

तुकाराम तुकाराम । नाम घेता कांपे यम ।। धन्य तुकोबा समर्थ । जेणें केला पुरुषार्थ ।
जळीं दगडासहित वह्या । तारियल्या जैशा लाह्या ।। म्हणे रामेश्वरभट्ट द्विजा । तुका-विष्णु नाहीं दुजा ।

भक्तिभावाने समर्पण



मातृकृपांकित

तीर्थरूप कै. नरहरशास्त्री जोशी, खरशीकर.

# श्रीतुकाराम महाराजांच्या चरणी स्तुतिसुमनांजली

भक्त भागवत जीवन्मुक्त संत । महिमा अत्यद्‌भुत चराचरीं ॥
ऐसिया अनंतामाजी तू अनंत । लीलावेश होत जगत्राता ॥
ब्रह्मानंद तुके तुके आला तुका । तो हा विश्वसखा क्रीडे जनीं ॥
शास्त्र श्रेष्ठाचार अविरुद्ध क्रिया । विधिविणे योगेंशी ब्रह्मार्पण ॥
भक्तिज्ञानें आणि वैराग्यें आगळा । ऐसा नाहीं डोळा देखियेला ॥
जप तप यज्ञ लाजविली दानें । हरिनामकीर्तनें करूनिया ॥
मागें कवीश्वर जाले थोर थोर । नेले कलेवर कोणे सांगा ॥
म्हणे रामेश्वर सकळां पुसोनी । गेला तो विमानीं बैसोनिया ॥

—रामेश्वर भ

प्रपंचरचना सर्वही भोगुनि त्यागीली । अनुतापाचे ज्वाळीं देहबुद्धि हविली ॥
वैराग्याची निष्ठा प्रकटुनि दाखविली । अहंता ममता दवडुनि निजशांती वरिली ॥ १ ॥
जयजय जी सद्‌गुरु तुकया दातारा । तारक संतांचा तू जिवलग सोयरा ॥
हरिभक्तीचा महिमा विशेष वाढविला । विरक्ति ज्ञानाचा ठेवा उघडुनि दाखविला ॥ २ ॥

—निळो

तुकोबाचीं पदें अद्वैत प्रसिद्धें । तयांच्या अनुवादें चित्त झुरे ॥
ऐसीं ज्याचीं पदें तो मज भेटता । जीवासी या होता तोष बहु ॥
तुकोबाचा छंद लागला मनासी । ऐकतां पदासी कथेमध्यें ॥
तुकोबाची भेटी होईल तो क्षण । वैकुंठसमान होय मज ॥
तुकोबाची कानीं ऐकेन हरिकथा । होये तैसे चित्ता समाधान ॥
तुकोबाचे ध्यान करूनि अंतरें । राहें त्या भितरीं घरामाजी ॥
बहेणी म्हणे तुका सद्‌गुरु सहोदर । भेटतां अपार सुख आहे ॥
मत्स्य जैसा जळावांचूनि चरफडी । तैसी ते आवडी तुकोबाची ॥
अंतरींचा साक्ष असेल जो प्राणी । अनुभवें मनीं जाणेल तो ॥
तृषितासी जैसे आवडे जीवन । तैसा पिंड प्राणेवीण तया ॥
बहेणी म्हणे हेत तुकोबाचे पायीं । ऐकोनिया देहीं पदें त्याचीं ॥

—बहिणाब

निर्गुण गुणवंता । तुकारामा समर्था । मागुती भेटी देई । पायीं ठेवीन माथा ॥ १ ॥
वर्तुळ वोंट पोट । नेत्र नासिक कंठ । देखिल्या दंतपंक्ति । तुकाराम समर्थी ॥ २ ॥
देखिले रूप जैसे । ह्यास दाविले तैसे । सावळें रूप बापा । त्याचे लागले पिसें ॥ ३ ॥
उंच ना ठेंगणा हो । ध्यानीं हेंचि हें राहो । मानसीं कचेश्वरा । गुरु तुकोबा पाहा हो ॥ ४

—कचेश्व

स्वात्मानुभव पहातां तुकया केवळ सखाचि जनकाचा ।
वैराग्यें डोलविला माथा जेणे मुनींद्र सनकाचा ॥ १ ॥
ज्याच्या सदभंगातें सेवी जन जेंवि बाळ आम्यातें ।
धनसा म्हणे मरावे सुरसे जें सुख करील आ म्या तें ॥ २ ॥
ज्याच्या होय अभंगावाचुनि होऊनि हरिकथा नाहीं ।
श्रोत्यांसि अभंगाहीं तो दे जसि माय हरिख पानाहीं ॥ ३ ॥

श्री

# पुरस्कारादाखल चार शब्द

ह भ प शंकर महाराज खदारकर याच्या श्रीतुकाराम महाराज गाथाभाष्याचे दोन भाग नुकतेच प्रसिद्ध झाले आहेत त्यातील पहिल्या भागास प्रास्ताविक म्हणून मी चार शब्द लिहिले आहेत.

जवळ-जवळ गाथाभाष्याच्याच प्रसिद्धीच्या वेळीच डॉ प्र न जोशी याचा ' सार्थ तुकाराम गाथा ' खड पहिला प्रसिद्ध होत आहे यासाठी पुरस्कार म्हणून चार शब्द मी लिहीत आहे, हे पाहून वाचकास थोडे आश्चर्य वाटण्याचा सभव आहे म्हणून त्यासबधी खुलासा करणे हे माझे पहिले कर्तव्य आहे

शिवाय, हा खुलासा करताना पुरस्काराचाही त्यात भाग सहजच येत असल्याने पुरस्कार म्हणून वेगळे लिहिण्याचे कारणच पडणार नाही

या दोन सार्थ गाथ्याचा विषय जरी तुकारामबोवाचे अभग हा एकच असला तरी त्या दोन गाथ्याचे कर्ते भिन्न आहेत. ह भ प शंकर महाराज हे वऱ्हाडातील उमरखेड येथे ज्याची समाधी आहे त्या श्रीसाधु महाराजाचे वशज आहेत अनेक पिढ्याचे वारकरी आहेत त्यानी स्वत अधिकारी पुरुषा-जवळ वेदान्तशास्त्राचे उत्तम अध्ययन करून त्यावर प्रभुत्व मिळवले आहे पढरपुरात अनेक चातुर्मास राहून ज्ञानेश्वरी, तुकोबाचा गाथा यावर प्रवचन-कीर्तने केली आहेत यामुळे त्याच्या अर्थावर वारकरी सप्रदायाच्या ज्ञानाच्या लाभाचा, शास्त्राध्ययनाचा, उपासनेचा परिणाम होणे स्वभाविक आहे त्याच्या सार्थ गाथ्याचे नाव ' गाथाभाष्य ' आहे

डॉ प्र न जोशी याचे वडिल कै ह भ प खरशीकर शास्त्री हे उत्तम शास्त्री होते व सत-वाङ्मयाचे मोठे व्यासगी होते डॉ प्र न. जोशी हे त्याचे चिरजीव असल्याने सतवाङ्मयाशी त्याचा परिचय अगदी बालपणापासून झालेला असणे हे अगदी स्वाभाविक आहे

शिवाय त्यानी स्वत सतवाङ्मयाचा अभ्यास करून ' मराठी साहित्यातील मधुर भक्ति ' या विषयावर प्रबध लिहून पुणे विश्वविद्यालयाची Ph D ची पदवी सपादन केली आहे व तो त्याचा प्रबध प्रसिद्धही झाला आहे पाश्चात्य पद्धतीने त्याचा अभ्यास झाल्याने ते सतवाङ्मयाकडे सप्रदाय अथवा परपरा याहून थोड्या स्वतत्र अशा बुद्धीने पाहू शकतात

या दोन सार्थ गाथ्याचे कर्ते अशा रीतीने वेगवेगळ्या सस्कारानी युक्त असल्याने अभग तुका-रामाचेच, पण त्याकडे पहाण्याचे दोघाचे दृष्टिकोन एकमेकापासून भिन्न असावेत, हे अगदी स्वाभाविक आहे ही भिन्नता त्याच्या प्रयत्नाच्या नामाभिधानावरूनही कळून येणारी आहे एका प्रयत्नाचे नाव आहे ' गाथा-भाष्य ', दुसऱ्याचे नाव आहे ' सार्थ तुकारामगाथा '

तात्पर्य, दोघाचे दृष्टिकोन भिन्न आहेत म्हणूनच दोघाच्या प्रयत्नासही पुरस्कार म्हणून चार शब्द लिहिणे शक्य झाले आहे

तुकारामबाबाच्या अभगाची भाषा जरी ज्ञानेश्वरीपेक्षा अर्वाचीन असली तरी, ते अभग सर्वच सहज समजतील असे मात्र नाहीत उलट प्रत्येक अभग हा एक स्वतत्र तुकडा आहे यामुळे एकाच माण-साला सर्व बाजू दिसतील असे नाही व यामुळेच सर्व बाजूनी पाहून तो पदरात घ्यावा लागतो त्यातील काही अभग तर खूपच कठीण आहेत यामुळे अशा अभगावर वेगवेगळ्या अगाने प्रकाश पडला तर तो हवाच आहे. त्यायोगे अभगाची उकल होण्यास मदतच होईल

या दृष्टीने हे दोन्ही प्रयत्न स्वागतार्हच आहेत इग्रजीत एक म्हणही आहे More the merrier व म्हणूनच मी दोन्ही गाथ्याना पुरस्कार लिहिण्याचे ठरविले.

ह. भ प. शकर महाराज यानी आपल्या 'गाथा भाष्यात' फक्त आरंभाच्या एका अभगाचा अर्थ देऊन विवरण दिले आहे पुढे मात्र सर्व अभगाचा अर्थच दिला आहे

डॉ जोशी याच्या 'सार्थ तुकारामगाथा' या ग्रथात जास्त माहिती आहे प्रथम अभग देऊन शब्दार्थ व टीपा दिल्या आहेत, व मग सपूर्ण अभगाचा अर्थ दिला आहे शब्दार्थ व टीपा दिल्याने कोणत्या शब्दाचा कोणचा अर्थ होतो, हे समजण्याची चागली सोय झाली आहे अर्थ देत असतानाही स्पष्टीकरण करण्याचा प्रयत्न केला आहे पण त्यास मदत म्हणून काही अभगावर अर्थ देऊन विवरणही दिले आहे. हेतू असा की, अर्थाचा खुलासा अधिक व्हावा अभगाबाबत इतका प्रपच केल्यामुळे या पहिल्या खडात सुमारे बाराशे अभगाचाच विचार झालेला आहे

या विवरणामुळे तुकाराम महाराजाचा स्वभाव, अभगातील विषय माडण्याची दृष्टी, त्याची सामाजिक, धार्मिक मते, त्याचे तत्त्वज्ञान, यावर प्रकाश पाडण्यास मदत होणारी आहे

तुकारामबोवाच्या अभगाचा, सर्व अभगाचा अर्थ सर्वानाच लागेल असे नाही. डॉ जोशी यानी अभगाचा अर्थ करताना स्वतत्र बुद्धीचा, व थोडासा ऐतिहासिक पद्धतीचा उपयोग केला आहे निव्वळ साप्रदायिक पद्धती जशी थोडी सदोष आहे, तशी सप्रदाय न बघता स्वतत्र बुद्धीने अर्थ करण्यातही दोष उत्पन्न होण्याचा सभव आहे उदाहरणार्थ, त्याच्या 'बाळो जन मज म्हणोत शिदळी।' प्रथमचरण, अथवा 'दुर्जे खडें तरी' (शेवटचा चरण) याचे अर्थ पहाण्यासारखे आहेत वस्तुस्थिती अशी आहे की, तुकारामबोवाच्या गाथ्याचा अर्थ करण्यास सप्रदायाचे ज्ञान व शास्त्रदृष्टी दोन्हीही हवीत.

काही काळ तुकोबाच्या गाथ्याची सार्थ प्रत मिळतच नव्हती आता योग असा आला आहे की, दोन वेगवेगळ्या अधिकाराच्या व्यक्तीनी एकाच वेळी आपले अर्थ प्रसिद्ध केले आहेत. यामुळे अभ्यासकाची सोय चागली झाली आहे

श्रीतुकोबाच्या गाथ्याच्या अभ्यासूस या दोन्ही प्रयत्नाचा उपयोग होऊन त्याला स्वत ला अर्थ ठरवण्यास मदत होईल अशी आशा आहे

—शं. वा. दांडेकर.

पुणे २८।२।६६

---

# तुकाराम महाराजांचे संक्षिप्त चरित्र

तुकाराम महाराज यांचा जन्म शके १५३० सन १६०८ या वर्षी इंद्रायणी नदी तीरावर असलेल्या देहू या गावी एका पवित्र अशा कुळात झाला तुकारामबुवांचे आठवे पूर्वज विश्वंभरबावा हे मोठे भगवद्‌भक्त असल्याने त्यांच्या वेळेपासूनच या कुळात विठ्ठलभक्ती, नामस्मरण व पंढरीची वारी यांचे माहात्म्य वाढलेले होते तुकाराम बुवांच्या घरचा व्यवसाय दुकानदारीचा, वाण्याचा असून घरी थोडीफार महाजनकी अथवा सावकारकीही होती '*याती शूद्र वैश्य केला वेवसाय,*' '*बरे देवा कुणबी केलो,*' '*शूद्रवंशी जन्मलों*' इत्यादी शब्दांवरून तुकारामबुवांची जात शूद्र मानण्याचे कारण नाही, ते सामान्यत मराठी कुणबी या कुळातील असावेत

तुकाराम महाराजांच्या वडिलांचे नाव बोल्होबा व आईचे नाव कनकाई असे असून यांचीही विठ्ठलाची उपासना चांगली मनापासून असे. आषाढी कार्तिकीची वारी यांची कधी चुकत नसे अन्नदान, गरिबांविषयी दया, संतांचा सन्मान, विठ्ठलावर दृढ निष्ठा, भजनपूजन, सदाचार यांचे महत्त्व, या घरी विशेष प्रकारचे असे सावकारकी, व्यापारधंदा व महाजनकी प्रथम प्रथम चांगलीच चालत असावी

तुकोबांना आयुष्याच्या पहिल्या बारा तेरा वर्षांत विशेष चिंता नसावी बरोबरीच्या मुलांच्यात खेळावे, इंद्रायणीवर स्नान करावे, विठ्ठलाची पूजा करावी आणि बापाबरोबर दुकानदारी समजावून घ्यावी, असा साधा जीवनक्रम बुवांचा प्रथम असावा तुकोबांना बंधू दोन होते एक थोरला सावजी व दुसरा धाकटा कान्होबा त्यांच्या आईवडिलांनी आपल्या मुलांची लग्ने करून दिली तुकोबांचे लग्न त्यांच्या वयाच्या चौदाव्या वर्षी झाले बायकोचे नाव रखमाबाई परंतु ही नेहमी आजारी असल्याने अप्पाजी गुळवे या एका श्रीमंत सावकाराच्या मुलीशी तुकोबांचे दुसरे लग्न झाले, व जिजाबाई तथा आवली त्यांच्या आयुष्यात येऊन स्थिर झाली संसाराचे सुख मातापित्यांच्या सावलीत बुवांनी पहिली काही वर्षे उत्तम प्रकारे भोगले, पण पुढे काळच पालटल्यासारखे झाले थोरला भाऊ सावजी हा मूळचाच अतिशय विरक्त असल्यामुळे संसार तुकोबांनी पाहावा हे ओघानेच आले, व तुकोबा वडिलांच्या बरोबर व्यवहार पाहू लागले

परंतु पुढे संसारात एकामागून एक अशी संकटपरंपरा उभी राहिली प्रथम वडील, व नंतर दोनतीन वर्षांत आई, यांच्या मृत्यूने तुकोबांच्या मनावर आघात झाला आणि ही मृत्यूची परंपरा वाढत गेली थोरली भावजय मरण पावली, पहिली बायको अन्नअन्न करिताना मरून गेली, पहिला मुलगा संताजी मरण पावला थोरला भाऊ वैराग्याच्या भरात घर सोडून निघून गेला सर्व संसाराचा भार एकाएकी तुकोबांच्या खांद्यावर येऊन पडला तशात बाहेरची परिस्थिती विचित्रपणे पालटली दुष्काळाने उग्र स्वरूप धारण केले, दुकानदारी बुडाली, कर्ज वाढत राहिले येणे वसूल होईनासे झाले, दुकानचे दिवाळे निघाले या सर्व संकटांनी तुकारामबुवांचे मन उद्विग्न झाले मूळचेच भक्तिप्रवण मन आता या संसारातून उठून जाऊ पाहात होते. दुसरी बायको कर्कशा असल्याने तही वचन बवांना फारसे या वैराग्याच्या काळात राहिले नाही त्यांना संसाराचा व घराचा वीट आला

'**संसाराच्या तापें तापलों मी देवा**' या अभंगात आपल्या संसाराची वाताहत कशी झाली, याचे, मोठे हृदयभेदक चित्र बुवांनी काढले आहे त्यामुळे त्यांचे चित्त संसारात रमण्याऐवजी श्रीविठ्ठलाकडे केंद्रित झाले '**विठो तुझें माझें राज्य । नाहीं दुसऱ्याचें काज**' अशा एकत्वाच्या नात्याने तुकाराम बुवा फटकळपणे घरातून उठून जवळच असणाऱ्या भामनाथाच्या किंवा भंडाऱ्याच्या डोंगरावर जाऊन भजन, ज्ञानेश्वरी, नाथभागवत, गीता यांचे वाचन, विठ्ठलचिंतन यांच्याच नादात दंग होऊन गेले

कर्मकांडावर त्यांनी कडाडून असा प्रखर शब्दात हल्ला केला आहे लोक संसार-संसार, पैसा-पैसा, बायको-बायको करीत असताना कसे बेभान होतात व विठ्ठलाला कसे विसरतात, याचे वर्णन त्यांनी अनेक उदाहरणे देऊन केले आहे. निरनिराळ्या प्रसंगाच्या निमित्ताने त्यांनी संसारी लोकांना सावध करून भक्तिमार्गास लाविले नामसंकीर्तनाचा सोपा मार्ग जो भागवत संप्रदायात रूढ होऊ पाहात होता, त्यास त्यांनी चालना दिली ज्या जिजावाईचे किंवा आवलीचे नाव तुकोबाच्या चरित्रात वारंवार कडवटपणे उच्चारिले जाते, तिच्याही बाजूने पुष्कळच सहानुभूतीने बोलण्यासारखे आहे तुकारामबुवांनी तिलाही उपदेश करून पूर्ण बोधाचे बारा अभंग लिहिले आहेत

याप्रमाणे तुकोबांनी स्वत चा उद्धार करून घेतलाच पण त्यांचे कुटुंबीय व त्यांच्या भोवतीचा परिवार यांनाही विठ्ठलभक्तीचे सुख समजू लागले. तुकारामबुवांची कीर्ती अवघ्या महाराष्ट्रात पसरत राहिली त्यांच्या भोवती शिष्यसमुदाय मोठ्या प्रमाणावर जमू लागला तुकारामबुवांना जिजाबाईपासून काशी, भागीरथी व गंगा अशा तीन कन्या व महादेव, विठ्ठल व नारायण असे तीन मुलगे, अशी अपत्ये झाली या लहानशा कुटुंबाबाहेर अवघे विश्व तुकोबांना जवळचे झाले होते **देवासाठीं झालें ब्रह्मांड सोयरें** ' असे त्यांनी म्हटले आहे निळोबाराय पिंपळनेरकर, रामेश्वरभट्ट वाघोलीकर, गंगाराम मवाळ कडूसकर, महादाजीपंत कुलकर्णी देहूकर, कोंडोपंत लोहोकरे, मालजी गाडे येलवाडीकर, गवरशेट सुदुंब्रेकर, संताजी जगनाडे, लोहगावकर इत्यादी अनेक शिष्य मंडळी बुवांच्या भोवती जमा झाली निळोबाराय पिंपळनेरकर यांच्या परमार्थामधील अधिकारासंबंधी जितके लिहावे तितके थोडेच आहे '**येऊनिया कृपावंतें । तुकया स्वामी सद्गुरु नांवें । हात ठेविला मस्तकीं । देऊनि प्रसाद केलें सुखी** ' असा आपला व तुकोबांचा संबंध निळोबांनी वर्णन केलेला आहे असेच नाव या भक्तीच्या व परमार्थवृत्तीच्या प्रान्तात तुकोबांच्या कृपेने कमाविले आहे ते बहिणाबाई या थोर व अधिकारसंपन्न अशा स्त्रीने '**मत्स्य जसा जळावांचूनी चरफडी । तैसी ते आवडी तुकोबाची** ' अशा प्रकारची तगमग तिची तुकोबांसाठी असे हिला तुकोबांनी स्वप्नात मंत्रोपदेश दिला '**स्वप्नामाजी कृपा पूर्ण केली** ' अशी साक्ष बहिणाबाईची आहे

याप्रमाणे तुकारामबुवा आपल्या जीवनात ईश्वरी प्रसादाने तृप्त झाले '**तुका प्रेमें नाचे गाये । गाणियात विरोनि जाये** ' अशी त्यांची अवस्था झाली '**सर्व सुखें पायीं बोळगिती,**' '**खुंटलीया धाव तृष्णेचिया,**' '**वेध श्रीरंगें लावियेला** ' अशा तृप्तीच्या आनंदात तुकोबांनी स्वत चा व लोकांचा उद्धार केला व आपल्या नंतरही अखंडपणे लोकांना प्रेरक व मार्गदर्शक ठरेल असे अभंगवाङ्मय निर्माण केले अणुरेणूएवढे असलेले तुकारामबुवा आकाशाएवढे बनून राहिले '**तुझी माझी एक ज्योती** ' अशी अनुभूती त्यांना येत राहिली जिवतपणीच ते नारायणाच्या स्वरूपात जाऊन जणु मिळाले होते '**निरंजनीं आम्हीं बांधियेलें घर**', '**झाला प्रेतरूप शरीराचा भाव**' '**बीज भाजुनी केली लाही । आम्हा जन्ममरण नाहीं** ' यासारख्या अनुभवातून तुकारामबुवा जात होते भक्तिमार्गाच्या पथावर ते कळसरूपाने स्थिर झाले शके १५७१ च्या फाल्गुन व १ रोजी त्यांनी देहूस गोपाळपुरा येथे नांदुरकीच्या वृक्षाखाली कीर्तन केले आणि फाल्गुन व २ या दिवशी तुकोबांनी या लोकीची यात्रा संपविली ते सदेह वैकुंठाला गेले असा समज पुष्कळांचा आहे '**घरा आलें वैकुंठपीठ** ' अशी ज्यांची अनुभूती ती मात्र त्यांच्या अभंगवाणीत आजही ताजी टवटवीत अशी आहे

# तुकाराम महाराजांची अभंगवाणी

अलौकिक तेजाचा उगम कसा, कुठे व केव्हा होतो, याचे गणित अजून कुणासही समाधान-
कारक रीतीने सुटलेले नाही 'शुचीना श्रीमता गेहे योगभ्रष्टोऽभिजायते-योगभ्रष्ट झालेला पुरुष
शुचिर्भूत व श्रीमान् लोकाच्या घरी जन्म घेतो' असा निर्वाळा भगवद्गीतेने दिलेला आहे पूर्वपुण्याई,
घराण्याचे सस्कार, शिक्षण, परिस्थिती, सगती इत्यादी अनेक कारणाचे चिंतन विचारवतानी या
बाबतीत केलेले आहे पुढील अनत काळावर तीव्रपणे ठसा उमटविण्याचे सामर्थ्य असणारी दिव्य
प्रतिभा किंवा अलौकिक शक्ती कोणत्या अवस्थेत जन्मास येते? कशी विकसित होते? या प्रश्नाच्या
उत्तराविषयी काही तर्क करिता येतात, काही अनुमाने बाधता येतात, पण शास्त्रीय दृष्टीने उत्तर देणे
अजून कुणासही जमलेले नाही।

## 'अभंगवाणी प्रसिद्ध तुकयाची'

सन १६०८ मध्ये देहूसारख्या खेडेगावच्या मातीच्या कणात व तेथल्याच इद्रायणीच्या पाण्यात
असे कोणते गुणधर्म निर्माण झाले की, ज्यातून एक अलौकिक तेज मुसावले जाऊन तुकाराम या नावाने
नावारूपास आले? वृत्तीने वाणी, जन्माने कुणबी, लौकिक शिक्षणाचा म्हणावा असा सस्कार नाही,
उच्च वर्णीयाना मिळणारी परपरागत अशी अनुकूल पार्श्वभूमी नाही, व्यावसायिक व सासारिक जीवन
तसे म्हटले तर प्रतिकूलच पण अशाही परिस्थितीत तुकोबाच्या मनाने जी आकाशास भिडणारी झेप
घेतली, ती कशाच्या बळावर? अनेक विद्याचे सस्कार झाले असले तरी, चार ओळी लिहिताना
अडखळणारे, अडणारे आपणास माहीत आहेत तुकाराम महाराजाना असे काय प्राप्त झाले की, ज्याच्या
योगाने त्याच्या मुखातून अशी अभगवाणी बाहेर पडली की, तिच्यापासून ते स्वत तर तृप्त झालेच,
पण त्याच्या भोवतीचे लोकही सतुष्ट होऊन गेले त्याच्या नतरही त्याच्या अभगवाणीने साऱ्या मराठी
माणसाना मुग्ध केले 'अभगवाणी प्रसिद्ध तुकयाची' असाच रिवाज सर्वांच्या बोलण्यातून निर्माण
झाला स्त्री, पुरुष, बाल, वृद्ध, व्यावसायिक, पारमार्थिक, उच्चवर्णीय, मध्यमवर्णीय, सर्वांनाच या
तुकाराम महाराजाच्या अभगाचे एवढे वेड लागलेले दिसते की, प्रत्येकाला तो आपल्या अतरगातील
जिव्हाळ्याचा ठेवा वाटावा ससारताप, व्यावसायिक अपयश, परमार्थमार्गातील हुरहूर, असे कोणतेही
कारण असो, प्रत्येकास आधार मिळाला आहे तो तुकाराम महाराजाच्या अभगवाणीचा तुकाराम-
बुवाच्या अभगातील दहापाच ओळी तरी माहीत नाहीत, असा मराठी मनुष्य सहसा मिळणार नाही
शिक्षणाचा प्रसार नव्हता, तेव्हाही सबध गाथा पाठ म्हणून दाखविण्याचे चमत्कार करणारे काही थोर
भक्त होते प्रसिद्ध भक्तवर कै बाबुराव हरि देवडीकर याचे साडेचार हजार अभग पाठ होते।

काढतात मा वाटता, कुणाला त्याच्या भाषासरणीचा अभ्यास करावासा वाटतो, कुणी त्याच्या चरित्रातील ऐतिहासिक प्रसंगाची सत्यता पडताळून पाहात असतात, कुणी त्याच्या अभंगाचा क्रमविकास बसविण्याच्या नादात असतात, कुणाला त्याच्या सगुणभक्तीने चटका लाविला असतो, तर कुणास त्याच्या निर्गुणनिराकाराच्या उपासनेची बौद्धिक उंची प्रिय वाटते कुणी त्याच्या द्वैत अथवा अद्वैत तत्त्वज्ञानाचा शोध घेतात, तर कुणी त्याना आलेल्या गूढ अशा आध्यात्मिक अनुभूतीची मानसशास्त्रीय चिकित्सा करतात कुणी त्याच्या आयुष्यातील चमत्कारिक गोष्टीचा अर्थ लावण्याचा प्रयत्न करतात, तर कुणी त्याच्या परपरेचा शोध घेतात कुणी त्याच्या नावाविषयी, गावाविषयी, जन्मशकाविषयी, जातिविषयी, व्यवसायाविषयी, शिक्षणाविषयी, गुरुपरपरेविषयी त्याच्या नामदेवाच्या प्रेरणेविषयी, त्याच्या सदेह वैकुठगमनाविषयी उत्सुकतेने चर्चा करीत असतात कोणत्या का होईना, पण एखाद्या बलवत्तर अशा कारणाने देहूच्या या भगवद्भक्ताने सर्वांचे लक्ष आपणाकडे वेधून घेतले आहे खास

## 'धन्य देहू गाव'

तुकोबाच्या या लोकप्रियतेचे व त्याच्या अभगवाणीच्या यशाचे नेमके गमक कोणत ? त्याच्या आयुष्यातील मुख्य प्रेरणा कोणत्या ? त्याच्या जीविताचा क्रमविकास व त्याच्या मानसिक अवस्थाची श्रेणी याचा काही सबध जुळविता येतो का ? प्रथम आपण तुकोबाच्या घरच्या किंवा घराण्याच्या काही प्रेरणा शोधण्याचा प्रयत्न करू तुकारामबुवानी आपल्या गावाचे वर्णन **धन्य देहू गाव पुण्यभूमी ठाव । तेथें नादे देव पाडुरग'** या अभगात विस्ताराने केले आहे तथील श्रीविठ्ठल, रखुमाई इद्रायणी-तीर, हरेश्वर, गरूड, हनुमत, लक्ष्मीनारायणाचे मदिर, इत्यादी खुणा तुकाराम महाराजानी या अभगात दिलेल्या आहेत **'पवित्र तें कुळ पावन तो देश । जेथें हरिचे दास जन्म घेती'** असे दुसऱ्या एका अभगात त्यानी हरिदासाच्या, भक्ताच्या जन्मभमीचे व कुळाचे माहात्म्य वणन केले आहे

## 'माझ्या वडिलाची मिरासी'

या पवित्र भूमीत एका प्रतिष्ठित व विठ्ठलभक्तिसपन्न अशा कुळात तुकोबाचा जन्म झाला तुकोबानी आपल्या कुळाची थोरवी अनेकदा वर्णन केली आहे **'शुद्धबीजा पोटीं । फळें रसाळ गोमटीं'** असे त्यानीच एका अभगात म्हटल्याप्रमाण अतिशय शुद्ध अशा कुळात हे भक्तीचे रसाळ व गोमटे असे फळ निर्माण झाले याच्या घराण्यातील आठवे पूर्वज विश्वभरबाबा हे माठेच विठ्ठलभक्त होते त्याच्याच वेळेपासून या गावास क्षेत्राचे महत्त्व प्राप्त झाले असावे याच विश्वभरबाबानी देहूस विठ्ठलाचे मदिर बाधले त्यात विठ्ठलमूर्तीची स्थापना केली अशी ही विठ्ठलपरपरा तुकाबाच्या वशाची मिरासदारी आहे **'विठ्ठल कुळींचे दैवत', 'आदि तो हा देव कुळपूज्य', 'सहज वडिलां होती सेवा । म्हणोनि पूजितों या देवा'** असे तुकाबानी आपल्या कुळाच्या दैवताचे वणन केले आहे **'पढरीची वारी आहे माझ्या घरीं'** म्हणून त्यानी साथ अभिमानान उल्लेख केलेला आहे **'तुका म्हणे सत सेवा । माझ्या पूवजाचा ठेवा'** अशा आपल्या आनुवंशिक ठव्याचे वारवार वणन तुकारामबुवानी केले आहे **'व्रत एकादशी करीन उपवासी । गाईन अहर्निशी मुखीं नाम'** अशा भाषेत तुकोबानी आपल्या घराण्याच्या पवित्र परपरेचा उल्लेख केलेला आहे या पावन कुळातील भक्तिपरपरेचा सस्कार तुकोबाच्या मनावर झालेला असावा

## सुस्थितीचा ससार

तुकाराम महाराजाच्या घरी महाजनकी होती थोडी सावकारकी असावी त्याच्या घराण्याचा व्यवसाय वैश्याचा, वाण्याचा तेव्हा घरी दुकानदारी व व्यापार या गोष्टी ओघाने आल्याच तुकाराम-बुवाचे लक्ष प्रथमपासूनच या व्यवसायात बऱ्यापैकी असावे आईवडिलाच्या सुखद छायेत बाळपणही सुखाचे गेले असावे टिपऱ्या, चेंडू, मृदगपाट्या, हुतूतू हुबरी, विटीदाडू, कुरघोडी इत्यादी खेळाची त्यानी

पुढे जी वहारीची वर्णने केली आहेत, ती बहुधा त्याच्या स्वानुभवाचीच असावीत तुकोबाचे जनक बोल्होबा व आई कनकाई यांचीही विठ्ठलाचरणी असीम भक्ती होती आपाढी–कार्तिकीची वारी घरी चालू होती दानधर्म, वैष्णवाचा मळार, भजनपूजन याच्या परिसरातच तुकोबा ल्हानाचे मोठे होत होते. पहिली पत्नी रखुमाई दीर्घकाळ आजारी असल्याने तुकोबाचे दुसरे लग्न त्याच्या आईबापानी करून दिले या दुसऱ्या बायकोने, जिजाबाई ऊर्फ आवलीने तुकोबाच्या चरित्रात बरेच नाव कमाविले आहे तुकोबाचा ससार प्रारभी तरी आनदी होता 'मातापिता बधु सज्जन। घरीं उदड धनधान्य। शरीर आरोग्य लोकात मान्य। एकही उणें असेना' अशा सुस्थितीच्या ससाराचे चित्र आकर्षक नव्हते असे कोण म्हणेल ?

## सासारिक आपत्ती

परतु देवाला या भक्तास केवळ ससार करू द्यावयाचा नव्हता असे दिसते त्याच्यावर एका-मागून एक असे घाव प्रथम घरून बसण्यास प्रारभ झाला. 'बाप मेला न कळतां' ही पहिली मोठी आपत्ती थोड्याच दिवसात आई मरण पावली थोरला बधू सावजी याची पत्नी मरण पावली व तो वैराग्याच्या भरात घर सोडून निघून गेला त्याची पहिली बायको अन्नान्न करून मरण पावली पहिला मुलगा सताजी मरण पावला या घरच्या आघाताने वयात येणारे सासारिक तुकारामबुवा गागरून गेले असल्यास नवल नाही मूळची वृत्ती अतिशय सात्त्विक, विठ्ठलावर भरवसा मोठा, पण एकामागून एक अशा कोसळणाऱ्या सकटानी तुकोबाचे मन व्यथित झाले असावे अशा वेळी मनास जपणारी, हळुवारपणे फुकर घालून दुःख हलके करणारी पत्नी असावी ना ? पण त्याना हे सुख म्हणावेसे नव्हते सावलीच्या बाजूने पुष्कळच म्हणण्यासारखे असले तरी, तुकोबानी 'बाईल कर्कशा' म्हणूनच तिचा उल्लेख केलेला आहे 'कर्कश सगती। दुःख उदड फजीती' असाच अनुभव त्यानी सागितला आहे

## बाहेरच्या सकटाचा वर्षाव

घरात झालेल्या या पडझडीत भर पडली, ती बाहेरच्या विलक्षण आपत्तीची भग मोठा दुष्काळ पडला, व्यापार बसला, दुकानदारी बुडाली, दणे वाढले, शेतीतील पिके नष्ट झाली व शेवटी दुकानाचे दिवाळे निघाले कर्त्या पुरुषाच्या मनावर अशा आघातानी जो परिणाम होतो, त्याचेही वर्णन तुकारामबुवानी मधून मधून केले आहे आपल्या ससाराच्या व व्यवसायाच्या वाताहतीचे मोठे विदारक चित्र त्यानी एकदोन ठिकाणी काढले आहे. 'सवसारें जालों अति दुःखें दुःखी' येथपासून प्रारभ करून त्यानी आपल्यावरील सकटाची मालिकाच निवेदन केलेली आहे 'दुष्काळें आटिलें द्रव्य नेला मान। स्त्री एकी अन्न अन्न करिता मेली। लज्जा वाटे जीवा त्रासलो या दुःखें। वेवसाय देखें तुटी येता' किंवा 'बहु पीडिलों ससारें' या शब्दात त्यानी आपल्या फजितीचे वर्णन केले आहे, आणि मग स्वत:चे समाधानही करून घेतले आहे 'बाईल मेली मुक्त झाली। देवें माया सोडविली', 'बरें झालें देवा निघालें दिवाळें। बरी या दुष्काळें पीडा केली' 'बरे झाले देवा बाईल कर्कशा। बरी हे दुर्दशा जनामध्यें' 'देव भक्तालागीं करू नेदी ससार' 'स्त्री द्यावी गुणवती तीर्थे गुते आशा। याणलागीं कर्कशा पाठी लावी' यासारख्या वचनात क्षणिक उद्वेग दिसतो ? तात्त्विक सिद्धान्ताचे मर्म दिसते ? हा विचारही एका अभ्यासास उपयुक्त पडण्यासारखा आहे

## 'येथें सार भगवत'

ससाराच्या, व्यवसायाच्या या वाताहतीनतर बुवाचे मन लौकिक जीवनातून उठले 'जाला हा वमन सवसार', 'फटकळ हा ससार। येथें सार भगवत' या निश्चयाने तुकोबाच्या आयुष्यास एक नवीन वाट मिळाली सुप्त असलेल्या विठ्ठलभक्तीस जोराची जाग प्राप्त होण्याचा समय प्राप्त झाला.

काढावासा वाटतो, कुणाला त्याच्या भाषासरणीचा अभ्यास करावासा वाटतो, कुणी त्याच्या चरित्रातील ऐतिहासिक प्रसंगाची सत्यता पडताळून पाहात असतात, कुणी त्याच्या अभंगाचा क्रमविकास बसविण्याच्या नादात असतात, कुणाला त्याच्या सगुणभक्तीने चटका लाविला असतो, तर कुणास त्याच्या निर्गुणनिराकाराच्या उपासनेची बौद्धिक उंची प्रिय वाटते कुणी त्याच्या द्वैत अथवा अद्वैत *तत्त्वज्ञानाचा शोध घेतात, तर कुणी त्याना आलेल्या गूढ अशा आध्यात्मिक अनुभूतीची मानसशास्त्रीय* चिकित्सा करतात कुणी त्याच्या आयुष्यातील चमत्कारिक गोष्टींचा अर्थ लावण्याचा प्रयत्न करतात, तर कुणी त्याच्या परंपरेचा शोध घेतात. कुणी त्याच्या नावाविषयी, गावाविषयी, जन्मशकाविषयी, जातिविषयी, व्यवसायाविषयी, शिक्षणाविषयी, गुरुपरंपरेविषयी, त्याच्या नामदेवाच्या प्रेरणेविषयी, त्याच्या सदेह वैकुंठगमनाविषयी उत्सुकतेने चर्चा करीत असतात कोणत्या का होईना, पण एखाद्या बलवत्तर अशा कारणाने देहूच्या या भगवद्भक्ताने सर्वांचे लक्ष आपणाकडे वेधून घेतल आहे यात्स

## 'धन्य देहू गाव'

तुकोबाच्या या लोकप्रियतेचे व त्याच्या अभंगवाणीच्या यशाचे नेमके गमक कोणते ? त्याच्या आयुष्यातील मुख्य प्रेरणा कोणत्या ? त्याच्या जीविताचा क्रमविकास व त्याच्या मानसिक अवस्थांची श्रेणी याचा काही संबंध जुळविता येतो का ? प्रथम आपण तुकोबाच्या घरच्या किंवा घराण्याच्या काही प्रेरणा शोधण्याचा प्रयत्न करू तुकारामबुवानी आपल्या गावाचे वर्णन **'धन्य देहू गाव पुण्यभूमी ठाव । तेथें नांदे देव पांडुरंग'** या अभंगात विस्ताराने केले आहे तथील श्रीविठ्ठल, रखुमाई, इंद्रायणी-तीर, हरेश्वर, गरुड, हनुमंत, लक्ष्मीनारायणाचे मंदिर, इत्यादी खुणा तुकाराम महाराजानी या अभंगात दिलेल्या आहेत **'पवित्र तें कुळ पावन तो देश । जेथें हरिचे दास जन्म घेती'** असे दुसऱ्या एका अभंगात त्यानी हरिदासाच्या, भक्ताच्या जन्मभूमीचे व कुळाचे माहात्म्य वर्णन केले आहे

## 'माझ्या वडिलांची मिरासी'

या पवित्र भूमीत एका प्रतिष्ठित व विठ्ठलभक्तिसंपन्न अशा कुळात तुकोबाचा जन्म झाला तुकोबानी आपल्या कुळाची थोरवी अनेकदा वर्णन केलेली आहे **'शुद्धबीजा पोटीं । फळें रसाळ गोमटीं'** असे त्यानीच एका अभंगात म्हटल्याप्रमाणे अतिशय शुद्ध अशा कुळात हे भक्तीचे रसाळ व गोमटे असे *फळ निर्माण झाले याच्या घराण्यातील आठवे पूर्वज विश्वंभरबाबा हे मोठेच विठ्ठलभक्त होते त्याच्याच* वेळेपासून या गावास क्षेत्राचे महत्त्व प्राप्त झाले असावे याच विश्वंभरबाबानी देहूस विठ्ठलाचे मंदिर बांधले त्यात विठ्ठलमूर्तीची स्थापना केली अशी ही विठ्ठलपरंपरा तुकोबाच्या वंशाची मिरासदारी आहे **'विठ्ठल कुळींचें दैवत', 'आदि तो हा देव कुळपूज्य', 'सहज वडिलां होती सेवा । म्हणोनि पूजितों या देवा'** असे तुकोबानी आपल्या कुळाच्या दैवताचे वर्णन केले आहे **'पंढरीची वारी आहे माझ्या घरीं'** म्हणून त्यानी सार्थ अभिमानाने उल्लेख केलेला आहे **'तुका म्हणे संत सेवा । माझ्या पूर्वजांचा ठेवा'** अशा आपल्या आनुवंशिक ठेव्याचे वारंवार वर्णन तुकारामबुवानी केले आहे **'व्रत एकादशी करीन उपवासी । गाईन अहर्निशी मुखीं नाम'** असे म्हणत तुकोबानी आपल्या घराण्याच्या पवित्र परंपरेचा उल्लेख केलेला आहे या पावन कुळातील भक्तिपरंपरेचा संस्कार तुकोबाच्या मनावर झालेला असावा

## सुस्थितीचा संसार

तुकाराम महाराजांच्या घरी महाजनकी होती थोडी सावकारकी असावी त्यांच्या घराण्याचा व्यवसाय वैश्याचा, वाण्याचा तेव्हा घरी दुकानदारी व व्यापार या गोष्टी ओघाने आल्याच तुकाराम-बुवाचे लक्ष प्रथमपासूनच या व्यवसायात बऱ्यापैकी असावे आईवडिलांच्या सुखद छायेत बाळपणही सुखाचे गेले असावे टिपऱ्या, चेंडू, मृदंगपाट्या, हुतूतू, हुवरी, विटीदांडू, कुरघोडी इत्यादी खेळांची त्यानी

पुढ जी बहारीची वर्णने केली आहेत, ती बहुधा त्याच्या स्वानुभवाचीच असावीत तुकोबाचे जनक बोल्होबा व आई कनकाई याचीही विठ्ठलाचरणी असीम भक्ती होती आषाढी–कार्तिकीची वारी घरी चालू होती दानधर्म, वैष्णवाचा सत्कार, भजनपूजन याच्या परिसरातच तुकोबा ल्हानाचे मोठे होत होते पहिली पत्नी रखुमाई दीर्घकाळ आजारी असल्याने तुकोबाचे दुसरे लग्न त्याच्या आईबापानी करून दिले या दुसऱ्या बायकोने, जिजाबाई ऊर्फ आवलीने तुकोबाच्या चरित्रात बरेच नाव कमाविले आहे तुकोबाचा ससार प्रारभी तरी आनदी होता **'मातापिता बधु सज्जन । घरीं उदड धनधान्य । शरीर आरोग्य लोकात मान्य । एकहीं उणें असेना'** अशा सुस्थितीच्या ससाराचे चित्र आकर्षक नव्हते असे कोण म्हणेल ?

## सासारिक आपत्ती

परतु देवाला या भक्तास केवळ ससार करू द्यावयाचा नव्हता असे दिसते त्याच्यावर एका-मागून एक असे घाव प्रथम घरून बसण्यास प्रारभ झाला. **'बाप मेला न कळतां'** ही पहिली मोठी आपत्ती थोड्याच दिवसात आई मरण पावली थोरला बधू सावजी याची पत्नी मरण पावली व तो वैराग्याच्या भरात घर सोडून निघून गेला त्याची पहिली बायको अनअन्न करून मरण पावली पहिला मुलगा सताजी मरण पावला या घरच्या आघाताने, वयात येणारे सासारिक तुकारामबुवा गागरून गेले असल्यास नवल नाही मूळची वृत्ती अतिशय सात्त्विक, विठ्ठलावर भरवसा मोठा, पण एकामागून एक अशा कोसळणाऱ्या सकटानी तुकोबाचे मन व्यथित झाले असावे अशा वेळी मनास जपणारी, हळुवारपणे फुकर घालून दु.ख हलके करणारी पत्नी असावी ना ? पण त्याना हे सुख म्हणावेसे नव्हते. सावलीच्या बाजूने पुष्कळच म्हणण्यासारखे असले तरी, तुकोबानी **'बाईल कर्कशा'** म्हणूनच तिचा उल्लेख केलेला आहे **'कर्कश सगती । दु ख उदड फजीती'** असाच अनुभव त्यानी सागितला आहे

## बाहेरच्या सकटाचा वर्षाव

घरात झालेल्या या पडझडीत भर पडली, ती बाहेरच्या विलक्षण आपत्तीची भला मोठा दुष्काळ पडला, व्यापार बसला, दुकानदारी बुडाली, देणे वाढले, शेतीतील पिके नष्ट झाली व शेवटी दुकानाचे दिवाळे निघाले कर्त्या पुरुषाच्या मनावर अशा आघातानी जो परिणाम होतो, त्याचेही वर्णन तुकारामबुवानी मधून मधून केले आहे आपल्या ससाराच्या व व्यवसायाच्या वाताहतीचे मोठे विदारक चित्र त्यानी एकदान ठिकाणी काढले आहे. **'सवसारे जालों अति दु खें दु खी'** येथपासून प्रारभ करून त्यानी आपल्यावरील सकटाची मालिकाच निवेदन केलेली आहे **'दुष्काळें आटिलें द्रव्य नेला मान । स्त्री एकी अन्न अन्न करिता मेली । लज्जा वाटे जीवा त्रासलो या दु खें । वेवसाय देखें तुटी येता'** किंवा **'बहु पीडिलो ससारें'** या शब्दात त्यानी आपल्या फजितीचे वर्णन केले आहे, आणि मग स्वत चे समाधानही करून घेतले आहे **'बाईल मेली मुक्त झाली । देवे माया सोडविली', 'बरें झालें देवा निघालें दिवाळें । बरी या दुष्काळें पीडा केली', 'बरे झालें देवा बाईल कर्कशा । बरी हे दुर्दशा जनामध्यें', 'देव भक्तालागीं करू नेदी ससार', 'स्त्री द्यावी गुणवती तोपें गुते आशा । यालागीं कर्कशा पाठी लावी'** यासारख्या वचनात क्षणिक उद्वेग किती ? तात्त्विक सिद्धान्ताचे मर्म किती ? हा विचारही एका अभ्यासास उपयुक्त पडण्यासारखा आहे

## 'येथें सार भगवंत'

ससाराच्या, व्यवसायाच्या या वाताहतीनतर बुवाचे मन लौकिक जीवनातून उठले **'जाला हा वमन सवसार', 'फटकळ हा ससार । येथें सार भगवत'** या निश्चयाने तुकोबाच्या आयुष्यास एक नवीन वाट मिळाली सुप्त असलेल्या विठ्ठलभक्तीस जोराची जाग प्राप्त होण्याचा समय प्राप्त झाला-

दुकानदारी व प्रपंच करण्यातच गुतण्यापेक्षा अवघ्या विश्वाची उठाठेव करण्याची शक्ती जेथे मिळते, तेथेच त्याचे चित्त गुंतून राहिले. त्यानी आपल्या नव्या साधनमार्गाचीही नोंद तपशीलाने दिलेली आहे तुकाराम महाराजाच्या साधनक्रमाचे एका अभगात सक्षेपाने पण स्पष्ट असे वर्णन आले आहे. 'याती शूद्र वैश्य केला वेवसाय' या प्रसिद्ध अशा आत्मनिवेदनपर अभगात ते या साधनमार्गाचा खुलासा करताना म्हणतात,

> देवाचें देऊळ होतें तें भंगलें । चित्तासी जें आलें करावें तें ॥
> आरंभीं कीर्तन करी एकादशी । नव्हतें अभ्यासीं चित्त आधीं ॥
> कांही पाठ केलीं संताचीं उत्तरें । विश्वासें आदरें करोनियां ॥
> गाती पुढें त्याचें धरावें ध्रुपद । भावें चित्त शुद्ध करोनियां ॥
> संताचें सेविलें तीर्थ पायवणी । लाज नाहीं मनीं येऊं दिली ॥
> ठाकला तो कांहीं केला उपकार । केलें हें शरीर कष्टवूनी ॥
> वचन मानिलें नाहीं सुहृदांचें । समूळ प्रपंचीं वीट आला ॥
> सत्य असत्यासी मन केलें ग्वाही । मानियेलें नाहीं बहुमता ॥
> मानियेला स्वप्नीं गुरुचा उपदेश । धरिला विश्वास दृढ नामीं ॥
> यावरि या जाली कवित्वाची स्फूर्ति । पाय धरिले चित्तीं विठोबाचे ॥

## 'आपुलाचि वाद आपणांसी'

याप्रमाणे तुकाराम महाराजाच्या साधनेस प्रारभ झाला पारमार्थिक जीवनयात्रेचा प्रवास सुरू झाला गावातील विठोबाचे देऊळ त्यानी प्रथम दुरुस्त केले सताची काही उत्तरे पाठ केली. कुणी कीर्तन करू लागले तर, त्याच्या पाठीमागे उभे राहून ध्रुपद धरण्याचे काम त्यानी पत्करले. सताच्या चरणसेवेची लाज मनात वाटू दिली नाही शेजारच्या भामनाथाच्या डोगरावर जाऊन तुकारामबुवानी ज्ञानेश्वरी, एकनाथी भागवत, गीता या ग्रथाची पारायणे केली. अखड विठ्ठलनामाचा जयघोष केला. 'खरें नानवट निक्षेपीचें जुनें ठेवणें' होते ते शोधण्याचा त्यानी प्रयत्न केला. एकान्ताच्या निवासाने व ज्ञानेश्वर-नामदेवाच्या कृपेने त्याचे चित्त शात झाले डोगरावरील वृक्षवल्लीचा व वनचराचा सहवास त्याना किती सुखाचा वाटत होता, याचे मोठे बहारदार वर्णन त्यानी एका अभगात केले आहे.—

> वृक्षवल्ली आम्हां सोयरीं वनचरें । पक्षी ही सुस्वरें आळविती ॥
> येणें सुखें रुचे एकान्ताचा वास । नाहीं गुणदोष अंगा येत ॥
> आकाश मडप पृथवी आसन । रमे तेथें मन क्रीडा करी ॥
> कंथा कमंडलु देह उपचारा । जाणवितो वारा अवसरु ॥
> हरिकथा भोजन परवडी विस्तार । करोनि प्रकार सेवूं रुची ॥
> तुका म्हणे होय मनासी संवाद । आपुलाचि वाद आपणांसी ॥

## 'मज विश्वंभर बोलवितो'

अशा या विशाल पार्श्वभूमीवर तुकोबाचे मन रमून गेले पृथ्वीचे आसन झाले. आकाशाची छाया झाली हरिकथेच्या भजनाचे नाना प्रकार झाले. आपल्या मनाशी आपले सुखसवाद सुरू झाले. याच वेळी आणखी एकदोन महत्त्वाच्या घटना बुवाच्या आयुष्यात घडल्या. बाबाजी चैतन्य या थोर सत्पुरुषाने त्याना उपदेश दिला 'राम कृष्ण हरि' हा मत्र प्राप्त झाला आणि थोड्याच दिवसात नामदेवरायाच्या कडून त्याना कवित्वाची प्रेरणा झाली 'नामदेवें केलें स्वप्नामाजीं जागें । सवें पांडुरंगें येवोनियां । सांगितलें काम करावें कवित्व । वाउगें निमित्य बोलों नये' अशा आज्ञेवरून तुकाराम महाराजाच्या कवित्वास प्रारभ झाला.

घरी असलेली विठ्ठलभक्तीची परंपरा व ज्ञानेश्वर, नामदेव यांची प्रेरणा यांतून तुकाराम महाराजांच्या मुखातून अभंगवाणी स्रवू लागली. साक्षात्काराच्या आधी, नामदेवांच्या प्रेरणेच्या आधी, सद्गुरूंच्या उपदेशाआधी, त्यांनी थोडेफार कवित्व केले असावे. पण आता जे परतत्त्वाच्या स्पर्शाने पुनीत झालेले 'वाङ्मय' त्यांच्या मुखातून बाहेर येऊ लागले, त्याच्या तेजाने, त्याच्या रसवत्तेने, त्याच्या मार्मिकतेने, सर्वजण त्यावेळीही दिपून गेले. तुकोबांच्या कवित्वाचा एक महत्त्वाचा विशेष असा की, त्यांचा आत्मविश्वास मोठा असला तरी, आपले कवित्व ही ईश्वराची देणगी आहे, अशी यथार्थ जाणीव त्यांना होती. इतकेच नव्हे तर, तो देवच आपल्या मुखातून बोलतो, अशी त्यांची खात्री होती. आपण केवळ भारवाही आहोत, धन्याचा माल वाटणारे आहोत, निरोप्ये आहोत, प्रत्यक्ष बोलणारा अथवा बोलविणारा तो भगवंत आहे, असे त्यांनी वारंवार म्हटले आहे.

**'माझिये युक्तीचा नव्हे हा प्रकार । मज विश्वंभर बोलवितो । काय मी पामर जाणे अर्थभेद । वदवी गोविंद तेंचि वदे ।', 'नव्हती माझे बोल बोले पांडुरंग', 'आपुलिया बळें नाहीं मी बोलत । सखा कृपावंत वाचा त्याची । साळुंकी मंजुळ बोलतसे वाणी । शिकविता धनी वेगळाची', 'तुका म्हणे मज बोलवितो देव',** इत्यादी ओळींतून तुकाराम बुवांनी आपल्या वाणीच्या प्रसादाचे व तेजाचे मर्म विशद केले आहे.

## पारमार्थिक अनुभवाचे सार

तुकाराम महाराजांनी एकूण अभंग किती लिहिले? म्हणजे त्यांच्या मुखातून किती स्रवले? त्यांचे लेखन कुणी केले, कोणत्या प्रसंगी कोणते अभंग तयार झाले, विशेष प्रसंगांचे अभंग कोणते? इतर तुकारामांचे 'तुका म्हणे' या मुद्रेने देहूच्या तुकारामांच्या गाथेत शिरलेले कोणते? त्यांच्या अभंगातील क्रमविकास कोणता? स्फुट अभंगांचे गट किंवा समूह प्रथमपासूनच होते काय? पुढे ज्या ओळींना किंवा वर्गीकरणांना महत्त्व आले, त्यांना तुकोबांच्या हयातीत कितपत आधार होता? इत्यादी अनेक प्रश्नांची चर्चा संशोधकांनी व अभ्यासकांनी आजपर्यंत केलेली आहे.

सर्वसाधारणपणे साडेचार ते पाचहजार पर्यंत अभंग तुकाराम महाराजांचे म्हणून उपलब्ध आहेत असे मानले, तर त्यांचे संक्षेपाने दर्शन घेता येण्यासारखे आहे. स्थूल मानाने तुकारामबुवांच्या अभंगांचे दोन प्रकार पडतात. पहिल्या विभागात त्यांना आलेले वैराग्य, त्यांची साधना, त्यांच्या मनाची तळमळ, त्यांच्या जीवाची झालेली तडफड, त्यांनी केलेली ईश्वराची, विठ्ठलाची करुण शब्दांतील प्रार्थना, त्यांचे देवावरचे रुसणे, त्यांचा प्रेमकलह, त्यांचा देवापाशी लडिवाळ हट्ट, त्यांचे एकेरीवर येणे, इत्यादी साधनेच्या किंवा साक्षात्काराच्या पूर्वावस्थेतील विविध अनुभवांचे चित्तवेधक व करुणेने आकंठ भरलेले अभंग सर्वांनाच मोलाचे वाटतील असे आहेत. यानंतर तुकारामांना ईश्वर भेटला, त्याचा अंगसंग जडला, जीवाशिवाचे आलिंगन झाले, शरीरसंबंधाची मिठी जडली, सगुण विठ्ठलाचे हर्षदायक दर्शन झाले, त्याच्या प्रेमाने व जवळकीने आयुष्य धन्य झाले. मनातील सर्व संशय फिटले, मन शांत झाले, तन्मयतेचा व तल्लीनतेचा उल्हास निर्माण झाला, ईश्वराच्या सहवासात निरनिराळ्या प्रकारचे अनुभव येत राहिले, यासंबंधीचीही वर्णने अतिशय सखोल, भावपूर्ण व वाचकांचे चित्त उल्हसित करणारी आहेत. तुकोबांच्या या आत्मानुभूतीपर अभंगातच त्यांच्या पारमार्थिक अनुभवाचे सारसर्वस्व साठविले आहे.

## सामाजिक उद्बोधन

अभंगाच्या दुसऱ्या विभागात तुकाराम महाराज ज्या संसारापासून दूर झाले, तो संसार इतरांचा अधिक उन्नत स्वरूपाचा व्हावा म्हणून, समाजाकडे वळून त्यांनी अतिशय कडक शब्दांत दोषांवर बोट ठेवून टीका करण्यास प्रारंभ केला. भोळ्याभाबड्या लोकांना देवाच्या, धर्माच्या नावाखाली फसविणारे साधुसंत व ढोंगी बुवा निर्माण झाले होते. नाना दैवते निर्माण करून वेडगावाकड्या

मार्गांनी लोक अनाचारास प्रवृत्त झाले होते टिळाटोपी करून, डोळे मिटून, समाधीचे नाटक करून लोकाना फसविण्याचा धदा मोठचा प्रमाणावर सुरु झाला होता तुकाराम महाराजानी या सर्व गैर प्रकारावर अतिशय कडक शब्दात प्रहार केले आहेत

तुकोबाच्या उपदेशाचे दुसरे अग असे की, या भाद्द गुरूच्या नादाने लोकही बिघडत चालले होते जे परमार्थाच्या मार्गात होते, त्याचा मार्गच चुकला होता भलत्याच फदात ते अडकले होते, आणि जे ससारात रमले होते, त्याना एका ससाराशिवाय, पैशाशिवाय, बायकोशिवाय दुसरे समजेनासे झाले होते. परद्रव्य व परनारी याचा अभिलाष मोठचा प्रमाणावर वाढला होता लोक आपल्याच नादात, आपल्याच गर्वाने, अभिमानाने केवळ विषमसुखात रमून गेले होते नाना प्रकारची इद्रियसुखे भोगण्यात त्याना सारा जन्म घालवावा असे वाटे देवधर्माची, कुळधर्माची, सताची, पवित्र स्थानाची मर्यादा सुटत चालली होती अशा बिघडलेल्या ससाराची विदारक शब्दचित्रे तुकाराम महाराजानी काढली आहेत केवळ पैसा, इद्रियसुख हेच एक ध्येय झाले, म्हणजे मग मनाचा तोल सुटतो तृष्णेला व लोभाला सीमा उरत नाही मग कोणतेही पातक करण्यास लोक कचरत नाहीत, कोणत्याही अनाचाराचे त्याना वावडे असत नाही ससारात सदा सर्वकाळ आसक्त राहून लोकानी ईश्वराचे नावच सोडून दिल्यामुळे या एका आधारावर जे परस्पराचे नाते उभे असते, तेही मग विसकटून जाते दुसऱ्याना त्रास देऊनच स्वत च्या सुखाची वृद्धी करण्याकडे व सर्व काही मलाच पाहिजे, या लोभाकडे माणसे लक्ष देतात. तुकारामबुवानी आपल्या उपदेशपर अभगातून या सासारिक पतनाचेही बोलके चित्र उभे करून लोकाना सावध केले आहे

## अभंगवाणीचे स्थूल स्वरूप

तुकाराम महाराजाच्या अभगाचे आत्मपर किंवा अनुभूतीपर आणि उपदेशपर असे दोन प्रमुख विभाग असले तरी, या प्रत्येकाचे आणखी उपविभाग होण्यासारखे आहेत शिवाय शिव, राम, हनुमत, गजेन्द्र, एकादशी, बाळक्रीडा, गौळणी, विराण्या अशा विविध विषयावर त्याची अभगरचना आहेच सतमाहात्म्य, पढरपूरवर्णन, कीर्तनमाहात्म्य, नामाची महती, याही विषयावर तुकोबाचे पुष्कळच अभग उपलब्ध आहेत सद्गुरूची कृपा, स्वत च्या कवित्वाचा निषेध, मबाजीबुवाकडून विरोध, लोहगावचा वेढा, चिंचवड येथील चिंतामणी देव याच्याशी सभाषण, स्वत च्या वैराग्यप्राप्तीचा क्षण, कवित्वाची प्रेरणा इत्यादी विविध अशा प्रासगिक विषयावरही बुवानी रचना करून स्वत च्या आयुष्यातील अनेक महत्त्वाच्या घटनाचे उल्लेख केलेले आहेत याशिवाय वासुदेव, आधळा, पागळा, डाका, गाधळ, लखोटा फुगडी इत्यादीसारखी भारूडात्मक अभगरचनाही तुकाराम महाराजाची आहे

तुकाराम महाराजाच्या अभगवाणीचे हे असे स्थूल व बाह्य स्वरूप विविधतेने नटलेले दिसत प्रत्येक अभग सुटा खरा, स्फुट खरा, पण काही अभगाचे गटही काही गाथात एकत्र आलेले दिसतात विचाराचे, भावनच, तत्त्वाचे एखादे सूत्र त्या त्या गटात दिसतही परतु यासबधी निश्चित असा शोध अजून झालेला नाही तुकारामाच्या अभगाचे पुढ सपादन करणारानी नामपर, सतपर, करुणापर, प्रेमकलहपर, सलगीपर अशी वर्गवारी करून काही व्यवस्था लावण्याचा प्रयत्न केला आहे परतु त्यावरून तुकाराम महाराजाच्या मुखातून अभग स्रवले, त कोणत्या क्रमाने व कोणत्या प्रसगानी याचा बोध होणे दुरापास्त होते

## ‘तुका झाला पाडुरग’

तुकोबाच्या अभगवाणीचा एवढा बाह्य परिचय करून घेतल्यानतर तिच्या अतरगाचे तजस्वी दर्शन जवळ जाऊन घेण्यासारखे आहे मानवी मन किती आतुर, किती कोमल, किती भावप्रवण होऊ शकते, याची उत्तम उदाहरणे तुकारामबुवाच्या आत्मपर अभगातून आपणास मिळतील वैराग्यामुळे,

संसाराच्या उदासीनतेमुळे तुकोबाचे लक्ष विठ्ठलाकडे वळले हे खरेच आहे संसारातील व व्यवसायातील आघातामुळे तुकोबाना एकान्ताचा वास रुचला, हेही खरे घरी दारी त्याची विटवना होत राहिली म्हणून त्याचे चित्त विठ्ठलपायी दृढ झाले हे खरेच पण या बाबतीत आणखी सूक्ष्म विचार व्हावयास हवा प्रसगी तुकारामबुवानी वैतागाचे, दु:खाचे उद्गार काढले आहेत कर्कशा असणाऱ्या बाईलीचे त्यानी ओभार मानले आहेत, दुकानाचे दिवाळे निघाले, बरे झाले, असेही त्यानी म्हटले आहे पण केवळ या सासारिक व व्यावसायिक आपत्तीमुळेच तुकोबा श्रेष्ठ पदवीस चढले, असे मानणे बरोबर होणार नाही. संसारातील आपत्ती सर्वांनाच असतात, व्यवसायातील चढउतारही सर्वांनाच भोगावे लागतात वांलभाड बायको पुत्रबाळाच्या नशिबी असते पण या अवस्थेत प्रत्येक ठिकाणी तुकोबा निर्माण होत नाहीत '*संसाराच्या तापें तापलों मी देवा*' येथपासून '*तुका झाला पांडुरंग*' येथपर्यंतचा त्याचा जो प्रवास आहे, त्याचा अधिक बारकाईने विचार व्हावयास हवा तुकोबाच्या मनाची वृत्ती, त्याची घरची परपरा, घराण्यातील विठ्ठलाचे अनुसधान, त्याची साधना, त्याचे नामसकीर्तन, त्याचा एकान्तवास, त्याची पूर्व-पुण्याई, ज्ञानेश्वरनामदेवाशी त्याचे जडलेले नाते, या सर्वांचा परिपाक म्हणजे तुकाराम महाराजाचे दिव्य असे पारमार्थिक जीवन होय सासारिक दु:खे व व्यावसायिक अपयश हे वरवरचे एक निमित्त होय

## अभगवाणीचे अतरग

यात पार्श्वभूमीवरून महाराजाच्या अभगवाणीचे अतरग पाहावयास हवे त्याच्या दिव्य अभगवाणीच्या गाभाऱ्याचे दर्शन, हा आजही एक अलौकिक व चैतन्याने रसरसलेला अनुभव आहे त्याच्या सजीव दर्शनाने आजही माणसाचे डोळे पाणावतात, हृदय भरून येत, सात्त्विकतेने चित्त प्रकाशित होते, *भगवताच्या रूपसौंदर्याने डोळे दिपून जातात, त्याच्या वत्सलतेने व भक्ताच्या आर्ततेने* अभग वाचणाराच्या चित्तावरही तेच सस्कार उमटतात तुकोबानी जे पाहिले, जे भोगले, त्याचा जसाचा तसा ठसा त्याच्या अभगवाणीवर उमटलेला असल्यामुळे वाचकासही ती अनुभूती सहजासहजी ध्यानात येऊ शकते सोपे सोपे शब्द व प्रसादपूर्ण अशी रचना या गुणामुळे बुवाचे कित्येक अभग आजही हृदयाचा ठाव घेऊन जातात तुकारामबुवाच्या भावविश्वाचे वा मनोगाभाऱ्याचे अलौकिक दर्शन आजही अनेकाच्या चित्तवृत्ती उल्हसित करील असेच आहे

लालचावलेले होते याच दर्शनासुखाची गोडी त्याना अवीट वाटत होती हेच ' **सकळ मगळाचे सार । मुख सिद्धीचे भाडार** ' त्याना वाटत होते याच्या दर्शनाने मनाची अवस्था कशी होऊन जाई ? तुकाराम महाराजानी वर्णन केले आहे !

**रूपीं गुंतले लोचन । पायीं स्थिरावले मन । देहभाव हरपला । तुज पाहता विठ्ठला ।**
**फळो नेदि सुख दु ख । तान हरपली भूक । तुका म्हणे नव्हे परती । तुझ्या दर्शनें मागुती ।।**

## विठ्ठलाशी लडिवाळपणा

या विठ्ठलाच्या रूपाचा वेध त्याना निरतर असे त्याच्या दर्शनसुखासाठी ते उत्सुक असत. त्याच्या अगाखाद्यावर खेळायला मिळावे म्हणून त्याची तळमळ असे कधी कळवळून ते या विठाई माउलीला हाक मारतात कधी तिला प्रश्न विचारतात, कधी तिच्यावर रुसतात, कधी प्रेमाने तिच्याशी भाडतात, कधी लडिवाळपणे ते आवतीभोवती वावरतात. कधी तिने आपणाकडे लक्ष द्यावे म्हणून इतराचे दाखले ते देतात आपल्या मुलाचा साभाळ कसा करावा, हे काही आईला शिकवावे लागत नाही ती त्याला गोड गोड पदार्थ न मागता देते, त्यास लागलेली भूक तिलाच अगोदर समजते आणि मग ती ' **खेळाया गुतले उमगूनी आणी । बैसोनिया स्तनीं लावी वळें** ' त्याच्या दु खाने ती कष्टी होत असते या मातेप्रमाणेच ही विठाई माउली तुकोबाना वाटत होती ते पुन पुन कळवळयाने म्हणतात, ' **पाडुरगे ये वो पाडुरगे । जिवाचे जीवलगे ये वो पाडुरगे । भक्ताच्या कैवारें कष्टलीस विठ्ठले । आवरूपी कारणे जन्म दाहा घेतले** ' आणि मग आता माझ्यासाठी तू का येत नाहीस असा त्याचा प्रश्न असे.

## ' मायें मोकलिले कोठें जावे बाळें ? '

पांडुरंगाने मनात न आणता आपण पातकाची रास असलो तरी, त्याने आपल्यावर कृपा करावी, असे त्यांना वाटते या परमेश्वराने जर आपणास सांभाळिले नाही, तर मग आपले पालन नरी कोण करणार ? आम्ही मग आमचे सुखदुःख कुणास मागाव ? आमच्या तापाचा परिहार कोण करणार ? आमची तहानभूक कोण निवारण करणार ? आम्ही मता तरी मग कुणावर करावी ? कोण आम्हांला साह्य करणारे होईल ? अशा प्रकारचा आभास करून बुवाचा कंठ शुष्क होऊन जातो 'तुजलागी माझा जीव झाला पिसा । अवलोकितो दिशा पांडुरंगा । प्राण हा विकल होय कासाविस । जीवनावीण मत्स्य तयापरी ' अशी त्यांची अवस्था करुणास्पद होऊन गेलेली असत

आपण परदेशी झालो आहात, अन्यायी आहोत, अवगुणी आहात, पातकी आहात, पण या विठाईमाउलीने ह सर्व विसरून आपला अंगीकार करावा, असा त्यांचा आग्रह असे या विठोबाने आपणावर कृपा कशी करावी ? नुसते दर्शन देऊन नव्हे, नुसता मस्तकावर हात ठेवून नव्हे, तर महाराजांच्या मुखातून त्यांची ही भूक ऐकण्यासारखी आह

भागलों मी आतां आपुल्या स्वभावें । कृपा करोनि देवें आश्वासीजे ॥
देऊनि आलिंगन प्रीतीच्या पडिभरें । अंगें ही दातारें निववावीं ॥
अमृताची दृष्टी घालूनिया वरी । शीतळ हा करी जीव माझा ॥
धई उचलोनि पुसे तानभूक । पुसी माझें मुख पीतांबरें ॥
बुझावुनी माझी धरी हनुवटी । ओंवाळुनी दिठी करूनी सांडी ॥
तुका म्हणजे बाप्पा अहो विश्वंभरा । आतां कृपा करा ऐसी कांहीं ॥

केली नाहीस तर मी काय करीन? तुकारामबुवानी एक गोड धमकी विठ्ठलालाच दिलेली आहे. त्यानी स्पष्टपणे सांगितले की, 'संतासी श्रीमुख कैसें दाखविसी। पुढें मात त्यासी सांगईन॥. घेईन डांगोरा तुझिया नामाचा। नव्हे अनाथांचा नाथ ऐसा। तुका म्हणे आम्ही राहिलों मरोनि। तूं का होसी धनी निमित्ताचा।' कारण देवा, आमच्यामुळे तुला मोठेपणा आला आहे, हेही तू विसरला आहेस. अनाथाचा नाथ तू आहेस, हेही तुझ्या ध्यानात नाही. कारण तू माझ्यावर कृपाच करीत नाहीस. खरे म्हणजे देवा, आम्हीच तुझे दैवत आहोत.

> जेणे तुज झालें रूप आणि नांव। पतित हें देव तुझें आम्ही॥ १॥
> नाहीं तरी तुज कोण हें पुसतें। निराकारी तेथें एकाएकी॥ २॥
> अंधारें दीपातें आणियेली शोभा। माणिकासी प्रभा कोंदणाची॥ ३॥
> धन्वंतरी रोगें आणिला उजेडा। सुखी काय चाडा जाणावें तें॥ ४॥
> अमृतासी मोल विषाचिये गुणें। पितळें तरी सोनें उंचांनेच॥ ५॥
> तुका म्हणजे आम्हीं असोनियां जाण। तुज देवपण आणियेलें॥ ६॥

## 'दिवाळीच्या मूळा लेकी आसावली'

अशा प्रेमाचे भाडण तुकोबासारख्या श्रेष्ठ भक्तालाच शोभून दिसते तेच मोठ्या धिटाईने पांडुरंगाचा पदर धरून विचारू शकतात, 'धरूनि पालव असुडीन करें। मग काय बरे दिसें लोकीं।' एकदा परमेश्वराची शोभा करायची ठरविले तर, मग कुणाची अब्रू बाहेर येईल? कुणाचा लौकिक बिघडून जाईल? समर्थाचे बालक जर केविलवाणे दिसले तर लोक कुणाला हसतील? म्हणून देवा, तू मला भेट द्यावीस 'कर कटावरी तुळशीच्या माळा। ऐसे रूप डोळा दावीं हरी। ठेविले चरण दोन्ही विटेवरी। ऐसें रूप हरी दावीं डोळा। कटीं पीतांबर कास मिरवली। दाखवीं वाहिली ऐसी मूर्ती।' कारण देवा, याच भेटीसाठी आता प्राण कंठाशी आले आहेत रे. किती दिवस वाट पाहावयाची? तुझ्याशिवाय मला दुसरे सोयरे कोण आहेत? तुझ्या भेटीशिवाय आता मला दुसरे काहीच सुचत नाही देवा, 'कन्या सासुऱ्यासी जाये। मागे परतोनि पाहे। तैसें जालें माझ्या जीवा। केव्हां भेटसी केशवा?' देवा, मला भेट देशील तर तुझे काय नुकसान होणे रे? 'काय तुझें वेचे मज भेटी देतां। वचन बोलतां एक दोन। काय तुझें रूप घेतों मी चोरोनि। त्या भेणे लपोनि राहिलासी। काय तुझें आम्हां करावें वैकुंठ। भेवों नको भेट आतां मज।' असा दिलासा तुकोबानीच विठ्ठलला दिला आहे! कसेही करा आणि मला एकदा येऊन देवा, भेट ना, असा सारखा टाहो तुकाराम महाराज फोडताना दिसतात. कळवळून एका अभंगात ते म्हणतात—

> भेटीलागीं जीवा लागलीसे आस। पाहे रात्रंदिवस वाट तुझी॥
> पूर्णिमेचा चंद्रमा चकोरा जीवन। तैसे माझें मन वाट पाहे॥
> दिवाळीच्या मुळा लेकी आसावली। पाहातसे वाटुली पंढरीची॥
> भुकेलिया बाळ अति शोक करी। वाट पाहे परी माउलीची॥
> तुका म्हणे मज लागलीसे भूक। धांवूनि श्रीमुख दावी देवा॥

पाणी आणून विनवितात, 'धाव घाली आई । आता पाहातेस काई ।। धीर नाहीं माझे पोटीं । झालो वियोगें हिपुटी ।। करावें शीतळ । बहु झाली हळहळ ।। तुका म्हणे डोई । कई ठेवीन हे पायीं ?' या मळमळयाने तुकोबाचा जीव फुटून निघत असे. कधी त 'पंढरीची वाट पाहे निरंतर । निढळावरी कर ठेवूनिया ' असे म्हणतात, तर कधी 'तुका म्हणे धीर नाहीं माझ्या जीवा । भेटसी केधवा पांडुरंगा ?' म्हणून अधीरता दाखवितात 'डोळियां पाझर कंठ माझा दाटी । येई वो देई भेटी पांडुरंगे । बहु दिस टाकिले निरास कां केले । कोठें वो गुंतले चित्त तुझें ? । बहु धंदा तुज नाहीं वो आठव । राहिलासे जीव माझा कंठीं ।' अशी अवस्था त्याच्या मनाची होऊन जात असे. त्याचा जीव तृषाक्रान्त होत असे 'करावा वर्षाव । तृषाक्रान्त झाला जीव ' असे त्यांनी म्हटले आहे.

## प्रकाशाचा दिवस

अशा तळमळीतून एखादा दिवस मग प्रकाशाचा उगवे. शुभ शकुनाची खूण पटे. संताचा समागम होई. श्रीविठ्ठलाचे चरण दिसताच सारी व्यथा दूर होऊन जाई. 'शुभ झाल्या दिशा अवघाचि काळ । अशुभ मंगळ मंगळाचें ' अशी स्थिती होत असे. 'डवळले तदाकार । अंधार जो निरसला । रूपो जातां नाहीं ठाव । प्रकट आहे पसारा । ' असा अनुभव त्यांना मध्येच येत असे. श्रीहरीच्या भेटीने मन तृप्त होऊन जाई. सर्वत्र तोच भरून राहिलेला आहे, अशी जाणीव दाटून येई. 'आत हरि बाहेर हरि । हरिनें घरीं कोंडिलें ' अशी सर्वात्मकता अनुभवास येत असे. 'जेथें जातों तेथें तू माझा सांगाती । चालविसी हातीं धरूनिया । चालों वाटे आम्हीं तुझाचि आधार । चालविसी भार सवें माझा ' अशी जवळीक पांडुरंगाची पटत असे. 'सुखाचें ओतलें । दिसे श्रीमुख चांगलें ।', 'मनें धरिला अभिलाष । मिठी घातली पायास । होतां दृष्टा-दृष्टी । ताप गेला उठाउठी ।। तुका म्हणे झाला । लाभें लाभ दुणावला ' अशा भाषेत मग विठ्ठलभेटीचा लाभ झाल्यावरची तृप्ती वर्णन केली जात असे. 'देहभान पालटली काया । पडली छाया ब्रह्मीची ।। जोडिलें हे न सरे धन । अविनाश आनंदघन ।। अमूर्त मूर्ति मधुसूदन । समचरण देखियेले ।। '

## 'हिरा शोभला कोंदणीं'

या भेटीच्या आनंदात व संतसहवासात तुकोबांना आकाश ठेंगणे होते. त्यांची दैन्याची अवस्था संपते. सर्व संशय फिटतात. शंका निवारल्या जातात. 'दैन्य गेलें हरली चिंता । सदैव आता यावरी ' निश्चिंतमुक्त अवस्थेचे वर्णनही तुकोबांनी पुष्कळ अभंगात केले आहे. या आनंदाच व स्वसुखाचे चित्तवेधक वर्णन तुकाराम महाराजांनी एका अभंगात केले आहे.

सर्वत्र त्याचीच पावले दिसू लागली 'देव झाले अवघे जन । दोषगुण हरपले ।' अशी अवस्था होऊन गेली 'आमुचा स्वदेश । भुवनत्रयामध्यें वास' अशी विशाल दृष्टी होत राहिली 'जेथें देखे तेथें तुझीच पाउलें । विश्व अवघें कोंदाटलें ।' ईश्वराच्या भेटीची, साक्षात्काराची, आत्मानुभूतीची बोलकी व सजीव चित्रे, तुकाराम महाराजाच्या अभगातून स्पष्टपणे जाणवतात एकदा त्यानी म्हटले आहे, 'माझें माथा तुझा हात । तुझे पायीं माझें चित्त ।। ऐसी पडियेली गाठीं । शरीरसबधाची मिठी ।। '

अशा प्रकारे स्वानदाचा लाभ तुकारामाना झाला ईश्वराची भेट झाली सर्वोत्तम सुखाचे साधन हाताशी आले ते त्याच्या स्वरूपाशी जाऊन भिडले तो व आपण एकच, ही अनुभूती आली आत्मा-परमात्मा, जीवशिव, याच्यातील भेद सपला पुढे काय ?-ज्या अद्वैताच्या अनुभूतीसाठी तुकाराम महाराजाचा जीव तळमळत होता, ती प्राप्त झाली ईश्वर अगदी जवळून भेटला दूरत्व सपले दुजाभाव नाहीसा झाला अणुरेणूहूनही लहान असणारा तुका आकाशाएवढा झाला परतु पुढे काय ? जीविताची हीच सार्थकता असल्यावर पुढे काय ? हा प्रश्नच निरर्थक म्हणावयाचा की काय ?

## 'मग या सतसंगा पाहूं कोठें ?'

परतु सताच्या पारमार्थिक जीवनात याही प्रश्नास महत्त्व आहे आत्मस्थितीचे ज्ञान झाले, ब्रह्माची अनुभूती आली, मीलनसुखाची चव सापडली म्हणजे मग सर्व सपले की काय ? वैकुठास किंवा मोक्षास पोचल्यावर मग काय उरणार ? मुक्ती मिळाल्यावर मग आणखी काय हवे ? अद्वैताच्या अनुभूतीपेक्षा आणखी श्रेष्ठ काय आहे ? तुकारामबुवानी उत्तर दिले आहे, या ब्रह्मज्ञानापेक्षाही भक्तीची आर्तता श्रेष्ठ आहे तू व मी एकच या भावापेक्षा, तू देव, मी भक्त, हे ऐक्यभावावरचे दुजेपण अधिक गोड व रमणीय वाटले त्याना ऐक्यभावाचे ज्ञान झाल्यावर, विठ्ठलाशी मीलन झाल्यावर, वेगळे होता त्यावेळच्या सुखाची आठवण त्याना होते सर्व एकच आहे अशा अनुभूतीत स्तवन कुणी कुणाचे करायचे ? कुणी कुणाच्या पायावर डोके ठेवायचे ? आर्त वाणीने पुकार कुणी करायचा ? कुणी कुणास दुःख सागायचे ? कुणी कुणाची सेवा करायची ? कुणी कुणाचे रक्षण करायचे ? कुणी कुणावर रुसायचे ? कुणी कुणाशी भाडायचे, लटक्या भावाने रागवायाचे ? या मी–तूपणाच्या भावातील गोडीचे सुख मग सपलेच की काय ? मुक्तीच्या स्थितीत, ऐक्यभावात, मीलनसुखात तळमळ नाही, विरह नाही, आर्त वाणी नाही, स्मरण नाही, उत्कठा नाही, हुरहुर नाही, आणि म्हणून या अवस्थेतील सुखही नाही सताची सगत नाही, की डोळे भरून सुदर रूप पाहणे नाही म्हणूनच एकदम नामदेवतुकारामासारखे सत बोलून जातात, 'ज्ञानी मुक्तीपद देशी पाडुरगा । मग या सतसगा पाहू कोठें ?'

अभंग ईश्वराच्या साक्षात्काराच्या आधीचे असतील, असे निश्चयाने म्हणता येत नाही कारण भक्तीच्या सुखासाठी, प्रेमाच्या भोगासाठी, नाना प्रकारचे भाव थोर भक्त पुन पुन व्यक्त करीत असतात

## ‘मी भक्त तू देव ऐसें करी’

आणि याचसाठी पुष्कळ ठिकाणी त्यांनी मुक्तीची किंवा ब्रह्मज्ञानाची अथवा आत्मस्थितीची चर्चा केलेली नाही ‘नको ब्रह्मज्ञान आत्मस्थिति भाव। मी भक्त तू देव ऐसें करी ॥ दावी रूप मज गोपिकारमणा। ठेवू दे चरणावरी माथा। पाहीन श्रीमुख देईन आलिंगन। जीवें निंबलोण उतरीन। पुसता सांगेन हितगुज मात। बैसोनि एकान्त सुखगोष्टी’ अशा प्रकारे सगुणाशी प्रेम वाढवावे, सगुणरूप डोळे भरून पाहावे, चरणावर माथा ठेवावा, आलिंगन द्यावे, जीव ओवाळून टाकावा, त्याही मनातील हितगुज करावे, एकान्तातील सुखगोष्टी कराव्यात व त्या प्रभूच्या नामस्मरणात आणि सत्संगात दंग होऊन जावे, पण हे सुख आत्मस्थितीच्या भावात, ब्रह्मपदात अथवा मोक्षस्थितीत नसते म्हणूनच तुकाराम महाराज म्हणतात, ‘सांडुनि सुखाचा वांटा। मुक्ति मागे तो करंटा।’ भक्तिरसाच्या गोडीत मोक्षसुखास तुच्छ लेखिलेले असून ‘अवघाचि संसार केला ब्रह्मरूप। विठ्ठल स्वरूप म्हणोनिया’ हा अनुभव अधिक श्रेष्ठत्वाचा त्यांनी मानलेला आहे मुक्त तरी कुणास म्हणायचे ? ज्याला बंधनच नाही त्याला कोण मुक्त करणार ? यासाठीच तुकाराम महाराज म्हणतात, ‘देवा एक हे विनंती। मज नको रे हे मुक्ती’ मग काय हवे ? त्याचेही उत्तर असे की, ‘आत्मस्थिती मज नको हा विचार। देई निरंतर चरणसेवा’ देवा, तुझ्या पायाची सेवा, तुझ्या मुखाचे दर्शन, तुझ्या नामाचे भजन, संतांचा सहवास, अखंड तुझे अनुसंधान, याखेरीज सुख दुसरे कुठले रे ? म्हणूनच तुकोबांनी विनविले आहे, ‘मोक्ष तुमचा देवा। तुम्ही दुर्लभ तो ठेवा। मज भक्तीची आवडी। नाहीं अंतरीं ते गोडी’ मोक्ष, वैकुंठ, मुक्ती, ब्रह्मस्थिती यांची थोरवी कोठवर आहे ? जोपर्यंत पंढरपूरचे वैभव पाहिले नाही तोपर्यंत, जोपर्यंत पांडुरंगाचे दर्शन झाले नाही तोपर्यंत या संतांचे सर्वसुख म्हणजे पंढरपूरच्या विठ्ठलाचे पाय हेच होय. तुकाराम महाराजांनी म्हटले आहे,

> जववरी नाहीं देखिली पंढरी। तववरी थोरी वैकुंठींची ॥
> मोक्षसिद्धी तेथें हिंडे दारोदारीं। होऊनि कामारी दीन रूप ॥
> वृंदावन सडे चौक रंगमाळा। अभिनव सोहळा घरोघरीं ॥
> नामघोष कथा पुराण कीर्तनीं। ओविया कांडणीं पांडुरंगा ॥
> सर्व सुख तेथें असे सर्वकाळ। ब्रह्म तें केवळ नांदतसे ॥
> तुका म्हणे जें न साधे सायासें। तें हें प्रत्यक्ष दिसे विटेवरी ॥

माऊ पडलिक मुनि । चद्रभागा आमुची वहिणी ।। तुका जुनाट मिरासी । ठाव दिला पायापाशीं ' या पढरपुरास केवढे सुख आहे ! हे भूवैकुठच आहे येथे पाऊल ठेविले की, '**सोनियाचा दीन**' उगवतो आनदाचा गजर होतो सतसज्जनाची सगत मिळने. विठ्ठलास क्षेम, आलिगन देता येते. सखा मायबाप प्रत्यक्ष भेटतो '**माउली बोळली प्रेमपान्हा**' असा अनुभव येतो

जे दोष इतर कोणत्याही क्षेत्रास गेल्याने जात नाहीत, ते पढरपूर येथील वास्तव्याने दूर होतात, असे तुकाराम महाराजानी सागितले आहे कारण पढरपूर हे '**सकळ तीर्थांचे माहेर । भूवैकुठ निर्विकार । होतो नामाचा गजर । असुर काळ कापती । नाहीं उपमा द्यावया । समतुल्य आणिक ठाया । धन्य धन्य जया । जे पढरपुर देखती**' या क्षेत्राचे माहात्म्य मराठी सतानी परोपरीने गाइले आहे '**ऐसा ठाव नाहीं कोठें । देव उभाउभी भेटे**' असा या स्थानाचा महिमा आहे म्हणूनच तुकाराम महाराज म्हणतात, '**तीर्थे केलीं कोटीवरी । नाहीं देखिली पढरी ।।** जळो त्याचे जालेपण । न देखेंचि समचरण । ' या पढरपूरच्या श्रीविठ्ठलाचे समचरण पाहून मन तृप्त होते '**शीतळ हा पथ माहेरची वाट । जवळीच नीट सुखरूप ।।**' हा पढरपूरचा देव '**कृपावत होय नामें एका**' अशा थाटात तुकाराम महाराजानी या क्षेत्राचे, विठ्ठलाचे, साधुसताच्या सगतीचे, नामस्मरणाचे महत्त्व परोपरीने सागितले आहे

## 'ते हे जोडी सतपाय'

सताची सगत तर तुकोबाना देवापेक्षाही प्रिय वाटते कारण सत हे देवाचेच रूप त्यानी मानले आहे या सताचे उपकार किती सागावेत ? नित्य मनास जागृती देण्याचे कार्य ते करीत असतात त्याच्यापायी जीव ठेविला तरी तो थोडा होईल धेनूच्या चित्तात जसे वत्स असते, तसे हे सत माझी काळजी घेतात, असे तुकाराम महाराजानी म्हटले आहे सत हे त्याना खरे सखेसोयरे वाटतात '**दसरा दिवाळी तोचि सण आम्हा । सखे सतजन भेटतील**' असा आनद सतभेटीमुळे त्याना होत असतो या सताच्या पादुका घेऊन मी नृत्य करीन, असे त्यानी म्हटले आहे '**सत मारगीं चालती । त्याची लागो मज माती**' अशी इच्छा त्यानी व्यक्त केली आहे '**सताच्या घरींचा दास मी कामारी । दारीं परवरीं लोळतसे**' अशी त्याची भूमिका होती '**सर्व सुखें आजी एथेंचि वोळलीं । सताची देखिलीं चरणांबुजें**' अशी त्याची निष्ठा होती त्याची सताना नेहमी प्रार्थना असे की, '**तुमचिये दासीचा दास करुनी ठेवा । आशीर्वाद द्यावा हाचि मज । आता तुम्हीं कृपावत । साधुसत जिवलग ।। गोमटें तें करा माझें । भार ओझें तुम्हासी,**' कारण आपले फार मोठे भाग्य म्हणून सताचे हे पाय आपणास पाहावयास मिळाले, असे त्याना वाटे '**भाग्याचा उदय । ते हे जोडी सतपाय । येथूनिया नुठो माया । मरणायाचुनि सर्वथा ।। होई बळकट । माझ्या मना रे तू धीट ।**' अशा शब्दात सतकृपेने आपल्या भाग्याचा उदय झाल्याचे तुकोबानी सागितले आहे

## कीर्तनातील ब्रह्मरस

सतसहवासाप्रमाणेच नामस्मरणाची व कीर्तनाची, भजनाची महती तुकोबानी वारवार वर्णन केलेली आहे '**नामसकीर्तन साधन पैं सोपें । जळतील पापें जन्मान्तरींचीं**' म्हणून त्यानी या साधन-मार्गाची सुलभता स्पष्ट केली आहे कारण या मार्गात '**न लगती सायास जावे वनान्तरा । सुखें येतो घरा नारायण ।। ठायींच बैसोनि करा एकचित्त । आवडी अनत आळवावा ।। राम कृष्ण हरी विठ्ठल केशवा । मत्र हा जपावा सर्वकाळ ।। यावीण असता आणिक साधन । वाहतसे आण विठोबाची ।।**' याप्रमाणे तुकोबानी सर्व लोकाना नामसकीर्तनाचे एक सुलभ साधन उपलब्ध करून दिले '**नाम गोड नाम गोड । पुरे कोड सकळही**' अशी या नामाची महती आहे या नामामुळे व भजनकीर्तनाच्यामुळे

तुकाराम महाराजानी ईश्वराची जवळीक सर्वांच्या घरीच आणून उभी केली. कारण 'कथा देवाचें हें ध्यान । कथा साधन मंडण ।। कथे ऐसें पुण्य । आणिक नाहीं सर्वथा ।। ऐसा साच खरा भाव । कथे-माजी उभा देव ।।' एवढी महती कथाकीर्तनाची त्यानी सांगितली आहे. या हरिकथेत देव, भक्त आणि नाम असा त्रिवेणीसंगम असतो. 'तीर्थें तया ठायां । येती पुनीत व्हावया' इतका या कथेचा महिमा तुकारामांच्या मते मोठा आहे. या कीर्तनातील सुख किती मोठे आहे ?

> सोपें वर्म आम्हां सांगितलें संतीं । टाळ दिंडी हातीं घेऊनि नाचा ।।
> समाधीचें सुख सांडा ओंवाळून । ऐसा या कीर्तनीं ब्रह्मरस ।।

कथा ज्या ठिकाणी चालू आहे, त्या ठिकाणी आपल्या दूतानी जाऊ नये, अशी यमाची त्याना आज्ञा असल्याचे तुकोबांनी सांगितले आहे. कीर्तन ही खरीखुरी व थोर दर्जाची समाधी असून सर्व प्रकारची सुखे या कीर्तनात प्राप्त होतात

> जप तप ध्यान नलगे धारणा । विठ्ठल कीर्तनामाजी उभा ।।
> राहे माझ्या मना दृढ या वचनीं । आणिक तें मनीं न धरावें ।।
> कीर्तनीं समाधि, साधन तें मुद्रा । राहतील थारा धरोनियां ।।
> तुका म्हणे मुक्ति हरिदासांच्या घरीं । घोळगती चारी रिद्धीसिद्धी ।।

## 'उरलों उपकारापुरतां'

अशा प्रकारे तुकोबाची अभगवाणी विठ्ठलप्रीतीने रंगलेली आहे. तीव्र स्वानुभूतीचे तेज आहे. भक्तीचा जिव्हाळा आहे नामसंकीर्तनाचा, संतमाहात्म्याचा, विठ्ठलरूपाचा, व भक्तितत्त्वाचा जयजयकार आहे या अतिशय पावन व परम मंगल अशा वाणीने समकालीच नव्हे, तर पुढेही अनेक शतके उपयुक्त होईल, असा उपदेशामृताचा वर्षाव केला आहे. आपली वाणी ही ईश्वराची वाणी असून आपण त्याचेच कार्य करावयास आलो आहोत, असा सार्थ अभिमान व विश्वास त्यांना वाटत असे. त्यांच्या उपदेशात ईश्वरी शक्तीचे तेज व स्वजनाविषयी तळमळ असल्यामुळेच त्यांचा प्रभाव आजही पडण्यासारखा आहे. 'धर्माचें पाळण । करणें पाषांड खंडण ।। हेंचि आम्हां करणें काम । बीज वाढवावें नाम ।।' या एका कार्यासाठी आपला अवतार आहे असे त्यानी म्हटले आहे 'आम्ही वैकुंठवासी । आलों याचि कारणासी । बोलिले जे ऋषी । साच भावें वर्ताया ।। झाडूं संतांचे मारग । आडरानें भरलें जग । उच्छिष्टाचा भाग । शेष उरला तो सेवूं ।। अर्थे लोपलीं पुराणें । नाश केला शब्द ज्ञानें ।। विषयलोभी मनें । साधनें बुडविलीं ।। पिटूं भक्तीचा डांगोरा । कळि काळासी दरारा । तुका म्हणे करा । जयजयकार आनंदें ।।' या एकाच कार्यासाठी तुकारामबुवा स्वत स साक्षात्कार झाल्यानंतरही उरले होते 'तुका म्हणे आतां उरलों उप-कारापुरता ।।' असे त्यानीच म्हटले आहे. 'आपण जेवुनी जेवबी लोका । संतर्पण करी तुका' ही त्याची भूमिका होती. लोकाना सन्मार्गास लावून त्याचे सर्वतोपरी कल्याण साधणे, एवढेच कार्य त्यांना आता उरले होते. या साठी 'तीक्ष्ण उत्तरें । हातीं घेऊनि बाण फिरे । नाहीं भीड भार । तुका म्हणे साना थोर' अशी आपली भूमिका निर्माण करावी, या साठी ते 'कांस घालोनि बळकट । झालों कळि-काळासी नीट' अशा भूमिकेवरून लोकाना म्हणत आहेत; 'या रे या रे लहान थोर । याती भलते नारी नर । करावा विचार । न लगे चिंता कोणासी' कुणासही चिंता उरू नये, या भूमिकेवरून त्यानी लोकांना उपदेश केला. तो आजही कितीतरी अधिक अर्थाने उपयुक्त आहे. पराकोटीची निवृत्ती कोण-त्याही संताने शिकविली नाही. पण केवळ धनदौलत व स्वतःची बायकामुले, यातच रमणाऱ्या माणसाची गयही त्यांनी केलेली नाही. माणसाच्या जन्मास येऊन काय मिळवायचे, हे फक्त तुकाराम महाराजासारखे सत्पुरुषच सांगू शकतात.

## शाश्वतचा विसावा

अशी ही पावन व मंगलकारी तुकोबाची वाणी ती नारायणाच्या कृपेने रंगलेली आहे ती देवाचा निरोप सांगणारी आहे खऱ्याखोट्याचा निवाडा करणारी आहे वेदाचा व पूर्वपरंपरेचा अर्थ यथार्थत्वाने सांगणारी आहे तिला दिव्यत्वाचा स्पर्श झालेला आहे परतत्त्वाच्या स्पर्शाने ती सतेज बनलेली आहे ईश्वरी प्रेमाने ती लडिवाळ व कमालीची रसाळ झाली आहे तिला अमृताचे माधुर्य आहे, चंद्रिकेची शीतलता आहे. तिला चंदनाचा सुगंध आहे, तिला विठ्ठलरूपाचा स्वाद आहे **'तुका म्हणे चवी आले । जें का मिश्रित विठ्ठले,'** तुकोबाचे सर्व जीवनच विठ्ठलस्पर्शाने पावन झालेले होते त्याची शाश्वत टिकणारी अशी ही अभंगवाणी, आजच्या पडत्या काळात, धाईगर्दीच्या काळात, तीव्र जीवनकलहाच्या काळात, अशांततेच्या काळात, धामधुमीच्या व क्वचित प्रसंगी अराजकाच्या काळात, माणसाच्या मनास सावरणारी आहे, धीर देणारी आहे तिच्या सावलीतच माणसाचे तप्त मन आजही विसावा घेऊ शकेल, आजही त्यास अलौकिक सुखाचे व आंतरिक समाधानाचे मार्ग स्पष्टपणे दिसतील ते तुकाराम महाराजाच्या या वाणीच्या सौम्य व शीतल प्रकाशातच

---



॥ श्रीविठ्ठलाय नमः ॥

॥ श्रीनिवृत्तिनाथाय नमः ॥ श्रीज्ञानेश्वराय नमः ॥

॥ श्रीराघवचैतन्यश्रीकेशवचैतन्य ॥

॥ श्रीबाबाचैतन्यसद्गुरुभ्यो नमः ॥

## मंगलाचरण–अभंग ६.

१ समचरणदृष्टि विटेवरी साजिरी । तेथें माझी हरी वृत्ति राहो ॥ १ ॥
आणीक न लगे मायिक पदार्थ । तेथें माझें आर्त नको देवा ॥ २ ॥
ब्रह्मादिक पदें दुःखाची शिराणी । तेथें दुश्चित[1] क्षणी जडो देसी ॥ ३ ॥
तुका ह्मणे त्याचे कळले आम्हा वर्म । जे जो कर्मधर्म नाशवत ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – समचरण– एकसारखी पावले, साजिरी–शोभिवत, वृत्ति–अतःकरणाची प्रवृत्ती, चित्ताचे लक्ष, न लगे–लागत नाहीत, मायिक–डोळ्याना दिसणारे, भासमान होणारे, परतु वस्तुत नाशवत वा अशाश्वत असणारे, आर्त–इच्छा, आसुसलेली वृत्ती, ब्रह्मादिक–ब्रह्मलोक वगैरे, पदे–स्थाने, ठिकाणे, शिराणी–कळस, शेवट, परिणाम क्षणी–नको (नकारात्मक अर्थ) वर्म–मुख्य रहस्य, कर्मधर्म–कर्म आणि धर्म किंवा कर्ममूलक धर्म, नाशवत–नाश पावणारे

अर्थ – विटेवरील एकसारख्या पावलाकडे ज्याची दृष्टी लागली आहे, अशा सुशोभित मूर्तीकडे हे हरी, माझ्या अतःकरणाची प्रवृत्ती दृढ होवो १ याखेरीज दुसरे काही मायिक म्हणजे दृष्टीस मात्र दिसणारे पण वास्तविकपणे नसणारे असे पदार्थ मला नकोत; देवा, या पदार्थांवर माझी इच्छा कधीही जडू नये २ ब्रह्मलोक, विष्णुलोक, इत्यादी ठिकाणे आहेत ती सर्व परिणामी दुःख देणारी असल्यामुळे त्या ठिकाणी माझ्या चित्तास लोभू देऊ नकोस ३ तुकाराम महाराज म्हणतात की कर्ममूलक असे जे जे नाना धर्म आहेत त्यांचे रहस्य आम्हास समजले आहे ते सर्व नाशवत असून तुझे रूप तेवढे शाश्वतचे आहे ४

विवरण –श्रीतुकाराम महाराजांच्या गाथेतील पहिले सहा अभग मगलाचरणात्मक आहेत कोणत्याही ग्रंथाचा आरभ मगलाचरणात्मक असावा असा रिवाज भारतीय कविसंप्रदायात पुरातन काळापासूनचा आहे संस्कृत साहित्यशास्त्रकारानी मगलाचरणाचे तीन मुख्य प्रकार सांगितले आहेत आशीरूप, नमस्क्रियारूप, व वस्तुनिर्देशरूप

---

१ तेथें चित्त क्षणी

या तीन प्रकारानी ग्रंथाचा आरंभ मंगलमय करावा असा संकेत आहे. प्रेक्षक, पाठक, श्रोता वा चिंतक याचे कल्याण व्हावे म्हणून जी प्रार्थना इष्ट देवतेची स्तवनकवनात केलेली असते ती आशीरूप मंगलचरणाची होते. इष्ट देवतेचे स्मरण व वंदन ज्यात असते ते नमस्क्रियारूप मंगलाचरण व या दोनही प्रकाराखेरीज केवळ वस्तुनिर्देशरूप हाही मंगलाचरणाचा एक प्रकार आहे. कोणत्याही विशिष्ट देवतेचे स्मरण वा वंदन यात नसून पद्याचे आद्याक्षर अथवा आद्यपद मंगलदायक वर्णांनी युक्त असते. कधी कधी या तीनही प्रकाराच्या मंगलाचरणानी ग्रंथास प्रारंभ केलेला असतो.

तुकारामबुवाच्या गाथेच्या आरंभी असलेले सहा अभंगाचे मंगलाचरण मुख्यत नमस्क्रियारूपच आहे. तुकारामानी आपले अभंग लिहून ठेविले असावेत, परंतु त्या हस्तलिखिताचा पत्ता कुणासच लागलेला नाही. तुकारामाच्या काही शिष्यानी त्याचे पुष्कळ अभंग जतन करून ठेविले होते. त्याच्यातील अभंगाचा क्रम शक्य तो जसाच्या तसा ठेवून जी गाथा उपलब्ध आहे तीत हे सहा अभंग मंगलाचरणाचे आहेत. या सहाही अभंगात तुकारामबुवानी आपले आराध्य दैवत पंढरपूर येथील श्रीविठ्ठल याचे अती सुंदर असे रूप वर्णन करून त्याच्या ठिकाणची आपली अनन्य भक्ती व्यक्त केली आहे. बुवाचे बरेचसे अभंग स्फुट आहेत, म्हणजे त्यातून भक्तीची स्फुट अशी भावछटा प्रकट झाली आहे. काही प्रासंगिक आहेत, आणि काहींचा अंतर्गत असा अर्थसंबंधाने गट निर्माण झालेला आहे. एखादे मोठे कथानक सांगावयास वा एखाद्या मोठ्या तात्त्विक विषयाचे निरूपण करावयास बुवा सिद्ध झालेले नव्हते. ज्याला ग्रंथ म्हणता येईल अशी रचना अर्थातच अभंगगाथेची नाही, त्यामुळे आरंभीचे मंगलाचरण व त्याचा संदर्भ याचा अर्थ तात्पर्यानेच ध्यानात घ्यावयास हवा. कुणी तरी जवळच्या शिष्याने बुवाचे चांगले अभंग निवडून ते प्रथम मंगलाचरण म्हणून बसविले असण्याचीही शक्यता आहे आणि हे पूर्वप्रथेस शोभून दिसणारे असल्याने संप्रदायातही रूढ झाले.

पंढरपूरचे श्रीविठ्ठल किंवा पांडुरंग हे अवघ्या महाराष्ट्राचे आराध्य दैवत आहे. ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ, तुकाराम आदी साधुसंतानी याच दैवताच्या भक्तीचा पुरस्कार देशी भाषेतून काव्यरचना करून केला. श्रीविठ्ठल हे श्रीविष्णूचे वा श्रीकृष्णाचे बालरूप मानले जाते. पुंडलीक महानुभावाच्या काळापासून हे दैवत भक्ताच्या रक्षणासाठी भिवरा नदीच्या वा चंद्रभागेच्या काठावर विटेवर स्थिर झाले आहे. पुंडलीक मुनीची मातृपितृभक्ती पाहून संतुष्ट झालेले देव पंढरपुरास आले व त्याच्या आग्रहाखातर तेथेच भक्तजनासाठी राहिले अशी कथा आहे. या विठ्ठलाचे रूपवर्णन मोठ्या प्रेमाने अनेक संतानी विविध प्रकारानी केले आहे. बहुतेकाच्या वचनातून एक प्रकारची समानता आहे. श्रीविठ्ठल हा समचरणदृष्टीचा आहे असे सर्वांनी सांगितले आहे. **'समचरणी मन माझें वेधलें', 'समचरणीं उभा चैतन्याचा गाभा', 'समपाउलीं उभा', 'तें समचरण विटेवरी', 'समचरण विटेवर। कटीं धरूनिया कर'।** इत्यादी अनेक ओळीतून एकनाथानी श्रीविठ्ठलाच्या समचरणाचे वर्णन केले आहे.

श्रीविठ्ठल विटेवर उभा असल्याची साक्ष तर सर्वत्र अभंगातून मिळते. आईबापाच्या सेवेत रममाण झालेल्या पुंडलीकाने एक वीट विठ्ठलास दिली व त्यावर उभे राहण्यास विनविले असा कथासंदर्भ आहे. या विटेचीही पुराणात कथा सापडते. इंद्राचा शत्रू वृत्रासुर यास तीन तोंडे असून त्याने इंद्रपदासाठी घनघोर तपश्चर्या आरंभिली होती. इंद्राने भयापोटी वृत्रासुराची तीन शिरे छेदून टाकली. वृत्रासुराने इंद्रास शाप दिला की तू दिंडिरवनात वीट होऊन पडशील. मग इंद्रास शोक झाल्यावर विष्णूनी त्यास अभिवचन दिले की पुंडलिकाच्या आश्रमात मी येईन तेव्हा तुझा उद्धार करीन. ती ही वीट. या विटेवर अखंडपणे उभा राहिला श्रीविठ्ठल, म्हणून इंद्राचा उद्धार झाला असा भावार्थ.

वरवर असे दिसते की सारी पुण्यकर्मे वा कर्मकांडे करायची ती स्वर्गप्राप्तीसाठी. इंद्रपद मिळावे, ब्रह्मलोक, मोक्षपद याची प्राप्ती व्हावी, मुक्ती मिळावी, जन्ममरणाच्या फेऱ्या चुकाव्यात म्हणून सारा अट्टाहास असतो. परंतु विठ्ठलभक्तीत रंगून गेलेल्या साधुसंतानी अगदी वेगळे असे स्वसुखस्थान शोधून काढले आहे. त्याना स्वर्गसुख नको, संपत्ती नको, ब्रह्मपद नको, मोक्षसुद्धा नको. त्याना हवे आहे केवळ श्रीविठ्ठलाचे सान्निध्य. श्रीविठ्ठल आपला प्राणसखा व आपण त्याचे जिवलग भक्त या नात्यातील गोडी त्यानी अनुभवली असल्याने ब्रह्मादिक पदाची त्याना 'शिराणी' वाटली, म्हणजे त्याची किळस आली, अथवा परिणामी ती दु:खाची वाटली. त्यात नवल काय? पंढरपूरच्या विठ्ठलाभोवती जो भागवत संप्रदाय उभा राहिला, जो वारकरी पंथ वाटचाल करू लागला त्याचे हे मोक्षसुखाच्या तुच्छत्वाचे एक मुख्य

वैशिष्ट्य मानावे लागेल इतर सर्वत्र स्वर्गासाठी, मोक्षासाठी अट्टहास असताना मराठी साधुसंत मात्र त्याकडे पाठ फिरवून आहेत श्रीविठ्ठलाची गुरुशोभा पाहावयास मिळावी म्हणून व संतसंगतीची माधुरी अनुभवास यावी म्हणून अनेक जन्माची येजा सुद्धा ते पसंत करतील 'मोक्षपदें तुच्छ केलीं या कारणें,' 'मोक्ष एवढें सुख । सुख नव्हेंचि तें दुःख,' 'सांडुनि सुखाचा वाटा । मुक्ति मागे तो करंटा,' 'मोक्ष तुमचा देवा । तुम्ही दुर्लभ तो ठेवा' इत्यादी चरणातून तुकारामबुवानी ब्रह्मपद वा मुक्तिपद आम्हास काय कामाचे असाच भाव व्यक्त केला आहे ब्रह्मादिकाची प्राप्ती म्हणजे शेवटी दुःखच परिणामास येणार असा भावार्थ पुण्याचा साठा संपल्यावर परत मृत्युलोकी जर यावे लागत असेल तर त्या स्वर्गसुखाची, मुक्तिसुखाची, ब्रह्मपदाची काय किंमत ?

२ सुंदर तें ध्यान उभें विटेवरी । कर कटावरी ठेवूनिया ॥ १ ॥
तुळसीहार[1] गळा कासे पीतांबर । आवडे निरंतर[2] तेंचि रूप ॥ २ ॥
मकरकुंडले तळपतीं श्रवणीं । कंठीं कौस्तुभमणि विराजित ॥ ३ ॥
तुका म्हणे माझें हेंचि सर्व सुख । पाहीन श्रीमुख आवडीनें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – ध्यान–उभे राहण्याची ऐट, कर–हात, कटावरी–कमरेवर, तुळसीहार–तुळशीच्या मंजिऱ्याचा हार, गळां–गळ्यात, कासे–कमरेला, पीतांबर–पिवळ्या रंगाचे रेशमी वस्त्र, मकरकुंडले–माशाच्या आकाराची कुंडलं, तळपती–चमकतात, श्रवणीं–कानात, कंठीं–गळ्यात, कौस्तुभमणि–श्रीविष्णूने वक्षावर धारण केलेल्या रत्नाचे नाव, विराजित–शोभत आहे श्रीमुख–श्रीविठ्ठलाचे सुंदर मुख, आवडीनें–भक्तीने, प्रीतीने

अर्थ – विठ्ठलाचे सुंदर रूप विटेवर उभे आहे. त्याने कमरेवर हात ठेविले आहेत १ त्याच्या गळ्यात तुळशीचा हार असून कमरेभोवती जरीचा पीतांबर त्याने नेसला आहे असे हे श्रीविठ्ठलाचे रूपच मला नेहमी आवडते २ त्याच्या कानात मत्स्याच्या आकाराची कुंडले चमकत आहेत आणि गळ्यात कौस्तुभमणी शोभत आहे ३. तुकाराम महाराज म्हणतात, विठ्ठलाचे हे सगुण सुंदर रूप हेच माझे सर्वसुख आहे याच मुखाकडे मी मोठ्या प्रीतीने पाहात राहीन याच्या एकसारख्या दर्शनात माझे सर्वसुख आहे ४

विवरण – तुकारामबुवाचा हा अतिशय प्रसिद्ध असा अभंग असून वारकरी संप्रदायाच्या भजनाच्या सुरुवातीसच हा अभंग नेहमी म्हणतात आराध्य दैवत जे श्रीविठ्ठल त्याचे अतीव सुंदर, मनोहर व सुखकारक स्वरूप यात *मोठ्या कोमलतेने बुवानी वर्णन केले आहे श्रीविठ्ठलाच्या मूर्तीचे असेच बहारदार वर्णन स्वतः तुकारामबुवानी व* इतर अनेक संतानी अगदी मनापासून पुनः पुनः केले आहे विठ्ठलरूपाचे वर्णन करणे, चिंतन करणे हाच एक सुखाचा ठेवा त्याना वाटत असे श्रीविठ्ठलाचे ध्यान सुंदर आहे, ते विटेवर उभे आहे, त्याचे हात कमरेवर आहेत, त्याच्या गळ्यात तुळशीची माळ आहे, तो पीतांबरधारी आहे, त्याच्या कानात मकरकुंडले चमकत आहेत, वक्षावर कौस्तुभमणी शोभत आहे या सर्व वर्णनात श्रीविठ्ठलाचे रूप सामावलेले आहे

श्रीविठ्ठल हा विष्णूचा अवतार असल्याच्या खुणा या अभंगात सहज सापडण्यासारख्या आहेत पीतांबर, तुळशीचा हार, मकरकुंडले, कौस्तुभमणी या वस्तू श्रीविष्णूलाही अती प्रिय असल्याचे आपणास माहित आहेच विष्णूचे व तुळशीचे सान्निध्यही पुराणातून अनेक ठिकाणी वर्णन केले आहे वृन्दा ही जालंधराची पत्नी जालंधराने आपली सत्ता सर्वत्र पसरविण्यास आरंभ केला त्याची पत्नी वृन्दा ही थोर पतिव्रता असल्याने त्याचा पराभव अशक्य होऊन बसला विष्णूने तिचे कपटवेषाने पातिव्रत्य हरण केले वृन्देस याचे परम दुःख झाले तिने तुझ्याही भार्येचे हरण होईल अशी वाणी उच्चारून अग्नीमध्ये प्रवेश केला त्याच्या प्रकाराने श्रीविष्णूचे मन अतिशय अस्वस्थ झाले तेव्हा त्यास शांत करण्यासाठी वृन्दाप्रमुख अग्निप्रवेशस्थली गौरी, लक्ष्मी व स्वरा याच्या अंशानी आवळी, तुळशी व मालती अशा वनस्पती निर्माण झाल्या, तेव्हा विष्णूचे मन स्थिर झाले श्रीविष्णूचा हा तुळशीशी संबंध, श्रीकृष्णावतारातील वृंदावनलीला, कृष्ण व तुळस यांचा विवाह यातील रहस्य ध्याना समजण्यासारखे आहे श्रीविष्णूस, कृष्णाला, म्हणजेच पर्यायाने विठ्ठलाला तुळशीची माळ यासाठी प्रिय आहे आपल्या पुराणग्रंथातून तुळशीमाहात्म्यही

१ गळां तुळसीहार २ आवडे निरंतर हेंचि ध्यान

अनेक प्रकारानी सागितले आहे पद्मपुराणात तुळशीचे सपूर्ण स्तोत्र आलेले आहे पुन पातालखडात तुळसी-दलाचे माहात्म्य वर्णन केले आहे तुलसीदलाच्या सेवनाने अनेक रोग नाहीसे होतात, दारिद्य नाहीसे होते, अनेक पापे नाहीशी होतात असे तेथे सागितले आहे ( दारिद्रचदु खभोगादिपापानि सुबहून्यपि । तुलसी हरते क्षिप्र रोगानिव हरीतकी ९४।८-९ ) मराठी सतानीही श्रीविष्णुवरावर आलेल्या या तुळशीचे मनापासून स्वागत केले आहे **'वैकुंठाहुनी आली । धन्य तुळशी माउली'** म्हणून एकनाथानी तुळशीमाहात्म्यात तिचा गौरव केला आहे **'तुळशीचें पान । एक त्रैलोक्यासमान,'** **'देवासी प्रिय तुळशीपान'**, **'तुळशी जाला कृष्णरावो'** इत्यादी वचनातून एकनाथानी तुळशीचे माहात्म्य उत्तम रीतीने सागितले आहे वारकरी पथात आजही तुळशीचे महत्त्व विशेष आहे दारात तुळशीवृदावन, गळयात तुळशीची माळ व देवाला तुळशीहार याची महती विशेष अशी या सप्रदायात दिसून येते

साधुसतानी केलेल्या विठ्ठलरूपाचे वर्णन वाचीत असताना एक प्रश्न मनात निर्माण होतो तो असा की हे सव वर्णन विठ्ठलाचे खरे, पण हे कोणत्या मूर्तीचे ? आज पढरपुरास उभी आहे तीच मूर्ती सर्वांच्या डोळ्यासमोर होती काय ? आजही ती उभी आहे, तिला मुगुट आहे, कानात माशाच्या आकाराची कुडले आहेत, कौस्तुभ मण्याचा हार गळयात आहे डाव्या छातीवर एक खळगा म्हणजे श्रीवत्सलाछन व उजव्या छातीवर एक वर्तुळ म्हणजे श्रीनिकेतन आहे दडावर बाजूबद आहेत, मनगटावर मणिबध आहेत डाव्या हातात शख आहे, उजव्या हातात कमल आहे विठ्ठलाचे असेच रूप सवसाधारणपणे साधुसतानी वर्णन केले आहे परतु कधी फरक पडण्याचे कारण एक असू शकेल की विठ्ठलमूर्तीस पोषाख घालून, दागदागिने घालून नटविण्याची प्रथा असल्याने त्या सालकृत रूपाचे वर्णन थोडे वेगळे येण्याची शक्यता आहे दुसरे असे की इतक्या दीर्घ कालावधीत मूर्ती एक जाऊन दुसरी आली असण्याची शक्यता दिसते तिसरे अतिशय महत्त्वाचे कारण असे की नामस्मरणात व भक्तीच्या आवेशात साधुसत तल्लीन होत असतात त्याच्या नजरेसमोर सुशोभित झालेले सगुणसुदर रूप नेहमीच असते मोठ्या आवडीने, कौतुकाने, प्रीतीच्या भराने साधुसतानी विठ्ठलरूपाचे वर्णन केले तर त्यातील रहस्य समजण्यासारखे आहे विठ्ठल हा मदनाचा पुतळा आहे, हा चैतन्याचा गाभा आहे, ही अनत लावण्याची शोभा आहे त्याच्या मुगुटाची शोभा कोटी सूर्याच्या झळाळासारखी आहे या सतवचनाचा भावार्थ रसिकतेनेच समजावून घेण्यासारखा आहे

३ सदा माझे डोळे जडो तुझे मूर्ती । रखुमाईच्या पती सोयरिया ॥ १ ॥
गोड तुझें रूप गोड तुझें नाम । देईं मज प्रेम सर्व काळ ॥ २ ॥
विठो माउलिये हाचि वर देईं । सचरोनि[1] राहीं हृदयामाजी ॥ ३ ॥
तुका म्हणे कांहीं न मागें आणीक । तुझे पायीं सुख सर्व आहे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा —सदा—नेहमी, जडो—जडून, खिळून राहोत रखुमाई—रुक्मिणीचे प्राकृत रूप, सोयरिया—आप्तस्वकीया, सचरोनी—शिरून हृदयामाजी—अत करणात, आणीक—इतर दुसरे

अर्थ —हे सख्या, रुक्मिणीपते, श्रीविठ्ठला, माझे डोळे नेहमी तुझ्या मूर्तीवर जडून राहोत १ तुझे रूप अती गोड आहे, तुझे नावही अती गोड आहे याचेच प्रेम मला नेहमी देत जा २ हे विठ्ठल माऊली ! माझ्या अत करणात निवास करून तू राहावेस हाच एक वर मला तू दे ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी दुसरे आणखी काही मागत नाही, तुझ्या पायापाशीच मला सर्व प्रकारची सुखे मिळतात ४

विवरण —या अभगात तुकारामबुवा विठ्ठलाच्या गोड रूपाचे व नावाचे वर्णन करून आपल्या मनाची तळमळ व एकमेव इच्छा व्यक्त करतात परमेश्वरापाशी अगदी निकटची जवळीक प्रस्थापित करण्यासाठी भक्त विविध प्रकाराची नाती त्याला जडवीत असतात माऊलीखेरीज अधिक सोज्ज्वळ, अधिक निकटचे, अधिक वात्सल्यपूर्ण नाते दुसरे कोणते ? विठो माऊलीये ! असे म्हणून महाराज त्याच्या जणू मानेवरच खेळत आहेत त्याला त्यानी सोयरा असेही येथे म्हटले आहे रखुमाईचा पती असे सबोधून आणखी एका नाजुक व रम्य अशा नात्याचा उल्लेख करून बुवानी आपल्या मनाची भावस्थिति प्रकट केली आहे 'रखुमाई' हे रुक्मिणीचे प्राकृत रूप समजले जाते रुक्मीपासून लक्ष्मा—लखुमा—रुखमा—रखुमा असाही क्रम सागण्यात येतो

---

१ सचरोनिया

४ राजस सुकुमार मदनाचा पुतळा । रविशशिकळा लोपलिया ॥ १ ॥
कस्तुरीमळवट चंदनाची उटी । रुळे माळ कंठीं वैजयंती ॥ २ ॥
मुगुट कुंडलें श्रीमुख शोभलें । सुखाचें ओतलें सकळ ही ॥ ३ ॥
कासे सोनसळा पांघरे पाटोळा । घननीळ सांवळा बाइयांनो ॥ ४ ॥
सकळ ही तुम्ही व्हा गे एकीसवा । तुका म्हणे जीवा धीर नाहीं ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– राजस–सुंदर, राजतेजाने चमकणारा, सुकुमार–लहान मुलाप्रमाणे कोमल व नाजुक, मदन–सौंदर्यवान कामदेव, रविशशिकळा–सूर्यचंद्राचे तेज, लोपलिया–नाहीसा झाल्या. कस्तुरी–एक सुगंधी द्रव्य, मळवट–कपाळभर असलेला लेप, चंदन–एक सुगंधी वृक्ष, उटी–लेप, रुळे–डौलाने लोळते, वैजयंती–विष्णूच्या गळ्यातील माळ हिरा, माणिक, पाच, नीळ व मोती अशा पचरत्नाची ही असते. ओतले–साच्यातून तयार केले, कासे–कमरेस, सोनसळा–जरीचा पीतांबर, पाटोळा–रेशमी वस्त्र, घननीळ–मेघाप्रमाणे निळा, सावळा–श्यामल, एकीसवा–एका बाजूस.

*अर्थ :– स्वत: गोपीची भूमिका घेऊन आपल्या इतर सख्यांना तुकारामबुवा म्हणत आहेत,* ' हा राजतेजाने शोभणारा, अतिशय सुकुमार असणारा, विठ्ठल म्हणजे सौंदर्यवान कामदेवाचाच पुतळा आहे. याच्या तेजापुढे सूर्याचे व चंद्राचे तेजसुद्धा लोपून जाते. १. याच्या कपाळावर कस्तुरीचा मळवट भरलेला असून सर्वांगावर चंदनाचा लेप लाविला आहे. याच्या गळ्यांत वैजयंती माळ मोठ्या डौलाने लोळत आहे. २. मुगुट व कुंडले यांनी याच्या सुंदर मुखास शोभा चढली आहे. जणु काही हे मुख म्हणजे प्रत्यक्ष सुखच मुशीत घालून आकारास आले आहे. ३. या विठ्ठलाने पीतांबर नेसला आहे आणि अंगावर रेशमी वस्त्र पांघरले आहे. मेघाप्रमाणे सावळ्या रंगाच्या अंगकांतीच्या या श्यामल रूपाकडे बायांनो, पाहा तरी ४. तुम्हांला शक्य होत नाही तर तुम्ही सर्वजणी दूर व्हा पाहू; माझ्याच्याने आता अधिक धीर धरवत नाही. ५.'

*विवरण :– परमेश्वराची जवळीक अधिक तीव्रतेने अनुभविण्यासाठी तुकाराममहाराजानी आणखी एका नात्याने त्याची आराधना येथे केली आहे. गोपीच्या भूमिकेतून इतर अनेक मैत्रिणीना बरोबर घेऊन बुवा विठ्ठलाकडे पाहात आहेत.* राजस, सुकुमार, मदनाचा पुतळा या सर्व विशेषणात्मक वर्णनाचे सौंदर्य लक्षणीय आहे. कस्तुरी, चंदन, जरीची व रेशमी वस्त्रे, यासहित साधलेल्या ऐश्वर्याचे राजस वर्णन या भूमिकेवर शोभण्यासारखे आहे. गोपीप्रमाणेच बुवा अगदी अधीर झाले आहेत. आपल्या मैत्रिणीना दूर सारून आपणच धावत जाऊन त्यास भेटावे अशी उतावीळ त्याना झालेली आहे. या भावाचे अधिक वर्णन तुकाराम महाराजाच्या विराण्या किंवा विरहिणींचे अभंग अथवा गौळणीचे विवेचन करतेवेळी आपण पाहू. येथे श्रीविठ्ठलाला कृष्णाप्रमाणे घननीळ, सावळा असे संबोधिले आहे. गूढता, सौंदर्य, तीव्र भावना याचे प्रतीक म्हणजे निळा वर्ण. विशाल आकाशाचा निळा रंग; अथांग सागराचा निळा रंग, परमेश्वराच्या विस्तीर्ण रूपाची प्रभा निळसरच कल्पिली आहे. योगप्रक्रियेतही या निळ्या रंगास महत्त्व आहे. या सावळ्या वा निळ्या रूपाचे वर्णन ज्ञानेश्वरानी मोठ्या बहारीने केले आहे. ' निळिये सारणी वाहे मोतियाचे पाणी ' हे त्याचे वचन प्रसिद्ध आहे. ' सांवळियाचें तेज सांवळा श्रीहरी ', ' सावळाचि नयनीं दिसे ', ' नीळवर्ण ब्रह्म, नीळवर्ण कर्म ', ' नीळवर्ण तनु नीळवर्ण गुणू '; ' नीळप्रभा दिसे, नीळपणे असे ' इत्यादी ओळीतून ज्ञानदेवानी घननीळाचे सान्निध्य वर्णन केले आहे. ' निळा पंढरपुरचा लावण्य पुतळा ' ' नीळवर्ण घनश्याम । आत्माराम विटेवरी ' अशा शब्दात एकनाथानी सावळ्या विठ्ठलास आळविले आहे. सततत्त्वज्ञानात मुरलेले आधुनिक कवी ' बी ' यानी नीळवर्णाचे मोठे सुरेख व यथायोग्य वर्णन केले आहे. त्यानी म्हटले आहे; ' गूढत्वाचें, सुंदरतेचें, भावनातेचे, नीलवर्ण हें द्योतक यांच्या नि:सीमत्वाचें '

५ कर कटावरी तुळसीच्या माळा । ऐसें रूप डोळां दावीं हरी ॥ १ ॥
ठेविले चरण दोन्ही विटेवरी । ऐसें रूप हरी दावीं डोळां ॥ २ ॥

कटीं पीतांबर कास मिरवली । दाखवीं वहिली ऐसी मूर्ती ॥ ३ ॥
गरुडपारावरी उभा राहिलासी । आठवे मानसीं तेंचि रूप ॥ ४ ॥
झुरोनि पांजरा होऊं पाहे आतां । येईं पंढरीनाथा भेटावया ॥ ५ ॥
तुका म्हणे माझी पुरवावी आस । विनंती उदास करूं नये ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा :– कास–काचा, वहिली–सुंदर, गरुडपार–पंढरपूर येथील पांडुरंगाच्या मंदिरातील सोळखांबीमध्ये गरुडखांबाजवळची देवासमोरची जागा मानसीं–मनामध्ये, पांजरा–सापळा, अस्थिपंजर, आस–इच्छा, उदास–व्यर्थ, दुर्लक्षित

अर्थ – हे हरी, हात कमरेवर आहेत, गळ्यात तुळशीच्या माळा आहेत असे तुमचे रूप माझ्या डोळ्यांना दाखवा ना. १ दोनही पाय विटेवर स्थिर आहेत असे तुमचे रूप मला दाखवा ना. २ पीतांबराची सुंदर कास शोभत आहे अशी तुमची सुंदर मूर्ती मला दाखवा ना. ३ विठ्ठला, तू गरुडपारावर उभा राहिला आहेस, हेच रूप मला नेहमी आठवत असते. ४ पंढरीनाथा! आता तू भेटायला ये ना. तुझी वाट पाहता पाहता मी झुरून चाललोय. माझा देह म्हणजे नुसता हाडांचा सापळा राहिला आहे. ५ तुकाराम महाराज म्हणतात, माझ्या मनातील एवढी इच्छा तुम्ही पुरवावी; माझ्या या विनंतीस व्यर्थ करू नका. तुम्ही उदास नका राहू. ६

विवरण :– या अभंगात अशी अशी मूर्ती हे हरी, तुम्ही दाखवा असे म्हणून तुकाराम महाराजांनी आपल्या मनातील अधीरता दर्शविली आहे, 'गरुडपारावरी उभा राहिलासी' या रूपाची आठवण आपणास होते असे तुकोबांनी म्हटले आहे विठ्ठलमंदिरातील सोळखांबी मंडप प्रसिद्ध आहे या मंडपास सोळा खांब असून यातील दक्षिण व पूर्व बाजूकडील दुसऱ्या ओळीतील एक खांब रुप्याच्या व सुवर्णाच्या पत्र्यांनी मढविलेला आहे यास गरुडखांब म्हणतात. गरुड हे विष्णूचे, विठ्ठलाचे वाहन व भक्त, म्हणून या खांबास आलिंगन देऊन लोक विठ्ठलाच्या दर्शनास जातात येथील जागेवरून विठ्ठलाचे मुखदर्शन चांगले होते याच जागेस गरुडपार असेही म्हणतात पण या पारावर तू उभा राहिलास व ते रूप मला आठवते असे तुका म्हणतात याचा अर्थ काय? पूर्वी देवाचे स्थान या ठिकाणी होते की काय? गरुडावरून देव आले ते प्रथम येथेच उभे राहिले असावेत इथेच त्यांना विटेवर उभे राहण्यास पुंडलिकाने सांगितले असावे, मग पुढे केव्हातरी मंदिराची वाढ जसजशी होत गेली तसतसे विठ्ठलाचे स्थान बदलले असावे

६ गरुडाचें वारिकें कासे पीतांबर । सांवळें मनोहर कै देखेन ॥ १ ॥
बरवया बरवंटा घनमेघ सांवळा । वैजयंतीमाळा गळां शोभे ॥ २ ॥
मुगुट माथां कोटि सूर्याचा झळाळ । कौस्तुभ निर्मळ शोभे कंठीं ॥ ३ ॥
ओतीव श्रीमुख सुखाचें सकळ । वामांगीं वेल्हाळ रखुमादेवी ॥ ४ ॥
उद्धव अक्रूर उभे दोहींकडे । वर्णिती पवाडे सनकादिक ॥ ५ ॥
तुका म्हणे नव्हे आणिकांसारिखा । तोचि माझा सखा पांडुरंग ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा :– गरुड–विष्णूचे वाहन, वारिकें–वाहन, बरवया–सुंदर, सुरूप, बरवंटा–चांगला, सुंदर, घनमेघ–दाट मेघ, झळाळ–लखलखाट, वामांगीं–डाव्या बाजूस, वेल्हाळ–लडिवाळ, लाडकी, उद्धव–श्रीकृष्णाचा परम मित्र, अक्रूर–श्रीकृष्णाचा मदतनीस, पवाडे–स्तुतिस्तोत्रें, सनकादिक–सनक, सनंदन, सनातन व सनत्कुमार हे ब्रह्मदेवाचे चार मानसपुत्र आणिकांसारिखा–इतर देवासारखा, पांडुरंग–विठ्ठलाचे एक नाव

अर्थ – गरुड ज्याचे वाहन आहे व ज्याने पीतांबर नेसलेला आहे ते सावळे व मन हरण करणारे रूप मी केव्हां बरे पाहीन? १. अतिशय सुंदर असणारा, घनदाट मेघांप्रमाणे सावळा असणारा व ज्याच्या गळ्यांत वैजयंतीमाळ आहे असा विठ्ठल शोभून दिसतो. २. याच्या डोक्यावर जो मुगुट आहे त्याचा लखलखाट कोटी सूर्यापेक्षाही अधिक आहे आणि याच्या कंठामध्ये कौस्तुभ मणी शोभून दिसत आहे. ३. याचे सुंदर मुख सर्व सुखांचे

ओतून तयार करावे इतके शोभिवत असून याच्यां डाव्या अंगास रुक्मिणीदेवी आहे ४. याच्या दोन्ही बाजूस उद्धव व अक्रूर उभे असून याची स्तोत्रे सनकादिक कुमार नेहमी गात असतात ५. तुकाराम महाराज म्हणतात की हा काही इतर देवासारखा नसून अनन्यसाधारण असा माझा हा सखा पांडुरंग आहे ६

विवरण : श्रीविठ्ठल हे विष्णूचेच रूप, याचा आणखी एक दाखला म्हणजे विष्णूचे जे वाहन तेच गरुड विठ्ठलाचेही या ठिकाणी कल्पिले आहे गरुड हा कश्यप व विनिता याचा पुत्र आईच्या दास्यविमोचनासाठी याने अमृताचा कुंभ मिळविला या कृत्यामुळे श्रीविष्णू याच्यावर संतुष्ट झाले व त्यानी त्यास आपल्या ध्वजावर जागा दिली, व याने विष्णूचे वाहन होण्याचे मान्य केले विठ्ठलाच्या देवळात विठ्ठलासमोर महामंडपात एक लहानसे गरुड-मंदिर आहे या अभंगात वामांगी रुक्मिणी असे म्हटले आहे आज रुक्मिणी अगदी जवळ मागेच डाव्या बाजूस नसली तरी थोड्या दूर अंतरावर शेजारीच तिचे स्वतंत्र देऊळ आहे परंतु सर्व संतानी विठ्ठलरखुमाई याचे सांनिध्य मानलेले आहे पुंडलिकाच्या मातृसेवेस भुलून द्वारकेहून जेव्हा देव दिंडिरवनात आले तेव्हा त्याच्याबरोबर रुक्मिणीही आली, पण आपणापेक्षा देवाला राधा व भक्तच अधिक प्रिय आहेत असे वाटून ती रुसली असल्याची समजूत आहे म्हणून ती थोडी दूर पंढरपूरास आहे इतरत्र मात्र विठोबा व रखुमाई एकत्र असतात पूर्वी केव्हा तरी पंढरपुरासही या दोन मूर्ती शेजारीशेजारीच असाव्यात असा जाणत्याचा तर्क आहे

उद्धव हा श्रीकृष्णाचा एक प्रिय सखा नंद, यशोदा व गोपी याचे सांत्वन करण्यासाठी श्रीकृष्णाने यास गोकुळात पाठविले होते हा मोठा ज्ञानी पुरुष, पण याच्या ज्ञानाचा परिणाम गोकुळातील भक्तावर फारसा झाला नाही सगुण प्रेमाने ज्ञानी उद्धवासही भक्तीचा महिमा पटवून दिला असल्याचा उल्लेख संताच्या वचनातून अनेक प्रसंगी येतो या आपल्या श्रेष्ठ भक्तास श्रीकृष्णाने सरस्वती नदीकाठी आत्मज्ञान सांगितले उद्धवगीता, अवधूतगीता यातून निर्माण झालेली आहे अक्रूर हा श्रीकृष्णाचा आणखी एक सहाय्यक प्रथम श्रीकृष्णास शासन करण्यासाठी मथुरेस घेऊन यावे म्हणून कंसाने याची योजना केली परंतु वाटेत यमुना नदीत स्नान करीत असताना याला श्रीकृष्णाचा साक्षात्कार झाला व त्याचे माहात्म्य अक्रूरास पटले तेव्हापासून हा श्रीकृष्णाचा सहाय्यक बनला ब्रह्मदेवाने तपश्चर्या केली म्हणून विष्णू त्याच्या मानसपुत्राच्या रूपानी प्रकट झाले तेच सनक, सनंदन, सनातन व सनत्कुमार या चार नावानी प्रसिद्ध आहेत याची रूपे बालकाप्रमाणे असून मोठे विरक्त म्हणून याची प्रसिद्धी आहे

श्रीविठ्ठल हा इतर देवाप्रमाणे नाही हा एक मोठाच ध्यास साधुसंताना होता यज्ञयाग, जपजाप्य, योग-साधना, कर्मकांड, नवस, तपश्चर्या इत्यादीनी इतर देव पावतात, तर विठ्ठल केवळ नामस्मरणाने, भजनाने, नुसती हाक मारण्याने प्रसन्न होतो तो स्वभावतःच भक्तावर प्रसन्न आहे इतर देवाप्रमाणे याच्याशी देवाणघेवाण करावी लागत नाही 'न पूजों आणिका देवा, न करीं त्याची सेवा,' 'आणिकाची प्रीति नाइके, न बोले,' इत्यादी वचनातून तुकारामबुवानी केवळ विठ्ठल हेच आमचे दैवत असे आग्रहाने सांगितले आहे इतर दैवताच्या नादी लागू नये असा आग्रहही त्यानी अनेक ठिकाणी धरला आहे या विठ्ठल दैवताचे दुसरे नाव पांडुरंग असे या अभंगात आले आहे विठ्ठल हे विष्णूचे रूप याबद्दल संशय नाही विष्णु या शब्दाचा कानडी अपभ्रंश 'विट्टि' असा होता

या अपभ्रंशापासून विठ्ठल रूप तयार झाले असे डॉ रा गो भांडारकर यानी सांगितले आहे विष्णु विठ्ठु व विठु किंवा विठ्ठल या मार्गानेही विठ्ठलाचा संबंध विष्णूशी पोचतो परंतु पांडुरंग हे नाव या देवास कसे मिळाले? याविषयी दोन तर्क संभवतात पांडुरंग हे शिववाचक नाव आहे शिव पांढऱ्या रंगाचा म्हणून पंडरंग किंवा पांडुरंग पंढरपुरास प्रथम शिवाचे देवालय असल्यामुळे फार प्राचीन काळी पंडरगे, पांडुरंगपल्ली, पांडुरंगपूर इत्यादी नावे या गावास मिळाली व येथला देव पांडुरंग शिव ठरला परंतु पुढे श्रीविष्णूचे माहात्म्य वाढल्यावर शिवविष्णूचे ऐक्य वाढवून विष्णूच्या अवतारास, विठ्ठलासच पांडुरंग म्हणण्याचा प्रघात पडला असा एक तर्क आहे दुसरे अनुमान असे की विठ्ठल हे दैवत पुंडलिकामुळे भिवरेच्या तीरी स्थिर झाले तेव्हा हे पुंडलीकक्षेत्र, पौंडरिकक्षेत्र इत्यादी नावानीही प्रसिद्ध झाले यावरून कानडी पंडरगे हे नाव व यावरून पांडुरंग हे नाव बनले की काय? पंडरगे या कानडी शब्दाचे पंडरिका हे संस्कृत रूप व यावरून पांडुरंग हे नाव बनले असावे

# विराण्या-अभंग

७ वाळो जन मज ह्मणोत शिंदळी । परि हा वनमाळी न विसंबें ॥ १ ॥
साडूनि लौकिक जालियें उदास । नाहीं भय आस जीवित्वाची ॥ २ ॥
नाइके वचन बोलतां या लोकां । ह्मणे जालो तुका हरिरता ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा:– वाळो–वाळित टाकोत, दूर करोत, शिंदळी–दुराचारी, वाईट चालीची स्त्री, न विसंबें–विश्वास ठेवीत नाही, लौकिक–या जगातील, हरिरता–परमेश्वराशी समरस झालेली

अर्थ:–सर्व लोकानी जरी मला दूर केले किंवा माझ्यावर बहिष्कार टाकला व मला दुराचारी स्त्री म्हटले तरी या त्याच्या म्हणण्यावर हा वनमाळी श्रीविठ्ठल विश्वास ठेवणार नाही १ मी सर्व लौकिक म्हणजे या जगातील व्यवहार सोडून उदास झाले आहे मला त्यामुळे कसलेच भय उरलेले नाही, अथवा जीवन जगण्याची आशाही उरलेली नाही २ म्हणून या लोकानी काही जरी कटु शब्दानी मला म्हटले तरी मी ते आता ऐकणार नाही, कारण मी आता पूर्णपणे एका ईश्वराशीच समरस झाले आहे असे तुकाराम महाराज म्हणतात ३

विवरण –येथून पुढले पचवीस अभग 'विरहिणीचे अभग' अथवा 'विराण्या'चे अभग म्हणून प्रसिद्ध आहेत परमेश्वराशी सपूर्ण ऐक्य जे अनुभवास आले त्याचे वर्णन करताना साधुसत अनेक प्रसगी नाइलाज म्हणून व्यावहारिक प्रेमाचा, पतिपत्नीचा किंवा कधी प्रियकर-प्रेयसीचा दृष्टान्त घेऊन आपले मनोगत व्यक्त करतात पति-पत्नी किंवा प्रियकर-प्रेयसी या नात्यातील तीव्रताच फक्त त्याना अपेक्षित असते पतीची वा प्रियकराची वाट पाहण्यात, त्याचे स्मरण करण्यात, त्याचा ध्यास लावून घेण्यात, त्याच्याबद्दल तळमळण्यात अपार सुख पत्नीस वा प्रेयसीस होते प्रत्यक्ष मीलनातील आनदापेक्षाही विरहातील आर्तता अधिक तीव्र, स्मरणाची जाणीव अधिक तीव्र, स्मर्यचितनाची माधुरी अधिक चविष्ट असल्यामुळे भक्तीच्या क्षेत्रात या विरहास मीलनापेक्षाही फार महत्त्व असते मीलनात किंवा अद्वैतानुभूतीत भोगसुख नाही सर्वच एक अशी अनुभूती आल्यावर कोण कुणाचे स्तवन करणार? कोण कुणावर लटके रागावणार? कोण कुणाचे भजन करणार? म्हणूनच कित्येक ठिकाणी 'अद्वैतीं तो नाही माझें समाधान' यासारखे उद्गार साधुसत काढतात

ज्ञानाच्या भूमिकेवर वा तात्त्विक भूमिकेवर अद्वैत, पण भोगासाठी किंवा अद्वैताच्या अनुभवासाठी द्वैत भक्तीत पत्करावे लागते आणि या द्वैतात विरहाला फार मोठे स्थान आहे स्वत स पत्नी वा प्रेयसी समजून साधुसतानी आपले जे अनुभव प्रकट केले आहेत त्यातील माधुरी अवीट आहे यातील शृगारिक अर्थ वरवरचा असून त्याचा सबध केवळ भार्यापुरता किंवा दृष्टान्तापुरताच आहे

शृगाराच वरवरचे रूप असणाऱ्या या भक्तीच्या विशिष्ट प्रकारास 'मधुरा भक्ती' असे नाव असून त्यास शास्त्रकारानी मान्यता दिलेली आहे नारदभक्तिसूत्रात भक्तीचे अकरा प्रकार सांगितले आहेत त्यात कातासक्ती म्हणून म्हणून एका विशेष प्रकाराचा उल्लेख आलेला आहे नारदानी श्रेष्ठ भक्तीचा हाच आदर्श सांगितला आहे भगवताला सर्वस्व अर्पण करणे, (तदर्पिताखिलाचारता), त्याच्या विस्मरणाने व्याकुळ होणे (तद्विस्मरणे परमव्याकुलतेति) हीच नारदाच्या मताने खरी भक्ती होय गोकुळातील गोपींनी याच प्रकारची भक्ती केली असून त्याचाच आदर्श नारदानी मान्य केला आहे (यथा व्रजगोपिकानाम्) त्याच्या मते भक्ती ही मुख्यत प्रेमरूपच आहे (परमप्रेमरूपा) भगवान शांडिल्य यानी प्रेममय भक्तीचाच पुरस्कार केलेला आहे (सा परानुरक्तिरीश्वरे) रूपगोस्वामी, जीवगोस्वामी यानी या भक्तीचे शास्त्रीय स्वरूप 'भक्तिरसामृतसिंधु', 'उज्ज्वलनीलमणि' यासारखे ग्रंथ लिहून सिद्ध केले आहे

८ आधिल्या भ्रतारें काम नव्हे पुरा । ह्मणोनि व्यभिचारा टेकलियें ॥ १ ॥
रात्रंदिस मज पाहिजे जवळी । क्षण [1]त्यानिराळी न गमे घडी ॥ २ ॥
नाम गोष्टी माझी सोय साडा आता । रातले अनंता तुका ह्मणे ॥ ३ ॥

---

[1] क्षण एक निराळी

शब्दार्थ व टीपा –आधिल्या–पूर्वजन्मीच्या, भ्रतारें–पतीकडून, रातले–रममाण झाले

अर्थ –पूर्वजन्मीच्या माझ्या पतीकडून माझी इच्छा पूर्ण न झाल्यामुळे मी आज या वरवर गैर वाटणाऱ्या आचरणास प्रवृत्त झाले आहे १ तो श्रीहरी मला आता रात्रंदिवस माझ्याजवळ हवा त्याच्याशिवाय मला एक क्षणभरही करमणार नाही २ आता माझ्याबद्दलची सर्व आशा सोडून द्या, कारण तुकारामबुवा म्हणतात की मी आता अनंताशी रममाण झाले आहे ३

विवरण –वरवर शृंगारात्मक दिसणाऱ्या या अभंगाच्या निमित्ताने तुकाराम महाराजांनी आपण आता परमेश्वराशी रममाण झालेलो असल्यामुळे आपली आशा आता लोकांनी सोडून द्यावी असे विनविले आहे

९ हाचि नेम आता न फिरे माघारी । बैसलें शेजारीं गोविंदाचे ॥ १ ॥
घररिघी जाले पट्टराणी बळें । वरिले सावळें परब्रह्म ॥ २ ॥
बळियाचा अंगसंग जाला आता । नाहीं भय चिंता तुका म्हणे ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा –घररिघी–स्वत होऊन घरात शिरणारी, पट्टराणी–मुख्य आवडती राणी, वरिलें–स्वीकारिलें, बळियाचा–बलवानाचा, समर्थाचा, अंगसंग–संबंध

अर्थ –मी आता श्रीप्रभुशेजारी बसले असल्याने तेथून आता माघारी फिरणार नाही, हाच माझा निश्चय झाला आहे १ मी आता त्या सावळ्या परब्रह्मास वरले असल्यामुळे मी त्याची पट्टराणी झाले आहे मी स्वत होऊन त्याच्या घरात शिरले आहे २ आता माझा संबंध बलवंताशी झालेला आहे त्यामुळे मला कुठलीच भीती किंवा चिंता उरली नाही ३

१० नाहीं काम माझें काज तुम्हासवें । होतें गुप्त ठावें केलें आता ॥ १ ॥
व्यभिचार माझा पडिला ठाउका । न सरती लोकामाजी जाले ॥ २ ॥
न धरावा लोभ काहीं मजविशीं । जाले देवपिशी तुका म्हणे ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा –काज–कार्य, सरती–मान्य, देवपिशी–देववेडी

अर्थ –भोवतीच्या लोकांना उद्देशून तुकारामबुवा म्हणत आहेत की, माझे आता तुमच्या बरोबर काही काम उरलेले नाही आजवर माझा गुप्त संबंध ईश्वराशी होता तो आता तुम्हा सर्वांना माहित झाला आहे १ माझे हे निद्यकर्म तुम्हाला ठाऊक झाले आहे त्यामुळे माझे आचरण तुम्हास मान्य नाही २ तरी तुम्हीही आता माझ्याविषयी कसलाच लोभ धरू नये, मी आता पक्की देववेडी झाले आहे ३

११ विसरलें कुळ आपुला आचार । पती भावे दीर घर सोये ॥ १ ॥
सांडिला लौकिक लाज भय चिंता । रातलें अनंता चित्त माझें ॥ २ ॥
मज आता कोणी आळवाल झणी । तुका म्हणे कानीं बहिरी जालें ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा – सांडिला–सोडिला, रातलें–रममाण झाले, झणी–नका

अर्थ –मी आता आपले कुलशीलही विसरून गेले असून माझे घर, सोयरे, दीर, पती इत्यादींनाही मी विसरले आहे १ मी या जगातील रोजचा सर्व व्यवहार सोडून दिला असून मला आता कसलीच भीती व चिंता उरलेली नाही माझे चित्त आता त्या अनंताशी रमले आहे २ आता मी परत संसारात किंवा लौकिक व्यवहारात गुंतावे म्हणून कुणी मला आळवू नये तुकाराम महाराज म्हणतात, मी आता दोनही कानांनी बहिरीच झाले आहे ३

१२ न देखें न बोलें नाइकें आणीक । बैसला हा एक हरि चित्तीं ॥ १ ॥
सासुरें माहेर मज नाहीं कोणी । एक केलें दोन्ही मिळोनियां ॥ २ ॥
आळ आला होता आम्हां भांडखोरी । तुका म्हणे खरी, केली मात ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा : नाईकें–ऐकणार नाही.

अर्थ : मी आता दुसरे काहीच पाहणार नाही, बोलणार नाही; आणि ऐकणार नाही; कारण माझ्या चित्तात आता एक श्रीहरी स्थिर झाला आहे. १ सासरी व माहेरी आता मला माझे म्हणून कुणी नाही; श्रीहरीच्या रूपात मी दोन्हींचे एकच स्वरूप मानले आहे. २ मीच भांडखोर म्हणून मजवर आळ आलेला होता; पण आता त्या प्रभूसच मिळवून मी सर्वांवर मात केली आहे. ३

१३ दुजा ऐसा कोण बळी आहे आतां । हरि या अनंता पासूनिया ॥ १ ॥
बळियाच्या आम्ही जालों बळिवंता । करूं सर्व सत्ता सर्वांवरी ॥ २ ॥
तुका म्हणे आम्ही जिवाच्या उदारा । जालों प्रीतिकरा गोविंदासी ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा : दुजा–दुसरा, प्रीतिकरा–प्रीति करणाऱ्या

अर्थ अनंत स्वरूपाच्या असणाऱ्या या हरीवाचून आता दुसरा कोणी बलवान आहे ? १ आणि या बलवंताच्या प्राप्तीमुळे आम्हीही बलवान झालो असून आमची सत्ता आता सर्वांवर राहील. २ तुकाराम महाराज म्हणतात की आम्ही मूळचेच अंतःकरणाने उदार आहोत; म्हणूनच गोविंदास प्रेम करून आम्ही जवळ करू शकलो. ३

१४ क्षणभरी आम्हीं सोसिलें वाईट । साधिलें अवीट निजसुख ॥ १ ॥
सांडी मांडी मागें केल्या मरोवरी । अधिकचि परी दुःखाचिया ॥ २ ॥
तुका म्हणे येणें जाणें नाहीं आतां । राहिलों अनंताचिये पायीं ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा : अवीट–वीट किंवा, कंटाळा न येणारे, निजसुख–मीलनाचे सुख, सांडीमांडी–टाकणे, पुन. घेणे, मरोवरी–श्रम, कष्ट

अर्थ : लोकांच्या दृष्टीने मी त्याची निंदा क्षणभर सहन केली; पण त्या योगाने ज्याचा कधी कंटाळा येणार नाही असे मीलनसुख मी मिळविले. १ पूर्वायुष्यात अनेक प्रकारची यातायात केली. अनेक गोष्टी टाळल्या. पुनः घेतल्या. सुखप्राप्तीसाठी अनेक परिश्रम घेतले, पण ते सर्व मला अधिकच दुःखाचे झाले. २ पण आता या अनंत स्वरूपाच्या प्रभूशी लीन झाल्यामुळे, पायांशी राहिल्यामुळे जाणेयेणे अथवा त्यातील कष्टच संपून गेले. ३

१५ आम्हां आम्ही आतां वडील धाकुटीं । नाहीं पाठीं पोटीं कोणी दुजें ॥ १ ॥
फावला एकांत एकविध भाव । हरि आम्हांसवें सर्व भोगी ॥ २ ॥
तुका म्हणे अंगसंग एके ठायीं । असों जेथें नाहीं दुजें कोणी ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा : दुजें–दुसरे, एकविध–एकनिष्ठ, अंगसंग–शरीराची जवळीक, शरीराचा भोग.

अर्थः–आता मला कोणी वडील, कोणी धाकटे नाही. मीच मला वडील आहे व धाकटीही आहे. आता माझ्या मागाहून येणारे कोणी नाही; पुढेही आलेले कोणी नाही. १ आता मला चांगला एकान्तही मिळतो, तेव्हा एकनिष्ठ भावनेनेच मी राहतो व तो श्रीहरी माझ्याबरोबर सर्व प्रकारच्या क्रीडा करतो. २ आमच्या दोघां-शिवाय दुसरे तेथे कोणीही नसते ३

१६ सर्व सुख आम्ही भोगूं सर्व काळ । तोडियेलें जाळ मोहपाश ॥ १ ॥
याचसाठीं सांडियेले भरतार । रातलों या परपुरुषाशीं ॥ २ ॥
तुका म्हणे आतां गर्भ नये धरूं । औषध जें करूं फळ नव्हे ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा:– जाळ–जाळे, सांडियेले–सोडले, भरतार–पती, परपुरुष–श्रेष्ठ परमेश्वर

अर्थ–आता मी सर्व सुखे नेहमीच भोगीन. मी सर्व मायापाश व नात्याची जाळी तोडून टाकली आहेत. १ या प्रभूसाठी मी माझ्या पतीसही सोडले. मी या श्रेष्ठ परमेश्वराशी रममाण झाले आहे. २ त्यामुळे आता मला पुनः गर्भवासाची यातना राहणार नाही ; आता प्रभुप्राप्तीचे औषध असेच केले आहे की जे फळ धरूच देणार नाही. पुन. लौकिकाची आशाच उरणार नाही. ३

१७ एका जिवें आतां जिणें जालें दोहीं । वेगळीक कांही नव्हे आतां ॥ १ ॥
नारायणा आम्हां नाहीं वेगळीक । पुरविली हे भाक सांभाळिली ॥ २ ॥
तुका म्हणे जाले सायासाचें फळ । सरली ते वेळ काळ दोन्ही ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा :–वेगळीक–वेगळेपणा, भाक–वचन, इच्छा.

अर्थ:–आता माझे व श्रीहरीचे अशी दोनही जीविते एकच झाली आहेत. आता वेगळेपणा असा काही उरलाच नाही. १ मी व नारायण यांच्यात आता निराळेपणा नाही. त्याला मी आर्त होऊन हाक मारली; तो मला मिळाला, माझी इच्छा त्याने पुरी केली व मला जवळ करून सांभाळले. २ माझ्या थोड्याफार परिश्रमाचे मला हे फळ मिळाले ; आता ती दुजेपणाची वेळ संपली. ३

१८ हासों रुसों आतां वाढवूं आवडी । अंतरीची गोडी अवीट ते ॥ १ ॥
सेवासुखें करूं विनोदवचन । आम्ही नारायण एकाएकीं ॥ २ ॥
तुका म्हणे आम्ही जालों उदासीन । आपुल्या आधीन केला पति ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा:– आवडी–प्रेम, अंतरीची–मनाची.

अर्थ : आता आम्ही हसू, एकमेकांवर रुसू व यातून प्रेमाची वाढ करू. मनातील अवीट गोडी चाखून एकमेकाची सेवा करू. १ काही विनोदवचनांनी संभाषण करू. आता मी व नारायण हे एकच आहोत. २ मी आता या लौकिक जगाविषयी उदासीन झाले आहे. कारण मी हा श्रेष्ठ ईश्वर पती म्हणून केला असून मी त्याला स्वतःच्या आधीन करून ठेवला आहे. ३

१९ मजसवें आतां येऊं नका कोणी । सासुरवासिनी बाइयांनो ॥ १ ॥
न साहवे तुम्हां या जनाची कूट । बोलती वाईट ओखटें तें ॥ २ ॥
तुका म्हणे जालों उदास मोकळ्या । विचरों गोवळ्यासवें आम्ही ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा :– न साहवे–सहन होत नाही, कूट–निंदा, ओखटें–वाईट, अमंगल, विचरों–हिंडत राहू

अर्थ – आपल्या मागे मागे येणाऱ्या सांसारिक व लौकिकावर दृष्टी ठेवणाऱ्या स्त्रियाना उद्देशून तुकाराम महाराज म्हणत आहेत; आता तुम्ही कोणी माझ्याबरोबर येऊ नका. बायांनो, तुम्ही सर्वजण सासुरवासिनी आहात. १ तुम्हांला हे लोक निंदात्मक शब्द बोलतील ते सहन होणार नाहीत कारण ते लोक फार वाईट व अमंगल असे बोलतात. २ पण मी मात्र सर्व लौकिकापासून मोकळी व विरक्त झाली असल्यामुळे या गोपालकृष्णाबरोबर मी वाटेल तशी बागू शकते. ३

२० शिकविलें तुम्हीं तें राहे तोंवरी । मज आणि हरी वियोग तों ॥ १ ॥
प्रसंगीं या नाहीं देहाची भावना । तेथें या वचना कोण मानी ॥ २ ॥
तुका म्हणे चित्तीं बैसला अनंत । दिसों नेदी नित्य अनित्य तें ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा – नित्य–अक्षर, कायम टिकणारे, अनित्य–क्षर, नाश होणारे

अर्थ.–लौकिक संसाराविषयी तुम्ही मला जे शिकविले ते श्रीहरिशी माझा वियोग जोपर्यंत होता तोपर्यंतच मला पटत होते. १ आता या ऐक्याच्या भावनेत देहाची देखील शुद्ध आम्हास नाही; तेथे तुमचे वचन आता कोण

मानणार ? २ तुकाराम महाराज म्हणत आहेत की माझ्या चित्तात आता अनंतस्वरूपाचा परमेश्वर वसलेला असल्यामुळे मला आता नित्य व अनित्य यातील भेदही दिसेनासा झाला आहे ३

२१ सांगतो ते तुम्हीं अइकावे कानीं । आमुचे नाचणी नाचूं नका ॥ १ ॥
जोवरी या तुम्हा मागिलाची आस । तोंवरी उदास होऊं नका ॥ २ ॥
तुका म्हणे काय वायाविण धिंद । पति ना गोविंद दोन्ही नाहीं ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा –नाचणीं–नादाने, मागिलाची–संसाराची लौकिकाची, आस–इच्छा धिंद–फजिती

अर्थ –बायांनो, मी सांगते ते तुम्ही आपल्या कानांनी नीट ऐका–माझ्या नादी काहीं केल्या तुम्ही लागू नका १ कारण जोपर्यंत तुम्हाला लौकिक संसाराची जबर हाव आहे तोपर्यंत उदास होऊन वैराग्याचा आव आणू नका २ तुकाराम महाराज म्हणतात की अशामुळे काहीच पदरी न पडता तुमची फजिती मात्र होईल इकडेही पतीची मर्जी घालवून बसाल व तिकडे परमेश्वरासही मुकाल ३

२२ आजिवरी तुम्हा आम्हा नेणपण । कौतुके खेळणे संग होता ॥ १ ॥
आतां अनावर जाले अगुणाची । करूं नये तेचि करीं सुखें ॥ २ ॥
तुका म्हणे आता बुडविलीं दोन्ही । कुळें एक मनीं नारायण ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा –नेणपण–अज्ञान, संग–सोबत अगुणाची–निर्गुणाची

अर्थ –आजपर्यंत तुम्ही व आम्ही अज्ञानाने लौकिक प्रपंचासच महत्त्व देऊन [कौतुकाने खेळ एकमेकांच्या संगतीने खेळलो १ आता मात्र सर्व गुणाचा त्याग करून मी त्या निर्गुण परमेश्वराशी लीन झाले, आणि करू नयेत ते खेळ सुखाने करण्यासाठी तत्पर झाले २ तुकारामबुवा म्हणतात आता मी दोनही कुळे सासरची व माहेरची बुडवून एक नारायणास मात्र हृदयात स्थान दिले आहे ३

२३ सासुरिया वीट आला भरतारा । इकडे माहेरा स्वभावेचि ॥ १ ॥
साडवर कोणी न धरिती हातीं । प्रारब्धाची गति भोगूं आता ॥ २ ॥
न व्हावी ते जाली आमुची भंडाई । तुका म्हणे काई लाजो आता ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा –साडवर–नवरा टाकलेली स्त्री भंडाई–अपकीर्ती

अर्थ –माझ्या सासुरवाडीस असे घडले की माझ्या पतीसच माझा वीट आला, आणि माहेरास तर दिलेली मुलगी दुसऱ्याचीच या भावनेने अलिप्तपणा सहजच होता १ आता या नवऱ्याने टाकलेल्या स्त्रीस कोण आधार देणार ? जे काय व्हायचे नशिबात असेल ते भोगू आता ! २ दोनही ठिकाणी भांडणे होऊ नयेत, ती माझी झाली खरी, आता त्याबद्दल लाज धरण्यात काय अर्थ आहे ? ३

२४ मरणाही आधीं राहिलो मरोनी । मग केलें मनीं होतें तैसें ॥ १ ॥
आता तुम्ही पाहा आमुचे नवल । नका वेचूं बोल वायाविण ॥ २ ॥
तुका म्हणे तुम्ही भयाभीत नारी । कैसी संग सरी तुम्हा आम्हा ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा –वायाविण–व्यर्थ

अर्थ –मरणाचे दुःख मी याच जन्मी जणू भोगले आहे प्रत्यक्ष देहत्यागापूर्वीच तो अवस्था या देहधारी अवस्थेतही आम्ही भोगत आहोत माझा संपूर्ण पालट झाला आहे, मग जे माझ्या मनात होते ते मी करीत राहिले. १ आता तुम्हीच आमच्या आयुष्यातील नवल पाहा उगाच व्यर्थ वचन मात्र अर्थशून्य बोलू नका २ तुकाराम महाराज म्हणतात की तुम्ही सर्व बायका भयभीत आहात, तुम्हाला लौकिकाची आशा सुटलेली नाही तेव्हा तुमच्या-आमच्या संगतीची बरोबरी कशी होणार ? होणार नाहीच ३

२५ परपुरुषाचे सुख भोगे तरी । उतरोनि करीं घ्यावे सीस ॥ १ ॥
सवसारा आगी आपुलेनि हाते । लावूनि मागुतें पाहू नये ॥ २ ॥
तुका म्हणे व्हावे तयापरी धीट । पतग हा नीट दीपासोई[1] ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा –सीस–डोके, मागुतें–मागे

अर्थ –त्या श्रेष्ठ पुरुषाच्या, परमेश्वराच्या सहवासाचे सुख भोगावयाचे असेल तर तळहातावर शीर घेऊनच जावे लागते, म्हणजे जिवावर उदार व्हावे लागते १ आपल्या हाताने आपल्या ससाराला आग लावावी लागते, ससारसुखावर पाणी सोडावे लागते, पुन त्याच्याकडे मागे वळूनही पाहू नये २ तुकाराम महाराज म्हणतात की दिव्यावर झेप घेणारा पतग जसा जिवावर उदार होऊन झडप घालतो त्याप्रमाणे या मार्गातील लोकानी धीट व्हावयास हवे ३

२६ अइकाल परी ऐसे नव्हे बाई । न सडा या सोई भ्रताराची ॥ १ ॥
नव्हे आराणुक लौकिकापासून । आपुल्या आपण गोविले तें ॥ २ ॥
तुका म्हणे मन कराल कठोण । त्या या निवडोन मजपाशी ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा –न सडा–सोडू नका, आराणुक–तृप्ती, सतोष, गोविलें–गुतवून ठेविले

अर्थ –बायानो, तुम्ही माझे म्हणणे ऐकाल, पण त्याप्रमाणे वागणे तुमचे किती होईल कुणास माहित ? पण तुम्ही या परमश्रेष्ठ पतीची सगत मात्र सोडू नका १ आणि लक्षात असू द्या की या लौकिक ससारापासून कसलाच सतोष तुमच्या मनास लाभणार नाही, पण आपले आपणच त्या ससारात गुतून राहिलेले असतो २ तेव्हा मन जरा कठिण करा व ज्याचे मन असे कठिण होईल तेवढ्याच माझ्या मार्गाने या ३

२७ आहाच वाहाच आत वरी दोन्ही । न लगा गडणी आम्हा तैशा ॥ १ ॥
भेऊ नये तेथें भेडसावू कोणा । आवरूनि मना बद द्यावा ॥ २ ॥
तुका म्हणे काही अभ्यासायाचुनी । नव्हे हे करणी भलतीची ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा – आहाच–आत वाहाच–बाहेर, गडणी–सावतीण, मैत्रिण, बद–कैदी, वायूचा निरोध करण्याची योगमार्गातील एक प्रक्रिया,

अर्थ –आत मनात एक व बाहेर तोंडात एक अशा मैत्रिणी आम्हास नकोत १ आमच्या मनात कसलेच भय नसते, मग आम्ही तरी इतराना कसे दाखवू ? तुम्हीही आपले मन आवरून बद्दिस्त करुन ठेवा २ आणि लक्षात असू द्या की कोणत्याही गोष्टीचा चागला अभ्यास असल्यावाचून काही साध्य होईल असे नसते ३

२८ बहुताच्या आम्ही न मिळो मतासी । कोणी कैसी कैसी भावनेच्या ॥ १ ॥
विचार करिता वाया जाय काळ । लटिके ते मूळ फजितीचे ॥ २ ॥
तुका म्हणे तुम्ही करा घटापटा । नका जाऊ वाटा आमुचिया ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा – लटिके–खाट, घटापटा–व्यर्थ खटपट घटावाद म्हणजे आकाश वस्त्र कवडे, तर घटाच्या आकारात सामावलेले पट म्हणजे वस्त्र व त्याच ततू याच्या सबधावरून ईश्वर व जगत याच्या सबधाचे वर्णन करण्याची जी वेदान्ताची परिभाषा ती या पटपटादी खटपटीवरून प्रकट होते

अर्थ –आम्ही काही पुष्कळ लोकाच्या मताना मानणार नाही, कारण प्रत्येकाची भावना कशी वेगळी असेल याचे काय सागावे ? १ यावद्दल जो जो विचार करावा तो तो वेळ मात्र वाया जातो असे दिसते व ही चर्चाच व्यर्थ असून तीमुळे फजितो मात्र पदरी येते २ तुकाराम महाराज म्हणतात की तुम्ही वाटल्यास ही घटपटादी खटपट करा खुशाल, पण आमच्या वाटेस मात्र कुणी जाऊ नका ३

---

[1] दीपावरी

२९ त्याचे सुख नाहीं आले अनुभवा । कठिण हे जिवा तोंचिवरी ॥ १ ॥
मागिलाचे दु:ख लागों नेदी अगा । अंतर हे सगा नेदी पुढें ॥ २ ॥
तुका म्हणे सर्वविशीं हा सपन्न । जाणती महिमान श्रुति ऐसे ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा – नेदी–देत नाही, सगा–सगतीस, श्रुति–वेद

अर्थ – जोपर्यंत त्या परमपुरुषाच्या सहवासाचे सुख अनुभवास आले नाही तोपर्यंतच जिवाला हा मार्ग भारी कठिण वाटतो १ पण एकदा त्याची भेट झाली म्हणजे मग मात्र मागचे दु:ख जाणवत नाही, आणि त्याच्या सगतीचे सुख मिळेल त्यात अतराही पडत नाही २ तुकाराम महाराज म्हणतात की हा परमपुरुष सर्वांना सपन्न असाच असून त्याचाच महिमा सर्व वेदानी जाणून गाईला आहे ३

३० न राहे रसना बोलता आवडी । पायीं दिली बुडी माझ्या मनें ॥ १ ॥
मानेल त्या तुम्ही अइका स्वभावें । मी तों माझ्या भावें अनुसरलें ॥ २ ॥
तुका म्हणे तुम्हीं फिरावें बहुतीं । माझी तों हे गती जाली आतां ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा – रसना–जीभ वाणी आवडी–प्रेमाने

अर्थ – बायानो, त्या श्रेष्ठ पुरुषाविषयी बोलताना प्रेमामुळे माझ्या वाणीला भान राहात नाही माझ्या मनाने तर त्याच्याच पायावर बुडी दिलेली आहे १ तुमचा जसा स्वभावविशेष असेल त्याप्रमाणे तुम्ही एकावे, मी मात्र माझ्या स्वभावानुसार त्याला अनुसरले आहे २ तुकारामबुवा म्हणतात, बायानो तुम्ही आता मागे फिरावे हे बरे माझी तर आता ही अशी गत होऊन गेली आहे ३

३१ न बोलता तुम्हा कळों न ये गुज । म्हणउनी लाज सांडियेली ॥ १ ॥
आतां तुम्हा पुढें जोडीतसें हात । नका कोणी अंत पाहों माझा ॥ २ ॥
तुका म्हणे आम्ही बैसलों शेजारीं । करील तें हरी पाहों आतां ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा – गुज–गुपित गोष्ट साडियेली–सोडली

अर्थ – बायानो, मी ही माझ्या मनातील गुपित गोष्ट जर बोलले नसते तर ती तुम्हास समजली नसती, म्हणून तर लाज सोडून मी ही तुम्हास सांगितली १ पण आता मात्र मी तुमच्यापाशी हात जोडून विनवणी करीत आहे की आता माझा अत दुणी पाहू नका २ तुकारामबुवा म्हणतात, आम्ही आता त्याच्या शेजारी सुखाने बसलो आहोत, आता तो श्रीहरी जे करील ते आम्ही पाहू ३

विवरण – येथ विराण्याचे पचवीस अभग सपले अत्यत तीव्र अशा अनुभूतीच्या प्रकटीकरणासाठी तुकाराम महाराजानी ही अशी शृगारिक भाषा वापरली असली तरी त्यातील रूपक एकदा ध्यानात आल्यावर मग मथितार्थ सरळपण ध्यानात येण्याजोगा असतो

३२ नये जरी तुज मधुर उत्तर । दिधला सुस्वर नाही देवें ॥ १ ॥
नाहीं तयाविण भुकेला विठ्ठल । येईल तैसा बोल रामकृष्ण ॥ २ ॥
देवापाशीं मागे आवडीची भक्ति । विश्वासेशीं प्रीति भावबळें ॥ ३ ॥
तुका म्हणे मना सांगतो विचार । धरावा निर्धार दिसेंदिस ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – सुस्वर–गोड आवाज, निर्धार–निश्चय

अर्थ – तुकारामबुवा आपल्या मनास उपदेश करीत आहेत की मना, तुला मधुर शब्दानी परमेश्वराचे स्तवन करता येत नसेल, कारण तसा गोड आवाज तुला मिळत नसेल १ पण ध्यानात ठेव की ईश्वर काही त्याच्यासाठी भुकेलेला नाही तुला जसे येईल तसे 'रामकृष्ण रामकृष्ण' असे म्हण २ देवापाशी मोठ्या प्रेमाने

तू भक्तीच माग आणि मोठ्या विश्वासाने व भावनेने त्याच्याशी प्रीती जडीव ३ मना, हा हाच एक निर्धार तू दिवसेंदिवस पक्का करावास हा एक विचार तुला सांगतो ४

३३ सावध जालों सावध जालों। हरिच्या आलो जागरणा ॥ १ ॥
तेथें वैष्णवांचे भार। जयजयकार गर्जतसे ॥ २ ॥
पळोनिया गेली झोप । होते पाप आड तें ॥ ३ ॥
तुका म्हणे तया ठाया । ओल छाया कृपेची ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – जागरणा–देवासाठी केलेले जागरण, भजन, कीर्तन, भार–समुदाय, ओल–दाट

अर्थ – परमेश्वराच्या कृपेने मी सावध झालो व हरीच्या भजनकीर्तनात दंग झालो १ त्या ठिकाणी विठ्ठलभक्ताचे समुदाय मोठमोठ्याने हरिनामाची गर्जना करीत होते २ ते पाहून माझी झोप पळून गेली व जे काही थोडे पाप होते तेही संपले ३ तुकाराम महाराज म्हणतात त्याच ठिकाणी दाट कृपेची छायाही निर्माण झालेली असते ४

३४ आपुलिया हिता जो असे जागता । धन्य माता पिता तयाचिया ॥ १ ॥
कुळीं कन्यापुत्र होतीं जीं सात्विक । तयाचा हरिख वाटे देवा ॥ २ ॥
गीता भागवत करिती श्रवण । [1]आणीक चिंतन विठोबाचें ॥ ३ ॥
तुका म्हणे मज घडो त्याची सेवा । तरी माझ्या दैवा पार नाहीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – जागता–सावध, हरिख–हर्ष, आनंद, पार–अंत, शेवट, तुलना

अर्थ – आपले श्रेष्ठ हित कशात आहे हे जो जाणून आहे, म्हणजे ईश्वराच्या मोठेपणाची जाणीव ज्यास आहे त्याचे आईबाप त्याला प्रसवून धन्य झाले आहेत १ ज्याच्या कुळात सात्विक विचाराचे कन्यापुत्र निर्माण होतात त्याबद्दल प्रत्यक्ष ईश्वरासही हर्ष होतो २ जेथे अखंडपणे भगवद्‌गीता व भागवत याचे वाचन व श्रवण चालत असते आणि जेथे सतत चिंतन विठ्ठलाचे असते, ३ तेथील लोकाची सेवा मला घडली तर मग माझ्या दैवास कसली तुलनाच राहणार नाही, एवढे दैव मोठे माझे होईल ४

३५ अंतरींची घेतो गोडी । पाहे जोडी भावाची ॥ १ ॥
देव सोयरा देव सोयरा । देव सोयरा दीनाचा ॥ २ ॥
आपुल्या वैभवे । शृंगारावे निर्मळ ॥ ३ ॥
तुका म्हणे जेवी सवे । प्रेम द्यावे प्रीतीचे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – अंतरींची–मनातील, गोडी–विमत, सोयरा–नातेवाईक, शृंगारावें–सुशोभित करावे

अर्थ – ईश्वर आपल्या भक्ताच्या अंतःकरणातील गोडी चाखीत असतो, त्याच्या हृदयात भावना कोणती असते हे तो पाहतो १ खरोखरच देव हा एकच खरा आपला आप्त आहे दीन दुबळ्याचा तोच नातेवाईक नव्हे काय ? २ तो आपल्या सामर्थ्याने आपल्या भक्तास निर्मळपणे सुशोभित करतो ३ इतकेच नव्हे तर तुकाराम महाराज म्हणतात की तो सोयरा ईश्वर आपल्या भक्ताबरोबरच जेवण करतो, व आपले स्वतःचे प्रेमही त्याला देतो ४

३६ सुखें वोळव दावी गोहा । माझें दुःख नेणा पाहा ॥ १ ॥
आवडीचा मारिला वेडा । होय होय कैसा म्हणे भिडा ॥ २ ॥
निपट मज न चले अन्न । पायली गहूं साजा तीन ॥ ३ ॥
गेले वारीं तुम्हीं आणिली साकर । सातदी[2] गेली साडेदहा शेर ॥ ४ ॥

१ अखंड २ सात दिवसा दाहा सेर

अखंड मज पोटाची व्यथा । दुधभात साकर[1] तूप पथ्या ॥ ५ ॥
दो पाहरा मज लहरी येती । शुद्ध नाही पडे सुपती ॥ ६ ॥
नीज नये घाली फुलें । जवळी न साहती मुलें ॥ ७ ॥
अंगी चंदन लाविते भाळीं । सदा शूळ माझे कपाळीं ॥ ८ ॥
हाड गळोनि आले मांस । माझें दुःख तुम्हां नेणवें कैसें ॥ ९ ॥
तुका म्हणे जिता गाढव केला । मेलियावरी नरका नेला ॥ १० ॥

शब्दार्थ व टीपा:– चोळंब – ढोंग, कौतुक, नागाव, गोहा – नवऱ्याला, मारिला – नादावलेला, भिडा – भिडेनें, निपट – अगदी, न चले – पचत नाही, जात नाही, साजा – वेळेस, गेलेवारी – मागल्या वारी, बाजाराच्या दिवशी, सातदी – सात दिवसात, व्यथा – दु ख, लहरी – चक्कर, भोवड, घेरी, सुपती – झोपी जाते, जिता – जिवतपणीच

अर्थ – एक सुखात वाढलेली स्त्री आपल्या पतीला आपल्या नाजुक प्रकृतीचे ढोंग किंवा कौतुक वर्णन करून सागत आहे आणि म्हणते, 'अहो, माझे दु ख कुणीच कसे जाणीत नाही ?' १ आणि बायकोच्या प्रेमाने नादावलेला वेडा नवरा भिडेखातर 'होय ग हो खरेच' असे म्हणत राहतो २ त्याची बायको त्याला म्हणत असते, 'मला अन्न मुळीच जात नाही, पचत नाही. दिवसास तीन वेळास कसे तरी पायलीभर गहू पुरतात मला ३ गेल्या बाजाराच्या दिवशीच तुम्ही साखर आणलीत, पण ती साडेदहा शेर साखर मला कशी तरी सात दिवस पुरली ४ मला एकसारखे पोटाचे दुखणे आहे, म्हणून दूधभात व तूपसाखर याच्या पथ्यावर मला राहावे लागते ५ दोन प्रहरी मला चक्कर येत असल्यामुळे मी अथरुणावर पडून झोपी जाते, कधी बेशुद्धही होते. ६ मला कधी धड झोपही येत नाही, मग मी माझ्या अथरुणावर फुलाचा थर घालते जवळ सारखी किरकिर करणारी मुले मला सहन होत नाहीत. ७ माझे कपाळ नेहमीच दुखत असल्यामुळे मी कपाळावर, अगावर चदनाची उटी लावते ८ माझी सारी हाडे गळून गेली असून नुसते मास उरले आहे, हे माझे दु ख तुम्हास कसे समजत नाही ? ९ तुकाराम महाराज म्हणतात, या असल्या ढोंगी बायकोच्या नादाने नवरा जिवत असतानाच शुद्ध गाढव बनला व मेल्यावर नरकात गेला त्याला नीट प्रपचही समजला नाही; परमार्थही साधला नाही १०

निरूपण:–तुकारामबुवाच्या अभगातून मलग असे तत्त्वनिरूपण या कथाप्रसगाचे, वृत्तान्ताचे कथन नसले तरी त्याच्या अभगाचे स्थूल मानाने दोन वर्ग करता येतात पहिल्या वर्गात त्याची स्वत ची मन स्थिती त्यानी सविस्तर वर्णन केली आहे आपला उद्योगधदा, आपला ससार, आपले वैराग्य, आपली साधना, आपणास झालेली गुरुप्राप्ती, आपली कवित्वशक्ती, परमेश्वरभेटीची तीव्र लालसा, तळमळ, उत्कठा, ईश्वराचे रूपचितन, त्याच्या भेटीचा परमानद, पुन विरह, पुन तगमग, पुन दर्शनाचे सुख, मीलनाचा आनद हा सर्व विलास पहिल्या प्रकारच्या अभगातून बुवानी सविस्तर वर्णन केलेला आहे दुसऱ्या प्रकारच्या अभगातून बुवा समकालीन लोकाना प्रपच व परमार्थ याच्यासबधी उपदेश करीत आहेत ढोंगी, स्वार्थी गुरुच्या मागे लागून लोक कसे फसत आहेत व त्याचे ना धड परमार्थ ना धड प्रपच, अशा अवस्थेत दिवस कसे वाया जात आहेत याचे चित्रण त्यानी अनेक अभगातून केले आहे लोकाचे वैयक्तिक प्रपच कसे चुकीच्या मार्गाने होत आहेत याचीही चित्रे त्यानी रेखाटली आहेत लोकही ढोंगी आहेत केवळ पैसा, केवळ स्त्री, केवळ मानसन्मान, केवळ स्वार्थ याच्याच नादी लागून परमार्थविचार अगदीच सोडून देत आहेत असे बुवाना दिसले ईश्वराचे नावही न घेता लोक निव्वळ प्रपच प्रपच, पैसा पैसा करीत आयुष्य कठतात अशा भेसूर प्रपचाची बुवानी फार मार्मिक व बोलकी शब्दचित्रे काढलेली आहेत प्रत्यक्ष उपदेशापेक्षाही असल्या उपरोधिक टीकेमुळे लोकाना जास्त समजते असा अनुभव सर्वत्र आहे

या अभगात अशाच एका अर्थकामाधिष्ठित जोडप्याचे प्रापचिक चित्र बुवानी उपरोधाने रगविले आहे या अभगातील बाई सुखाला, विलासाला चटावलेली आहे साऱ्यानी, विशेषत आपल्या नवऱ्याने सदैव आपलेच

---

[1] साकर पथ्या

कौतुक करावे असे तिला वाटते ही सुवासीन स्त्री सदोदित आपल्या पतीच्या मागे भुणभुण लावीत असते मला भूक लागत नाही, अन्न पचत नाही, पोट दुखते, कपाळ दुखते, दोन प्रहरी जीव घाबरा होतो, झोप येत नाही, हाडे गळून गेली आहेत या तक्रारी ही लाडावलेली स्त्री नेहमी करीत असते, आणि तिच्या सौंदर्याने मोहित झालेला नवरा 'हो हो खरेच आहे' अशी कबुली देत असतो असल्या ढोंगी व मतलबी बायकोच्या नादाने बिघडलेला नवरा हा या जन्मी गाढवाच्या बरोबरीचाच असतो व पुढल्या जन्मी नरकात जातो कारण लाडावलेल्या बायकोस सुधारण्याचे काम खरे म्हणजे पतीचे पण हा तर तिच्याच तंत्राने वागतो तिचे हे सर्व ढोंग आहे कारण पायलीभर गहू तिला रोज लागतात, साडेदहा शेर साखर तिला एका आठवड्याची लागते दूधभात व तूपसाखर तिला पथ्यासाठी लागतात हे पदार्थ तुकारामबुवाचे हे बोलणे उपरोधाचे असले तरी प्रापंचिकाना त्याच्या स्थितीचे नीट वर्णन करून सांगणारे आहे

समाजस्थितीचे किंवा समकालीन लोकांच्या प्रपंचाचे उपरोधिक वर्णन विनोदी भाषेत बुवा नेहमीच करतात नुसत्या उपदेशापेक्षा उपरोधिक टीकेने अधिक चांगले कार्य होते हे त्यानाही माहित होते असे दिसते प्रपंचातील अनेक विषयावर भारुडात्मक रचना संतानी जी विपुल प्रमाणात केलेली आहे तीत हा उपरोध प्रकर्षाने पाहावयास मिळतो मानवी मनाचे सूक्ष्म निरीक्षण करून त्याचे दोष घालवून त्याला सन्मार्गास प्रवृत्त करण्याचे कार्य संताना साधावयाचे होते एकनाथानी या प्रकारच्या सासारिक चित्राची अनेक शब्दचित्रे काढली आहेत **'बाई मी भोळी ग बाई मी भोळी । आठा दिसा न्हाते पुरणाची पोळी'** या ओळीने सुरुवात असणारे एकनाथाचे एक चागले भारुड-गीत प्रसिद्ध आहे अशा प्रकारे ससारात स्त्री व पुरुष याचे स्नेह केवळ अर्थकामावर कसे असते व त्यामुळे ससार कसा बिघडून जातो याची तुकारामबुवाची अभगात्मक चित्रे विचारप्रवृत्त करणारी आहेत पुढे **'भ्रतारेंसी भार्या बोले गुजगोष्टी', 'कामाचा अकित कातेलें प्रार्थित'** यासारख्या अभगातून हे प्रपचदर्शन आपणास होणार आहेच तुकाराम-बुवाची प्रपचविषयक मते यासारख्या अभगावरून अजमावताना फार सावध असावयास हवे स्त्रीजातीसबधी तुकारामबुवाचीही दृष्टी अनुदारपणाची होती असा आक्षेप वारवार येतो, पण तो खरा नाही केवळ प्रपच, केवळ धनलोभ, केवळ स्त्री व मुले याच्याच नादात असणाऱ्याचा गौरव कोण करणार? प्रपचाचे वा स्त्रीपुरुषाच्या प्रेमाचे रहस्य बुवाना समजत नव्हते असे नाही, परतु त्यातील ढोंग, त्यातील लोभी वृत्ती, त्यातील ईश्वरविन्मुखता बुवाना दूर करावयाची होती

३७ **पावले पावले तुझें आम्हां सर्व । दुजा नको भाव होऊं देऊं ॥ १ ॥**
**जेथें तेथें देखें तुझीच पाउलें । त्रिभुवन संचलें विठ्ठला गा ॥ २ ॥**
**भेदाभेदमते भ्रमाचे संवाद । आम्हा नको वाद त्यासीं देऊं ॥ ३ ॥**
**तुका म्हणे अणु तुजविण नाहीं । नभाहूनि पाहीं वाढ आहे ॥**

**शब्दार्थ व टीपा** – **पावले** – मिळाले, **दुजा** – दुसरा, याहून वेगळा, **सचले** – साठून राहिले, **भेदाभेदमते** – नाना मताचे प्रतिपादन, भेद-अभेद, द्वैत-अद्वैत, सगुण-निर्गुण असे वाद, **भ्रमाचे** – भ्रममूलक, **सवाद** – भाषण, **वाद** – भाडण, कलह, **अणु** – अगदी लहान कण, **नभाहूनि** – आकाशापेक्षा, **वाढ** – मोठा

**अर्थ** – परमेश्वरा, तुमच्यापासून जे काही मला मिळायचे होते ते सर्व मिळाले आहे आता देवा, मागणे एवढेच की मनातील हा भाव बदलू देऊ नका १ विठ्ठला, जेथे मी पाहतो तिथे तुझीच पाउले मला दिसतात या त्रिभुवनात तूच भरून राहिलेला आहेस २ भेद, अभेद, द्वैत, अद्वैत हे सर्व भाषण भ्रमातून निर्माण झाले असल्याने त्याच्याशी वाद घालण्याचा किंवा भाडण करण्याचा प्रसग मजवर आणू नकोस ३ देवा, एखादा अणूही असा नाही की ज्यात तू नाहीस तू अणूपेक्षाही लहान व आकाशापेक्षाही मोठा आहेस ४

त्याप्रमाणे अथवा ज्ञानेश्वरांनी सांगितले आहे त्याप्रमाणे 'सुवर्णाचे मणी केले । ते सोनियाच्या सुतीं ओविले' त्यानुसार परमेश्वरी सूत्रात हे जग ओवले गेले आहे. सर्वत्र वासुदेवतत्त्व भरून राहिले हा एक भागवत धर्माचा प्रमुख सिद्धान्त आहे. महाभारताच्या शांतिपर्वात 'सर्वभूताधिवासश्च वासुदेवस्ततो ह्यहम्' सर्व भूतांच्या ठिकाणी मी वास करतो म्हणून मी वासुदेव ' असे स्पष्ट केले आहे. गीतेतही 'वासुदेव सर्वमिति ' असे वर्णन करून अगदी लहान अणूपासून अमर्याद आकाशापर्यंत परमेश्वर भरून राहिला असल्याचे वर्णन 'अणोरणीयान्महतो महीयान् 'सारख्या सूत्रांत स्पष्ट केले आहे. इतरत्रही तुकारामबुवांनी ' अणुरेणुया थोकडा । तुका आकाशाएवढा ' अशा शब्दांत स्वानुभव सांगितला आहे. ' सर्वं विष्णुमय जगत् ' म्हणजे सर्व जग विष्णुमय होऊन गेले असा भावार्थ. जिथे दृष्टी जाईल तिथे भगवताची पावलेच दिसावीत ही निष्ठा आहे. ' ज्या ज्या स्थळीं हें मन जाय माझें । त्या त्या स्थळीं हें निज रूप तुझें ' अशी जाणीव सर्वत्र आहे. ' हें समस्तही श्रीवासुदेवो । ऐसा प्रतीतिरसाचा वोतला भावो ' असा स्वानुभव असून ' जें जें भेटे भूत । तें तें मानिजे भगवत ' हे भक्तियोगातील सूत्र येथे स्पष्ट झाले आहे.

३८ वंदूं चरणरज सेवूं उष्टावळी । पूर्वकर्मा होळी करुनी सांडूं ॥ १ ॥
अमुप हे गांठीं बांधू माडवल । अनाथा विठ्ठल आम्हां जोगा ॥ २ ॥
अवघे होती लाभ एका या चिंतनें । नामसंकीर्तनें गोविंदाच्या ॥ ३ ॥
जन्ममरणाच्या खुंटतील खेपा । होईल हा सोपा सिद्ध पंथ ॥ ४ ॥
गेले पुढें त्याचा शोधीत मारग । चला जाऊं माग घेत आम्ही ॥ ५ ॥
तुका म्हणे घालूं जीवपणा चिरा । जाऊं त्या माहेरा निजाचिया ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – चरणरज– चरणावरील धूलिकण, सेवूं–सेवन करू, स्वीकारू, उष्टावळी–उष्ट्या पत्रावळी, अमुप–पुष्कळ, खुंटतील–संपतील, चिरा घालणें–जन्ममरणाच्या फेऱ्या बंद करणें, एखाद्या गुहेच्या तोंडावर चिरा देऊन दारे बंद करतात त्याप्रमाणे. माहेरा–जेथून आपण जन्मास आलो तेथे जाऊन मिळण्याची धडपड. प्रत्येक वास असते म्हणून या मूलस्थानास ' माहेर ' असे संबोधण्याची प्रथा आहे. पूर्वी लग्न लौकर झाल्यानंतर लहानपणी माहेरची ओढ जशी असते तशी ओढ प्रत्येकास परमेश्वरास भेटण्याची असते असा भावार्थ.

अर्थ – त्या विठ्ठलाच्या पायांवरील धुळीस वंदन करू. त्याच्या उष्ट्या पत्रावळीही सेवन करून पूर्वकर्मांची होळी करून टाकू. १. आमच्यासारख्या अनाथांना विठ्ठल हेच एक दैवत योग्य असल्याने हे न सरणारे भरपूर असे भांडवल आम्ही पदरात साठवून ठेवू. २. या गोविंदाच्या चिंतनाने, त्याच्या नामसंकीर्तनाने सर्व लाभ आम्हांस होतात. ३. याच्या नामाने जन्ममरणाच्या खेपा संपतील व याच्या प्राप्तीचा हा एक सोपा मार्ग हस्तगत होईल. ४. या मार्गावरून जे आमच्या अगोदरच पुढे गेले त्यांचा मार्ग शोधीत शोधीत आम्ही त्यांच्या मार्गावरच राहू. ५. आम्ही आमच्या जीवपणावर चिरा (दगड) घालून, म्हणजे जीवपणाचा भाव संपवून निजात्मरूपाच्या माहेराला

३९ जेविले ते संत मागें उष्टावळी । अवघ्या पत्रावळी करुनी झाडा ॥ १ ॥
सोवळ्या ओवळ्या राहिलो निराळा । पासूनि सकळा अवघ्या दुरी ॥ २ ॥
परे परतें मज न लगे सांगावे । हे तो देवें बरें शिकविलें ॥ ३ ॥
दुसऱ्यातें आम्ही नाहीं आतळत । जाणोनि संकेत उभा असें ॥ ४ ॥
येथें कोणी काहीं न धरावी शंका । मज चाड एका भोजनाची ॥ ५ ॥
लाचावला तुका मारितसे झड । पुरविलें कोड नारायणें ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – झाडा-हिशब, परे परते-परावाणीच्या पलीकडे, आतळत-स्पर्श करीत संकेत-खूण, झड-झाड, कोड-कौतुक इच्छा

अर्थ – पूर्वी जे संत जेवले, त्यांच्या उष्ट्या पत्रावळी सर्व गोळा करून मी उच्छिष्टाची इच्छा करीत आहे. १ तुमच्या सर्व सोवळ्या ओवळ्यापासून मी निराळा आहे २ परावाणीच्या पलीकडे जे तत्त्व आहे त्यासंबंधी आता मला कुणी काही सांगू नये, मला हे देवाने चांगले शिकविले आहे ३ एका ईश्वराशिवाय आम्ही दुसऱ्या कोणासही स्पर्श करणार नाही, याच प्रकारची खूण मनाशी बांधून मी आता स्वस्थ उभा आहे ४ येथे कुणी काही कसलीही शंका धरू नये मला आता ईश्वरप्राप्तीच्या भोजनाचीच आवड आहे ५ मी याच गोष्टीसाठी हपापलेला असून तीवरच मी अधाशासारखा तुटून पडत आहे आणि नारायणाने माझी ही इच्छा पूर्ण केली आहे ६

(४०) देवाच्या प्रसादें करा रे भोजन । व्हाल कोण कोण अधिकारी ते ॥ १ ॥
ब्रह्मादिकांसि हे दुर्लभ उच्छिष्ट । नका मानूं वीट ब्रह्मरसीं ॥ २ ॥
अवघियां पुरतें वोसडलें पात्र । अधिकार सर्वत्र आहे येथें ॥ ३ ॥
इच्छादानी येथें वळला समर्थ । अवघेंचि आर्त पुरवितो ॥ ४ ॥
सरे येथें ऐसें नाहीं कदाकाळीं । पुढती वाटे कवळीं घ्यावें ऐसें ॥ ५ ॥
तुका म्हणे पाक लक्ष्मीच्या हातें । कामारीसांगातें निरुपम ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा –अवघियां–सर्वांना वोसडले–भरून चालले पाक–स्वयंपाक कामारी–मदत करणारा कामगार सांगाते–बरोबर निरुपम–उपमा नसलेला

अर्थ – जे कोणी या मार्गास येण्यासाठी अधिकारी असाल त्यांनी देवाचा प्रसाद म्हणूनच भोजन करावे १ कारण हे उष्टे अन्न ब्रह्मादिकांनासुद्धा दुर्लभ आहे, म्हणून या ब्रह्मरसाचा वीट तुम्ही मानू नका २ सर्वांना पुरेल एवढे भरून हे पात्र तयार आहे, आणि याचे सेवन करण्याचा अधिकार सर्वांनाच आहे ३ आणि ज्याची इच्छा करावी ते देणारा समर्थ येथ प्रसन्न झाला आहे, तो सर्वांची इच्छा पूर्ण करणारा आहे ४ या रसाचे सेवन कोणी कितीही केले तरी तो कधी संपणारा नाही व पुन पुन तो घ्यावा, त्याचा घास घ्यावा असे वाटत राहते ५ तुकाराम-महाराज म्हणतात हा ब्रह्मरसाचा स्वयंपाक स्वत लक्ष्मीने केला आहे, आणि तिला मदत करणारा प्रत्यक्ष निरुपम असा परमेश्वर आहे ६

४१ अवगुणाचे हातीं । आहे अवघी फजीती ॥ १ ॥
नाहीं पात्रासवें चाड । प्रमाण तें फिके गोड ॥ २ ॥
विष ताब्या वाटी । भरली लावूं नये होटीं ॥ ३ ॥
तुका म्हणे भाव । शुद्ध बरा सोंग वाव ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – अवगुण–दुर्गुण पात्र–भांडे वाव–फुकट व्यर्थ

अर्थ :–दुर्गुणांचा काहीच उपयोग नाही. त्यांच्यायोगे नेहमीच फजिती होत असते १ मांडे कसले आहे, चांगले की वाईट यावर काही नसून आतील पदार्थाच्या गुणावगुणांवर सर्व आहे. २ ताब्याच्या पवित्र वाटीमधील विष ते विषच, परिणामी घातकारकच होणार; ती भरलेली वाटी ओठाना लावता कामा नये. ३ तुकाराम महाराज म्हणतात मूळचा भाव जो असेल तोच खरा; धरले सोंग व्यर्थ आहे. ४

४२ हरीच्या जागरणा । जातां कां रे नये मना ॥ १ ॥
कोठें पाहासील तुटी । आयुष्य वेचे फुकासाटीं ॥ २ ॥
ज्यांची तुज गुंती । ते तों मोकलिती अंतीं ॥ ३ ॥
तुका म्हणे बरा । लाभ काय तो विचारा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – जागरण –भजनकीर्तन वगैरेसाठी केलेले जागरण, तुटी–नुकसान, वेचे–खर्च होत आहे, गुंती–मोह, माया, मोकलती–सोडून देतात, अंतीं–शेवटी,

अर्थ – मना, हरीच्या कथाकीर्तनाला का जात नाहीस? १ केवळ प्रपंचाचा विचार करून तुझे जे नुकसान झाले आहे त्याची भरपाई तू करणार तरी कुठे? आयुष्य हरिविना फुकट चालले ना? २ ज्या मुलांबाळांचा व आप्ताचा तुला मोह पडत आहे ते तर अंतकाळी तुला सोडून जातील. ३ म्हणून तुकाराम महाराज म्हणतात, ईश्वरप्राप्तीचाच जो चांगला लाभ आहे त्याचाच तू विचार कर. ४

४३ धर्माची तूं मूर्ती । पाप पुण्य तुझे हातीं ॥ १ ॥
मज सोडवीं दातारा । कर्मापासूनि दुस्तरा ॥ २ ॥
करिसी अंगीकार । तरी काय माझा भार ॥ ३ ॥
जिवींच्या जीवना । तुका म्हणे नारायणा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – दुस्तर–तरून जाण्यास कठिण

अर्थ – ईश्वरा, तू तर प्रत्यक्ष धर्माचीच मूर्ती आहेस आणि पापपुण्यही तुझ्याच हाती आहे. १ म्हणून हे दातारा, या कठिण अशा पापपुण्यात्मक कर्मांपासून मला मुक्त कर. २ देवा, तू जर माझा स्वीकार केलास तर तुला काय माझा भार होणार आहे? ३ सर्व जीवाचे जीवन असणाऱ्या देवा नारायणा, तुला माझे ओझे काय आहे? ४

४४ ब्रह्मादिक जया लाभासि ठेंगणें । बळिये आम्ही भले शरणागत ॥ १ ॥
कामनेच्या त्यागें भजनाचा लाभ । जाला पद्मनाभ सेवाॠणी ॥ २ ॥
कामधेनूचिया क्षीरा पार नाहीं । इच्छेचिये वाही वरुषावें ॥ ३ ॥
वैसलिये ठायीं लागलें भरतें । त्रिपुटीवरतें भेदी ऐसें ॥ ४ ॥
हरि नाहीं आम्हां विष्णुदासां जगीं । नारायण अंगीं विसावला ॥ ५ ॥
तुका म्हणे बहु लाटे हें भोजन । नाहीं रिता कोण राहत राहो ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा –ब्रह्मादिक–ब्रह्मलोक वगैरे, बळिये–बलवान, पद्मनाभ–श्रीविष्णू, सेवाॠणी–सेवेने ॠणी. कामधेनु–इच्छिलेली वस्तू देणारी दैवी गाय, त्रिपुटी–ज्ञेय, ज्ञाता, ज्ञान किंवा ध्येय, ध्याता, ध्यान, अशा तिघांचा समुदाय, लाटे–भरपूर मोठे

अर्थ – ज्याच्या लाभापुढे ब्रह्मादिकांचेही लाभ ठेंगणे आहेत अशा ईश्वराच्या संगतीचा लाभ आम्ही मिळविला आहे; त्यामुळे मी शरणागत मोठा बलवान बनलो आहे. १ मी वासनेचा त्याग करून देवाच्या भजनाची जोड मिळविली आहे आणि त्यायोगे पद्मनाभ श्रीविष्णूलाच ॠणी करून ठेविले आहे. २ ईश्वराची ही भक्ती म्हणजे कामधेनूप्रमाणे असून तिच्या दुधाला अंत नसतो. जशी ज्याला इच्छा होईल तसा त्याच्यावर वर्षाव होत राहील. ३

बसल्या ठिकाणीच तिच्या क्षुधाला भरते येते व त्याच्या प्राशनाने एवढी लय साधते की ज्ञेय, ज्ञाता, ज्ञान ही त्रिपुटी नाहीशी होते ध्येय, ध्याता, ध्यान यातील भेद मावळतो ३ काय जाणावयाचे आहे ते, जाणणारा व त्याची झालेली जाणीव अशा वेगळ्या अवस्थाच शिल्लक राहात नाहीत ४ या जगात आमच्यासारख्या विष्णुदासाला हरिनाम हाच एक विसावा आहे. नारायणाने विसावा आमच्याच देहात घेतलेला आहे ५ तुकाराम महाराज म्हणतात की ईश्वरप्राप्तीच्या या भोजनाचा लाभ फार मोठाच आहे येथे कुणीही उपाशी राहू म्हटले तरी राहू शकत नाही ६

४५ दुजें खडे तरी । उरला तो अवघा हरि । आपणाबाहेरी । न लगे ठाव धुंडावा ॥ १ ॥<br>
इतुलें जाणावया जाणा । कोडे तरी मनें मना ॥ पारधीच्या खुणा । [1]जाणतेचि साधावे ॥ २ ॥<br>
देह आधीं काय खरा । देहसंबंधपसारा ॥ बुजगावणें चोरा । रक्षणसे भासतें ॥ ३ ॥<br>
तुका करी जागा । नको [2]वासपू वाउगा ॥ आहेसि तू आगा । अगीं डोळे उघडी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – दुजें–द्वैत, जीवशिव, आत्मापरमात्मा ही भिन्न असल्याची जाणीव खडे–खडल्यावर संपल्यावर, पारधी–शिकारी, वासपू–चाचपू, वाउगा–व्यर्थ

अर्थ – एकदा द्वैत संपले की जे उरले ते सर्व परमेश्वराचेच रूप आहे मग त्याला शोधण्यासाठी आपल्या-बाहेर कुठे जावे लागत नाही १ पण हे ज्ञान होण्यासाठी मनाने मनाकडेच अंतर्मुख व्हावयास हवे, कारण पारध्यासच पारध्याच्या खुणा माहित असतात २ आधी देह हासुद्धा खरा नाही, मग त्यापासून निर्माण झालेला पसारा खरा कसा असणार? शेतातले बुजगावणे हे जसे चोरास रक्षण करणारेच वाटते त्याप्रमाणे देह आपणास खरा वाटतो ३ म्हणून तुकाराम महाराज जागे करीत आहेत की, उगाच इकडे तिकडे व्यर्थ चाचपू नका, देहानच तुम्ही ईश्वरस्वरूप आहात, हे देहातीलच ज्ञानदृष्टीने तुमच्या ध्यानात येईल ४

विवरण – संतांच्या अभंगात द्वैताद्वैताचा उल्लेख नेहमी येतो संत द्वैती की अद्वैती? याचे उत्तर संत तत्त्व ज्ञानाच्या वा बोधाच्या दृष्टीने अद्वैतीच त्यांची अनुभूती अद्वैताची दुजेपणा किंवा द्वैत संपल्यावर जे स्वरूप उरते तोच एक परमेश्वर हा या अभंगाचा मुख्य गाभा आहे दुजेपणा संपावा, भेद सर्व नाहीसा व्हावा, जीव वेगळा, ईश्वर वेगळा अशी भावना उरू नये यासाठी तर आग्रह आहे 'भेद तुटलियावरि । आम्ही तुमचीच हो हरी' अशी जाणीव सर्वत्र आहे 'कासयाने पूजा करू केशीराजा' नावाच्या सर्वोत्तम अभंगात या अद्वैतानुभूतीचे फार चांगले वर्णन आलेले आहे नाव निरनिराळी म्हणून काय मूळ रूपही वेगवेगळे असावे? जलप्रवाह निराळा, तरंग निराळा, सुवर्ण निराळे, अलंकार वेगळे किंवा बुवांच्याच भाषेत बोलायचे म्हणजे 'खडा खाळी साकर । झाला नामाचाची फेर' नामाची भिन्नता, परंतु स्वरूपाच्या दृष्टीने एकताच की 'तुज मज नाहीं भेद' अशीच अनुभूती सर्वत्र आहे मग द्वैत आले कोठून? 'अद्वैतीं तो नाहीं माझें समाधान' असेही तुकारामबुवा का म्हणतात? याचे उत्तर असे की बोधाला प्रचीतीला, तत्त्वज्ञानाच्या बैठकीवर अद्वैतच; पण या अद्वैताची अनुभूती येणार ती द्वैताच्या साह्याने भोगायला द्वैत, अनुभूतीस अद्वैत दिसायला दोन पण असायला एक अशी वस्तुस्थिती आहे डोळे दोन पण दृष्टी एक ओठ दोन पण गोष्टी एकरूपाच्या एक बीजच वृक्षाच्या रूपाने आले सुवर्णच नाना अलंकाराच्या रूपानी व्यक्त झाले, अनंत लहरीच समुद्रावर उमटल्या, पण या सर्वांत अनुभूती एका अव्यक्ताचीच आहे घरात सूर्य अलिप्त दिसतो काष्ठात अग्नी वेगळा दिसतो पण सूर्याची व अग्नीची व्यापकता सर्वत्र असते उदका वेगळा । नव्हे तरंग निराळा ही अनुभूती उदक व तरंग या द्वैतापासून यावयाची तरुवर बीजा पोटीं । बीज तरुवरा शेवटीं, असे हे द्वैताद्वैत चक्र आहे 'तुझी माझी एक ज्योती' हे अनुभवाचे सार आहे अव्यक्ताला सुद्धा व्यक्त होण्याचा अद्वैताला द्वैतावर यण्याचा ध्यास असतो कारण त्याशिवाय सुख नाही त्या मूलस्थानाला एकटेपणास करमनास होते म्हणून तो बहुविध आवा-रानी नटतो, व्यक्त होतो एका बीजाचा नाश झाल्यासारखा वाटला तरी अनंत टपोऱ्या दाण्याचे कणीस दिसते या अनंत दाण्यातही एक बीजच विविधतेने नटलेले असते

[1] जाणं तर्णेचि साधाव्या [2] चाचपू

४६ विष्णुमय जग वैष्णवांचा धर्म । भेदाभेदभ्रम अमंगळ ॥ १ ॥
अइका जी तुम्ही भक्त भागवत । कराल तें हित सत्य करा ॥ २ ॥
कोणाही जिवाचा न घडो मत्सर । वर्म सर्वेश्वरपूजनाचें ॥ ३ ॥
तुका म्हणे एका देहाचे अवयव । सुख दुःख जीव भोग पावे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – भेदाभेदभ्रम–हे माझे, हे दुसऱ्याचे, हा पापी, हा पुण्यवान, हा लहान, हा मोठा असा जाणिवेचा भ्रम, वर्म–खूण.

अर्थ :– सर्व जगच विष्णुमय आहे.म्हणजे एकच तत्त्व सर्वत्र भरून राहिले आहे असे मानणे हा वैष्णवांचा धर्मच आहे. यात् भेद मानणे, निराळेपणा कोणत्याही कारणाने कल्पिणे हे वाईट आहे. १ तुम्ही खरे भगवंताचे उपासक असाल तर जे कराल ते सत्याचे स्वरूप जाणून हिताचे असेल तेच करा. २ कुणाही जीवाचा मत्सर करू नका, कारण सर्वत्र एकच परमेश्वरतत्त्व भरून राहिले आहे, व त्या सर्वेश्वर पूजनाचे तत्त्व ध्यानात असू द्या. ३ तुकाराम महाराज म्हणतात, सर्व अवयव एकाच देहाचे आहेत. जर एका अवयवास सुखाची किंवा दु:खाची अनुभूती आल्यास ती त्या जीवास सारखीच जाणवते. ४

विवरण :–वारकरी सम्प्रदायात या अभंगास फार महत्त्व आहे याचे कारण असे की दोन महत्त्वाचे विचार या अभंगात थोडक्या शब्दात सांगितले आहेत सर्व जगतात एकच परमेश्वर भरून राहिला आहे असे समजून सर्वेश्वराची पूजा करण्याचीच वृत्ती आपली असावी असा एकत्वाचा बोध फार परिणामकारक रीतीने वर्णन केला आहे. या बोधाचा व्यावहारिक उपयोग म्हणजे सर्वत्र परमेश्वराचाच अंश व्यक्त झालेला असल्यामुळे हा लहान, हा मोठा हा उच्च, हा नीच, हा चांगला, हा वाईट, हा पुण्यवान, हा पापी असे भेद उरू नयेत एकाचाच हा सर्व विस्तार असल्यामुळे समानबंधुत्वाची जाणीव असणे अगत्याचे आहे, हा यातून निघालेला दुसरा विचार. मग कुणाचाही मत्सर करू नये हे ओघानेच आले. हेवा दावा, मत्सर आपण ज्याचा करणार तोच ईश्वरी अंशाचा व्यक्त झालेला आकार असेल तर ? असा प्रश्न सर्वांच्याच मनासमोर उभा राहिला तर पुष्कळसे हेवेदावे मिटतील कटुता कमी होईल. भागवत धर्माने या समत्वाच्या दृष्टीने फार मोठी कामगिरी सामाजिक क्षेत्रातही केली आहे भेददृष्टीने पाहणे संतानी अमंगल मानले आहे

४७ आम्ही तरी आस । जालों टाकोनि उदास ॥ १ ॥
आतां कोण भय धरी । पुढें मरणाचें हरी ॥ २ ॥
भलते ठायीं पडों । देह तुरंगीं हा चढो ॥ ३ ॥
तुमचें तुम्हांपासीं । आम्ही आहों जैसीं तैसीं ॥ ४ ॥
गेले मानामान । सुखदुःखाचें खंडन ॥ ५ ॥
तुका म्हणे चित्तीं । नाहीं वागवीत खंती ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा –आस–इच्छा, आशा, तुरगीं–घोड्यावर मानामान–मान किंवा अपमान, खंती–काळजी

अर्थ :– देहबुद्धीची आशा सोडून आता आम्ही उदास झालो आहोत. १ आता परमेश्वरा, मरणाचे भय कुणास आहे ? २ आता देह कुठे पडून जावो अथवा घोड्यावर चढो, आम्हांस त्याचे काय ? ३ यामुळे होणारे सुखदु:खादी विकार तुमचे तुम्हापाशीच राहोत, आमचा त्याच्याशी संबंध नाही; आम्ही आहो तसेच राहू. ४ मान आणि अपमान, सुख आणि दुःख यांचा नाश करून आम्ही आता त्यांच्या पलीकडे गेलो आहोत. ५ तुकाराम महाराज म्हणतात, आता यासबंधीची मनांत बिलकुल चिंता उरलेली नाही. ६

४८ निंदी कोणी मारी । वंदी कोणी पूजा करी ॥ १ ॥
मज हेंही नाहीं तेंही नाहीं । वेगळा दोहीं पासुनी ॥ २ ॥

देहभोग भोगें घडे । जें जें जोडे तें बरें ॥ ३ ॥
अवघें पावे नारायणीं । जनार्दनीं तुक्याचें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – देहभोग–देहास होणारे सुखदु:खादी विकार

अर्थ :– आमची कुणी निंदा करोत अथवा कुणी स्तुती करोत, कुणी मार देवोत अथवा कुणी पूजा करोत, १ मला पहिल्याचे दु:ख नाही दुसऱ्याचे सुख नाही. मी सुखदु:खाच्याहीपेक्षा निराळाच आहे. २ देहभोगानुसार जे जे बरेवाईट प्रसंग येतील ते सर्व सारख्याच दृष्टीने मी भोगीन. त्याचे समत्वाने स्वागतच करीन ३ कारण ही सर्वच सुखदु:खे माझी स्वत:ची नसून जनार्दन स्वरूपाच्या नारायणास ती मी अर्पण केली आहेत, मी तसा अलिप्तच राहिलो आहे. ४

विवरण – वरील दोनही अभंगात भक्ताच्या उदासीन वृत्तीचे रहस्य फार मर्मग्राही रीतीने वर्णन केले आहे. त्याने आपले सर्व भाव व सर्व क्रिया सबंध परमेश्वराला अर्पण केले असल्याने तो त्यात गुंतून राहात नाही, ता मानअपमान, सुखदु:ख याच्या पलीकडे असतो स्तुतिनिंदा त्याला सारखीच असते भगवद्गीतेच्या बाराव्या अध्यायात ' यो न हृष्यति न द्वेष्टि न शोचति न कांक्षति । शुभाशुभपरित्यागी ' ( जो कशाचाही आनंद मानीत नाही, द्वेष करीत नाही, शोक करीत नाही व इच्छाही करीत नाही, कर्माचे शुभाशुभ फलही ज्याच्या मनात नसते ) अशा भक्ताचा गौरव केला आहे त्याची वागणूक ' तुल्यनिन्दास्तुतिर्मौनी ' ( निंदास्तुती समान मानणारी ) असते सर्व साधुसंतांनी हाच बोध आपल्या आचरणातून व्यक्त केला आहे ' निंदा स्तुति कोणी करो दया माया । न धरीं चाड या सुखदु:खा ' असे तुकारामबुवांनीही म्हटले आहे

४९ जन विजन जालें आम्हा । विठ्ठलनामा प्रमाणे ॥ १ ॥
पाहें तिकडे बापमाय । विठ्ठल आहे रखुमाई ॥ २ ॥
वन पट्टण एकभाव । अवघा ठाव सरता जाला ॥ ३ ॥
आठव नाहीं सुखदु:खा । नाचे तुका कौतुकें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– विजन–एकान्ताची जागा, पट्टण–शहर, सरता झाला–सारखा झाला, विठ्ठल रूपाने भरून राहिला

अर्थ :– एका विठ्ठलनामामुळे आम्हास जनसमुदायात राहून विजनवासाची, एकान्ताची गोडी मिळाली १ जिकडे आम्ही पाहू तिकडे मायबाप विठ्ठलरखुमाईचीच रूपे आम्हास दिसतात २ वन असो अथवा नगर असो विठ्ठलवासाने सर्व ठिकाणे आम्हास सारखीच झाली ३ या अद्वितीय अशा समभावाच्या आनंदात आम्हाला सुखदु:खाची आठवणही होत नाही; तुकाराम महाराज त्याच कौतुकाने नाचत आहेत. ४

विवरण–या अभंगात परमेश्वरी कृपेने भाग्यवान झालेल्या भक्ताची अवस्था समत्वाची कशी होते याचे उत्कृष्ट चित्रण आले आहे सर्वत्र विठ्ठलभावच प्रतीतीस आल्यामुळे सुखदु:ख, स्तुति-निंदा याची भावना नष्ट झाली जनात आहोत की विजनात आहोत हेही आमच्या ध्यानात येत नाही असे बुवा सांगत आहेत या ठिकाणी ' जन विजन जाले आम्हा ' या शब्दातील रहस्य समजावून घ्यावयास हवे जनसमुदाय व वननिवास ही स्थिती आम्हाला समान वाटते म्हणजे वनातील एकान्त गर्दीप्रमाणे वाटतो, असे नसून शहरातील जनसमुदायातही एकान्ताचा अनुभव येण्याइतपत आमची विठ्ठलाशी तद्रूपता झाली आहे असा भावार्थ या विजनवासाचे, एकान्ताचे, वननिवासाचे महत्व साधकाच्या आयुष्यात फार मोठे आहे ' अरतिर्जनसंसदि ' सर्वसामान्य जनाच्या समूहाची आवड नसणे हे एक आत्मज्ञानी माणसाचे लक्षण गीतेत सांगितले आहे हा आत्मज्ञानी ' विविक्त सेवी ' म्हणजे विशिष्ट अशा एकान्ताच्या स्थळी राहाणारा असतो ' एकान्तेवीण प्राणियातें बुद्धि कैंची ? ' म्हणून समर्थांनीही विचारले आहे

याचसाठी तुकारामबुवानी गावातील गजबजाट सोडून भंडाऱ्याच्या डोंगरावरील वृक्षवल्लींच्या व वनचराच्या सोयऱ्यात मन रमविले हा एकान्ताचा निवास बुवांच्या मनास फार रुचला येथे आपल्याच मनाशी आपणच संवाद

करू शकतो 'सत्य असत्यासी मन केले ग्वाही । मानियेले नाहीं बहुमता' असा स्पष्ट निर्वाळा बुवानी दिलेला आहे एकान्तात आपल्या मनासच साक्षी ठेवून वागता येते सर्वसामान्य लोकाच बहुमत उपयोगी नसते या आत्मज्ञानी भक्ताच्या निवासाचे व एकान्तप्रियतेचे वर्णन ज्ञानेश्वरानी फार बहारीने केले आहे 'आणि तीर्थे धौतें तटें। तपोवनें चोखटें । आवडती कपाटें । वसवू जया ॥ शैलकक्षांचीं कुहरें । जळाशय परिसरें । अधिष्ठी जो आदरें नगरा नयें । बहु एकान्तावरी प्रीति । जया जनपदाची खंती । जाण मनुष्याकारें मूर्ती । ज्ञानाची तो" साधुसत वा आत्मज्ञानी याप्रमाणे एकान्तवासात प्रभूशी समरस झाले असले तरी ते सुख इतरेजाना देण्यासाठी त लोकाच्यातही मिसळत असतात हेही येथे ध्यानात घ्यावयास हवे 'आपण जेवुनी जेववी लोका । सतर्पण करी तुका' म्हणून बुवानी आपल्या कार्याचे मर्म सागितले आहे लोकाच्या उद्धारासाठी जेव्हा सत पुरुष समुदायात येतात तेव्हाही त्याच एकान्ताचे ममत्व कायम असते

५० हिरा ठेविता ऐरणीं । वाचे मारिता जो घणीं ॥ १ ॥
तोचि मोल पावे खरा । करणीचा होय चुरा ॥ २ ॥
मोहरा होय तोचि अगें । सूत न जळे ज्याचे सगें ॥ ३ ॥
तुका म्हणे तोचि सत । सोसी जगाचे आघात ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – करणी–कृत्रिम मणी काच इ० मोहरा–ज्याच्या सगतीत आगीतही सूत जळत नाही असे रत्न

अर्थ – जो हिरा एरणीवर हातोड्याचे आघात सहन करूनही फुटत नाही तोच खरा १ त्यालाच खरे मोल असते कृत्रिम काचेसारखा असेल तर त्याचा लागलीच चुराच होतो २ ज्याच्या सगतीत अग्नीच्या मुखातही सूत जळत नाही तोच खरा मोहरा मणी म्हणायचा ३ जो जगाचे आघात सहन करील तोच खरा सत म्हणावा असे तुकाराम महाराज म्हणतात ४

विवरण –सताच्या चरित्राचे व वर्तणुकीचे महत्त्व समकालीन लोकाना बहुधा वेळीच उमगत नसते सत फटकळपणे समाजाच्या, व्यक्तीच्या गैरवर्तनावर बोट ठेवून कधी कटु शब्दात कधी मृदु शब्दात जाणीव देत असतात सर्व काळास उपयुक्त होईल असा त्याचा उपदेश असतो स्वत अतिशय निर्लोभी मानापमानाच्या पलीकडे गेलेले असे ते असतात याच्या या वृत्तीमुळे ढोंगी स्वार्थी, लोभी माणसाची अडचण होते मग ते सताचा द्वेष करायला प्रवृत्त होतात ज्ञानेश्वर एकनाथ, तुकाराम इत्यादी सत्पुरुषाचा झालेला छळ प्रसिद्ध आहेच स्वत सताना याचे काही नसते लोक रागावले तरी सत पुरुष शात असतात 'विश्व रागें झालिया वन्ही । सतें मुखें व्हावें पाणी' अशी त्याची शिकवण असते जगाचे आघात सताना सहन करावे लागतात

५१ आलिंगनें घडे । मोक्ष सायुज्यता जोडे ॥ १ ॥
ऐसा सताचा महिमा । जाली बोलायाची सीमा ॥ २ ॥
तीर्थे पर्वकाळ । अवघीं पायापें सकळ ॥ ३ ॥
तुका म्हणे देवा । त्याची केली पावे सेवा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – सायुज्यता–मुक्तीचा एक प्रकार सीमा–अखेर पायापें–पायाशी

अर्थ – सताच्या आलिंगनाने सायुज्यतेची मुक्ती मिळते १ सताचा महिमा हा असा आहे त्याविषयी बोलणेही अपुरे पडते सायुज्यता मिळाल्यानतर दुसरे काय साधायचे? २ सर्व तीर्थे व सर्व पर्वकाळ सताच्या पायाशीच असतात ३ तुकाराम महाराज म्हणतात, सताची सेवा केली की ती देवास पोचते ४

विवरण –या अभगात सतमहिमा वर्णन केला आहे सताच्या सहवासात सर्व तीर्थे सर्व पुण्ये प्राप्त होतात अशी ग्वाही सर्वच सतानी दिलेली आहे या सताच्या पायी नामदेव-तुकारामानी आपला जीव वाहून ठेविला होता 'सतमहत माझी पूजा । आन भाव नाहीं दुजा ।' अशी निष्ठा स्वत तुकोबाची होती सताच्या पादुका खाद्यावर

घेऊन मी आनंदाने नाचेन असे त्यांनी एका अभंगात म्हटले आहे. संतांच्या आलिंगनाने सायुज्यता नावाची मुक्ती प्राप्त होते असे म्हटले आहे. स्वतः संतांना कसल्याही मुक्तीची जरूरी नसते. त्यांना केवळ ईश्वरसान्निध्य व भजन यांचीच गोडी असते. पण सर्वसामान्य लोकांच्या दृष्टीने मुक्तीचे किंवा मोक्षाचे ध्येय सांगितले आहे. आपल्या परंपरेत मुक्ती चार प्रकारच्या सांगितल्या आहेत. सलोकता, समीपता, स्वरूपता व सायुज्यता या चार मुक्ती होत. भागवतात सार्ष्टि ही पाचवी मुक्ती सांगितली आहेत.

५२ माझिया मीपणा । जाला यावरी उगाणा ॥ १ ॥
भोगी त्यागी पांडुरंग । त्यानें वसविलें अंग ॥ २ ॥
टाळिलें निमित्त । फार थोडें घात हित ॥ ३ ॥
यावें कामावरी । तुका म्हणे नाहीं उरी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – उगाणा–गणना, हिशेब, कामावरी–कामादिक वृत्तींवर

अर्थ – देहाविषयी मी, माझा देह असा जो भाव होता तो सर्व संपला, त्याचा हिशेब मोटपणे झाला १ आता सर्व भोग व सर्व त्याग तो पांडुरंगच बनलेला आहे, कारण माझ्या सर्वांगात त्याचीच वस्ती आहे. तोच प्रेरक आहे २ थोडाफार घात अथवा फायदा करण्याचे कारण जी देहबुद्धी होती तीच संपवून टाकली आहे ३ आता कामादिक वृत्तींवर यावे अशी अवस्थाच उरलेली नाही. आता कुठल्या इच्छा मी कराव्यात असे राहिलेच नाही. सर्व काही प्रभूच बनून राहिला आहे ४

५३ सकळ चिंतामणी शरीर । जरी जाय अहंकार आशा समूळ ॥
निंदा हिंसा नाहीं कपट देहबुद्धि । निर्मळ स्फटिक जैसा ॥ १ ॥
मोक्षाचें तीर्थ न लगे वाराणसी । येती तयापासीं अवघीं जनें ॥
तीर्थांसी तीर्थ जाला तोचि एक । मोक्ष तेणें दर्शनें ॥ २ ॥
मन शुद्ध तया काय करिसी माळा । मंडित सकळा भूषणासी ॥
हरिच्या गुणें गर्जताती सदा । आनंद तया मानसीं ॥ ३ ॥
तन मन धन दिलें पुरुषोत्तमा । आशा नाहीं कवणाची ॥
तुका म्हणे तो परिसाहूनि आगळा । काय महिमा वर्णूं त्याची ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – चिंतामणी–चिंतिलेले देणारे रत्न, स्फटिक–कांतियुक्त पारदर्शक दगडाची एक जात, आगळा–श्रेष्ठ, थोर

अर्थ – ज्याची समूळ देहबुद्धी गेलेली आहे, अहंकार गळाला आहे, सर्व आशा संपली आहे, त्याचे सर्व शरीरच मनात असेल ते देणाऱ्या रत्नाप्रमाणे आहे. ज्याच्या मनात निंदा, हिंसा, कपटबुद्धी उरलेली नाही तो स्वच्छ कांती देणाऱ्या स्फटिकाप्रमाणेच आहे १ सर्व मोक्षाचे तीर्थ जे काशी तिथे आता जायला नको, कारण याच सत्पुरुषापाशी सर्व लोक आता येतात. सर्व तीर्थांचा तीर्थ तोच स्वतः बनलेला असतो. त्याच्या दर्शनानेच मोक्ष मिळतो २ मग या सत्पुरुषाच्या गळ्यात माळ असो नसो, ज्याचे मन शुद्ध असते त्यास माळेसारख्या बाह्य उपचारांची काय आवश्यकता आहे ? इतर भूषणांनी अथवा अलंकारांनी भूषित होण्याची जरूरी तरी काय आहे ? ते परमेश्वराच्या गुणांचे संकीर्तन नेहमीच करीत असतात, त्यामुळे त्यांचे चित्त सदोदित आनंदाने भरून राहिलेले असते ३ या श्रेष्ठ पुरुषाने आपले तन मन धन हे सर्वस्व परमेश्वरास अर्पण केलेले असते, त्याला स्वतःला कुठलीही आशा उरलेली नसते. तुकाराम महाराज म्हणतात असा सत्पुरुष परिसाहूनही श्रेष्ठ आहे. त्याची महती मी काय वर्णन करू ? ४

५४ आहे तें सकळ कृष्णासि अर्पण । न कळतां मन दुजें भावी ॥ १ ॥
म्हणउनी पाठीं लागतील भूतें । येतीं गवसीत पांचजणें ॥ २ ॥

ज्याचें त्या वंचलें आठव न होतां । दंड या निमित्ताकारणें हा ॥ ३ ॥
तुका म्हणे काळें चेपियेला गळा । मी मी वेळोवेळा करीतसे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– भावी–भावना धरते, मानते, भूतें–पचेंद्रियें व पचविषय, वचलें–विस्मरण झालें.

अर्थ :– जे आहे ते सर्व श्रीकृष्णाला अर्पण करावे, कृष्णाच्याच सत्तेने व प्रेरणेने सर्व क्रिया होतात असे मानावे. हे ज्याना कळत नाही ते मात्र अज्ञानामुळे सर्व कर्मे मीच केली अशी विपरीत भावना मनात धरतात. १ त्यामुळेच त्याच्यामागे पचेंद्रियें व पचविषय याची भूते लागतात. यात ते गुरफटून राहतात. २ आपणाकडून होणारी सर्व कर्मे त्या परमेश्वराकडूनच होतात व ही त्यालाच अर्पण करायची असतात, याची आठवण न राहिल्यामुळे फसगत होते व विविध विषयाच्या तावडीत सापडण्यास अवसर मिळतो ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा माणसाचा म्हणजे देहबुद्धी धारण करून पचविषयात रममाण होणाऱ्या माणसाचा गळा काळ एकसारखा चेपीत असतो ,तरी हा मी मी, माझे माझे असेच अज्ञानाने म्हणत असतो ४

५५ महारासि सिवे । कोपे ब्राह्मण तो नव्हे ॥ १ ॥
तया प्रायश्चित्त कांहीं । देहत्याग करितां नाहीं ॥ २ ॥
नातळे चांडाळ । त्याचा अंतरीं विटाळ ॥ २ ॥
ज्याचा सग चित्ती । तुका म्हणे तो त्या याती ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा .– कोपे–रागावतो, नातळे–जवळ करू नये

अर्थ – या अभगाचे अर्थ दोन प्रकारानी लाविता येतात. एक आध्यात्मिक अर्थ, दुसरा लौकिक. पहिला अर्थ असा – क्रोध हा महार मानला आहे. याला म्हणजे क्रोधरूप महाराला जो शिवतो तो ब्राह्मण नव्हे. ब्राह्मणास राग आला तर तो महार या पदवीस जातो. १ या क्रोधयुक्त ब्राह्मणाने देहान्त प्रायश्चित्त जरी घेतले तरी तो शुद्ध होणार नाही. २ या क्रोधरूपी चाडाळास कधीही जवळ करू नये, कारण त्याच्या अतरगात विटाळ असतो. ३ तुकाराम महाराज म्हणतात, ज्याचा सग ज्याच्या मनात तशी जात त्याची होते क्रोधरूप महारास त्याने मनात स्थान दिल्यास तोही महारच होईल ४

दुसरा लौकिक अर्थ असा की, महारास शिवल्यावर जो ब्राह्मण सतापतो तो खरा ब्राह्मणच नव्हे. १ अशा सतापी ब्राह्मणास, दुसऱ्यास अस्पृश्य मानणाऱ्या ब्राह्मणास देहत्यागाचे प्रायश्चित्तही कमीच होईल. २ हा मनुष्य चाडाळास जवळ करीत नाही, कारण त्याच्या अतरगातच विटाळ असतो, म्हणून त्यास तो चाडाळ वाटतो. ३ हा महार, हा चाडाळ असाच ध्यास एकसारखा त्याच्या चित्तात असल्यामुळे तो त्याच जातीचा होतो. जसे चिंतन तसे त्याला फळ मिळते ४

विवरण :– तुकोरामबुवाच्या वेळेच्या आधीपासून हिंदू धर्मात कर्मकाडाचे, बाह्य उपचाराचे माहात्म्य फार माजले होते पण एक जात उच, एक नीच असा फरक सताच्या दृष्टीत नसल्याचे दिसून येते जातिबाह्य, हीन जातीचा, अस्पृश्य, चाडाळ, पापकर्मी यांच्या उद्धाराची सोय भागवतधर्मीय सतानी केली. 'म्हणौनि कुळ उत्तम नोहावें । जाती अत्यजही व्हावें । परि देहाचेनि नावें । पशूचेही लाभो' अशी ग्वाही ज्ञानदेवानी दिली दगडाप्रमाणे पापयोनीतील मूर्ख असले तरी एकदा त्याची दृष्टी भगवताकडे लागली की मग काही उणीव पडू नये 'जाति कुळवर्ण । हे आघवेचि गा अकारण' अशी घोषणा करून ज्ञानेश्वरानीच या क्रातिकार्यास सुरुवात केली जन्मजात जातिभेद परमेश्वराच्या दरबारात नसावा अशी नवी विचारसरणी रूढ झाली 'जाति व्यक्ति पडे बिंदुले' असा निर्णय ज्ञानेश्वरानी दिला आहे भगवद्गीतेने दिलेल्या सवलतीवर भाष्य करिताना ज्ञानेश्वरानी म्हटले आहे 'यापरी पापयोनिही अर्जुना । का वैश्य शूद्र अगना । मातें भजता सदना माझिया येती' निदान भक्तीच्या प्रांतातील जातिभेद कमी होत राहून यावाळी प्रत्येक जमातीत एक एक सत्पुरुष निर्माण झाला. महार जातीत चोखामेळा निर्माण होऊन या नवविचाराना एक प्रकारचा विजयच झाला चोखा, कर्ममेळा इत्यादी अस्पृश्य सताच्या अभगातील

सामाजिक दुखणे या सदर्भात पाहण्यासारखे आहे चोखोबाचे विटाळाचे अभग तत्त्वज्ञानाच्या दृष्टीनेही महत्त्वाचे आहेत त्याच्या मते सोवळेओवळे ज्याच्यात्याच्या पाहण्यावर आहे प्रत्यक्ष विठ्ठल पाहिला तर? ता 'सोवळचाच्या ठायीं सोंवळा आहे। ओंवळयाचे ठायी ओंवळा का न राहे ? चोखा म्हणे देव दोहींच्या वेगळा' म्हणून चोखोबानी निर्णय दिला आहे समत्वाची हीच विचारसरणी नतर सर्वच सतानी पुढे नेली कबीरासारख्या फटकळ वाणीच्या सताने एकदम विचारले, एक बह्मसे विश्व रच्या है, को ब्रह्मन को शूद्रा ?' एकाच ब्रह्मापासून जर सर्व जीवाची उत्पत्ती असेल तर हा पवित्र, हा अपवित्र हा भेद कसा आला ?

एकदा हरीचे अकित झाल्यावर मग त जातीचे कुणीही असले तरी 'जाती कुळ नाहीं तयास प्रमाण' असे तुकोबानी एके ठिकाणी सागितले आहे अशा हीन यातीयाची एक नामावळीच तुकारामबुवानी 'पवित्र तें कुळ पावन तो देश' या अभगात दिली आहे 'उत्तम कुळीं जन्म, क्रिया अमगळ' असेल तर 'जातीचा ब्राह्मण न करिता सध्या-स्नान। तो एक नावाचा ब्राह्मण, होय हीनाहूनी हीन' म्हणून तुकोबानी आपले जातिभेदावरील विचार स्पष्ट केले आहेत हाच विचार पुढे मराठीतील इतर साधुसताच्या उपदेशातही येत राहिला एकनाथाच्या चरित्रातील अनेक कथावरून हा जातिविषयक विचार अध्यात्माच्या, भक्तीच्या क्षेत्रातून सामाजिक व्यवहारातही उतरू पाहात होता असे दिसून येईल

५६ तेलनीशी रुसला वेडा। रागें कोरडें खातो भिडा ॥ १ ॥
आपुलें हित आपण पाही। सकोच तो न धरी काही ॥ २ ॥
नावडे[1] लोका टाकिला गोहो। बोडिले डोकें साडिला मोहो ३ ॥
शेजारणीच्या गेली रागें। कुतऱ्यानीं घर भरिलें मागें ॥ ४ ॥
पिसारागें[2] भाजिले घर। नागविले ते नेणे फार ॥ ५ ॥
तुका म्हणे वाच्या रागें। फेडिले सावले देखिले जगें ॥ ६ ॥

*शब्दार्थ व टीपा — भिडा-भिडेने, नावडे—आवडत नाही गोहो—नवरा, बोडिले—हजामत करून घेतली वाच्या रागें—उवाच्या रागाने सावले—लुगडे*

अर्थ —आपले हित कशात आहे हे न पाहता उगाच सकोच करून वागणाऱ्या माणसाची फजिती कशी होते हे सागताना तुकारामबुवा म्हणत आहेत, कोणी एक मूर्ख मनुष्य काही कारणाने तेलिणीवर रुसला आता तिच्याकडे तेल कसे मागावे ? या सकोचाने तो भाकरी कोरडीच खात राहिला १ आपले हित पाहून सकोच न धरता त्याने वागायला हवे नाही तर त्याची फजितीच होणार २ लोकाना आवडत नाही म्हणून कोणा एका वेडपट स्त्रीनें आपल्या पतीचाच त्याग केला व मोह सोडून स्वत चे डोके बोडून घेतले याल तिचेच नुकसान झाले ३ दुसऱ्या एका मूर्ख स्त्रीनें शेजारच्या स्त्रीशी भाडण झाले म्हणून आपले घर उघडे टाकून घराबाहेर प्रयाण केले व तिच्यानतर कुत्र्यानी तिचे घर भरून गेले. ४ घरात पिसवा फार झाल्या म्हणून एका शहाण्या माणसाने घरच पटवून दिले त्यामुळे त्याचेच फार नुकसान झाले ५ एका मलिच्छ स्त्रीच्या लुगड्यात फार उवा झाल्या म्हणून तिनें अगावरचे लुगडेच फेडून टाकले तुकाराम महाराज म्हणतात यात तिचेच मोठे नुकसान झाले तिचे नग्नत्व लोकाना दिसले ना! अविवेकी लोक अशा प्रकारे स्वत चे हित कशात आहे हे न पाहता मूर्खपणाने वागतात ६

५७ मज दास करी त्याचा। सतदासाच्या दासाचा ॥ १ ॥
मग होत कल्पवरी। सुखें गर्भवास हरी ॥ २ ॥
नीचवृत्तिकाम। परी मुखीं तुझें नाम ॥ ३ ॥
तुका म्हणे सेवे। माझे सकल्प वेचावे ॥ ४ ॥

१ नाडिले २ पिसामेणे

शब्दार्थ व टीपा – कल्पवरी–युगाच्या अखेरपर्यंत, नीचवृत्तिकाम–हलक्या वृत्तीमधील कोणतेही काम, वेचावे–खर्च व्हावेत

अर्थ –साधुसंगतीचे माहात्म्य गाताना तुकारामबुवा म्हणत आहेत, संताचे जे दास आहेत त्यांच्या दासाचा दास मला परमेश्वरा, केलेस तरी चालेल १ असे झाले तर मग अनेक युगापर्यंत मला गर्भवास घडून जन्मावर जन्म लाभले तरी चालतील २ तुझे नाव माझ्या मुखात असले म्हणजे वाटेल तसली हलकी कामेही मी आनंदाने करीन ३ तुकाराम महाराज म्हणतात, परमेश्वरा, तुझ्या सेवेतच माझे सर्व संकल्प याप्रमाणे खर्च व्हावेत ४

५८ सदा तळमळ । चित्ताचिये हळहळ ॥ १ ॥
त्याचे दर्शन न व्हावे । शव असता तो जिवे ॥ २ ॥
कुशब्दाची घाणी । अमंगळविली वाणी ॥ ३ ॥
नेणे शब्द पर । तुका म्हणे परउपकार ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – शव–प्रेत, कुशब्द–वाईट शब्द, पर–परतत्त्व

अर्थ – ज्याचे चित्त नेहमीच वृथा तळमळ करीत असते, हळहळत असते, १ त्याचे दर्शन सुद्धा मला होऊ नये कारण तो जिवंत असला तरी प्रेताप्रमाणेच असतो २ वाईट शिवराळ शब्दांच्या घाणीने त्याची वाणी अमंगल बनलेली असते ३ परतत्त्वाविषयी, ईश्वराविषयी त्याला एक शब्दही माहित नसतो परोपकारही तो जाणीत नाही ४

५९ जया नाहीं नेम एकादशीव्रत । जाणावे ते प्रेत शव लोकीं ॥ १ ॥
त्याचे[1] वय नित्य काळ लेखीताहे । रागें दात खाय करकरा ॥ २ ॥
जयाचिये द्वारी तुळसीवृंदावन । नाही ते स्मशान गृह जाणा ॥ ३ ॥
जये कुळी नाही एक ही वैष्णव । त्याचा बुडे भवनदीतापा ॥ ४ ॥
विठोबाचे नाम नुच्चारी जें तोंड । प्रत्यक्ष ते कुंड रजकाचे[2] ॥ ५ ॥
तुका म्हणे त्याचे काष्ठ हातपाय । कीर्तना नव जाय हरीचिया[3] ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – काळ–यम वैष्णव–विष्णुभक्त, भवनदीतापा–संसाररूपी नदीमधील नाव, रजकाचे–परिटाचे, चर्मकाचे–चाभाराचे, काष्ठ–लाकूड

अर्थ – ज्याच्या घरी एकादशीचे व्रत नाही त्याचा देह सजीव असला तरी समाजात त्याची एखाद्या प्रेताइतकीच किंमत समजावी १ त्याचे जाणारे दिवस प्रत्यक्ष यम रागाने दात करकरा खाऊन मोजीत बसला आहे २ ज्याच्या घराच्या दारात तुळसीवृंदावन नाही त्या घरास घर न म्हणता स्मशानच समजावे ३ ज्याच्या कुळात एकही विष्णुभक्त झाला नाही त्याची संसारसागर तरून जाण्याची नाव बुडाली आहे असेच समजावे ४ जो मनुष्य तोंडाने विठ्ठलाचे नाव उच्चारीत नाही त्याचे तोंड म्हणजे चामडे बुडवायचे चाभाराचे कुंडच होय ५ तुकाराम महाराज म्हणतात जो कीर्तनाला जात नाही त्याचे हातपाय म्हणजे निर्जीव लाकडेच म्हणावीत ६

विवरण –वारकरी संप्रदायातील पंथीयांना काही आचारधर्म साधुसंतांनी बसवून दिले आहेत त्याचे उपास्य दैवत श्रीविठ्ठल असावे त्याने एकादशी व्रत करावे, त्याच्या दारात तुळसीवृंदावन असावे, त्याने विठ्ठलाचे नामस्मरण करावे, त्याने कीर्तनास जावे असा काही साधनमार्ग आखून दिला आहे हा न पाळणारा मनुष्य कसा वाया जातो याचे वर्णन या अभंगात आहे वारकरी संप्रदायात एकादशी या महाव्रताचे महत्त्व विशेष सांगितले आहे या दिवशी उपवास करून हरिस्मरणात सर्व वेळ घालविणे हा मुख्य हेतू असतो उपवास हे परमेश्वरप्राप्तीचे एक साधन म्हणून उपनिषदातून वर्णन आहे ' तमेतं वेदानुवचनेन ब्राह्मणा विविदिषन्ति यज्ञेन दानेन तपसानाशकेन ' म्हणजे वेदाभ्यास, यज्ञ, दान, तप व अनाशक म्हणजे अन्नपाण्यावाचून राहणे हे पाच परमेश्वरप्राप्तीचे मार्ग आहेत अन्नपाणी वर्ज्य करून भगवंताजवळ एकचित्ताने राहणे हे उपवासाचे रहस्य आहे भागवतात एकादशीच

१ त्याचे दिवस २ चर्मकाचे ३ हरीच्या जो

माहात्म्य सांगितले आहे तुकोबांनी अनेक अभंगातून एकादशीचे महत्त्व परोपरीने सांगितले आहे 'एकादशी व्रत सोमवार न करिती । कोण त्यांची गति होईल नेणों' अशी काळजी एका अभंगात व्यक्त केली आहे 'एकादशीस अन्नपान । जे नर करिती भोजन' या अभंगात एकादशी न करणाराची गती काय ती सांगून त्यांनी एकादशीमाहात्म्य वर्णन केले आहे

६० आम्ही सदैव सुडके । जवळी येता चोर धाके । जाऊ पुढी भिके । कुतरीं घर राखती ॥ १ ॥
नादणूक ऐसी सांगा । नाहीं तरी वाया भागा । थोरपण अंगा । तरी ऐसे आणावे ॥ २ ॥
अक्षय साचार । केले सायासानीं घर । एरंडसिवार । दुजा भार न साहती ॥ ३ ॥
धन कण घरोघरीं । पोट भरे भिकेवरी । जतन तो करी । कोण गुरें वासरें ॥ ४ ॥
जाली सकळ निश्चिती । भाडवल शेण माती । झळझळीत भिंती । वृंदावनें तुळसीचीं ॥ ५ ॥
तुका म्हणे देवा । अवघा निरविला[1] हेवा ॥ कुटुंबाची सेवा । तोचि करी आमुच्या ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – सुडका– लंगोटी धारण करणारा, दरिद्री, धाके– भिता, पुढी– रोजच्या भिक्षेस, वाया– विनाकारण, भागा– श्रमता, साचार– खऱ्या स्वरूपाचे, सिहार– शेराचे लाकूड, निरविला– दूर केला

अर्थ – थोर भक्त किती उदासीन व निरिच्छ असतो याचे वर्णन या अभंगात बुवांनी फार चांगल्या प्रकारे केले आहे ते म्हणतात, आम्ही नेहमीच असे दरिद्री म्हणून भाग्यवान आहोत आमच्या घरी चोर येतच नाहीत, आले तर तेच भिऊन जातात आम्ही बाहेर कुठे भिक्षेस अथवा भोजनाच्या व्यवस्थेस गेलो असता आमच्या घराचे रक्षण कुत्री करतात म्हणजे रक्षण करण्याजोगे तेथे काही नसतेच १ अशी भाग्याची वागणूक कुणाची आहे सांगा तुम्ही सर्वजण व्यर्थ भागता, दमता तुम्हास थोरपण हवे असेल तर आमच्या सारखे वागा २ , आम्ही पाहा मोठ्या कष्टाने खरेखुरे घर उभे केले आहे त्याला लाकडे एरंडाची व शेराचीच वापरली आहेत, कारण याच्या-शिवाय दुसरा भार या घरास सहन झालाच नसता ३ आमचे धन व धान्य यांनी लोकांची घरे भरली असून आम्ही मात्र पोट भरण्यासाठी भिक्षा मागीत हिंडतो गुरे, वासरे यांचे जतन करण्याची खटपट कोण करीत बसतो ? ४ आम्हास कशाचीच काळजी नाही, सर्वांविषयी आम्ही निश्चित आहोत कारण आमचे भाडवल म्हणजे शेण व माती, याचेच आहे याच्या साह्याने घराच्या भिंती मात्र स्वच्छ सारवलेल्या असून तुळशीवृंदावनही निर्मळ केले आहे ५ तुकाराम महाराज म्हणतात, परमेश्वराने आमची सर्व विषयाबद्दलची हावच दूर केली आहे आणि कुटुंबाची काळजी तोच नेहमी करीत असतो ६

विवरण – निरिच्छ व उदास राहून सब भार परमेश्वरावर टाकणाऱ्या भक्ताच्या प्रपंचाची काळजी परमेश्वर करीत असतो असा अनुभव अनेक संताना आलेला आहे भक्त जसे अनन्य भक्त असतात तसाच ईश्वरही आपल्या भक्ताना अनन्य असतो 'अनन्याश्चिन्तयन्तो मां ये जनाः पर्युपासते । तेषां नित्याभियुक्तानां योगक्षेमं वहाम्यहम्' म्हणून आपले अनन्य चिंतन करणाऱ्या भक्ताचा योगक्षेम मी चालवितो असे साक्ष भगवताने गीतेत स्वमुखाने दिली आहे ज्ञानेश्वरांनी तर या परमेश्वराच्या अनन्यत्वाचे वर्णन करताना कौतुकाने म्हटले आहे, 'मग वाहीवरी पार्था, माझ्या भजनीं आस्था । तरी तयातें मी माथा । मुकुट करीं । ' इतकेच नव्हे तर 'म्हणोनी गा नमस्कारू । तयातें आम्ही माथा मुकुट करूं । तयाची टांच धरूं । हृदयीं आम्ही तो पाहावा हे डोहळे । म्हणूनि अचक्षूसी मज डोळे । हातींचेनि लीलाकमळें । पूजूं तयातें ॥ दोवरी दोनी । भुजा आलों घेउनी । आलिंगावया लागुनी । तयाचें आंग ॥ असा गौरव ज्ञानेश्वरांनी भक्ताचा केला आहे

६१ पराविया नारी माउलीसमान । मानिलिया धन काय वेचे ॥ १ ॥
न करिता परनिंदा परद्रव्य अभिलाष । काय तुमचे यास वेचे सांगा ॥ २ ॥
बैसलिये ठायीं म्हणता रामराम । काय होय श्रम ऐसे सांगा ॥ ३ ॥

[1] निरसला

सताचे वचनीं मानितां विश्वास । काय तुमचे यास वेचे सागा ॥ ४ ॥
खरें बोलता कोण लागती सायास । काय वेचे यास ऐसे सागा ॥ ५ ॥
तुका म्हणे देव जोडे याचसाठीं । आणीक ते आटी न लगे काही ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – पराविया–दुसऱ्याची, वेचे–खर्च होत, आटी–खटाटोप

अर्थ – परस्त्री आईप्रमाणे मानल्यास तुमचे कधी द्रव्य खर्च होते काय ? १ दुसऱ्याची निंदा जर केली नाही, दुसऱ्याच्या धनाची इच्छा केली नाही तर तुमचे काही खर्च होते काय ? २ बसल्याबसल्याच हरिनाम घेतल्यास तुम्हास काही श्रम होतील का ? ३ साधुसताच्या वचनावर विश्वास ठेवाल तर तुमचे काय नुकसान होणार आहे ? ४ खरे बोलण्यास तुम्हास का येवढे कष्ट होतात ? त्यात काय तुम्हास खर्च येतो ? ५ तुकाराम महाराज म्हणतात, वर सांगितलेल्या नियमानी वागा, म्हणजे देव तुम्हास भेटेल, देव मिळवायला आणखी काही खटाटोप करण्याची जरूरी नाही ६

६२ शुद्ध बीजा पोटीं । फळें रसाळ गोमटीं ॥ १ ॥
मुखीं अमृताची वाणी । देह वेचावा[1] कारणी ॥ २ ॥
सर्वांगीं निर्मळ । चित्त जैसे गगाजळ ॥ ३ ॥
तुका म्हणे जाती । ताप दर्शने विश्राती ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – गोमटी–सुरेख चागली, ताप–त्राम

अर्थ – बीज शुद्ध असले म्हणजे त्यापासून फळेही रसदार, टवटवीत, व सुदर निर्माण होतात, १ मुखातून अमृताप्रमाणे मधुर शब्द बाहेर पडत आहे आणि देह देवाच्याच कारणी लागला आहे २ त्या पुरुषाचे सर्व अग निर्मळ असून त्याचे चित्त गगेप्रमाणे निर्मळ व पवित्र आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा पुरुषाच्या दर्शनाने सर्व त्रास दूर होतात व मनास एक प्रकारची विश्रांती मिळते ४

६३ चित्त समाधाने । तरी विष वाटे सोने ॥ १ ॥
बहु खोटा अतिशय । जाणा भले सागों काय ॥ २ ॥
मनाच्या तळमळें । चदनें ही अग पोळे ॥ ३ ॥
तुका म्हणे दुजा । उपचार पीडा पूजा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – अतिशय–अतिलोभ हावरेपणा

अर्थ – चित्त जर समाधानी नसेल तर सोन्यासारखे सुख विषाप्रमाणे वाटल १ कशाचीही अतिशय हाव खरी नव्हे हे तुम्हीच जाणावे मी काय तुम्हा भल्याना सागावे ? २ मन जर तळमळत असेल तर चदनाने अग थड न वाटता भाजूनच निघेल ३ तुकाराम महाराज म्हणतात अशा मनास दुसऱ्या रीत उपचाराची सोय केली तरी त्यास दु खच होते ४

६४ परिमळ म्हूण चोळूं नये फूल । खाऊं नये मूल आवडते ॥ १ ॥
काय एक नव्हे धरिता अतरीं । कासवीचे परी वेळोवेळा ॥ २ ॥
मोतियाचे पाणी चाखूं नये स्वाद । यत्र भेदुनि नाद पाहूं नये ॥ ३ ॥
कर्मफळ म्हणुनी इच्छूं नये काम । तुका म्हणे वर्म दावूं लोका ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – परिमल–सुवास म्हूण–म्हणून अतरीं–दूर अतरावर यत्र–गोड वाद्य

अर्थ – फुलास मधुर सुगध आहे म्हणून ते चोळून त्याचा एकदम सुगध वाढण्याचा प्रयत्न करू नये मूल आवडते झाले म्हणून ते खायचे का असते ? १ कासवीप्रमाणे दूर राहून पिलांचे पोषण करता येणार नाही काय ? २

[1] देवाच

चमकदार पाण्याचे मोती असेल त्याचा स्वाद पाजण्याचा वेडेपणा करू नये मधुर ध्वनी वाढणारे वाद्य असले तरी ते फोडून त्याचा नाद कधी पाहू नये ३ कर्म देणारी फळे असली तरी फळाची इच्छा धरून कर्मे करू नयेत असे वर्म तुकाराम महाराज लोकाना वाखवीत आहेत ४

६५ माया तेंचि ब्रह्म ब्रह्म तेंचि माया । अंग आणि छाया तया परी ॥ १ ॥
तोडिता न तुटे सारिता निराळी । लोटांगणातळीं हारपते ॥ २ ॥
दुजें नाहीं तेथें बळ कोणासाठीं । आणिक ते आटी विचाराची ॥ ३ ॥
तुका म्हणे उंच वाढे उंचपणे । ठेंगणी लवणे जैसीं तैसीं ॥ ४

शब्दार्थ व टीपा – हारपते–नाहीशी होते, लपते, आटी–खटपट, लवणें–वाकलो म्हणज

अर्थ –माया आणि ब्रह्म हे दोन नसून एकच आहेत माया तेच ब्रह्म व ब्रह्म तेच माया आहे जसे देह आणि त्याची छाया याचे ऐक्य असते तसेच ब्रह्म–माया याचेही ऐक्य आहे १ छाया कधी शस्त्राने तोडली तरी निराळी होत नाही, दूर सारली तरी नाहीशी होत नाही, आपण जमिनीवर लोटांगण घातल्यास ती वेगळी न राहता आपल्यातच नाहीशी होते इतकी ती आपल्या देहाशी एकजीव आहे २ ही छाया दुसऱ्या पणाने खरी नाही मग तिच्या स्वतंत्र सिद्धीसाठी बळ कशासाठी खर्च करायचे ? विचारांची खटपट तरी काय म्हणून करावी ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, ही छाया नेहमी आपणास अनुसरते आपण उंच झालो की ती उंच होते, आपण जर लवलो तर तीही तशीच लवून राहते देहापासून छाया जशी दूर या वेगळी नाही, तशीच अवस्था ब्रह्म व माया यांच्या संबधाने आहे ४

६६ दुर्जनासि करी साहे । तो ही लाहे दंड हे ॥ १ ॥
शिंदळीच्या कुंटणी वाटा । संग खोटा खोटयाचा ॥ २ ॥
येर येरा काचणी भेटे । आगी उठे तेथूनी ॥ ३ ॥
तुका म्हणे कापू नाके । पुढें आणिकें शिकविती ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – साहे–मदत लाहे–मिळविती दंड–शिक्षा, काचणी–घासण

अर्थ – वाईट लोकाना जे मदत करणारे आहेत त्यांनाही शिक्षाच व्हावयास हवी १ वाईट चालीच्या स्त्रीचा माग कुंटिणीचाच असतो खरे आहे, खोटयाना संगत खोट्याचीच लागते २ एका पदार्थाचे दुसऱ्यावर घर्षण झाले की त्यातून आग निर्माण व्हायचीच ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा दुर्जनाचे नाक कापून घ्यावे, कारण ते असाच दुराचार इतरानाही शिकवितात ४

६७ वृत्ति भूमि राज्य द्रव्य उपार्जिती । जाणा त्या निश्चितीं देव नाहीं ॥ १ ॥
भाडेकरी वाहे पाठीवरी भार। अतरींचे सार लाभ नाहीं ॥ २ ॥
देवपूजेवरी ठेवूनिया मन । पाषाणा पाषाण पूजी लोभें ॥ ३ ॥
तुका म्हणे फळ चिंतिती आदरें। लाघव हे चार शिंदळीचे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा –वृत्ति–निर्वाहाचे साधन, शेतवाडी उपार्जिती–मिळवतात अतरींचे–आतील सार–मुख्य वस्तू लाघव–मायावी प्रकार चार–वर्तन

अर्थ –निर्वाहाचे साधन म्हणून जे लोक भूमी, राज्य, द्रव्य याची प्राप्ती करून घेतात, त्याना देव निश्चित मिळत नाही असे समजा १ भाडेकरी आपल्या पाठीवर केवळ सामानाचे ओझेच वाहतो, त्या ओझ्यातील मुख्य वस्तू काही त्याला मिळत नाही २ एखाद्या विषयाचा लोभ मनात ठेवून जर एखादा देवपूजा करीत असेल तर तोही एका पाषाणापुढचा दुसरा पाषाणच होय ३ मोठ्या आदराने या प्रमाणे नाना वासना ठेवून लोक कर्मे करणारे असतात फलाची आशा ठेवून ज्याची कर्मे असतात त्याचे आचार व त्याचे सारे कौतुक, वेश्येप्रमाणेच या गोष्टी असतात ४

६८ पवित्र सोंवळीं । एक तींच भूमंडळीं ॥ १ ॥
ज्यांचा आवडता देव । अखंडित प्रेमभाव ॥ २ ॥
तींच भाग्यवंतें । सरतीं पुरतीं धनवित्तें ॥ ३ ॥
तुका म्हणे देवा । त्यांची केल्या पावे सेवा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :–भूमंडळीं–या जगतात, सरतीं पुरतीं–सपन्न, विपुल

अर्थ – जगात भक्त हेच अति पवित्र व सोवळे असतात. १ त्यांचा देव मोठा आवडता व प्रेमाचा असून त्याविषयी त्याच्या मनात अखड प्रेमभाव असतो. २ हे भक्त मोठे भाग्यवंत असून धनधान्य, संपत्ती यांची विपुलता त्याच्या घरी असते, म्हणजे या काळजीत ते कधी नसतात ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा संतांची सेवा केल्यास ती देवाला पोचते. ४

६९ आशाबद्ध जन । काय जाणे नारायण ॥ १ ॥
करी इंद्रियांची सेवा । पाहे आवडीचा हेवा ॥ २ ॥
भ्रमलें चावळे । तैसें उचित न कळे ॥ ३ ॥
तुका म्हणे विषें । अन्न नाशियेलें जैसें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :–भ्रमले–भ्रमलेले, चावळे–चावळलेले.

अर्थ :– आशाबद्ध लोक परमेश्वरास कसे जाणणार ? त्याना परमेश्वर कसा समजणार ? १ तो तर इंद्रियाच्या म्हणजे विषयसुखाच्या सेवेत तत्पर असतो, आवडीच्या विषयाचाच हेवा त्याला वाटत असतो २ भ्रमलेला, चावळलेला मनुष्य बोलतो तेव्हा त्यात उचित–अनुचित असे काहीच नसते, आशेने बद्ध असलेल्याची गत अशीच असते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, सुग्रास अन्नात विष कालविले म्हणजे जसे ते अन्न नासून जाते तसे आशाबद्ध माणसाचे आयुष्य व्यर्थ होते. ४

७० ढेकरें जेवण दिसे साचें । नाहीं तरि काचें कुंथाकुंथीं ॥ १ ॥
हेही बोल तेही बोल । कोरडे फोल रुचीविण ॥ २ ॥
गव्हांचिया होती परी । फके वरी खाऊं नये ॥ ३ ॥
तुका म्हणे असे हातींचें कांकण । तयासी दर्पण विल्हाळक ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :–साचे–खरोखर, काचे–कच्चे, खोटे, फोल–फुकट, परी–प्रकार, फकेवरी–फक्क्या मारून, बकाणे मारून, विल्हाळक–व्यर्थ

अर्थ – तृप्ती करणारे जेवण झाले आहे की नाही ते सहजच येणाऱ्या ढेकरीवरून समजते जेवण यथातथाच झाले तर बळेबळेच खोटी ढेकर ध्यानात येतेच. १ तृप्त होऊन ढेकर देणाऱ्याचेही बोलच; व उपाशी राहून खोटी ढेकर देण्याचेही बोलच. पण पहिल्याचे स्वानुभवी व खरे आहेत, दुसरे फोलकटाप्रमाणे व्यर्थ आहेत. २ गव्हाचे पुष्कळच निरनिराळे पदार्थ होतात म्हणून ते नुसतेच फाके अथवा बकाणे भरून खाऊ नयेत ३ तुकाराम महाराज म्हणतात, हातच्या कंकणाला आरसा घेणे व्यर्थच नव्हे काय ? ४

७१ करावी ते पूजा मनेंचि उत्तम । लौकिकाचें काम काय असे ॥ १ ॥
कळावें तयासि कळे अंतरींचें । कारण तें साचें साचा अंगीं ॥ २ ॥
अतिशया अंतीं लाभ किंवा घात । फळ देतें चित्त बीजा ऐसें ॥ ३ ॥
तुका म्हणे जेणें राहे समाधान । ऐसें तें भजन पार पावी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– लौकिक–बाह्य अवडबर, साच–खरा, अतिशया–अति हव्यास, लौकिकाची हाव

अर्थ – देवाची पूजा करायची असेल तर ती मनातल्या मनातच करावी हे उत्तम. येथे बाह्य अवडबराची काय जरूरी आहे ? १ अशी मानसिक पूजा ज्या ईश्वरास पोचावयास हवी, ज्यास समजावयास हवी त्यास ती बरोबर पोचते, समजते अत करणातील खरा भाव खरोखरीच उपयोगी पडतो २ बाह्य डामडौलाचा हव्यास फार धरला तर कधी लाभ व कधी हानीही होईल कारण ज्या जातीचे बीज चित्तात असेल त्याप्रमाणे त्याचे फळ मिळते आपल्या अत करणातील भावाप्रमाणे आपणास फलप्राप्ती होईल ३ तुकारामबुवा म्हणतात, ज्या भजनामुळे मनास खरे समाधान मिळते त्याच्या योगानेच ससारातून पैलतीराला जाण्याचे करावे ४

विवरण –मनात देवाविषयी प्रीती नसताना गध, धूप, दीप, फुले, आरती, नैवेद्य या बाह्य थाटान पूजा केली तरी देव प्रसन्न होणार नाही त्यास फक्त भक्ताच्या मनातील भाव दिसतो मानसिक पूजा तुकारामबुवाना यासाठी श्रेष्ठ वाटते मनन भगवताला अर्पण करून सर्व कर्मे करीत राहणे हीही एक प्रकारची पूजाच, आपले मन व त्याच्या सर्व वृत्ती हरिरूपच आहेत असे समजून वृथा बाह्य अवडबर माजवू नये कारण या बाह्य देखाव्याने ईश्वर सतुष्ट होत नाही त्यास आपल्या मनाची निर्मळता व समर्पित अवस्था याची गोडी असते '**मनीं भाव असे काहीं । तेथें देव येती पाही**' असे दुसऱ्या एका अभगात तुकाराम महाराजानी सागितले आहे आणखी एका अभगात त्यानी म्हटले आहे, '**मनोमयपूजा । हेंचि पढियें केशीराजा**' या पढरीरायाला भक्ताच्या अत करणातील प्रेम हवे त्याला गध, अक्षदा, सुवासिक पुष्प, भरजरी वस्त्रे, मौल्यवान अलकार याची जरूरी नसून भक्ताचे मनापासूनचे प्रेम तवढे हवे असते '**देव भावाचा भुकेला**' हेच खरे ज्ञानेश्वरीच्या नवव्या अध्यायात ज्ञानदेवानी भगवताच्या या आवडीचे मोठे रसाळ वर्णन केले आहे मनामधील नि सीम भावाने एखादे फळ, फूल, पान जरी अर्पण करणारा भक्त असला तरी परमेश्वर सतुष्ट होतो आणि यापैकी काहीच मिळाले नाही तर पाण्याचा थेंबसुद्धा पुरेसा होतो या भक्तीच्या प्रेमाचा देव भुकेलेला असतो 'आम्ही भावाचे पाहुणे' असे खुद्द भगवतानीच सागितले आहे मनानेच ईश्वराची पूजा कधी न जमली तर काय करावे याचेही सविस्तर वर्णन ज्ञानेश्वरानी बाराव्या अध्यायात केले आहे सर्व वृत्तीसह मन ईश्वराशी निगडित करणे हे प्रथम कठिण वाटते मग एखादे निमिष जरी ईश्वराच्या स्मरणात सर्व केले तरी चालेल, किंवा मनाने, वाणीने ज्या ज्या क्रिया होत आहेत त्या 'मी करतो आहे' असे असे मानू नये ज्याच्या स्फूर्तीने विश्वाचे चलनवलन होते, तेथे आपण कोण ? असाच भाव असावा बाह्य देखाव्याचा ईश्वराच्या भक्तीत काही उपयोग नसून स्वत च्या मानसिक वृत्तीच हरिरूप बनल्याची जाणीव करून घेणे हीच सर्वोत्तम पूजा होय

७२ एकादशीव्रत सोमवार न करिती । कोण त्याची गति होइल नेणों ॥ १ ॥
काय करूं बहु वाटे तळमळ । आधळीं सकळ बहिर्मुख ॥ २ ॥
हरिहरा नाहीं बोटसरी वाती । कोण त्याची गति होइल नेणों ॥ ३ ॥
तुका म्हणे नाहीं नारायणीं प्रीति । कोण त्याची गति होइल नेणो ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – गति–परिणाम अखेरी, बहिर्मुख–बाह्य उपचारावर लक्ष देणारे, वाती–वात, आरती

अर्थ – जे लोक एकादशी अथवा सोमवारचे व्रत करीत नाहीत त्याच्या आयुष्याची काय अखेरी होईल हे समजत नाही १ या सर्व लोकाकडे पाहून मनाची फार तळमळ होते, कारण सर्व माणसे आधळी आहेत बाह्य कर्मकाडावर त्याचा भर आहे त्यांची वृत्ती बहिर्मुख आहे २ विष्णू किंवा शकर याना बोटसर वातीनेही जे ओवाळीत नाहीत, आपले प्रेम व्यक्त करीत नाहीत त्याची गत काय होणार कुणास माहित ? ३ ईश्वरावर ज्याचे प्रेम नाही त्याचे आयुष्य सुखाचे कसे होणार याबद्दलची चिंता तुकाराम महाराजाना वाटते ४

विवरण – कोणत्या तरी दैवास भजा, त्याचे स्मरण करा म्हणजे तुमच्या जीवनाचे सार्थक होईल या उपदेशाबरोबरच आणखी एक महत्त्वाचा सिद्धान्त बुवानी या अभगात सागितला आहे बुवा भागवत सप्रदायातील, वारकरी पथातील त्याचे दैवत पढरपूरचे श्रीविठ्ठल हा विठ्ठल श्रीविष्णू किंवा श्रीकृष्ण होय एकादशीचे व्रत हे या

पथात प्रमुख; पण तुकाराम महाराज या ठिकाणी सोमवारही करायला सागतात, यातले रहस्य काय? कोणत्याही देवाची पूजा करा, स्मरण करा, स्तवन करा. ते एकाच परमेश्वराला पोचते अशी आपली परपरा आहे. शिव, विष्णू ही नावे दोन पण दैवत एकच अशीच वारकरी पथाची धारणा आहे. पढरपूरचा श्रीविठ्ठल हा शिवाशी सबधित आहेच. त्याच्या डोक्यावर शिवलिंग आहे. ' विठोनें शिरीं वाहिला देव राणा ' म्हणून समर्थ रामदासानी विठ्ठलाचे स्तवन केले आहे. हरिहराचे ऐक्य हे वारकरी पथाचे एक महत्त्वाचे ऐतिहासिक कार्य मानावे लागेल. दैवतावरून मतभेद व भाडण या बाबी वारकरी पथात दिसत नाहीत मुख्य भर विठ्ठलावर असला तरी तोही शिवस्वरूपच सतानी मानला आहे हरिहरात केवळ एका वेलांटीचा फरक आहे असे एके ठिकाणी बुवानी म्हटले आहे. विष्णू व शिव, हरि व हर याच्यात वरवरचा भेद असला तरी 'मज उभयरूपीं एक ' असे तुकारामानी सागितले आहे. 'हरिहरां भेद । नाहीं करूं वाद । एक एकाचे हृदयीं । गोडी साखरेच्या ठायीं ' अशी मोठी गोड अनुभूती तुकारामानी वर्णन केली आहे आणि म्हणून हरीला किंवा हरला, कुणाला का होईना पण वात लावा, त्याचे स्मरण करा असे बुवा आग्रहाने सागत आहेत तुकोबाच्या घरी कुलदैवत म्हणून शिवाचीही उपासना होतीच हरिहरेश्वराचे देऊळ अद्यापही त्याच्या जागेत आहे ( अभग क्र. १२४ वरील अधिक विवरण पाहावे )

७३ नव्हे आराणूक संवसारा हातीं । सर्वकाळ चित्तीं हाचि धंदा ॥ १ ॥
देवधर्म सांदीं पडिला सकळ । विषयीं गोंधळ गाजतसे ॥ २ ॥
रात्रि दीस न पुरे कुटुंबाचें समाधान । दुर्लभ दर्शन ईश्वराचें ॥ ३ ॥
तुका म्हणे आत्महत्या रे घातकी । थोर होते चुकी नारायणीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:– आराणूक– शाती, समाधान, सुख, सांदीं– कोपऱ्यात

अर्थ.– केवळ संसार करणाऱ्या प्रापंचिकास कधीही समाधान मिळणार नाही; कारण त्याच्या चित्तात नेहमी धंदा, व्यवसाय याचाच ध्यास असतो. त्यास शांती कुठली ? १ अशा रीतीने सर्व चित्तच संसारात व्यग्र झाल्यावर मग देवधर्म सादीकोपऱ्यात पडतात, त्यांची आठवणही कुणास होत नाही, कारण एकसारखे विविध विषयाचे चिंतन व त्याचाच गोंधळ मनात गाजत असतो. २ आणि कुटुंबातील प्रिय व्यक्तींचे समाधान रात्रंदिवस कितीही केले तरी ते पुरे पडत नाहीं; पण त्यामुळे मात्र ईश्वराकडे दुर्लक्ष होऊन त्याचे दर्शन घेणेही दुर्लभ होऊन जाते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, असे ससारग्रस्त लोक आत्मघातकीच असतात. नारायणाच्या ठिकाणी ऱ्यांचे चित्त लागत नाही ही त्यांची मोठी चूक होत आहे. ४

७४ स्मशान ते भूमि प्रेतरूप जन । सेवाभक्तिहीन ग्रामवासी ॥ १ ॥
भरतील पोट श्वानाचिया परी । वस्ति दिली घरीं यमदूतां ॥ २ ॥
अपूज्य लिंग तेथें अतित न घे थारा । ऐसी वस्ती चोरां कंटकांची ॥ ३ ॥
तुका म्हणे नाहीं ठावी स्थिति मती । यमाची निश्चिती कुळवाडी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:– ग्रामवासी– गावचे लोक, श्वान– कुत्रे, लिंग– शिव, अतित– अतिथी, थारा– विश्रांती कंटक– दुसऱ्याना त्रास देणारे लोक, कुळवाडी– वतनदारी

अर्थ – ज्या गावचे लोक परमेश्वराची सेवा व भक्ती करीत नाहीत ते गाव व त्याच्या भोवतीची जागा स्मशानासारखी समजावी व त्या गावातील माणसे जिवंत असली तरी प्रेतरूप मानावीत. १ कसला तरी धंदा करून कुत्र्याप्रमाणे ते पोट भरतात एवढेच, पण त्याच्या घरी यमदूतांची वस्ती असते. मृत्यूच्या पथाराच त्यांचे वागणे लागलेले असते. २ जेथे लिंगाची म्हणजे ईश्वराची पूजा होत नाही, तेथे अतिथीही आश्रयास, विश्रांतीस थाबत नाही या गावात वस्ती फक्त चोरांची व समाजकंटकाचीच असते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, ज्यांच्या बुद्धीला आपण कोण, आपली स्थिती काय याविषयी काहीच जाणीव नाही तेथे निश्चितपणे यमाची वतनदारी सुरू झालेली असते. ४

७५ आहाकटा त्याचे करिती पितर । वर्शी दुराचार पुत्र जाला ॥ १ ॥
गळोंचि ना गर्भ नव्हेचि का वाज । माता त्याची लाजलावा पापी ॥ २ ॥
परपीडे परद्वारीं सावधान । सादरचि मन अभाग्याचे ॥ ३ ॥
न मिळता निंदा चाहडी उपवास । सग्रहावे दोष सकळ ही ॥ ४ ॥
परउपकार पुण्य त्या वावडें । विषाचे ते कोडें दुग्धीं मरे ॥ ५ ॥
तुका म्हणे विटाळाचीच तो मूर्ति । दया क्षमा शांति नातळे त्या ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – आहाकटा– अरे देवा असे दुःखाचे शब्द दुराचार–वाईट चालीरीतीचा, लाजलावा–वसाला काळिमा लावणारा, सादर–उत्सुक, वावडें–सहन न होण्याजोगा, नातळे–शिवत नाहीत

अर्थ – आपल्या कुळातील पुत्र वाईट रीतीचा निघाला आहे असे पाहून स्वर्गातील त्याचे पितरही 'हाय रे देवा' म्हणून शोक करतात १ कुळाला लाज लावणारा, काळिमा लावणारा मुलगा प्रसवून, पापी मुलास जन्म देऊन कष्टी झालेली माता पाहून लोक म्हणतात, ही वाझ का नाही राहिली ? किंवा हिचा गर्भच गळून का नाही गेला ? २ या अभागी मुलाचे मन नेहमी दुसऱ्यास पीडा देण्यासाठी व दुसऱ्याच्या स्त्रीविषयी उत्सुक असते ३ कुणाची निंदा किंवा चहाडी करायवास एखाद्या दिवशी वास मिळाली नाही तर त्यास उपवास घडल्याइतके दुःख होते सगळ्या दोषाचा सग्रह करावा अशी त्याची बुद्धी असते ४ दुसऱ्यावर उपकार करावा अथवा काही पुण्य करावे हे त्याला सहनच होत नाही, विषावर जगणारे किडेच ते त्याना गोड दुधात टाकल्यास ते मरणारच त्याना विषच बरे वाटते ५ तुकाराम महाराज म्हणतात, तो केवळ विटाळाचीच, अमगलाचीच मूर्ती असतो त्याच्या चित्तास दया, क्षमा, शाती हे गुण स्पर्शं देखील करणार नाहीत ६

७६ श्वान शीघ्रकोपी । आपणा घातकर पापी ॥ १ ॥
नाहीं भीड आणि धीर । उपदेश जिरे क्षीर ॥ २ ॥
माणसासि भुंके । विजातीने घावे थुंके ॥ ३ ॥
तुका म्हणे चित्त । मळिण करा तें फजित ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – श्वान–कुत्रे शीघ्रकोपी–लौकर सतापणारा, घातकर–घात करणारा, विजातीने–हलक्या जातीच्या लोकानी

अर्थ – लौकर सतापणारा मनुष्य म्हणजे एक प्रकारचा कुत्राच आपला आपणच तो घात करतो १ तो कुणाची भीड धरत नाही, त्याला कसला धीरही नसतो उपदेशरूपी दूधही त्याला कधी पचत नाही २ दुसऱ्या माणसावर तो नेहमी भुकत असतो, इतर हलक्या लोकानीही त्याच्यावर थुकावे अशी मग परिस्थिती निर्माण होते ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा माणसाचे चित्त हे पापी असते, त्याची पुरती फजिती करावी ४

७७ देखोनि हरखली अड । पुत्र जाला म्हणे राड ॥
तव तो जाला भाड । चाहाड चोर शिंदळ ॥ १ ॥
जाय तिकडे पीडी लोकां । जोडी भाडवल थुंका ॥
पोर जाला चुका । वर का नाहीं घातली ॥ २ ॥
भूमि कांपे त्याच्या भारें । कुंभपाकाचीं शरीरें ॥
निष्ठुर उत्तरें । पापदृष्टी मळिणचित्त ॥ ३ ॥
दुराचारी तो चांडाळ । पाप सागातें विटाळ ॥
तुका म्हणे खळ । म्हणोनिया निषिद्ध तो ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – हरखली–संतुष्ट झाली अड–पुरुषत्व बाधक चिन्ह भाड–भाडखोर, कुंभपाक–एक प्रकारचा नरक

अर्थ – पुत्रप्राप्तीस हपापलेल्या एका स्त्रीस बऱ्याच दिवसांनी पुत्र झाला, पण तो दुराचारी निघाला काय त्याचा उपयोग ? या पार्श्वभूमीवर तुकाराम महाराज म्हणत आहेत, बाळंत झाल्यावर मोठ्या उत्सुकतेने कोण्या एका स्त्रीने आपणास मुलगा झाला हे पाहताच मोठा आनंद व्यक्त केला, पण पुढे हा पोरगा तर मोठाच भाडखोर व चोर निघाला चहाडखोरी करु लागला वाईट चालीचा निघाला काय त्याचा उपयोग ? १ त्याने जिकडे पाहिले तिकडे लोकाना पीडाच निर्माण झाली त्यामुळे लोक तिरस्काराने त्याच्यावर थुकले, हेच त्याचे एकमेव भांडवल जमा झाले या आईच्या हातून मोठीच चूक झाली जन्मतःच तिने यास नष्ट का नाही केले ? २ या दुष्ट मुलाच्या भाराने भूमी थरथरा कापायला लागते याचे शरीर म्हणजे कुंभपाक नरकाचे ठिकाणच होय हा नेहमी निष्ठुर उत्तरानी बोलत असतो, याची दृष्टी पापी असून चित्तही नेहमी मलीन असते ३ हा चांडाळ दुराचारी असतो, याच्या बरोबर पापाचा विटाळ असतो तुकाराम महाराज म्हणतात, हा दुष्टच असतो याचा सदैव निषेधच करावा ४

७८ नेणें गाणे कंठ नाहीं हा सुस्वर । घालूं तुज भार पांडुरंगा ॥ १ ॥
नेणे राग वेळ काळ घात मात ॥ तुझे पायीं चित्त ठेवीं देवा ॥ २ ॥
तुका म्हणे मज चाड नाहीं जना ॥ तुज नारायणा वांचूनिया ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा – कंठ–गळा चाड–पर्वा, मात मात–ताल, लय वगैरे

अर्थ – देवा, मला गायनाचे शास्त्र माहित नाही, मला चागला गळा नाही, मला नीट गाता येत नाही, माझा आवाज गोड नाही पण पाडुरंगा, माझा सब भार तुझ्यावर आहे १ मला संगीतामधील राग माहित नाहीत, निरनिराळ्या वेळांच्या घात-मातांच्या रीतीही मला माहित नाहीत, पण देवा, तुझ्या पायांवर मात्र माझे चित्त सदोदित असते २ तुकाराम महाराज म्हणतात की मला लोकांची काही पर्वा नाही नारायणा, तुझ्यावाचून या लोकांचा काय उपयोग आहे ? ३

७९ माझी पाठ करा कवी । उट लावी दारोदार ॥ १ ॥
तव तया पारखी सिव । लाजे ठाव साडिता ॥ २ ॥
उष्टावळी करूनि जमा । मुंथुनि प्रेमा आणितसे ॥ ३ ॥
तुका म्हणे बाहेरमुदी । आहाच गोविंदीं न सरती ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – उट–कटकट पारखा–परीक्षा करते, सिव–सीमा ठाव–मूळचे ठिकाण बाहेरमुदी–बाह्यमुद्रा वरवरच ढोंग आहाच–व्यर्थ न सरती–पोचती होत नाही

अर्थ – सर्व सामान्य कवी असतात ते 'माझी कविता वाचा, पाठ करा' अशी एकसारखी कटकट लोकांच्या पाठीमागे लावतात १ पण त्यांची परीक्षा स्वतःच्या गावच्या सीमेवर जाताच होते, व मग आपले स्थान सोडताच त्यानाच लाजल्यासारखे होते २ कारण मागच्या काही कवींच्या काव्यातील शब्द उसने आणून वृथा कष्टाने प्रेम व्यक्त करण्याचा त्यांचा प्रयत्न असतो ३ तुकाराम महाराज म्हणतात, यांचे बाहेरचेच ढोंग तेवढे पाहून घ्यावे ते व्यर्थ असते कारण ईश्वराच्या ठिकाणी ते कवित्व कधीच पोचत नसते ४

८० उपाधीच्या नावे घेतला सिंतोडा । नेदूं आता पीडा आतळों ते ॥ १ ॥
पाशासाठीं हात भरूनि धुवावे । । चालतिया गोवे मारगासि ॥ २ ॥
काय नाहीं देवे करूनि ठेविले । असे तें आपुले ते ते ठायीं ॥ ३ ॥
तुका म्हणे जेव्हा गेला अहंकार । तेव्हा आपपर बोळविले ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – उपाधी–बाह्य बंधने, शिंतोडा घेणे–शुद्ध होणे, नेदूं–न देऊ, आतळणे–शिवू देणे, गोवे–अडथळे आपपर–मी-तू असा भाव बोळविले–निरोप दिला घालविले

अर्थ – शरीराचे विषय, प्रपंचातील सुखदु खे इत्यादी बाह्य बंधनातून मी गोमूत्राचा शितोडा घेऊन शुद्ध झालो आहे. आता पुन. तो पीडा मला शिवणार देखील नाही. १ एखाद्या घाणेरड्या थारोळ्यात हात भरवा व मग तो धुवा हे कशाला हवे ? चालत्या मार्गात अडथळे कशासाठी ? २ परमेश्वराने आपल्यासाठी काय करायचे बाकी ठेविले आहे ? त्याने जे जे निर्माण केले ते आपल्यासाठीच नाही का ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, बाह्य उपाधींचा अहंकार एकदा गेला म्हणजे मग मी-तू असा द्वैतावरचा भाव नाहीसा होतो. दुजेपणा उरत नाही. ४

८१ योगाचें तें भाग्य क्षमा । आधीं दमा इंद्रियें ॥ १ ॥
अवघीं भाग्यें येती घरा । देव सोयरा जालिया ॥ २ ॥
मिरासीचें म्हूण सेत । नाहीं देत पीक उगें ॥ ३ ॥
तुका म्हणे उचित जाणा । उगीं सिणा काशाला ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– दमा–दमन करा, ताब्यात ठेवा, सोयरा–आप्त, मिरासी–परंपरागत हक्क, सेत–शेत, सिणा–श्रम करा

अर्थ – क्षमा हे योगाचे खरे सौभाग्य असून आधी इंद्रियांचे दमन करावे, त्याना ताब्यात ठेवण्याचा प्रयत्न करावा १ एकदा देवाशी सख्यत्व जडले, तो सोयरा झाला म्हणजे मग सर्व भाग्याच्या गोष्टी आपल्या घरात येतील २ शेत आपल्या वंशपरंपरागत हक्काचे असले तरी काही श्रम न करता काही पीक हाती येत नाही. ३ हे तुम्ही उचित असे जाणून परमेश्वरासाठी इंद्रियदमनाचे तप करा; उगाच इतर व्यर्थ असे प्रयत्न मात्र करून शिणू नका असे तुकाराम महाराज म्हणतात ४

८२ न ये नेत्रां जळ । नाहीं अंतरीं कळवळ ॥ १ ॥
तो हे चावटीचे बोल । जन रंजवणें फोल ॥ २ ॥
न फळे उत्तर । नाहीं स्वामी जों सादर ॥ ३ ॥
तुका म्हणे भेटी । जंव नाहीं दृष्टादृष्टी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– चावटी–उगाच बडबड, फोल–फुकट, सादर–तत्पर, स्वाधीन

अर्थ .– डोळ्यात पाण्याचा एक थेंबही नाही आणि मनात ईश्वराविषयी प्रेम नाही १ तोपर्यंत त्याचे बोल उगाच व्यर्थच आहेत. केवळ लोकाना रंजविण्यासाठी केलेली ती वायफळ बडबडच म्हणावी लागेल २ जोपर्यंत आपला स्वामी, परमेश्वर आपल्या स्वाधीन झाला नाही, त्याची कृपा झाली नाही तोपर्यंत आपल्या बोलाना अपेक्षित असे फळ मिळत नाही ३ दृष्टादृष्ट होऊन एकमेकाकडे पाहणे होऊन जोपर्यंत भेट झाली नाही तोपर्यंत नुसत्या वचनात कोणतेच इष्ट असे फळ येणार नाही ४

८३ बाईल सवासिण आई ॥ आपण पितराचे ठायीं ॥ १ ॥
थोर वेच जाला नष्टा । अवघ्या अपसव्य चेष्टा ॥ २ ॥
विषयांचे चरवणीं[1] । केली आयुष्याची गाळणी ॥ ३ ॥
तुका म्हणे लंडा । नाहीं दया देव धोंडा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– वेच–खर्च, अपसव्य–उलटी क्रिया, चरवणीं–भोगात, गाळणी करणे–व्यर्थ घालविणे, गमविणे, लंडा–धर्मभ्रष्टास

अर्थ – धर्मशास्त्रविरहित वागणाऱ्या एका बेताल माणसाचे वर्णन बुवा येथे करीत आहेत. आपल्या आईबापाच्या श्राद्धाच्या दिवशी याने ब्राह्मण सुवासिनी जेवण्यास बोलावण्याऐवजी आपली बायकोच सवाष्ण आईच्या जागी व आपण ब्राह्मण वडिलाच्या जागी असा व्यवहार केला १ अरे दुष्ट माणसा, या धर्मबाह्य कृत्यामुळे तुझे फारच नुकसान झाले आहे, कारण या सर्व गोष्टी धर्माच्या उलट झाल्या आहेत धर्मशास्त्राच्या विपरीत हो तुझी

१ चरणी

करणी आहे २ तू तुझ्या आयुष्याची अखेर व्यर्थपणे विषयाच्या भोगातच केली आहेस ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा धर्मभ्रष्टाला कसलीही दयामाया उरत नाही या अधमाला देव आणि धोंडा सारखाच वाटतो ४

८४ दानें कापे हात । नावडे तेविशीं मात ॥ १ ॥
कथी चावटीचे बोल । हिंग क्षीरीं मिथ्या फोल ॥ २ ॥
न वजती पाय । तीर्था म्हणे वेचू काय ॥ ३ ॥
तुका म्हणे मनीं नाहीं । न ये आकारातें काहीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – नावडे–आवडत नाही, ते विशी–त्याबद्दल मात–गोष्ट चावटीचे–उगाच बडबडीचे मिथ्या–व्यर्थ, नवजती–वळत नाही वेचू–खर्च करू

अर्थ – दान देताना त्याचा हात थरथर कापतो, मनातून त्याला दान द्यायला नकोच असते, दानाविषयी कुणी गोष्ट काढली तरी ती त्याला आवडत नाही १ दुधात हिंगाचा खडा टाकल्यावर जशी स्थिती होते तसेच याच्या व्यर्थ बडबडीमुळे होते याचे सर्व बोल फुकट असतात २ तीर्थयात्रेसाठी याची पावले वळत नाहीत तो म्हणतो तेथे जाऊन खर्च कसा करू ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, याच्या मनातच नाही तर ते आचरणात कसे दिसणार ? ४

८५ वळिते जें गाई । त्यासि फार लागे काई ॥ १ ॥
निवे भावाच्या उत्तरीं । भलते एके धणी वरी ॥ २ ॥
न लगती प्रकार । काहीं मानाचा आदर ॥ ३ ॥
साडी थोरपणा । तुका म्हणे सवे दीना ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – निवे–संतुष्ट होते धणी–समाधान सांडी–सोडून देता

अर्थ – केवळ गाई वळण्याच्या रूपाने प्रकट झालेल्या श्रीकृष्णास संतुष्ट करण्यास फार लागत नाही १ केवळ भक्तिप्रेमाचा मनापासूनचा एखादा उदगारही त्याला पुरा होतो त्यावर तो संतुष्ट होतो कुणाच्याही या प्रेमाने तो तृप्त होतो, समाधान पावतो २ त्याला प्रसन्न करून घेण्यासाठी जपजाप्य, यज्ञयाग वगैरे प्रकट काही करावे लागत नाही, काही मानाचे, आदर दर्शविण्याचे इतर उद्योगही करण्याची जरूरी नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, प्रेमभावाने भजणाऱ्या या दीनासाठी आपले मोठेपण सोडून देवही त्याच्याशी सख्यत्व पत्करतात, त्याच्यावर कृपा करतात ४

८६ मैत्र केले महा बळी । कामा न येती अंतकाळीं ॥ १ ॥
आधी घे रे रामनाम । सामा भरी हा उत्तम ॥ २ ॥
नाहीं तरी यम । दात खातो करकरा ॥ ३ ॥
धन मेळविलें कोडी । काळ घेतल्या न सोडी ॥ ४ ॥
कामा न ये हा परिवार । सैन्य लोक बहु फार ॥ ५ ॥
तववरि मिरविसी बळ । जंव आला नाहीं काळ ॥ ६ ॥
तुका म्हणे बापा । चुकवीं चौऱ्यांशींच्या खेपा ॥ ७ ॥

शब्दार्थ व टीपा – मैत्र–मित्र, सामा–सामान कोडी–कोटीच

अर्थ – आयुष्याचे कल्याण व्हावे म्हणून प्रापंचिकास उपदेश करताना बुवा म्हणतात, अनेक मोठमोठे मित्र जरी तू जमविलेस तरी शेवटी अंतकाळी त्याचा काही उपयोग होत नाही १ म्हणून तू आधी रामनाम घे परमेश्वराच्या नामस्मरणाच्या सामानाचे भांडवल जपून ठेवावेस हे उत्तम २ नाहीतर यम तुझ्यावर क्रुद्ध होऊन कराकरा दात खाईलच ३ कोट्यावधी रुपयाचे धन जरी तू मिळविलेस तरी ते यम घेतल्याखेरीज सोडणार

नाही म्हणजे ते धन तुला सोडावेच लागेल ४ बलवान मित्र, बाप, बहीण, आई, पत्नी हे बांधव व आप्त यांचे सैन्य जरी मोठे असले तरी त्याचा काहीच उपयोग शेवटी होणार नाही ५ कारण तुझी ही शक्ती जोपर्यंत प्रत्यक्ष काळ जवळ आलेला नाही तोपर्यंतच तू मिरवशील ६ म्हणून तुकाराम महाराज म्हणतात, बाबा हा काळ जवळ नाही तोपर्यंतच तू काही करून जन्ममृत्यूच्या चौऱ्याशी लक्ष योनींच्या फेऱ्या चुकीव

८७ कानडीनें केला मऱ्हाटा भ्रतार । एकाचे उत्तर एका न ये ॥ १ ॥
तैसे मज नको करूं कमळापति । देईं या संगति सज्जनाची ॥ २ ॥
तिने पाचारिले इल बा म्हणोन । येरु पळे आण जाली आता ॥ ३ ॥
तुका म्हणे येर येरा जें विच्छिन्न । तेथें वाढे शीण सुख पोटीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – कानडीने–कर्नाटकातील कानडी बोलणाऱ्या स्त्रीने पाचारिले–बोलाविले इलबा–इकडे या, येरु–हा नवरा आण–शपथ, येर येरा–एकमेकात विच्छिन्न–विसगत

अर्थ – आपणास संताची संगत हवी इतर कुणाची भलत्याची मिळाल्यास कसा शीण होतो ते या अभंगात बुवानी एक मोठ्या गमतीचे विनोदी उदाहरण घेऊन सिद्ध केले आहे एकदा एका कानडी भाषाच जाणणाऱ्या स्त्रीने मराठी बोलणाऱ्या माणसाशी लग्न केले पण संसार सुरू झाल्यावर एकाचे बोलणे दुसऱ्यास समजेना असा प्रसंग आला हे कमलापती विष्णू, मला मात्र तशी अवस्था देऊ नकोस, मला संताचीच संगत हवी २ नाही तर काय होईल पाहा, त्या कानडी बाईने 'इलबा-इकडे या' म्हणून नवऱ्याला बोलविले, पण नवऱ्याला वाटले हिने आपणास 'बा' बाप म्हणून भलतीच शपथ घेतली त्यामुळे तो पळून जाऊ लागला ३ तुकाराममहाराज म्हणतात एकमेकास जे विसंगत असते त्यापासून सुख होण्याऐवजी दुःखच मोठे होते ४

८८ सुख पाहता जवापाडें । दुःख पर्वता एवढें ॥ १ ॥
धरीं धरीं आठवण । मानीं संताचे वचन ॥ २ ॥
नेलें रात्रीने तें अर्धे । बाळपण जराव्याधें ॥ ३ ॥
तुका म्हणे पुढा । घाणा जुती जसी मूढा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – जवापाडें–जवा एवढे अल्प जराव्याधें–म्हातारपण व रोग यानी, पुढा–पुढील जन्मी

अर्थ – या संसारात माणसास सुख जवाएवढे सुद्धा लाभत नाही उलट दुःख मात्र पर्वताएवढे अनुभवास येते १ याची आठवण धरून मना, तू संताच्या उपदेशाप्रमाणे वाग २ कारण तुझे आयुष्य पाहा कसे चालले आहे निम्मे रात्रीच्या झोपेतच गेले काही बाळपणात गेले, काही म्हातारपणात व नाना रोगांच्या व्याधींत जाईल ३ आणि संतवचनाच्या साह्याने काही आताच उपाय न करील तर पुढील जन्मीही तू असाच घाण्याला जुपला जाशील ४

विवरण – तुकाराम महाराजाचा हा एक छोटा परंतु सर्वप्रसिद्ध असा अभंग असून यात मानवी समाधान चित्र संक्षेपाने पण यथार्थतेने रेखाटले आहे या संसाराचा एकंदर अनुभव काय आहे? हा संसार दुःखमय की सुखमय? संताचे उत्तर यास असे आहे की ईश्वरकृपा झाल्यास सर्वच सुखमय होऊन जाते, मग दुःखेही सुखरूप वाटतात परंतु ही अवस्था सहजासहजी सर्वसामान्य माणसाच्या ठिकाणी येत नाही तो संसारातील बाह्य वस्तूतच सुख शोधतो द्रव्य, मान, कांता, घर जमीन लौकिक यांच्या वाढीने सुख वाढेल अशी त्याची कल्पना असते पण ईश्वरी कृपेशिवाय हे सर्व व्यर्थ आहे असाच त्याचा अनुभव असतो सर्व बाह्य लौकिकाच्या वाढीबरोबरही ईश्वराशिवाय सुख हे जवाएवढे सुद्धा न दिसता दुःख मात्र पर्वताएवढे अनुभवास येते कारण या लौकिक गोष्टींच्या वाढीनेच सारे आयुष्य खर्च होते ईश्वराकडे पाहण्यास वा त्याचे स्मरण करण्यास कुणास वेळ आहे?

मुळात सुखदुःखाची कल्पनाच मुळात चुकलेली असते सुख म्हणजे काय? दुःख म्हणजे काय? आपल्या शास्त्रकारानी शास्त्रीय व तात्त्विक पद्धतीने विचार केलेला आहे 'जे केवळ बुद्धीनेच ग्राह्य असते व जे इंद्रियानीन असते तेच आत्यंतिक सुख होय' (सुखमात्यंतिक यत्तद्बुद्धिग्राह्यमतीन्द्रियम् ६ २१) असा निर्णय भगवद्गीतेनेच

दिला आहे सर्वांची प्रवृत्ती सुखासाठी असते हे स्पष्ट आहे पण सुख म्हणजे काय ? जे आपणास इष्ट वाटते ते सुख व ज्याचा द्वेष वाटतो ते दुःख ' ( यदिष्ट तत्सुख प्राहु द्वेष्य दुःखमिहेष्यते ) अशी सुटसुटीत व्याख्या महाभारतकारानी केली आहे, परतु येथेही इष्ट कशास म्हणावे, अनिष्ट कशास म्हणावे असा प्रश्न निर्माण होतोच नैयायिकानी 'अनुकूलवेदनीय सुखम्' 'प्रतिकूलवेदनीय दुःखम्' अनुकूल वेदना सुख व प्रतिकूल दुःख अशी परिभाषा वापरली आहे

परतु प्रतिकूल वेदना घालवून अनुकूल वेदना कशी मिळवावी हेच भक्तिमार्गाचे मुख्य रहस्य आहे ससार मुळचाच दुःखमय असला तरी प्रभुकृपेच्या साह्याने त्याचे गाढ रूप आनदमय व सुखमय कसे करायचे हे सतपुरुष शिकवितात या ससारात सुखाचा विचार करवर तर कुठेच नाही 'सुख नाहीं कोठें आलिया ससारीं' असाच अनुभव तुकारामबुवा इतरनही सागतात मग हे सुख आहे तरी कोठे ? तुकारामानी याचे उत्तर दिले आहे, 'सुख पंढरियें आलें । पुडलिकें साठविलें,' 'सुख या सतसमागमें । नित्य दुणावे तुकिया नामें', 'सुखरूप ऐसें कोण दुजें सागा । माझ्या या पांडुरगासारिखें,' । 'सुख वाटे तुझे वर्णिता पवाडे,' 'सुख वाटे मांचि ठायीं । बहु पायीं सताचे', 'हेचि सर्वसुख जपावा विठ्ठल' अशा अनेक वचनातून श्रीविठ्ठल व त्याचे सत सज्जन याच्याशिवाय दुसरीकडे सुख कधीच मिळणार नाही असे तुकाराम महाराजानी स्पष्ट केले आहे ज्ञानेश्वरानीसुद्धा 'सर्व सुखाचें आगर । बापरखुमादेवीवर' असेच म्हटले आहे

तेव्हा हे अलौकिक व शाश्वतच सुख मिळविण्यासाठी सताची सगती हवी आणि ही केव्हा तरी वय झाल्यावर करावी असे नव्हे ईश्वराची भक्ती व सतसगत याची जरूरी सुरुवातीपासूनच आहे कारण आपले आयुष्य नकळत कमी होत असते, आणि पुढे पुढे इद्रियाची कार्यशक्तीही मदावते आपल्या आयुष्याचा सहसा लक्षात न येणारा हिशेब बुवानी या अभगात दिला आहे माणसास शभर वर्षे आयुष्य मानले तर त्यातली निम्मी वर्षे रात्रीच्या झोपण्यात जातात व बाळपण तारुण्य, जराव्याधी व्यसने यातही वरीच वर्षे जातात या सर्व गोष्टींचा विचार करून आपण सावध असावयास हवे मानवी आयुष्याचा असा हिशेब आपल्या प्राचीन ग्रथातून अनेक ठिकाणी केलेला आहे भर्तृहरीने या आयुष्याचा हिशेब देताना सुख वाटून व कसे मिळणार असाच प्रश्न विचारला आहे

> आयुर्वर्षशत नृणा परिमित, रात्रौ तदर्धं गत ।
> तस्यार्धस्य परस्य चार्धमपर बालत्ववृद्धत्वयो ॥
> शेष व्याधि-वियोग-दुःखसहित सेवादिभिर्नीयते ।
> जीवे वारितरङ्गबुद्बुदसमे सौख्य कुत प्राणिनाम् ॥

माणसास आयुष्य शभर वर्षाचे मानले तरी त्यातले अर्धे रात्रीच्या झोपेत जाते उरलेल्या अर्ध्यातले बालपण, वार्धक्य यात व मग जे उरले ते सेवा, रोग, वियोग, दुःख यात नष्ट व्हायचे हे जीवनच मुळी पाण्यावरील बुडबुड्याप्रमाणे असल्यामुळे माणसास सुख कुठले ? सतानी मात्र या प्रश्नाचे उत्तर वरीलप्रमाणे दिले आहे

**८९　बोलायाचा त्यासीं । नको सबध मानसीं ॥ १ ॥**
**जया घडली सतनिंदा । तुज विसरूनि गोविंदा ॥ २ ॥**
**जळो त्याचें तोंड । नको दृष्टीपुढें भाड ॥ ३ ॥**
**तुका म्हणे देवा । तया दुरी मज ठेवा ॥ ४ ॥**

शब्दार्थ व टीपा – भाड–भाडखोर, बडबड्या

अर्थ – ईश्वरा, जे दुर्जन आहेत त्यांच्याशी बोलण्याचाही प्रसग मजवर येऊ नये १ तुला विसरून सत निंदा करतात त्याची सगत नको २ अशा दुष्टाचे तोंड जळून जावे त्या भांडखोर व बडबड्या माणसाचे नावही दृष्टीसमोर नको ३ तुकाराम महाराज म्हणतात, ईश्वरा, अशा माणसापासून मला दूर ठेव ४

९० तीळ जाळिले तांदुळ । काम क्रोध तैसेचि खळ ॥ १ ॥
का रे सिणलासी वाउगा । न भजता पाडुरंगा ॥ २ ॥
मानदंभासाठीं[1] । केली अक्षराची आटी ॥ ३ ॥
तप करूनि तीर्थाटन । वाढविला अभिमान ॥ ४ ॥
वाटिलें तें धन । केली अहंता जतन ॥ ५ ॥
तुका म्हणे चुकले वर्म । केला अवघाचि अधर्म ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीप :– खळ–दुष्ट, वाउगा–व्यर्थ, आटी–सायास, वर्म–मुख्य मार्ग

अर्थ :– वरवर कर्मे करणाऱ्या पण अतरंगात ईश्वरप्रेम नसणाऱ्याना उद्देशून बुवा म्हणतात, मोठमोठे यज्ञयाग करून अग्नीत तीळ व तादूळ याच्या आहुती दिल्या, त्याचा काय उपयोग ? काम, क्रोध हे दुष्ट विकार असेच्या तसेच राहिले ना ! १ पाडुरगाला न भजता उगाच श्रम व्यर्थ का करता ? २ केवळ मानसन्मान मिळावा, कीर्ती वाढावी म्हणूनच ना अक्षराची घोकपट्टी केली, पाडित्याचा बडेजाव माजविला ? ३ तपश्चर्या केली, तीर्थयात्रा केली यामुळे फक्त अभिमान तेवढा वाढला. ४ पुष्कळ दानधर्म करण्यासाठी धन वाटले, पण यातही मी दानधर्म केला ही अहता उरलीच ५ तुकाराम महाराज म्हणतात, पांडुरगास स्मरण्याचे मुख्य रहस्यच न समजल्यामुळे या बाह्य कर्मकांडाने अधर्म मात्र घडला ६

विवरण – परमेश्वराचे स्मरण, नामसकीर्तन, भजन, विठ्ठलभक्ती ही सोपी साधन सोडून यागसाधना, शरीरकष्ट, तीर्थयात्रा, उपासतापास, दानधर्म वगैरेंच्या चक्रात सापडणाऱ्या लोकाना सावध करण्याचे काम तुकारामानी अनेक अभगातून केले आहे या वरवरच्या गोष्टीत विठ्ठलस्मरण नसेल तर वृथा अहकार मात्र येऊन अधर्म घडतो ईश्वरासाठी घर सोडून जावे लागत नाही, प्रपचाचा त्याग करावा असे नाही मोठमोठी यज्ञकर्मे करून काही साधण्याचीही जरूरी नाही 'न लगे सायास जाणे वनान्तरा । सुखें येतो घरा नारायण' अशी मताची शिकवण आहे नामसकीर्तन हे अतिशय सोपे असे साधन सांगितले आहे तीर्थयात्रानी व व्रतवैकल्यानी काय होणार? वृथा अभिमान मात्र वाढणार त्या ऐवजी 'तीर्थाचे जें मूळ व्रताचे जें फळ । ब्रह्म तें केवळ पंढरीये' आहे तेच जाणून घ्यावे असे सताना वाटते 'तीर्थे केलीं कोटीवरी । नाहीं देखिली पंढरी' तर सर्व व्यर्थ आहे असेच बुवाना म्हणावयाचे आहे

९१ संवसारतापें तापलो मी देवा । करिता या सेवा कुटुंबाची ॥ १ ॥
म्हणऊनी तुझे आठविले पाय । ये वो माझे माय पांडुरंगे ॥ २ ॥
बहुता जन्मांचा जालो भारवाहो । सुटिजे हें नाहीं वर्म ठावे ॥ ३ ॥
वेढियेलो चोरीं अंतर्बाह्यात्कारीं । कणव न करी कोणी माझी ॥ ४ ॥
बहु पांगविलो बहु नागविलों । बहु दिवस जालो कासाविस ॥ ५ ॥
तुका म्हणे आता धाव घालीं वेगीं । ब्रीद तुझें जगीं दीननाथा ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीप :– संवसारतापें–ससारातील त्रासामुळे, भारवाहो–ओझे वाहाणारा, सुटिजे हें–ज्या योगाने सुटका असे, अतर्बाह्यात्कारी–आतून, बाहेरून, कणव–दया, पांगविलों–दुबळा, पगू केला गेलो, वेगीं–लौकर, दीनानाथा–गरिबाच्या नाथा

अर्थ – स्वतःच्या परिस्थितीचे सत्य निवेदन करणारा हा एक तुकारामबुवाचा श्रेष्ठ असा अभग आर्त हाकेने भारावलेला असा आहे यात ते म्हणतात, देवा, मी या माझ्या ससारातील त्रासांमुळे त्रासून गेलो आहे या कुटुंबियांची सेवा करता करता मी देवा, थकून गेलो आहे १ म्हणून देवा, तुझे पाय आठवले आहेत, म्हणून तुझी

[1] मान धन पोटासाठीं

स्मरण झाले आहे, माझ्या आईप्रमाणे तू आहेस, माय पांडुरंगे, तू माझ्यासाठी लौकर धावत ये २ पुष्कळ जन्मात जे काही पापपुण्य हातून घडले असेल त्यांच्या ओझ्याखाली मी दडपून गेलो आहे. यातून मुक्त व्हावे असे काही रहस्य मला सापडले नाही. ३ आतून व बाहेरून अशा नाना प्रकाराच्या चोरानी मी वेढलो गेलो आहे, माझी दया कुणासही येत नाही ४ देवा, याच्यामुळे मी फारच पगू झालो असून माझी नागवणही फार झाली आहे. पुष्कळ दिवस झाले, मी अगदी कासावीस होऊन गेलो आहे. ५ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तू दीनाचा नाथ आहेस ना ? दीनाचे रक्षण करणे हे तुझे ब्रीद आहे ना ? ते ब्रीद सामाळण्यासाठी दीनानाथा, आता तू सत्वर धावून ये व माझे रक्षण कर ६

विवरण :– तुकारामबुवाच्या चरित्रपर अथवा आत्मपर अभगातील हा एक अतिशय महत्त्वाचा अभग आहे. यात बुवानी आपणास वैराग्य का व कसे प्राप्त झाले त्याचा सक्षेपाने निर्देश केला आहे आपणास ससाराचा फार त्रास झाला, लोकानी आपणास फार नागविले, लुबाडले, चोरानी आतबाहेर दरोडे घालून आपली लूट केली कोणता त्रास तुकाराममहाराजाच्या ससारात होता ? कोणी त्याना लुबाडिले ? नागविले ? स्वत च्या ससारासबधी आणखीही काही अभगातून तुकारामबुवानी अशा प्रकारचा उल्लेख केलेला आहे 'ससाराच्या नावें घालूनिया शून्य । वाढता हा पुण्य धर्म केला,' ससाराचे ओझें वाहतां वाहविता । तुजविण अनंता नाहीं कोणी,' 'देव भक्तालागीं करू नेदी ससार,' 'जाला हा वमन ससार,' 'फटकळ हा ससार । येथें सार भगवत' इत्यादी वचनातून असे प्रत्ययास येते की बुवाचा ससार वरवर तरी सुखाचा झाला नसावा

प्रारभी प्रारभी तरी तुकोबाना ससाराची वर्षे बरी गेली असावीत दुकानदारी चागली चालत असावी घरान महाजनकी होती परतु पुढे एकामागून एक अशी सासारिक दु खे त्याच्यावर कोसळली 'मातापिता बधु सज्जन । घरीं उदड धनधान्य । शरीरीं आरोग्य लोकात मान्य । एकही उणे असे ना' अशी परिस्थिती असताना तुकारामावर अनेक आघात सतत होत राहिले 'बाप मेला न कळतां' यावरून बुवाच्या ऐन वयाच्या वेळी त्याचे वडील एकाएकी मरण पावले असे दिसते मग ससाराची सर्व जबाबदारी त्याच्याचवर येऊन पडली आईही थोड्याच दिवसात मरण पावली तुकारामबुवाचा बधू सावजी याची बायकोही याच सुमारास मृत्यु पावली व आधीच वैराग्यशील असणारा सावजी घर सोडून तीर्थयात्रेला निघून गेला. तुकारामाचे एक मूल व पहिली स्त्री हीही माणसे दगावली या भयानक अशा मृत्यूच्या थैमानामुळे आधीच कोवळे असलेले तुकारामाचे मन व्यथित झाले दुसरी पत्नी त्याचे मन हळुवारपणे साभाळील अशी नव्हती

घरातील या आघातान बाह्य स्थितीचेही प्रहार त्याच्या मनावर सतत झाले व्यथित चित्त असल्यामुळे धद्यावर, दुकानदारीवर मन राहिले नाही त्यात दिवाळे निघण्याची वेळ आली दुष्काळाची भर पडून माणसे व दावणीची गुरे हैराण झाली या वेळच्या दुष्काळाचे स्वरूपही भयानक होते 'पर्जन्य गेला देशातून । दुष्काळ आला पुढें कठिण । मुलें माणसे खाण्यावांचून । होतीं हैराण सर्वथा' असे वर्णन या काळाचे महिपतीने केले आहे तुकोबाचा व्यापार चालेना, द्रव्यहानी फार झाली जगात अपमान झाला 'सावकार पिटिती कपाळ । कांता हळहळ करी' अशा भयकर अवस्थेत बुवा सापडले होते 'एकविसाव्यात विपरीत काळ । तुकयासि घातला तत्काळ । तेव्हा निघतांचि दिवाळें । सोइरे सकल हासती' अशा परिस्थितीत बुवाचे मन खिन्न झाले स्वत तुकाराम महाराजानी दुसऱ्या एका महत्त्वाच्या अभगात म्हटले आहे की, 'ससारें जाळों अति दु खें दुखी । मायबाप सेखीं खाइलिया । बहु पीडिलों ससारें–' घरातील जिवलगाचा मृत्यु, सन १६३०–३१ चा भयकर दुष्काळ व त्यायोगे झालेली व्यापारहानी यानी तुकारामबुवा विव्हळ होऊन गेले 'मद झाल्या मेघवृष्टि', 'अपीक धान्यें दिवसेंदिवस', 'मेघ पडों भीती' अशा चोवतालच्या भीषण स्थितीचे बुवानी आपल्या अभगातून उल्लेख केले आहेत त्याना समकालीन कागदपत्राचाही पुरावा मिळतो समर्थ रामदास स्वामीनी या अस्मानी सकटाचे हृदयभेदक वर्णन केले आहे 'काळ दुष्काळें कहर पडता', 'पायली ज्वारीस एक दोन अशी धारण बसली', 'उपवासी मरो लागलों' असे उल्लेख त्या वेळच्या सरकारी कागदपत्रातूनही मिळतात

तुकारामबुवाना असा हा ससाराचा ताप आजून व माहेरून झालेला होता त्याचे चित्त कासावीस झाले असून करुणेने द्रवले होते याच करुणेपोटी त्यानी श्रीविठ्ठलाला 'माय पांडुरगे'[1] म्हणून हाक मारली तुकोबा ससारतापाने त्रस्त झाले म्हणून त्याना विठ्ठलाचे नाम आठविले असे जरी या अभगात म्हटले असले तरी त्याचा अर्थ मार्मिकतेने समजावून घ्यावयास हवा ससारताप व दुष्काळ ही वरवरची कारणे प्रभावी दिसतात हे खरे असले तरी **'बहुत सुकृतांची जोडी । म्हणूनी विठ्ठलीं आवडी'** हेही खरे आहे **'पंढरीची वारी आहे माझ्या घरीं'** असे त्यानीच म्हटले आहे **'माझ्या वडिलांची मिरासी गा देवा'** या अभगात **'वशपरपरा दास मी अकिता'** म्हणून त्यानी स्वतःचा उल्लेख केला आहे तुकारामबुवाचे आठवे पूर्वज विश्वभरबुवा यानी देहूस एक विठ्ठलाचे देऊळ बांधले होते तेव्हा या वशात जी भूमी पहिल्यापासूनच तयार होत होती तीमध्ये वैराग्याचे व प्रतिकूल परिस्थितीचे बीज पडले व देहूच्या भमीत इद्रायणीकाठी जे **'परब्रह्म मुसावले'** ते तुकारामबुवाच्या रूपाने साकारले

९२ भक्तऋणी देव बोलती पुराणे । निर्धार वचनें साच करी[1] ॥ १ ॥
मार्गे काय जाणो अइकिली वार्त्ता । कबिर सातें जाता घडिया घाटीं ॥ २ ॥
माघारिया धन आणिले घरासि । ने घे केला त्यासि त्याग तेणें ॥ ३ ॥
नामदेवाचिया घरासि आणिले । तेणे लुटविले द्विजा हातीं ॥ ४ ॥
प्रत्यक्षासि काय द्यावें हे प्रमाण । व्यकोबाचे[2] ऋण फेडियेले ॥ ५ ॥
बीज दळोनिया केली आराधना । लागे नारायणा पेरणे तें ॥ ६ ॥
तुका म्हणे नाहीं जयासि निर्धार । नाडला साचार तोचि एक ॥ ७ ॥

शब्दार्थ व टीपा – भक्तऋणी–भक्ताच्या ऋणात असणारा, कबीर–उत्तर हिंदुस्थानातील पधराव्या शतकातील प्रसिद्ध साधु कवी, सातें जाता–बाजारात जाताना, घडिया–विणलेल्या वस्त्राच्या घड्या, नामदेव–ज्ञानेश्वराच्या समकालीन प्रसिद्ध भगवद्भक्त व सतकवी ( १२७०-१३५०, ) व्यकोबा–एकोबा म्हणजे एकनाथ अशा पाठामुळे अर्थ स्पष्ट होतो

अर्थ – पुराणे असे सागतात की देव, हा भक्ताच्या ऋणानी बद्ध आहे देवा, ही वचने खरी करून दाखवाल ना ? १ मागे काय घडले कुणास माहित ? पण असे ऐकतो खरे की कबीर नावाच्या एका भक्ताने बाजारास कापड विकावयास जाताना गरिबाना ती वस्त्रे वाटून टाकली २ मग घरी येऊन पाहतो ते देवाने या सर्व वस्त्राची किंमत आणून दिली आहे पण कबीराने ती घेतली नाही ३ नामदेवानी असेच केले त्यानीही असेच कापड वाटून टाकले व मग देवाने त्या पैशाची व्यवस्था करून सर्व किंमत घरी आणून दिली, पण नामदेवानीही ती घेतली नाही, ब्राह्मणाना ते धन वाटून टाकले ४ इतके कशास हवे ? प्रत्यक्षास प्रमाण नकोच एकनाथाचेही असेच ऋण देवाने फेडले ५ दुसऱ्या एका प्रसगी पेरावयाचे बी दळून घरी आलेल्या सताच्या भोजनाची व्यवस्था एका सताने केली तेव्हा त्याच्या शेतात पेरणी करायचे कामही देवाला करावे लागले ६ तुकाराम महाराज म्हणतात, ईश्वर आपल्या भक्ताची एवढी काळजी घेतो पण यावर ज्याचा विश्वासच नाही तो खरोखर जन्माला येऊन फसलाच म्हणायचा ७

विवरण – देव हा भक्ताच्या ऋणात गुंतावतो व तो आपल्या एकनिष्ठ भक्ताचे काही कमी पडू देत नाही, हा मनवाङ्मयात व चरित्रात वारवार येणारा विचार तुकाराम महाराजानी काही पूर्वीची उदाहरणे देऊन व्यक्त केला आहे कबीर, नामदेव व व्यकोबा किंवा एकोबा याची त्याना माहित असलेली हकीकत सागितली आहे या प्रत्येकाच्या जीवितातील ऐतिहासिक प्रसगाचा शोध घेणे कठिण काम आहे कबीर हा उत्तर हिंदुस्थानातील एक थोर सत पुरुष ज्ञानेश्वरानतरच्या कालात होऊन गेला योगसप्रदाय वैष्णवपथ, सूफीसप्रदाय याचे चमत्कारिक मिश्रण त्याच्या शिकवणुकीत दिसून येते हाही तुकारामाप्रमाणेच फटकळपणे बोलून समाजातील ढोंगे दूर करणारा होता याचा वस्त्रे विणण्याचा धदा होता ईश्वराचे नामस्मरण करीत तो आपल्या उद्योगात रमून जाई नामदेव

१ खरी, २ एकोबाच

हे बालभक्त म्हणून पंढरपुरास ज्ञानेश्वराच्या काळातच प्रसिद्धीस आले होते ते शिंपी जातीचे असून कापड विकण्याचा त्याचा धंदा होता तुकाराम महाराजांनी आणखी एका संताचे उदाहरण दिले आहे ते त्यांच्या आधीच थोड्याच वर्षांत होऊन गेलेल्या एकनाथांचे आहे परंतु हे एकोबा अभंगात व्यंकोबा म्हणून उल्लेखलेले आहेत 'व्यंकोबा' हाच पाठ बरोबर असण्याची शक्यता आहे हे व्यंकोबा बुवांच्या समकालीन संत काय ? कारण कबीर व नामदेव ही दोन जुन्या काळची उदाहरणे दिल्यानंतर 'प्रत्यक्षासि काय द्यावें हें प्रमाण' म्हणून अगदी नजीकचा उल्लेख करीत आहेत कदाचित एकोबा म्हणजे एकनाथ हेही त्यांना काळाच्या दृष्टीने काल्चेपरवाचे वाटत असावेत कारण एकनाथांच्या निर्याणानंतर अठराच वर्षांतच तुकोबांचा जन्म झाला

९३ भोगें घडे त्याग । त्यागें अंगा येती भोग ॥ १ ॥
ऐसें उफराटें वर्म । धर्मा अंगींच अधर्म ॥ २ ॥
देव अंतरे ते पाप । खोटें उगवा संकल्प ॥ ३ ॥
तुका म्हणे भीड खोटी । लाभ विचारावा[१] पोटीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – उफराटें–उलटे, अंतरे–दूर होतो, उगवा–उलगडा करून घ्या

अर्थ – मनात ईश्वराविषयी भाव असला म्हणजे नाना विषयांचे भोग घेत असतानाही त्याग घडतात व ईश्वराविषयी निष्ठा नसेल तर मात्र वरवर त्याग करीत असतानाही तो भोगच होतो १ असे हे धर्माचे रहस्य उलटेसुलटे आहे कधी धर्मामध्येच अधर्म दिसतो, अधर्मातच धर्म असतो २ एवढे लक्षात असू द्या की ज्यामुळे देव अंतरतो ते पापकर्म समजावे, म्हणून आपल्या कर्माचे खरेखोटेपण नीट समजावून घ्यावे, त्याच्या स्वरूपाचा उलगडा करून घ्यावा ३ तुकाराम महाराज म्हणतात, एखाद्या कर्माविषयी परीक्षा न करता संकल्प करणे ही भीड खोटी आहे विचार करून भिडेचा त्याग करणे श्रेयस्कर असते ४

९४ भोरप्याने सोंग पालटिलें वरी । बक ध्यान धरी मत्स्या जैसें ॥ १ ॥
टिळे माळा मंद मुद्रा लावी अंगीं । देखों नेदि जगीं फासे जैसे ॥ २ ॥
ढीवर या मत्स्या चारा घाली जैसा । भीतरील फासा कळों नेदी ॥ ३ ॥
खाटिक हा स्नेहवादें पशु पाळी । कापावया नळी तया साठीं ॥ ४ ॥
तुका म्हणे तैसा भला मी लोकांत । परी तूं कृपावंत पांडुरंगा ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – भोरप्याने–बहुरूप्याने बक–बगळा, मंद–वाटमारे लोक ढीवर–मासे धरणारा, स्नेहवादें–मोठ्या प्रेमानं

अर्थ – आपल्या कमकुवत मनाची मोठ्या विनयाने व प्रांजलपणे कबुली देताना बुवा म्हणत आहेत, परमेश्वरा, बहुरूप्याने वरवरची अशी नाना प्रकारांची सोंगे धारण केली तरी तो निराळाच असतो व बगळ्याने डोळे मिटून ध्यानाची बतावणी केली तरी त्याचे चित्त माशांवरच असते १ एखाद्या वाटमाऱ्याने गळ्यात माळा घातल्या किंवा मुद्रा लावल्या अंगावर तरी त्याचे अंतरंग निराळेच असते फासे टाकून प्राण्यांना पकडण्याचे त्याचे कसब दिसून येत नाही इतकेच २ माशांना गळाला खाण्याचा पदार्थ लावून मासेमारी लोक आमिष दाखवितात, पण त्यांना त्या गळास असणारा फास दिसत नाही ३ एखादा खाटिक मोठ्या प्रेमाने शेळ्यामेंढ्या पाळतो, त्यांना खायला घालतो, पण त्याचा हेतू या प्राण्यांना मारून त्यांचे मांस खाण्याचाच असते हे वरवर दिसत नाही ४ तुकाराम महाराज म्हणतात, या सर्व उदाहरणांप्रमाणेच मी वरवर लोकांत बरा दिसत असेन, साधु वाटत असेन, पण माझे अंतरंग अजून शुद्ध नाही, प्रभू पांडुरंगा, तू कृपाळू आहेस म्हणून सारे निभावते एवढेच ५

[१] विचाराच्या

९५ गेली वीरसरी । मग त्यासि रांड मारी ॥ १ ॥
मग नये तैसी सत्ता । गेली मागील आणितां ॥ २ ॥
भंगलीया चित्ता । न ये कांशानें सांदितां[1] ॥ ३ ॥
तुका म्हणे धीर । भंगलिया पाठीं फीर ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– वीरसरी–वीरश्री, पराक्रम, भंगलिया–मोडून गेलेल्या, कांशानें–कशानेही, सांदिता–साधिता, जोडता, फीर–खरोखर, उचित.

अर्थ – एकदा का अंगातील वीरश्री नाहीशी झाली, पराक्रम संपला, मग त्यास एखादी सामान्य स्त्री देखील फजीत करू शकते १ मग मात्र पूर्वी जशी सत्ता होती तशी परत आणता येत नाही. २ एकदा चित्त कोणत्याही कारणाने भगले की मग ते कशानेही साधता येणार नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, खरोखर एकदा का धीर सुटला की मग त्याची कीव किती करावी ? ४

९६ युक्ताहार न लगे आणिक साधने । अल्प नारायणें दाखविलें ॥ १ ॥
कलियुगामाजी करावें कीर्तन । तेणें नारायण देइल भेटी ॥ २ ॥
न लगे हा लौकिक सांडावा वेव्हार । ध्यावें वनांतर भस्म दंड ॥ ३ ॥
तुका म्हणे मज आणिक उपाव । दिसती ते वाव नामाविण ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– युक्ताहार–फलमूलादिकाचा जपजाप्य करतानाचा आहार, न लगे–लागत नाही, आणिक–दुसरी, अल्प–अगदी थोडक्यात, वेव्हार–व्यवहार, व्यवसाय, वाव–व्यर्थ.

अर्थ – जपजाप्यादी साधने करताना घ्यावयाचा फलमूलादिकाचा आहार पाळणे, त्याची नीट व्यवस्था करणे किंवा यासारखी आणखी काही कर्मकांडात्मक साधने करणे याची जरूरी लागत नाही. परमेश्वराने फार थोडक्यात असा मार्ग दाखविला आहे. १ या कलियुगात कीर्तनभक्ती हाच एक मार्ग सांगितला आहे, या कीर्तनामुळेच परमेश्वराची भेट होईल. २ रोजचा व्यवहार अथवा लौकिक आचार सोडण्याचीही जरूरी नाही, वनात तपस्येसाठी जावयास नको, भस्म धारण करून, हातात दंड घेऊन सन्यासी किंवा बैरागी होण्याची जरूरी नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, ईश्वरप्राप्तीसाठी या कीर्तनाखेरीज आणखी इतर उपाय व्यर्थ आहेत. एक नामस्मरण व कीर्तन यानीच देव संतुष्ट होईल. ४

विवरण.– वारकरी पंथात नामभक्ती, कीर्तनभक्ती हेच एक ईश्वरप्राप्तीचे साधन सर्वांना अतिशय सुलभ असे सांगितले आहे. जपजाप्य, योगयाग, ध्यानधारणा, वनातील तपश्चर्या, उपासतापास, यज्ञकर्म, सदाचरण यांची काही जरूरी आहे असे नाही 'आता गृहादिक आघवें । ते काहीं न लगे त्यजावे' म्हणून ज्ञानेश्वरीत सांगितले आहे तुकाराम बुवानीही 'न लगे सायास जाणें वनांतरा । सुखें घरा येतो नारायण' म्हणून या साधनमार्गाचे महत्त्व वर्णन केले आहे. रानावनात जाऊन यज्ञयाग वगैरे करण्याची किंवा शरीराला कष्ट देऊन योगसाधन करण्याची जरूरी या कलियुगात नाही असा निश्चय भागवत सांप्रदायिकानी केलेला आहे 'क्लेशोऽधिकतरस्तेषामव्यक्तासक्तचेतसाम् । अव्यक्ता हि गतिर्दुःखं देहवद्भिरवाप्यते'– अव्यक्ताच्या ठिकाणी चित्त लावून वागणाऱ्याना क्लेश अधिक होतात, कारण या उपासनेचा मार्ग कष्टकारक असतो असे भगवद्गीतेतही म्हटले आहे तेव्हा या कष्टाच्या व श्रमाच्या मार्गाला जाण्याचे कारणच नाही असे साधुसंताचे सांगणे आहे 'म्हणोनि योगाचिया वाटा । जे निगाले गा सुभटा, । तया दुःखाचि वांटा । भागा आला ।' असा स्पष्ट निर्णय ज्ञानदेवानी दिला आहे

या कष्टदायक मार्गापेक्षा नामसंकीर्तनाची भक्ती सर्वांना अतिशय सुलभ व ईश्वराची प्राप्ती करून देणारी आहे नवविधा भक्तीतही कीर्तनास विशेष प्राधान्य आहे. भागवत संप्रदायात नामदेवापासून सर्वांनी याच कीर्तनभक्तीचा प्रसार केला आहे. नामदेव महाराज हे महाराष्ट्राचे आद्य कीर्तनकार होत. 'सुंभाचा करदोटा रक्टयाची

[1] साधिता

लगोटी । नामा वाळवटीं कीर्तन करी' म्हणून नामदेवाचे वर्णन आहे गुणसंकीर्तन, नामसंकीर्तन व लीलासंकीर्तन असे कीर्तनाचे तीन प्रकार प्राचीन काळापासून मानण्यात आले आहेत भगवान नारदमुनी हे कीर्तनसंस्थेचे आद्य प्रवर्तक होत भागवतपुराण, नारदपुराण यातून कीर्तनाचे माहात्म्य विस्ताराने वर्णन केले आहे स्त्रीशूद्रादिकापर्यंत सर्वांना सुलभ असणारे हे साधन महाराष्ट्रातही लोकप्रिय झाले नारद, परीक्षिती, ध्रुव, व्यास, वाल्मीकी याचीही नावे या परपरेशी निगडित आहेत नारदाची वीणा आजही कीर्तनकारास अतिशय प्रिय आहे नामदेव, ज्ञानदेव, चोखाबा, एकनाथ, तुकाराम रामदास या सर्वांनीच कीर्तनावर भर दिला होता 'नाचू कीर्तनाचे रंगीं । ज्ञानदीप लावू जगीं ।' अशी नामदेवाची प्रतिज्ञा आहे

तुकाराम महाराजाचे तर शेकडो अभग कीर्तनाचा महिमा वर्णन करणारे आहेत 'सोपें वर्म आम्हां सांगितलें संतीं । टाळ दिंडी हातीं घेऊनि नाचा— 'अवीट हें क्षीर हरिकथा माऊली । सेवितां सेविली वैष्णवजनीं', 'आनदें कीर्तन कथा करी घोष । आवडीचा रस प्रेमसुखें ' 'कथा देवाचें ध्यान । कथा साधन मडण । कथेऐसें पुण्य आणिक नाहीं सर्वथा ' अशी शेकडो वचने कीर्तनाचे माहात्म्य सागणारी मिळतात रामदासानाही या कीर्तनभक्तीचे मोठे प्रेम होते ' भगवतास कीर्तन प्रिय । कीर्तनें समाधान होय । बहुत जनांसी उपाय । हरिकीर्तनें कलियुगीं ' असे सागून समर्थानी कीर्तनाचे महत्त्व विशद केले आहे कलियुगात मान्यतेस पावलेल्या या कीर्तनभक्तीचा महाराष्ट्रात फार मोठ्या प्रमाणावर आधुनिक काळातही झाला हरिदासी व वारकरी अशा दोन पद्धती मुख्यत आज कीर्तनभक्तीच्या दिसतात नृत्य, सगीत, वाद्य याच्या साहाय्याने परमेश्वराचे गुणगान कीर्तनात सामुदायिक रीतीने साधाता येते नमन, स्तवन, सद्गुरुस्मरण झाल्यावर बहुधा तुकारामाचाच अभग निरूपणास घेऊन तत्त्वज्ञान वा परमार्थ याचे निरूपण प्रथमार्धात करण्याचा प्रघात आहे हा झाला पूर्वरग, आणि उत्तररगात पहिल्या निरूपणास शोभेल अशा एका भक्ताचे, सताचे रसाळ चरित्र कथात्मक पद्धतीने सागावयाचे असे स्थूल स्वरूप आजही कीर्तनाचे टिकून आहे

९७ कठीं कृष्णमणी । नाहीं अशुभ ते वाणी ॥ १ ॥
हो का नर[1] अथवा नारी । राड तमें नावें खरी ॥ २ ॥
नाहीं हातीं दान । शूरपणाचें काकण ॥ ३ ॥
वाळियेली संतीं । केली बोडोनि फजिती ॥ ४ ॥
तुका म्हणे ताळा । नाहीं त्याची अवकळा ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – कठी–गळ्यात, कृष्णमणी–श्रीकृष्णाच्या नामाचा मणी वाळियेली–दूर काढले, बोडोनि–हजामत करून, निकरान टीका करून ताळा–मर्यादा

अर्थ – ज्याच्या गळ्यात श्रीकृष्ण नामाचा मणी नाही त्याची वाणी कितीही गोड असली तरी अशुभच समजावी १ मग तो पुरुष असो अथवा स्त्री असो, ती राड व तो रडवा अशीच नावे त्याना शोभून दिसतात २ ज्याच्या हातात दान देणारे शूरपणाचे ककण नाही त्याचा काय उपयोग ? ३ अशा स्त्रीपुरुषाना संतानी आपल्या मेळाव्यातून दूर काढले असून त्यानी त्याची पुरती फजिती केली आहे ४ तुकाराम महाराज म्हणतात, ज्याचा ताळ सुटला आहे म्हणजे ज्याच्या वागण्यास कुठलीच मर्यादा नाही असे झाले आहे त्यास अवकळाच येणार, त्याचा नाश होणार ५

९८ माया ब्रह्म ऐसें म्हणती धर्मठक । आपणासरिसे लोक नागविले ॥ १ ॥
विषयीं लपट शिकवी कुविद्या । मनामागें नाद्या होऊनि फिरे ॥ २ ॥
करुनी खाता पाक जिरे सुरण राई । करिता अतिल्याई दु ख पावे ॥ ३ ॥
औषध द्यावया चाळविलें बाळा । दावूनिया गुळा दृष्टीपुढें ॥ ४ ॥
तरावया आधीं शोधा वेदवाणी । वाजट बोलणीं वारा त्याचीं ॥ ५ ॥
तुका म्हणे जया पिंडाचें पाळण । न घडे नारायणभेट तयां ॥ ६ ॥

[1] पुरुष

**शब्दार्थ व टीपा :–** माया–ईश्वरी शक्ती, अविद्या, भ्रम, ब्रह्म–ईश्वर, परमात्मा, जगाचे आदिकारण, मायाब्रह्म याची वरवर एकसारखी चर्चा करून लोकाना फसविणाऱ्या भोंदू गुरूंच्यावर उपरोधाने टीका करण्यासाठी हे शब्द वापरले आहेत, धर्मठक–भोंदू लोक, नागविले–लुटले, नांद्या–हो हो करणारा नंदीबैल, अतित्याई–अत्याचार, पांजट–फोल, पिंडाचे–शरीराचे.

**अर्थ:–** जगतात वरवर दिसणारा जो प्रपंच ती माया व खरे असणारे ब्रह्म अशा भावेत मायाब्रह्माचे भोंदू साधुलोक निरूपण करतात किंवा वरवर दिसणारा मायिक पसारा हेच ते ब्रह्माचे रूप मानतात. असे विवेचन करून ते स्वतःही फसतात व स्वतःप्रमाणेच इतरांनाही फसवितात. १ अशी माणसे केवळ विषयामध्ये आसक्त असतात व लोकाना वाटेल तसा खोटा बोध करतात आणि आपण मात्र स्वतः ओढाळ मनामागे नंदीप्रमाणे होऊन फिरतात. २ कोणतीही गोष्ट नीट रीतीने करायला हवी. नीट स्वयंपाक करून राई व मुरण या दोनही वस्तू शिजल्यावर त्या पचतील, पण अत्याचार करून त्या तशाच कच्च्याच खाल्या तर मात्र खाणारासच दुःख होईल. ३ कडू औषध घ्यायचे असेल तर गुळासारखा गोड पदार्थ पुढे करून लहान मुलाची समजूत घालावी लागते. ४ म्हणून खरोखरी असे आहे की आपणांस तरायचे असेल तर अगोदर वेदवाणी काय आहे ते शोधा, नी समजावून घ्या व अशा भोंदू लोकांची वृथा बोलणी प्रथम दूर करा. ५ तुकाराम महाराज म्हणतात, ज्याचे केवळ शरीरपोषण हेच एक ध्येय असते त्यांची व ईश्वराची भेट कधीही होणार नाही. ६

**विवरण :–** भोंदू साधुसंतापासून सावध असावे असे सांगताना तुकाराम महाराज या अभंगात 'तरावया आधी शोधा वेदवाणी' असे सांगतात हे ध्यानात घ्यावयास हवे. भागवत संप्रदाय किंवा वारकरी पंथ जरी गीता-भागवतादी ग्रंथातून आकारास आला असला तरी त्याला वेदाचे व उपनिषदाचे महत्त्व मान्यच आहे. सर्व उपनिषदाचे सार गीतेत आले आहे व त्यावर भागवत धर्माची इमारत उभी आहे. वेदविरोधी असे भागवत धर्मात काहीही नाही. कालमानाप्रमाणे जातिबंधने व वर्णव्यवस्था यांच्या विचारात थोडाफार बदल संतांनी सुचविला असला तरी वेदाचे महत्त्व त्यांनी अनेकदा मान्य केले आहे. 'वेदु संपन्नु होय ठाईं। परी कृपणु ऐसा आनु नाहीं' अशी टीका ज्ञानदेवांनी केली असली तरी भाषेपुरती मर्यादित आहे. सर्वांना सुलभ होईल अशा लोकभाषेत परमार्थनिरूपण करावे अशा भूमिकेवर हे लिहिणे आहे. पुढील संतानी वेदमान्यतेचेच धोरण स्वीकारले आहे. वेदाचेच सार तुकारामांनी 'वेद अनंत बोलिला। अर्थ इतुकाचि साधिला॥ विठोबासी शरण जावें' अशा शब्दात काढले आहे. 'सकळ शास्त्रांचें हें सार। हें वेदांचें गव्हार' म्हणून आणखी एका अभंगात बुवानी वेदगौरव केलेला आहे 'वेदविहित तुम्ही आइका हीं कर्में। बोलतो तीं वर्म संतांपुढें' या अभंगात तुकाराम महाराजांनी सर्वांची वेदविहित अशी कर्मे सांगितली आहेत. इतकेच नव्हे तर आपण प्राकृत वाणीत बोलत असू व उच्च कुळात आपला जन्म झाला नसला तरी प्रभुकृपेने आपणास केवढे सामर्थ्य आले आहे याचे वर्णन करताना त्यांनी म्हटले आहे, 'वेदाचा तो अर्थ आम्हासीच ठावा। येरांनी वाहावा भार माथा।' सारांश, वारकरी पंथातील वेदाचा अभिमान हा स्पष्ट आहे. एका विशिष्ट सूत्रात जोडलेल्या परंपरेतून वेदापासूनच भागवत धर्माचा विकास झाला आहे. हा ओघ अखंड आहे. 'हें धर्मगात आघवें। युगायुगीं म्या रक्षावें। ऐसा ओघ हा स्वभावें। आद्य असे' अशी ज्ञानेश्वराची साक्ष आहे.

९९ मृगजळ दिसे साचपणा ऐसें। खोटियाचें पिसें ऊर फोडी॥ १॥
जाणोनि कां करा आपुलाले घात। विचार रे हित लवलाहीं॥ २॥
संचित सांगातीं बोळवणें सवें। आचरलें द्यावें फळ तेणें॥ ३॥
तुका म्हणे शेखीं श्मशान तोंवरी। संबंध गोवरी अंगीं सवें॥ ४॥

**शब्दार्थ व टीपा :–** मृगजळ–हरिणाना वाटणारा पाण्याचा भास, साचपणा ऐसे–सत्याप्रमाणे, संचित–पूर्व जन्मीचे कर्म, सांगातीं–बरोबर, शेखीं–शेवटी, आगीसवें–अग्नीबरोबर

**अर्थ :–** मृगजळ हे खरे नसूनही विचारी हरणे धापा टाकीत टाकीत त्याच्या मागे धावतात, त्याना ते पाणी खरेच वाटते. १ या प्रमाणे वरवरचा देहादिक प्रपंच खरा नाही असे जाणून आपला घात करण्याचे थांबवा, व

आपल्या हिताचा विचार लौकर करा २ आपले पूर्वसंचित जे कर्म असेल तेच आपल्या बरोबर असून आपली पाठवणी तेच करीत असते. जसे आपले कर्म तसे आपणास फळ मिळते ३ शेवटी आपला देह जोपर्यंत स्मशानातच जाणार आहे तोंपर्यंत त्याचा संबंध अग्नीशी व गोवरीशीच यायचा हे नाकारून कसे चालेल ? ४

१०० गौळीयाची ताकपिरें । कोण[1] पोरें चांगलीं ॥ १ ॥
येवढा त्यांचा छंद देवा । काय सेवा भक्ती ते ॥ २ ॥
काय उपास पडिले होते । कण्यामोवते विदुरांच्या ॥ ३ ॥
तुका म्हणे कुब्जा दासी । रूपरासी हीनकळा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – ताकपिरें–ताक पिणारी, विदुर–धृतराष्ट्र व पंडू याचा धर्मनिष्ठ भाऊ, कुब्जा–पाठीला पोक असलेली कंसाची एक कुरूप दासी

अर्थ :– भक्तीसाठी परमेश्वर किती लालचावलेला असतो हे सांगण्यासाठी तुकारामबुवा सांगतात, गवळ्याची ताक पिणारी ती पोरे ! काय त्यांच्यात लोभ पडण्यासारखे होते ? १ पण श्रीकृष्णास त्यांचा केवढा मोठा छंद होता ! कारण त्यांची सेवा व त्यांची भक्ती यांची थोरवी फार होती २ विदुराच्या कण्या देवांनी मोठ्या प्रेमाने खाल्ल्या, त्यावेळी काय देवाला उपवास पडले होते ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, ती कंसाघरची दासी पाठीला पोक आल्यामुळे अष्टवक्रा झाली होती, पण अशी विरूप झालेली व हीन कळा असलेली दासी ही ईश्वराला सौंदर्याची राशी वाटली कारण एवढच देवाला केवळ भक्ती प्रिय आहे

विवरण :– भक्तीचे महिमान सांगणारा एक महत्त्वाचा अभंग आहे हा शुद्ध प्रेमास भुकेलेला ईश्वर आपल्या भक्ताचे रूप, त्याची जात, त्याचे पूर्वकर्म वगैरे काही न पाहता केवळ त्याचे भाव पाहतो हे सांगण्यासाठी वरवर हीन किंवा क्षुल्लक दिसणाऱ्या काही थोर भक्ताचा उल्लेख तुकारामबुवांनी येथे केला आहे लहानपणी गोकुळात असताना गवळ्याची मुले घेऊन श्रीकृष्ण अनेक खेळ खेळले. ती गवळ्याची मुले ! काय त्यांना रूप असणार ? की त्यांना प्रगल्भ बुद्धी असणार ? का ती धनवंत होती ? पण ईश्वरास या गोष्टीची जरूरी नसते त्याला फक्त प्रेम हवे असते ते या भावड्या पोरांच्यात होते विदुर हा अंबिका नावाच्या दासीपासून झालेला मुलगा शूद्र स्त्रीपासून याची निर्मिती म्हणून याला धृतराष्ट्र व पंडु यांशी बंधुत्वाचे नाते असूनही राज्य मिळाले नाही पण हा मोठा धर्मनिष्ठ होता श्रीकृष्णावर याचे फार प्रेम होते याची श्रीकृष्णभक्ती थोर असल्याने याच्या घरच्या कण्याही श्रीकृष्णास गोड लागल्या आणि ती कंसाघरची दासी कुब्जा ? अंग वाकडे झाल्याने कुरूप दिसत असे त्रेता युगातील कैकयीची दासी मंथरा शापाने द्वापरयुगात कंसदासी कुब्जा बनली होती पण तिच्या मनात कृष्णाविषयी अपार प्रेम असल्याने श्रीकृष्णाने तिला जवळ करून सुस्वरूप केले

१०१ आतां तरी पुढें हाचि उपदेश । नका करूं नाश आयुष्याचा ॥ १ ॥
सकळांच्या पायां माझें दंडवत । आपुलालें चित्त शुद्ध करा ॥ २ ॥
हित तें करावें देवाचें चिंतन । करूनिया मन एकविध ॥ ३ ॥
तुका म्हणे लाभ होय तो व्यापार । करा काय फार शिकवावें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – दंडवत–नमस्कार, व्यापार–कामे

अर्थ :– माझा सर्व प्राणिमात्रांना आता हाच उपदेश आहे की त्यांनी आपल्या आयुष्याचा नाश करू नये. १ सर्वांच्या पायावर डोके ठेवून मी विनंती करीत आहे की सर्वांनी आपापले चित्त शुद्ध करून विठ्ठलाची भक्ती करावी. २ ईश्वराचे चिंतन सतत करणे हेच हितकारक असल्यामुळे ते मन शुद्ध ठेवून करावे ३ तुकाराम महाराज म्हणतात, जे हिताचे असेल ते लक्षात ठेवून आपली कामे करीत जावीत, आता आणखीन काय सांगावे ? ४

[1] काय

१०२ भक्ताविण देवा । कैंचे रूप घडे सेवा ॥ १ ॥
शोभविले येर येरा । सोने एके ठायीं हिरा ॥ २ ॥
देवाविण भक्ता । कोण देता निष्कामता ॥ ३ ॥
तुका म्हणे बाळ । माता जैसे स्नेहजाळ ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– *येरयेरा–एकमेकाना, निष्कामता–निष्काम भक्ती, स्नेहजाल–एकमेकात गुतलेले प्रेमाचे धागे*

अर्थ – भक्त असल्याखेरीज देवाला त्याचे रूप कसे प्राप्त होईल ? भक्त आहे म्हणून देव आहे १ सोन्याच्या कोंदणात हिरा असतो म्हणून त्याची शोभा ना ? हिरा व सोने यानी एकमेकास सुशोभित केले आहे एकट्याची काय किंमत ? २ देव जर नसेल तर भक्त मग निष्काम भक्ती तरी कुणाची करणार ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, नात्याची ही नाजुक गुतागुत किंवा प्रेमाचे हे नाजुक धागे आई व मूल याच्या नात्यातील स्नेहाप्रमाणे आहेत आईमुळे मूल आहे व मुलामुळे आईस आईपणा आहे ४

विवरण – श्रेष्ठ भक्तीच्या एका विशेष अवस्थेचा फार मार्मिक सदर्भ या अभगात आहे जीवाने शिवाची, आत्म्यानें परमात्म्याची सेवा किंवा भक्ती करायची त्याला वदन करायचे त्याच्याजवळ करुणा भाकायची, त्याची कृपा सपादन करायची हे ठीकच, पण भक्तीच्या पुढच्या अवस्थेत एक प्रश्न निर्माण होतो, तो असा की, भक्तानेच, सेवकानेच, जीवानेच का भक्ती करायची ? जीवास जशी शिवाची ओढ असते, तशीच शिवालाही असते ना ? परमेश्वरासही आपल्या भक्ताची ओढ असते ना ? ताही कासावीस होतो ना ? खर म्हणजे असच व्हावयास हवे त्याला *एकाकी करमत नव्हते, म्हणून तो हे चराचर विश्व प्रसवला तो या जगाची माता–पिता आहे मूलस्थानी तो व व्यक्त* झालेले विश्व एकच होते पण बीजाचा विस्तार झाला, एकाच सुवर्णाचे नाना अलकार झाले, एकाच पाण्यावर नाना लहरी उठल्या, म्हणून काही भेद मानावा असे नाही मग भेद नाही असे ठरल्यावर कोण कुणाचे स्तवन करणार ? भक्तास जसा ईश्वराचा ध्यास, तसा ईश्वरासही भक्ताचे अनुसधान असतेच ना ? या उच्च भूमिकेवरून तुकारामाच्या याही अभगातून विचार प्रकट झाले आहेत

या अभगात एक अति गोड भाव असा व्यक्त झाला आहे की मी भक्त आहे म्हणून देवा, तुला देवपण आहे बाळ आहे म्हणून स्त्रीस आईपण प्राप्त झाले आहे 'तुका म्हणे आम्ही विधीचे जनिते–प्रत्यक्ष ब्रह्मदेवासही आम्हीच जन्म दिला आहे' या तुकाराम महाराजाच्या उक्तीमधील सामर्थ्य फार मोठे आहे दुसऱ्या एका ठिकाणी बुवानी म्हटले आहे 'जरि मी नव्हतो पतित । तरि तू पावन कैचा तेथ ?' मी येथे पतित असल्यामुळे विठ्ठला, तू पतितपावन म्हणून लौकिकवान झालास, असा प्रेमाच्या भाडणाचा लडिवाळ मुद्दा उपस्थित केला आहे लोखड आहे म्हणून परिसाला महत्त्व मी भक्त आहे म्हणून देवा तुमचे महिमान असा भावार्थ दोघेही परस्पराना पोषक आहेत

१०३ विश्वाचा जनिता । म्हणे यशोदेसि माता ॥ १ ॥
ऐसा भक्ताचा अंकित । लागे तैसी लावी प्रीत ॥ २ ॥
निष्काम निराळा । गोपी लावियेल्या चाळा ॥ ३ ॥
तुका म्हणे आले । रूपा अव्यक्त चांगले ॥ ४ ॥

१०४ काय दिनकरा । केला कोंबड्याने खरा ॥ १ ॥
का हो ऐसा सत ठेवा । भार माझे माया देवा ॥ २ ॥
आडविले दासीं । तरि का मरती उपवासी ॥ ३ ॥
तुका म्हणे हातीं । कळा सकळ अनंतीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – दिनकरा–सूर्यास, दासीं–सेवकानी

अर्थ – सूय उगवताना कोंबडा आरवतो याचा अर्थ असा नव्हे की त्याच्या आरवण्याने सूर्य उगवतो कोंबड्याच्या ओरडण्याने सूर्याचे उगवणे खरे मानायचे काय ? त्याचा उदय स्वयंसिद्धच आहे १ माझे व देवाचे नाते असेच आहे सत लोकहो, माझ्यावर सतत्वाचे ओझे ठेवू नका माझ्या सतत्वामुळे ईश्वराचे नाव सिद्ध करू नका २ सेवकानी, स्वयपाक करणाऱ्या नोकरानी जरी अडवून घेतले, किंवा सोडले तरी मालक काही उपाशी राहात नाही तसे माझे सतत्व नसले तरी ईश्वराचे थोरपण स्वयंसिद्ध आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात सर्व कला, माझ्या गुणावगुणाची सारी किमया त्या अनत स्वरूपी ईश्वराच्या स्वाधीन आहे ४

१०५ जेविता ही धरी । नाक हागतिया परी ॥ १ ॥
ऐसियाचा करी चाळा । आपुलीच अवकळा ॥ २ ॥
साडावे माडावे । काय ऐसे नाहीं ठावे ॥ ३ ॥
तुका म्हणे करी । ताका दुधा एक सरी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – चाळा–क्रिया, अवकळा–वाईट स्थिती, साडावे–सोडावे माडावें–पत्करावे, सरी–बरोबरी

अर्थ – परसाकडेस बसले असताना ज्याप्रमाणे घाण येऊ नये म्हणून नाक धरतात त्याप्रमाणे काही लोक वेड्यासारखे जेवतानाच नाक धरतात १ अशा वेडसर क्रियामुळे आपली आपणच वाईट स्थिती किंवा फजिती करीत असतो २ कुठे काय करावे, काय धरावे, काय सोडावे याचा विवेकच काहींना नसतो ३ तुकाराम महाराज म्हणतात, असे लोक ताक व दूध याना सारखेच मानतात ४

१०६ हो का पुत्र पत्नी बधु । त्याचा तोडावा सबधु ॥ १ ॥
कळो आले खटचाळसे । शिवो नये लिपो दोषें ॥ २ ॥
फोडावे मडके । मेले लेखीं घायें एके ॥ ३ ॥
तुका म्हणे त्यागें । विण चुकीजेना भोगें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – मडके फोडणे–सबध सोडणे, घायें–घावाने

अर्थ – ईश्वरप्राप्तीसाठी पुत्र असो, पत्नी असो, बधू असो त्या सर्वांचा सबध तोडून टाकावा १ हे सबध सर्व खटपाळ आहेत, आड यणारे आहेत असे समजून आल्यावर त्याना शिवू सुद्धा नये, त्याच्या सहवासाचा दोष अगी लावून घेऊ नये २ ती सर्व मेली आहेत असे समजून त्याच्या नावाने मडके फोडून त्याचा सबध सोडून द्यावा ३ तुकाराम महाराज म्हणतात, असा त्याग केल्याशिवाय ससारातील भोगाविषयी आस्था दूर व्हायची नाही ४

१०७ व्याल्याविण करी शोभनतातडी । चार ते गधडी करीतसे ॥ १ ॥
वासया पाल्हाळ आणिकाचे देखों । सांगता नव्हे सुखी साखरेसि ॥ २ ॥
कुयाच्या ढेकरें न देवेल पुष्टी । रूप दावी कष्टी[1] मळिण वरी ॥ ३ ॥
तुका म्हणे अरे वाचाळ हो ऐका । अनुभवेविण नका वाव घेऊ ॥ ४ ॥

---

१ पुष्टी

शब्दार्थ व टीपा – व्याल्याविण–वाळंत झाल्याशिवाय शोभन तातडी–बारशासारखे मंगल कार्य करण्याची घाई, घार–चाळे, देखी–पाहून, कुथाव्या–मुद्दाम उसने आणलेल्या, कुष्टी–कोडाच्या रोगाचा, वाव–विनाकारण

अर्थ – एक स्त्री बाळंतीण व्हायच्या आधीच बारसे वगैरे मंगल कार्य करण्याचे चाळे मूर्खाप्रमाणे करू लागली १ दुसऱ्या स्त्रीच्या बाळंतिणीचे विस्तारपूर्वक व्यापार पाहून ही तसे करू लागली तर काय उपयोग ? साखर स्वत खाऊन जी गोडी अनुभवता येते ती काय दुसऱ्यास सांगता येते ? २ तृप्ततेचे जेवण झाल्यावर जशी ढेकर येते तशी ती उगाच भुकेल्या पोटी बळेने दिलेल्या ढेकरेप्रमाणे होणार नाही दोघांत मोठाच फरक दिसणार उलट अशा ढेकरेमुळे चेहरा मात्र कष्टदायक व मलीन दिसणार, किंवा कोडाच्या रोगाचा मनुष्य आपले कोड दिसू नये म्हणून अंग मलीन करून घेतो तसेच होणार ३ तुकाराम महाराज म्हणतात, नुसती वडबड करणारे लोकहो ऐका, तुम्ही स्वत अनुभव घेतल्याखेरीज उगाच बोलू नका ४

१०८ जेणें घडे नारायणीं अंतराय । होत बाप माय वर्जावीं तीं ॥ १ ॥
येर प्रिया पुत्र धना कोण लेखा । करिती तीं दुःखा पात्र शत्रु ॥ २ ॥
प्रल्हादें जनक बिभीषणें बंधु । राज्य माता निंदु भरतें केली ॥ ३ ॥
तुका म्हणे सर्व धर्म हरिचे पाय । आणीक उपाय दुःखमूळ ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – अंतराय–अडथळा, वियोग, वर्जावीं–सोडावीं, येर–मग, लेखा–गणती, हिशव, दुःखमूळ–दुःख देणारे

अर्थ – ईश्वराच्या प्राप्तीस जर अडथळा होत असेल, त्याचा वियोग घडत असेल तर अत्यंत पूज्य असलेल्या आईबापाचाही त्याग करावा १ मग इतर नात्याची माणसे, प्रिय पत्नी, मुले धन यांची काय गणना ? त्यांचाही त्याग करावा, कारण हे सर्व आपल्याला दुःख देण्यास पात्र असलेले शत्रूच आहेत २ आईबापाचा वा आप्ताचा असा त्याग पूर्वी अनेकांनी केला होता देवासाठी प्रल्हादाने आपल्या पित्याचा बिभीषणाने आपल्या थोरल्या बंधूचा, भरताने आपल्या आईचा व राज्याचाही त्याग केला नव्हता काय ? ३ तुकाराम महाराज म्हणतात याच्या सेवेतून निर्माण होणारे सर्व धर्म श्रीहरीच्या पायाशी दिसतील इतर सर्व उपाय दुःखाचे मूळ आहे त्यामुळे दुःखच होत राहील हे निश्चित ४

विवरण – ईश्वरप्राप्ती हे सर्वांत मोठे ध्येय माणसाने अमलात्‍न या प्राप्तीच्या आड येणारी सर्व बंधने ताडावीत असे वारंवार सांगितले जाते अतिशय पूज्य आईबाप, यांनी आपणास जन्म दिलेला असतो, पण हे जर परमेश्वरप्राप्तीच्या आड आले तर त्यांचाही त्याग करावा, मग बंधू, पुत्र पत्नी यांचा त्याग करावा यात नवल ते काय ? याच्या अतिरिक्त मोहामधून ईश्वर दुरावतो म्हणून या नात्यांचा त्याग सुचविला आहे गीतेच्या तेराव्या अध्यायात ज्ञानी माणसाची लक्षण सांगताना 'असक्तिरनभिष्वंग पुत्रदारगृहादिषु–बायकामुलं व घर इत्यादींविषयी लंपट न होणे'–हा एक प्रमुख म्हणून दर्शविला आहे 'दारागृहपुत्रीं । नाहीं जया मैत्री । तो जाणपां धात्री । ज्ञानासि गा' असे ज्ञानदेवांनी या पुरुषाचे वर्णन केले आहे 'देवाच्या सख्यत्वासाठीं । पाडाव्या जिवलगांसि तुटी । प्राण सर्वस्वही शेवटीं । तोही देवावा' असे समर्थ रामदासांनी निग्रहाने सांगितले आहे

असा हा आप्तस्वकीयांचा किंवा आईबापाचा त्याग पूर्वी कधी कुणी केला होता काय ? तुकारामबुवांनी याही उदाहरणे आपल्या म्हणण्याच्या पुष्टीसाठी दिली आहेत प्रल्हाद हा हिरण्यकशिपूचा मुलगा पण याने भगवद्भक्तीचे अतिशय वेड म्हणून या बापाने प्रल्हादाचा अतिशय छळ केला प्रल्हादाने विष्णूची व नृसिंहाची प्रार्थना केली शेवटी नृसिंह प्रकट होऊन त्यांनी हिरण्यकशिपूचा वध केला अशी कथा आहे याप्रमाणे प्रल्हादाने आपल्या बापाची पर्वा केली नाही असा भावार्थ बिभीषण हा रावणाचा बंधू मोठा भगवद्भक्त होता रावणाने सीतेस चोरून आणले, रामास त्याग देण्याचे सुरवात केली, त्याच्याशी युद्ध आरंभिले म्हणून याने रावणास बराच उपदेश केला, पण तो त्यास पटला नाही मग बिभीषण रामास अनुकूल झाला त्याने सर्व माहिती रामास पुरविली युद्धात रामाकडूनच लढून याने धूम्राक्ष, प्रहस्त वगैरेंना ठार मारले भरत हा रामाचा बंधू आपली आई कैकयी हिच्या

मुळे रामास वनवासास जावे लागले असे समजताच याने आईस कटू शब्दानी फार दुखविले व आपण स्वत ही राज्याच्या त्यागास प्रवृत्त झाला. रामाच्या पादुका सिंहासनावर ठेवूनच भरत राज्यकारभार पाहात होता.

१०९ मान अपमान गोवें । अवघें गुंडूनी ठेवावें ॥ १ ॥
हेंचि देवाचें दर्शन । सदा राहे समाधान ॥ २ ॥
शांतीची वसती । तेथें खुंटे काळगती ॥ ३ ॥
आली ऊर्मी साहे । तुका म्हणे थोडें आहे ॥ ४ ॥

*शब्दार्थ व टीपा :– गोवें–पाश, गुंडूनी–गुंडाळून, खुंटे–थांबते, ऊर्मी–सुखदु खाची लाट*

*अर्थ – मान आणि अपमान याच्या पाशात गुंतून राहू नये. हे सारे विकार गुंडोळून ठेवावेत. १ यामुळे अत करण नेहमी समाधानी राहून यातच देवाचे दर्शन झाल्याचे सुख होईल. २ याच ठिकाणी खऱ्या शांततेची वस्ती असून कालचक्राचीही गती येथे खुंटेल. ३ जी जी सुखाची किंवा दु.खाची ऊर्मी येईल ती थोडी सहन करणे, शांतपणे तीस वार्गविणे, एवढे थोडे जमले म्हणजे झाले. ४*

विवरण.–मन ईश्वराकडे लावून शाश्वतचे समाधान मिळविण्याचा एक सोपा मार्ग म्हणजे मानापमान न मानता स्थिर बुद्धीने राहणे मान आणि अपमान याच्या वृथा जाणिवेमुळे अनेक प्रकारची दु से निर्माण होतात. भगवद्गीतेच्या तेराव्या अध्यायात ज्ञानी माणसाची जी लक्षणे आहेत त्यात ' अमानित्वम् ' हे पहिलेच लक्षण सागण्यात आले आहे ' पूज्यता डोळा न देखावी । स्वकीर्ती कानीं नायकावी । ' अशी स्थिती आपली असावी ' चातुर्य लपवी । महत्त्व हारवी । पिसेपण मिरवी ' अशी अवस्था ज्ञानी माणसाची असते. उलट मानसन्मानाची हाव धरली की अपमानच होऊ लागतो. ' मान इच्छी तो अपमान पावे ' असे तुकारामबुवानी म्हटले आहे

११० थोडें आहे थोडें आहे । चित्त साहे जालिया ॥ १ ॥
हर्षामर्ष नाहीं अंगीं । पांडुरंगीं सरले तें ॥ २ ॥
अवघ्या साधनाचें सार । न लगे फार शोधावें ॥ ३ ॥
तुका म्हणे लटिकें पाहें । सांडीं देह अभिमान ॥ ४ ॥

*शब्दार्थ व टीपा :– साहे–साहचर्य, हर्षामर्ष–आनद, दु ख, सरले–सपले, लटिके–खोटे, देहअभिमान–देह हा खरा असा अभिमान*

*अर्थ – जर आपले चित्त आपल्या साहचर्यास येईल तर ईश्वरप्राप्तीसाठी फार थोडे करावे लागेल १ ज्याच्या चित्तात सुखदुःखादी विकार उरले नाहीत त्याचे जीवन पांडुरंगातच विलीन झाले असे समजावे. २ सर्व साधनाचे सार हेच एक असल्याने आणखी दुसरे काही शोधावयास नको ३ तुकाराम महाराज म्हणतात, हा सर्व प्रपच व ही बाह्य सृष्टी या गोष्टी खोट्या असल्याने मना, तू त्याचा अभिमान सोड. ४*

विवरण –मानसन्मान सोडावा, अपमानाची फिकीर करू नये हे जसे खरे, तसेच या मार्गात राहणाऱ्या माणसाने सुखदु खाचीसुद्धा पर्वा करू नये गीतेत सागितल्याप्रमाणे ' सुखदु खे समे कृत्वा ' सुख आणि दु.ख याना समान वागवूनच आपण चालले पाहिजे ' सुखीं संतोषा न यावें । दु खीं विषादा न भजावें ' अशी ज्ञानेश्वराची ही शिकवण आहे ' सुखदु.खादि धर्मे । का शुभाशुभे कर्मे । दोन्ही ऐसी मनोधर्मे । नेणोचि जो । ' अशी अवस्था ईश्वरप्राप्तीसाठी सिद्ध झालेल्या माणसाची असते सुख, दु ख, हर्ष, अमर्ष, लाभ, अलाभ, जयाजय याच्या द्वंद्वातून त्यास पलीकडे जावयाचे असते.

१११ आतां उघडीं डोळे । जरी अद्यापि न कळे ॥
तरी मातेचिये खोळे । दगड आला पोटासि ॥ १ ॥
मनुष्यदेहा ऐसा निध । साधिलीं ते साधे सिद्ध ॥
करूनि प्रबोध । संत पार उतरले ॥ २ ॥

नाव चंद्रभागे तीरीं । उभी पुंडलीकाचे द्वारीं ॥
कट धरूनियां करीं उभाउभी पालवी ॥ ३ ॥
तुका म्हणे फुकासाठीं । पायीं घातली या मिठी ॥
होतो उठाउठी । लवकरीच उतार ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – खोळें–गर्भात, निध–निधी, साठा, प्रबोध–उपदेश, जागृति, कट–कटी, पालवी–खुणावतो, बोलावतो.

अर्थ :– एवढा जन्म वाया चालला, अजून तरी डोळे उघड. अजूनही तुला जर काहीच समजले नसेल तर मग तू आपल्या आईच्या पोटी खरेच दगड म्हणून जन्मलास असे मानणे भाग आहे १ चागला मनुष्यदेह तुला मिळाला आहे. याच मोलाच्या साठ्यामुळे तुला काय साधायचे आहे ते तू साध, असाच बोध सतानी केला असून ते स्वतःही ससार–सागराच्या पलीकडे गेले आहेत २ तुझ्यासाठीं ही नाव पढरपुरास चद्रभागेच्या तीरावर पुडलिकाच्या दारात हात कटीवर ठेवून उभी आहे. ती सर्वांना मोठ्या प्रेमाने आपल्याकडे उभ्या उभ्यानेच बोलावीत आहे, खुणावीत आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, या नावेस काही किमत मोजावी लागत नाही, ही फुकटच आहे नुसती पायास मिठी घालावी; मग या भवसागरातून पलीकडच्या तीरावर जावयास उशीर काहीच नाही ४

११२ न करी संग राहे रे निश्चळ । लागो नेदी मळ ममतेचा ॥ १ ॥
या नावे अद्वैत खरे ब्रह्मज्ञान । अनुभवावांचून बडबड ते ॥ २ ॥
इंद्रियांचा जय वासनेचा क्षय । संकल्पा[1] ही न ये वरी मन ॥ ३ ॥
तुका म्हणे न ये जाणीव अंतरा । अंतरीं या धारा आनंदाचा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– सग–सगत, निश्चळ–स्थिर, अद्वैत–आपण व ईश्वर, जीव व शिव, आत्मा व परमात्मा एक आहोत ही अनुभूती, क्षय–नाश, जाणीव–मी वेगळा ही दुजेपणाची कल्पना

अर्थ :– तू आता इतर कुणाच्याही सगतीत पडू नकोस, अगदी स्थिर रहा तू. कुठल्याही सबंधाचा किंवा ममत्वाचा मळही तू स्वत स लावून घेऊ नकोस. १ अशा या अवस्थेसच ब्रह्मज्ञान किंवा अद्वैतज्ञान असे नाव असून याची जाणीव अनुभवाखेरीज येणार नाही. अनुभवाशिवाय बोलणे व्यर्थ बडबडच मानावी लागेल २ या अवस्थेत इद्रियादी विषयाचा जय होऊन वासनेचा नाश होत असतो विविध विषयावरील वासनाची आसक्ती सपते आणि देहादिक वृत्तींचे किंवा बाह्य प्रपचाचे मनातील सकल्पही सपतात. ३ मी निराळा, मी वेगळा अशी जाणीवच या अवस्थेत मनात उरत नाहीं. सर्वच आनदी आनद याचेच राज्य असते, असे तुकाराम महाराज म्हणतात. ४

११३ पंढरीचा महिमा । देता आणीक उपमा ॥ १ ॥
ऐसा ठाव नाहीं कोठें । देव उभाउभी भेटे ॥ २ ॥
आहेति सकळ । तीर्थे काळें देती फळ ॥ ३ ॥
तुका म्हणे पेठ । भूमिवरी हे वैकुंठ ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – ठाव–ठिकाण, काळें–कालातराने, पुष्कळ काळाने, उभाउभीं–तावडतोब, पेठ–बाजाराचे मुख्य ठिकाण,

अर्थ :– पढरपूरचा महिमा वर्णन करताना दुसरी उपमाच उपयोगी पडत नाही १ कारण या क्षेत्रासारखे ठिकाण इतरत्र कुठेच नाही देव येथे तावडतोब भेटतो २ बाकीची तीर्थे पुष्कळ असली तरी त्याचेकडून इष्ट फळ बऱ्याच काळानतर मिळते ३ तुकाराम महाराज म्हणतात, हे पढरपूर म्हणजे भक्तीचे मुख्य ठिकाण असून हे भूवरचे प्रत्यक्ष वैकुठच आहे. ४

---

१ सकल्पा ही वरी न ये मन

मुळे रामास वनवासास जावे लागले असे समजताच याने आईस कटू शब्दानी फार दुखविले व आपण स्वतःही राज्याच्या त्यागास प्रवृत्त झाला. रामाच्या पादुका सिंहासनावर ठेवूनच भरत राज्यकारभार पाहात होता

१०९ मान अपमान गोवें । अवघें गुंडूनी ठेवावें ॥ १ ॥
हेंचि देवाचें दर्शन । सदा राहे समाधान ॥ २ ॥
शांतीची वसती । तेथें खुंटे काळगती ॥ ३ ॥
आली ऊर्मी साहे । तुका म्हणे थोडें आहे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– गोवें–पाश, गुंडूनी–गुडाळून, खुंटे–थांबते, उर्मी–सुखदु खाची लाट

अर्थ – मान आणि अपमान यांच्या पाशांत गुंतून राहू नये. हे सारे विकार गुंडाळून ठेवावेत. १ यामुळे अंत करण नेहमी समाधानी राहून यातच देवाचे दर्शन झाल्याचे सुख होईल. २ याच ठिकाणी खऱ्या शांततेची वस्ती असून कालचक्राचीही गती येथे खुंटेल. ३ जी जी सुखाची किंवा दुःखाची उर्मी येईल ती थोडी सहन करणे, शांतपणे तीस वागविणे, एवढे थोडे जमले म्हणजे झाले. ४

विवरणः–मन ईश्वराकडे लावून शाश्वतचे समाधान मिळविण्याचा एक सोपा मार्ग म्हणजे मानापमान न मानता स्थिर बुद्धीने राहणे मान आणि अपमान याच्या वृथा जाणिवेमुळे अनेक प्रकारची दु.खे निर्माण होतात. भगवद्गीतेच्या तेराव्या अध्यायात ज्ञानी माणसाची जी लक्षणे आहेत त्यात 'अमानित्वम्' हे पहिलेच लक्षण सांगण्यात आले आहे 'पूज्यता डोळा न देखावी । स्वकीर्ती कानीं नायकावी ।' अशी स्थिती आपली असावी. 'चातुर्य लपवी । महत्त्व हारवी । पिसेपण मिरवी' अशी अवस्था ज्ञानी माणसाची असते. उलट मानसन्मानाची हाव धरली की अपमानच होऊ लागतो. 'मान इच्छी तो अपमान पावे' असे तुकारामबुवानी म्हटले आहे.

११० थोडें आहे थोडें आहे । चित्त साहे जालिया ॥ १ ॥
हर्षामर्ष नाहीं अंगीं । पांडुरंगीं सरलें ते ॥ २ ॥
अवघ्या साधनांचें सार । न लगे फार शोधावें ॥ ३ ॥
तुका म्हणे लटिकें पाहें । सांडीं देह अभिमान ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– साहे–साहाय्यास, हर्षामर्ष–आनंद, दु ख, सरले–संपले, लटिकें–खोटे, देहअभिमान–देह हा खरा असा अभिमान

अर्थ – जर आपले चित्त आपल्या साहाय्यास येईल तर ईश्वरप्राप्तीसाठी फार थोडे करावे लागेल. १ ज्याच्या चित्तात सुखदुःखादी विकार उरत नाहीत त्याचे जीवन पांडुरंगातच विलीन झाले असे समजावे. २ सर्व साधनाचे सार हेच एक असल्याने आणखी दुसरे काही शोधावयास नको. ३ तुकाराम महाराज म्हणतात, हा सर्व प्रपच व ही बाह्य सृष्टी या गोष्टी खोट्या असल्याने मना, तू त्याचा अभिमान सोड. ४

विवरण–मानसन्मान सोडावा, अपमानाची फिकीर करू नये हे जसे खरे, तसेच या मार्गात राहणाऱ्या माणसाने सुखदु खाचीमुद्दा पर्वा करू नये गीतेत सांगितल्याप्रमाणे 'सुखदु खे समे कृत्वा' सुख आणि दुःख याना समान वागवूनच आपण चालले पाहिजे 'सुखीं संतोषा न यावें । दु खीं विषादा न भजावें' अशी ज्ञानेश्वराची ही शिकवण आहे. 'सुखदुःखादि धर्मे । कां शुभाशुभे कर्मे । दोनी ऐसी मनोधर्मे । नेणोचि जो ।' अशी अवस्था ईश्वरप्राप्तीसाठी सिद्ध झालेल्या माणसाची असते. सुख, दु.ख, हर्ष, अमर्ष, लाभ, अलाभ, जयाजय याच्या द्वद्वातून त्यास पलीकडे जावयाचे असते.

१११ आतां उघडीं डोळे । जरी अद्यापि न कळे ॥
तरी मातेचिये खोळे । दगड आला पोटासि ॥ १ ॥
मनुष्यदेहा ऐसा निध । साधिलीं ते साधे सिद्ध ॥
करूनि प्रबोध । संत पार उतरले ॥ २ ॥

नाव चंद्रभागे तीरीं । उभी पुंडलीकाचे द्वारीं ॥
कट धरूनियां करीं उभाउभी पालवी ॥ ३ ॥
तुका म्हणे फुकासाठीं । पायीं घातली या मिठी ॥
होतो उठाउठी । लवकरीच उतार ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – खोळें–गर्भात, निध–निधी, साठा, प्रबोध–उपदेश, जागृति, कट–कटी, पालवी–खुणावतो, बोलावतो

अर्थ :– एवढा जन्म वाया चालला, अजून तरी डोळे उघड. अजूनही तुला जर काहीच समजले नसेल तर मग तू आपल्या आईच्या पोटी खरेच दगड म्हणून जन्मलास असे मानणे भाग आहे १ चागला मनुष्यदेह तुला मिळाला आहे. याच मोलाच्या साठ्यामुळे तुला काय साधायचे आहे ते तू साध, असाच बोध संतानी केला असून ते स्वत ही संसार–सागराच्या पलीकडे गेले आहेत २ तुझ्यासाठीं ही नाव पढरपुरास चद्रभागेच्या तीरावर पुडलिकाच्या दारात हात कटीवर ठेवून उभी आहे. ती सर्वांना मोठ्या प्रेमाने आपल्याकडे उभ्या उभ्यानेच बोलावीत आहे, खुणावीत आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, या नावेस काही किंमत मोजावी लागत नाही, ही फुकटच आहे. नुसती पायास मिठी घालावी; मग या भवसागरातून पलीकडच्या तीरावर जावयास उशीर काहीच नाही ४

११२ न करी संग राहे रे निश्चळ । लागो नेदी मळ ममतेचा ॥ १ ॥
या नावे अद्वैत खरे ब्रह्मज्ञान । अनुभवाचांचून बडबड ते ॥ २ ॥
इंद्रियांचा जय वासनेचा क्षय । सकल्पा[१] ही न ये वरी मन ॥ ३ ॥
तुका म्हणे न ये जाणीव अंतरा । अंतरीं या धारा आनंदाचा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– सग–सगत, निश्चळ–स्थिर, अद्वैत–आपण व ईश्वर, जीव व शिव, आत्मा व परमात्मा एक आहेत ही अनुभूती, क्षय–नाश, जाणीव–मी वेगळा ही दुजेपणाची कल्पना

अर्थ :– तू आता इतर कुणाच्याही सगतीत पडू नकोस, अगदी स्थिर रहा तू. कुठल्याही सबंधाचा किंवा ममत्वाचा मळही तू स्वत स लावून घेऊ नकोस. १ अशा या अवस्थेसच ब्रह्मज्ञान किंवा अद्वैतज्ञान असे नाव असून याची जाणीव अनुभवाखेरीज येणार नाही. अनुभवाशिवाय बोलणे व्यर्थ बडबडच मानावी लागेल २ या अवस्थेत इद्रियादी विषयाचा जय होऊन वासनेचा नाश होत असतो विविध विषयावरील वासनाची आसक्ती सपते आणि देहादिक वृत्तींचे किंवा बाह्य प्रपचाचे मनातील सकल्पही सपतात. ३ मी निराळा, मी वेगळा अशी जाणीवच या अवस्थेत मनात उरत नाहीं. सर्वच आनदी आनद याचेच राज्य असते, असे तुकाराम महाराज म्हणतात ४

११३ पंढरीचा महिमा । देतां आणीक उपमा ॥ १ ॥
ऐसा ठाव नाही कोठें । देव उभाउभी भेटे ॥ २ ॥
आहेति सकळ । तीर्थे काळें देती फळ ॥ ३ ॥
तुका म्हणे पेठ । भूमिवरी हे वैकुंठ ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – ठाव–ठिकाण, काळें–कालातराने, पुष्कळ काळाने, उभाउभीं–तावडतोब, पेठ–बाजाराचे मुख्य ठिकाण,

अर्थ :– पढरपूरचा महिमा वर्णन करताना दुसरी उपमाच उपयोगी पडत नाही १ कारण या क्षेत्रासारखे ठिकाण इतरत्र कुठेच नाही. देव येथे तावडतोब भेटतो २ बाकीची तीर्थे पुष्कळ असली तरी त्याचेकडून इष्ट फळ बऱ्याच काळानतर मिळते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, हे पढरपूर म्हणजे भक्तीचे मुख्य ठिकाण असून हे भूवरचे प्रत्यक्ष वैकुंठच आहे. ४

१ सकल्पा ही वरी न ये मन

**विवरण** :– या एका छोटया व गोड अभगात भूवरचे वैकुठ म्हणजे विष्णुलोक म्हणून मानलेल्या पढरपूरचा महिमा वर्णन केला आहे श्रीविठ्ठल हे दैवत पुडलिकासाठी ज्या क्षेत्रात स्थिरावले ते हे पढरपूर भागवत सांप्रदायिकाना वैकुठापेक्षाही प्रिय वाटल्याने अनेक सतानी पढरपूरचे माहात्म्य मोठया तन्मयतेने वर्णन केले आहे

पुडलिकाचा काळ अनिश्चित असल्याने पढरपूरच्या इतिहासासबधीही निश्चित असे सागता येत नाही पूर्वी पढरपुरास पाडुरगपूर, पडरिपूर, फागनिपूर, पौंडरीक क्षेत्र, पडरगे, पाडरगपल्ली, पढरी इत्यादी नावानी ओळखत असत असा पुरावा ऐतिहासिक कागदपत्रातून मिळतो पौडरिक हे नाव पुडरीक यावरून बनले असावे या पढरपूरच्या विठ्ठलाचे उपासक ज्ञानेश्वर-नामदेव याच्या आधीपासून किती तरी असावेत पद्मपुराणातील सह्याद्री अथवा उत्तर खडातील १७६ व्या अध्यायात पैठणच्या ज्ञानश्रुति नावाच्या राजाच्या सारथ्याची हकीगत आली आहे तो अनेक क्षेत्रे हिंडत हिंडत *श्रीशैलानतर पढरपूर येथे आला होता सन ५१६ च्या एका ताम्रपटात पाण्डरगपल्ली असा* पढरपूरचा उल्लेख आलेला आहे सन १२३६ च्या सुमाराचा पढरपूरचा शिलालेख जो साळखाबी मडपाच्या तुळईवर आहे त्यात पडरगे असा उल्लेख आलेला आहे यानतर १२४९ च्या एका शिलालेखात 'पौडरीक क्षेत्र' असे पढरपूरास म्हटले आहे १२७० च्या एका लेखात पाडुरगपूर असाही उल्लेख आहे प्रसिद्ध चौऱ्यायशीच्या शिलालेखात पढरपूरास फागनिपूर म्हटले आहे हा सन १२७३ चा आहे हेमाद्रीच्या चतुर्वर्गचिंतामणि नावाच्या ग्रथात पौंडरिक क्षेत्राचे वर्णन आहे चोखोबाच्या समाधीपाशी असलेल्या एका शिलालेखात सन १३११ मध्ये पडरिपूर असा निर्देश आला आहे इ स १४९०–१५०८ च्या सुमारास निजामशाहीत दलपतिराज नावाचा एक अर्थमत्री होऊन गेला याच्या नृसिंहप्रसाद नावाच्या ग्रथात पुडरीक क्षेत्राची माहिती आहे शामजी गोसावी वाजरखेडे नावाच्या एका कवीने सन १५०५ मध्ये एका कवितेत **'पुरातन स्थळ आमुचे पढरपूर'** *असा उल्लेख केलेला दिसतो बगालचे प्रसिद्ध वैष्णव* श्रीचैतन्यप्रभू किंवा गौरागदेव सन १५१०–११ मध्ये दक्षिणेत आले होते त्याच्या पढरपूरभेटीचा उल्लेख कृष्णदास कविराजाने **'तथा होईते पाण्डुपुर आइला गौरचद्र । विठ्ठल ठाकूर देखि पाइल आनद'** असा उल्लेख केला आहे

*याप्रमाणे अनेक ऐतिहासिक उल्लेख पढरपूरचे मिळतात मराठी सताच्या दृष्टीने तर अवघ्या विश्वात* पढरपूरसारखे क्षेत्र नाही असा गौरवाचा भाग त्याच्या अभगात वारवार येतो **'पढरीचे सुख नाही त्रिभुवनीं'** **'अवघी पढरी भूवैकुठ नगरी', 'इनामाची मरली पेठ । भूवैकुठ पढरी'** 'चोखा म्हणे पाहता पढरी भूवैकुठ। मनाचे हे कष्ट दूर गेले', 'अगाध भूवैकुठ नगरी । पढरी हे चराचरीं' यासारख्या अनेक पक्तीतून चोखोबानी पढरपूरचा महिमा प्रेमाने गाइला आहे **'चाप तीर्थ पढरी । भूवैकुठ महीवरी काशी अयोध्या अवति काति । मथुरा माया गोमती । ऐशीं तीर्थे इत्यादिके आहेती । परि सरी न पवती पाडुरगीं'** असा भाषेत स्वत ज्ञानेश्वरानी पढरपूरचा गौरव केला आहे **'इच्छितात देव पढरीचा वास', 'बहुत तीर्थे क्षेत्रें बहुतापरी । न पावती सरी पढरीची', 'उदड तीर्थे, उदड क्षेत्रे । परि पवित्र पढरी ।', 'बहुता काळाचे हें क्षेत्र । सकळ देवाचे माहेर । सकळ सताचे निजमदिर । तें हे पढरपूर जाणावें', 'माझें माहेर पढरी । आहे भीवरेच्या तीरीं'** इत्यादी ओळीतून एकनाथानी पढरपूरचे वर्णन केले आहे **'धन्य धन्य हें नगर । भूवैकुठ पढरपूर'** म्हणून भानुदासाचा उल्लेख आहे **'पढरीचे सुख पाहता अलौकिक । वैकुठनायक उभा जेथें'** असा आणखी एक त्याचा अभग प्रसिद्ध आहे नामदेवरायानी तर पढरपूरचे वर्णन मोठया प्रेमळपणाने व मुक्तकठाने केले आहे **'पढरी हे क्षेत्र पावनपवित्र । महिमा विचित्र त्रिभुवनीं', 'ऐसे तीर्थ कोणी दाखवा गोमटें । जेथें प्रत्यक्ष हे भेटे परब्रह्म', 'बरवे बरवे पढरपूर । विठोबा रायाचे नगर', 'वैकुठासी आम्हा नको धाडू हरी । वास दे पढरी सर्वकाळ'** *इत्यादी ओळीतून नामदेवरायाचा पढरीप्रेमा* उफाळून आला आहे

इतकेच काय पण वैकुठनगरापेक्षाही पढरपूर अधिक असून सर्व जगतात प्रथम पढरपूरच उभे राहिले असा अर्थाचा नामदेवाचाच एक अति गोड अभग आहे तो सबध देण्याचा मोह होतो

**आधी रचिली पढरी । मग वैकुठ नगरी ॥ १ ॥ जेव्हा नव्हतें चराचर । तेव्हा होते पढरपुर ॥ २ ॥**
**जेव्हा नव्हती गोदा गगा । तेव्हा होती चद्रभागा ॥ ३ ॥ चद्रभागेच्या तटी । धन्य पढरी गोमटी ॥ ४ ॥**
**नासिलिया भूमडळ । उरे पढरी मडळ ॥ ५ ॥ असे सुदर्शनावरी । म्हणूनि अविनाश पढरी ॥ ६ ॥**
**नामा म्हणे बा श्रीहरी । ते म्या देखिली पढरी ॥ ७ ॥**

तुकाराम महाराजांना पंढरपूरबद्दल अपार प्रीती वाटावी यात नवल काय ? ते तर त्यांच्या जिव्हारीचे गूज होते 'जाय जाय तू पंढरी । होय होय वारकरी', 'जा रे तुम्ही पंढरपुरा । तो सोयरा दीनाचा', 'पंढरीसी जा रे आलेनो संसारा । दीनाचा सोयरा पांडुरंग ।', 'आमुची मिरास पंढरी । आमुचे घर भीमातीरीं', 'पावलो पंढरी वैकुंठ भुवन । धन्य आजि दीन सोनियाचा', 'पंढरीचे मार्गे माहेर साजणी । ओवीये कांडणी गाऊं गीत', 'धन्य पुंडलिका बहु बरें केलें । निधान आणलें पंढरीये', 'धन्य ते पंढरी धन्य भीमातीर । आणियेलें सार पुंडलीकें', 'धन्य धन्य पंढरी । जे मोक्षाची अक्षयपुरी', 'धन्य झालो हो संसारी । आम्ही देखिली पंढरी', 'पंढरीचो वारी जयाचिये घरीं । पाय-धुळी शिरीं वंदिन त्याची' इत्यादी शेकडो वचनांतून तुकाराम महाराजांनी पंढरीमाहात्म्य तन्मयतेनं वर्णन केले आहे

असा हा पंढरपूरचा ध्यास मराठीतील सर्व साधुसंतांना दिसून येतो त्यांना दुसरे तीर्थ नको, क्षेत्र नको, सारी दुःखे एका पंढरीच्या दर्शनाने नाहीशी होतात म्हणून तर आषाढीकार्तिकीस लाखो लोक पंढरपुरास जाऊन विसावतात माहेरी आल्याचे सुख त्यांना याच पंढरपूरक्षेत्रात मिळते

११४ तिर्थी धोंडा पाणी । देव रोकडा सज्जनी ॥ १ ॥
मिळालिया संतसंग । समर्पितां भलें अंग ॥ २ ॥
तीर्थी भाव फळे । येथें आनाड ते वळे ॥ ३ ॥
तुका म्हणे पाप । गेले गेल्या काळें ताप ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – रोकडा–खराखुरा, भलें अंग–आपले सर्वस्व, आनाड–अडाणी मनुष्य

अर्थ – कोठल्याही तीर्थस्थानात जा, तेथे धोंडा व पाणी याचाच सुकाळ दिसेल मनात भाव नसेल तर तीर्थात दुसरे काय दिसणार ? खरोखर देव पाहावयाचा असेल तर तो साधुसंतांच्या रूपातच पाहावा १ सतसंगती प्राप्त होताच आपण आपले सर्वस्व त्यांना अर्पण करावे म्हणजे देवत्वाची खूण पटते २ तीर्थस्थानावर गेल्यावर मनात शुद्ध भाव व भक्ती असेल तरच त्याचा उपयोग होतो, पण संतसंगतीत अडाणी मनुष्य असला तरीही त्याचा उद्धार होऊ शकतो ३ तुकाराम महाराज म्हणतात, माणसाचे त्रिविध ताप नाहीसे झाले की तो निष्पाप झाला असे समजते ४

११५ घेऊनिया चक्र गदा । हाच धंदा करी तो ॥ १ ॥
भक्तां राखे पायापासीं । दुर्जनासी संहारी ॥ २ ॥
अव्यक्त ते आकारलें । रूपा आलें गुणवंत ॥ ३ ॥
तुका म्हणे पुरवी इच्छा । जया तैसा विठ्ठल ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – चक्र–शत्रूचा नाश करणारे सुदर्शन चक्र

अर्थ – हा विठ्ठल हातात गदाचक्र घेऊन हाच उद्योग करतो १ दुर्जनाचा, वाईट लोकांचा संहार करून आपल्या भक्तांचे रक्षण करणे हेच याचे काम असते २ याच कामासाठी अव्यक्त परब्रह्म आकारास आले, नाना गुणांनी सालंकृत झाले ३ तुकाराम महाराज म्हणतात, हा विठ्ठल ज्याची त्याची इच्छा पूर्ण करतो ४

विवरण – दुर्जनांच्या नाशासाठी व साधुसज्जनांच्या रक्षणासाठीच परमेश्वराचा अवतार असतो हे गीतेने 'परित्राणाय साधूनां विनाशाय च दुष्कृताम्' या श्लोकार्धात प्रकट केलेच आहे अधर्माचे प्राबल्य माजले की भगवंतास धर्मसंस्थापनेसाठी अवतार धारण करावा लागतो अशा प्रकारे अवतार घेऊन परमेश्वर भक्तांचे रक्षण कसे करतो यासंबंधी ज्ञानेश्वरांनी फार चांगले व समर्पक असे वर्णन केले आहे 'दैत्यांचीं कुळें नाशीं । साधूंचा मानु गिंवसीं । धर्मासीं नीतीसीं । शेज करीं ॥ मी अविवेकाची काजळी । फेडूनि विवेकदीप उजळीं । तैं योगियां पाहे दिवाळी । निरंतर ॥' शंख, चक्र, गदा, पद्म ही परमेश्वराची आयुधे या एका उद्योगासाठी असतात दुष्टांचा नाश, सज्जनांचे रक्षण व धर्मसंस्थापना ही कामे ईश्वरास अवतार घेऊन करावी लागतात

११६ देखोनि पुराणिकांचीं दाढी । रडे फुंदे नाक ओढी ॥ १ ॥
प्रेम खरें दिसे जना । भिन्न अंतरीं भावना ॥ २ ॥
आवरितां नावरे । खुर आठवी नेवरे ॥ ३ ॥
बोलों नये मुखावाटां । म्हणे होता त्यांचा तोटा ॥ ४ ॥
दोन्ही सिंगे चारी पाय । खुणा दावी म्हणे होय ॥ ५ ॥
मनां आणितां बोकड । मेला त्याची चरफड ॥ ६ ॥
होता भाव पोटीं । मुखा आलासे शेवटीं ॥ ७
तुका म्हणे कुडें । फळो येतें तें रोकडें ॥ ८ ॥

शब्दार्थ व टीपा :– नावरे–आवरत नाही, नेवरे–पाडरे, कुडें–खोटे

अर्थ – या अभंगात हरिदासपुराणिकाच्या कीर्तनात येणारी एक गमतीची पण मोठ्या बोधाची गोष्ट विनोदी पद्धतीने तुकाराम सांगतात. ज्याचा एक लाडका बोकड नुकताच मेला आहे असा धनगर पुराणिक बुवांचे पुराण कसे तन्मयतेने पण एका निराळ्याच अर्थाने समजावून घेत होता त्याचे मोठे गमतीचे वर्णन येथे आहे. पुराणिक बुवांची दाढी पाहताच त्याला स्फुंदून स्फुंदून रडू आले; नाक पुसण्याचा प्रसंग आला लोकाना वाटले काय निरुपणाचा परिणाम ! किती प्रेमळ श्रोता ! त्याच्या मनातील भाव मात्र निराळा होता. नुकताच मेलेला आपला दाढीवाला बोकड त्यास आठवला १ त्याच्या मनात खरे प्रेम नव्हते तरी वरवर लोकाना ते खरेच प्रेम वाटले २ त्याला रडे आवरेना. बोकडाचे खुर व नख्या त्याला एकसारख्या समोर दिसत होत्या ३ तो म्हणू लागला, काय सांगू हो ? हा माझा बोकड वियाण्याचा म्हणून राखलेला होता तोच गेला हो. पुराणिकाना एका बीजाचा हा विस्तार कसा हे सांगितले तेव्हा त्यास आपल्या 'त्याच्या' बोकडाची आठवण झाली ४ पुराणिक बुवा सांगत होते, एक पुरुष, एक प्रकृती, चार वेद किंवा ईश्वराची चार रूपे तो धनगर बुवांच्या दोन व चार बोटाचा अर्थ मनाशी समजत होता, हो हो माझ्या बोकडास दोन शिंगे होती, चार पाय होते. ५ कारण या धनगराच्या अंत.करणात मेलेल्या बोकडाचे दुःख होते. त्याचे चित्त पुराणात नव्हतेच ६ जो भाव त्याच्या अंत.करणात होता तोच शेवटी त्याच्या मुखातून बाहेर पडला. ७ तुकाराम महाराज म्हणतात, अंत.करणात असणारी खोटी भावना शेवटी केव्हा तरी प्रकट होतेच ८

११७ दुर्जनाची गंधी विष्ठेचिया परी । देखोनियां दुरी व्हावें तया ॥ १ ॥
अइका ही तुम्ही मात हे सज्जन । करूं संघष्टन नये बोलों ॥ २ ॥
दुर्जनाचे अंगीं अखंड विटाळ । वाणी रजस्वला स्रवे तैशी ॥ ३ ॥
दुर्जनाचें भय धरावें त्यापरी । पिसाळलेवरी धांवे श्वान ॥ ४ ॥
दुर्जनाचा भला नव्हे अंगसंग । बोलिलासे त्याग देशाचा त्या ॥ ५ ॥
तुका म्हणे किती सांगावें पृथक । अंग कुंभीपाक दुर्जनाचें ॥ ६ ॥

११८ अतिवादी नव्हे शुद्ध या बीजाचा । ओळखा जातीचा अत्यज[1] तो ॥ १ ॥
वेद श्रुति नाहीं ग्रंथ ज्या प्रमाण । श्रेष्ठाचे वचन न मानी जो ॥ २ ॥
तुका म्हणे मद्यपानाचे मिष्टान्न । तैसा तो दुर्जन शिवो नये ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा – अतिवादी–वृथा वादविवाद करणारा

अर्थ – विनाकारण वितंडवाद करून भांडणारा मनुष्य हा शुद्ध बीजाचा नाही असेच समजावे. तो जातीने अत्यज म्हणजे महार समजावा १ कारण त्याला वेदाचे किंवा श्रुतीचे वचनच मान्य नसते, श्रेष्ठ माणसाचे वचन तो ऐकत नाही, मानीत नाही २ तुकाराम महाराज म्हणतात, मद्यपानाचे गोड अन्न जसे त्याज्य तसे या दुर्जनास शिवू सुद्धा नये ३

११९ शब्दा नाहीं धीर । ज्याची बुद्धि नाहीं स्थिर ॥ १ ॥
त्याचे न व्हावे दर्शन । खळा पगती भोजन ॥ २ ॥
सतास जो निंदी । अधम लोभासाठीं वंदी ॥ ३ ॥
तुका म्हणे पोटीं । भाव अणीक जया होटीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा –धीर–एकवाक्यता खळा–दुष्टाच्या होटीं–ओठात

अर्थ – ज्याच्या बोलण्यात एकवाक्यता नाही, निश्चय नाही, त्याची बुद्धीच स्थिर नाही असे समजावे १ त्याचे दर्शनसुद्धा घेऊ नये, की या दुर्जनाच्या पगतीला जेवण घेऊ नये २ कारण हा दुष्ट मनुष्य सतसज्जनांची निंदा करतो व अधम लोकाची स्तुती करतो त्याची सगतच नको ३ तुकाराम महाराज म्हणतात, त्याच्या पोटात भाव एक व ओठात म्हणजे बोलण्यात दुसराच, त्याचे दर्शनसुद्धा नको

१२० चोरें चोरातें करावा उपदेश । आपुला अभ्यास असेल तो ॥ १ ॥
शिंदळीच्या मागें[2] वेचिता पाउलें । होईल आपुलें तिच्या ऐसें ॥ २ ॥
तुका म्हणे मितो पुढिलिया दत्ता । म्हणऊनि चिंता उपजली ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा – शिंदळीच्या–वाईट चालीच्या स्त्रीच्या, दत्ता–पुढे उभे राहिलेल्या, उपजली–निर्माण झाली

अर्थ – चोराने चोरानाच उपदेश दिल्यावर तो तरी दुसरा काय देणार ? जो त्याचा नित्याचा चोरीचा अभ्यास असेल तोच शिकविणार तो १ एखाद्या वाईट चालीच्या स्त्रीच्या घरी आपण गेलो तर आपण तिच्या-प्रमाणेच होणार २ तुकाराम महाराज म्हणतात, यापुढ आता अशा विपरीत सगतीमुळे पुढे काय काय भयानक स्थिती लोकाची होणार या सबधी चिंताच वाटू लागली आहे ३

१२१ मांडवाच्या दारा । पुढें आणिला म्हातारा ॥ १ ॥
म्हणे नवरी आणा राड । जाळा नवऱ्याचें तोंड ॥ २ ॥
समय न कळे । काय उपयोगीं ये वेळें ॥ ३ ॥
तुका म्हणे खरा । येथूनिया दूर करा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – खरा–गाढवाला

अर्थ – कोणत्या वेळी काय बोलावे हे न समजणाऱ्या लोकाना उद्देशून बुवा म्हणत आहेत एका लग्नात पुढारीपण एका म्हाताऱ्यास दिले मांडवाच्या दारातच त्याला उभे करून व्यवस्था पाहायला सांगितली १ तर

१ अधम, २ अगणी

तो प्रसंग न ओळखता वाटेल तसे बडबडू लागला, म्हणाला, त्या रांड नवरीला आणा त्या नवऱ्याचे तोंड जाळा २ त्याच्या मनात नसेल, पण असे अपशब्द या प्रसंगी का तोंडातून काढायचे ? यावेळी त्याचा विपरीत परिणामच होणार ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा प्रसंगातून यासारख्या गाढवांना प्रथम दूर करा ४

१२२ काहीं नित्यनेमाविण । अन्न खाय तोचि श्वान ॥
वाया मनुष्यपण । भार वाहे तो वृषभ ॥ १ ॥
त्याचा होय भूमी भार । नेणें यातीचा आचार ॥
जाला दावेदार । भोगवी अघोर पितरांसि ॥ २ ॥
अखंड अशुभ वाणी । खरें न बोलेचि स्वप्नीं ॥
पापी तयाहुनी । आणीक नाहीं दुसरा ॥ ३ ॥
पोट पोसी एकला । भूतीं दया नाहीं ज्याला ॥
पाठीं लागे आल्या । अतिताचे दाराशीं ॥ ४ ॥
काहीं संताचे पूजन । न घडे तीर्थाचे भ्रमण ॥
यमाचा आदण । सीण थोर पावेल ॥ ५ ॥
तुका म्हणे त्यानीं । मनुष्यपणा केली हानी ॥
देवा विसरूनी । गेलीं म्हणता मी माझें ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – वाया–व्यर्थ वृषभ–बैल, यातीचा–जातिकुळाचा, आदण–देणगी, सीण–श्रम, दुःख

अर्थ – रोज काही तरी नामस्मरण, नित्यपाठ, भजन, गीताभागवतश्रवण यासारखा नित्यनेम न करता जो अन्न सेवन करतो तो कुत्र्याच्या जातीचा मानावा मनुष्यजन्माला येऊन तो वायाच गेला, केवळ बैलाप्रमाणे संसाराचा फुकट भार त्याने वाहिला १ कारण अशा माणसाचा भूमीला फुकट भार होतो, कारण हा आपल्या घराण्याचा काय आचार आहे, कुलाचार आहे, हेच विसरतो, त्यामुळे तो कुळाचाच दावेदार बनलेला असल्याने त्याचे सर्व पितर अघोर अशा नरकातच खितपत पडतात २ त्याची वाणी नेहमी अमंगल असून तो स्वप्नातही चुकून खरे बोलत नाही त्याच्याशिवाय दुसरा कोणीही पापी नाही ३ तो केवळ स्वतःचे पोट भरीत असतो त्याला इतर प्राणिमात्राबद्दल कधीही दया वाटत नाही दाराशी एखादा अतिथि जरी आला तरी त्याच्या पाठीशी लागून तो त्याला पिटाळून लावतो ४ साधुसंताचे पूजन करावे, तीर्थाचे भ्रमण करावे या गोष्टी याला माहितच नसल्यामुळे हा यमाचेच भक्ष्य बनलेला असतो ही एक थोर अशी यमाला विनासायास देणगीच मिळते ५ तुकाराम महाराज म्हणतात, अशा प्रकारच्या माणसाने सर्व मनुष्यपणाची हानी केली आहे कारण जगच्चालक परमेश्वरास विसरून हा 'मी मी, माझे माझे' करीत असतो याचा जन्म व्यर्थ गेला असेच समजावे ६

१२३ कन्या गो करी कर्येचा विकरा । चांडाळ तो खरा तया नांवे ॥ १ ॥
गुण अवगुण हे दोन्ही प्रमाण । यातिशीं कारण नाहीं देवा ॥ २ ॥
जे जैसे करिती ते तैसे पावती । भोग ते भोगिती केले कर्मी ॥ ३ ॥
आशाबद्ध नये करूं तें करिती । तुका म्हणे जाती नरकामधीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – गो–गाय, विकरा–विक्री, कारण–कर्तव्य

अर्थ – स्वतःची मुलगी, गाय किंवा कया याची विक्री पैसे घेऊन जो करतो तो खरोखरीच नावाने चांडाळच होय १ माणसाचे गुण काय किंवा अवगुण काय हे त्याच्या ईश्वरनिष्ठेवरून ठरवायचे, जातीशी येथे काही कर्तव्य नाही जातीवर काही अवलंबून नाही २ जशी कर्मे एखाद्याच्या हातून होतील तशी फळे त्याला प्राप्त होतील व

त्याच्या कर्माप्रमाणे त्याला फळे भोगावी लागतील ३ आशेच्या लोभाने जे लोक करू नये ती कर्मे करतात ते नरकासच जातील असे तुकाराम महाराज म्हणतात ४

१२४ हरिहरा भेद । नाहीं करूं नये वाद ॥ १ ॥
एक एकाचे हृदयीं । गोडी साखरेच्या ठायीं ॥ २ ॥
भेदकासी नाड । एक वेलांटीच आड ॥ ३ ॥
उजवे वामांग । तुका म्हणे एकचि अंग ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – हरि व हर–विष्णू व शंकर, नाड–अडचण, वामांग–डावे अंग

अर्थ – विष्णू व शंकर एकच असल्याने या विषयी वाद करू नये १ शंकराच्या हृदयात विष्णू व विष्णूच्या हृदयात शंकर आहे गोडी जशी साखरेशी एकजीव झालेली असते तसे हे ऐक्य असते २ फरक करणायाला अडचण फक्त एका वेलांटीचीच दिसून येते ३ पण तुकारामबुवा म्हणतात, डावे अंग काय, उजवे काय, दोनही एकच होत ४

विवरण – प्राचीन धर्मग्रंथात व पुराणात अनेक ठिकाणी विष्णू व शिव अथवा हरी व हर यांच्यात अभेद वर्णन केला आहे शिव व विष्णू हे परस्परांची उपासना करणारे आहेत वैकुंठ चतुर्दशीला शिव विष्णूची पूजा करतात व शिवरात्रीला मध्यरात्री विष्णू शिवाची पूजा करतात दोन देवतांची नावे वेगळी असली तरी त्यांच्यात भेद नाही अशीच शिकवण वारकरी संप्रदायाचीही आहे ब्रह्मदेव सृष्टी निर्माण करतो, विष्णू जगाचे पोषण करतो विश्वाचा संहार करून शिव दुष्ट शक्तींचा नाश करून मंगल साधणारा आहे या त्रिमूर्तीचे ऐक्य मार्कंडेय पुराणात अध्याय ४६ मध्ये व भागवतात चौथ्या स्कंधात अध्याय ७ श्लोक ५०–५४ मध्ये वर्णन केले आहे 'य शिव स च वै विष्णुर्यो विष्णु स च वै शिव ' असे शिव व विष्णू यांचे ऐक्य हरिवंशात वर्णन केले आहे 'शिवस्य हृदय विष्णुर्विष्णोश्च हृदय शिव ' असे म्हटले आहे 'स ब्रह्मा स शिव सेंद्र सोक्षर परम स्वराट् । स एव विष्णु स प्राण स कालोग्नि स चद्रमा । स एव सर्व यद्भूत यच्च भाव्य सनातनम् ' असे ऐक्य कैवल्योपनिषदात वर्णन केले आहे असे हे शिव विष्णूंचे ऐक्य प्राचीन काळापासून मानले गेले आहे महाभारतात अनुशासन पर्वात उपमन्यूचे आख्यान आहे त्यात जांबवतीला पुत्र व्हावा म्हणून श्रीकृष्णाने शंकराची आराधना केली व शंकराची सहस्रनामे श्रीकृष्णाने उपदेशिली असे वर्णन आहे अर्जुनानेही शंकराचीच आराधना करून पाशुपतास्त्र मिळविल्याची कथा प्रसिद्ध आहे महाभारतात असलेल्या विष्णु सहस्रनामात 'सर्व शर्व शिव स्थाणु ' व 'स्वयभू शंभुरादित्य ' अशी वर्णने आहेत याप्रमाणे शिव व विष्णू या दोन देवता वरवर भिन्न असल्या तरी त्यांचे ऐक्य सर्वांनाच मान्य आहे असा भेद कुणीही मानू नये असाच स्पष्ट आदेश सर्वत्र दिसतो 'शिव थोर विष्णु लहान । हरि विशेष हर गौण । ऐसे म्हणति जे त्यालागून । आणून नरकीं घालाव ' अशी एक ओवी शिवलीलामृतात आहे

मराठी संतांनी हे हरिहराचे ऐक्य अनेक ठिकाणी आग्रहाने वर्णन केले आहे नावे भिन्न असली तरी ती एकाच परमेश्वराची रूपे असल्याचा बोध मराठी संतांचा आहे भागवत संप्रदायाचे पहिले उदगाते श्रीज्ञानदेव यांनी म्हणजे या भागवत धर्माच्या मंदिराचा पाया घातला पण हे ज्ञानदेव स्वत शिवोपासक अशा नाथ संप्रदायाकडून प्रेरित झाले होते हे आपणास माहित आहे 'आदिनाथ उमाबीज प्रकटले ' या अभंगात किंवा 'क्षीरसिंधुपरिसरी । शक्तीच्या कर्णकुहरीं ' या ओळीने सुरू होणाऱ्या ज्ञानेश्वरीमधील गुरुपरंपरेच्या ओव्या (अध्याय १८ १७५२ १७६६) या दृष्टीने पाहण्यासारख्या आहेत एकनाथांनी श्रीशिवमाहात्म्य विस्ताराने वर्णन करून पुन हरिहरऐक्य म्हणून आणखी काही अभंग स्वतंत्र केले आहेत 'एक ध्याती एकमेकां । वेगळें अंतर नोहे देखा ।', 'हराचे चिंतन हरीचे हृदयीं । हरीचे चिंतन हराचे हृदयीं ', 'हरिहरांसी जे करिती भेद । ते मतवादी जाण निषिद्ध । हरिहर एक तेथे नाहीं भेद । कासयासि वाद मूढ जनीं । ' इत्यादी ओळींतून एकनाथांनी शिव व विष्णू यांचे ऐक्य चांगल्या रीतीने वर्णन केले आहे 'दोघे सारिखे सारिखे, शिव आणि विष्णू सखे ' असे तुकोबांनीही म्हटले आहे शिवविष्णूच्या या ऐक्यप्रतिपादना साठीच वारकरी संप्रदायात एकादशीबरोबरच सोमवारचा उपवास करावा असा निर्देश केलेला आहे अभंग क्र ७२ वरील विवरण पाहावे

१२५ वक्त्या आधीं मान । गंध अक्षता पूजन ।
श्रोता यति जाला जाण । तरी त्या नाहीं उचित[1] ॥ १ ॥
शीर सर्वांगा प्रमाण । यथाविधि कर चरण ।
धर्माचें पाळण । सकळीं सत्य करावें ॥ २ ॥
पट्ट पुत्र सांभाळी । पिता त्याची आज्ञा पाळी ।
प्रमाण सकळी । ते मर्यादा करावी ॥ ३ ॥
वरासनीं पाषाण । तो न मानावा सामान्य ।
येर उपकरणें । सोनियाचीं परी तीं नीच ॥ ४ ॥
सोनियाचा पैंजण । मुगुटमणि केला हीण ।
जयाचें कारण । तया ठायीं अळंकार ॥ ५ ॥
सेवका स्वामीसाठीं मान । त्याचें नाम त्याचें धन ।
तुका म्हणे जाण । तुम्ही संत तदर्थी ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – प्रमाण–मुख्य, पट्ट–गादी, येर–दुसरी

अर्थ – धर्मप्रवचनाच्या वेळी गंध, अक्षता, पूजन इत्यादींचा मान श्रोत्याच्या आधी वक्त्याचाच म्हणजे प्रवचन सांगणाराचाच असतो मग श्रोत्यात एखादा सन्यासी यती असला तरी त्याला मान देणे उचित नाही १ सर्व अंगात डोके हे महत्त्वाचे असल्याने त्याचे स्थान मुख्य आणि मग यथा क्रमाने हातापायाचे याच धर्माचे पालन सर्वांनी करावे २ मुलगा मोठा होऊन तो गादीवर बसून राज्यकारभार सांभाळू लागला की मग त्याचा बापही त्याची आज्ञा पाळतो याप्रमाणे मान्य झालेली मर्यादा सर्वांनीच पाळावी ३ देव्हाऱ्यामधील देव दगडाचा असला तरी तो सामान्य किंवा कमी प्रतीचा मुळीच होत नाही आणि या देवाच्या पूजेची उपकरणी जरी सोन्याची असली तरी ती देवापेक्षा नेहमीच कमी प्रतीची मानावीत हे स्पष्टच आहे ४ राजाच्या मुकुटावरील मणी कमी किंमतीच्या काचेचा असला व त्याच्या पायातील तोडा सोन्याचा असला तरी मुकुटमणी हीन ठरत नाही, किंवा तोड्यास महत्त्व येत नाही तो अलंकार त्या ठिकाणीच शोभून दिसतो ५ सेवकाचा मान केवळ स्वामीमुळे वाढलेला असतो, त्याच्या धन्याचे नाव हेच खरे म्हणजे त्याचे धन होय तुकाराम महाराज म्हणतात, तुम्ही संतानी हे नीट समजून असावे तुमचा मान देवामुळे आहे ६

१२६ घरीं रांडा पोरें मरती उपवासीं । सांगे लोकांपासीं थोरपण ॥ १ ॥
नेऊनिया घरा दाखवावें काय । काळतोंडा जाय चुकावूनि ॥ २ ॥
तुका म्हणे आम्ही जाणों त्या प्रमाण । ठकावे हे जन तैसे नहों ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा – काळतोंडा–लाजेने तोंड चुकविणारा, ठकावे–फसतात

अर्थ – एखादा मनुष्य आपले मोठपण गावातील लोकांपाशी नेहमी वर्णन करून सांगत असतो, पण त्याची घरची बायकामुले मात्र उपाशी मरत असतात १ आपल्या घरातील वैभवाचे वर्णन करणाऱ्या माणसाच्या घरी अचानक आपण जाऊन पाहिले तर काय दिसेल ? खरी परिस्थिती लक्षात येईलच तो लाजेने तोंड चुकवून बसतो २ मग तुकाराम महाराज म्हणतात, आम्ही अशा माणसास चांगले ओळखून आहोत त्याच्या बोलण्यावर लोक फसले तसे आम्ही फसणार नाही ३

---

१ अधिकार

# जोहार-अभंग ३

१२७ मायबाप[1] जोहार । सारा साधावया आलो वेसकर ॥ १ ॥
मागील पुढील करा झाडा । नाहीं तरी खोडा घालिती जी ॥ २ ॥
फाकूं नका रुजू जालिया वाचून । सांगा जी कोण घरीं तीं धण्या ॥ ३ ॥
आजि मायबाप करा तडामोडी । उद्या कोणी घडी राहेना हो ॥ ४ ॥
तुका म्हणे काहीं न चले ते बोली । अखरते सालीं झाडा घेती ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – जोहार–पूर्वी अंत्यजादी महार लोक 'जोहार' म्हणून नमस्कार करीत असत जोहार म्हणजे नमस्कार सारा–सरकारी कर, वेसकर–वेशीवर राहणारा महार, झाडा–हिशेब, खोडा–सापळा, पिंजरा, फाकू नका–जाऊ नका, तडामोडी–ताटातूट

अर्थ – मायबाप, मी हा गावचा वेसकर महार तुम्हास जोहार जोहार असे म्हणून वंदन करीत आहे मी सरकारकडून सारा मागण्यासाठी आलो आहे १ तुम्ही तुमच्या मागल्यापुढल्या जन्माचा सर्व हिशेब नीट द्या, नाही तर जन्ममृत्यूच्या किंवा संसाराच्या खोड्यात, सापळ्यात किंवा चक्रात तुम्ही पुन सापडाल २ धन्याच्या चाकरीस हजर झाल्यावाचून तुम्ही इतरत्र कुठे जाऊ नका जे काही सांगायचे असेल ते या घरच्या धन्याला सांगा ३ मायबाप लोकहो, आजच काय क्रियाकर्मांची ताटातूट करून घेऊन मोकळे व्हायचे असेल तर व्हा, पुन काही उद्या ही वेळ यायची नाही ४ तुकाराम महाराज म्हणतात, शेवटच्या वर्षी जेव्हा हिशेब पूर्ण होईल त्यावेळी मग काही बचावाचे बोलणे करता येणार नाही काय ते आत्ताच साधा ५

विवरण – मराठी संतानी लोकवाङ्मयाच्या स्वरूपात जी अनेक रूपके 'भारुड' या विभागात केली आहेत त्यात त्यांच्या 'जोहार' अभंगाना फार महत्त्व आहे अशा प्रकारचा हा उपदेश रूपकात्मकच असतो गारुडी, गावगुंड, गोंधळी, वासुदेव, भुत्या, मांग, जागल्या, वेसकर, वाघ्या, मुरळी अशा अनेक नावांनी ही लोकगीतात्मक अभंगरचना संतानी केली आहे नुसत्या परमार्थपर निरूपणापेक्षा त्यांच्या लोकव्यवहारात्मक अशा विविध नीडातून किंवा क्रियातून बोध दिल्यास तो सर्वसामान्य जनतेस अधिक उपयुक्त होणार असतो 'जोहार' हा एक महत्त्वाचा प्रकार आहे 'जोहार' म्हणजे अस्पृश्यांनी वरिष्ठांना करावयाचा नमस्कार, किंवा रामराम जुन्या समाजरचनेत किंवा जातिसंस्थेत निरनिराळ्या जातींना काही कामे वाटून दिली होती ती या भारुडात्मक लोक-वाङ्मयात आज टिकून आहेत

'जोहार' मुख्यत महाराच्या तोंडचा रामराम आहे गावव्यवस्थेत महारांस फार महत्त्वाचे व जबाबदारीचे काम असे वेशीवर राहून त्यास गाव रक्षण करावे लागे सरकारचा सारा कुळकर्ण्यांच्या वतीने सरकारात भरण्याचे जोखमीचे काम याच्याकडेच असे सरकारी पत्रव्यवहार नेणे, आणणे, निरोप देणे, घेणे ही कामेही या महाराकडेच असत महार हे अधिक बुद्धिमान, शक्तिमान व विश्वासू असल्यामुळे जुन्या समाजरचनेत त्यांना महत्त्वाचे स्थान असे महाराच्या ऐतिहासिक कामगिरीचा गौरव मोठ्या संतोषाने करता येण्यासारखा आहे महाराष्ट्रातील मूळ रहिवासी महारच, म्हणून या देशाचे नाव महाराष्ट्र आहे असाही संशोधकाचा एक तर्क आहे येथील भूमिपुत्र म्हणून महारच प्रसिद्ध आहत जमिनीची सर्व व्यवस्था महाराकडे असे जमिनीच्या न्यायनिवाड्यात महाराची साक्ष महत्त्वाची असे महाराच्या या कामाचे रूपकाच्या आश्रयाने मोठे सुरेख वर्णन संतांच्या अभंगात सापडते स्वत महाराचे रूप घेऊन किंवा त्या भूमिकेवरून संतानी परमेश्वरास अनेकदा आळविले आहे

महार व त्यांचा जोहार यांना आणखी महत्त्व येण्याचे एक कारण म्हणजे ज्ञानेश्वराच्या काळी संतत्वास पोचलेला चोखा महार याचे कर्तृत्व होय आपल्या विठ्ठलभक्तीमुळे हा चोखा महार सर्वांना वंद्य झाला 'जोहार

[1] जोहार मायबाप जोहार

मायबाप जोहार। तुमच्या महाराचा मी महार। बहु भुकेला जाहलों। तुमच्या उष्टयासाठीं आलों' असा चोखोबाचा एक उत्कृष्ट अभंग जोहाराचा आहे चोखोबाना तो शोभून दिसलाच, पण जणु या भगवद्भक्तास वंदन करण्यासाठी की काय पुढील अनेक संतानी 'जोहार मायबाप' म्हणून अनेकदा अभंगाची रचना करून चोखोबाबद्दल आपला आदर व्यक्त केला जोहार करताना असणारी लीन वृत्ती, दास्यत्वाची भूमिका, स्वत कमी असल्याची जाणीव, सेवेची भावना, काकुळतीचे शब्द या सर्वांचा उपयोग भक्तीच्या क्षेत्रात अधिक झाल्यास नवल नाही स्वत ज्ञानेश्वराचाही 'जोहार मायबाप जोहार। मी कृष्णाजी घरचा पाईकार' म्हणून अभंग प्रसिद्ध आहे पुढे एकनाथांनी जोहारावर अतिशय उत्कृष्ट रचना करून हे दालन समृद्ध केले 'जोहार मायबाप जोहार। मी तो एकनाथ महार' या भूमिकेवर एकनाथाचे सर्वच अभंग हृदयस्पर्शी व उद्बोधक आहेत

१२८ येऊ द्या जी काहीं वेसकरास। आतून बाहेर वोजेचा घास ॥ १ ॥
जो यावे तो हातचि रिता नाहीं। कधीं तरी काहीं द्यावे घ्यावे ॥ २ ॥
तुका म्हणे उद्या लावीन म्हनेरा। जे हे दारोदाराभोवतीं फिरा ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा :– वोजेचा–चांगल्या स्वच्छतेचा, निर्मळ, म्हनेरा–तगादा

अर्थ –अहो महाराज, हा वेसकर आला आहे आतून काही निर्मळ व सुग्रास अन्नाचा घास बाहेर येऊ द्या ना मजकडे तुमच्या कृपेचा ओघ मजकडे वळू द्या ना १ मी जेव्हा जेव्हा येतो तेव्हा हात रिकामा नाही, सवड नाही असे म्हणता, पण असे म्हणून कसे चालेल ? केव्हा तरी काही तरी मला द्यावे लागेल, मजकडून दुवा घ्यावा लागेल २ तुकाराम महाराज म्हणतात, उद्या मी सारखा तगादा लावीन तुमच्या दारात, मग मात्र जन्मभर जन्ममृत्यूच्या चक्रात तुम्ही फिरत राहाल ३

१२९ देती घेती परज गेली। घर खालीं करूनिया ॥ १ ॥
धावणियाचे न पडे हातीं। खादली रातीं काळोखी ॥ २ ॥
अवघियाचे अवघें नेले। काहीं ठेविलें नाहीं मागें ॥ ३ ॥
सोंग संपादुनि दाविला भाव। गेला आधीं माव वरि होती ॥ ४ ॥
घराकडे पाहू नयेसेचि जाले। अमानत केले दिवाणात ॥ ५ ॥
आता तुका कोणा न लगेचि हातीं। जाली ते निश्चिती बोलों नये ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा –परज–धार, चमक, माव–मोह, सोंग, अमानत–ठेव, दिवाणात–सरकारच्या दरबारात

अर्थ –देण्याघेण्याच्या क्रिया करणारी बुद्धीची धार किंवा चमक आता घर सोडून निघून गेली आहे, काळोख्या रात्रीच्या अंधाराची जी अवस्था होती ती खाऊन टाकली, म्हणजे संपविली, आता धावत येणाऱ्या काळाच्या हातात मी लागणार नाही २ मी सर्व धर्मांचे, सर्व तत्त्वाचे सार पाहिले, आता काही पाहावयास मागे ठेविलेच नाही ३ या दृश्य जगाच्या मायारूप वस्तूने सोंग धारण करून वेगळाच भाव मला दाखविला होता, पण तो वरवर असणारा मोह आता नाहीसा झाला ४ आता शरीरव्यापाकडे व घरप्रपंचाकडे पाहू नये असेच वाटू लागले, कारण देहात्मबुद्धीची ठेव आता मी प्रभूच्या दरबारातच ठेविली आहे ५ तुकाराम महाराज म्हणतात आता मी कुणाच्याही हाती लागणारा नसून माझा जो आता निश्चय झाला आहे त्याचे वर्णनही करून सांगता येणार नाही ६

१३० शुकसनकादिकीं उभारिला बाहो । परिक्षितीला हो दिसा साता ॥ १ ॥
उठाउठी करी स्मरणाचा धावा । धरवत देवा नाहीं धीर ॥ २ ॥
त्वरा जाली गरुड टाकियेला मागें । द्रौपदीच्या लागें नारायणे ॥ ३ ॥
तुका म्हणे करी बहुच तातडी । प्रेमाची आवडी लोभ फार ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा –शुकसनकादिक–प्रसिद्ध ब्रह्मचारी, धर्मज्ञ, वैराग्यशील ज्ञानी असा शुकाचार्य सनक, सनदन, सनातन व सनत्कुमार हे सनकादिक ब्रह्मदेवाचे चार मानसपुत्र ज्ञानी व तत्त्ववेत्ते म्हणून प्रसिद्ध होते बाहो–हात, परीक्षित–अर्जुनाचा नातू, उत्तरा-अभिमन्यू याचा मुलगा उठाउठी–तावडतोब, द्रौपदी–पाडवपत्नी, द्रुपद राजाची मुलगी

अर्थ – शुकसनकादिक ऋषिमुनींनी हात उंच करून सांगितले आहे की, परिक्षिताचा धावा ऐकून सातव्या दिवशी भगवताने त्याचे रक्षण केले १ जो कोणी आपले स्मरण करील धावा करून प्रार्थना करील त्याकडे देव रक्षणास धावतो, देवालासुद्धा मग धीर धरवत नाही २ कौरवसभेत दुष्टाकडून गांजलेल्या द्रौपदीकडून आर्त हाक ऐकू येताच भगवताने गरुडासारख्या चपळ वाहनालाही मागे टाकले व तो मनोमय वाहनातून येऊन तिच्या साहाय्यासाठी उभा राहिला ३ तुकाराम महाराज म्हणतात, एकनिष्ठ प्रेमाची आवड या भगवतास फार असल्याने तो भक्ताच्या रक्षणासाठी अशीच त्वरा करीत असतो तातडीने तो भक्ताना सकटमुक्त करतो ४

विवरण – केवळ मनोभावे स्मरण केले तरी भक्ताचे रक्षण परमेश्वर कसे करतो हे दर्शविण्यासाठी बुवानी दोन उदाहरणे दिली आहेत परीक्षितास भगवतानी अनेक वेळा सरक्षण दिले आहे अश्वत्थाम्याने सोडलेल्या अस्त्रामुळे उत्तरच्या गर्भात हा होरपळू लागला उत्तरेने विष्णूचा धावा केला, तेव्हा त्याचे रक्षण झाले हा एकदा तृषाक्रान्त होऊन पाण्यासाठी शमीक ऋषीच्या आश्रमात गेला शमीक ध्यानस्थ असल्याने त्याच्या ध्यानात याची याचना आली नाही यान रागान त्याच्या गळ्यात एक मृत सर्प अडकविला ऋषीचा मुलगा शृगी याने सातव्या दिवशी परीक्षित राजाला सर्पदश होऊन मरण येईल असा शाप दिला परीक्षिताचे हे सकट शुकाचार्याच्याकडून भागवतश्रवणाने नष्ट झाल्याची कथा आहे

१३१ बोलिलो तें कांहीं तुमचिया हिता । वचन नेणता क्षमा कीजे ॥ १ ॥
बाट दावी तया न लगे रुसावें[1] । अतित्याई जीवें नाश पावे ॥ २ ॥
निंब दिला रोग तुटाया अतरीं । पोभाळिता चरि आंत चरे ॥ ३ ॥
तुका म्हणे हित देखण्यासि कळे । पडती आंधळे कूपा माजी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – अतित्याई–आततायी मनुष्य, पोभाळिता–वरवर चोळल्याने, देखण्यासी–पाहणाऱ्यास कूपा माजी–विहिरीत

अर्थ – मी आजवर कडू शब्दात तुम्हास काही बोललो असेन, पण ते तुमच्या हितासाठीच होते हे ध्यानात घ्या त्यातील कडवटपणा सोडून मला क्षमा करा तुम्ही १ जो नीट रस्ता दाखवितो त्याच्यावर कधी रागावू नये, त्याचे न ऐकताच जर आततायी माणसाप्रमाणे वागाल तर मग नष्ट व्हाल २ एखाद्या वैद्याने पोटात घ्यावयास कडू लिंबाचे औषध दिलेले असते, ते रोग नाहीसा व्हावा म्हणूनच पण ते पोटात घ्यायच्या ऐवजी जर वरवरच चोळले तर बरे वाटायच्या ऐवजी रोगाचे प्रमाण वाढतच राहील ३ तुकाराम महाराज म्हणतात जे लोक विचार करतात त्यानाच आपले हित समजेल, पण आंधळे असतील तर ते विहिरीतच पडतील अज्ञानाच्या विहिरीत पडून राहतील ४

---

[1] शिणावे

१३२ माकडें मुठी धरिले फुटाणे । गुतले ते नेणे हात तेथें ॥ १ ॥
काय तो तयांचा लेखावा अन्याय । हित नेणे काय आपुले ते ॥ २ ॥
शुकें नळिकेशी गोवियेले पाय । विसरोनि जाय पक्ष दोन्ही ॥ ३ ॥
तुका म्हणे एक ऐसे पशुजीव । न चले उपाव काहीं तेथें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – लेखावा–मानावा शुकें–पोपटान, एक–कित्येक उपाव–उपाय

अर्थ – माकडाने मडक्यातील फुटाणे घण्यासाठी हात आत घालून मुठीत फुटाणे धरुन ठेविले, पारधी धरायला आला तेव्हा त्याचा हात काही त्या मडक्यातुन निघेना फुटाण्याचाही लोभ सोडवेना त्याला १ पण यामुळे असे झाले की ते मात्र अडकून पडले, तो काय त्याचा अन्याय समजावा ? त्याला आपले हित समजले नाही २ अशीच बाब पोपटाची आहे नळीवर पाय ठेवून बसतो तो बसल्याबरोबर नळी गरकन फिरुन तो खाली यतो, आणि अडकला जातो त्याला आधाराची नळीही सोडता येत नाही, की आपल्या पखाचा उपयोगही त्यास सुचत नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात असे कित्येक पशूचे जीवन फसून गले आहे अशा जीवाच्या उद्धारासाठी, ससारात आसक्त राहणाऱ्यासाठी काही उपाय सुचत नाही ४

१३३ हरि तू निष्ठुर निर्गुण । नाही माया बहु कठिण ।
नव्हे ते करिसी आन । कवणे नाही केले ते ॥ १ ॥
घेऊनि हरिश्चंद्राचे वैभव । राज्य घोडे भाग्य सर्व ।
पुत्र पत्नी जीव । डोंबाघरीं वोपविलीं ॥ २ ॥
नळा दमयंतीचा योग । विघडिला त्याचा सग ।
ऐसे जाणे जग । पुराणे ही बोलती ॥ ३ ॥
राजा शिबी चक्रवर्ती । कृपाळु दया मूर्ती ।
तुळविले अर्तीं । तुळें मास तयाचे ॥ ४ ॥
कर्ण भिडता समरंगणीं । बाणी व्यापियेला रणीं ।
मागसी पाडोनी । तेथें दात तयाचे ॥ ५ ॥
बळी सर्वस्वे उदार । जेणे उभारिला कर ।
करूनि काहार । तो पाताळी घातला ॥ ६ ॥
श्रियाळाच्या घरीं । धरणे मांडिले मुरारी ।
मारविले करीं । त्याचे बाळ त्याहातीं ॥ ७ ॥
तुज भावे जे भजती । त्याच्या ससारा हे गति ।
ठाव नाही पुढती । तुका म्हणे करिसी ते ॥ ८ ॥

शब्दार्थ व टीपा – आन–भलत वाहा तरी डोंब–स्मशानातील राखणदार वोपविलीं–विकली, तुळविले–वजन केले

अर्थ – परमेश्वरा तू मोठा निष्ठुर, निर्विकार आहेस तुला काही दयामाया दिसत नाही, जे कधी कुणी केले नाही असे तू करतोस १ तू हरिश्चद्र राजाचे वैभव घेतलेस, त्याचे राज्य घोडे हे सर्व वैभव हरण केलेस, इतकेच नव्हे तर त्याचा मुलगा, त्याची पत्नी व तो स्वत यांना डोंबाघरी विकून घ्यायची पाळी तू आणलीस २ नळदमयंती

याची सगत फोडून त्याच्यातही तू असाच वियोग घडविलास असे सारी पुराणे सांगतात जगही बोलते ३ शिबी राजा चक्रवर्ती होता आणि सर्व प्राणिमात्रावर तो दयाही करी, पण तू त्याला स्वत चे मांस तागडीत घालून वजन करायला लावलेस ४ त्याच प्रमाणे देवा, रणांगणात अर्जुनाशी युद्ध करताना मरणोन्मुख झालेल्या कर्णास तू त्याचे सुवर्णाचे दात तो बाणानी व्यापून गेलेला असताना मागितलेस ५ बळी राजा तर केवढा उदार, सर्वस्व द्यायला नेहमी तयार असे, त्याने तुला दान देण्यासाठी हात वर केला, तर तू कपट करून त्यालाच पाताळात दडपलेस ६ आणि परमेश्वरा, तू श्रियाळ राजाच्या घरी विचित्र हट्ट धरून धरणे धरिलेस व त्याच्या मुलास त्याच्या हातून मारविलेस ७ देवा, तुला जे भक्तिभावाने भजतात त्याच्या ससाराची ही अशी अखेर तू करतोस तुकाराम महाराज म्हणतात, आता त्याना पुढे काय गती देत असशील काही पत्ता नाही त्याचा'८

विवरण – थोर भक्ताना ईश्वरप्राप्तीसाठी, सत्त्वपालनासाठी, धर्मासाठी किती दु:ख भोगाव लागते व परमेश्वरही त्याची परीक्षा कशी पाहतो याचे वर्णन प्राचीन काळचे अनेक दाखले देऊन तुकारामबुवानी केले आह हरिश्चद्र हा सत्यव्रताचा पुत्र अयोध्येचा राजा असून त्याच्या पत्नीचे नाव तारामती विश्वामित्रास स्वप्नात दिलेले वचन खरे करण्यासाठी याने राज्य सोडले, नतर स्वत स स्त्रीस व पुत्रास एका वृद्ध ब्राह्मणास विकून स्वत स स्मशानात डोबाघरी पाणी भरावे लागले असा याचा छळ झाला नळदमयती याची कथाही अशीच शोकपूर्ण आह निषध देशाचा राजा हा नळ, त्याची पत्नी दमयती हा प्रजेचे पालन उत्तम प्रकारे करी अश्वमेधादिक यज्ञ करून याने देवानाही सतुष्ट केले काही थोड्या अपराधावरून याच्या शरीरात कलीने प्रवश केला व यास द्यूत खेळण्याची बुद्धी झाली त्याची सर्व सपत्ती यात गेली तो एका वस्त्राने नगराबाहेर पडला, दमयतीही एका वस्त्रान त्याच्याबरोबर आली अरण्यात याचे क्षुधेने फार हाल झाले, एकदा पक्ष्यानी याचे अर्धे वस्त्रही नेले मग त्यान दमयती झोपली असताना तिचे अर्धे वस्त्र कापून घेतल ता तिला तिथेच सोडून गेला दमयतीस चेदी देशाच्या राजाची सैरध्री म्हणून काम करावे लागले अशी सकटे नळदमयतीवर येत राहिली

शिबी राजा मोठा दयाशील होता याची परीक्षा पाहण्यासाठी अग्नीने कपोताचे व इद्राने श्येनाचे अशी रूप घेऊन श्येन कपोतामागे लागला. कपोत शिबीस शरण आला श्येनाने कपोताची मागणी केली तेव्हा आश्रयास आलेल्याचे रक्षण करणार असे त्याने सागितले, पण कपोताच्या ऐवजी तेवढेच मास त्याने आपल्या अगातील कापून श्येनास दिले कर्ण हा सूर्यापासून झालेला कुतीचा पुत्र महा पराक्रमी पण कुतीने याचे पालनपोषण न केल्याने हा सूतपुत्र म्हणूनच वाढला अपमानाने व सूडाने याचा स्वभाव नेहमी तप्त राही. हा कौरवाच्या बाजूचा असून भारतीय युद्धात अर्जुनाशी याचे निकराचे युद्ध झाले, ऐन सकटकाळी याचे सुवर्णाचे दात देवाने मागितले अशी कथा आह बळी हा दैत्याचा राजा धर्माने राज्य करीत होता याचे सत्त्व हरण करण्यासाठी भगवान विष्णूनी वामन बटूचे रूप घेऊन यास तीन पावलाची भूमी मागितली ती याने दिल्यावर वामन बटू सर्व विश्वास व्यापणारा बनला एका पावलाने त्याने पृथ्वी व्यापली, दुसऱ्याने स्वर्ग व तिसरे पाऊल बळीच्या मस्तकावर ठेवून त्यास पाताळात दडपून टाकले अशी कथा पुराणात आह श्रियाळाचे सत्त्व भगवान शकरानी पाहण्याचे ठरविले अतिथीचा वेष धारण करून ते ऐन भोजनाच्या वेळी त्याच्या घरा आले त्यान सतुष्ट होऊन या ब्राह्मणाचे स्वागत करून इच्छाभोजन विचारले या विचित्र ब्राह्मणाने राजा व राणी चागुणा याच्या एकुलत्या एक मुलाच्या मासाचे भोजन मागितले ते या उभयतानी देऊन अतिथीस तृप्त केले अशा या भक्ताच्या दु:खदायक कथा असल्या तरी त्याच्या आयुष्याचा शेवट चागला होऊन त्याना सद्गती मिळाली आह

१३४ चाल केलासी मोकळा । बोल विठ्ठल वेळोवेळा ॥ १ ॥
तुज पापचि नाहीं ऐसे । नाम घेता जवळीं वसे ॥ २ ॥
पच पातकाच्या कोडी । नामें जळता न लगे घडी ॥ ३ ॥
केलीं मागें नको राहो । तुज जमान आम्ही आहो ॥ ४ ॥

करीं तुज जीं करवती । आणिक नामें घेऊं किती ॥ ५ ॥
तुका म्हणे काळा । रीग नाहीं निघती ज्वाळा ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा :– चाल–चल, समज, कोडी–कोटी, जमान–जामीन, रीग–प्रवेश.

अर्थ :– अनेक वेळा विठ्ठल विठ्ठल असे नामस्मरण कर; चल, तावडतोब दुष्कर्मांतून मोकळा होशील. १ जवळ राहणारे असे एकही पाप तुझे नामस्मरण सुरु होताच उरणार नाही. २ पचमहापातकाची पापे केवढीही, कोटचावधी जरी केलीस तरी ती एका नामस्मरणाने एका क्षणात जळून जातील. ३ मागे काही पापे तू केली असशील, पण त्यांत आता तू राहू नकोस, त्या सर्वांच्याबद्दल मी फार तर जामीन राहीन. ४ तुला हवीत तेवढी तू पापे कर; किती पापाची नावे घेऊ मी ? ती सर्व तू कर. ती सर्व सपतील. ५ तुकाराममहाराज म्हणतात, ती सर्व पापे जळून भस्म होतील कारण हरिनामात प्रत्यक्ष यमालाही प्रवेश नाही. पापाचीही ज्वालात राख होऊन जाईल ६

१३५ बाळ बापा म्हणे काका । तरी तो कां निपराध ॥ १ ॥
जैसा तैसा भाव गोड । पुरवी कोड विठ्ठल ॥ २ ॥
साकरेसि म्हणतां धोंडा । तरी कां तोंडा न रुचे ॥ ३ ॥
तुका म्हणे आरुष बोल । नव्हे फोल आहाच ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– आरुष–कठिण, दुर्बोध, आहाच– व्यर्थ, निष्फळ

अर्थ :– एखाद्या लहान मुलाने चुकून वडिलात काका म्हटले तर काही बिघडत नाही; त्यामुळे बाप काही परका होत नाही. १ तसेच भक्ताने वेडेवाकडे नाव परमेश्वराचे घेतले तरी बिघडणार नाही, त्यातील भाव पाहून ईश्वर त्याचे मनोरथ पूर्ण करतो. २ साखरेस धोंडा म्हटले तर काही तिची गोडी तोंडाला कमी लागत नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, भक्ताचे बोल ओबडधोबड, दुर्बोध असले तर ते काही व्यर्थ ठरत नाहीत, वाया जात नाहीत. ते परमेश्वरास अधिक आवडतात. ४

१३६ चित्तीं नाहीं तें जवळीं असोनि काय । वत्स सांडी माय तेणें न्यायें ॥ १ ॥
प्रीतीचा तो वायु गोड लागे मात । जरी जाय चित्त मिळोनियां ॥ २ ॥
तुका म्हणे अवघें फिकें भावाविण । मीठ नाहीं अन्न तेणें न्यायें ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा :– वायु–लहर, मात–गोष्ट.

अर्थ :– आपल्या मनातच नाही ते अगदी जवळ असून काय उपयोग ? एखादे मोठे वासरू रात्रंदिवस आपल्या आईजवळ असले आणि आईच्याच मनात प्रेम नसले तर काय त्या जवळ असण्याचा उपयोग ? १ पण दोघाचे चित्त जर एकमेकात मिळून गेले असेल तर मात्र प्रीतीच्या संभाषणांच्या वाऱ्याची लहर किंवा झुळूक गोड लागेल. २ तुकाराम महाराज म्हणतात, सर्व काही एका भावनेशिवाय फिके असून सुग्रास अन्नात मीठ नसल्यामुळे ते जसे बेचव होते तशीच अवस्था भावाशिवाय जीवनाची होते. ३

१३७ काय काशी करिती गंगा । भीतरि चांगा नाहीं तो ॥ १ ॥
अंधणी कुचर बाहेर तैसा । नये रसा पाकासि ॥ २ ॥
काय टिळे करिती माळा । भाव खळा नाहीं त्या ॥ ३ ॥
तुका म्हणे प्रेमें विण । बोले भुंके अवघा शीण ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– भीतरि–अंतरगात, चांगा–चागले, कुचर–कठिण दाणा.

अर्थ :– जर अंतरंग शुद्ध नसेल तर बाहेरच्या काशीयात्रेचे व गंगास्नानाचे काय महत्त्व ? मनच जर चांगले नसेल तर काशी व गंगा याचा काही उपयोग नाही. १ एखादा कठिण दाणा अधणात शिजविला तरी तो तसाच टणक

राहतो, शिजत नाही की मऊ होत नाही, त्याचा काही शिजून रस होत नाही, त्याप्रमाणे अतरंग कठिण असेल तर काही उपयोग नाही २ वरवर लावलेले कपाळावरचे टिळे व गळ्यातील माळा याचा काय उपयोग? अशा दुष्ट माणसाच्या हृदयात भावभक्तीचा लवलेशही नसतो ३ तुकाराम महाराज म्हणतात, एका प्रेमभावाशिवाय जो बोलतो ते त्याचे निरर्थक भुकणेच असते विनाकारण शीण मात्र त्याला होतो, कारण भावाविना बोलण्याचा काही उपयोग नाही ४

१३८ शिंदळा साल्याचा नाहीं हा विश्वास । वाईल तो त्यास न विसंभे ॥ १ ॥
दुष्ट बुद्धि चोरी करी निरंतर । तो म्हणे इतर लोक तैसे ॥ २ ॥
तुका म्हणे जया चित्तीं जे वासना । तयाची भावना तयापरी ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा – शिंदळ–वाईट चालीचा, व्यभिचार करणारा पुरुष, साला–मेहुणा, बायकोचा भाऊ

अर्थ – जो वाईट चालीचा मनुष्य असतो त्यास कुणावरच विश्वास ठेवावासा वाटत नाही त्याच्या बायकोचा प्रत्यक्ष भाऊ जरी बहिणीस माहेरी न्यायला आला असेल तरी तो त्याच्याबरोबर तिला पाठवीत नाही कारण त्याला सर्वजण स्वतःसारखेच वाटतात १ जो नेहमीच चोरी करण्यात गुंगलेला असतो त्याची बुद्धी सदैव त्याच कर्मात रमलेली असते व इतर सर्व लोक आपल्यासारखेच चोर आहेत असेच तो मानतो २ तुकाराम महाराज म्हणतात, ज्याच्या मनात जसा भाव, जशी वासना असेल तशी त्याची भावना होत राहते ३

## काला चेंडुफळी–अभंग १००

१३९ झेला रे झेला वरचेवर झेला । हातिंचे गमावी तो पाठीं साहे टोला ॥ १ ॥
त्रिगुणाचा चेंडू हालें झुगारी निराळा । वरिलिया मुळें मन लावी तेथें डोळा ॥ २ ॥
आगळा होऊनि धरी वरिचिया वरी । चपळ तो जिंके गाढ्या ठके येरझारीं ॥ ३ ॥
हातीं सापडले उभें बैसो नेदी कोणी । सोरीमागें सोरी घेती ओणवे करूनि ॥ ४ ॥
डाई पडिलिया सोसी दुःखाचे डोंगर । पाठीवरी भार भोवता ही उभा फेर ॥ ५ ॥
तुका म्हणे सुख पाहे तयाचे आगळें । जिंकी तो[1] हरवी कोणी एका तरी काळें ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – साहे–सहन करतो टोला–मार गाढ्या–दुबळा, अशक्त सोरी–डाव डाई–डावात

अर्थ – हा सत्त्व, रज, तम अशा त्रिगुणाचा चेंडू तुम्ही वरचेवर झेला हो जर तुमच्या हातातून हा चेंडू निसटला तर मार जन्ममृत्यूचा टोला किंवा मार तुमच्या पाठीवर बसेल असेच समजा १ हा त्रिगुणाचा चेंडू वरचेवर झेलून अलगद हाताने निराळा टाकून द्या त्याचा म्हणजे देहबुद्धीत असलेल्या त्रिगुणात्मकतेचा संबंध सोडून तुम्ही आपली वरवर असणारी दृष्टी मनाशी एकाग्र करावी, स्वतःच्या अंतर्यामी पाहावे २ स्वात्मसुखाचे वेगळेच सुख भोगून हा त्रिगुणात्मक चेंडू वरचेवर धरून निराळाच ठेवा या कार्यात जो चपळ आहे तो डाव जिंकेल, जो दुर्बळ आहे तो डाव हरेल आणि मग जन्ममृत्यूच्या फेऱ्यात सापडल ३ जर एकदा का या त्रिगुणात्मक बंधनात व देहबुद्धीच्या तावडीत सापडलात की मग कुणी बसू देणार नाही, विश्रांति मग कुणी घेऊ देणार नाही डावामागून डाव एकसारखे वाकवून घेतील ४ मग या त्रिगुणाच्या डावात सापडल्यावर मात्र दुःखाचे डोंगरच्या डोंगर उभे राहतील, पाठीवरचा भार वाढत राहील व भोवतीचे खेळातील सोंगडी त्रास देतील ५ तुकाराम महाराज म्हणतात, जो कुणी एखाद्या वेळेस त्या हरीला जिंकेल त्यावेळचे त्याचे सुख अलौकिक म्हणावे लागेल ६

विवरण – येथून पुढचे शमर अभंग काल्यावरच आहेत 'काला' या शब्दाचा अर्थ मिश्रण खिचडी असा असून श्रीकृष्णाच्या बालजीवनात यास फार महत्त्व आहे लहानपणी श्रीकृष्ण आपल्या बालमित्रांना बरोबर घेऊन

[1] जिंकीतो हरिसा

गाईंच्या बरोबर रानात, वनात जात असे त्याच्या सौंगड्याबरोबर त्याची शिदोरी पाठीशी असे वनात गेल्यावर काही खेळ होत असत, क्रीडाविलास झाला की मग शिदोऱ्या सोडून जेवण होई यावेळी सर्वांच्या शिदोऱ्या एकत्र होत असाव्यात या मिश्रणास काला म्हणतात यात श्रीकृष्णाचीही शिदोरी मिसळलेली असल्याने तिची चव या काल्यात आलेली असते त्यामुळे फार महत्त्व या काल्यास येते

श्रीकृष्ण व त्याचे सौंगडी यांच्या बालजीवनातील हे मधुर सख्य मराठी संतांनी मनापासून वर्णन केले आहेत श्रीकृष्णाच्या बालजीवनातील हा रम्य आविष्कार अतिशय लोकप्रिय करण्यासाठी त्यांनी वनातील या विविध क्रीडांचे व गोपाच्या खेळांचे फार सुंदर वर्णन केले आहे. पंढरपूरचा श्रीविठ्ठल हा श्रीकृष्णाचा बाल अवतार असल्यामुळे या वनक्रीडांना फारच महत्त्व आहे या दृष्टीने हे काल्याचे अभंग पाहण्यासारखे आहेत यात गौळणी, हमामा, हुतुतू, चेंडुफळी, फुगड्या, हुबरी, दळण, कांडण, टिपरी, विटीदांडू, मृदंगपाट्या इत्यादी विविध खेळांचे रूपकात्मक वर्णन असून त्यातून अध्यात्माचे व परमार्थविचाराचे सुबोध विवेचन करण्यात आले आहे नुसता बोध कोरडा होतो, तो खेळाच्या, बाललीलाच्या रूपानी दिल्यास अधिक पटतो श्रीकृष्ण व त्याचे बालमित्र यांनी मधुवनात केलेल्या क्रीडांचे अवीट वर्णन संताच्या अभंगातून पाहावयास सापडते श्रीकृष्णाची सुंदर अशी बालमूर्ती, त्याचा डौलदार असा गवळ्याचा वेष, गळ्यात हार, डोक्यावर मोरपिसाची टोपी, आणि भोवती साधे भाधे पण श्रीकृष्णावर अपार प्रेम असलेले त्याचे अनेक सोबती त्यांच्या विविध खेळांचे प्रकार, त्याच एकमेकावर रागावणे, रुसणे, श्रीकृष्णाने समजूत काढणे, मग त्यांच्या शिदोऱ्या सुटणे, त्याची वनातील पंगत बसणे, कुणाची भाकरी, कुणाचा भात, कुणाचे दहीदूध, कुणाच्या लाह्या याचेमधूनच सर्व मिश्रण–काला–करून त सवांना वाटणे इत्यादी विविध क्रीडामधील आनंद व अलौकिक सुख संतांनी काल्यावरचे अभंग करून स्वत लुटले व इतरासाठी सिद्ध केले कान्होबा, पेंधा इत्यादी विशिष्ट मित्राचे उल्लेख संताच्या अभंगात येत असतात काही मित्र बोबडे, लंगडे, खुजे, पागळे, बहिरे होते त्याची मजेदार वर्णने त्यांनी केलेली आहेत. 'चुल्हा धमाल ले, धमाल अपुल्या गाई' या नावाचे एकनाथांचे एक प्रसिद्ध गीत या संदर्भात ध्यानात घेण्यासारखे आहे विविध खेळ, क्रीडा, भांडणे, मारामारी, पुन गोडी, सलोखा, श्रीकृष्णाचे समजावणे व मग सर्वांचे एकत्रित भोजन यातील सुख भोगण्यासाठी स्वर्गातील देवसुद्धा पृथ्वीवर येण्याची इच्छा करतात

ज्ञानेश्वराच्या काळापासून हे काल्याचे अभंग प्रसिद्ध आहत एखाद्या उत्सवाच्या अखेरीस, यात्रेच्या शेवटच्या दिवशी, सप्ताहाच्या अखेरच्या दिवशी काल्याचे कीर्तन करण्याची पद्धती अजून आहे '**वैष्णवांचा मेळ सकळ मिळाला। विठ्ठल नामें काला पंढरीसी,**' म्हणून निवृत्तिनाथांनी याचे वर्णन केले आहे '**सोडिल्या शिदोरी। काला करी दहीभात। घ्यारे अवघे समस्त। हरी गोपाळांसी देत**' असे या काल्याचे वर्णन श्रीसेनामहाराजांनी केल आह '**देव भक्त दोन्ही करिताती काला। तयाच्या सुखाला वर्णी कोण।**' या शब्दात एकनाथांनी काल्याच्या सुखाचे वर्णन केले आहे '**अवघ्या सोडियेल्या मोटा। आजोचा वही काला केला गोमटा॥ घ्यारे घ्यारे दहीभात। आम्हा देतो पंढरीनाथ**' अशा भाषेत संत भानुदासांनी या प्रेमसुखाची महती गाइली आहे '**एकच टाळी झाली चंद्रभागे वाळवंटीं। माझ्या ज्ञानराज गोपाळाशीं लाह्या वांटी**' अशी साक्ष ज्ञानेश्वराच्याबद्दल जनाबाईंने दिली आहे तुकाराम महाराजांनी तर या काल्याचे '**आजि देतों पोटभरी। पुरे म्हणाल तोंवरी**' इतके वर्णन अतिशय विस्ताराने पण तन्मयतेने केले आहे श्रीकृष्ण व त्याचे मित्र यांच्या प्रेमाचे इतके अवीट वर्णन इतरत्र सापडणे कठिण आहे या प्रेमसुखाच्या दर्शनाने सान्या ब्रह्मांडास जणू वेड लागते '**काल्याचिये आसे। देव जळीं जाले मासे**' असे वर्णन तुकोबांनी एके ठिकाणी केले आहे '**चवीं चवीं घेऊ घास। ब्रह्मरस आवडी**' अशी याची महती असल्याने '**गोकुळीच्या सुखा। अंतपार नाहीं लेखा**' असा निर्णय बुवांनी एका अभंगात दिला आहे काल्याच्या या सर्व अभंगात भगवंताचे प्रेम सर्वावर कसे सारख्या प्रमाणात असते, कधी दुःखीकष्टी भक्ताकडे त्याचे अधिकच लक्ष कसे असते हेही ध्यानात येते प्रभुप्रेमाची व अध्यात्माची खेळता खेळता शिकवण देण्याची सोय संतांनी या काल्याच्या अभंगात केलेली आहे

पंढरपूरच्या यात्रेतही काल्याच्या या प्रसंगास फार महत्त्व असते पंढरपूरच्या दक्षिणेस सुमारे एका मैलावर गोपाळपूर नावाची छोटी वस्ती आहे तेथे गोपालकृष्णाचे देऊळ आहे विष्णुपद, गोपाळपुरा याच भागात श्रीकृष्णाने

आपल्या गोपाल मित्राबरोबर आनंदपगत करून काल्याची मौज लुटली असे मानतात येथील मंदिरात यशोदेची दधिमथनाची जागा, मुसळ, जाते असा सरंजामही दाखविला जातो मंदिराच्या पूर्वेस असलेल्या पटांगणात आषाढ व कार्तिक शु. १५ स काल्याचा थाट होतो येथील काल्याचा प्रसाद घेतल्याशिवाय न परतण्याचा कित्येक वारकऱ्याचा प्रघात आहे कृष्णावतारी झालेल्या या बाललीलाचे कौतुक भक्तिप्रेमाच्या पोटी अजूनही ताजे टवटवीत असे आहे

१४० अझुनि का थीर पोरा न म्हणसी किर । धरुनिया धीर लाजे बुर निघाला ॥ १ ॥
मोकळा होतासि का रे पडिलासि डाईं । वरिलाचा भार आता उतरेसा नाही ॥ २ ॥
मेळवूनि मेळा एकाएकीं दिली मिठी । कवळिले एक बहु बैसविली पाठी ॥ ३ ॥
तळील ते वरी वरील ते येते तळा । न सुटे तोवरी येथें गुतलिया खेळा ॥ ४ ॥
साडिता ठाव पुढें सईल धरी हात । चढेल तो पडेल ऐसी ऐका रे मात ॥ ५ ॥
तुका म्हणे किती आवरावे हात पाय । न खेळावे तोच वरें वरी न ये डाय ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा –थीर–पुर, किर–खरोखर, बुर–भुसा, डाय–डाव

अर्थ – अरे गृहस्था, जन्ममृत्यूच्या घनात इतक्या चकरा मारल्यास तरी अजून 'पुरे' कसे म्हणत नाहीस ? सकोवाने धैर्य धरून तू राहिलास तरी त्यामुळे तुझा भुसा निघाला असेल फार ताप झाला असेल १ चागला देहादिकाच्या व त्रिगुणाच्या बंधनातून प्रथम मोकळा होतास, मग या या प्रपचाच्या डावात का पडलास ? आता प्रपचाचा हा भार तुझ्या डोक्यावर आहे तो खाली कसा उतरणार ? २ पचमहाभूताचा मेळा मिळवून आत्म्याने शरिराला मिठी दिल्यामुळे अनेक विकाराचे ओझे आता पाठीवर येऊन बसले आहे ३ या प्रपचाच्या खेळात आता काही पुण्यकर्म करून खालचे वर येतील, दुष्ट कर्मादिकामुळे वरचे तळाशी येतील, पण येथील खेळात जोपर्यंत ते गुतले आहेत तोपर्यंत त्याची पूर्ण सुटका मात्र होणार नाही ४ हा प्रपचरूपी डाव सोडून देताना हात सैल धर, जो चढेल तो पडेल अशी गोष्ट ध्यानात असू द्या ५ तुकाराम महाराज म्हणतात, हा देहबुद्धी धारण करून प्रपचाचा डाव खेळावा तरी किती ? देहात्मबुद्धी वृथा धारण करून हा डाव न खेळणेच अधिक बरे कारण मग अगावर डाव तरी येणार नाही ६

## कोडें–अभंग २

१४१ कोडें रे कोडें ऐका हें कोडें । उगवूनि फार राहे गुतोनिया थोडें ॥ १ ॥
पुसतसे सागा मी हे माझें ऐसें काई । रुसू नका नुगवे तो झवे आपुली आई ॥ २ ॥
सागतो हें मूळ काही न धरावी खती । जाले जीवों मेले मरो प्रारब्धा हातीं ॥ ३ ॥
तुका म्हणे अभिमान साडावा सकळी । नयें अगावरी वाया येऊ देऊ फळी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा –उगवून–स्पष्ट होऊन नुगवे–समजणार नाही, फळी–लचाड

अर्थ – एक कोडे आहे माझे ऐकता का ? त्याचे उत्तर सांगता का ? ते स्पष्ट होणारे फार असून गुप्त असे थोडेच आहे १ रागावू नका, पण ज्याला हे कोडे सुटणार नाही तो आपल्या आईशी सबध ठेवणारा होईल मी व माझे असे हे काय आहे ? या प्रश्नाचे उत्तर हवे २ मी एक महत्त्वाची गोष्ट सागतो ती अशी की तुम्ही कसलीच चिंता करू नका हा देह प्रारब्धामुळे जन्मास येतो, मरण पावतो, त्याच्या जन्माचा वा मरण्याचा विचार तुम्ही कशास करता ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, देहात्म बुद्धीचा हा सर्व अभिमान तुम्ही सोडून द्यावा कोणत्याही विकाराचे लचाड तुमच्या अगावर येऊ देऊ नका ४

१४२ नुगवे तें उगवून सांगितलें भाई । घालुनियां ताळा आतां शुद्ध राखा घाई ॥ १ ॥
आतां कांहीं नाहीं राहिलें । म्यां आपणा आपण पाहिलें ॥ २ ॥
कमाईस मोल येथें नका रीस मानूं । निवडूं नये मज कोणा येथें वानूं ॥ ३ ॥
तुका म्हणे पदोपदीं कान्हो वनमाळी । जयेंजत मग सेवटिला एक वेळीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :–नुगवें–उलगडत नाही, उगवून–समजावून, ताळा–मेळ, रीस–राग.

अर्थ :– भाई, तुझ्या बुद्धीने जे तुला समजणार नाही ते मी आता उलगडून दाखविले आहे. आता त्याचा स्वतःशी मेळ बसवून तुम्ही लौकर शुद्ध भाव मनात निर्माण करा. १ स्वरूपाला एकदा जाणल्यावर आता काही शोधायचे, जाणून घ्यायचे काही उरत नाही. २ स्वतःच्या कमाईलाच येथे मोल आहे; याचा राग मानू नका, मला इथे कुणाची निवड करता येत नाही की कुणाचे वर्णनही मी करू शकत नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, एकसारखे कान्होबाचे नाव घ्या, म्हणजे शेवटी एखाद्या वेळी तुमचा जय खात्रीने होईल. ४

१४३ हरुष आनंदाचा । घोष करा हरिनामाचा ।
कोण हा दैवाचा । भाग पावे येथील ॥ १ ॥
पुण्य पाहिजे वहुत । जन्मांतरींचें संचित ।
होईल करीत । आला अधिकारी तो ॥ २ ॥
काय पाहातां हे भाई । हरुषें नाचा धरा घाई ।
पोटभरी कांहीं । घेतां उरी न ठेवा ॥ ३ ॥
जें सुख दृष्टी आहे । तेंच अंतरीं जो लाहे ।
तुका म्हणे काय । कळिकाळ तें बापुडें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा–हरुष–हर्ष, आनद, उरी–शिल्लक

अर्थ :– ईश्वराच्या नावाचा घोष सतत करणे हाच मोठ्या आनंदाचा प्रसंग आहे. कोण्या दैववानास हा वाटा मिळणार आहे ? १ या प्राप्तीसाठी अनेक जन्मांच्या पुण्याचा साठा जवळ असेल तरच तो अधिकारी होईल. २ अरे भाईनो, पाहता काय ? आनंदाने नाचा ना. हात धरा, गर्दीगर्दीने ओळ धरा. या भक्तिरसाचे पोटभर सेवन असे करा की काही उरू देऊ नका ३ तुकाराम महाराज म्हणतात, तुमच्या दृष्टीपुढे जे परमेश्वराचे सुख उभे आहे तेच तुमच्या अंतःकरणात स्थिर, होऊ द्या. मग त्याच्यापुढे प्रत्यक्ष यमही बापुडा पराजित होऊन जाईल. ४

१४४ अवघे गोपाळ म्हणती या रे करूं काला ।
काय कोणाची सिदोरी ते पाहों द्या मला ॥
नका कांहीं मागें पुढें रे ठेवूं खरेंच वोला ।
वंची वंचला तोचि रे येथें भोवंडा त्याला ॥ १ ॥
घेतल्या वांचून झाडा रे नेदी आपुले कांहीं ।
एकां एक ग्वाही बहुत देती मोकळें नाहीं ॥
ताक सांडी येर येर रे काला भात भाकरी दहीं ।
आलें घेतो मध्यें बैसला नाहीं आणवीन तेंही ॥ २ ।
एका नाहीं धीर तांतडी दिल्या सोडोनि मोटा ।
एक सोडितील गाठी रे एक चालती वाटा ॥
एक उभा भार वाहोनि पाहे उगाचि खोटा ।

एक ते मरुनि आराले आतां ऐसेचि घाटा ॥ ३ ॥
एकीं स्थिराविल्या गाई रे एक बळल्या देती ।
एकांच्या फांकल्या वोढाळा फेरे मोघतीं घेती ॥
एकें चाराबोरा गुंतलीं नाहीं जीवन चित्तीं ।
एक एका चला म्हणती एक हुंबरी घेती ॥ ४ ॥
एकीं एके वाटा लाविलीं भोळीं नेणतीं मुलें ।
आपण घरींच गुंतलें माळा नासिलीं फुलें ॥
गांठीचें तें सोडूं नावडे खाय आइतें दिलें ।
सांपडलें वेठी वोढी रे भार वाहातां मेलें ॥ ५ ॥
एक ते माया गुंतले घरीं बहुत काम ।
वार्ता ही नाहीं तयाची तया कांहींच ठावें ॥
जैसें होतें शिळें संचित तैसे लागलें खावें ।
हातोहातीं गेलें वेचुनि मग पडिलें ठावें ॥ ६ ॥
एकीं हातीं पायीं पटे रे अंगीं लाविल्या राखा ।
एक ते सोलिव वोडके केली सपाट शिखा ॥
एक ते आळसी तळीं रे वरी वाढिल्या काखा ।
सिदोरी वांचून वुद्धि रे केला अवघ्यां वाखा ॥ ७ ॥
तुका म्हणे आतां कान्होबा आम्हां वांटोनि द्यावें ।
आहे नाहीं आम्हांपाशीं तें तुज अवघेंचि ठावें ॥
मोकलितां तुम्ही शरण आम्ही कवणासि जावें ।
कृपावंतें कृपा केली रे पोट भरे तों खावें ॥ ८ ॥

*शब्दार्थ व टीपा* – वचो–फसवी, भोवडा–हालवून द्या, मोटा–शिदोऱ्याची गाठोडी, आराले–शांत झाले, वाखा–नाश.

*अर्थ:– सर्व गोपाळ म्हणू लागले, या रे सर्वजण या, आपण काला करू. कोणी कोणती पापपुण्याची शिदोरी* आणली आहे ते मला पाहू द्या. नीट खरे वोलून मला सर्व शिदोरी दाखवा; काही राखून ठेवू नका जो काही चोरून ठेवील, फसवील त्याला येथून बाहेर काढले जाईल. १ हे काही जण त्याचा झाडा घेतल्याशिवाय काहीच देत नाहीत; जो तो एकमेकाची ग्वाही देत आहे, पण कुणी मोकळेपणाने सांगत नाहीत. तर कुणी ताक देतात, कुणी भात, कुणी भाकरी, कुणी दही देतात, याचा काला तयार करतात मध्यभागी बसलेला श्रीहरी हे सर्व घेतो; तो स्वतः होऊन काही आणीत नाही. २, काही गोपाळांना दम निघेना, त्यांनी आपली पापपुण्याची गाठोडी सोडून लागलीच श्रीकृष्णाच्या स्वाधीन केली. कित्येक जण गाठ सोडण्याचा विचार करीत राहिले तर कित्येक याचा नुसताच विचार करीत होते दुसरा एक या गाठोड्याचे ओझे नुसतेच पाठीवर घेऊन उभा होता; तर दुसरे काही हा सर्व भार हरीस अर्पण करून शांत झाले व दुसऱ्यास तुम्ही असेच करा असे सांगत राहिले. ३ कित्येकांनी आपल्या इंद्रियादी वृत्तींच्या गाई स्थिर केल्या, तर काहींनी त्यांना मोकळे सोडले, विषयात गुंतवून ठेविले काहींच्या या तृष्णेत गाई फारच ओढाळ निघाल्या; त्यांनी त्यांना फार त्रास दिला. विषयसुखातच त्यांचे फेरे चालू राहिले. कित्येकांच्या मनोवृत्ती हिरव्या चाऱ्यास पाहून तेथेच गुंतल्या, त्यांच्या चित्तात श्रीहरी उरला नाही; काही एकमेकांना चला, हरीकडे चला म्हणू लागल्या; काही फेरे धरू लागल्या, हुंकारू लागल्या ४ कित्येकांनी, भोळ्या भावाने

एकमेकाना मार्ग दाखविले व आपण मात्र प्रपचबुद्धीतच गुतून राहिले वरवरच्या माळात व फुलात चित्त गुतवून त्याचा नाश केला याना आपले पदरचे खर्च करून खावे हे पसत नसते दुसऱ्याचे आयते खावेसे वाटते अशी माणसे जन्ममरणाच्या चक्रात सापडून, भार वाहता वाहताच मरण पावतात ५ दुसरी काही माणसे मायेच्या कचाट्यात सापडून देह बुद्धीच्या घरात अडकतात आपली स्वत ची अशी काहीच वार्ता त्याना माहीत नसते ते पूर्वजन्मीच्या क्रियेचे साठलेले जुनेपाके व शिळे फळ असेल तेच त्याना खावे लागते अशा परिस्थितीत, पाहता पाहता त्याचे आयुष्य सपते व मग ते सावध होतात ६ कित्येकानी तर हातापायाना व अगाला राखेचे पट्टे लावून गोसाव्याचे रूप धारण केले दुसऱ्या काहींनी आपले डोके सोलून, मुडून शेंडी नाहीशी केली, सन्यासाचे सोग घेतले आणखी कित्येकानी आळसात राहून दाढीजटा व केस वाढविले, पण शुद्ध पुण्याच्या शिदोरीशिवाय त्याच्या सर्व क्रिया व त्याची बुद्धी याचा नाशच झाला ७ तुकाराम महाराज म्हणतात, आता श्रीकृष्णा, या आमच्या शिदोऱ्या तूच आम्हास वाटून दे आमच्यापाशी काय आहे नाही ते तुला सर्व काही माहीत आहेच तूच जर आम्हास सोडलेस तर मग आम्ही शरण कुणास जावे? कृपावत परमेश्वराने एकदा कृपा केली की मग पोटभर भोजन सुखाने करता येते ८

१४५ बैसवुनि फेरी । गडिया मध्यभागीं हरी ।।
अवघियाचे करी । समाधान सारिखें ।। १ ।।
पाहे तो देखे समोर । भोगी अवघे प्रकार ।।
हरुषें झेली कर । कवळ मुखीं देती ते ।। २ ।।
बोले बोलतिया सवे । देतील ते त्याचे घ्यावे ।।
एक एका ठावे । येर येरा अदृश्य ।। ३ ।।
कोणाचिया जीवा । वाटो नेदीं विषम ।।
तुका म्हणे देवा । बहु आवडीचा हेवा ।। ४ ।।

शब्दार्थ व टीपा – फेरी–ओळ, कवळ–घास, विषम–दु ख

अर्थ – श्रीकृष्ण सर्वांना आपल्या भोवती ओळ करून बसवितो व आपण सर्वांचे समाधान करून सर्वांना सारखेच वागवितो १ प्रत्येकास तो आपल्या समोरच आहे असे भासले व सर्व प्रकारचे भोग ते भोगू लागले मोठ्या आनंदाने हातात व मुखात श्रीकृष्ण घास झेलू लागला २ जे स्वत शी बोलतील त्याच्याशी तो मनापासून बोलू लागला, जे देतील ते तो घेऊ लागला त्याच्या या कृत्यातील अर्थ त्याचा त्यालाच माहीत असावा त्याच्यात ते गुप्त होते ३ तुकाराम महाराज म्हणतात, ईश्वराला भक्ताच्या प्रीतीची हौस मोठीच आहे तो कुणाच्याही मनाला दु ख होईल असे कधी करीत नाही ४

१४६ आम्हा निकट वासे । कळो आले जैसे तैसे ।।
नाही अनारीसे । कान्होबाचे अतरीं ।। १ ।।
पीडती आपुल्या भावना । जैसी जयाची वासना ।।
कर्माचा देखणा । पाहे लीळा कौतुक ।। २ ।।
खेळ खेळे न पडे डाई । ज्याचा भार त्याच्या ठायी ।।
कोणी पडतील डाईं । कोणी कोडी उगवीती ।। ३ ।।
तुका म्हणे कवळ । हाती घेऊनि गोपाळ ।।
देतो ज्याचे बळ । त्यासि तैसा विभाग ।। ४ ।।

शब्दार्थ व टीपा – अनारीसे–वेगळे, डाई–डावात, कवळ–घास

अर्थ.– आम्ही त्या परमेश्वराच्या जवळ वावरणारे असल्यामुळे तो जसा आहे तसा आमच्या ध्यानात आला आहे काम्होवाच्या मनातील भाव आम्हास समजला असून तो काही वेगळी भावना धरून असतो असे नाही १ ज्याची जशी वासना असेल तशी तो त्याला पीडा देत असतो हे मात्र खरे असून हा श्रीहरी कर्माकडे नुसता पाहात असतो सर्व लीलाचे कौतुक तो बघत असतो २ तो स्वत ही काही खेळ खेळतो, पण कुणाच्या डावात मात्र सापडत नाही त्याचा भार त्याच्या डोक्यावर ठेवून देतो, कुणी या डायात अडकून पडतात तर कुणी या प्रपचाच्या डावातून मोकळे होतात ३ तुकाराम महाराज म्हणतात, हा गोपाळ हातात घास घेऊन ज्याचा जसा अधिकार असेल तसा त्याना काल्याचा भाग देत असतो ४

१४७ काम सारूनि सकळ । आले अवघे गोपाळ ।
जाली आता वेळ । म्हणती आणा सिदोऱ्या ॥ १ ॥
देती आपुलाला झाडा । गाई बैसविल्या वाडा ।
दोदिल बोबडा । वाकडयाचा हरि मेळीं ॥ २ ॥
आपुलालिये आवडी । मुदा बांधल्या परवडी ।
निवडूनिया गोडी । हरि मेळवी त्यात तें ॥ ३ ॥
भार वागविला खांदीं । नव्हती मिळाली जो मादी ।
सकाळाचे सदी । बोझीं अवघीं उतरलीं ॥ ४ ॥
मागे जो तातडी । त्यासि रागा येती गडी ।
तुझी का रे कुडी । येथें मिथ्या भावना ॥ ५ ॥
एक एकाच्या सवादें । कैसे धाले [1]ब्रह्मानदें ।
तुका म्हणे पदें । या रे वदू हरीचीं ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – वाडा–गोठ्यात, दोदील–मोठ्या पोटाचा, परवडी–विविध प्रकारच्या, मादी–समुदाय, सदी–अडचणीत, कुडी–खोटी, धाल–आनदे

अर्थ – नित्याची सर्व कामे करून झाल्यावर सर्व गोपाळ एकत्र झाले व म्हणू लागले, आता वेळ झाली आपल्या शिदोऱ्या सोडा पाहू १ मग सर्वजण आपापल्या कर्माचा हिशेब देऊन इद्रियरूपी गाई आपल्या हृदयाच्या गोठ्यात बाधू लागले श्रीहरीच्या भोवती मोठ्या पोटाचा दोदील बोबडा, वाकडा असे सौंगडी होते २ या गोपाळांनी आपापल्या आवडीनुसार नाना प्रकारच्या भावभक्तीच्या विविध प्रकारच्या मुदा बाधल्या त्यातील गोडी निवडून श्रीहरीनेही आपली शुद्ध आवड त्यात मिसळली ३ जो पर्यंत हे गोपाळ समुदायात एकत्र झालेले नव्हते तोपर्यंत त्यातील प्रत्येकास आपापला भार खाद्यावर वागवावा लागत होता पण आता सगळ एकत्र आल्यावर अडचणींची ओझी खाद्यावरून खाली आली ४ जो उतावळा होऊन श्रीहरीचे प्रेम प्रथम मागतो त्यास दुसरे रागावतात व म्हणतात, अशी तुझी खोटी भावना का रे? ५ तुकाराम महाराज म्हणतात, अशा प्रकारे एकमेकाच्या सवादात सर्व गोपाळ ब्रह्मानद मिळवून सतुष्ट झाले, ही सतुष्टता देणाऱ्या श्रीहरीची पाऊले आपण वदन करू या ६

१४८ यमुनें पावळीं । गडिया बोले वनमाळी ॥
आणा सिदोऱ्या सकळी । काला करू आजी ।
अवघे एके ठायीं । करूनि स्वाद त्याचा पाहीं ।
मजपाशीं आहे ते ही । तुम्हामाजी देतों ॥ १ ॥

---

[1] परमानद

म्हणती बरवें गोपाळ । म्हणती बरवें गोपाळ ।
वाहाती सकळ । मोहरी पांवे आनंदें ।
खडकीं सोडियेल्या मोटा । अवघा केला एकवटा ।
काला करूनियां वांटा । गडियां देतो हरि ॥ २ ॥
एकापुढें एक । घाली हात पसरी मुख ।
गोळा पांवे तया सुख । अधिकचि वाटे ।
म्हणती गोड जालें । म्हणतो गोड जालें ।
आणिक देईं । नाहीं पोट धालें ॥ ३ ॥
हात नेतो मुखापासीं । एर आशा तोंड वासी ।
खाय आपण तयासी । दावी वांकुलिया ।
देऊनिया मिठी । पळे लागतील पाठीं ।
धरूनि काढितील ओठीं । मुखामाजी खाती ॥ ४ ॥
म्हणती ठकडा रे कान्हा । लावी घांसा भरी राणा ।
दुम करितो शहाणा । पाठोवाठीं तयाच्या ।
अवघियांचें खाय । कवळ कृष्णा माझी माय ।
सुरवर म्हणती हाय हाय । सुखा अंतरलों ॥ ५ ॥
एक एका मारी । ढुंगा पाठी तोंडावरी ।
गोळा न साहवे हरि । म्हणे पुरे आतां ।
येतो काकुलती । गोळा न साहवे श्रीपती ।
म्हणे खेळों आतां नीती । सांगों आदरिलें ॥ ६ ॥
आनंदाचे फेरी । माजी घालुनियां हरी ।
एक घालितो हुंबरी । वाती सिंगें पांवे ।
वांकडे बोबडे । खुडे मुडे एक लुडे ।
कृष्णा आवडती पुढें । बहु भाविक ते ॥ ७ ॥
करी कवतुक । त्यांचें देखोनियां मुख ।
हरी वाटतसे सुख । खदखदां हांसें ।
एक एकाचें उच्छिष्ट । खातां न मानिती वीट ।
केलों लाजतां ही धीट । आपुलिया संगें ॥ ८ ॥
नाहीं ज्याची गेली भुक । त्याचें पसरवितो मुख ।
अवघियां देतो सुख । सारिखेंचि हरी ।
म्हणती भला भला हरी । तुझी संगती रे बरी ।
आतां चाळविसी तरी । न वजों आणिकां सवें ॥ ९ ॥
गाई विसरल्या चार । पक्षी श्वापदांचे भार ।
जालें यमुनेचें स्थिर । जळ वाहो ठेलें ।

देव पाहाती सकळ । मुखें घोटूनियां लाळ ।
धन्य म्हणती गोपाळ । धिग जालों आम्ही ॥ १० ॥
म्हणती कैसें करावे । म्हणती कैसें करावें ।
यमुनाजळीं व्हावें । मत्स्य शेष घ्यावया ।
सुरवरांचे थाट । भरलें यमुनेचें तट ।
तंव अधिकची होंट । मटमटां वाजवी ॥ ११ ॥
आनंदें सहित । क्रीडा करी गोपीनाथ ।
म्हणती यमुनेंत हात । नका धुऊं कोणी ।
म्हणती जाणे जीवीचें । म्हणती जाणे जीवीचें ।
लाजे त्यास येथें कैंचे । शेष कृष्णाचे । लाभ थोरिवे ॥ १२ ॥
धन्य दिवस काळ । आजी पावला गोपाळ ।
म्हणती धालों रे सकळ । तुझिया नि हातें ।
मानवले गडी । एक एकांचे आवडी ।
दहीं लादलें परवडी । धणीवरी आजी ॥ १३ ॥
तुझा संग बरवा । नित्य आम्हां द्यावा ।
ऐसें करूनि जीवा । नित्य देवा चालावें ।
तंव म्हणे वनमाळी । घ्या रे काठिया कांबळी ।
आतां जाऊं खेळीमेळीं । गाई चारावया ॥ १४ ॥
तुका म्हणे प्रेमें धालीं । कोणा न साहवे चाली ।
गाई गोपाळांसि केली । आपण वांसरी ॥ १५ ॥
आजि जाला आनंद । आजि जाला आनंद ।
चाले परमानंद । सवे आम्हांसहित ॥ १६ ॥

*शब्दार्थ व टीपा :– पावळीं–तीरावर, वाहाती–वाजविती, मोहरी–मुरली, ठकडा–चतुराईने फसविणारा, दुम करणे–धूम पळणे, वाती–वाजविती, खुडा–थोटे, मुडे–वाकडे, लुडे–लुळे, होंट–ओठ*

अर्थ – यमुनेच्या तीरावर असलेल्या सर्व सोबत्याना श्रीहरी म्हणाले, चला रे आपण आपल्या शिदोऱ्या आज सकाळीच सोडू आपण सर्वांचा एकत्र काला करू. सर्व शिदोऱ्या एक करून मी त्याचा स्वाद पाहीन माझ्या जवळची जी शिदोरी आहे तीही मी तुमच्याजवळ देतो १ 'तेव्हा बरे आहे, बरे आहे' असे सर्व गोपाळांनी म्हटले व ते मोठ्या आनंदाने मुरली आणि पावे वाजवू लागले सर्वांनी नदीच्या काठावरील खडकावर आपापल्या शिदोऱ्यांची गाठोडी सोडली व सर्वांचा एकत्र काला केला; व सर्व मित्राना श्रीहरी त्याचा भाग वाटून देऊ लागला २ यावेळी जो तो दुसऱ्याच्या अगोदर आपणास वाटा मिळावा म्हणून तोंड अथवा हात पसरू लागला. ज्याला मोठा वाटा मिळाला त्याला फारच सुख होई, व तो फार छान झाले, छान झाले असे म्हणू लागला सर्वजण म्हणत राहिले की आमचे पोटच भरले नाही. आम्हास आणखी काला हवा ३ देवाने तोंडापाशी हात नेला की दुसरा आपल्यास काला मिळावा म्हणून तोंड उघडून त्याच्याकडे पाहू लागला, पण श्रीहरी स्वतःच खाऊ लागला व मागणारास गमतीने वेडावू लागला. सर्व काला स्वत एकट्यानेच मुखात घालून तो श्रीहरी पळू लागला. तेव्हा सर्व गोपाळ त्याच्या पाठोपाठ धावू लागले ४ आणि म्हणायला लागले की, हा कान्हा मोठा फसवा आहे. एका घासासाठी

हा रानभर पळायला लावतो त्याच्या पाठीमागे धूम ठोकून जो पळेल तोच खरा शहाणा श्रीहरी माय आम्हा सर्वांचे घास एकटीच खाते या सर्व सुखाना आपण मुकलो म्हणून इद्रादी देव हायहाय करू लागले ५ सर्व गोपाळ मग काल्याच्या घासाचाच खेळ खेळू लागले घासाने एकमेकाना मारायला लागले कुणी कुणाच्या तोंडावर, ढुगणावर मारू लागले श्रीहरीला हा मार सहन होईना, तेव्हा आता पुरे असे तो म्हणू लागला मी आता फार दमलो आता आपण नियमास धरून आपले खेळ खेळू या श्रीकृष्णाच्या या सायण्याचा सर्वांनी आदर केला ६ मग सर्व गोपाळानी मोठ्या आनदाने फेर धरले व मध्यभागी श्रीहरीला बसविले नतर कित्येकजण फेर धरत राहिले. काही जणानी शिगे, पावे वाजविण्यास सुरुवात केली या सोबत्यात काही गोपाळ वाकडे होते, काही बोबडे होते काही थोटे, लुळेही होते परतु हे सर्व फार भाविक असल्यामुळे श्रीकृष्णाला फार प्रिय होते ७ त्याची भावपूर्ण तोंडे पाहून श्रीकृष्ण त्याचे कौतुक करू लागला हे सर्व सुख पाहून श्रीकृष्ण खदखदून हसू लागला एकमेकाचे उष्टे खाण्यासही कुणास वीट वाटेनासा झाला काही थोडे सकोच धरणारे होते, पण त्यानाही श्रीहरीने आपल्या सगतीने धीट बनविले ८ ज्याची अजून मूक गेली नाही त्याची मुखे उघडवून तो हरी सर्वांना सुख सारख्या प्रमाणात देतो मग सर्वजण म्हणत राहिले की, श्रीकृष्णा, तू फार चागला, फार चागला आहेस रे, तुझी सगत फार चागली, आता तू जरी आम्हास फसविलेस तरी आम्ही दुसऱ्या कुणाही बरोबर जाणार नाही ९ श्रीहरी व गोपाळ याचा हा आनदप्रसग पाहून गाई चारा खायच्या विसरून गेल्या पक्षी व वनातील इतर पशू याचेही चारा खाणे बद झाले यमुनेचे पाणी स्थिर झाले, त्याचा प्रवाहच्छ जणु श्रीकृष्णस्मरणात थाबला हे सर्व प्रकार देवानी पाहिले व त्याच्या तोंडास पाणी सुटले, व ते म्हणू लागले की यमुनेच्या तीरावरचे हे गोपाळ किती धन्य आहेत, आमचा जन्म मात्र फुकट धिक्कार असो त्याला १० मग ते स्वर्गातील देव म्हणू लागले, काय करावे, कसे करावे ? काल्याचा भाग भक्षण करण्यासाठी आपण यमुनेच्या पाण्यातील मासे व्हावे असे त्याना वाटले या सकल्पास अनुसरून सर्व देव मत्स्यरूपानी यमुनेच्या तीरावर आले सर्व किनारा भरून गेला तेव्हा हे खटचाळ गोपाळ अधिकच प्रमाणात आपले ओठ मटामटा वाजवून त्याना हिणवू लागले ११ मोठ्या आनदाने गोपाळासह श्रीकृष्ण खेळ खेळू लागले आणि त्यानी कुणीही आपले हात यमुनेत धुवू नका ( कारण या मत्स्याना काल्याचा शेष उगाच मिळेल ) असे सागितले त्यावर हा कृष्ण बरोबर आमच्या मनातले ओळखतो असे गोपाळ म्हणू लागले श्रीकृष्णाच्या हातच्या काल्याचा भाग जे आपल्या थोरवीमुळे लाजणारे आहेत त्याना कसा मिळणार ? १२ आजचा दिवस व काळ किती धन्यतेचा आहे, कारण आज श्रीकृष्ण परमात्मा आम्हास भेटला देवा, तुझ्या हातामधून आज आम्हास काल्याचा प्रसाद मिळाला म्हणून आम्ही आज सतुष्ट झालो एकमेकाच्या सगतीत हे गोपाळ सौंगडी फार सुखावले नाना प्रकारानी यानी दही पोटभर सतुष्ट होऊन खाल्ले असल्याने ते तृप्त झाले १३ देवा, तुझी ही चागली सगत आम्हास नेहमी असावी असाच प्रकारे नित्य जीवाना आनद देऊन आम्हास चालवावे त्यावर तो वनमाळी सर्व गोपाळाना म्हणाला, चला रे आपापल्या काठ्या, कावळ्या घ्या आपण सर्वजण खळीमेळीने गाई चारायला निघू या आता १४ तुकाराम महाराज म्हणतात, आज मोठा ब्रह्मानद झाला त्याचे वर्णनही करता येणार नाही आज या श्रीकृष्णाने सर्व गाईंना व गोपाळाना आपल्यासारखच करून टाकले १५ आज केवढा आनद झाला आहे प्रत्यक्ष परमानदच आपल्याबरोबर आज उभा आहे १६

१४९ या हो या चला जाऊ सकळा । पाहो हा सोहळा आजि वृंदावनींचा ॥ १ ॥
वाइला गोपाळें वेणुनाद पडे कानी । धीर नव्हे मनी चित्त जालें चचळ ॥ २ ॥
उरले ते सांडा काम नका करू गोवी । हेचि वेळ ठावी मज कृष्णभेटीची ॥ ३ ॥
निवतील डोळे याचे श्रीमुख पाहता । बोलती ते आता घरचीं सोसूं वाईट ॥ ४ ॥
कृष्णभेटीआड काहीं [1]नावडे आणीक । लाज तरी लोक मन जाले उदास ॥ ५ ॥
एकाएकीं चालियेल्या सादावीत सवे । तुका म्हणे देवें रूपें केल्या तन्मय ॥ ६ ॥

१ न साहे

शब्दार्थ व टीपा – वाइला–वाजविला, गोवी–गुतवण, सादावीत–सावध करीत

अर्थ – चला, आज सर्वजण वृन्दावनातील सोहळा पाहण्यासाठी जाऊ या १ या ठिकाणी श्रीकृष्ण मुरली वाजवीत आहे ती आपल्या कानी येईल चला, मला काही धीर निघत नाही, माझे चित्त आज भारी चचल बनले आहे २ जे हातात काम उरले असेल ते टाकून द्या त्यात मन गुतवू नका कारण, श्रीकृष्णास भेटण्याची हीच एक वेळ आहे ३ त्या श्रीकृष्णाला पाहताच डोळे निवतील घरची माणसे यासाठी काही वेडेवाकडे बोलतील तर ते सहन करू ४ कारण कृष्णाच्या भेटीआड जे येईल ते काही मला आवडणार नाही त्याच्या भेटीविषयी लाज कसली? या लाजेसबधीच माझे मन उदास झाले आहे मी लज्जेची पर्वा करणार नाही ५ तुकाराम महाराज म्हणतात, एकमेकींना सावध करीत त्या सर्व एका मेळयाने श्रीकृष्णाकडे निघाल्या त्या श्रीकृष्णाने आपल्या ठिकाणी त्याना तन्मय करून सोडले आहे ६

## फुगड्या–अभंग २

१५० फुगडी फू फुगडी घालितां उघडी राहे । लाज सांडोनि एक एकी पाहे ॥ १ ॥
फुगडी गे अवघें मोडी गे । तरीच गोडी गे ससार तोडी गे ॥ २ ॥
मागें जें शिकली होतीस पोटी । तेचि विचारूनि आता उच्चारी ओठीं ॥ ३ ॥
त्रिगुणाची वेणी तुझे उडते पाठीं । सावरूनि धरी घाली मूळबदीं गाठी ॥ ४ ॥
आगळें पाउल जिंके एकाएक । पावसी मान हे मानवती तिन्ही लोक ॥ ५ ॥
तुका म्हणे तुजमजमध्यें एक भाव । सम तुके बार घेऊं पावों उंच ठाव ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – मूळबद–योगातील एक क्रिया, टाचेने गुदद्वार दाबून, सकोचित करून अपानवायूची गती वरच्या दिशेस करणे, तुकें–वजनाने, बार–खेप

अर्थ – प्रपचरूपी फुगडी घालीत असताना तू बाह्य वस्तूविषयी कसलीही ममता न धरता निःसग होऊन उघडी राहा सर्व प्रकारची लाज सोडून त्या एका परमेश्वराकडे एकरूपाने तू पाहा १ या फुगडीच्या नादाने तू प्रपचातील बाह्य उपाधी साऱ्या मोडून टाक, ससारातील बाह्य गोष्टींचा सग सोडलास तरच या फुगडीची गोडी तुझ्या ध्यानात येईल २ मागे अव्यक्त असताना जो एकात्मतेचा भाव तू शिकली होतीस तो तुझ्या जवळ होताच, त्याचाच विचार करून आपल्या ओठातून तू उच्चार कर ३ ही फुगडी खेळताना त्रिगुणाची वेणी तुझ्या पाठीवर एकसारखी उडत असते, ती नीट सावरून धर यासाठी योगमार्गातील मूळबदादि क्रिया कराव्या लागल्या तरी तू कराव्यास ४ या फुगडीच्या खेळातील तुझे एक पाऊल पुढे पडेल तसे तू जिंकून घेशील एकरूप होण्यात तुला यश मिळेल तुला मान मिळेल तिन्ही लोक तुला मान देतील ५ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तुझ्या माझ्या-मध्ये एकच आत्मरूप भाव आहे या खेपेस आता अशा आत्मरूपाची अनुभूती घेऊन तुझ्या बरोबरीने आम्ही उचावले जाऊ ६

१५१ फुगडी फू सवती माझे तू । हागुनि भरलें धू तुझ्या ढुंगा तोंडावरि थू ॥ १ ॥
फुगडी घेतां आली हरी । ऊठ जावो जगनोवरी ॥ २ ॥
हात पाय बेंबळ जाती । ढुगण घोळिता लागे माती ॥ ३ ॥
सात पाच आणिल्या हरी । वाचुनी काय तगसी पोरी ॥ ४ ॥
सरला दम पांगले पाय । आझुनि वरी घोळिसी काय ॥ ५ ॥
तुका म्हणे आझुन तरी । सांगितले ते गधडी करी ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – हरी–पराभव, जगनोवरी–जगाशी सबध ठेवणारी नवरी, बेंबळ–ढिले, सात–सप्त धातू, पाच–पचमहाभूते.

अर्थ :– या फुगडीमध्ये देहादी वृत्तींच्या मागे लागणाऱ्या सवतीशी तू गडी फू कर. त्याच्या नादाने जी वाईट क्रियाकर्मे झाली ती तुलाच धुवून काढावी लागतील. नाही तर तुझ्या ढुंगणावर व तोंडावर आम्ही थुंकू. १ ही प्रपंचरूप फुगडी खेळताना तुला जरी पराभव झाल्यासारखा वाटला तरी सर्व जगाशी संबंध ठेवणाऱ्या नवऱ्या मुलीप्रमाणे तू होऊ नकोस. ऊठ, सावध होऊन त्या श्रीहरीस शरण जा. २ ही आजची वेळ जर जाईल तर तुझे हातपाय ढिले पडतील. तू वाटेल तशी वागलीस तर तुझ्या अंगास फक्त मातीच लागेल. ३ तू सप्तधातू व पञ्च-महाभूते यांना जिंकून आणल्याखेरीज या प्रपंचरूप फुगडीत टिकणार नाहीस पोरी ४ आताच पहा, तुझ्या अंगातील सर्व शक्ती संपली असून तुझे पायही पांगुळले आहेत. तरी अजूनही तू या प्रपंचात काय घोळून राहिली आहेस? गुरफटून राहिली आहेस? ५ तुकाराम महाराज म्हणतात, हे गधडे, अजून तरी मी जे सांगतो आहे ते कर ना ६

## लखोटा–अभंग १

१५२ लयें लयें लखोटा। मूळबंदि कासोटा।
भावा केलें साहें। आतां माझें पाहें॥ १॥
हातोहातीं गुंतली। जीवपणा मुकली।
धीर माझा निका। सांडीं बोल फिका॥ २॥
अंगीकारी हरि। नको पडों फेरी।
लाज धरीं भांडे। जग झोडी रांडे॥ ३॥
वैस भावा पाठीं। ऐक माझ्या गोष्टी।
केला सांडीं गोहो। येथें धरीं मोहो॥ ४॥
पाठमोरा डोल। आवरी तें बोल।
पांगलीस बाळा। पुढें अवकळा॥ ५॥
आतां उभी ठायीं। उभाउभीं पाहीं।
नको होऊं डुकरी। पुढें गाढव कुतरी॥ ६॥
नामा केलें खरें। आपुलें म्या बरें।
तुका म्हणे येरी। पांगविल्या पोरी॥ ७॥

शब्दार्थ व टीपा:– लयें–अनुसधानाची एकरूपता निका–उत्तम, झोंड–निलाजरी, गोहो–पती, डोल-कप.

अर्थ – योगमार्गातील मूळबंदादि क्रियांचा कासोटा घालून व सर्व वृत्तींच्या अनुसंधानाचा परमेश्वराशी लय साधून मी ही लखोट्याची क्रीडा करीत आहे. माझ्या भाववृत्तींचे साह्य मी घेतले असल्यामुळे माझी क्रीडा आता पाहाच. १ माझी वृत्ती आता जीवपणास मुकून ताबडतोब ईश्वरस्वरूपातच गुंतून राहिली. माझे धैर्य पाहा किती उत्तम आहे उगाच पोकळ बडबड तू आता सोडून दे. २ तूही याच श्रीहरीचा अंगिकार कर. उगाच जन्म-मरणाच्या फेऱ्यात अडकू नकोस. साऱ्या जगाची उठाठेव करणाऱ्या रांडे, भाडखोर बये, थोडीशी तरी लाज तू मनात धर ना. ३ तू श्रीहरीच्या भक्तीचाच फक्त आश्रय कर; माझी गोष्ट ऐक नीट. देहाभिमानाचा तू जो पती केला आहेस तो सोडून टाक; व या श्रीहरीच्या ठिकाणीच प्रेम ठेव. ४ पाठमोरी होशील तर तुझी अवस्था कठीण होईल. तुला कंप सुटेल, व्यर्थ बडबड तुला आवरावी लागेल व बाळे, बाह्य वृत्तींत तू रमून राहशील तर पुढे फार कठिण स्थिती प्राप्त होईल. ५ आताच या ठिकाणी उभी आहेस तोच त्या श्रीहरीकडे जा. उगाच पुढे डुक्कर, गाढव, कुत्री यांच्या जन्मास जाऊ नकोस. ६ तुकाराम महाराज म्हणतात, या श्रीहरीच्या नामाने माझे मी कल्याण करून घेतले आहे; पण इतर मुली मात्र त्यांचे चित्त देहावर व प्रपंचावर असल्यामुळे पळून गेल्या. ७

# हुंबरी–अभंग १

१५३ तुर्शी कोण घाली हुंबरी । साही पांगल्या अठरा चारी ॥ १ ॥
सहस्र मुखावरी हरी । शेष शिणविलें ॥ २ ॥
चेंडुवासवें घातली उडी । नाथिला काळिया देऊनि बुडी ॥ ३ ॥
अशुद्ध पीता करुणा नाहीं । तुवां माउशी ही मारियेली ॥ ४ ॥
रावणाचें घर वुडविलें सारें । त्याचीं रांडापोरें मारियेलीं ॥ ५ ॥
जाणों तो ठावा आहेसि आम्हां । तुवां आपुला मामा मारियेला ॥ ६ ॥
याशीं खेळतां नाश थोरू । तुकयास्वामी सारंगधरू ॥ ७ ॥

शब्दार्थ व टीपा :– हुंबरी–तोंडाने एक प्रकारचा आवाज करून खेळावयाचा खेळ, साही–सहा शास्त्रे, अठरा–अठरा पुराणे, चारी–चार वेद, शेष–नाग, नाथिला–वष्टी केला, अशुद्ध–रक्त, माउशी–पूतना मावशी, मामा–कंस, सारंग–एक धनुष्य.

अर्थ :– देवा, तुझ्याशी हुंबरीचा खेळ कोण रे खेळू शकणार ? तुझे सामर्थ्य वर्णन करताना चार वेद, सहा शास्त्रे व अठरा पुराणेंही थकली. १ हरी, एवढा सहस्र मुखाचा शेषनाग, तोही तुझे वर्णन करताना शिणून गेला. २ गोकुळात यमुनेच्या तीरावर चेंडूफळीचा खेळ खेळत असताना चेंडु यमुनेच्या डोहात पडला, तेव्हा तूच यमुनेत उडी घेतलीस व तेथील दुष्ट कालिया नागाचा पराभव केलास. ३ तुला मारण्यासाठी स्तनाला विष लावून ती पूतना मावशी आली असताना तू तिचे रक्त प्राशन करून तिला मारलेस. तुला कधी करुणा अगदी येत नाही रे ? ४ रामावताराच्या वेळी तू त्या रावणाचे घर बुडविलेस, त्याची बायकामुले मारून टाकलीस. ५ तू किती कठिण हृदयाचा आहेस हे आम्हास माहित आहे. या अवतारात तू आपल्या कंस मामालाही ठार मारलेस. ६ तुकाराम महाराज म्हणतात, सारंग नावाचे धनुष्य धारण करणाऱ्या या ईश्वराशी खेळ खेळताना असाच मोठा नाश होतो. कधी देहात्मबुद्धीच्या वृत्तीचा नायनाट होतो. ७

# हमामा–अभंग २

१५४ मशीं पोरा घे रे वार । तुझें बुजीन खालील द्वार ॥ १ ॥
पोरा हमामा रे हमामा रे ॥ २ ॥
मशीं हमामा तूं घालीं । पोरा वरी सांभाळीं खालीं ॥ ३ ॥
तरीच मशीं बोल । पोरा जिव्हाळ्याची ओल ॥ ४ ॥
मशीं घेता भास । जीवा मीतूंपणा नास ॥ ५ ॥
मज सर्वे खरा । पण जाऊं नेदी घरा ॥ ६ ॥
आमुचिये रंगीं । दुजें तगे ना ये संगीं ॥ ७ ॥
तुक्यासवें भास । हरी जीवा करी नास ॥ ८ ॥

तू बोल. ४ माझ्यापुढे शपथ घेताना पोरा मी तूपणाचा नाश व्हायला हवा. ५ तू माझ्याबरोबर येशील तर मी तुला प्रपचादिक सुखांसाठी परत घरी जाऊ देणार नाही. ६ आमच्या या अद्वैताच्या रंगात दुजेपणाचा भाव टिकणारच नाही. ७ तुकाराम महाराज म्हणतात, एकदा माझ्याबरोबर प्रतिज्ञा केली म्हणजे श्रीहरी जीवदशेचा नाश करून सर्वच सुखमय करून सोडतो. ८

१५५ हमामा रे पोरा हमामा रे। हमामा घालितां ठकले पोर।
करी येरझार चौन्याशीची ॥ १ ॥
पहिले पहारा रंगासि आलें। सोहं सोहं सें बार घेतले ॥
देखोनि गडी तें विसरले। डाईं पडिले आपणची ॥ २ ॥
दुसऱ्या पहारा महा आनंदें। हमामा घाली छंदछंदें।
दिस वाढे तों गोड वाटे। परि पुढें नेणे पोर काय होतें तें ॥ ३ ॥
तिसऱ्या पहारा घेतला बार। अहंपणें पाय न राहे स्थिर।
सोस सोस करितां डाईं पडसी। सत्य जाणें हा निर्धार ॥ ४ ॥
चौथ्या पहारा हमामा। घालिसी कांपविसी हातपाय।
सुऱ्यापाटिलाचा पोर यम। त्याचे पडसील डाईं ॥ ५ ॥
हमामा घालितां भ्याला तुका। त्यानें सांडिली गडयाची सोई।
यादवांचा मूल एक विठोबा त्यासवें चारितो गाईं ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा :– ठकले–फसले, पहारा–वेळेस, सुऱ्या पाटिलाचा–सूर्य या पाटलाचा

अर्थ :– पोरा, हमामा खेळ खेळ रे. हमामा हमामा म्हणताना व खेळताना हे पोर फसून गेले आहे चौऱ्याशी लक्ष योनींच्या फंदात सापडले. १ गर्भावस्थेच्या पहिल्या अवस्थेत मोठा रंग आलेला होता, त्यावेळी पोरा, तू सोहं सोह–सो मी आहे तो मी आहे, असा छंद घेतलास, पण ससारातील इतर गडी पाहून तू हा छद विसरलास या डावात आपण होऊन सापडलास २ दुसऱ्या बालपणाच्या वेळी तू मोठ्या आनदात होतास, स्वच्छंदाने हमामाचा खेळ खेळत राहिलास. जसजशी वाढ होऊ लागली तसतसे तुला बरे वाटले, पण पोरा, पुढे काय आहे हे तुला काय माहित ? ३ तिसऱ्या तारुण्याच्या अवस्थेत याने मी वेगळा, निराळा असा देहबुद्धीच्या अहपणाचा ध्यास घेतला. त्यामुळे याचा पाय स्थिर राहीना, तो सारखी ससाराची उठाठेव करू लागला. त्याने नाना विषयाचा सोस केल्यामुळे तो या डावात पुरता सापडला; हे खरेच समजावे. ४ मग चौथ्या अवस्थेत वृद्धपणा आल्यावर त्याचा हमामा निराळाच सुरू होतो त्याचे हातपाय कापू लागतात सूर्याजी पाटलाचा पोर यम त्याच्या तावडीत सापडण्याची वेळ जवळच आलेली असते. ५ तुकाराम महाराज म्हणतात, देहादी प्रपचाशी हमामा खेळताना मी भीत असतो. मी या सर्व गड्याचा सबध सोडून गोकुळातील यादवाचा तो एक मूल जो विठोबा त्यालाच मित्र करून त्याच्या गाई मी वळण्याचे, चारण्याचे काम करतो. ६

## गाई–अभंग १

१५६ आम्हां घरी एक गाय दुभता हे। पान्हा न समाये त्रिभुवनीं ॥ १ ॥
वान ते सांवळी नांव ते श्रीधरा। चरे वसुंधरा चौदा भुवनें ॥ २ ॥
वत्स नाहीं माय भलत्या सवे जाय। कुर्वाळी तो लाहे भावभरणा ॥ ३ ॥
चहूं धारीं क्षीर वोळली अमुप। धाले सनकादिक सिद्ध मुनी ॥ ४ ॥
तुका म्हणे माझी भूक तेथें काय। जोगाविते माय तिन्ही लोकां ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – दुभताहे–दूध देणारी आहे, न समाये–मावत नाही, वान–वर्ण, रग, वसुधरा–पृथ्वी, भलत्या–कुणाही, जोगविते–पोसत

अर्थ – आमच्या घरी एक दुभती गाय असून तिचा पान्हा सर्व त्रिभुवनांत मावत नाही १ तिचा रग काळसर असून तिचे नाव श्रीधर असे आहे ती पृथ्वी व चौदा भुवनात चरत असते, हिंडत असते २ तिला स्वत ला वासरू नसल्याने ती कोणाही भक्ताबरोबर जाते जो तिला प्रमाने कुरवाळतो त्याला ती कृपेचे दूध भरपूर देते ३ या गाईच्या चार स्तनातून चार धारानी कृपेचे दूध भरपूर मिळते याच दुधावर सनकादिक ऋषिमुनी व सिद्धलोक सतुष्ट झाले आहेत ४ तुकाराम महाराज म्हणतात अशा ठिकाणी माझी एवढीशी भूक काही विशष नाही, कारण ही अदभुत धेनू तीनही लोकाची जोपासना करणारी आहे ५

## कांडण–अभग २

१५७ सिद्ध करुनिया ठेविले काडण । मज सागातीण शुद्ध बुद्धि गे ॥ १ ॥
आठव हा धरी मज जागें करीं । मागिले पाहारी सेवटिचा गे ॥ २ ॥
सम तुके घाव घालीं वो साजणी ॥ मी तुजमिळणी जव मिळें ॥ ३ ॥
एक कशी पाखडी दुसरी निवडी । नि शेष तिसडी ओज करी ॥ ४ ॥
सरले काडण पाकसिद्धि करी । मेळवण क्षिरीसाकरेचे ॥ ५ ॥
उद्धव अक्रूर बधु दोघेजण । बाप नारायण जेवणार ॥ ६ ॥
तुका म्हणे मज माहेरीं आवडी । म्हणोनि तातडी मूळ केले ॥ ७ ॥

शब्दार्थ व टीपा – सम तुके–समानपणाची

अर्थ – आत्मा–अनात्माभावाचे काडण मी तयार करुन ठेविले आहे काडण करण्यासारख्याच या गोष्टी आहेत माझी विवेकबुद्धी हीच या कामी माझी मैत्रीण आहे तिच्या साहचाने मी हे काडण करीत आहे १ ही आठवण मनात धरुनच असे, मला रात्रीच्या शेवटच्या प्रहरी म्हणजे पहाटेसच तू जागे कर २ हे मैत्रिणी, तू सवत्र समत्वबुद्धी धरुनच या काडणासाठी घाव घाल तर तुझी व माझी जुळणी एकरूपाची होईल ३ या शुद्धबुद्धीने मी माझ्या वृत्तीचे किंवा देहात्मभावाचे काडण करताना एवदा पाखडीन, एकदा निवडीन, एकदा सडून काढीन, मग मात्र बुद्धी तेजस्वी होईल ४ एवढे घाले की मग काडण सपेल नतर स्वयपाक तयार होईल खीर व साखर याची मिळणी आत्मज्ञान व सुखानुभूती याच्या स्वरूपात होईल ५ आणि या अलौकिक प्रसगी उद्धव व अक्रूर हे श्रीकृष्ण सखे व प्रत्यक्ष नारायण भोजनास यणार आहेत ६ तुकाराम महाराज म्हणतात मला माझ्या माहेरच्या माणसाची मोठीच आवड असल्यामुळेच तातडीन ते सवजण मला बोलवावयाला आले आहेत ७

१५८ सावडीं काडण ओवी नारायण । निवडे आपण भूस सार ॥ १ ॥
मुसळ आधारी आवरूनि धरीं । सावरोनि थिरीं घाव घालीं ॥ २ ॥
वाजती काकणे अनुहात गजरे । छद माहियेरे गाऊ गीति ॥ ३ ॥
काडिता काडण नव्हे भाग शीण । तुजमजपण निवडे तो ॥ ४ ॥
तुका म्हणे रूप उमटे आरिसा । पाक त्या सरिसा शुद्ध जाला ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – सावडीं–सपव थिरीं–स्थिर बुद्धीन, अनुहात–असड ध्वनी

अर्थ – नारायणाची ओवी गात गात आता तू हे काडण आवर व आता यातील भुसा कोणता, व आत्मानुभूतीचे सार कोणते याचा निवाडा करू १ तू आता मुसळ असेच वरचे वर धर व नीट मन, बुद्धी, इद्रियादी वृत्ती याना आवरून स्थिर चित्ताने घाव घाल २ त्यावेळी तुला अनुभव येईल की सोहच्या अनुभूतीचा ध्वनी तुझ्या वृत्तिरूप काकणातूनच तुला एकू यईल याच स्वरानी माहेरच्या आईबापाना आपण गाणे गाऊ ३ जोपर्यंत या

कांडणामध्ये मी-तूपणाचा दुजाभाव निर्माण झालेला नाही तोपर्यंत हे कांडण कांडताना कुठलाच त्रास होणार नाही. ४ तुकाराम महाराज म्हणतात, जसा आरसा असेल तसेच आपले रूप त्यात उमटेल त्याप्रमाणे जशी आपली तयारी असेल तसा परमात्मस्वरूपाच्या स्वानुभूतीचा स्वयंपाक शुद्ध व सात्त्विक होईल. ५

## आडसण-दळण-अभंग १

१५९ शुद्धीचें सारोनि भरियेली पाळी । भरडोनि वोंगळी नाम केलें ॥ १ ॥
आडसोनि शुद्ध करीं वो साजणी । सिद्ध कां पापिणी नासियेलें ॥ २ ॥
सुपीं तोंचि पाहें धड उगटिलें । नव्हतां नासिलें जगझोडी ॥ ३ ॥
सुपीं तोंचि आहे तुज तें आधीन । दळिल्या जेवण जैसें तैसें ॥ ३ ॥
सुपीं तोंचि संग घेईं घडफुडी । एकसा गधडी नास केला ॥ ५ ॥
दळितां आदळे तुज कां न कळे । काय गेले डोळे कान तुझे ॥ ६ ॥
सुपीं तोंचि वोज न करितां सायास । पडसी सांदीस तुका म्हणे ॥ ७ ॥

शब्दार्थ व टीपा :– आडसण–सुपाने वेगळे काढलेले स्वच्छ दाणे, उगटिले–वाईट, घडफुडी–खरोखर, वोज–काळजी, सांदीस–कोपऱ्यात.

अर्थ :– शुद्ध केलेले दळण बाजूस सारून उरलेले जात्याच्या पाळीत भरून ठेवले व हे ओंगळ किंवा वाईट असणारे प्रभूच्या नामाने भरडून काढले. १ हे साजणी, आता तू हे दळण आडसून नीट स्वच्छ करून ठेव. पापिणी, हे चांगले तयार होत असलेले दळण तू नाश करू नकोस. २ जोपर्यंत हे सुपात आहे, तोपर्यंत तू ते चांगले की वाईट हे नीट पाहा नाही तर निलाजरे बये, तू सर्वांचाच नाश करून टाकशील ३ जोपर्यंत हे दळण सुपात आहे, जोवर जीव देहात आहे तोपर्यंत तुझी त्यावर सत्ता आहे; मग मात्र, म्हणजे दळण संपल्यावर मात्र कर्मगतीप्रमाणेच तुला त्याचे भोजनरूपाने फळ मिळेल. ४ तेव्हां खरोखर, हे दळण सुपात आहे तोच त्याची संगत धरून नीट त्याचे रूप ओळखून घे. नाही तर गधडे, या मनुष्यदेहाचा नाश करशील. ५ नाही तर देहात्मबुद्धीचे दळण दळतानाच अनेक वेळा मग जन्ममृत्यूंच्या चक्रात सापडावे लागेल. नीट ध्यानात घे. तुझे कान व डोळे गेलेले नाहीत ना? ६ जोपर्यंत हे दळण सुपात आहे, जोपर्यंत देह कायम आहे तोपर्यंतच तू त्याची नीट काळजी घे. फार श्रम न करता तू याला नीट जप; नाही तर अनेक जन्मांच्या कोपऱ्यात मात्र उगाच तू पडून राहशील. ७

## दळण–अभंग १

नाही ४ तुकाराम महाराज म्हणतात, हे शुद्ध दळण सर्वांनाच आवडते आणि ज्या स्त्रीस हे दळण पसत पडते तिला आपल्या जिवास या श्रीहरीभ्रतारापासून कधीही वेगळे राहावत नाही ५

१६१ उपजोनिया पुढती येऊ । काला खाऊ दहींभात ॥ १ ॥
वैकुंठीं तो ऐसे नाहीं । कवळ काहीं काल्याचे ॥ २ ॥
एकमेका देऊ मुखी । सुखीं घालू हुंबरी ॥ ३ ॥
तुका म्हणे वाळवट । बरवे नीट उत्तम ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – उपजोनिया–पुन जन्म घेऊन

अर्थ – पुन पुन जन्म घ्यावा लागला तरी हरकत नाही, पण हा काला व दहीभात आपण मोठ्या प्रेमाने खाऊ १ कारण वैकुंठलोकीसुद्धा हे सुख नाही काल्याच्या घासाचे सुख तेथे कुठून असणार? २ हे घास आपण एकमेकाच्या तोंडात देऊ व मग सुखाने हुबरीचा खेळ खेळू ३ तुकाराम महाराज म्हणतात, असा काल्याचा खेळ खेळायला हे वाळवट फार चागले आहे ४

१६२ याल तर या रे लागें । अवघे माझ्या मागें मागें ॥ १ ॥
आजि देतो पोटभरी । पुरे म्हणाल तोवरी ॥ २ ॥
हळ हळू चला । कोणी कोणाशी न बोला ॥ ३ ॥
तुका म्हणे सांडा घाटे । तेणे नका भरू पोटें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – लागें–लागलीच, घाटे–फोलकटे

अर्थ – गोपाळानो, यायचेच असेल तर लागलीच सर्वजण माझ्या मागोमाग या १ आज मी तुम्हाला काल्याचा प्रसाद पुरे पुरे म्हणाल तोपर्यंत पोटभर देणार आहे २ पण अगदी पाय न वाजविता हळूहळू चला, कुणाशीही एक शब्द बोलू नका ३ तुकाराम महाराज म्हणतात, सर्व फोलकटे सोडून द्या त्यानीं काही तुमचे पोट भरणार नाही ४

१६३ शिंके लावियेलें दुरी । होतो तिचाचे मी वरी ॥ १ ॥
तुम्ही व्हा रे दोहींकडे । मुख पसरूनि गडे ॥ २ ॥
वाहाती त्या धारा । घ्यारे दोहींच्या कोपरा ॥ ३ ॥
तुका म्हणे हातीं टोका । अधिक उणें नेदी एका ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – दुरी–उच, टोका–पाहा

अर्थ – गोपाळानो, आज त्या गवळणीने हे शिंके फार उच लावले आहे काही हरकत नाही तुम्ही एक-मेकाच्या खाद्यावर असे तिघेजण उभे राहा मी तुमच्या खाद्यावर चढून ते दहीदूध काढतो १ तुम्ही मात्र माझ्या दोनही बाजूस तोंड उघडून तयार असा २ माझ्या दोनही हाताच्या कडानी दह्यादुधाच्या धारा वाहतील त्या नीट पाहा ३ तुकाराम महाराज म्हणतात माझ्या हाताकडे पाहा, कुणाला काही कमीजास्त न करता मी सर्वांना सारखाच वाटा देईन ४

१६४ पळाले ते भ्याड । त्यासि येथें जाला नाड ॥ १ ॥
धीट घेती धणीवरी । शिंकीं उतरितो हरी ॥ २ ॥
आपुलिया मतीं । पडलीं विचारीं तीं रितीं ॥ ३ ॥
तुका लागे घ्यारे पाया । कं पावाल या ठाया ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – नाड–फसवणूक, रितीं–रिकामी

अर्थ :– या गोपाळांत जे भित्रे होते ते पळून गेले. पण त्यांची फार फसवणूक झाली. कारण त्यांना स्वसुख मिळाले नाही. १ हा श्रीहरी उंचावरली शिंकी उतरवीत आहे; तुमचे प्रारब्ध, क्रियमाण व संचित कर्मे करीत आहे. अशा प्रसंगी जे धीट होते ते भूमीवर पाय मक्कम ठेवून उभे राहिले. त्यांनी दह्यादुधांचे सेवन केले. २ आणि जे आपल्याच शहाणपणाच्या विचारात सापडले ते बिचारे रिकामेच, प्रभुकृपेशिवाय तसेच राहिले. ३ तुकाराम महाराज म्हणतात, या श्रीहरीच्या पायांशी लागा रे गोपाळांनो, पुनः या ठिकाणी कधी याल? आताच चांगली संधी आहे. ४

१६५ धालें मग पोट । केला गड्यांनीं बोभाट ॥ १ ॥
ये रे ये रे नारायणा । बोलों अबोलण्या खुणा ॥ २ ॥
खांद्यावरी भार । तीं शिणती बहु फार ॥ ३ ॥
तुकयाच्या दातारें । नेलीं सुखी केलीं पोरें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :–धाले–संतुष्ट झाले, बोभाट–आरडाओरडा, अबोलण्या–अनिर्वचनीय, बोलता न येणाऱ्या.

अर्थ :– सर्व दहीदूध खाऊन झाल्यावर गोपाळ संतुष्ट झाले मग त्यांनी प्रभूच्या नावाने एकच आरडाओरडा केला, १ ते म्हणू लागले ' नारायणा, तुम्ही या ना. लौकर या, काही न बोलण्यासारख्या किंवा ज्याचे वर्णन करता येणार नाही अशा काही गोष्टी बोलू ना. ' २ ज्यांच्या खांद्यावर भोपणाचे ओझे फार आहे त्यांना फारच शीण झालेला असतो. ३ तुकाराम महाराज म्हणतात, या श्रीहरीने आपल्याबरोबर जे गोपाळ नेले ते सर्व सुखी करून सोडले. ४

१६६ पाहाती गौळणी । तंव पालथी दुधाणी ॥ १ ॥
म्हणती नंदाचिया पोरें । आजि चोरी केली खरें ॥ २ ॥
त्याविण हे नासी । नव्हे दुसरिया ऐसी ॥ ३ ॥
सवें तुका मेळा । त्याणें अगुणा आणिला ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– दुधाणी–दुधाचे भांडे, नासी–नासाडी, अगुणा–दुर्गुणी, अतिशय गुणी, किंवा गुणातीत

अर्थ – दुसऱ्या दिवशी गोकुळातील गौळणी उठून पाहतात तो दुधाची सर्व भांडी पालथी झालेली त्यांना दिसली. १ त्या म्हणू लागल्या आज त्या नंदाच्याच पोराने चोरी केलेली दिसते. २ त्याच्याशिवाय दह्या-दुधांची ही अशी नासाडी दुसरे कोण करणार ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, त्याच दुर्गुणी किंवा अतिशय गुणी या गुणातीत अशा नंदाच्या पोराने गोपाळांचा मेळा आणून हे कर्म केले असावे. ४

१६७ आतां ऐसें करूं । दोघां धरूनियां मारूं ॥ १ ॥
मग टाकिती हे खोडी । तोंडीं लागली ते गोडी ॥ २ ॥
कोंडूं घरामधीं । न बोलोनि जागों बुद्धी ॥ ३ ॥
बोलाविती देवा । तुका गडियांचा मेळावा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– खोडी–सवय

अर्थ :– त्या गौळणी मग म्हणू लागल्या, आता आपण असे करू, त्या श्रीकृष्णाला व त्याच्या साथिदाराला दोघांनाही धरून चांगला मार देऊ. १ तेव्हाच त्यांची चांगली खोड मोडेल, सवय नाहीशी होईल, त्यांच्या तोंडाला या दुधाची गोडी लागली आहे ती दूर होईल. २ किंवा त्यांना या आपल्या घरात कोंडून ठेवू, हृदयात बंदिस्त करून ठेवू. न बोलताच बुद्धी जागी ठेवून त्याला पकडू ३ तुकाराम महाराज म्हणतात, त्या श्रीहरीस व त्याच्या सौंगड्यांच्या मेळाव्यास बोलवावे व शिक्षा करावी असे त्या गौळणींनी ठरविले. ४

१६८ गडी गेले रडी । कान्हो नेदीस तूं चढी ॥ १ ॥
आम्ही न खेळों न खेळों । आला भाव तुझा कळों ॥ २ ॥
न साहावे भार । बहु लागतो उशीर ॥ ३ ॥
तुका आला रागें । येऊं नेदी मागें मागें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– रडी–चिडून राहिले.

अर्थ :– पुष्कळ वेळ यमुनेच्या तीरावर खेळ खेळल्यावर मग गोपाळ रडकुंडीस आले, चिडूनही गेले व म्हणू लागले, कान्होबा, तू आमचा डाव चढूच देत नाहीस, तूच नेहमी जिंकतोस. १ आम्ही काही आता तुझ्याशी खेळणार नाही, तुझी लबाडीची भावना आता आमच्या ध्यानात आली आहे. २ आम्हाला आता या तुझ्या डावाचे ओझे सहन होत नाही व आम्हाला आता उशीरही झाला आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, असे म्हणत एक गोपाळ रागारागाने मागे निघून गेला. हरीला त्याने आपल्या मागे येऊनसुद्धा दिले नाही. ४

## हाल–अभंग २

१६९ यमुनेतटीं मांडिला खेळ । म्हणे गोपाळ गडियासि ॥ १ ॥
हाल महाहाल मांडा । वाउगी सांडा मोकळी ॥ २ ॥
नांवें ठेवूनि वांटा गडी । न वजे रडी मग कोणी ॥ ३ ॥
तुका म्हणे कान्हो तिळतांदळ्या । जिंके तो करी आपुला खेळ्या ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – हाल–डाव, न वजे–चालणार नाही

अर्थ :– श्रीकृष्णाने यमुनेच्या तीरावर खेळ सुरु करुन आपल्या सौंगड्यांना तो म्हणाला, १ चला आपण मोठा खेळ खेळू. डाव माडू. उगाच व्यर्थ काळ घालवू नका. २ नावे ठेवून गडी वाटून घ्या; म्हणजे मग नतर कुणाला रडी करायला जागा सापडणार नाही. कुणाची तक्रार चालणार नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, या कान्होबाने कामक्रोधरूपी तिळातांदुळाची ओलीसुकी करुन त्याने डाव जिंकला व त्याने आपला खेळ सुरु केला. ४

१७० बळें डाईं न पडे हरी । बुद्धि करी शाहणा तो ॥ १ ॥
मोकळें देवा खेळों द्यावें । सम भावें सांपडावया ॥ २ ॥
येतो जातो वेळोवेळां । न कळे कळा सांपडती ॥ ३ ॥
तुका म्हणे धरा ठायींच्या ठायीं । मिठी जीवीं पायीं घालुनियां ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – कळा–युक्ती.

अर्थ :– मोठ्या बळाने श्रीहरीला पकडण्याचा प्रयत्न करावा तर तो सापडत नाही. म्हणून बुद्धिकौशल्य वापरुन जो त्याला पकडील तोच शहाणा ठरेल १ या श्रीकृष्णाला मोकळेपणाने खेळू द्यावे व समत्वभावाने त्यास पकडून ठेवावे. २ तो अनेक वेळा हातात सापडतो, अनेक वेळा निसटून जातो; तो कायमचा सापडेल, हाती राहील अशी काय युक्ती आहे हे समजत नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, त्याला जागच्या जागीच पकडून ठेवा. त्याच्या पायाशीच जीवाने मिठी घालून राहिले पाहिजे. ४

## सुतुतू–अभंग १

१७१ जीवशिवाच्या माडूनि हाला । अहं सोहं दोन्ही भेडती भला ॥ १ ॥
घाली सुतुतू फिरोनि पाही आपुणासि ।
पाही बळिया तो मागिला तुटी पुढिलासि ॥ २ ॥

खेळिया तो हाल साभाळी । घुम घाली तो पडे पाताळीं ॥ ३ ॥
बळिया गाढ्या तोचि खेळे । दम पुरे तो वेळोवेळा खेळे ॥ ४ ॥
हाता पडे तो चि ढाग । दम पुरे तो खेळिया चाग ॥ ५ ॥
मागें पुढें पाहे तो जिंके । हातीं पडे तोचि आधार फिके ॥ ६ ॥
आपल्या बळें खळे रे भाई । गडियाची साडोनि सोई ॥ ७ ॥
तुका म्हणे मी खेळिया नव्हे । जिकडे पडें त्याचि सवे ॥ ८ ॥

शब्दार्थ व टीपा – सुतुतू–एक प्रकारचा खेळ, हाला–डावास, भेडती–खेळातील भिडू

अर्थ – जीवाशिवाच्या या डावास माडून अहं सोहम या भिडूची झगली गाठ पडली आहे आता १ हे दोन गडी आता सुतुतूचा खेळ करून आपणाकडे फिरून फिरून पाहू लागले आहेत एखादा बलवान गडी मागील गड्याची कमतरता पुढल्यासाठी भरून काढीत असतो २ एखादा गडी डाव सामाळतो व दुसरा एकदा पळून जातो तो धरणीवर पडून राहतो ३ जो गडी चांगला दणकट तोच शेवटपर्यंत खेळतो त्याचा दम जसा पुरेल तसा तो खूप वेळपर्यंत खेळत राहील ४ गडी हातात सापडला असे वाटते, ढाग मारून निसटून जातो कारण त्याचा दम भरपूर असल्यामुळे त्याचा खेळ चागला होतो ५ मागेपुढे पाहून अवधान राखून जो खेळतो तोच जिंकतो जो गडी हाती आलेला असतो तोच आधार वाटतो ६ इतर गड्याची सोय सोडून आपल्या बळाने एखादा गडी खेळ करीत असतो ७ तुकाराम महाराज म्हणतात असा मी खेळिया गडी नाही मी ज्याच्या बाजूस राहीन त्याचीच बाजू राखीन ८

१७२ अनंत ब्रह्मांडें उदरीं । हरि हा बाळक नंदा घरीं ॥ १ ॥
नवल केव्हडें केव्हडें । न कळे कान्होबाचे कोडें ॥ २ ॥
पृथ्वी जेणें तृप्त केली । त्यासि यशोदा भोजन घाली ॥ ३ ॥
विश्वव्यापक कमळापती । त्यासि गौळणी कडिये घेती ॥ ४ ॥
तुका म्हणे नटधारी । भोग भोगून ब्रम्हचारी ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – नटधारी–नाट्य धारण करणारा

अर्थ – ज्याच्या उदरात अनंत ब्रह्मांडे सामावतात तो हा बालक श्रीकृष्ण या नंदाच्या घरी रांगत आहे १ केवढे नवल आहे पाहा हे या कान्होबाचे कोडे काही केल्या उलगडतच नाही २ ज्या कृष्णाने सर्व पृथ्वीवरील लोकाना तृप्त केले त्यास माता यशोदा मोठ्या प्रेमाने घास भरवीत आहे ३ सर्व विश्वाला व्यापून राहणारा हा कमलापती श्रीकृष्ण, पण गौळणी यास कडेवर घेऊन मिरवितात ४ तुकाराम महाराज म्हणतात, हा श्रीकृष्ण म्हणजे अनेक प्रकारची नाटकी रूपे धारण करणारा आहे अनेक प्रकारचे विविध भोग भोगून हा श्रीकृष्ण

१७३ कृष्ण गोकुळी जन्मला । दुष्टा चळकाप सुटला ॥ १ ॥
होता कृष्णाचा अवतार । आनंद करिती घरोघर ॥ २ ॥
प्रेम[1] नाम वाचे गाती । सदा आनंदें नाचती ॥ ३ ॥
तुका म्हणे हरती दोष । आनंदाने करिती घोष ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– चळकाप–चळचळा कापायला लावणारा थरकाप

अर्थ – आज श्रीकृष्णाचा जन्म गोकुळात झाला केवढी आनंदाची गोष्ट दुष्ट लोकांच्या अंगाचा थरकाप उडालेला दिसतो १ या श्रीकृष्णाचा अवतार होताच सर्वत्र घरोघरी आनंद निर्माण झाला २ लोक त्याचे नाव मोठ्या प्रेमाने तोंडातून काढू लागले, आनंदाने नाचू लागले ३ तुकाराम महाराज म्हणतात, या श्रीकृष्णाचे नाव घेताना, त्याचा घोष करताना आपले सर्व दोष दूर होतील ४

विवरण – या एका लहानशा पण सुंदर अभंगात श्रीकृष्णजन्माने सर्वत्र जो आनंदी आनंद झाला त्याचे मोठे रेखीव जिवंत वर्णन बुवानी केले आहे श्रीकृष्णजन्माच्या आधी कंसादिकांची दुष्ट कृत्ये ध्यानात धरली तर लोक किती कष्टी व दुःखी झाले होते याची कल्पना येईल अशा प्रसंगी साधूंचे रक्षण करण्यासाठी व दुष्टांचे निर्दाळण करण्यासाठी आपण अवतार घेतो हे 'पुढचे' वचन श्रीकृष्णाने जन्म घेऊन जणु आधीच सार्थ केले कृष्ण जन्माचा आनंद या संदर्भात पाहण्यासारखा आहे

१७४ मेळउनि सकळ गोपाळ । काहीं करिती विचार ॥ १ ॥
चला जाऊं चोरूं लोणी । आजि घेऊं चंद्रधणी ।
वेळ लावियेला अझुणी । एकाकरिता गडे हो ॥ २ ॥
वाट काढिली गोविंदीं । मागें गोपाळांची मांदी ॥ ३ ॥
अवघाचि वावरे । कळों नेदी कोणा फिरे ॥ ४ ॥
घर पाहोनि एकांताचे । नवविधा नवनीताचे ॥ ५ ॥
रिघे आपण भीतरी । पुरवी मायुलियाच्या हरी ॥ ६ ॥
बोलों नेदी म्हणे स्थीर । खुणा दावी खा रे क्षीर ॥ ७ ॥
जोगावल्यावरी । तुका करितो चाकरी ॥ ८ ॥

शब्दार्थ व टीपा – चंद्रधणी–मनाची तृप्ती, मांदी–समुदाय, मायुलियाच्या–दह्यादुधाच्या डेऱ्याच्या, हरी–ओळी, जोगावल्यावरी–संतुष्ट झाल्यावर

अर्थ – सर्व गोपाळ एके ठिकाणी जमा करून श्रीकृष्णाने काही एक विचार केला १ तो म्हणाला, चला रे मित्रहो, आज आपण गौळणींच्या घरी जाऊन लोणी चोरून खाऊ व मनाची तृप्ती होईपर्यंत आज दहीदूध खाऊ चला, वेळ लावू नका एखाद्यासाठी उशीर करू नका २ श्रीकृष्णाने पुढे होऊन सर्वांना वाट दाखविली व त्याच्या पाठीमागे सर्व गोपाळांचा थवा निघाला ३ हा श्रीकृष्ण परमात्मा सर्वत्र वावरत असूनही कुणास एकदम समजत नाही ४ आणि जिथे नवविधा भक्तीचे स्थान आहे, जिथे एकान्तात ईश्वरचिंतन चालते ५ अशा ठिकाणी हा देव मोठ्या आनंदाने प्रवेश करतो व आपल्या सोबत्यांना दह्यादुधानी भरलेल्या भांड्यांची किंवा डेऱ्यांची रांगच्या रांग दाखवितो, त्यांना ते दहीदूध वाटतो ६ आणि दह्यादुधाचे सेवन मुकाट्याने करावे, बोलू नये, कुणी आवाज करू नये म्हणून हा खुणा करतो व सुचवितो की दूधदही भरपूर घ्या ७ तुकाराम महाराज म्हणतात अशा रीतीने तृप्त झाल्यानंतर मी त्या प्रभूची मनोभावे चाकरी करीन संतुष्ट झाल्यावर त्याच्याच सेवेत राहीन ८

१ सदा नाम वाचे गाती । प्रेमें आनंदें नाचती ॥

१७५ धन्य त्या गौळणी इंद्राच्या पूजनीं । नैवेद्य हिरोनि खातो कृष्ण ॥ १ ॥
अरे कृष्णा इंद्र अमर इच्छिती । कोण तयाप्रति येइल आता ॥ २ ॥
तुका म्हणे देव दाखवी विदान । नैवेद्य खाऊन हासो लागे ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा – हिरोनी–हिरावून घेऊन, विदान–कौशल्य

अर्थ.– या गोकुळच्या गौळणी धन्य आहेत या इंद्राच्या पूजनात दंग असताना श्रीकृष्ण हळूच येतो व त्याच्या पूजेतील नैवेद्य हिरावून नेऊन खातो १ अरे श्रीकृष्णा, त्या गौळणी इंद्रादी देवाची इच्छा करतात, आता तूच नैवेद्य खाल्ल्यावर त्यांच्यावर कोण कृपा करणार ? २ तुकाराम महाराज म्हणतात, परंतु श्रीकृष्ण मोठे कौशल्य दाखवून त्यांच्यावर कृपा करतो, स्वतः नैवेद्य खाऊन हसू लागतो ३

विवरण – कृष्णावतारानंतर श्रीकृष्णाचे माहात्म्य हळूहळू वाढीस लागले याच्यापूर्वी इन्द्रादिक देवांना महत्त्व होते इंद्र हा देवांचा राजा मानलेला असून याच्या कृपेने पाऊस पडतो अशी कल्पना आहे श्रावण महिन्यातील सूर्य हाच असाही उल्लेख आहे वैदिक वाङ्मयात व महाभारतादी ग्रंथात याच्या पराक्रमाच्या अनेक कथा आहेत कृष्णाचे वडील नंद याच्या घरी इंद्राची पूजा करण्यासाठी दर वर्षी इंद्रयाग होत असे नव्या काळात इंद्राच्या ऐवजी पावसासाठी गोवर्धन पर्वताची पूजा करावी, त्याची उपासना वाढवावी असा नवा विचार श्रीकृष्णाने काढला. इंद्रयाग बंद झाल्यानंतर सर्व गोकुळावर रात्रंदिवस अखंडपणे पर्जन्यवृष्टी इंद्रदेवाने केली तेव्हा श्रीकृष्णाने गोवर्धन पर्वताच्या आश्रयाने सर्व गोकुळवासियांचे रक्षण केले असल्याची कथा आपणास माहित आहेच इंद्राचे माहात्म्य त्याच्या नैवेद्य चोरून खाण्यातूनही कमी करण्याचा प्रयत्न या अभंगात दिसतो

१७६ तुम्ही गोपी बाळा मज कैसा नेणा । इंद्र अमरराणा म्यांचि केला ॥ १ ॥
इंद्र चंद्र सूर्य ब्रह्मा तिन्ही लोक । माझे सकळीक यम धर्म ॥ २ ॥
मजपासूनिया जाले जीव शिव । देवांचा ही देव मीच कृष्ण ॥ ३ ॥
तुका म्हणे त्यांसी बोले नारायण । व्यर्थ मी पाषाण जन्मा आलो ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – अमरराणा–अमर राजा

अर्थ.– गोपिकांनो, तुम्ही मला कसा जाणीत नाहीत ? तुमच्या ध्यानात कसे येत नाही की इंद्रालासुद्धा मीच अमर राजाचे पद प्राप्त करून दिले आहे १ इंद्र, चंद्र, सूर्य, ब्रह्मा हे सर्व लोक मीच निर्माण केले असून यम व धर्म यांचीही निर्मिती माझ्यापासूनच आहे २ इतकेच काय पण सर्व जीव व त्यांच्यातील शिवतत्त्वही मीच आहे सर्व देवांचा देव तो मीच श्रीकृष्ण आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, त्या गौळणींना श्रीकृष्ण हे सर्व समजावून सांगत आहे मी मात्र व्यर्थ पाषाण होऊनच जन्माला आलो आहे ४

१७७ का रे गमाविल्या गाई । आली वळती तुझी जाई ।
मागें जाले काई । एका तें का नेणसी ॥ १ ॥
केलास फजित । मागें पुढें ही बहुत ।
लाज नाहीं नित्य । नित्य दंड पावता ॥ २ ॥
बोला खोडा खिळ गाढी । ऐसा कोण तये काढी ।
धावेल का पाडी । तुझी आधीं बोढाळा ॥ ३ ॥
चाल धायें । मीही येतो तुजसवें ।
तुका म्हणे जय । तेथें नाहीं पावलो ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– वळती–गाई वळून आणण्याची पाळी, खोडा–मापळा, खिळ–बंदिस्त, पाडी–कालवड

अर्थ – श्रीकृष्ण आपल्या एका गोपाळ मित्रास म्हणत आहेत अरे तू इंद्रियरूपी गाई का सोडून दिल्यास ? आता तर त्याना वळून आणण्याचे काम तुलाच करायचे आहे जा तू, मागच्या खेपेसही तू असेच काम केले होतेस ते तुझ्या ध्यानात नाही का ? १ या कामात कुचराई केलीस तर मात्र तू फजीत पावशील मागे व पुढेही तुझी अवस्था कठीण होईल नित्य काळ तुला शिक्षा करीत असताना तुला त्याची लाज कशी नाही ? २ पुढे जन्ममृत्यूचा जो मोठा बंदिस्त करणारा सापळा आहे त्यातून तुला काढणारे कोण आहे ? आधीच ओढाळ म्हणून प्रसिद्ध असणारी तुझी वृत्तीरूपी कालवड धावून जात आहे तिला आवर ३ चल पळ लवकर मी पण तुझ्या मदतीस येतो तुकाराम महाराज म्हणतात, चल ती जोपर्यंत मिळाली नाही तोपर्यंत मीही येतो तुझ्याबरोबर ४

१७८ काय या संताचे मानू उपकार । मज निरंतर जागविती ॥ १ ॥
काय देवा यासि व्हावे उतराई । ठेविता हा पायी जीव थोडा ॥ २ ॥
सहज बोलणे हित उपदेश । करूनि सायास शिकविती ॥ ३ ॥
तुका म्हणे वत्स धेनुचिया चित्तीं । तैसे मज येती सांभाळित ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – सायास–श्रम

अर्थ – या साधुसंताचे उपकार मी आता मानू तरी किती व कसे ? वारवार उपदेश करून हे मला सावध करीत असतात १ देवा, आता या संताचे उतराई तरी मी कसे व्हावे ? याचे उपकार मी कसे फेडू ? याच्या पायावर मी माझा जीव जरी ओवाळून ठेविला तरी ते थोडेच आहे २ या संताचे सहजचेच जे बोलणे असते तोच सर्वसामान्य लोकाना हिताचा उपदेश असतो हे सत्पुरुष मोठे परिश्रम घेऊन सर्वांना शिकवीत असतात ३ तुकाराम महाराज म्हणतात, एखाद्या गाईच्या मनात ज्याप्रमाणे अखंडत्वाने तिचे वासरूच असते, त्याप्रमाणे हे सत्पुरुष मला एकसारखे चित्तात वागवून सांभाळीत असतात ४

विवरण – वारकरी पंथात किंवा भागवत संप्रदायात देवाइतकेच महत्त्व संतानाही आहे 'संत ते देव देव ते संत' असे एकनाथाना एका अभंगात म्हटले आहे संत सहवासाचे, त्यांच्या दर्शनाचे फार मोठे सुख आपणास होते देव भेटल्याची अनुभूती संताच्या सहवासात तुकारामादिकानाही फार मोठी येत असे या एका अभंगात तुकारामानी संताचे माहात्म्य सरूपाने वर्णन केले आहे संताचे उपकार फार मोठे मानले जातात या संताचे महत्त्व वर्णन करताना ब्रह्मदेवसुद्धा थकतो असे नामदेवानी एका अभंगात म्हटले आहे 'संतसंगतीचे काय सांगू सुख । आपण पारिखे नाहीं तेथ,' 'माझ मायबाप साधुसंतजन । माझे जीवप्राण अंतरींचे,' अशा शब्दानी नामदेवरायानी संताच्या सहवासाचे वर्णन केले आहे 'उदार तुम्ही संत । मायबाप कृपावंत' या भाषेत मायबाप संताच वर्णन श्रीसनाने केले आहे 'संतचरणींचा महिमा । काही न कळे आगमानिगमा,' देवाचे ते आप्त जाणावे ते संत, 'संत आधी देव मग । हाचि उगम आणा मना,' 'संतापोटीं देव वसे । देवापोटीं संत असे,' 'संताचिये पायीं मज पैं विश्रांती' इत्यादी चरणातून एकनाथानी संताचा महिमा गायिला आहे संताच्या भेटीने आगमनाने दर्शनाने तुकाराम महाराज तर स्वतःलाच आनंदून जातात 'दसरा दिवाळी तोचि आम्हा सण । सखे संतजन भेटतील ।' 'धन्य दिवस आजी दर्शन संताचे । नांदे तया घरीं दैवत पंढरीचे ' 'भाग्याचा उदय । ते हे जोडी संतपाय,' 'कृपेचे सागर हेचि साधुजन ' 'आता तुम्ही कृपावंत । साधुसंत जिवलग ' अशा शब्दो वचनातून तुकारामबुवाचा संतप्रेमा उफाळून वर आलेला दिसतो संतप्रेमापुढे मग मोक्ष स्वर्ग, वैकुंठवास याचीही पर्वा नसते ईश्वर एकदम कृपावंत होऊन आपणास मुक्ती देईल की काय अशी धास्ती वाटून मग तुकारामबुवासारखा भक्त एकदम आळवितो, 'म्हणे मुक्तीपद देशी पांडुरंगा । मग या संतसंगा पाहू कोठें ?' अशी ओढ या श्रेष्ठ साधुसंतानाही संतसहवासाची असते

१७९ कंठीं धरिला कृष्णमणी । अवघा जनी प्रकाश ॥ १ ॥
काला वाटू एकमेका । वैष्णवा निका संभ्रम ॥ २ ॥

वांकुलिया ब्रह्मादिकां। उत्तम लोकां दाखवूं ॥ ३ ॥
तुका म्हणे भूमंडळीं । आम्ही बळी वीर गाढे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- कंठी-वाणीत, गळ्यात, कृष्णमणी-कृष्णाच्या नामाचा अलंकार, गाढे-प्रतापी.

अर्थ :- ज्याने आपल्या वाणीत कृष्णरूपी मण्याचा अलंकार धारण केलेला आहे त्याचा प्रकाश सर्व लोकात एकदम पसरतो. १ वैष्णवांच्या मेळाव्यात काल्याचा प्रसाद एकमेकांना वाटू. २ आणि या काल्याच्या सुखामुळे ब्रह्मलोकादी जे श्रेष्ठ लोक आहेत त्यानाही येथून वेडावण दाखवूं. ३ तुकाराम महाराज म्हणतात, या जगतात आम्ही भक्तच मोठे बलवान असे प्रतापी वीर पुरुष आहोत. ४

१८० कवळाचिया सुखें । परब्रह्म जालें गोरखें ।
हात गोऊनि खाय मुखें । बोटासांदी लोणचें ॥ १ ॥
कोण जाणे तेथें । कोण लाभ फां तें । ब्रह्मादिकां दुर्लभ ॥ २ ॥
घाली हमामा हुंबरी । पांवा वाजवी छंदें मोहरी ।
गोपाळांचे फेरी । हरि छंदें नाचतसे ॥ ३ ॥
काय नव्हतें त्या घरीं खावया । रिघे लोणी चोरावया ॥ ४ ॥
तुका म्हणे सवें तया । आम्ही ही सोंकलों ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :- कवळ-घास, गोरखें-गुरे राखणारे, सोंकलों-मोकावलो.

शब्दार्थ व टीपा:- गोवळीं-गवळी, गुरे राखणारे, कांबळें-पांघरूण

अर्थ:- पुष्कळ काळ झाला, आम्ही त्या श्रीकृष्णाच्या संगतीत वावरणारे गुराखी आहोत. १ त्याच्या शिदोरीमधील भाताचा आम्हांस कधीच वीट येत नाही. त्याच्या संगतीनेच आम्ही जेवणही करतो. २ यानेच माझे पांघरूणही पुष्कळकाळपर्यंत पांघरले होते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, आमचे असे काहीच नाही; सर्व काही त्या प्रभूचे, श्रीकृष्णाचेच आहे. ४

१८३ बहु बरा बहु बरा । यासांगातें मिळे चारा ॥ १ ॥
म्हणोनि जीवेंसाठीं । घेतली कान्होबाची पाठी ॥ २ ॥
बरवा बरवा दिसे । समागम याचा निमिषें ॥ ३ ॥
पुढती पुढती तुका । सोंकला सोंकवितो लोकां ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा - बरवा-चांगला, निमिषें-क्षणभरही.

अर्थ - या श्रीकृष्णाची संगत फार चांगली दिसते. कारण याच्या संगतीत गाईगुरांना चाराही चांगला मिळतो. १ म्हणून माझ्या जीवाने या कान्होबाच्याच पाठीमागे एकसारखे राहायचे ठरविले आहे. २ याचा सहवास एक क्षणभर जरी झाला तरी तो फारच चांगला वाटतो. ३ तुकाराम महाराज म्हणतात, पुढे पुढे तर मी याच्या संगतीसच चटावलो व तो लोभ इतरानाही लाविला. ४

१८४ घेती पाण्यासी हुंबरीं । त्यांचें समाधान करी ॥ १ ॥
ऐशी गोपाळांची सवे । जाती तिकडे मागें धांवे ॥ २ ॥
स्थिरावली गंगा । पांगविली म्हणे उगा ॥ ३ ॥
मोहरी पांवा काठी । तुका म्हणे याजसाठीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:- सवे-सवय.

अर्थ - हुंबरीचा खेळ करून करून यमुनेच्या पाण्याचा प्रवाहही थांबविण्याचा म्हणजे त्याच्या आवाजावर मात करण्याचा प्रयत्न ज्या गोपाळांनी केला त्यांचे समाधान श्रीकृष्णाने केले. १ या गोपाळांची सवय त्या श्रीहरीला फार मोठ्या प्रमाणावरची असल्याने तो ते जिकडे जातील तिकडे जात असतो २ या गोपाळांच्या हुंबरीने व श्रीकृष्णाच्या मुरलीच्या स्वरांनी प्रत्यक्ष यमुना नदीही स्थिर झाली. ती वहायची थांबली; मग श्रीकृष्णाने पांगलेल्या सोबत्यांना उगे राहण्यास सांगितले ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवाने पावा, मुरली, काठी यांना या आपल्या भक्त गोपाळांसाठीच धारण केले आहे. ४

१८५ वळी गाई धावे घरा । आमच्या करी येरझारा ॥ १ ॥
नांव घेतां तो जवळी । बहु भला कान्हो बळी ॥ २ ॥
नेदी पडो उणें पुरें । म्हणे अवघेंचि बरे ॥ ३ ॥
तुका म्हणे चित्ता । वाटे न व्हावा परता ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा - परता-दूर.

अर्थ - हा श्रीकृष्ण आमच्या इंद्रियरूपी गाई वळण्यासाठी आमच्या घरी धावत येतो व आम्हांस जवळ करण्यासाठी याच्या सारख्या येरझारा चाललेल्या असतात. १ हा कान्हा फार बलवान असून चांगला आहे. तो त्याचे नाव घेताच आमच्याजवळ येतो २ तो आम्हांला काहीच उणे पडू देत नाही; सर्व काही चांगले आहे असेच तो म्हणतो. ३ तुकाराम महाराज म्हणतात, तो दूर व्हावा असे माझ्या चित्तास कधीच वाटत नाही. ४

१८६ म्हणती धालों धणीवरी । आतां न लगे शिदोरी ।
नये क्षणभरी । आतां यासि विसंबों ॥ १ ॥

चाल चाल रे कान्होबा खेळ मांडूं रानीं ।
बैसवू गोठणीं गाई जमा करूनि ॥ २ ॥
न लगे जावे घरा । चुकलिया येरझारा ।
सज्जन सोयरा । मायबाप तूं आम्हा ॥ ३ ॥
तुका म्हणे धाले पोट । आता कशाचा घोसाट ।
पाहाणे ते वाट । मागें पुढें राहिली ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – धालो–संतुष्ट झालो, धणीवरी–मालकावर

अर्थ – सर्व गोपाळ म्हणू लागले की आता या आमच्या प्रभूवर, स्वामीवर आम्ही पूर्णपणे संतुष्ट झालो आहोत, आता आम्हांला शिदोरीचीसुद्धा जरूरी नाही आता याला एक क्षणभरसुद्धा सोडता कामा नये १ अरे कान्होबा आता चल ना, रानामध्ये जाऊन आपण आता चांगला खेळ मांडू सर्व गाई एकत्र करून गोठ्यात बसवू २ आता घराकडे जाणे सुद्धा नको वाटते देवा तुझ्या संगतीत जन्ममृत्यूच्या खेपाही संपल्या तूच आता आमचा सज्जन, सोयरा, मायबाप आहेस ३ तुकाराम महाराज म्हणतात, आता आम्ही संतुष्ट झालो आहोत आता कसलीच तक्रारही नाही मागची पुढची वाट पाहण्याचेही कारण उरले नाही ४

१८७ तुझिये संगति । जाली आमुची निश्चिंति ॥ १ ॥
नाहीं देखिले तें मिळे । भोग सुखाचे सोहळे ॥ २ ॥
घरीं ताकाचें सरोवर । येथें नवनीताचे पूर ॥ ३ ॥
*तुका म्हणे आता । आम्ही न वजों दवडिता ॥ ४ ॥*

शब्दार्थ व टीपा – न वजों–जाणार नाही

अर्थ – देवा तुझ्या संगतीत आम्हाला भरपूर सुख मिळून आम्ही निश्चिंत झालो आहोत १ जे सुख आम्ही कधी पाहिलेही नाही ते आम्ही मिळविले आहे सर्व सुखाचे भोग आम्ही भोगले आहेत २ घरी आमच्या ताक भरपूर आहे पण येथे कृष्णाच्या संगतीत मात्र चांगल्या लोण्याचे पूर आहेत ३ तुकाराम महाराज म्हणतात, आता या श्रीहरीने आम्हाला दूर दवडिले तरी आम्ही जाणार नाही. ४

१८८ कामें पीडिलो माया । बहु मारी नाहीं दया ॥ १ ॥
तुझ्या राहिलो आधारें । जाले अवघेंचि बरें ॥ २ ॥
तुझे लागलो संगती । आता येतो काकुळती ॥ ३ ॥
तुका म्हणे तुझ्या भिडा । कान्होबा हे गेली पीडा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – कामें–वासनेने भिडा–भिडेने

अर्थ – आम्ही वासनेने फार त्रासलेलो होतो, तिच्या मान्याखाली वैतागून गेलो होतो तिला काही दयामाया नाही १ पण देवा, आता तुझ्या आश्रयाने राहिलो तेव्हा मात्र सर्व काही ठीक झाले २ तुझ्या संगतीत राहिलो म्हणूनच देवा, आता मोठ्या काकुळतीने आम्ही तुला विनवू शकतो ३ तुकाराम महाराज म्हणतात कान्होबा, तुझ्या भिडेने आमच्यामागची सर्व पीडा नाहीशी झाली ४

## टिपरी-अभंग ७

१८९ खेळ मांडियेला वाळवंटीं घाई । नाचती वैष्णव भाई रे ।
क्रोध अभिमान केला पावटणी । एक एका लागतील पायीं रे ॥ १ ॥

नाचती आनंदकल्लोळीं । पवित्र गाणें नामावळी ।
कळिकाळावरि घातलीसे कास । एक एकाहुनी बळी रे ॥ २ ॥
गोपीचंदनउटी तुळसीच्या माळा । हार मिरवती गळां ।
टाळ मृदंग घाई पुष्पवरुषाव । अनुपम्य सुखसोहळा रे ॥ ३ ॥
लुब्धलीं नादीं लागली समाधी । मूढ जन नर नारी लोकां ।
पंडित ज्ञानी योगी महानुभाव । एकचि सिद्धसाधकां रे ॥ ४ ॥
वर्णाभिमान विसरली याति । एकएकां लोटांगणीं जाती ।
निर्मळ चित्तें जालीं नवनीतें । पाषाणा पाझर सुटती रे ॥ ५ ॥
होतो जयजयकार गर्जत अंबर । मातले हे वैष्णव वीर रे ।
तुका म्हणे सोपी केली पायवाट । उतरावया भवसागर रे ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा.— पावटणी–पायाखालची पायरी, अनुपम्य–ज्याला दुसरी तुलना नाही असा, महानुभाव–श्रीचक्रधराच्या पंथातील साधक, अंबर–आकाश.

अर्थ:— या वाळवंटात भाई हो, वैष्णवानी घाईघाईने खेळाला आरंभ केला आहे. नाचताना ते तल्लीन झाले आहेत. या संतानी क्रोध, अभिमान वगैरे विकारांना पायांखालची पायरी करून सोडले आहे. १ परमेश्वर-प्रेमाच्या आनंदकल्लोळात ते नाचत असून त्याच्या पवित्र नामावळीचा जयघोष करून गाणे गात आहेत. यांनी या नामाच्या जोरावर प्रत्यक्ष यमावरही मात करण्यासाठी कास कसली आहे. एकापेक्षा एक बलवान असे हे वैष्णववीर आहेत. २ यानी आपल्या अंगाला गोपीचंदनाची उटी लावली आहे. गळ्यात तुळशीच्या माळा घातलेल्या आहेत, हारही घालून ते मिरवीत आहेत. आणि भजनाच्या निमित्ताने टाळ, मृदुंग, फुलांचा वर्षाव यांची एकच घाई उडत आहे येथे. या सुखसोहळ्याचे वर्णनही करता येणार नाही. ३ या नामघोषाच्या नादास लुब्ध होऊन मूढ जनांपासून सर्व स्त्रीपुरुषांचीच समाधी लागलेली दिसते. पंडित, ज्ञानी, योगी, महानुभावी, सिद्ध, साधक, यांचे चित्त एकतेने ईश्वराशी जडलेले दिसते. ४ प्रत्येकजण आपल्या वर्णाचा अभिमान, जातीचा अभिमान विसरून गेलेले आहेत; ते एकमेकांची जात विसरून एकमेकांस लोटांगण घालतात; या प्रकारामुळे त्यांचे चित्त लोण्याहूनही मऊ व शुद्ध बनले आहे. त्याच्या संगतीने पाषाणासही प्रभुप्रेमाचा पाझर फुटणार आहे. ५ यांच्या ईश्वरनामाच्या गर्जनेने सारे आकाश गर्जून राहिले असून हे वैष्णव वीर भक्तिसुखाच्या नशेत जणू मत्त झालेले दिसतात; तुकाराम महाराज म्हणतात, यांनी भवसागर तरून जाण्यासाठी भक्तीची ही सोपी अशी पाऊल वाटच तयार केलेली आहे ६

१९० एके घाई खेळतां न पडसी डाई । दुचाळचानें ठकसील भाई रे ।
त्रिगुणांचे फेरी थोर कष्टी होसी । या चौघांची तरी धरीं सोई रे ॥ १ ॥
खेळ खेळोनियां निराळाचि राही । सांडी या विषयाची घाई रे ।
तेणेंवि खेळें बसवंत होसी । ऐसें सत्य जाणें माझ्या भाई रे ॥ २ ॥
सिंपियाचा पोर एक खेळिया नामा । तेणें विठ्ठल बसवंत केला रे ।
आपुल्या संवगडिया सिकवूनि घाई । तेणें सतंतर फड जागविला रे ।
एक घाई खेळतां तो न चुकेचि कोठें । तया संत जन मानवले रे ॥ ३ ॥
ज्ञानदेव मुक्ताबाई वटेश्वर चांगा । सोपान आनंदें खेळती रे ।
कान्हो गोवारी त्यांनीं बसवंत केला । आपण भोंवतीं नाचती रे ।
सकळिकां मिळोनि एकी च घाई । त्याच्या ब्रह्मादिक लागती पायीं रे ॥ ४ ॥
रामा बसवंत कबिर खेळिया । जोडा बरवा मिळाला रे ।

पांचा संवगडियां एकचि घाई । तेथें नाद बरवा उमटला रे ।
ब्रह्मादिक सुरवर मिळोनियां त्यांनीं । तो ही खेळ निवडिला रे ॥ ५ ॥
ब्राह्मणाचा पोर खेळिया एका भला । तेणें जन खेळकर केला रे ।
जनार्दन बसवंत करूनियां । तेणें वैष्णवांचा मेळ मेळविला रे ।
एकचि घाईं खेळतां खेळतो । आपणचि बसवंत जाला रे ॥ ६ ॥
आणीक खेळिये होउनिया गेले । वर्णावया वाचा मज नाहीं रे ।
तुका म्हणे गडे हो हुशारूनि खेळा । पुढिलांचि धरूनियां सोई रे ।
एकचि घाईं खेळतां जो चुकला । तो पडेल संसारडाईं रे ॥ ७ ॥

*शब्दार्थ व टीपा – दुचाळभावें–द्वैताच्या भावनेने, बसवंत–उपास्य दैवत, संतर–स्वतंत्र.*

*अर्थ :–* एकत्वाच्या भावनेने, अद्वैताच्या वृत्तीने तू जर खेळ खेळलास तर मग मात्र संसाराच्या डावात किंवा चक्रात तू सापडणार नाहीस. द्वैताच्या भावनेने खेळशील तर भाई, फसशील रे बाबा. तू यामुळे सत्त्व रज, तम या त्रिगुणांच्या चक्रात सापडून फारच कष्टी होशील. म्हणून पुढे दिलेल्या चौघांची उदाहरणे नीट ध्यानात धरून तू वाग १ जगातील संसाराचा जरी तू खेळ खेळलास तरी तू अलिप्त राहा बाह्य विषयांची भारी संगत तू सोडून दे. अशाच खेळामुळे तू प्रत्यक्ष ईश्वर होऊन जाशील हे माझे सत्यवचन भाई, तू नीट समजावून घे. २ पंढरपुरास एका शिंप्याचा पोर नामदेव नावाचा एक थोर खेळगडी होऊन गेला त्याने श्रीविठ्ठलासच आपले आराध्य दैवत बनविले व आपल्या सर्व सोबत्यांना याच मार्गाची त्याने शिकवण दिली व वारकरी पंथाचा स्वतंत्र फड पंढरीच्या वाळवंटात निर्माण केला याने एकत्वाच्या वृत्तीने खेळ खेळल्यामुळे त्याची कुठेच फसगत झाली नाही, की तो कुठे चुकला नाही. त्यामुळे त्याला सत लोकही मान्य झाले ३ ज्ञानदेव, मुक्ताबाई, चांगदेव वटेश्वर, सोपानदेव यांनी आनंदाने खेळ सुरू करून कान्होबा गवळी यास आपले उपास्य दैवत बनविले. त्याच्या भोवती फेर धरून ते नाचले. त्या सर्वांना मिळून एकदमच आपल्या प्रभूविषयी आवड निर्माण झालेली पाहून ब्रह्मादिक देवही त्यांच्या पायांवर नम्र होण्यास तत्पर झाले. ४ प्रसिद्ध साधू कबीरदास याने रामचंद्रास उपास्य दैवत करून खेळ करावा लागला. कबीर व राम यांची जोडी फार चांगली जमली. या पाच सोंगड्यांनी खेळाची एकच घाई करून ईश्वरभजनाचा नाद फार श्रेष्ठ प्रकारचा निर्माण केला. ब्रह्मादी व श्रेष्ठ देव यांनी सर्व खेळात यांचा हा खेळच निवडला ५ पैठणच्या ब्राह्मणाचा पोर एकनाथ हा एक असाच थोर खेळगडी होऊन गेला त्याने जनार्दनास खेळगडी बनविले जनार्दन स्वामीस उपास्य दैवत बनविले व वैष्णवाचा मेळा पुनः जमा केला व एकच अशा खेळाच्या घाईत आपण स्वतःच तो जनताजनार्दन स्वरूपी होऊन गेला ६ आणखीही पुष्कळ खेळगडी थोर थोर होऊन गेले; त्यांचे वर्णनही करायला समर्थ अशी वाणी मजजवळ नाही. तुकाराम महाराज म्हणतात, गड्यांनो, चांगले सावध राहून खेळ खेळा आधी होऊन गेलेल्या सत खेळगड्यांचा मार्ग ध्यानात धरून खेळा एकच घाई करीत असताना जर खेळगडी चुकला तर मात्र तो संसाराच्या डावात पुरता फसेल. ७

संप्रदायावर नामदेवाच्या भक्तितत्त्वाची छाप मोठी असून त्याच्या प्रथमाहेव या पवित्र ग्रंथात या नामदेवाची अनेक पदे आहेत. या नामदेवाचा व तुकोबाचा संबंध प्रसिद्धच आहे नामदेवानी स्वप्नात दृष्टान्त देऊन आपली कवित्वाची प्रतिज्ञा पूर्ण करण्याचा आदेश दिला असा एक प्रसिद्ध अभंग तुकोबाचा आहे

यानंतर तुकारामबुवानी ज्ञानदेव, सोपान-मुक्ताबाई याना थोर खेळगडी म्हणून उल्लेख केला आहे ज्ञानदेव ( १२७५-१२९६ ) हे तर भागवत संप्रदायाचे आद्य संघटक यानी गीतेवर मराठीत भाष्य लिहून संस्कृता-मधील उच्च तत्त्वज्ञान प्रथम मोठ्या प्रमाणावर मराठी भाषेत आणले. याच्या भावार्थदीपिकेसारखा तत्त्वज्ञानाचा, भक्तीचा, काव्याचा ग्रंथ अजूनही झालेला नाही असे जाणते सांगतात याच भावार्थदीपिकेस ज्ञानदेवी किंवा ज्ञानेश्वरी अशी लोकप्रिय नावे आहेत अनुभवामृत, चांगदेवपासष्टी अभंगरचना इत्यादी वाङ्मय ज्ञानदेवाचे म्हणून प्रसिद्ध आहे यानीच समकालीन संताचा मेळावा जमवून भक्तिमार्गाची पुनर्स्थापना केली याची भगिनी मुक्ताबाई ( १२७९-१२९७ ) हीही फार अधिकारसंपन्न अशी कावयित्री असून हिने आपल्या बोधाने प्रसिद्ध योगीपुरुष चांगदेव यानाही आपले शिष्य बनविले आपल्या भावडानाही ही प्रसंगी उपदेश देत असे हिचे 'ताटीचे अभंग' प्रसिद्ध असून त्यात भक्तीचा कळवळा व थोर तत्त्वज्ञान याचे उत्कृष्ट दर्शन होते सोपानदेव ( १२७७-१२९७ ) हे निवृत्तिज्ञानदेवाचे धाकटे बधू याचेही परमार्थ-निरूपणावर काही अभंग प्रसिद्ध असून सोपानदेवी नावाची गीतेवर एक समश्लोकी टीका याची आहे चांगा वटेश्वर ( समाधी १३२५ ) हेही प्रसिद्ध तापीतीरचे योगीपुरुष वटेश्वर हे स्वतंत्र न मानता चांगा वटेश्वर हे एकच मानून वटेश्वर हे त्याच्या गुरूचे किंवा दैवताचे नाव मानण्याकडे संशोध-काचा कल आहे या योगीपुरुषाने शेवटी भक्तिमार्गातील मुक्ताबाईचे शिष्यत्व पत्करले '

कबीर ( पधरावे शतक ) हे एक उत्तर भारतातील प्रसिद्ध सत्पुरुष होत याच्यावर हिंदू व मुसलमान याचे संमिश्र संस्कार असून नाथ संप्रदाय व सूफी पंथ याचीही थोडी छाप याच्या विचारावर दिसते याचे उपास्य दैवत राम. हा राम सगुण की निर्गुण असा वाद नेहमी उपस्थित होतो कारण दशरथाचा जो मुलगा रामचंद्र त्याहून माझ्या रामाचे मर्म निराळेच आहे असे यानी म्हटले आहे 'दशरथ सुत तिहुं लोक बखाना। रामनामका मर्म हैं आना' अशी याची ओळ असली व 'निर्गुण मेरा पीव' असा याचा पुकारा असला तरी सगुण भक्तीसही लाजवील असे प्रेम यानी निर्गुण रामावर केले आहे एकनाथ ( १५३३-१५९९ ) हे भागवत संप्रदायाचे संजीवक पैठणास राहात असत ज्ञानेश्वरानंतरच्या काळात मुसलमानी राजवटीत जो सांस्कृतिक घातपात झाली तीत ज्ञानेश्वरीसारखा ग्रंथ लुप्त होण्याची वेळ आली तेव्हा ज्ञानेश्वराच्याच प्रेरणेने यानी ज्ञानेश्वरीचे संशोधन केले रामायणभागवतावर ग्रंथरचना केली ज्ञानेश्वरीच्या खालोखाल याच्या भागवतास वारकरी संप्रदायात मान आहे याची पदे व अभंग प्रसिद्ध आहेत याचे गुरू दौलताबाद येथील श्रीजनार्दनस्वामी याचे भारुडवाङ्मय हे मराठीतील खरेखुरे लोकवाङ्मय असून जनतेतील जनार्दन जागृत करण्यास या वाङ्मयाचा फार मोठा उपयोग होत राहिला आहे

१९१ बाराही सोळा गडियांचा मेळा । सतरावा बसवंत खेळिया रे ।
जतिस पद राखो जेणे टिपरिया घाई । अनुहाते वाये मादळा रे ॥ १ ॥
नाचत पढरिये जाऊं रे खेळिया । विठ्ठल रखुमाई पाहू रे ॥ २ ॥
सा चहूं वेगळा अठराहो निराळा । गाऊ वाजवूं एक चाळा रे ।
विसरती पक्षी चारा घेणे पाणी । तारुण्य देहभाव बाळा रे ॥ ३ ॥
आनंद तेथिचा मुकियासि वाचा । बहिरे ऐकती कानी रे ।
आधळचासि डोळे पागळासि पाय । तुका म्हणे वृद्ध होती तरणे रे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – जतीस–यतीचे, वाये–ध्वनी, मादळ–मृदग

अर्थ :– बारा अथवा सोळा खेळगड्याचा समुदाय मिळवून सतरावा गडी प्रत्यक्ष श्रीकृष्ण देवच आहे रे या टिपऱ्याच्या घाईगर्दीत यतीचे पद मात्र रक्षण करा येथे मृदगाचा अनुहाताचा ध्वनी उमटत आहे. १ अरे

खेळगड्या, आपण नाचत नाचतच पंढरपूरला जाऊ व तेथील विठ्ठलरखुमाईस डोळे भरून पाहू २ हा विठ्ठल सहा शास्त्रे, चार वेद, अठरा पुराणे यांच्याहून वेगळाच आहे त्यालाच आपण गाऊ व त्याच्याच रूपाचे स्मरण करू याच्या नादाने पक्षीसुद्धा चारापाणी घेण्याचे विसरतात व तरुण स्त्रीपुरुष आपला देहभावही विसरून जातात ३ येथील आनंद काय वर्णन करावा? येथे मुक्याला वाचा फुटते, बहिऱ्याना ऐकू येते, आंधळ्याना चागले दिसू लागते व पागळ्यासही पाय फुटतात तुकाराम महाराज म्हणतात या विठ्ठलाच्या नामगजरात म्हातारी माणसेही तारुण्याने बेहोष होऊन जातात ४

१९२ दोन्ही टिपरीं एकचि नाद । सगुण निर्गुण नाहीं भेद रे ।
कुसरी अंगें मोडितील परी । मेळविति एका छंदें रे ॥ १ ॥
काहींच न वजे वाया रे । खेळिया एकचि दसवत अवघिया रे ।
सम विषम तेथें होऊंच नेदी । जाणऊनि आगळिया रें ॥ २ ॥
सत महंत सिद्ध खेळतील घाई । तेच साभाळी माझ्या भाई ये ।
हात राखोन हाणिती टिपऱ्या । टिपरे मिळोनि जाय त्याची सोई रे ॥ ३ ॥
विताळाचें अवघें जाईल वाया । काय ते शृंगारूनि काया रे ।
निवडूनि बाहेर काढिती निराळा । जो न मिळे सताचिया घाई रे ॥ ४ ॥
प्रकाराचे काज नाहीं सोडी लाज । निःशंक होउनिया खेळें रे ।
नेणतीं नेणतींच एके पावलीं मान । विठ्ठल नामाचिया बळें रे ॥ ५ ॥
रोमाच गुढिया डोलविती अंगें । भाववळें खेळविती सोंगें रे ।
तुका म्हणे कंठ सद्‌गदित दाटे । या विठोबाच्या अंगसगें रे ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – नाद–ध्वनी, कुसरी–कौशल्याने, विताळ–चुकलेला बसूर टाळ

अर्थ – अरे सौंगड्यानो टिपऱ्या दोन असतात पण त्यांचा नाद किंवा ध्वनी एकच असतो ना? त्याप्रमाणेच सगुण व निर्गुण ही दोन रूपे वेगळी दिसत असली तरी त्याच्यात भेद दिसतच नाही नृत्याच्या भरात नाना कौशल्याने अंग मोडून विविध भाव दर्शविले तरी त्या सर्वांचे लक्ष एका श्रीहरीकडेच असते १ खेळणाऱ्याचे काहीच वाया जात नाही, सर्व खेळगड्याचे दैवत एकच असते या श्रेष्ठ ईश्वराकडे जेव्हा त्याचे लक्ष असते तेव्हा सम विषम असा फरक उरतच नाही या भेदापेरीज असणाऱ्या परमेश्वरास तू जाण २ भाई, या ईश्वराच्या नादाने अनेक सत, महंत सिद्ध खेळ खळतील, त्याच मार्गाने तूही खेळाचा रग साभाळ रे स्वस्वरूपाचा हात राखून त्या साधु सतानी टिपरीचा खेळ खेळला, नाही तर टिपरी मिळून त्याचा काय उपयोग? ३ टिपरीचा किंवा टाळाचा ठेका चुकून सारे वाया जाईल असे करू नकोस बाह्य शरीरशृंगाराचा उपयोग काय रे? साधुसगतीत जो मिसळून जाणार नाही त्यास या मेळाव्यातून निपटून बाहेर काढला जाईल ४ वेगवेगळ्या बाह्य रगाचे किंवा डौलाचे काय काम? तू सर्व लज्जा सोडून, शका सोडून या खेळात भाग घ प्रथम न जाणणारी असतात पण पुढे या खेळात विठ्ठलाच्या नामस्मरणामुळे एकत्वास पावतात ५ भावभक्तीच्या सामर्थ्यावर खळ खेळणाऱ्या व नाना सोगे धारण करणाऱ्या भक्ताच्या अंगावर भक्तिप्रेमाच्या रोमाच्याच्या गुढ्या उभ्या राहतात तुकाराम महाराज म्हणतात, या विठ्ठलाच्या अगसगामुळे भक्तिरसाने कठ भरून येतो ६

१९३ या रे गडे हो धरू घाई जाणता हो नेणता ।
नाम गाऊ टाळी वाहू आपुलिया हिता ॥ १ ॥
फावलें तें घ्यारे आता प्रेमदाता पाडुरंग ।
आजि दिवस सोनियाचा वोडवला रंग ॥ २ ॥

हिंडती रानोरान भुजंगांत कांट्यावन ।
सुख तयांहून आम्हां गातां नाचतां रे ॥ ३ ॥
तुका म्हणे ब्रह्मादिकां सांवळें दुर्लभ सुखा ।
आजि येथें आलें फुका नाम [1]मुखा कीर्तनीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– भुजंग–सर्प

अर्थ :– गड्यांनो, कळो, न कळो, पण हरिनामाची ओळ धरू व आपलेच हित साधण्यासाठी टाळी वाजवू. १ आज जो लाभ होत आहे तो पदरात पाडून घ्या भक्तिप्रेमाचा दाता पांडुरंग कृपा करायला तत्पर आहे. आज मोठा सोन्याचा दिवस उगवला असून भक्तिप्रेमाला रंग चढला आहे. २ या रानावनात कित्येक ठिकाणी काट्याकुट्यांतून, सर्पांच्या स्थानातून हिंडणे झाले तरी त्यातही या प्रभुप्रेमाचे सुख काही वेगळेच व अद्वितीय असे आहे अशा अवघड ठिकाणी जाण्यापेक्षा हरिनामात दंग होणे अधिक चांगले नाही का ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, या सावळ्या श्रीकृष्णाचे सुख ब्रह्मादिकानासुद्धा दुर्लभ आहे. पण आज येथे कीर्तनात व नामस्मरणात सहजासहजी फुकट हे सुख मिळत आहे ते का नाही घेत ? ४

१९४ भीमातीरीं एक वसलें नगर । त्याचे नाव पंढरपुर रे ।
तेथील मोकासी चार भुजा त्यासी । बाइला सोळा हजार रे ॥ १ ॥
नाचत जाऊं त्याच्या गांवा रे खेळिया । सुख देईल विसावा रे ।
पुढें गेले ते निधाई जाले । वाणितील त्याची सीमा रे ॥ २ ॥
वळियां आगळा पाळी लोकपाळां । रीघ नाहीं कळिकाळा रे ।
पुंडलीक पाटील केली कुळवाडी । तो जाला भवदुःखा वेगळा रे ॥ ३ ॥
संतसज्जनीं मांडिलीं दुकानें । जया जें पाहिजे तें आहे रे ।
भुक्तिमुक्ति[2] फुकाच साठीं । कोणी तयाकडे न पाहे रे ॥ ४ ॥
दोन्हीच हाट भरले घनदाट । अपार मिळाले वारकरी रे ।
न वजो म्हणती आम्ही वैकुंठा । जिहीं देखिली पंढरी रे ॥ ५ ॥
बहुत दिस होती मज आस । आजि घडले सायासीं रे ।
तुका म्हणे होय तुमचेनी पुण्यें । भेटी तया पायांसी रे ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा :– मोकासी–मालक, इनामदार, निधाई–संतुष्ट, हाट–बाजार

अर्थ :– भीमा नदीच्या काठावर एक नगर वसले आहे रे. त्याचे नाव पंढरपूर असून तेथील मालक जो श्रीकृष्ण किंवा विठ्ठल आहे त्यास चार हात असून सोळा हजार स्त्रिया आहेत १ गड्यांनो, आपण हसत, नाचत त्याच्या गावी जाऊ तो आपणास सुखाचा विसावा देईल या मार्गाने जे आधी गेले त्याची चांगलीच तृप्ती झाली. त्याचे वर्णनही करता येणे शक्य नाही २ या ठिकाणचा मालक अतिशय बलाढ्य असून लोकांचे रक्षण करणारा आहे येथे यमाच्या दूतांना शिरकाव करण्यास वावच नाही येथील पाटील पुंडलीक असून त्याने देवाच्या शेतवाडीची कुळवाडी केली आहे. त्याने भक्तांना संसाराच्या दुःखातून मोकळे केले आहे ३ या क्षेत्रात साधुसंतांनी व सज्जनांनी आपापली भक्तीची दुकाने मांडली आहेत ज्याला जे हवे ते इथे आहे भोग व मोक्ष हे येथे सुखासुखी व फुकटात मिळतात. पण त्याच्याकडे कुणीच कसे पाहात नाही रे ? ४ वर्षातून दोनदा आषाढी व कार्तिकी एकादशीस या ठिकाणी फार मोठे बाजार भरतात व या निमित्ताने अनेक वारकरी जमा होतात. हे वारकरी म्हणतात की, आम्ही

---

१ सुखा, २ मुक्ति मुक्ति तेथे

या पढरीपुढे वैकुठालासुद्धा जाण्याचे माम करणार नाही ५ तुकाराम महाराज म्हणतात, मलाही हे सुख पाहण्याची पुष्कळ दिवसाची इच्छा होती ती आज मोठ्या प्रयत्नाने सत हो, तुमच्या पुण्याईने सफल होत आहे त्याच्या पायाची भेट आज होत आहे ६

विवरण – या एका उत्कृष्ट अभगात तुकारामबुवा पढरपूर क्षेत्राचे मोठया डौलान रूपकात्मक अस वणन करीत आहत भीमेच्या तीरावरचे हे गाव पढरपूर तेथील मालक श्रीविठ्ठल व त्याचा कुळवाडी किंवा पाटील पुडलीक आहे सत सज्जनानी येथे भगवदभक्तीच्या पेठा वसविल्या असून आषाढीकार्तिकीस यथे मोठेच बाजार भरतात अशा डौलदार भापत तुकारामबुवानी पढरीचे माहात्म्य या अभगात चटकदार पद्धतीन रगविले आहे अभग क्र ११३ वरील विवरणात पढरपूरच्या ऐतिहासिक व पौराणिक महत्त्वाचे विवचन विस्ताराने केले आहच पढरपूरच्या चद्रभागा नदीस भीमा, भिवरा अशीही नावे असून यथच पुडलीकाने भक्तासाठी विठ्ठलास स्थिर केले अशी कथा आहे

या भीमा नदीचेही माहात्म्य पुराणातून सागितले आहे त्रिपुरासुराच्या नाशाच्या वळी जे श्रम झाले त्यातून शकराच्या कृपेने ही भीमा नदी निर्माण झाली ही भीमा फारच भयकर स्वरूपाची होती, पण क्षेत्रस्थ लोकानी भैरवाची प्रार्थना करून या भीमा नदीस शात केल पाडुरगकृपेने ही भीमा येथे शात झाली भीमा नदी ही वारकऱ्याना गगपक्षाही श्रेष्ठ व पवित्र वाटत हिलाच पुढ चद्रभागा असे नाव असून पापनाशक अशी सर्व तीर्थे तिच्यात आहत अशी भाविकाची श्रद्धा आहे या भीमातीरावरच आईबापाच्या सवेत रमलेल्या पुडलिकाने श्रीविठ्ठल देवास विटवर उभ केल्याची कथा प्रसिद्धच आहे

१९५ पढरी चोहटा माडियेला खेळ । वैष्णव मिळोनि सकळ रे ।
टाळ टिपरी मादळे एक नाद रे । जाला वसवत देवकीचा बाळ रे ॥ १ ॥
चला ते कवतुक भाई रे । पाहो डोळा कामी गुतलेति काई रे ।
भाग्यवत कोणी गेले सागाति । ऐसे सुख त्रिभुवनी नाहीं रे ॥ २ ॥
आनदाचे वाद सुखाचे सवाद । एक एका दाखविती छद रे ।
साही अठरा चारी घालुनिया घाई । नाचती फेरी टाळशुद्ध रे ॥ ३ ॥
भक्ताचीं भूषणे मुद्रा आभरणे । शोभती चदनाच्या उट्या रे ।
सत्व सुदर कास घालूनि कुसरी । गर्जती नाम बोभाटीं रे ॥ ४ ॥
हरि हर ब्रह्मा तीर्थासहित भीमा । देव कोटी तेहतीस रे ।
विस्मित होऊनि ठाकले सकळ जन । अमरावती केली ओस रे ॥ ५ ॥
वाणितील थोरी वैकुंठिची परी । न पवे पढरीची सरी रे ।
तुकयाचा दास म्हणे नका आळस करू । सागतो नरनारींस[1] रे ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – चोहटा–बाजार चव्हाटा, आभरणें–अलकार अमरावती–इद्राची नगरी

अर्थ – या पढरपूरच्या चव्हाटयाच्या बाजारपेठेत मस्त वैष्णवानी हा भक्तीचा खेळ माडलेला आहे आणि याचे उपास्य दैवत देवकीचा बाळ श्रीकृष्ण झाला आहे रे १ बधूनो, चला त्या वाळवटात जाऊ व डोळ्यानी ते कौतुक पाहू दुस-या कामात तर गुतलेले नाहीत ना तुम्ही ? जे त्याच्या सगतीत गले ते खरोखरच भाग्यवान ठरले त्याना मिळालेले सुख त्रिभुवनात दिसणार नाही २ या ठिकाणी वादविवादही मोठ्या आनदाचे व सवाद सुखाचे होतात एकमेक एकमेकांना आपापले छद दाखवितात सहा शास्त्रे, चार वेद, अठरा पुराण घाईत वाचूनही याचा बोध होणार नाही तो एका टाळाच्या व नाचाच्या फेरीत शुद्धत्वाने होईल ३ कपाळावर मुद्रा हीच भक्ताची भूषणे व अलकार होत त्यांच्या अगावरील चदनाची उटी त्याना शोभून दिसते या भक्तानी सत्वाची सुदर कास

[1] नारीबाळास

मोठ्या कौशल्यानें घातलेली असते, आणि मोठ्यानें नामाची गर्जना ते करीत असतात. ४ या क्षेत्रात हरी, हर, व ब्रह्मदेव यांच्या बरोबर सर्व तीर्थांसह भीमा नदी असून तेहतीस कोटी देवाची वस्तीही येथेच आहे या क्षेत्रातील सर्व थाट पाहून सर्वजण विस्मित होतात व त्याना देवाची नगरी अमरावतीही ओस पडली असे मनापासून वाटते. ५ लोक वैकुंठाची थोरवी वर्णन करीतात, पण त्याची बरोबरी पंढरपुराशी कधीच होणार नाही. तुकाराम महाराज म्हणतात, स्त्रीपुरुषानो, कसलाही आळस न करता या पंढरपूरच्या विठ्ठलावर चित्त ठेवा. ६

१९६ ब्रह्मादिकां न कळे खोळ । ते हे आकळ धरिली ॥ १ ॥
मोहरी पांवा वाहे काठी । धांवे पाठीं गाईचे ॥ २ ॥
उच्छिष्ट न लभे देवा । तें हे सदैवां गोवळयां ॥ ३ ॥
तुका म्हणे जोड जाली । ते हे माउली आमुची ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– खोळ–पांघरुण, आकळ–न कळण्यासारखा.

अर्थ :– या श्रीकृष्णाच्या रूपाची ओळख ब्रह्मादिकानाही होत नाही. या विठ्ठलाने न कळण्यासारखे पांघरुण जणु घेतले आहे. १ याच्या हातात पावा, मुरली व काठी असून तो गाईंच्या पाठीमागे धावत असतो. २ याच्या उष्ट्यासाठी देवादिक प्रयत्न करतात, पण त्यानाही ते मिळत नाही. पण या गोपाळाना मात्र नेहमीच ते मिळत राहते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, मोठ्या भाग्याने याची जोड होऊन ही थोर माऊली आम्हास मिळाली आहे. ४

१९७ कान्होबा तूं आलगट । नाहीं लाज बहु धीट ।
पाहिले वाईट । बोलोनिया खोटें ॥ १ ॥
परि तूं न संडिसी खोडी । करिसी केली घडीघडी ।
पाडिसी रोकडी । तुटी माये आम्हांसी ॥ २ ॥
तूं ठायींचा गोवळ । अविचारी अनर्गळ ।
चोरटा शिंदळ । ऐसा पिटूं डांगोरा ॥ ३ ॥
जरी तुझी आई । आम्ही घालूं सर्वा ठायीं ।
तुका म्हणे तेंही । तुज वाटे भूषण ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – आलगट–दांडगा, खोडकर, अनर्गळ–स्वच्छंदी.

अर्थ :– कान्होबा, तू मोठा दांडगा असून तुला काही लाजलज्जा नाही तू फारच धीट आहेस तुला आम्ही वाईट बोलून पुष्कळ पाहिले. १ पण तु आपली खोड काही सोडीत नाहीस. जे आजवर केलेस तेच पुनः पुनः आताही करीत आहेस. अशा या तुझ्या करण्याने तू तुझ्याआमच्यात अंतर मात्र पाडशील हे ध्यानात धर. २ खरे म्हणजे तू मूळचा गवळीच. अगदी अविचारी व स्वच्छंदी आहेस. तू पक्का चोर आहेस, वाईट चालीचा आहेस असा तुझा लौकिक आम्ही सर्वत्र पसरवू. ३ जरी तुझी आई सर्वांच्या खाली घातली तरी तेही तुला भूषणच वाटेल असे वाटते. ४

१९८ भोजनाच्या काळीं । कान्हो मांडियेली आळी ।
काला करी वनमाळी । अन्न एकवटा ।
देई निवडुनी । माते म्हणतो जननी ।
हात पिटूनि मेदिनी । वरि अंग घाली ॥ १ ॥
कैसा आळी घेसी । नव्हे तेचि करविसी ।
घेई दुसरे तयेसी । वारी म्हणे नको ॥ २ ॥

आता काय करूं । नये यासि हाणू मारूं ।
नव्हे बुझाविता स्थिरू । काहीं करिना हा ।
त्याचि केले एके ठायी । आता निवडूनि खाई ।
आम्हा जाचितोसि काई । हरिसि म्हणे माता ।। ३ ।।
त्याचे तयाकुन । करविता तुटे भान ।
तव जाले समाधान । उठोनिया बैसे ।
माते बरें जाणविले । अग चोरूनि आपुलें ।
तोडियले एका बोलें । कैसे सुखदु ख ।। ४ ।।
ताट पालवे झाकिले । होतें तैसे तेथें केले ।
भिन्नाभिन्न निवडिले । अन्नें वेगळालीं ।
विस्मित जननी । भाव देखोनिया मनीं ।
म्हणे नाहीं ऐसा कोणी । तुज सारिखा रे ।। ५ ।।
हरुषली माये । सुख अगीं न समाये ।
कवळूनि बाहे । देती आलिंगन ।
आनद भोजनीं । तेथें फिटलीसे धणी ।
तुका म्हणे कोणी । सांडा शेष मज ।। ६ ।।

शब्दार्थ व टीपा – आळी–हट्ट, मेदिनी–पृथ्वी, पालवें–पदराने

अर्थ – एकदा भोजन करीत असताना श्रीकृष्णाने विचित्र हट्ट धरला वाढलेले अन्न त्याने एकत्र केले व आईस म्हणू लागला की हे आता फिरून मला वेगळे करून दे श्रीकृष्णाने रागाने पृथ्वीवर लोळण घेतली १ मग त्याची आई यशोदा त्याला म्हणाली, कृष्णा, कसला रे हा हट्ट तुझा, नसत्या गोष्टी करतोस मी तुला दुसरे पदार्थ वाढते पण तो तिला तेंच म्हणाला २ मग यशोदा मनाशीच म्हणाली, आता काय करू तरी काय ? याला तर हाणमार करता येत नाही याची समजूत कशीही केली तरी पटत नाही ती म्हणाली, कृष्णा, तूच तुझ्या हाताने पदार्थ एकत्र केलेस, आता तूच ते निवडून खा आम्हाला का विनाकारण त्रास देतोस ? ३ त्या कृष्णाचे समाधान त्याच्याच शब्दात केल्यानतर मात्र त्याची समजूत पटली, त्याचा हट्टही थांबला मग तो जमिनीवर उठून बसला तेव्हा आईसही बरे वाटले मग तो श्रीकृष्ण स्वत चे अग चोरून आईस म्हणाला, आई, एकाच शब्दात माझे सुखदु:ख जाणून तू माझा हट्ट कसा ग दूर केलास ? ४ त्यावर श्रीकृष्णाने पदराने झाकलेले ताट पाहिले व सर्व पदार्थ पहिले होते तसे वेगवेगळे निवडून ठेवले कृष्णाचे हे सामर्थ्य पाहून त्याची आई मनात चकित झाली त्याची भावना पाहून ती त्यास म्हणाली, तुझ्या सारखा या त्रिभुवनात कुणी नाही ५ यशोदा माता आनदून गेली तिच्या अगात पुत्रप्रेमाचे सुख मावेनासे झाले आपले दोन्ही हात पसरून तिने श्रीकृष्णास पोटाशी धरले दोघानीही मोठ्या आनदाने भोजन केले दोघाच्याही मनाची तृप्ती झाली तुकाराम महाराज म्हणतात, या भोजनातील काही शिल्लक राहिलेला भाग आपणास मिळावा ६

१९९ चला वळू गाई । बैसों जेऊं एके ठायीं ।। १ ।।
बहु केली वणवण । पायपिटी जाला सिण ।। २ ।।
खादीं भार पोटीं भुक । काय खेळायाचे सुख ।। ३ ।।
तुका म्हणे धावे । मग अवघें बरवें ।। ४ ।।

शब्दार्थ व टीपा :– बरवें–उत्तम.

अर्थ :– चला आपण सर्व गाई वळून आणू व एका ठिकाणी बसू. १ आज पुष्कळ पायी चालणे झाल्यामुळे व वणवण फार झाल्यामुळे फारच त्रास वाटत आहे. २ खांद्यावर शिदोरीचे ओझें व पोटात कडाडून लागलेली भूक या अवस्थेत खेळण्याचे सुख कसले ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा वेळी श्रीहरीकडे धावून जावे, मग सर्व उत्तमच होईल. ४

२०० नेणों वेळा काळ । धालों तुझ्यानें सकळ ॥ १ ॥
नाहीं नाहीं रे कान्होबा भय आम्हापाशीं ।
वळूनि पुरविसी गाई पोटा खावया ॥ २ ॥
तुजपाशीं भये । हें तों बोलों परी नये ॥ ३ ॥
तुका म्हणे बोल । आम्हा अनुभवें फोल ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– फोल–व्यर्थ.

अर्थ :– श्रीकृष्णा, आम्हांस काळवेळ कांही समजत नाही. केवळ तुझ्या संगतीत आम्ही संतुष्ट झालो आहोत. १ अरे कृष्णा, आता आम्हांस कसलेही भय नाही. कारण तू आमच्याच गाई रक्षण करून वर आम्हास खायलाही देतोस. २ तुझ्या भीतीने इतके शब्दही आम्ही खरे म्हणजे बोलू नयेत; ३ कारण तुकाराम महाराज म्हणतात, असे बोलणेही व्यर्थ आहे असा आमचा अनुभव आहे. ४

## विटीदांडू अभंग १

२०१ सारा विटूदांडू । आणीक कांहीं खेळ मांडूं ॥ १ ॥
बहु अंगा आले डाव । स्थिर नाहीं कोठें पाव ॥ २ ॥
कोली हाणे टोला । झेली तेणें तो गोविला ॥ ३ ॥
एकमेकां हाका मारी । सेल जाळी एक धरी ॥ ४ ॥
राजी आलें नांव । फेरा न चुकेचि धांव ॥ ५ ॥
पुढें एक पाटी । एक एकें दोघां आटी ॥ ६ ॥
एका सोस पोटीं । एक धांवे हात पिटी ॥ ७ ॥
तुका म्हणे आतां । खेळ मोडावा परता ॥ ८ ॥

शब्दार्थ व टीपा – पाव–पाय, गोविला–गुंतून राहिला, सेल–उत्तम वाटा.

अर्थ :– विटीदांडूचा हा खेळ आता मोडू या. दुसरा काही तरी खेळ खेळू आता आपण. १ सारे डाव अंगावर आले. पाय कुठेच स्थिर नाही. २ विटी एकदा कोलल्यानंतर व एकदा टोला मारल्यावर ती जो झेलतो तो गुंतून राहतो. ३ गडी एकमेकास हाका मारतात व झेलका वाटा हातात धरतात ४ ज्यांच्यावर राज्य आले किंवा जे खेळण्यास तयार झाले त्यांची धावपळ काही चुकत नाही. ५ एक पुढे धावतो, दुसरा मागे धावतो, दोघानाही धावावे लागतेच ६ कित्येकाना धावण्याची हौस असते तर कित्येकाना धावताना हात पिटावा लागतो. त्याना त्याचा शीण होतो. ७ तुकाराम महाराज म्हणतात, हा खेळ आता मोडून टाकावा हे बरे. ८

२०२ पाहातां गोवळी । खाय त्यांची उष्टावळी ॥ १ ॥
करिती नामाचें चिंतन । गडी कान्होबाचें ध्यान ॥ २ ॥
आली धावी डाई । धांवे वळत्या मागें गाई ॥ ३ ॥
एके ठायीं काला । तुका म्हणे भाविकाला ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– गोवळी–गवळी, गोपाळ.

अर्थ :– या श्रीकृष्णाचे प्रेम एवढे मोठे की तो गोपाळाचे उष्टेही खात आहे. १ या कृष्णाचे सोबती त्याच्या नामाचे चिंतन व ध्यान करतात. २ त्यांनी आलेल्या डावाचे रक्षण करून वळणाऱ्या गाईंच्या मागेही धावावे. ३ तुकाराम महाराज भाविकाला म्हणतात, सर्व काला एका ठिकाणी करा ४

२०३ पैल आली आगी कान्हो काय रे करावें ।
न कळे तें कैसें आजि वांचों आम्ही जीवें ॥ १ ॥
धांव रे हरी सांपडलों संधीं ।
वोणव्याचे मधीं बुद्धि कांहीं करावी ॥ २ ॥
अवचितां जाळ येतां देखियेला वरी ।
परतोनि पाहतां आधीं होतों पाठमोरी ॥ ३ ॥
सभोंवता फेर रीग न पुरे पळतां ।
तुका म्हणे जाणसी तें करावें अनंता ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – आगी–आग, संधीं–सक्टात, रीग–शिरकाव

अर्थ – अरे श्रीकृष्णा, पलीकडे आग पेटली आहे आता आम्ही काय करावे ? आज आमचे जीव कसे वाचणार हे काही समजत नाही १ अरे श्रीहरी, तू धाव आता. आम्ही मोठ्याच संकटात सापडलो आहोत. या आगीच्या प्रलयात आम्ही काय करावे हेच आम्हास समजत नाही. तूच काही तरी कर व आम्हांस वाचव २ आम्ही आधी पाठमोरेच होतो, पण वळून पाहताच आगीच्या ज्वाला आम्हास दिसल्या. ३ सगळीकडे अग्नी एवढा पसरला आहे की बाहेर पडण्यासाठी शिरकाव करायला कुठे जागाच नाही तुकाराम महाराज म्हणतात, अनंता, आता तुला समजेल तसे तू कर. आमचे रक्षण या अग्नीपासून कर. ४

२०४ भिऊं नका बोले झाकुनियां राहा डोळे ।
चालवील देव धाक नाहीं येणें वेळे ॥ १ ॥
बाप रे हा देवांचाही देव कळों ।
नेंदी माव काय करी करवी ते ॥ २ ॥
पसरुनि मुख विश्वरूप खाय जाळ ।
सारुनियां संधी अवघे पाहाती गोपाळ ॥ ३ ॥
तुका म्हणे आम्ही मागें भ्यालों वांयांविण ।
कळो आले आतां या सांगातें नाहीं शिण ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– माव–माया, चमत्कार, संधी–बोटाच्या फटीतून

अर्थ :– त्यावर श्रीकृष्ण म्हणाला, तुम्ही मुळीच भिऊ नका. डोळे मात्र झाकून घ्या. हे सर्व संकट देव आता निवारण करील. यावेळी काही भीती नाही. १ मग गोपाळ मनाशी समजले की अरे बाप रे, हा तर देवांचा ही देव दिसतो हेच खरे. काय चमत्कार करील ते काही सांगवत नाही. २ मग श्रीकृष्ण विश्वरूप पसरवून सर्व आग तोंडाने गिळून टाकीत आहे असे सर्व गोपाळांनी हाताच्या बोटाच्या फटीतून पाहिले. ३ तुकाराम महाराज म्हणतात, आम्ही मग मागे उगीचच भ्यालो, या श्रीहरीच्या संगतीत कसलाच शीण नाही हे आता आम्हांस कळून चुकले ४

विवरण – श्रीकृष्णाच्या बालचरित्रातील ज्या अद्भुत गोष्टी पुराणातून वर्णन केल्या आहेत त्यात दावाग्नी-भक्षणाची कथा या दोन अभंगात तुकानी वर्णन केलेली दिसते. पूतनावध, धेनुकासुरवध, इद्रगर्वहरण, रासक्रीडा, कालियामर्दन, अघासुरवध, कंसवध इत्यादी विभाग कृष्णचरित्रात महत्त्वाचे असून त्याच्या या बाललीलाचे कौतुकाने वर्णन केले जाते. एकदा उन्हाळ्याच्या रात्री सर्व मंडळी थकून झोपलेली असताना एकाएकी सर्वत्र आग लागली. गोकुळातील लोक घाबरले. या वणव्यात अनेक स्त्रीपुरुष व गाईवासरे सापडल्यामुळे सर्वत्र हाहाकार उडाला. मग सर्वजण मनोभावे श्रीकृष्णास शरण गेले. त्यानी आपले अग्नीपासून रक्षण व्हावे म्हणून श्रीकृष्णाची प्रार्थना केली. ती आर्त प्रार्थना ऐकून भगवान श्रीकृष्णाने तो दावाग्नीच आपल्या मुखाने गिळून टाकला व वनवासियाचे संकट दूर केले अशी कथा आहे.

२०५ नेणती तयासि साच भाव दावी हरी ।
लाज नाहीं नाचे पावा वाजवी मोहरी ॥ १ ॥
चला रे याच्या पाया लागो आता ।
राखिले जळता महा आगीपासूनि ॥ २ ॥
कैसी रे कान्होबा एवढी गिळियेली आगी ।
न देखो पोळला तुज तोंडीं कोठें अगीं ॥ ३ ॥
तुका म्हणे तुम्ही का रे करिता नवल ।
आमची सिदोरी खातो त्याचें आलें बळ ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – साच–खरोखर

अर्थ – एवढी मोठी आग श्रीकृष्णानी गिळून टाकल्यावर सर्वांना नवल वाटून ते म्हणू लागले, जे याचे सामर्थ्य जाणीत नाहीत त्याना खरोखर हा श्रीकृष्ण असाच प्रत्यय आणून देतो. मग त्याच्या मनात कसलीही लाज नसते. तो सुखाने पावा अथवा मुरली वाजवीत नाचत राहतो. १ चला रे, गोपाळ लोकहो त्याच्या पायावर मस्तक ठेवू या. या मोठ्या वणव्यापासून केवळ याच्या कृपेने आपण बचावलो आहोत. २ अरे श्रीकृष्णा, तू एवढी मोठी आग कशी रे गिळलीस? तुझे तोंड किंवा अंग कुठे पोळले नाही का रे? ३ तुकाराम महाराज म्हणतात, गोपाळ हो, तुम्ही या कृष्णाचे काय एवढे नवल सांगता? हा आमची शिदोरी खातो म्हणूनच त्याला एवढे बळ प्राप्त झाले आहे. ४

२०६ त्यानीं धणीवरी संग केला हरीसवें ।
देऊनि आपुले तोचि देईल तें खावे ॥ १ ॥
न ठेवी आभार प्रेमाचा भुकेला ।
बहु दिवस संग हाचि निर्धार त्याला ॥ २ ॥
कान्होबा तू जेवीं घासोघासीं म्हणती ।
आरुष गोपाळें त्याची बहु देवा प्रीती ॥ ३ ॥
तुका म्हणे आता जाऊ आपुलिया घरा ॥
तोंय वाचविलें ऐसें सांगो रे दातारा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – धणीवरी–तृप्त होईपर्यंत, आरुष–अडाणी, तोंय–तेव्हा

अर्थ – या गोपाळमित्रानी मनाचे समाधान होईपर्यंत त्या श्रीहरीची सोबत केली. त्यानी आपल्या शिदोऱ्या त्याला दिल्या व तो जे देईल तेच ते खाऊ लागले. १ त्यालाही या गोपाळाची संगत फार दिवसाची असल्यामुळे

व तोही प्रेमाचाच भुकेला असल्यामुळे त्याने त्याचे उपकार ठेवले नाहीत २ प्रत्येक घास घेत असताना सर्व गोपाळ श्रीकृष्णा, तू जेव ना असे म्हणत असत. हे भावडे व अडाणी गोपाळ मोठे कृष्णप्रेमी होते यांची देवालाही मोठीच प्रीती होती ३ तुकाराम महाराज म्हणतात, आता आपण आपापल्या घरी जाऊ व या दात्या श्रीकृष्णाने आपणास वणव्याच्या सकटातून तेव्हा वाचविले असे घरच्या माणसाना सागू ४

२०७ घ्या रे भोकरे भाकरी । दहींभाताची सिदोरी ।
ताक साडी दुरी । असेल ते तयापें ॥ १ ॥
येथें द्यावे तसे घ्यावे । थोडें परी निरें व्हावे ।
सागतो हे ठावे । कसो द्या रे सकळा ॥ २ ॥
माझें आहे तैसे पाहे । नाही तरी घरा जाये ।
चोरोनिया माये । नवनीत आणावे ॥ ३ ॥
तुका म्हणे घरीं । माझें कोणी नाहीं हरी ।
नका करू दुरी । मज पाया वेगळें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – निरें–खरे शुद्ध

अर्थ – गोपाळानो, ही भाकरी व हे भोकराचे लोणचे घ्या ही दहीभाताची शिदोरी घ्या तुम्ही ज्याच्याजवळ ताक असेल तर ते त्याने दूर सारावे १ येथे जसे द्यावे तसे घ्यावे असे असल्यामुळे जरी थोडे मिळविले तरी ते शुद्ध व चागले असेल मी सर्व हे सागतो त्याची नीट माहिती असू द्या तुम्हाला २ माझी जशी शिदोरी चांगली, शुद्ध व ताजी आहे तशी तुझी आहे की नाही हे तू पाहा व मग घरी जा आईला न सागता घरातील लोणी चोरून घेऊन ये ३ तुकाराम महाराज म्हणतात, मला मात्र माझ्या घरी कुणीही नाही तेव्हा श्रीकृष्णा मला तुझ्या पायापासून दूर करू नकोस ४

२०८ काल्याचिये आसे । देव जळीं जाले मासे ।
पुसोनिया हासे । टिरीसांगाते हात ॥ १ ॥
लाजे त्यासि वाटा नाहीं । जाणे अतरींचे तेंही ।
दीन होता काहीं । होऊ नेदी वेगळें ॥ २ ॥
उपाय अपाय यापुढें । खोटे निवडिता कुडे ।
जोडुनिया पुढें । हात उभे नुपेक्षी ॥ ३ ॥
तें घ्या रे सावकाशें । जया फावेल तो तैसे ।
तुका म्हणे रसे । प्रेमाचिया आनदें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – आसे–आशेने

अर्थ – श्रीकृष्ण आणि गोपाळ यानी जो काला केला त्याचा एखादा लहानसा भाग मिळावा म्हणून आशेने प्रत्यक्ष देवही नदीच्या पाण्यातील मासे बनले त्यावेळी श्रीकृष्ण व गोपाळ यानी हसून आपले हात टिरीला पुसून टाकले १ जो कुणी इथे लज्जित होईल त्यास शिदोरीचा वाटा मिळणार नाही पण त्याच्या मनातील हेही जाणा की जो दीन होऊन मागतो त्यास काही तरी मिळाल्याशिवाय राहात नाही २ या श्रीकृष्णापुढे उपाय व अपाय हे दोनही व्यर्थ होतात, खोटे ठरतात त्याच्यापुढे हात जोडून उभे राहावे, तो कधीही उपेक्षा करणार नाही ३ ज्याला जसे साधेल तसे त्याने या देवापासून जे हवे ते प्राप्त करून घ्यावे तुकाराम महाराज म्हणतात, प्रेमरसाच्या आनदात असावे ४

२०९ गोपाळ म्हणती कान्होबा या रे कांहीं मागों ।
आपुलाले आम्ही जीवीचे तया आवडी सांगों ।
एक म्हणती उगे रे उगे मागेंचि लागों ।
निजों नका कोणी घरी रे आजि अवघेचि जागो ॥ १ ॥
जाणोनि नेणता हरि रे मध्यें उगाचि बैसे ।
नाइकोनि बोल अइके कोण कोणाचे कैसे ।
एक एकाच्या संवादा जाणे न मिळेची ऐसें ।
पोटींचें होटा आणवी देतो तयांसि तैसें ॥ २ ॥
एक म्हणति बहु रे आम्ही पीडिलो माया ।
नेदी दहींभातसिदोरी ताक घालिती पिया ।
तापलों वळितां गोधनें नाहीं जीवन छाया ।
आतां मागों पोटभरी रे याच्या लागोनि पायां ॥ ३ ॥
एक म्हणति तुमचें अरे पोट ते किती ।
मागों गाई म्हैसी घोडे रे धन संपत्ति हस्ती ।
देव गडी कान्हो आमुचा आम्हां काय विपत्ती ।
कन्याकुमरें दासी रे बाजावरी सुपती ॥ ४ ॥
एक म्हणती वेटें हो कोण करी जतन ।
गाढव तैसेचि घोडे रे कोण तयाचा मान ।
लागे भवरोग वाहतां खांदीं चवघे जण ।
हाती काठ्या डोया बोडक्या हिंडों मोकळे राण ॥ ५ ॥
एक म्हणती रानीं रे बहु सावजें फार ।
फाडफाडूं खाती डोळे रे पाय नेतील कर ।
राखोनि राखे आपणा ऐसा कइचा शूर ।
बैसोनि राहों घरीं रे कोण करी हे चार ॥ ६ ॥
घरीं बैसलिया बहुले बहु सांगती काम ।
रिकामें कोणासि नावडे ऐसे आम्हांसि ठावें ।
चौघांमध्यें बरें दिसेसें तेथें नेमक व्हावे ।
लपोनि सहज खेळतां भले गडियांसवें ॥ ७ ॥
एक म्हणती गडी ते भले मिळती मता ।
केली तयावरी चाली रे बरी आपुली सत्ता ।
नसावे ते तेथें तैसे रे खेळ हाणिती लाता ।
रडी एकाएकीं गेलिया गोधळ उडती लाता ॥ ८ ॥
एक म्हणती खेळतां उगीं राहतीं पोरें ।
ऐसें काय घडों शके रे कोणी लहान थोरें ।

अवघीं येती रागा रे एका म्हणतां वरें।
संगें वाढे कलह हरावा एकाएकींच खरें ॥ ९ ॥
एक म्हणती एकला रे तूं जासील कोठें।
सांडी मांडी हें वाउगें तुझे बोलचि खोटें।
ठायीं राहा उगे ठायींच कां रे सिणसी वाटे।
अवघियांची सिदोरी तुझे भरली मोटे ॥ १० ॥
तुका म्हणे काय काहण्या अरे सांगाल गोष्टी।
चाटावे तुमचे बोल रे भुका लागल्या पोटीं।
जागा करूं या रे कान्होबा मागों कवळ तांटीं।
घाले गडी तुका ढेकर देतो विठ्ठल कंठीं ॥ ११ ॥

शब्दार्थ व टीपा – तापलों–कष्टी झालो, विपत्ती–दारिद्र्य, सुपती–झोपतात

अर्थ – कान्होबास काही आपण मागावे असे सर्व गोपाळ म्हणू लागले आपल्या आवडीची अशी जी गोष्ट असेल ती त्यास प्रेमाने मागू. एक म्हणू लागला आपण उगाचच त्याच्या मागे लागू. कुणीही आज घरी झोपू नका आपण सर्वजण जागे राहू. १ हा श्रीहरी सर्व जाणणारा असला तरी नेणता होऊन सर्व गोपाळाच्या मध्ये उगाच बसला; आणि कोण कोण काय काय बोलत आहे हे ऐकत राहिला एकमेकाचे बोलणे एकमेकाच्या मतास जुळत नसल्याचे त्याने पाहिले मग जे ज्याच्या हृदयात होते ते ज्याच्या त्याच्या ओठावर पाहून श्रीहरीने त्याचे मनोरथ पूर्ण केले २ कुणी एक म्हणायला लागले की आम्ही या मायेने फार त्रस्त झालो आहोत कुणीही आम्हास दहीभाताची शिदोरी न देता नुसते ताकच प्यायला देतात आम्ही या गाई वळता वळता फार कष्टी झालो कुठे विसाव्याला सावली नाही की तहान भागवायला पाणीही नाही आता या श्रीकृष्णाच्या पायाशी लागून पोटभर तरी मागून घेऊ ३ दुसरे काहीं गोपाळ म्हणू लागले, अरे तुमचे पोट तरी किती आहे ? आपण त्या कान्होबास गाई, म्हशी, घोडे, हत्ती, अशी धनसपत्ती मागू. तो देवच आपला धनी असल्यामुळे आपणास दारिद्र्य कसले आहे ? आपली मुले, मुली, दासी वगैरे सर्वजण आरामाने याच्या कृपेने पलगावर झोपतील. ४ दुसरे कुणी म्हणू लागले ही सर्व सपत्ती कुणी जतन करावी ? जसे गाढव तसेच घोडे. त्याचा मान वेगळा कशास हवा ? या साऱ्या सपत्तीचा भार खाद्यावर वाहता वाहता भवरोग मात्र आपणास जडेल त्यापेक्षा हातात काठ्या घेऊन बोडक्या डोक्याने साऱ्या रानात मोकळेपणाने भटकू ना ! ५ मग दुसरे काही म्हणू लागले, रानावनात नको रे बाबा, तेथे फार भयानक पशू असतात ते फाडून खातील, अस्वले बोके, हत्तरस, कवन पार खाऊन टाकतील त्याच्यापासून स्वत चे रक्षण करील असा आपल्यात कोण आहे ? म्हणून आपला घरीच बसून राहा ना. कुणी हा नसता उद्योग सांगितला आहे ? ६ पण घरात बसले की मग सर्वजण खूप कामे सागतात कुणी रिकामे बसले की घरी कुणास आवडत नाही हे आम्हाला माहीत आहे जी गोष्ट चारचौघाना पटेल तीच आपण नीट करू आपल्या गड्यावरोबर भलेपणाने लपून लपूनच खेळले पाहिजे. ७ त्यावर काही म्हणू लागले की आपल्या मताशी मिळणारे गडी फार चागले. कारण आपण त्याच्यावर सत्ता केली तरी मग चालते अरे, असा प्रकार या खेळाच्या ठिकाणी असू नये. या खेळात एखाद्या वेळेस लायाही बसतील एकमेकावर रागावून रडी खाल्ल्यावर मग लायाळी होऊन गोंधळ उडतो ८ मग काहीजण म्हणू लागले की खेळ खेळताना ही पोरे उगीच राहतात खेळात का कुणी लहान, थोर असे कधी घडू शकते ? एकाला चागले म्हटले की दुसरी पोरे रागावतात. अशा सगतीत मग भांडणच वाढीस लागते. ते टाळण्यासाठी एकटेच राहणे मग बरे. ९ त्यावर दुसरे म्हणतात, अरे तू एकटाच मग कुठे जाशील ? मी हे सोडून देईन, हे घेईन हे बोलणेच खोटे व व्यर्थ आहे. अरे, तू जागच्या जागी स्वस्थच राहा ना. उगाच या मार्गात का श्रमतोस ? सर्वांची शिदोरी तुझ्याच गाठोड्यात भरलेली आहे. १० तुकाराम महाराज म्हणतात, अरे, कसल्या या गोष्टी सागता ? तुमचे बोल फुकट आहेत. इथे आम्हाला पोटात भूक लागली आहे तिथे तुमच्या वडबडीस काय चाटायचेय ? या सर्वजण, आपण या

कान्होबाला जागें करू व आपल्या ताटात त्याला घास मागू मग सर्व गडी सतुष्ट होऊन विठ्ठलनामाचे ढेकर देऊ असे तुकारामबुवा म्हणतात ११

२१० आजि ओस अमरावती । काला पाहावया येती ।
देव विसरती । देहभाव आपुला ॥ १ ॥
आनंद न समाये मेदिनी । चारा विसरल्या पाणी ।
तटस्थ त्या ध्यानीं । गाई जाल्या श्वापदें ॥ २ ॥
जें या देवाचें दैवत । उभें आहे या रंगात ।
गोपाळासहित । क्रीडा करी कान्होबा ॥ ३ ॥
तया सुखाची शिराणी । तींच पाउलें मेदिनी ।
तुका म्हणे मुनी । धुंडितां न लाभती ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – मेदिनी–पृथ्वी, शिराणी–कळस

अर्थ – या गोपाळाचा काला पाहण्यासाठी सारे देव आल्यामुळे आज अमरावतीही ओस पडलेली आहे त्याचे देहभान हरपून गेले आहे १ काल्याचा आनद या सबध पृथ्वीवरही मावत नाही वनातील सर्व गाई व श्वापदे चारा खायचे व पाणी प्यायचे विसरुन गेल्या त्याच्या सर्व वृत्ती या श्रीहरीच्या ठिकाणी एकवटून आल्या २ या सर्व देवाचे दैवतच आज या काल्याच्या आनदाच्या रगात उभे आहे, हा श्रीकृष्ण गोपाळाबरोबर आज क्रीडा करीत आहे ३ सर्व सुखाचा कळस म्हणजे पृथ्वीवरील याची पाऊले होत तुकाराम महाराज म्हणतात, या पावलांसाठी ऋषिमुनी सर्व जग धुडतात पण त्याना ही सापडत नाहीत ४

२११ चला बाई पांडुरंग पाहूं वाळवंटीं ।
मांडियेला काला भोंवतीं गोपाळाची दाटी ॥ १ ॥
आनंदें कवळ देती एकामुखीं एक ।
न म्हणती सान थोर अवघीं सकळिक ॥ २ ॥
हमामा हुबरी पावा वाजविती मोहरी ।
घेतलासे फेर माजीं घालुनिया हरी ॥ ३ ॥
लुब्धल्या नारी नर अवघ्या पशुयाती ।
विसरलीं देहभाव शका नाहीं चित्तीं ॥ ४ ॥
पुष्पाचा वरुषाव जाली आरतियांची दाटी ।
तुळसी गुफोनिया माळा घालितील कंठीं ॥ ५ ॥
यादवाचा राणा गोपीमनोहर कान्हा ।
तुका म्हणे सुख वाटे देखोनिया मना ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – कवळ–घास

अर्थ – चला बायांनो, वाळवटात जाऊन पाडुरगाचे दर्शन घेऊ या विठ्ठलाने काल्याचा खेळ माडून समोवती गोपाळाची दाटी निर्माण केली आहे १ मोठ्या आनदाने हे गोपाळ एकमेकाना घास देऊ लागले कुणी कुणास लहान थोर मानीत नव्हते २ सर्व गोपाळ मध्यभागी श्रीकृष्णाला ठेवून त्याच्या भोवती फेर धरतात, हमामा, हुमरीचे खेळ करतात, पावा किंवा बासरी वाजवितात. ३ या क्रीडेमुळे सर्व स्त्रीपुरुष व प्राण्यांच्या सर्व जाती लुब्ध होऊन गेल्या. त्यांचा देहभाव विसरुन गेला यात शकाच नाही ४ यावेळी आकाशातून पुष्पाचा

वर्षाव झाला आरती करणाराची दाटी झाली सर्व गोपाळ तुळशीच्या माळा तयार करून पांडुरंगास घालू लागले ५ या देवाचा राजा व गोपींचा प्रियकर श्रीकृष्ण माझ्या मनास किती सुख देतो म्हणून सांगू ? असे तुकाराम महाराज म्हणतात ६

२१२ माझे गडी कोण कोण । निवडा भिन्न यातुनी ॥ १ ॥
आपआपणामध्यें मिळों । एक खेळों एकाशीं ॥ २ ॥
घाबरियाच्या मोडा काड्या । धाडा भाड्या वळतिया ॥ ३ ॥
तुका म्हणे देवापाशीं । विटाळशी नसावी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – काड्या मोडणे–खेळातून काढणे, भाड्या–भित्र्या

अर्थ – माझे सोबती कोणकोण आहेत ते सांग पाहू गोपाळाच्या मेळाव्यातून हे मला निवडून द्या पाहू १ आपण आपल्या स्वरूपातच मिळून एकमेकाशी खेळू या २ या खेळात जे गडी घाबरतील त्याना खेळातून काढून टाका अशा भित्र्या गड्याना इंद्रियरूपी गाई वळायला पाठवून देऊ ३ तुकाराम महाराज म्हणतात, या देवापाशी ज्याच्या चित्तास विटाळ झाला आहे असा मनुष्य नसावा ४

२१३ हेचि अनुवाद सदा सर्वकाळ । करुनिया गोपाळकाला सेवूं ॥ १ ॥
वोरसले कामधेनूचे दुभतें । सपूर्ण आइतें गगनभरी ॥ २ ॥
सत सनकादिक गोमटचा परवडी । विभाग आवडी इच्छेचिये ॥ ३ ॥
तुका म्हणे मधीं घालू नारायण । मग नव्हे सीण कोणा खेळें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – अनुवाद–स्मरण वोरसलें–प्राप्त झाले, गोमट्या–चागल्या परवडी–प्रकारानी

अर्थ – भगवताच्या स्वरूपाचे स्मरणच सर्वकाळ करून या गोपाळाच्या बरोबर आपण या काल्याचे सेवन करू या १ आज कामधेनूचे हे दुभते आपणास प्राप्त झाले आहे या दुग्धामृताने पूर्णपणे सारे आकाश भरून गेले आहे २ सनकादिक सतानी विविध अशा चागल्या प्रकारानी व मोठ्या प्रमाने याचा लाभ आपल्या इच्छेप्रमाणे घ्यावा ३ तुकाराम महाराज म्हणतात, मध्यभागी नारायणाला ठेवून खेळ केला म्हणजे मग कसलाही शीण कधी आपणास होत नाही ४

२१४ अधिकाचा मज काटाळा । तुम्हा गोपाळा सगति ॥ १ ॥
काय नाही तुम्हापाशीं । सकळांविशीं सपन्न ॥ २ ॥
उद्योगाचा नेघें भार । लागल्या सार पुरते ॥ ३ ॥
तुका म्हणे अधीर जिणे । नारायणे न करावे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – अधिकाचा–ऐश्वर्याचा

अर्थ – नारायणा, तुमच्या व या गोपाळाच्या सगतीमुळे मला ऐश्वर्याचा व सपत्तीचा कटाळाच आलेला आहे १ तुमच्या सगतीत काय मिळण्यासारखे नाही? सर्व सपत्तीचा साठा येथ आहे २ कोणत्याही व्यावहारिक कामाचा भार आपण घेण्याची जरुरी नाही येथे आल्याचे सुख हेच समाधानाचे सार आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात नारायणा, माझे जिणे इतके अधीर करू नका ४

२१५ जालों आता एके ठायीं । न वचूं काहीं एकमेका ॥ १ ॥
सरलों हेंगे देउनि मोट । कटकट काशाची ॥ २ ॥
सोडोनिया गाठीं पाहें । काय आहे त्यात ते ॥ ३ ॥
तुका म्हणे जालों निराळा । आता गोपाळा देऊं बोमा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – वंचूं-सोडू, हेंगें-इकडे, बोभा-हाक

अर्थ :– आता देव व मी एकच झालो आहोत. आता आम्ही एकमेकाना सोडून देणार नाही. १ ही सर्व देहाची मोटकुळी श्रीहरीला इकडे अर्पण करून मी आता मुक्तच झालो आहे. आता कसली कटकट आली आहे? २ आता हृदयग्रंथी सोडून त्यात काय काय आहे याचा तपास घेऊ लागलो आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, आता मी सर्व व्यावहारिक बाबतींतून मोकळा झालो. आता श्रीकृष्णास हाक मारणे एवढेच काम उरले आहे. ४

२१६ या रे करूं गाई । जमा निजलेती काई ।
बोभाटानें आई । घरा गेल्या मारील ॥ १ ॥
घाला घाला रे कुकारे । ज्याची तेणेंचि मोहरे ।
एवढेचि पुरे । केलियानें सावध ॥ २ ॥
नेणोनियां खेळा । समय समयाच्या वेळा ।
दुश्चिताजवळा । मिळालेति दुश्चित ॥ ३ ॥
तुका म्हणे शीक । न धरिता लागे भीक ।
धरा सकळीक । मनेरी धांवा वळतियां ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– कुकारे-मोठ्या हाका, ओरडा, मनेरी-मनरूपी गाय

अर्थ :– गोपाळानो, चला आपण आपल्या गाई आता जमा करू. बेसावधपणे झोपलात काय? उठा ना. गाई नीट सापडल्या नाहीत तर बोभाटा होईल आणि मग घरी गेल्यावर आपली आई आपणास मार देईल. १ ज्याने त्याने आपापल्या गाईस मोठ्याने हाका माराव्यात रे एवढ्याच ओरड्याने गाईंना सावध करून परत बोलवा. २ आता घरी परतायची वेळ झाली आहे हे न समजून तुम्ही, समयाचे महत्त्व न ओळखून तुम्ही खेळ खेळत बसता, आणि एका अवगुणी गोपाळाजवळ आणखी अवगुणी मित्र जमा होतात. ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी तुम्हास अनेकदा शिकविले आहे, ते जर तुम्ही ध्यानात धरले नाही तर मग भीक मागण्याचा प्रसंग येईल यासाठी तुमची मनोरूपी गाय तुम्ही प्रथम आवरून धरा. कारण तीच धावपळ मोठ्या ओढाळपणे करते; तिला सर्वांनी सावरून धरावे. ४

२१७ वोळलीचा दोहूं पान्हा । मज कान्हा सांगितला ॥ १ ॥
द्या जि हेंगे क्षीर हातीं । निगुतीने वाढावे ॥ २ ॥
सांगितले केले काम । नव्हे धर्म सत्याचा ॥ ३ ॥
तुका म्हणे नवे जुनें । ऐसे कोणे सोसावें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – वोळली-वळलेली, हेंगे-हच, निगुतीने-सावधतेने, सत्याचा-स्वतःचा

अर्थ :– ही गाय वळलेली असून हिची धार काढ असे श्रीकृष्णाने मला सांगितले आहे. हेच दूध सर्वांना मिळावे म्हणून मोठ्या सावधतेने मी ते सर्वांना वाढणार आहे. २ ईश्वराने जे काम मला सांगितले ते मी केले. हा काही माझा स्वतःचा धर्म म्हणून सांगितला नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, आता नव्याजुन्याचे कष्ट कुणास सहन होण्यासारखे आहेत? ४

२१८ येईल ते घेइन भागा । नव्हे जोगा दुसरिया ॥ १ ॥
आवडी ते तुम्ही जाणा । बहु गुणांसारिखी ॥ २ ॥
मज घेती डांगवरी । सवें हरि नसलिया ॥ ३ ॥
तुका म्हणे राखवा देवा । करीन सेवा सांगितली ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – डांगवरी-काठीने मारण्यास.

अर्थ :– जे माझ्या वाटणीस सर्वांना देऊन झाल्यावर येईल ते मी निमुटपणे घेईन. मी काही इतरांसारखा हावरा मनुष्य नाही. १ चांगल्या गुणवान माणसांसारखीच माझी आवड आहे. ती तुम्ही जाणून घ्या. २ हा परमेश्वर क्षणभरही मजजवळ नसला तर हे लोक मला काठीने मारण्यास तयार होतील. ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, मला पायाले राखवून घ्या. जी सेवा सांगाल ती मी मनोभावे करीन. ४

२१९ अंतरली कुटी मेटी । भय धरूनियां पोटीं ।
म्हणतां जगजेठी । धांवें करुणाउत्तरीं ॥ १ ॥
बाप बळिया शिरोमणी । उतावीळ या वचनीं ।
पडलिया कानी । धांवा न करी आळस ॥ २ ॥
बळ दुनी शरणागता । स्वामी वाहों नेदी चिंता ।
आइतेचि दाता । पंगतीस बैसवी ॥ ३ ॥
वाहे खांदीं पाववी घरा । त्याच्या करी येरझारा ।
बोबडचा उत्तरा । स्वामी तुक्या मानवे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– कुटी मेटी–घरदार, दुनी–दुप्पट

अर्थ :– घरादाराला जी माणसे अंतरली होती व जी मोठेच भय पोटात धरून होती त्यानी करुण वाणीने ईश्वराचा धावा केल्याबरोबर त्याना ईश्वराचे साह्य झाले. १ हा ईश्वर आपल्या ब्रीदाप्रमाणेच असून मोठा बलवान आहे. कुणाची हाक कानी पडताच हा आळस न करता उतावीळ होऊन भक्ताच्या रक्षणार्थ धावत येतो. २ जो शरणागत आहे त्यास असे परमेश्वराचे साह्य झाल्यामुळे त्याचे बळ दुप्पट होते. ईश्वर त्यास कसलीही चिंता करू देत नाही. हा दाता ईश्वर त्याना आयताच पंगतीस बसवितो ३ आणि तुकाराम महाराज म्हणतात, आपल्या भक्ताचे बोबडे बोल ऐकून हा माझा स्वामी भक्ताना खांद्यावर घेऊन त्याच्या घरापर्यंत पोचते करतो वारंवार त्यांच्या घरी त्याची येजा असते ४

२२० धन्य तें गोधन कांवळी काष्ठिका । मोहरी पांवा निका ब्रीद वांकी ॥ १ ॥
धन्य तें गोकुळ धन्य ते गोपाळ । नर नारी सकळ धन्य जाल्या ॥ २ ॥
धन्य ते देवकी जसवंती दोहींचें । वसुदेवनंदाचे भाग्य जाले ॥ ३ ॥
धन्य त्या गोपिका सोळा सहस्र बाळा । यादवां सकळां धन्य जाले ॥ ४ ॥
धन्य म्हणे तुका जन्मा तेचि आली । हरिरंगीं रंगली सर्वभावें ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– काष्ठिका–काठी

अर्थ :– गोकुळातील गोधन, कावळे, काठ्या, मुरली, पावा, वाक्या इत्यादी भूषणे या सर्व वस्तू श्रीकृष्णाच्या सहवासाने धन्य आहेत १ ते गोकुळ धन्य आहे तेथील गोपाळ, स्त्री-पुरुष सर्वच जण धन्य आहेत. २ श्रीकृष्णाच्या माता देवकी व यशोदा याही धन्य होत. वसुदेव व देवकी यांच्या भाग्याचे वर्णन किती करावे ? ३ त्या गोपिका व सोळा सहस्र स्त्रिया आणि सर्व यादवही धन्य होत ४ तुकाराम महाराज म्हणतात, जी हरीच्या भक्तीत रमून गेली ती सर्व माणसे जन्मास येऊन धन्य झाली आहेत. ५

२२१ गौळणी बांधिती धारणासि गळा । खेळे त्या गोपाळांमाजी ब्रह्म ॥ १ ॥
धांवोनियां मागे यशोदे भोजन । हिंडे रानोरान गाईपाठीं ॥ २ ॥
तुका म्हणे सर्व कळा ज्याचे अंगीं । भोळेपणालागीं भीक मागे ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा :– धारणासि–घुसळखांब्याला

अर्थ :– गोकुळच्या गौळणी श्रीकृष्णाला त्याने खोडी करू नये वा चोरी करू नये म्हणून उखळाशी दाव्याने बांधून ठेवितात. हे परब्रह्म त्या गोपाळाच्यात खेळ खेळीत असते. १ यशोदेच्या मागे मागे धावून हा श्रीकृष्ण तिला भोजनही मागतो. हाच श्रीकृष्ण गाईंच्या मागे रानोरान हिंडून क्रीडा करतो. २ तुकाराम महाराज म्हणतात, या श्रीकृष्णाच्या अंगी सर्व प्रकारचे ज्ञान असून तो एका भोळेपणासाठी भीक मागतो. ३

२२२ देखिलासि माती खाता । दावियानें बांधी माता ॥ १ ॥
जाळी घेउनि कांबळी काठी । गाई वळी वेणु पाठीं ॥ २ ॥
मोठें भावार्थाचे बळ । देव झाला त्याचें बाळ ॥ ३ ॥
तुका म्हणे भक्तासाठीं । देव धावे पाठोवाठीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– जाळी–जाळे, वेणु–पावा, पाठोवाठीं–पाठोपाठ

अर्थ – देवा, यशोदामातेने तुला माती खात असताना पाहिले. त्यासाठी तुझ्या आईने तुला दाव्याने बांधले. १ हातात जाळे घेऊन, खांद्यावर कांबळे व काठी घेऊन गाई चळायला हा निघाला आहे. याच्या हातात पावा आहे. २ भावभक्तीच्या बळाने हा देव त्याच्या घरी बालकाच्या रूपाने जन्मास आला आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, भक्तासाठी देव पाठोपाठ त्याच्या रक्षणार्थ धावत असतात ४

विवरण :– या दोन अभंगात श्रीकृष्णाच्या गोकुळातील खोडकरपणाचा संक्षेपाने उल्लेख तुकारामबुवांनी केलेला आहे पहिल्या क्र २२१ च्या अभंगात श्रीकृष्णास त्याच्या खोडकरपणामुळे उखळाशी किंवा घुसळखांब्याशी बांधण्यात आले होते त्याचा उल्लेख आला आहे श्रीकृष्णास मांडीवर घेऊन यशोदा एकदा दधिमंथन करीत असता चुलीवरचे दूध उतू गेले म्हणून यशोदा कृष्णास तिथेच ठेवून दूध उतरण्यास धावली याचा राग श्रीकृष्णास आला व त्याने डेराच फोडून टाकला, उरलेले लोणी खाऊन टाकले यशोदेस हे सारे कृत्य समजताच तिला फार मोठा राग आला ती या खोडकर पोरास दाव्याने घुसळखांब्याशी बांधायला निघाली आणि भला मोठा दोर आणून त्याला बांधन म्हणून बांधीत असताना कितीही मोठे वेढे घेतले तरी दावे दोनतीन बोटे कमीच पडत राहिले. आणखी कितीतरी दावी एकमेकास बांधून घेतली तरी ती अपुरीच राहिली श्रीकृष्णास पुत्रभावाने पाहणाऱ्या या यशोदामातेस आपल्या पुत्राची विश्वव्यापकता व ईश्वरस्वरूपता पटली अशी कथा भागवत पुराणात आलेली आहे. दुसऱ्या अभंग क्रमांक २२२ मध्ये श्रीकृष्णाने माती खाल्याच्या कथेचा उल्लेख तुकारामांनी केलेला आहे एकदा मुलामुलांत खेळत असताना श्रीकृष्णाने माती खाल्ली असा पुकारा करीत त्याचे सोबती यशोदामातेकडे आले त्यावर यशोदेने श्रीकृष्णास पकडून धाक दाखविण्यास सुरुवात केली 'आई, मी माती मुळीच खाल्ली नाही.' असे श्रीकृष्ण परोपरीने सांगत असतानाही यशोदेस खरे वाटले नाही 'तुझे तोंड दाखव पाहू' असे यशोदेने म्हणताच श्रीकृष्णाने तोंड उघडले. तेव्हा तिला सर्व विश्व श्रीकृष्णाच्या मुखात सामावले असल्याचे दिसून आले सर्व सृष्टी, समुद्र, नद्या, पर्वत, चंद्र, सूर्य यांनी भरलेले श्रीकृष्णाचे मुख पाहून यशोदेस नवल तर वाटलेच, पण पुत्रभावाने पाहणारी यशोदामाता ही आपल्या मुलाचे थोरपण समजून चुकली

२२३ हा गे माझे हातीं । पाहा कवळ सांगाती ॥ १ ॥
देवें दिला खातो भाग । कराल तर करा लाग ॥ २ ॥
धाले ऐसे पोट । वरी करूनियां बोट ॥ ३ ॥
तुका म्हणे घरीं । मग कैंच्या या परी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – लाग–खटपट, प्रयत्न.

अर्थ :– आपल्या बरोबर असलेल्या सोबत्यांस हे गोपाळ सांगतात, 'हा पाहा माझ्या हातीं काल्याचा घास आहे.' १ हा भाग त्याला देवाने दिलेला असतो. तोच तो खात असतो. तुम्हास तो हवा असेल तर तुम्हीही प्रयत्न

करून पाहा २ तुमचे पोट भरले असे तुम्ही बोट वर करून म्हणता ३ तुकाराम महाराज म्हणतात अशा प्रकारचे सुख तुम्हाला तुमच्या घरी मिळणार आहे काय ? ४

२२४ अवघें अवघीकडे । दिले पाहे मजकडे ॥
अशा सवगडे । सहित थोरी लागली ॥ १ ॥
का रे धरिला अबोला । माझा वाटा देईं मला ॥
सिदोरीचा केला । झाडा आता निवडे ना ॥ २ ॥
भूक लागली अनंता । का रे नेणसी जाणता ॥
भागलो वळिता । गाई सैरा ओढाळा ॥ ३ ॥
तुका करुणा भाकी । हरि पाहे गोळा टाकी ॥
घेता जाला सुखी । भीतरी वाटी आणीका ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – अशा–आशा, झाडा–हिशेब, सैरा–स्वैर

अर्थ – श्रीकृष्णा, तू सर्वांना सर्व काही दिलेस, आता माझ्याकडे थोडे पाहून मलाही काही दे ना माझ्या सौंगड्यासहित सर्वांना तुझी मोठीच आशा लागून राहिली आहे १ श्रीकृष्णा, तू माझ्याशी अबोला का रे धरिलास ? माझा वाटा मला तावडतोब देऊन टाक ना मी माझ्या पापपुण्यात्मक शिदोरीचा हिशेब तुझ्याजवळ पुरा केला आहे ना ? मग आता तू माझा निवाडा का करीत नाहीस ? २ अनंता, आता फार भूक लागली आहे रे तू चांगला जाणता असून तुला हे का रे समजत नाही ? मी आता या इंद्रियरूपी गाई वळतावळता थकून गेलो आहे या गाई मोठ्या सैरावैरा धावणाऱ्या व ओढाळ आहेत ३ श्रीकृष्णा, मी तुझी करुणा भाकत आहे तू काल्याचा घास माझ्या वाट्याचा मजकडे टाक ना या काल्याचा घास घेत असताना तुकाराम महाराज म्हणतात मी फार सुखी झालो आहे, मी तो माझ्या सोबत्यांना वाटून दिला ४

२२५ आम्ही गोवळीं रानटें । नव्हों जनांतील धीटें ॥ १ ॥
सिदोरीचा करूं काला । एक वांटितो एकाला ॥ २ ॥
खेळों आपआपणाशीं । आमचीं तीं आम्हांपाशीं ॥ ३ ॥
मिळालों नेणते । तुका कान्होबा भोंवते ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – रानटें–रानवट

अर्थ – आम्ही आपले गाई राखणारे रानवट गुराखी आहोत लोकात धीटपणे कसे वागावे हे आम्हास माहित नाही १ आम्ही सर्वांच्या शिदोऱ्याचा एकच काला करू व सर्वांना वाटू २ आम्ही एकमेकात खेळ खेळू, जी आमचीच मंडळी आहेत ती आम्हासच येऊन मिळतील ३ तुकाराम महाराज म्हणतात, आम्ही या कान्होबाच्या भोवती सर्व नेणते गोपाळ एकत्र झालो आहोत ४

२२६ "अवघिया दिला गोर । मजकरे पाहीना " ॥ १ ॥
फुदे गोपाळ डोळे चोळी । ढुंगा थापली हाणे तोंडा ॥ २ ॥
आवडती थोर मोटे । मी रे पोरटें दैन्यवाणे ॥ ३ ॥
तुका म्हणे जाणे भाव । जीविंचा देव बुझावी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – गार–गोड

अर्थ – श्रीकृष्णाच्या संगतीतील एक बोबडा गोपाळ म्हणत आहे, 'या श्रीकृष्णाने सर्वांना गोडगोड घास दिले आणि तो माझ्याकडे पाहातसुद्धा नाहीं' १ असे म्हणून तो गोपाळ डोळे चोळून चोळून स्फुदून रडू लागला,

आपल्या तोंडावर व ढुंगणावर थपडा मारू लागला. २ या बोबडयाने म्हटले, 'श्रीकृष्णास थोर थोर लोक हवेत. त्यांची मैत्री याला आवडते. मी तर एक दैन्यवाणे गरीब पोरटे आहे.' ३ तुकाराम महाराज म्हणतात, त्या गरिबाच्या मनातील भाव जाणून श्रीकृष्णाने त्या गरीब जीवाची समजूत काढली. ४

## मृदुंग पाट्या-अभंग

२२७ मागें पुढें पाहे सांभाळूनि दोनी ठाय।
चूकावूनि जाय गडी राखें गडियांसि ॥ १ ॥
मुरडे दंडा दोहीं तोंडें गडियां सावध करी।
भेटतियासंगें तया हाल तुजवरी ॥ २ ॥
गडियां गडी वांटुनि देई। ज्याचा सोडी तेचि ठायीं ॥ ३ ॥
अगळचा वळें करील काय। तुज देणें लागे डोय ॥ ४ ॥
नवां घरीं पाउला करीं। सांपडें तो तेयें धरीं ॥ ५ ॥
जिंकोनि डाव करीं। टाहो सत्ता आणिकांवरी ॥ ६ ॥
सांपडोनि डाईं बहु। काळ गुंतलासी ॥ ७ ॥
बळिया गडी फळी। फोडी न धरितां त्यांसी ॥ ८ ॥
चुकांडी जो खाय मिळोनि अंगीं जाय।
गुंतलासी काय तुका म्हणे अज्ञूनी ॥ ९ ॥

शब्दार्थ व टीपा :– ठाय–बाजू, हाल–डाय, डोय–डाव, टाहो–घोप, चुकाडी–नुकाडी.

अर्थ :– मागेपुढे म्हणजे प्रवृत्तीकडे व निवृत्तीकडे नीट लक्ष देऊन दोनही बाजूंच्या गड्यांना चुकवून तू जा. १ प्रवृत्ती व निवृत्ती या दोनही बाजूंच्या गड्यांना वळवून तू त्यांना सावध कर. जे कुणी तुला भेटतील त्यांचा डाव तुझ्यावर आहे हे ध्यानात असू दे. २ प्रवृत्ती व निवृत्ती यांच्याप्रमाणे गड्याची वाटणी करून तू ज्याचा गडी त्यासच देऊन टाक. ३ विनाकारण अधिक बळाचा उपयोग काय? तू त्यांना डाय द्यायला हवासच. ४ नऊ ग्रहांच्या रूपाने असणाऱ्या या नऊ गड्यांचा पाठलाग करून ते जिथे सापडतील तिथे त्यांना तू धर. ५ त्यांच्यावर डाव जिंकून दुसऱ्यावरील आपली सत्ता तू घोष करून चालू ठेव. ६ या बलवान प्रवृत्तींच्या ताब्यात सापडून तू पुष्कळ काळ गुंतून राहिला आहेस. ७ या बलवान गड्यांची फळी तू त्याना न धरता फोड व त्यातून तू पार हो. ८ चुकांडी देऊन जो गडी श्रीकृष्णस्वरुपी मिसळून जातो, त्याची संगत तू धर. तुकाराम महाराज म्हणतात, अजून तू या प्रवृत्तीत, या खेळात का विनाकारण गुंतून राहिला आहेस? ९

२२८ पाहा रे तमासा तुमचा येयें नव्हे लाग ॥
देईन तो भाग आलियाचा बाहेरी ॥ १ ॥
जागा रे गोपाळांनो ठायीं ठायीं जागा।
चाहुलीनें भागा दूर मजपासूनि ॥ २ ॥
न रिघतां ठाव आम्हा ठावा पाळतियां।
भयाभीत वांयां तेयें काय चांचपां[1] ॥ ३ ॥
तुका म्हणे हातां चढे जीवाचिये साटीं।
मिटक्या देतां गोड मग लागतें शेवटीं ॥ ४ ॥

---

[1] चांचपाल.

शब्दार्थ व टीपा:– तमासा–गमत, लाग–फायदा.

अर्थः–गोपाळांनो, तुमचा या ठिकाणी फायदा होणार नाही तुम्ही या श्रीहरीची गमत तर पाहा. चोरी करून बाहेर आल्यावर मग तुमचा लाभ तुम्हास तो देईल. १ गोपाळानो, तुम्ही आपापल्या जागी जागेपणाने असा. मजपासून दूर राहण्यास व असावधपणे वागल्यास तुम्हास त्रास होईल. २ आम्ही त्या श्रीहरीच्या ठिकाणी प्रवेश न करताही नुसती पाळत ठेवूनही आम्हांला त्याची सर्व ठिकाणे माहीत आहेत. त्याच्याशिवाय तुम्ही मनात भय बाळगून वागाल तर व्यर्थ इतर जागा चाचपीत बसाल ३ तुकाराम महाराज म्हणतात, जिवावर उदार होऊन तुम्ही त्याच्याकडे जा; मग शेवटी ते नवनीत मिटक्या मारून खाताना तुम्हांस फार गोड वाटेल. ४

२२९ डाई घालुनियां पोरें। त्यांची गुरें चुकवीलीं ॥ १ ॥
खेळ खेळता फोडिल्या डोया। आपण होय निराळा ॥ २ ॥
मारिती माया घेती जीव। नाहीं कीव अन्यायें॥ ३ ॥
तुका कान्होबा मागें। तया अंगें कळों आलें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:– डोया–डोकी

अर्थः– या कृष्णाने अनेक प्रकारचे खेळ करून सर्व पोराना डावात हरविले व त्याची इंद्रियरूपी गुरे चुकविली. १ खेळ खेळता खेळता अनेकांची अभिमानाची डोके फुटली; आणि तो श्रीकृष्ण तर आपण होऊन निराळा राहिला. २ ही वरवरची माया सर्वांना मारून त्याचा जीव घेते. तिला कसलीही दया नसल्याने ती अन्यायानेच वागते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी या कान्होबाच्या मागे नेहमीच असतो. त्याच्या अंगसंगाने मला हे सर्व कळून चुकले आहे ४

२३० आतां हेचि जेऊं हेचि जेऊं। सवें घेऊं सिदोरी॥ १ ॥
हरिनामाचा खिचडा केला। प्रेमें मोहिला साधनें॥ २ ॥
चवीं चवीं घेऊं घास। ब्रह्मरस आवडी ॥ ३ ॥
तुका म्हणे गोड लागे। तो तों मागे रसना ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:– खिचडा–खिचडी, मिश्रण, रसना–जीभ

अर्थ–हरिनामाचे व काल्याचे भोजन हेच आमचे मुख्य जेवण होय. ही शिदोरी आम्ही यापुढे नेहमीच बरोबर घेऊ. १ श्रीहरीचे नाम, त्याचे गुणसंकीर्तन, त्याची भक्ती याची खिचडी काल्याच्या रूपाने करून याच प्रेमाने, व भक्तीच्या साधनाने तो मोहित होणारा आहे. २ या ब्रह्मरसाच्या घासाचे मोठ्या आवडीने सेवन करून त्याची चव बारकाईने आम्ही घेत राहू. ३ तुकाराम महाराज म्हणतात, हा काल्याचा घास किती गोड लागतो म्हणून सागू ? तो जो जो गोड लागतो तो तो ही जीभ त्याची इच्छा अधिक अधिक करीत आहे ४

२३१ अवघेंचि गोड जालें। मागीलये भरी आलें ॥ १ ॥
साह्य जाला पांडुरंग। दिला अभ्यंतरीं संग॥ २ ॥
थडिये पावतां तो वाव। मागें वाहावतां ठाव ॥ ३ ॥
तुका म्हणे गेलें। स्वप्नींचें जागें जालें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – भरी आले–भरून आले, थडिये–किनाऱ्यावर, वाव–व्यर्थ

अर्थ.– देवा, आम्ही मागे जे जे कर्म केले होते ते ते सर्व तुला वाहून टाकल्यामुळे आता सर्वच गोड होऊन गेले आहे. १ आम्हांस आता पांडुरंगाचे साह्य असल्यामुळे त्याचा निवास आमच्या हृदयातच कायमचा आहे. २ महापुरात बुडणाऱ्यास पैलतीर गाठता आल्यानंतर मग बुडण्याची भीती व्यर्थच असते. ३ तुकाराम महाराज

म्हणतात, त्याप्रमाणे माझे झाले आहे. एखादे भयंकर स्वप्न पडल्यानंतर जागे झाल्यावर जसे त्याचे काहीच उरत नाही त्याप्रमाणे त्या पाडुरंगाच्या संगतीने माझी भीती वृथा ठरलेली आहे. ४

२३२ तुजसवें येतों हरी । आम्हां लाज नाहीं तरी ।
उचलिला गिरी । चांग तईं वांचलों ॥ १ ॥
मोडा आतां खेळ । गाई गेल्या जाला वेळ ।
फांकल्या ओढाळ । नाहीं तोंचि आवरा ॥ २ ॥
चांग दैवें यमुनेसी वांचलों बुडतां ।
निलाजिरीं आम्ही नाहीं भय धाक या अनंता ॥ ३ ॥
खातो आगी माती । आतां पुरे हा सांगाती ।
भोंवतां भोंवेल । आम्हां वाटतें हें चित्तीं ॥ ४ ॥
तुका म्हणे उरी नाहीं तुजसवें ।
शाहाणिया[1] दुरी छंद भोळियां सवें ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – गिरी–गोवर्धन पर्वत, चाग–चागले, सावधपणाने, फांकल्या–पसरल्या.

अर्थ:– श्रीहरी, आमच्या मनास काही लाजच नाही. आम्ही जणु कोडगेच आहोत. आम्ही पुन पुनः तुझ्या बरोबरच येणार. कारण आम्हास माहीत आहे की तूच इद्राच्या अवकृपेच्या वेळी गोवर्धनपर्वत उचलल्यामुळे आम्ही चागले वाचलो आहोत, १ आता फार वेळ झाल्यामुळे खेळ मोडा. गाई चरायला जाऊन फार वेळ झाला. जोपर्यंत या इद्रियरूपी गाई ओढाळ होऊन चहू दिशास पसरल्या नाहीत तो पर्यंतच त्याना आवरिले पाहिजे. २ या देवाच्या कृपेने व आमच्या चागल्या दैवाने आम्ही यमुनेत बुडत असताना वाचलो त्यामुळे या हरीचे उपकार आमच्यावर फार आहेत. आम्ही निलाजरेच आहोत या अनंताला मात्र यसलाही धाक किंवा कसलीही भीती नाही, ३ तो अग्नी, माती काहीही खातो. असल्या या देवाची संगत आता नकोशी वाटते. कारण याची अशी ही विपरीत वागण्याची सगत आम्हास चागलीच भोवेल असे आमच्या मनात वाटते. ४ तुकाराम महाराज म्हणतात, श्रीकृष्णा, तुझ्याबरोबर आम्ही कसे पुरे पडणार? तुझ्यासारख्या शाहण्यापासून चार पावले दूरच असावे व भोळ्याभाबड्यांची संगत धरावी. ५

विवरण:–श्रीकृष्णाच्या बालपणातील अद्भुत क्रीडा पाहून त्याच्या सगतीचा मनात धाक निर्माण झाल्याची एक विचित्र पण गमतीची तक्रार तुकारामबुवानी गोपाळाची म्हणून या अभगात माडलेली आहे. या श्रीकृष्णाचे उपकार फार मोठे, याच्याच कृपेने सर्व सकटे टळली, शेवटी निलाजरे होऊन याचीच सगत धरणे प्राप्त आहे हे माहीत असूनही याच्या अचाट कृत्याची धास्ती मनात असल्यामुळे एक प्रकारे याची सगत नकी तरी आपणास अनिष्ट रूपाने भोगावी लागेल अशी भीती व्यक्त करण्यात आली आहे

तुकारामबुवानी येथे गोवर्धन उचलून श्रीकृष्णाने गोकुळातील लोकाचे रक्षण केल्याचा उल्लेख केला आहे. ही कथा भागवतादी पुराणातून सविस्तर येते. दर वर्षी पावसासाठी लोक इद्रास तृप्त करण्यासाठी इद्रयाग करीत असत. इद्राचा हा अभिमान दूर करण्यासाठी इद्राऐवजी गोवर्धन पर्वताची पूजा करण्यास श्रीकृष्णाने सर्वांना सागितले. गोकुळातील लोकाचा मुख्य व्यवसाय गोरक्षणाचा यासाठी सर्वांत अधिक मदत गोवर्धन पर्वताची होते असा त्याच्या बोलण्याचा अर्थ मग नदासहित सर्व गोपाळानी गोवर्धनाचीच पूजा केली त्याला महानैवेद्य दाखविला गाईंना कोवळे गवत घातले, गोवर्धन हाच मुख्य देव त्याचा झाला. या कृत्याचा इद्रास फार मोठा राग आला. त्याने सावर्तक नावाच्या मेघाना बोलावून गोकुळात सर्वत्र वृष्टी करण्यास आज्ञा केली. गोकुळावर यानतर भयकर स्वरूपात जलवृष्टी होऊ लागली. जिकडे तिकडे पाणीच पाणी होऊन गेले. आह व प्रवह नावाच्या सोसाट्याच्या वाऱ्यानी

१ शाहाणे या भावे दुरी छद भोळिया । किंवा शाहाणे या दुरी । छद भोळिया भावे ।

सर्वांची दाणादाण करून सोडिली. सर्वजण श्रीकृष्णास शरण गेले. मग या आपल्या भक्ताचे रक्षण करण्यासाठी श्रीकृष्णाने लहान मूल एखादे 'अळवे' (पावसाळ्यातील कुऱ्याची छत्री) जसे उचलते तसा तो गोवर्धन पर्वत लीलेने आपल्या डाव्या हातावर उचलून धरिला व त्याच्या खाली सर्व गोकुळनिवासी स्त्रीपुरुष सुखाने राहू लागले. गोवर्धन पर्वताच्या आश्रयाने श्रीकृष्णाने स्वबांधवाचे याप्रमाणे रक्षण केले. यानतर इंद्राचाही अभिमान नाहीसा झाला.

२३३ नको आम्हांसवें गोपाळा । येऊं ओढाळा तुझ्या गाई ॥ १ ॥
कोण धांवें त्यांच्या लागें । मागें मागें येरझारी ॥ २ ॥
न बैसती एके ठायीं । धांवती दाही दाहा वाटां ॥ ३ ॥
तुका म्हणे तूं राख मनेरी । मग त्या येरी आम्ही जाणों ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :— मनेरी–मनरूपी गाय, येरी–इतर

अर्थ:–श्रीकृष्णा, गोपाळा, तू आमच्या बरोबर नको येऊस. तुझ्या या गाई फारच ओढाळ आहेत. १ त्यांच्या मागे कोण धावणार रे एकसारखे ? त्यांच्या मागून कुणी एकसारख्या खेपा कराव्यात ? २ त्या कधीच एके ठिकाणी बसत नाहीत; दहा वाटांनी दहा दिशांना धावतात त्या ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तू फक्त या मनरूपी गाईस सांभाळ; इतर मग आम्ही नीटपणे सांभाळू. ४

२३४ मागायास गेलों सिदोरी । तुझ्या मायाघरीं गांजियलों ॥ १ ॥
तुजविणें ते नेदी कोणा । सांगतां खुणा जिवें गेलों ॥ २ ॥
वांयांविण केली येरझार । आतां पुरे घर तुझी माया ॥ ३ ॥
तुका म्हणे तूं आम्हां वेगळा । राहें गोपाळा म्हणउनी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :–मायाघरी–आईच्या घरी.

अर्थ:–श्रीकृष्णा, तुझ्या घरी तुझी शिदोरी आणण्यासाठी गेलो, तो तुझ्या आईने फार त्रास दिला. रागावली ती. १ तुझ्याशिवाय कुणालाही ती शिदोरी द्यायला तयार होईना. तुझ्या ओळखीच्या सर्व खुणा मी सांगितल्या जीव तोडून मी विनवणी केली; पण व्यर्थ. २ तुझ्या घरच्या माझ्या खेपा व्यर्थ गेल्या आता, देवा, तुझे घरही पुरे व तुझी मायाही पुरे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, श्रीकृष्णा तू आमच्यापासून नेहमीच निराळा राहतोस. कारण आम्ही बिचारे गोपाळ ना ! ४

२३५ काकुलती येतो हरी । क्षणभरी निवडितां ॥ १ ॥
तुमची मज लागली सवे । ठायींचे नवें नव्हों गडी ॥ २ ॥
आणीक बोलाविती फार । बहु थोर नावडती ॥ ३ ॥
भाविके त्यांची आवडी मोठी । तुका म्हणे मिठी घाली जिवें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– निवडिता–दूर करताच

अर्थ –या श्रीकृष्णाला आम्ही क्षणभर जरी दूर केले तरी तो अगदी काकुळतीस येतो. १ तो म्हणतो 'गोपाळांनो, तुमची सवय आम्हास फार आहे. तुम्ही प्रथमपासून आमचेच गडी आहात; हा संबंध काही नवा नाही.' २ या कृष्णाला दुसरे थोर थोर लोक बोलवतात, पण त्याला ते फार मोठे लोक आवडत नाहीत. ३ तुकाराम महाराज म्हणतात, जे भाविक आहेत, त्यांची फार मोठी अवाड या श्रीकृष्णास असते. तो त्याना मोठा जीव लावून मिठी घालतो. ४

२३६ वरता वेंघोनि घातली उडी । कळंबाबुडीं यमुनेसी ॥ १ ॥
हरि बुडाला बोंब घाला । घरचीं त्याला ठावा नाहीं ॥ २ ॥

भवनदीचा नकळे पार । काळिया माजी थोर विखार ॥ ३ ॥
तुका म्हणे काय वाउग्या हाका । हातींचा गमावुनियां थिका ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– वेंघोनि–चढून, विखार–विषारी, थिका–रडता.

अर्थ :–यमुनेच्या तीरावरील कळंब वृक्षाच्या फांदीवर चढून श्रीकृष्णाने नदीच्या डोहात उडी टाकली. १ तेव्हा सर्व गोपाळ ओरडू लागले, 'अरे हरी बुडाला, कृष्ण बुडाला. बोंब मारा ना. कारण याच्या घरी जे आहेत त्यांना यासंबंधी काहीच माहीत नाही.' २ या भवनदीचा काही ठाव कधी लागत नाही व या नदीच्या पात्रात कालिया नावाचा फार मोठा विषारी नाग आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, हातच्या हरीला दवडू नका. व्यर्थ हाका का मारता ? का रडत बसता ? ४

२३७ अवघीं मिळोनि कोल्हाळ केला । आतां होता म्हणती गेला ॥ १ ॥
आपलिया रडती भावें । जयासवें जयापरी ॥ २ ॥
चुकलों आम्ही खेळतां खेळ । गेला गोपाळ हातींचा ॥ ३ ॥
तुका म्हणे धांवती थडी । न घली उडी आंत कोणी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– कोल्हाळ–गोंगाट, थडी–काठापर्यंत.

अर्थ :–मग सर्व गोपाळांनी मिळून एकच गोंगाट केला; व म्हणू लागले, 'हा हरी आता की हो होता. आता कसा नाहीसा झाला ?' १ जो तो आपापल्या भावनेने रडू लागला. ज्याची जशी त्याच्याशी संगत होती तशा प्रमाणात त्यांना शोक झाला, २ ते म्हणू लागले, ' आम्हीच खेळ खेळताना चुकलो. म्हणूनच आमच्या हातून हा आमचा गोपाल कृष्ण गेला.' ३ तुकाराम महाराज म्हणतात, असे म्हणून काही गोपाळ नदीच्या काठापर्यंत धावत गेले; पण आत उडी घालून श्रीकृष्णाचा शोध घेण्याचे धैर्य मात्र कुणास झाले नाही. ४

२३८ भ्यालीं जिवा चुकलीं देवा । नाहीं ठावा जवळीं तो ॥ १ ॥
आहाकटा करिती हाय । हात डोकें पिटिती पाय ॥ २ ॥
जवळी होतां नकळे आम्हां । गेल्या सीमा नाहीं दुःखा ॥ ३ ॥
तुका म्हणे हा लाघवी मोटा । पाहे खोटा खरा भाव ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– आहाकटा–हायहाय.

अर्थ :– श्रीकृष्ण यमुनेच्या डोहात बुडाला, त्याचे रक्षण आपण केले नाही या विचाराने ते सर्व गोपाळ भ्याले उडी टाकून त्याला वर काढण्याचे धैर्य कुणास नव्हते. ज्याने त्याने आपल्या जिवास जपले व देव मुकविला. तो जवळच आहे तरी त्याचा तपास आता काही केल्या लागेना. १ मग सर्वजण हायहाय करून दु:ख करू लागले. जो तो हात, पाय, डोके पिटून घेऊ लागला. २ व म्हणू लागला; 'हा कृष्ण आमच्या अगदी जवळ होता तेव्हा त्याचे महत्त्व आम्हांस समजले नाही; व हा आता दूर जाताच आमच्या दुःखास सीमाच उरली नाही.' ३ तुकाराम महाराज म्हणतात, हा श्रीकृष्ण मोठा लाघवी आहे स्वत-विषयी कोण खरा, कोण खोटा अशी परीक्षाच जणु तो भावभक्तीची पाहतो. ४

२३९ काळिया नाथूनि आला वरी । पैल हरी दाखविती ॥ १ ॥
दुसरिया भावें न कळे कोणा । होय नव्हेसा संदेह मना ॥ २ ॥
रूपा भिन्न पालट जाला। गोरें सांवळेंसा पें देखिला ॥ ३ ॥
आश्वासीत आला करें। तुका खरें म्हणे देव ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– नाथूनि–मर्दन करून, दुसरिया–द्वैत भावनेने

अर्थ :– कालिया सर्पाचे मर्दन करून तो श्रीहरी पाण्याच्यावर आला, व नदीच्या पलीकडच्या तीरावर दिसू लागला १ द्वैतभावाने जे कुणी त्याच्याकडे पाहतात त्याना तो नीट समजत नाही त्याच्या मनात तो आहे की नाही असा संदेहच निर्माण होतो २ त्यावेळी श्रीहरीच्या स्वरूपात थोडा फरक झालेला दिसला काही थोडा गोरा व काही थोडा सावळा असे त्याचे रूप दिसत होते ३ तुकाराम महाराज म्हणतात, हा देव सर्वांना हाताने आश्वासन देतच सर्वांच्या जवळ आला ४

२४० हरि गोपाळासवे सकळा । भेटे गळ्या गळा मेळवनी ॥ १ ॥
भाविके त्याची आवडी मोठी । सांगे गोष्टी जीवींचिया ॥ २ ॥
योगियाच्या ध्याना जो नये । भाकरी त्याच्या मागोनि खाये ॥ ३ ॥
तुका म्हणे असे शाहाणिया दुरी । बोबडिया [1]दास हाका मारी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– आवडी–प्रीती, भक्ती

अर्थ :–त्यानंतर या श्रीहरीने सर्व गोपाळांच्या गळ्यात गळा घालून भेटी घेतल्या १ या कृष्णाला जे भाविक असतात त्यांची फार मोठी प्रीती असते आपल्या जीवाभावाच्या गोष्टी तो त्याना सांगतो २ हा श्रीकृष्ण मोठमोठ्या योग्याच्याही ध्यानात जात नाही पण जे त्याचे भक्त आहेत त्यांच्या भाकरी मागूनही तो खातो ३ तुकाराम महाराज म्हणतात, हा श्रीकृष्ण शहाण्याना दूर ठेवितो व आपल्या बोबड्या भक्ताचा दास होऊन त्याना हाका मारीत असतो ४

**विवरण** – वरील चारपाच अभंगातून तुकारामबुवानी श्रीकृष्णाने बालपणी केलेल्या आणखी एका अद्भुत कृत्यांचे वर्णन केले आहे यमुनेच्या डोहात कालिया नावाचा एक महाविषारी सर्प राहात होता याच्या विषाने दूषित झालेल्या पाण्यामुळे गाईगुरे व माणसे याच्या जीवितास मोठाच धोका निर्माण झाला होता या विषारी कालियाचा नाश करण्याचे कृष्णाने ठरविले खेळ खेळत असताना चेंडू डोहात पडल्याचे निमित्त करून श्रीकृष्ण काठावरील कदंब वृक्षावर चढला व तेथून त्याने डोहात उडी घेतली या भयानक धाडसामुळे कालिया क्रोधाने संतापून जाऊन त्याने श्रीकृष्णाच्या कोवळ्या अंगास वेढे दिले त्याला दंशही केला श्रीकृष्णास फार त्रास झाला काठावर राहिलेल्या गोपाळांनी कृष्ण बुडाला, कृष्ण बुडाला म्हणून फार शोक केला इकडे कृष्णाने कालियाच्या वेढ्यातून मुक्त होण्याचा प्रयत्न केला श्रीकृष्ण त्वरा करून त्याच्या फड्यावर उभा राहिला व तेथे नाचून त्याने त्यास हैराण करून सोडले कालिया भारी त्रस्त झाला त्याच्या मुखातून रक्त येऊ लागले कालिया श्रीकृष्णास शरण आला त्याच्या पत्नींनीही श्रीकृष्णाची प्रार्थना केली मग कालियाने डोह सोडून जावे असे ठरून श्रीकृष्ण सुखरूपपणे डोहाबाहेर आला

२४१ धाव कान्होबा गेल्या गाई । न म्हणे मी कोण ही काई ॥ १ ॥
आपुलियाचे वचन देवा । गोड सेवा करीतसे ॥ २ ॥
मागता आधीं द्यावा डाव । बळिया मी तो नाहीं भाव ॥ ३ ॥
तुका म्हणे ऐशा सवे । अनुसरावे जीवेभावे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – काई–काही

अर्थ – कान्होबा या गाई फार दूर गेल्या आहेत तू धाव ना मी दुसऱ्या कुणासच काही म्हणत नाही साह्यासाठी बोलावीत नाही १ ईश्वरास आपल्या भक्ताचे वचन मोठे गोड असते, तो त्यांची सेवा गोड करून घेतो २ गोपाळ मित्रानी डाव आधी मागितला तरी तो त्याना देतो मी बलवान, त्याना डाव कसा द्यावा असी भावना त्या देवाच्या मनात नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा देवाला मनोभावे शरण जावे त्याच्या बरोबरच नेहमी असावे ४

---

१ बोबडिया दास वामारी

२४२ धाकुट्याचे मुखीं घांस घाली माता। वरी करी सत्ता शाहाणियां ॥ १ ॥
ऐसें जाणपणें पडिलें अंतर। वाढे तों तों थोर अंतराय ॥ २ ॥
दोन्ही उभयतां आपणचि व्याली। आवडीची चाली भिन्न भिन्न ॥ ३ ॥
तुका म्हणे अंगापासूनि निराळें। निवडिलें बळें रडतें स्तनीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:– जाणपणें–शहाणपणामुळे,

अर्थ:– जे दुर्बळ आहे, नेणते आहे त्याची आवड देवास किती असते हे तुकोबांनी या अभंगात फार मार्मिक व वेधक शब्दात सांगताना म्हटले आहे, जो वयाने लहान असतो त्याच्या मुखात आई प्रेमाने घास घालते व त्यास भरविते व जो मोठ्या वयाचा व शहाणा झालेला असतो त्यास नाना प्रकारची कामे सांगून ती त्याच्यावर सत्ता गाजविते. १ असे केवळ वय व शहाणपण वाढल्यामुळे आईच्या प्रीतीत अंतर पडते. जो जो ही जाणीव वाढते तो तो प्रेमात उणीव निर्माण होते; फरक पडतो. २ लहान मुलास व मोठ्या मुलास तीच प्रसविते; तीच त्या दोघांचीही आई असते; पण तिच्या प्रीतीच्या रीतीत मात्र याप्रमाणे फरक पडून त्या निरनिराळ्या होतात. ३ तुकाराम महाराज म्हणतात, ती जाणत्या व शहाण्या मुलास आपल्या अंगापासून दूर लोटते व जे तान्हे मूल पाळण्यात रडत असते त्यास मोठ्या प्रेमाने जवळ घेऊन स्तनास लावीत असते. तेव्हां आपण नेणतेच राहणे बरे असा भावार्थ. ४

२४३ देवाचे म्हणोनि देवीं अनादर। हें मोठें आश्चर्य वाटतसे ॥ १ ॥
आतां येरा जना म्हणावें तें काई। जया भार डोई संसाराचा ॥ २ ॥
त्यजुनी संसार अभिमान सांटा। जुलूम हा मोठा दिसतसे ॥ ३ ॥
तुका म्हणे अळस करूनियां साहे। बळें कैसे पाहें वांयां जाती ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:– येरा–इतर सामान्य जनास, सांटा–साठा, साहे–साह्य.

अर्थ:– केवळ आम्ही ईश्वराचे दास किंवा भक्त म्हणूनच हे लोक देवाच्या ठिकाणी अनादराची भावना दर्शवितात याचे मला मोठे आश्चर्य वाटते. १ मग आता ज्यांच्या शिरावर संसाराचे खरोखरीच मोठे ओझे आहे त्याना, इतर सामान्य लोकांना काय म्हणायचे ? २ हे भक्त लोकही संसाराचा त्याग करून अभिमानाचा साठा वाढवितात हा मोठा जुलूमच म्हणावयास हवा ३ तुकाराम महाराज म्हणतात, हे लोक आळसाच्या साह्यामुळे वाया जातात, त्यांचे आयुष्य व्यर्थ होते. ४

२४४ उपदेश तो भलत्या हातीं। जाला चित्तीं धरावा ॥ १ ॥
नये जाऊं पात्रावरी। कवटी सारी नारळें ॥ २ ॥
स्त्री पुत्र बंदीजन। नारायण स्मरविती ॥ ३ ॥
तुका म्हणे रत्नसार। परि उपकार[1] चिंधीचे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:– कवटी–नारळाचे बाहेरचे कवच, सारी–चांगली, सार–मुख्य गोष्ट, बंदीजन–दासदासी.

अर्थ:– कोणताही उपदेश तो जरी भलत्या माणसाने केलेला असला तरी तो ध्यानात ठेवावा; मनात वागवावा. १ वरवर दिसणाऱ्या भांड्याच्या रूपावर जाऊ नये. नारळाची कवटी वरवर खडबडीत असली तरी आतील वस्तुमुळे चांगलीच मानतो ना आपण ती ? २ स्त्री, पुत्र, दासदासी यांचा त्याग करायला नको; कारण त्याच्यामुळेच नारायणाचे स्मरण होते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, रत्न हे प्रमुख होय; पण ते एखाद्या साध्या चिंधीत[1] बांधले असले म्हणून काय झाले ? तेवढ्यापुरते चिंधीचेही उपकार मानायला हवेतच. ४

१ परी आधार चिंधीचा.

२४५ सताचे गुण दोष आणिता या मना । केलिया उगाणा सुकृताचा ॥ १ ॥
पिळोनियां पाहे पुष्पाचा परिमळ । चिरोनि केळी केळ गाढव तो ॥ २ ॥
तुका म्हणे गगे अग्नीसि विटाळ । लावी तो चाडाळ दु:ख पावे ॥ ३ ॥

**शब्दार्थ व टीपा** – उगाणा–शेवटचा हिशेब, नाश, सुकृताचा–पुण्याईचा, परिमल–सुवास

**अर्थ** –सताच्या गुणदोषांची चर्चा मनात आणू नये तो आली की केलेल्या सर्व पुण्याईचा नाश होतो १ फूल पिळून का कधी त्याचा वास येईल? केळीचे झाड चिरून का कधी केळ्याचा घड मिळेल? असा उद्योग गाढवपणाचाच मानायला हवा २ त्याचप्रमाणे गगा किंवा अग्नी हे इतराना शुद्ध करतात, त्यानाच विटाळाचा दोष लावतो तो शुद्ध चाडाळ असून तो दु:ख पावेल यात शका नाही ३

२४६ चुबळीचा करी चुबळीशीं सग । अगीं वसे रग क्रियाहीन ॥ १ ॥
बीजा ऐसें फळ दावी परिपाकीं । परिमळ लौकिकीं जाती ऐसा ॥ २ ॥
माकडाच्या गळा रत्न कुळागना । साडूनिया सुना बिदी धुडी ॥ ३ ॥
तुका म्हणे ऐसा व्याली ते गाढवी । फजिती ते व्हावी आहे पुढें ॥ ४ ॥

**शब्दार्थ व टीपा** – चुबळीचा–वाईट वर्तनाचा पुरुष चुबळीशी–डोक्यावर ओझे ठेवण्याच्या आधी खाली गवताची किंवा कपड्याची जी गुडाळी ठेवतात तिच्याशी क्रियाहीन–रसहीन, परिपाक–परिणाम, कुलागना–कुलीन स्त्री, सुना–कुने, बिदी–गल्ली

**अर्थ** – वाईट वर्तनाचा पुरुष चुबळीशी सग करू लागला तर ती क्रिया रग व रस याच्याशिवायच होणार १ जसे बीज असेल तसाच सुवास किंवा रग परिणामी फुलात येणार बीजाची जातच फुलात वा फळात उमटणार २ माकडाच्या गळ्यात रत्न बाधून त्याचा त्याला काय उपयोग? त्याचप्रमाणे घरची कुलस्त्री सोडून कुत्र्याप्रमाणे गावातील गल्ल्या शोधायला जातो त्याला काय म्हणावे? ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा मुलाला जन्म देणारी स्त्री गाढवीच म्हटली पाहिजे त्याची फजिती अजून पुढेच आहे ४

२४७ सापडला सदीं । मग बळिया पडे वदीं[1] ॥ १ ॥
ऐसी कोणी वाहे वेळ । हातीं काळाच्या सकळ ॥ २ ॥
दाता मागे दान । जाय याचका शरण ॥ ३ ॥
तुका म्हणे नेणा । काय सागो नारायणा ॥ ४ ॥

**शब्दार्थ व टीपा** – सदीं–अडचणीत सादीकोपऱ्यात बळिया–बलवान मनुष्य

**अर्थ** –एखाद्या अडचणीत सापडला की मग त्या बलवान माणसासही बदात म्हणजे गोत्यात यावे लागते १ अशी वेळ नक्की कधीतरी येणार आहे की ज्यावेळी आपण सर्व काळाच्या हाती सापडू २ असाही प्रसग येतो की जो दाता म्हणजे नेहमीच देणारा असतो त्याच्यावर दुसऱ्यास शरण जाऊन मागायचा प्रसग येतो ३ तुकाराम महाराज म्हणतात, नारायणा, तुम्हाला काय सागायचे? तुम्हाला काय समजत नाही? ४

२४८ सर्प विंचू दिसे । धन अभाग्या कोळसे ॥ १ ॥
आला डोळ्यासि कवळ । तेणे मळले उजळ ॥ २ ॥
अगाचे भोवडीं । भोय झाड फिरती धोंडी ॥ ३ ॥
तुका म्हणे नाड । पाप ठाके हिता आड ॥ ४ ॥

**शब्दार्थ व टीपा** – अभाग्या–दुर्दैवी माणसास, कवळ–कावीळ भोय–भूमी, नाड–आड

१ फदी

अर्थ – दुर्दैवी मनुष्य असला की मग त्याला धन हे धन न दिसता साप, विंचू व फोडसेच दिसतात १ डोळ्याना एकदा काविळीचा रोग झाला की मग त्यास जे उजळ म्हणजे चागले आहे तेही मलीन किंवा पिवळसर दिसू लागते २ शरीराला एकदा घेरी आली, भोवळ आली की मग जमीन, झाडे, धोंडे सर्व काही फिरत आहे असे दिसू लागते ३ तुकाराम महाराज म्हणतात, आपले पापकृत्य हे असे आपल्या हिताच्या आड येऊन उभे राहते ४

२४९ न देखोन काही । म्या पाहिले सकळ ही ॥ १ ॥
जालो अवघियापरी । मी हे माझें ठेले दुरी ॥ २ ॥
न घेता घेतले । हाते पायें उसतिले ॥ ३ ॥
खादले न खाता । रसना रस जाली घेता ॥ ४ ॥
न बोलोनि बोले । केले प्रगट झाकिले ॥ ५ ॥
नाइकिले कानीं । तुका म्हणे आले मनी ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – उसतिले–शेवटास नेले, घेतले

अर्थ :– न पाहताच मी सर्व काही पाहिले १ मी व माझे हा दुजाभाव दूर ठेवून मी असल्यामुळे मी इतर सर्व जगाशी एकरूप झालो आहे २ मी स्वत हातानी काही घेतले नसले तरी सर्व काही घेतल्यासारखेच आहे ३ न खाताच मी सर्व काही खाल्ले आहे, जिभेने सर्वांची चव घेतलेली आहे ४ मी न बोलताच बोलत असतो, व त्यामुळे जे गुप्त असते, रहस्यमय असते ते प्रकट होते ५ मी कानानी काहीच ऐकिले नसले तरी पण माझ्या मनावर सर्व-काही नीटपणे ठसले आहे ६

विवरण –या एका सुदर व अर्थपूर्ण अभगात तुकारामबुवानी ऐक्यानुभूतीचे वर्णन मोठ्या बहारदार पद्धतीने केले आहे न करून सर्व केल्याची अनुभूती त्यानी येथे वर्णन केली आहे काही न पाहताच सर्व पाहिले आहे न घेताच सव काही घेतले आहे, न खाताच सर्व खाल्ले आहे, न बोलताच प्रकट केले आहे, न ऐकताच सर्व मनात साठविले आहे याचा अर्थच असा की एकदा मीपणाची भावना सपली की मी मी कुणी एक करणारा हे उरत नाही सर्व काही त्याच्याकडूनच होत राहत मग सर्व समजत सर्वांचे आकलन होते पण ते मी केले आहे, मी पाहिले आहे, मी ऐकले आहे, मी बोलला आहे अशी जाणीव नसल्यामळे हे सव न करूनच घडत असते कर्म करून भक्त अकर्ता असतो. सर्व कर्मात तो वतत असूनही तो नैष्कर्म्यता आचरीत असतो नावेतून जाताना आपणास नदीकाठचे वृक्ष *हालताना, चालताना दिसतात, किंवा सूर्याच्या उदयास्तामुळे तो चालत नसूनही चालल्यासारखा वाटतो त्याप्रमाणेच* या श्रेष्ठ भक्ताचे नैष्कर्म्यत्व कर्मातच असते त कर्मे करीत असताना दिसतात, पण त्याचे ते नैष्कर्म्यत्वच असत त्याचे बोलणे न बोलण्यासारखे, त्याचे खाणे न खाण्यासारखे, त्याचे पाहणे न पाहण्यासारखेच असते ज्ञानदेवानी या अवस्थेचे वणन फार समर्पक शब्दात केले आहे

" तो दिठीं जें पाहे । ते आपणचि होऊनि जाये । आइके तें आहे । तोचि जाहला ॥ चरणीं हन चाले । मुखें जें जें बोले । ऐसे चेष्टाजात तेतुलें । आपणचि जो ॥ हे असो विश्व पाहीं । जयासि आपणपेंवाचूनि नाहीं । आता कवण तें कर्म कायी । बाधी तयाते " ॥

अशी त्याची अवस्था असल्यामुळे तो ' सकर्मचि कर्मरहित ' असतो, 'सगुणपरी गुणातीत' असतो काही न करताच त्याचे सर्व काही होत असते, व सर्व काही करूनही काही न केल्यासारखी त्याची अवस्था असत

# ब्रह्मचारी फिर्याद गेला–अभंग– २

२५० कावे कडासन आड पडे । खडबड खडबडे हुसकले ॥ १ ॥
दादकरा दादकरा । फजितखोरा लाज नाहीं ॥ २ ॥

अवघा जाला राम राम । कोणी कर्म आचरे ना ॥ ३ ॥
हरिदासांच्या पडती पायां । म्हणती तयां नागवावें ॥ ४ ॥
दोन्ही ठायीं फजीत जालें । पारणे केलें अवकळा ॥ ५ ॥
तुका म्हणे नाश केला । विटंबिला वेश जिहीं ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – कडासन–हरणाच्या कातड्याचे आसन.

अर्थः– एका ब्रह्मचाऱ्याचा निषेध करताना बुवांनी म्हटले आहे; एका ब्रह्मचाऱ्याच्या काखेत हरणाच्या कातड्याचे आसन होते ते घालताना पडले व त्याचा खडबड खडबड असा आवाज झाला १ असा हा फजितखोर व निर्लज्ज येथे आला आहे याची काही वाद लावा ना. २ हा म्हणतो सर्वत्र राम राम म्हणून उच्चार केला जातो पण त्याप्रमाणे कर्म कुणीच आचरीत नाही. ३ जे कोणी हरिदासाच्या पाया पडतील त्याना लुटावे असे हा म्हणतो. ४ ज्यांची या ब्रह्मचाऱ्याप्रमाणे समजूत आहे त्यांची दोन्हीकडे फजिती होईल. त्याला धड नाममस्तीही साधणार नाही, की त्यास कर्म करणेही समजणार नाही. त्याने ससार व परमार्थ याची फजितीच केली आहे. त्याचा शेवट अशाच अवकळेने, नाशाच्या अवस्थेने होणार ५ तुकाराम महाराज म्हणतात, अशा वरवरच्या वेशामुळे देह विटंबिला जातो व सर्व परमार्थाचा नाश होतो. ६

२५१ कुटुंबाचा केला त्याग । नाही राग जंव गेला ॥ १ ॥
भजन तें वोंगळवाणें । नरका जाणे चुके ना ॥ २ ॥
अक्षराची केली आटी । जरी पोटीं संतनिंदा ॥ ३ ॥
तुका म्हणे मागें पाय । तया जाय स्छळासि ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा.– अक्षराची–वेदविद्येची, आटी–मेहनत, स्छळासी–नरकात

अर्थः– मनातील रागलोभादी विकार गेले नाहीत तोपर्यंत कुटुंबाचा त्याग केला तरी व्यर्थ आहे तो. १ बाह्य वेष धारण करून नुसते भजन केले तर ते ओंगळ दिसते व ते करणारा नरकास गेल्याशिवाय राहात नाही २ वेदविद्या पाठ करण्याची मेहनत केली, पण पोटात संतनिंदा आहे तर त्याचा काहीही उपयोग नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, त्याने जरा मागे वळून पाहिल्यास आपण नरकात जात आहोत असे त्याला दिसेल. ४

२५२ तारतिम वरी तोंडाच पुरते । अंतरा हे येते अंतरीचें ॥ १ ॥
ऐसी काय वरी दिसे ठकाठकी । दिसतें लौकिकी सत्या ऐसे ॥ २ ॥
भोजनांत द्यावें विष कालवूनि । मोहचाळवणी मारावया ॥ ३ ॥
तुका म्हणे मंद देखो नेदी कुडें । आदरेंचि पुढें सोंग दावी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा.– तारतिम–तारतम्याचे बोलणे, मंद–कपटी, कुडें–खोटे

अर्थ:– या माणसाच्या तोंडी दिसणारे तारतम्याचे शब्द तोंडापुरतेच आहेत पण याच्या मनात कपट आहे ते स्वच्छ दिसते. १ व्यवहारात सत्याप्रमाणे वाटणारी ही फसवाफसवी काय चागली दिसते का कधी ? २ एखाद्यास भोजनास बोलवावे व अन्नात विष कालवून त्यास मोह दाखवून मारावे तसाच हा प्रकार नव्हे का ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, हा कपटी मनुष्य आदरसत्काराचे सोंग पुढे पुढे दाखवून आपल्या मनातील खोटे दिसू न देण्याचा प्रयत्न करीत असतो ४

२५३ ब्रह्मनिष्ठ काडी । जरी जीवानावें मोडी ॥ १ ॥
तया घडली गुरुहत्या । गेला उपदेश तो मिथ्या ॥ २ ॥
सांगितले कानीं । रूप आपुलें वाखाणी ॥ ३ ॥

भूतांच्या मत्सरें । ब्रह्मज्ञान नेले चोरे ॥ ४ ॥
शिकल्या सांगे गोष्टी । भेद क्रोध वाहे पोटीं ॥ ५ ॥
निंदा स्तुति स्तवनीं । तुका म्हणे वेची वाणी ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – मिथ्या–खोटा

अर्थः– जो खऱ्या अर्थाने ब्रह्मनिष्ठ झाला आहे तो गवताच्या काडीसही सजीव मानतो. तो काडी जरी तो मोडून टाकील १ तरी त्याच्या हातून गुरुहत्या घडली असेच समजावे त्याचा सर्व उपदेश खोटा आहे असेच मानणे भाग आहे २ त्याच्या कानी जो गुरुपदेश सांगितला गेला तो व्यर्थच झाला, कारण तो आपलेच रूप बाह्याकाराने वर्णन करीत असतो, ३ त्याने सर्व प्राणिमात्राचा मत्सर केला असल्याने त्याचे सारे ब्रह्मज्ञान चोरांनी लुटून नेल्यासारखेच असते ४ गुरूने शिकविलेल्या गोष्टी तो वरवर सांगत असतो, पण त्याच्या पोटात मात्र भेदाच्या, क्रोधाच्याच गोष्टी असतात ५ तुकाराम महाराज म्हणतात, त्याने केलेली स्तुती, किंवा निंदा म्हणजे त्याच्या वाणीचा व्यर्थ अपव्ययच होय ६

२५४ इहलोकींचा हा देहे । देव इच्छिताती पाहे ॥ १ ॥
धन्य आम्ही जन्मा आलो । दास विठोबाचे जालो ॥ २ ॥
आयुष्याच्या या साधने । सच्चिदानंद पदवी घेणे ॥ ३ ॥
तुका म्हणे पाठवणी । करूं स्वर्गाची निशाणी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – देहे–देह, शरीर

अर्थ – या लोकी माणसास हा जो देह मिळाला आहे त्याची इच्छा प्रत्यक्ष देवसुद्धा करतात १ आम्ही मात्र धन्य झालो, कारण आम्ही या विठ्ठलाचे दास झालो आहोत २ आयुष्यात आम्हास हे एक साधन मिळाले म्हणूनच आम्ही ही सच्चिदानंदाची पदवी धारण करू शकतो ३ तुकाराम महाराज म्हणतात, या नरजन्माच्या व या देहाच्याच पाठवणीवर स्वर्गाची निशाणी रोवता येते स्वर्गसुखास मागे टाकून सच्चिदानंदपणाकडे जाणे सुलभ होते ४

विवरण – मानवी देहाचे व जन्माचे वर्णन साधुसंतांनी विविध प्रकारांनी केले आहे या देहाच्याच साह्याने सर्व काही साधावयाचे आहे, असे असले तरी देह म्हणजेच काही सर्वस्व नव्हे केवळ देहाचेच लाड सुरू झाले की मग देहदेवालयात राहणाऱ्यांना विसर पडतो मग देहाचेच कोडकौतुक मोठ्या प्रमाणावर सुरू होते म्हणून संतांनी मानवी देहाची विटंबना विस्ताराने वर्णन केलेली आहे मानवी देह व नरजन्म याची ही निंदा सावधपणे समजावून घ्यावयास हवी 'जन्म दु खाचा अंकुर' असेच वर्णन संत कधी कधी मानवी जन्माचे करतात शरीर हे दु खाचे मूळ, 'अत्यंत दोष ज्या विटाळा । त्या विटाळाचाचि पुतळा' म्हणजे हा देह असेच वर्णन या मानवी देहाचे केले जाते 'नरकाचे कोठार भरलें । आंत बाहेरी लिडिबिडीलें' असे हे शरीर ज्ञानेश्वरांनीही या मानवाच्या देहाचे असेच भयानक वर्णन केले आहे ते एवढ्याचसाठी की माणसाने केवळ या देहाच्याच प्रीतीत सापडू नये 'गवताची कुसळे वाऱ्याने साऱ्या माळावर पसरतात, तशा माणसाच्या दाढा उपटून पडतील आषाढाच्या पावसाने डोंगराची शिखरे नद्यानाल्यांच्या रूपाने वाहतात, तशी तोंडाच्या खिडीतून लाळ पाझरू लागेल गवताच्या भुजगावण्याप्रमाणे देह मागेपुढे झुकांड्या खाईल पाय लटपटतील, हाताची कडबोळी होतील ' हे ज्ञानदेवकृत वर्णन एवढ्यासाठीच ध्यानात ठेवायचे की नुसता देह हे सर्वस्व नाही

अशी एकदा मनाची निश्चिती झाली की मग मात्र मनुष्यजन्म व नरदेह याचा योग्य उपयोग ध्यानात येईल मग स्वर्गीचे देवही मानवी देह मिळावा अशी का इच्छा करतात ते लक्षात येईल. कारण याच देहाच्या साह्याने सच्चिदानंदाचे रूप जाणायचे असते 'देहीं देव आहे बोलती हे वेद । परि वासनेचे भेद न दवडिती' असे निवृत्तिनाथांनी म्हटले आहे शरीरच ब्रह्मरूप करून सोडावे, असा संतांचा उपदेश आहे यासाठीच 'देह हा सादर पहावा निश्चित' म्हणून तुकोबांनीही म्हटले आहे

२५५ पंडित वाचक जरी जाला पुरता । तरी कृष्णकथा ऐके भावें ॥ १ ॥
क्षीर तुपा साकरे जालिया भेटी । तैसी पडे मिठी गोडपणें ॥ २ ॥
जाणोनियां लाभ घेईं हा पदरीं । गोड गोडावरी सेवीं बापा ॥ ३ ॥
जाणिवेचें मूळ उपडोनी खोड । जरी तुज चाड आहे तुझी ॥ ४ ॥
नाना परिमळद्रव्य उपचार । अंगी उटी सार चंदनाची ॥ ५ ॥
जेविलियाविण शून्य ते शृंगार । तैसी गोडी हरिकथेविण ॥ ६ ॥
ज्याकारणें वेदश्रुति ही पुराणें । तेंचि विठ्ठलनाणें तिष्ठे कथे ॥ ७ ॥
तुका म्हणे येर दगडाचीं पेंवें । खळखळ आघवें मूळ तेथें ॥ ८ ॥

शब्दार्थ व टीपा:– जाणिवेची–अहपणाची , उपडोनी–खुडून.

अर्थ:– मनुष्य जरी मोठा वाचक व पंडित झाला तरी त्याला भक्तीने कृष्णकथा ऐकावीच लागते. १ याचे हे करणे म्हणजे दूध, तूप, साखर याच्या भेटीमधील गोडीप्रमाणेच होय. २ हे समजून तू ज्ञानाचा व भक्तीचा हा लाभ पदरात घे. गोडावर गोड पदार्थांचे सेवन कर ३ तुला जर कांहीं चाड असेल तर तू अहंमन्यतेची जाणीव खुडून टाक. ४ नानाप्रकारची सुवासिक द्रव्ये जरी अंगाला लावली किंवा चंदनाची उटी प्रामुख्याने अंगाला फासली तरी ती हरिकथेशिवाय व्यर्थच मानावी लागेल ५ वरवरचा शृंगार जरी झाला असला तरी जेवणाने पोट भरल्याशिवाय जसे व्यर्थ, तसेच हरिकथेशिवाय सर्व फुकट आहे. ६ ज्याच्या नावाने ही सर्व पुराणे खरी आहेत, श्रुती म्हणजे वेद खरे आहेत तेच विठ्ठलरूपी नाणे कथाकीर्तनात स्थिर उभे असते. ७ तुकाराम महाराज म्हणतात, इतर सर्व मग नुसती दगडाचीच पेवे असतात. नुसतीच खळखळ वरवरची तेथें असते. पण सर्व मूळ एका त्या विठ्ठलात असते. ८

२५६ आणिकांच्या कापिती माना । निष्ठुरपणा पार नाहीं ॥ १ ॥
करिती बेटे उसणवारी । यमपुरी भोगावया ॥ २ ॥
सेंदराचें दैवत केलें । नवस बोले तयासि ॥ ३ ॥
तुका म्हणे नाचति पोरें । खोडितां येरें अंग दुखे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:– पार–सीमा, खोडिता–दोष दाखविल्यास

अर्थ:– काही दुष्ट लोक इतराच्या माना कापतात. त्याच्या निष्ठुरपणास सीमाच असत नाही. १ हे दुष्ट लोक नरकवास भोगण्यासाठीच जणु ही उसनवारी करीत असतात असे वाटते २ शेंदूर फासून दगडाचा देव बनवितात व त्याला ही माणसे नवस बोलतात. ३ तुकाराम महाराज म्हणतात, ही माणसे उगाच देवाच्या नावानें नाचतात; याचा दोष दाखविण्याचा प्रयत्न केल्यास त्याना पटत नाही. यांचे अंग दुखल्याइतके दु:ख याना होते. ४

२५७ गंधर्व अग्नि सोम भोगिती कुमारी । कोठें चराचरीं त्याग केला ॥ १ ॥
गायत्री स्वमुखें भक्षीतसे मळ । मिळाल्या वाहाळ गंगाओघ ॥ २ ॥
कागाचिये विष्ठें जन्म पिंपळासि । पांडवकुळासि पाहातां दोष ॥ ३ ॥
शकुंतळा सूत कर्ण शृंगी व्यास । यांच्या नामें नाश पातकांसि ॥ ४ ॥
गणिका अजामेळ कुब्जा तो विदुर । पाहातां विचार पिंगळेचा ॥ ५ ॥
वाल्हा विश्वामित्र वसिष्ठ नारद । यांचें पूर्व शुद्ध काय आहे ॥ ६ ॥
न व्हावी तीं जालीं कर्में नरनारी । अनुतापें हरी स्मरतां मुक्त ॥ ७ ॥
तुका म्हणे पूर्व नाठवी श्रीहरी । मूळ जो उच्चारी नरक त्यासि ॥ ८ ॥

**शब्दार्थ व टीपा :–** गंधर्व–देवाचा गवई, सोम–चंद्र, गायत्री–गाय, मळ–विष्ठा, कागाचिये–कावळ्याच्या, शकुंतला–विश्वामित्रमेनका यांची मुलगी, सूत–हीन जातीचा, कर्ण–कुंतीस सूर्यापासून झालेला मुलगा, शृंगी–विभांडक ऋषीस दासीपासून झालेला मुलगा, व्यास–पराशर-सत्यवतीपुत्र, गणिका–वेश्या पिंगला, अजामेळ–कान्यकुब्ज देशातील एक दुराचारी ब्राह्मण, कुब्जा–कंसाची अष्टवक्रा दासी, विदुर–व्यास व दासी यांचा पुत्र, वाल्हा–वाल्या कोळी, विश्वामित्र–एक ऋषी, वसिष्ठ–एक ऋषी, नारद–दासीपुत्र, अनुतापें–पश्चात्तापाने, नाठवी–आठवत नाही.

**अर्थ :–** कुमारीचे पुरुषाशी लग्न व्हावयाच्या आधी गंधर्व, अग्नी, सोम यांच्याशी तिचा विवाह झालेला असतो असे शास्त्र सांगते; म्हणून ती भ्रष्ट झाली असे समजून या जगात कुणी तरी तिचा त्याग केला आहे काय? १ पवित्र गाय स्वतःच्या मुखाने नाना प्रकारची विष्ठा खाते म्हणून का ती अपवित्र मानायची? गंगेच्या ओघात गावातील घाणेरड्या पाण्याचे ओहोळ मिळतात म्हणून का ती अपवित्र मानायची? २ पिंपळ फार पवित्र मानला जातो, पण त्याचा जन्म कावळ्याच्या विष्ठेत असतो मग तो का कधी अपवित्र मानला जातो? आणि पांडव केवढे थोर! पण त्यांचे जन्मवृत्त पाहू नये हेच खरे. ३ शकुंतला, कर्ण, शृंगी, व्यास, यांची नावे पातकाच्या राशी नष्ट करतात, पण यांचे जन्मवृत्त काही चांगले नाही ४ गणिका, पिंगला, अजामेळ, कुब्जा, विदुर, वाल्या कोळी, विश्वामित्र, वसिष्ठ, नारद यांची नावे फार थोर; पण यांचे पूर्वायुष्य काय चांगले आहे? ५-६ यांच्या हातून मागे जी नव्हती ती कर्मे झाली, पण श्रीहरिस्मरणाने पश्चात्ताप होताच ती मुक्त झाली. ७ तुकाराम महाराज म्हणतात, एकदा ईश्वराचे स्मरण झाले की मग तो श्रीहरी त्यांचे पूर्व कर्म आठवीत नाही. पूर्वचरित्राचा किंवा मूळाचा जो उच्चार करील तो नरकास जाईल. ८

**विवरण :–** श्रीविठ्ठलाची उपासना करणाऱ्या भागवत संप्रदायाने ईश्वरप्राप्तीचा मार्ग सर्वांना खुला केला. बुद्धीने, कुळाने, कर्माने, संपत्तीने, विद्वत्तेने श्रेष्ठ असतील तर त्यांची नावे ज्याच्या त्याच्या स्मरणात राहावी असा एकंदर जगाचा रिवाज. पण भागवत संप्रदायाने हे भेद दूर करून परमेश्वरी कृपेस कुणासही पात्र होता येईल अशी ग्वाही दिली. एखाद्याचा हीन कुळात जन्म झाला असेल, एखाद्याने पूर्वायुष्यात काही पापकर्म केले असेल तर त्याला कधी सुधारण्याला संधीच नाही की काय? दुराचारी लोकांची आयुष्ये अशीच बरबाद व्हायची की काय? भागवत संप्रदायाने या प्रश्नांना समर्पक अशी उत्तरे दिली आहेत.

या उत्तराचे मूळ अर्थातच भगवद्गीतेत आहे 'अपि चेत्सुदुराचारो भजते मामनन्यभाक् । साधुरेव स मन्तव्य सम्यग्व्यवसितो हि स.' या गीतेतील नवव्या अध्यायातील तिसाव्या श्लोकात भगवंतांनी 'दुराचारी मनुष्य जर मला भजत असेल तर तो साधूच मानावा' असा निर्णय दिला आहे. भगवद्भक्त दुराचारी असला तरी चालेल असा याचा अर्थ नाही तर पूर्वी कधी काळी आयुष्यात दुराचार घडला असेल व आता जर निश्चयाने परमेश्वराकडे त्याचे चित्त जडले असेल तर त्याचे पाप उरत नाही. ज्ञानेश्वरांनी या बाबतीत स्पष्टपणे सांगितले आहे, 'या लागीं दुष्कृति जर्‍ही जाहला। तरि अनुतापतीर्थीं न्हाला। न्हाऊनि मजआंतु आला। सर्वभावें ॥ तरि आतां पवित्र तयाचेंचि कुळ। आभिजात्य तेंचि निर्मळ। जन्मलेयाचें फळ। तयासीच जोडलें ॥'

पुढल्या बत्तीसाव्या श्लोकात आणखी स्पष्टीकरण देताना गीतेने म्हटले आहे, 'मां हि पार्थ व्यपाश्रित्य येऽपि स्यु पापयोनय । स्त्रियो वैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यान्ति परां गतिम् ।' माझा आश्रय करून स्त्रिया, वैश्य, शूद्र किंवा अत्यजादी पापयोनीतील लोकही परम गतीस पावतात असा भगवताचा आदेश आहे. गीतेतील ही सवलत पूर्वीच्या शास्त्रात नव्हती असे दिसते. स्त्रिया, शूद्र किंवा कलियुगातील नामधारी ब्राह्मण यांच्या कानी वेद पडत नसल्याने ते मूढ राहू नयेत म्हणून व्यासमुनींनी कृपाळू होऊन महाभारतातील गीता त्यांच्या कल्याणार्थ गायिली आहे असे स्पष्टीकरण भागवत पुराणात आले आहे. भागवत धर्माचे हे क्रांतिकारक पाऊल महत्त्वाचे मानावयास हवे. वेदादी कर्मे, मोक्षासाठी असणारे वेदोपनिषदांचे अध्ययन यांचा अधिकार पहिल्या तीन वर्णांनाच यापूर्वी होता. पण पुढे महाभारत, भगवद्गीता यानून ही अट वरीच शिथिल झाली. महाभारताच्या वनपर्वात ब्राह्मणव्याधसंवादात मांस विकणाऱ्या व्याधाने ब्राह्मणास आणि शांतिपर्वात तुलाधाराने म्हणजे वैश्याने जाजलि नावाच्या ब्राह्मण तपस्व्यास असाच उपदेश केलेला आहे.

भगवद्गीतेच्या या ग्वाहीमुळे भागवत संप्रदायात एक प्रकारचे नवे चैतन्य निर्माण होऊन सर्व समाजास नवे स्फुरण चढले सर्व जातींना भगवद्भक्तीचा मार्ग खुला झाला पूर्वायुष्यात दुराचारी असणाऱ्यांना आत्मोद्धाराचा मार्ग खुला झाला हीन यातीयांच्या आशाआकांक्षा पल्लवित झाल्या ज्ञानेश्वरांनी या क्रांतिकारक विचाराचे वैभव वर्णन करताना मुक्त कंठाने लिहिले आहे

'अगा नावें घेतां वोखटीं । जे अघावेया अधमाचिये शेवटीं । तिये पापयोनीही किरीटी । जन्मले जे ॥ ते पापयोनि मूढ । मूर्ख जैसे का दगड । परि माझ्याठायीं दृढ । सर्वभावें ॥ ते पापयोनीही होतु का । ते श्रुता धितही न होतु का । परि मजसीं तुकिता तुका । तुटी नाहीं ॥ म्हणोनी कुळ जाती वर्ण । हे आघवेंचि गा अकारण । एथ अर्जुना माझेंपण । सार्थक एक ॥ तेंचि भलतेणें भावें । मन मज आतु येतें होआवें । आले तरी आघवें । मागील वावो ॥ जैसे तवचि वहाळ वोहळ । जव न पवती गंगाजळ । मग होऊनि ठाकती केवळ । गंगारूप ॥ तैसे क्षत्री वैश्य स्त्रिया । का शूद्र अंत्यज्यादि इया । जाति तवचि वेगळालिया । जव न पवती मातें ॥ आणि भलतिया जातीं जन्मावें । मग भजिजे का विरोधावें । परि भक्त का वैरिया व्हावें । माझियाची ॥ यालागीं पापयोनीही अर्जुना । का वैश्य शूद्र अंगना । मातें भजतां सदना । माझिया येती ॥'

ज्ञानेश्वरांच्या विचारसूत्राचाच अनुवाद पुढे साधुसंतांनी केला तुकारामबुवांनी अनेक अभंगांतून या विचारास पुष्टी दिली आहे 'ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र । चांडाळां आहे अधिकार । बाले नारीनर । आदिकरोनि वेश्याहि ॥ तुका म्हणे अनुभवें । आम्ही पाडियले ठावे । आणिकहि दैवें । सुख घेतो भाविकें' असे त्यांनी दुसऱ्या अभंगात म्हटले आहे ज्यांची याती हीन आहे अथवा ज्यांचे पूर्वाचरण दूषित आहे पण भक्तिप्रेमामुळे ईश्वरास सर्वस्व अर्पण केल्याने जे आदर्श होऊन गेले त्यांची नामावलीच बुवा कधीकधी आपल्यापुढे उभी करतात

या अभंगात प्रथम तुकोबांनी हिंदू कुमारी आधीच गंधर्व, अग्नी, चंद्र यांच्या द्वारे रूपकार्थाने का होईना पण भोगली गेलेली असते याचाच प्रथम उल्लेख केलेला आहे. सोमः प्रथमो विविदे गंधर्वो विविदे परः । तृतीय. पतिर-ग्निस्ते तुरियस्ते मनुष्यजः ' या कल्पनेप्रमाणे बुवांनी स्त्रीच्या गंधर्व, अग्नी, सोम यांच्या संबंधाचे वर्णन केलेले दिसते आपल्या शास्त्रामध्ये मुलगी आठ वर्षांची होईपर्यंत तिला दोन वर्षे गंधर्व, दोन वर्षे अग्नी, दोन वर्षे सूर्य व दोन वर्षे चंद्र भोगीत असल्याची कल्पना आहे.

पांडवकुळाची सर्वच हकीगत प्रसिद्ध आहे पांडू हा विचित्रवीर्याचा मुलगा महर्षी व्यासाच्यापासून विचित्र-वीर्यपत्नी अंबालिका हिच्या पोटी याचा जन्म झाला युधिष्ठिरादी याचे पुत्रही असेच निरनिराळ्या अंशापासून झाल्याची कथा आहे युधिष्ठिर हा पांडुपत्नी कुंतीस यमधर्मापासून झालेला मुलगा भीम हा वायुपुत्र, इंद्रमंत्राच्या प्रभावाने झालेला अर्जुन, इत्यादींच्या जन्मकथा महाभारतात सांगितलेल्या आहेत

शकुंतला ही विश्वामित्र व मेनका यांची मुलगी विश्वामित्र तप करीत असताना त्यांचा भंग करण्यासाठी मेनका येथे आली यांची ही कन्या नवजात अशा या बालिकेस तेथेच सोडून मेनका स्वर्गलोकी गेली व मुलीस शकुन पक्ष्यांनी सांभाळिले म्हणून ही शकुंतला पुढे हिचे पालन पोषण कण्वमुनींनी केले हीच राजा दुष्यन्त याची पत्नी होय कर्ण हा सूतपुत्र म्हणून शेवटपर्यंत उल्लेखिला गेला हा कुंतीस सूर्यापासून झालेला मुलगा जन्मतःच कुंतीने याला अश्वनदीत सोडून दिले पेटीतील या बालकाचे रूप चर्मण्वती नदीतून पुढे यमुना व भागीरथी नद्यात आले तेव्हा ते धृतराष्ट्राचा सारथी अधिरथ याने पाहिले त्याने व त्याची पत्नी राधा हिने या बालकाचे पालन केले देवाने दिलेला हा मुलगा म्हणून राधेने या कर्णाचे लाडपणे पोषण करून त्याचे नाव वसुषेण ठेविले राधेय म्हणूनही याचा उल्लेख होतो सूतपुत्र म्हणून याचा अपमान वारंवार होत असे परंतु याचे शौर्य व याचे दातृत्व याची कीर्ती आजही सांगितली जाते

शृंगी याचे पूर्ण नाव ऋष्यशृंग असून हा विभांडक ऋषींचा मुलगा. एकदा विभांडक गंगेवर स्नानास गेला असताना उर्वशी तेथे आलेली त्याला दिसली विभांडकाचे रेत पाण्यात पडले, ते शापदग्ध झालेल्या एका देवकन्येच्या पोटात गेले तिला जो मुलगा झाला तो हा शृंगी याचा आकार माणसासारखा पण यास डोक्यावर मृगासारखी शिंगे

होती. व्यास हा पराशर व सत्यवती याचा मुलगा. सत्यवती ही वसुराजाची कन्या. हिला कौमारदशेत पराशर ऋषीपासून कृष्णद्वैपायन नावाचा विख्यात मुलगा झाला. हाच प्रसिद्ध ग्रंथकर्ता भगवान व्यास होय.

गणिका म्हणजे वेश्या. हिचे नाव पिंगला असून ही अवंती नगरातील एक प्रसिद्ध गणिका होती मिथिला नगरीच्या वेश्येचे नावही पिंगला होते. परपुरुषाची मार्गप्रतीक्षा करताना मध्यरात्रीपर्यंतही कुणीही आले नाही तेव्हा तिला उपरती झाली व तिने ईश्वराकडे आपले चित्त वळविले अजामीळ हा कान्यकुब्ज देशातील एक ब्राम्हण एका वेश्येच्या नादी लागलेला होता. या वेश्येस याच्यापासून दहा मुलेही झाली. धाकट्या नारायण नावाच्या मुलावर याचा फार लोभ होता. अंतकाळी या मुलास त्याने हाक मारली ती ईश्वरास पोचली व त्यामुळे याचा उद्धार झाला अशी कथा आहे. शेवटी याची परमेश्वरावर भक्ती जडली कुब्जा ही अत्यंत कुरूप व आठ ठिकाणी वाकडी असणारी कंसदासी श्रीकृष्ण व बलराम हे मथुरेस आले तेव्हा कृष्णकृपेने ही सुरूप झाली वाल्मीकी पूर्वायुष्यांत प्रसिद्ध दरोडेखोर वाल्या कोळी या नावाने होते हे प्रसिद्ध आहेच हा खरे म्हणजे एक ब्रह्मर्षी सुमती नावाच्या एका ब्राह्मणाचा हा पुत्र लहानपणी किराताच्या सहवासात वाढल्यामुळे यास चोऱ्या करण्याची सवय लागली पुढे याने तपश्चर्या करून वाल्मीकी या नावाने आपले नाव वाढविले रामचरित्राची कथा यानीच छंदोबद्ध करून अमर केली आहे. वसिष्ठ– हाही एक प्रसिद्ध ऋषी असून हा मित्रावरुणाच्या रेताने कुंभात वा कमलात निर्माण झाला पण पुढे याची प्रसिद्ध तत्त्वज्ञ म्हणून कीर्ती वाढली नारद हा प्रसिद्ध ऋषी असून संगीतकीर्तनादी भक्तीचा प्रवर्तक मानला जातो पण हा पूर्वी एका ऋषीचा दासीपुत्र होता

२५८ सोनियाचें ताट क्षीरीनें भरिलें । भक्षावया दिलें श्वाना लागीं ॥ १ ॥
मुक्ताफळहार खरासि घातला । कस्तुरी सुकराला चोजविली ॥ २ ॥
वेदपरायण बधिरा सांगे ज्ञान । तयाची ते खुण काय जाणे ॥ ३ ॥
तुका म्हणे ज्याचें तोचि एक जाणे ॥ भक्तीचें महिमान साधु जाणे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा श्वान–कुत्रे, खर–गाढव, सूकर–डुक्कर, चोजविली–मारविली.

अर्थ :– सोन्याचे ताट खिरीने भरून ते कुत्र्यापुढे ठेविले तर त्याचा त्याला काय उपयोग ? त्याला त्याची काही चव नाही. १ गाढवाला मोत्यांचा हार घातला किंवा डुकराला कस्तुरीने माखले तर काही उपयोग आहे काय ? २ एखादा वेदपरायण पंडित बहिऱ्या माणसास ज्ञान सांगू लागला तर काय उपयोग ? त्याचे ज्ञान त्यास समजणारच नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, ज्याला ज्या विषयाचे महत्त्व तोच विषय त्याला रुचणार, समजणार. भक्तीचे माहात्म्य साधुसंतच समजतील इतराना त्याची काय किंमत ? ४

२५९ ऐसा हा लौकिक कदा राखवेना । पतितपावना देवराया ॥ १ ॥
संसार करितां म्हणती हा दोषी । टाकितां आळसी पोटपोसा ॥ २ ॥
आचार करितां म्हणती हा पसारा । न करितां नरा निंदिताती ॥ ३ ॥
संतसंग करितां म्हणती हा उपदेशी । येरा अभाग्यासि ज्ञान नाहीं ॥ ४ ॥
धन नाहीं त्यासि ठायींचा करंटा । समर्थासि ताठा लाविताती ॥ ५ ॥
बहु बोलो जातां म्हणति हा वाचाळ । न बोलों सकळ म्हणती गर्वा ॥ ६ ॥
भेटीसि न वजातां म्हणती हा निष्ठूर । येतां जातां घर बुडविलें ॥ ७ ॥
लग्न करूं जातां म्हणती हा मातला । न करितां जाला नपुंसक ॥ ८ ॥
निपुत्रिका म्हणती पहा हो चांडाळ । पातकाचें मूळ पोरवडा ॥ ९ ॥
लोक जैसा ओक धरितां धरवे ना । अभक्ता जिरे ना संतसंग ॥ १० ॥
तुका म्हणे आतां ऐकावें वचन । त्यजुनियां जन भक्ति करा ॥ ११ ॥

शब्दार्थ व टीपा :—पोटपोसा—कसेबसे पोट भरणारा, वाचाल—बडबड्या, न वजातां—न गेले तर.

अर्थ - लोक कसे नेहमी दोन्ही बाजूंनी बोलत असतात याचे फार समर्पक वर्णन करताना तुकोबा म्हणत आहेत, हा बाह्य लौकिक नीट राखावयाचा म्हटले तर तो कधीच साधता येणार नाही. पतितपावना देवा, लौकिक राखणें अवघड काम आहे. १ कारण पाहा की; संसार सोडून द्यावा तर म्हणतात हा आळशी आहे. कसे तरी पोट भरण्याची ऐपत नाही याला. २ काही वेदविहित असे आचार करावेत तर लोक म्हणणार काय कर्मकांडाचा पसारा मांडला आहे; बरे, काहीच आचारधर्म पाळिला नाही तरीही निंदा करतात. ३ साधुसंतांची संगत धरावी तर म्हणतात हा लागला आता लोकांना ब्रह्मज्ञानाचा उपदेश करायला; तसे न केले तर म्हणतात हा मतिमंदच, याला कुठली बुद्धी येणार? या अभाग्याला दान होणारच नाही. ४ जवळ धन नसले तर लोक हा मूळचाच करंटा असे म्हणतील, बरे धनवान झाला तर फार धनमत्त झाला असे जिथे तिथे बोलतील. ५ फार बोलली तर म्हणतील हा फारच बडबड्या दिसतो; बरे अजिबात न बोलावे तर हा महंमन्य, गर्विष्ठ आहे असे लोक म्हणतील ६ कुणाच्या भेटीस जर गेलो नाही तर म्हणतील हा मनाचा फारच निष्ठुर आहे; आणि भेटीस जाऊ लागलो तर हे म्हणतील जातायेता खाऊनपिऊन याने आमचे घर बुडविले हो. ७ लग्न करावे तर हा फारच माजला हं असे म्हणतील. बरे न करावे तर हा कसले लग्न करणार? नपुसकच आहे असेही म्हणणार. ८ मुले बाळे झाली नाहीत तर म्हणतात हा निपुत्रिक चांडाळ आहे; आणि चार मुलेबाळे झाली तर म्हणतील काय हो पोरवडा! पातकाचे मूळच की. ९ येणारी ओसरी जशी थांबविता येत नाही तसे लोकांचे बोलणे थांबविता येत नाही. अभक्त असेल त्याला संतसंगदेखील जिरायचा नाही. १० म्हणून तुकाराम महाराज म्हणतात, एकच वचन ऐका, की या दुटप्पी बोलणाऱ्या सामान्य लोकांची संगत सोडा व भक्ती करायला लागा. ११

२६० धर्म रक्षावया साठीं । करणें आटी आम्हांसि ॥ १ ॥
वाचा बोलों वेदनीती । करूं संतीं केलें तें ॥ २ ॥
न बाणतां स्थिति अंगीं । कर्म त्यागी लंड तो ॥ ३ ॥
तुका म्हणे अधम त्यासी । भक्ति दूषी हरीची ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :— आटी—खटपट, श्रम, लंड—नास्तिक

अर्थः— आपल्या कार्याचे स्वरूप सागताना या प्रसिद्ध अभंगात बुवांनी सांगितले आहे, धर्माचे रक्षण करण्यासाठीच आम्हास अशा प्रकारचे परिश्रम करावे लागतात १ वेदानी सागितलेली नीती आम्ही आमच्या वाणीने लोकाना सांगू व संतानी जसे आचरण केले तसेच आम्हीही करू. २ अंगी आत्मस्थिती बाणली नसताना जो कर्म सोडून देतो तो एक नास्तिकच म्हणावा लागेल ३ तुकाराम महाराज म्हणतात, जो हरीच्या भक्तीला दूषण लावतो तो अधमच होय ४

२६१ चवदा भुवनें जयाचिये पोटीं । तोचि आम्हीं कंठीं साठविला ॥ १ ॥
काय एक उणें आमुचिये घरीं । वोळगती द्वारीं रिद्धिसिद्धी ॥ २ ॥
असुर जयानें घातले तोरडीं । तो आम्हांसि जोडी कर दोन्ही ॥ ३ ॥
रूप नाहीं रेखा जयासि आकार । आम्हीं तो साकार भक्तीं केला ॥ ४ ॥
अनंत ब्रह्मांडें जयाचिये अंगीं । समान तो मुंगी आम्हांसाठीं ॥ ५ ॥
रिद्धिसिद्धी सुखें हाणितल्या लाता । तेथें या प्राकृता कोण मानी ॥ ६ ॥
तुका म्हणे आम्ही देवाहूनि वळी । जालों हे निराळी ठेवुनि आशा ॥ ७ ॥

शब्दार्थ व टीपा — वोळगती—येतात, उपस्थित राहतात, तोरडीं—तुरुगात

अर्थः—ज्याच्या पोटात चौदा भुवने साठविली आहेत तोच श्रीहरी आम्ही आमच्या कंठात साठविलेला आहे. १ मग आमच्या घरी काय कमी आहे? आमच्या दारात रिद्धीसिद्धीसुद्धा झुलतात २ ज्याने मोठमोठे राक्षसही

बंदिवासात घातले तो आमच्या पुढे हात जोडून उभा आहे. ३ ज्याला रूप नाही, रेखाचा आधार नाही, तो परमेश्वर आम्ही भक्तीच्या साहयाने सगुण व साकार केला ४ ज्याच्या अंगात अनंत ब्रह्मांडेसुद्धा सामावतात तो आम्हासाठी मुंगीसारखाही होऊ शकतो ५ ज्याने रिद्धीसिद्धींना सुद्धा दूर केले आहे तो या प्राकृत व साध्या संसाराची चिंता कशाला करील ? ६ तुकाराम महाराज म्हणतात, आम्ही देवाहूनही बलवान आहोत कुठलीही आशा मनात न ठेवता आम्ही निराळेच झालो आहोत. ७

२६२ केला मातीचा पशुपति । परि मातीसि काय देव म्हणती ।
शिवपूजा शिवासी पावे । माती मातीमाजी समावे ॥ १ ॥
तैसे पूजिती आम्हां संत । पूजा घेतो भगवंत ।
आम्ही किंकर संतांचे दास । संतपदवी नको आम्हास ॥ २ ॥
केला पाषाणाचा विष्णु । परी पाषाण नव्हे विष्णु ।
विष्णुपूजा विष्णुसि अर्पे । पाषाण राहे पाषाणरूपें ॥ ३ ॥
केली कांशाची जगदंबा । परि कांसे नव्हे अंबा ।
पूजा अंबेची अंबेला घेणे । कांसे राहे कांसेपणे ॥ ४ ॥
ब्रह्मानंद पूर्णमाजी । तुका म्हणे केली कांजी ।
ज्याची पूजा त्याणेचि घेणे । आम्ही पाषाणरूप राहणे ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – किंकर–दास, कांशाची–कांसे धातूची, कांजी–पेज

अर्थ:– मातीचा पशुपती म्हणजे महादेव तयार करून त्याची पूजा केली, पण या मातीस का देवपण द्यायचे? ज्या शिवाच्या भावनेने पूजा केली होती त्या शिवास ती पोचली. माती मातीस मिळाली १ त्याचप्रमाणे काही लोक आमची पूजा करतात; पण आमचे महत्त्व नाही; पूजा घेणारा तो भगवंतच आहे–आम्ही केवळ संतांचे दास किंवा सेवक आहोत, आम्हास संतपदवी नको आहे. २ पाषाणाचा विष्णू केला तरी तो पाषाण काही विष्णू नव्हे, विष्णूची पूजा विष्णूला प्राप्त होते व पाषाण पाषाण रुपानेच राहातो ३ कांशाची देवी जगदंबा केली व तिची पूजा केली; पण तिच्यातील कांसे हे काही जगदंबास्वरूप नव्हे. अंबेची पूजा अंबेला मिळते, कांसे कांसेच राहते ४ तुकाराम महाराज म्हणतात, पूर्णब्रह्म असणाऱ्या ईश्वराच्या ठिकाणी माझी भक्ती ही कांजीच्या पेयाप्रमाणे आहे, या भावनेने पूजा झाल्यास ती त्याची त्यास म्हणजे परमेश्वरास पोचते व आम्ही मात्र पाषाण-रुपाने उरतो. ५

विवरण :– तुकाराम महाराज हे सगुणोपासक असल्याने त्यांना मूर्तिविषयी व तिच्या सौंदर्याविषयी अपार प्रेम असणे साहजिकच आहे निर्गुण, निराकार परमेश्वराची मनोमय पूजा करण्याचे काम फार क्लेशकारक असल्याने व अव्यक्ताची उपासना सर्वांना सहजसुलभ अशी नसल्याने सगुण उपासनेस व मूर्तिपूजेस महत्त्व मिळाले. परंतु या सगुणोपासनेवर व मूर्तिपूजेवर पूर्वीपासून आक्षेप होते निर्गुण, निराकार व अव्यक्त स्वरूपाची उपासना थोर असा आग्रह धरणाऱ्यांच्या मनाचे समाधान करण्याचा प्रयत्न तुकोबासारख्या साधुसंतांनी वारंवार केला आहे. मातीचा महादेव केला, पाषाणाचा विष्णू केला व त्यांनी पूजा केली तरी ती ईश्वरास मिळते त्या पूजनापाठीमागे एक भाव असेल तर पाषाण, माती, कांसे कशाचा का देव असे ना, त्याच्या मूर्तीच्या निमित्ताने ती पूजा शेवटी परमेश्वरासच प्राप्त होते या मूर्तीच्या वा प्रतिमाच्या रुपाने तो परमेश्वरच पूजा घेत असतो.

भक्तीचा पाचवा प्रकार म्हणून अर्चनभक्ती सांगितली आहे हे अर्चन सगुणाचेच होऊ शकते सगुणावर मन स्थिर करणे सोपेही असते भगवताच्या विभूती ज्या ज्या ठिकाणी आहेत ती ती स्थाने किंवा त्या त्या वस्तू प्रतिमारूपाने तयार झाल्या की त्यांचे पूजन सर्वसाधारण माणसास सुलभ होते सूक्ष्म व अव्यक्त अशा रुपाचा परिचय करून घेण्यासाठी आधी सगुण मूर्तीची आराधना उपयुक्त होण्यासारखी असते असाही एक विचार आहे.

अक्षराची ओळख होण्यासाठी प्रथम खडे माडून लहान मुलाना दाखवावे लागतात, त्यातलाच हा प्रकार काहीनी सागितला आहे **' ओनाम्याचे काळे, खडे माडियेले बाळें '** असे तुकोबानीही म्हटले आहे

परतु निर्गुण उपासनेपेक्षा सगुण उपासना कमी असाही त्याचा अर्थ नाही मूर्तीपूजा किंवा सगुणपूजा हे एक निर्गुणनिराकारप्राप्तीचे साधन अशीही भूमिका नाही खरे म्हणजे एक भाव असेल तर मूर्तीमध्येही ईश्वरी तत्त्वाचा अश का सापडू नये ? **' कासया पाषाण पूजिती पितळ '** असे म्हणून पाषाण व पितळ याची पूजा का करता असे तुकोबानी विचारिले आहे हे खरे असले तरी पुढे लागलीच **' अष्ट धातू खळ भावेविण । भावचि कारण भावचि कारण '** असेही बजावले आहे भाव असला तर प्रतीक कोणतेही चालेल आणि दुसरे असे की परमेश्वरतत्त्व सर्वत्र भरून आहे तर मग ते मूर्तीत अथवा प्रतीकात का नाही? **'अवघें ब्रह्मरूप रिता नाहीं ठाव। प्रतिमा तो देव कैसा नव्हे ?'** असा प्रश्न स्वत तुकाराममहाराजानीच विचारला आहे याचाच अर्थ असा की मनाची तीव्र भावना असेल तर कोणतेही प्रतीक चालेल तुकोबाच्यासमोर नाना शका घेऊन लोक बसलेले असावेत म्हणून कधी ते **' पाषाण नव्हे विष्णू '** असे सागतात, तर कधी **प्रतिमा तो देव कैसा नव्हे ?** असे विचारतात एक भक्तिभाव असेल तर परमेश्वराच्या पूजनास कोणतीही वस्तू चालल

२६३ ते माझे सोयरे सज्जन सागाती । पाय आठविती विठोबाचे ॥ १ ॥
येरा मानी विधि पाळणापुरते । देवाची तीं भूते म्हणोनिया ॥ २ ॥
सर्वभावे जालो वैष्णवाचा दास । करीन त्याच्या आस उच्छिष्टाची ॥ ३ ॥
तुका म्हणे जैसे मानती हरिदास । तैशी नाही आस आणिकाची ॥ ४ ॥

**शब्दार्थ व टीपा –** सागाती–सोबती, विधि पाळणापुरते–केवळ उपचारासाठी, मानती–प्रिय वाटतात

**अर्थ –** सताची महती वर्णन करताना तुकोबा म्हणतात, जे साधुसत विठ्ठलाचे पाय आठवतात ते माझे सोयरे व सोबती आहेत १ दुसऱ्या लोकाना केवळ ती देवाचीच रूपे आहेत म्हणून उपचारापुरते मी मानतो २ पण सर्व भावनानी युक्त होऊन मी दास मात्र विष्णुभक्ताचाच झालेलो आहे त्याच्या उष्ट्या घासाची इच्छा मी करीन ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी ज्याप्रमाणे हरीच्या दासाना मानतो, ते जसे मला प्रिय वाटतात, तसे दुसरे कोणीही आवडत नाहीत दुसऱ्याची आशा मला वाटत नाही ४

२६४ दया तिचे नाव भूताचे पाळण । अणीक निर्दळण कटकाचे ॥ १ ॥
धर्म नीतीचा तो ऐकुनी वेव्हार । निवडीले सार असार ते ॥ २ ॥
पाप त्याचे नाव न विचारिता नीत । भलतेचि उन्मत्त करी सदा ॥ ३ ॥
तुका म्हणे धर्म रक्षावया साठी । देवास ही आटी जन्म घेणे ॥ ४ ॥

**शब्दार्थ व टीपा –** भूताचे–प्राण्याचे निर्दळण–नाश कटक–दुष्ट लोक, नीत–नीती आटी–त्रास

**अर्थ –** दया तीच की जिच्यामुळे सर्व प्राणिमात्राचे पालनपोषण होते व दुष्ट लोकाचा नाश होतो १ धर्म व नीती या सबधीचा सव व्यवहार पाहून आम्ही हेच तात्पर्य काढलेले आहे २ त्याचे नाव पाप की ज्याच्या योगाने मनुष्य उन्मत्त होतो, त्याला नीतीची ओळख उरत नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, धर्माचे रक्षण करण्यासाठी प्रत्यक्ष देवालाही फार त्रास घ्यावा लागतो नाना जन्म घ्यावे लागतात ४

**विवरण –** तुकाराममहाराजांचा हा एक छोटा, सुटसुटीत, अर्थपूर्ण व सर्वप्रसिद्ध असा अभग असून यात दया म्हणजे काय याचा स्पष्ट उल्लेख केला आहे सर्व प्राणिमात्राचे पालन करण्यासाठी दुष्टाचा नाश करणे ओघानेच येते दया म्हणजे कटकाचे, दुष्ट लोकाचे निर्दळण व मग सज्जनाचे सरक्षण हा अर्थ येथे बुवानी निश्चयाने सागितला आहे आणि यास भगवद्गीतेचा सवप्रसिद्ध असा आधार आहेच धर्माची ग्लानी होऊन जेव्हा अधम फार माजतो तेव्हा मीच स्वत अवतार घेऊन साधूचे रक्षण करतो व दुष्टाचा नाश करतो असे चौथ्या अध्यायात भगवतानी

सांगितले आहे, '**यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत । अभ्युत्थानमधर्मस्य तदात्मानं सृजाम्यहम् ॥ परित्राणाय साधूनां विनाशायच दुष्कृताम् । धर्मसंस्थापनार्थाय सम्भवामि युगे युगे**' असा विश्वास श्रीकृष्णाने प्रकट केला आहे. सर्वत्र अधर्म माजला, दुष्टांचे प्राबल्य फार होऊन सज्जनांना त्रास होऊ लागला की, मग मी काय करतो? ज्ञानेश्वरांनी आणखी रहस्य प्रकट करताना म्हटले आहे, '**अधर्माचि अवधि तोडीं । दोषांची लिहिलीं फेडीं । सज्जनांकरवीं गुढी । सुखाची उभवीं ॥ दैत्यांचीं कुळें नाशीं । साधूंचा मानु गिवशीं । धर्मासीं नीतीशीं । शेंस भरी ॥ मी अविवेकाची काजळी । फेडूनि विवेकदीप उजळीं । तें योगियां पाहे दिवाळी । निरंतर ॥ .... ऐसे या काजालागीं । अवतरें मी युगींयुगीं ।**' स्वत च्या भक्तांचे रक्षण करण्याचा पतकरच जणु ईश्वराने घेतलेला असतो. '**तेवीं मी तयां । जैसे असती तैसिया । कळिकाळ नोकोनिया । घेतला पट्टा**' असे पुढे बाराव्या अध्यायात ज्ञानेश्वरांनी म्हटले आहे

सज्जनांचे हित व्हावे म्हणून दुर्जनाचा नाश करावा असे साधुसंत स्पष्टपणे अनेक ठिकाणी सांगतात '**दुर्जनाचा मान । सुखें करावा खंडण**', '**दुर्जनाची जाती । त्याचे तोंडीं पडो माती**' इत्यादी ओळीतून खळनिर्दळण किती आवश्यक आहे हेच तुकोबांनी सांगितले आहे. '**पापा झाला नारू**' या ओळीने सुरू होणाऱ्या एका अभंगात बुवांनी '**अधमासि तो अधम**' असाच उपदेश केलेला आहे

२६५ करावें गोमटें । बाळा माते तें उमटे ॥ १ ॥
आपुलिया जीवाहूनी । असे वाल्हें ते जननी ॥ २ ॥
वियोग तें तिस । त्याच्या उपचारें तें विष ॥ ३ ॥
हरणी चुकली पाडसा । धुंडाळी ती दाही दिशा ॥ ४ ॥
रानीं हिंडो गेली गाय । घरीं वत्स वाट पाहे ॥ ५ ॥
तुका म्हणे पायें । डोळा सुखावे ज्या न्यायें ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा:– उमटे–समजते, पटते, वाल्हें–प्रिय

अर्थ :– आपल्या लाडक्या मुलाला काही तरी रोज चांगले करावे असे आईस नेहमीच वाटत असते; पटत असते. १ आपल्या स्वत च्या जिवापेक्षा तिला आपले मूल अधिक प्रिय वाटत असते. २ तिच्या उपचारात जे सुख तिला वाटत असते ते त्याचा वियोग झाल्यावर संपते, म्हणून वियोग तिला विषाप्रमाणे वाटतो. ३ हरिणी आपल्या पाडसास चुकली की ती त्याचा शोध सैरावैरा धावून दाही दिशांना घेत असते. ४ गाय रानात चाऱ्यासाठी हिंडत असते, पण घरी गोठ्यात वासरू भुकेलेले आहे याची जाणीव तिला सतत असते. घरी वासरू वाट पाहात आहे याचा वेध तिला निरंतर असतो. ५ तुकाराम महाराज म्हणतात, पायास शीतोपचार केल्यावर जसे डोळ्यांना सुख होते तसे मुलाच्या सुखाने माता संतुष्ट होते. ६

२६६ कन्या सासुऱ्यासि जाये । मागें परतोनी पाहे ॥ १ ॥
तैसें जालें माझ्या जीवा । केव्हां भेटसी केशवा ॥ २ ॥
चुकलिया माये । बाळ हुरू हुरू पाहे ॥ ३ ॥
जीवना वेगळी मासोळी । तैसा तुका तळमळी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:– जीवन–पाणी, मासोळी–मासा.

अर्थ :– या एका सर्वप्रसिद्ध व गोड अभंगात आपण परमेश्वरासाठी कसे आतुर आहोत, कसे तळमळतो याचे फार सुबक व समर्थ असे वर्णन करताना बुवा म्हणतात, लग्न झाल्यावर लहान मुलगी सासरी निघताना, तिला माहेर व माहेरची माणसे सोडताना जसे दु ख होते, ती पुनः पुनः मागे घराकडे वळून पाहते. १ त्याचप्रमाणे देवा, माझ्या जिवाची अवस्था झाली आहे. देवा, मला कधी भेट देशील? २ आई चुकली किंवा दृष्टिआड झाली की लहान मूल

चुकल्यासारखे होऊन टकमक पाहात असते ना ? ३ किंवा पाण्याबाहेर काढलेला मासा कसा तडफड तडफड करून तळमळतो, तशी माझ्या जिवाची अवस्था झाली आहे मी एकसारखा तळमळत आहे देवा ४

विवरण – भक्त ईश्वरासाठी किती व्याकुळ होतो याचा हा एक नमुना म्हणून उत्कृष्ट अभंग आहे ईश्वराच्या मीलनातील सुख, अद्वैतातील, एकरूपातील सुख अद्वितीय तर आहेच, पण हे प्राप्त करण्यासाठी जी मनाची तगमग होते, जी व्याकुळलेली अवस्था होते, करुणेने हृदय जे भरून येते त्यास तुलना कुठली ? कित्येक वेळा भक्तास याच अवस्थेची गोडी अधिक लागते अद्वैताच्याच भूमिकेवर पण द्वैतावर येऊन मीतूपणाचा थोडा भेद कल्पून साधुसंतानी करुणेचे अनेक अभंग केले आहेत त्यांच्या हृदयाची आर्त हाक, त्यांची तळमळ, त्यांच्या जिवाची कासावीस अवस्था, त्यांची तडफड, त्यांची व्याकुळलेली अवस्था इत्यादींची मोठी हृदयभेदक पण ईश्वरी प्रेमाने भारावलेली अशी अभंग संपदा मराठीत अमोल अशी आहे ईश्वराला, विठ्ठलाला आई कल्पून मराठी संतानी जी करुणेने हाक मारली आहे तिच्यातून कित्येक अभंग स्फुरले आहेत ही केवळ एक साधकाची साधनरूप अवस्था असेही नाही, तर केवळ भक्तीसुखासाठीही साधुसंत असा पुकारा करीत असतात

*नामदेव आणि तुकाराम या दोन संतांनी तर या करुण वाणीच्या आर्त उद्गारांनी मराठी वाङ्मयास एक* तेजस्वी लेणेच चढविले आहे 'देशीपरदेशी झालो तुजविण, 'तुजविण आम्हा कोण हो पोशिता', 'मज का मोकलिले । कवणा निरविले ? ', धाव गा विठ्ठला, सोडवी आपुला दास', इत्यादी ओळींतून नामदेवांनी परमेश्वरापाशी, विठ्ठलापाशी करुणा भाकली आहे *'येग येग विठाबाई,' 'गंगा गेली सिंधूपाशी'*, 'तुजवाचूनि विठ्ठला । कोणी नाही रे मजला', ' पोट भरुनि व्यालासी । मज सांडुनी कोठे जासी ? ', ' का गा उशीर लाविला । माझा विसर पडला ', 'येरे येरे माझ्या रामा । मनमोहन मेघ श्यामा ' यासारख्या ओळींतून जनाबाईने आपली करुण व्यथा व्यक्त केलेली आहे तुकारामबुवांनीही इतरत्र, ' मायें मोकलिलें कोठें जावें बाळें ? ', 'येई गा विठ्ठला येई गा विठ्ठला । प्राण हा कुडला आळविता ', *' कोण आम्हा पुसे शिणले भागले ', ' तुजलागीं माझा जीव झाला पिसा , ' न लगे मायेसीं बाळ निरवावें '* इत्यादी ओळींतून आपल्या मनाची तळमळ समर्थपणे उभी केली आहे

२६७ हातीं होन दावी बेना । करिती लेकीच्या धारणा ॥ १ ॥
ऐसे धर्म जाले कळी । पुण्य रंक पाप बळी ॥ २ ॥
सांडिले आचार । द्विज चाहाड जाले चोर ॥ ३ ॥
टिळे लपविती पातडीं । लेती विजारा कातडी ॥ ४ ॥
बैसोनिया तक्ता । अन्नेंविण पिडिती लोकां ॥ ५ ॥
मुदबख लिहिणे । तेलतुपावरी जिणे ॥ ६ ॥
नीचाचे चाकर । चुकलिया खाती मार ॥ ७ ॥
राजा प्रजा पीडी । क्षेत्री दुश्चितासी तोडी ॥ ८ ॥
वैश्यशूद्रादिक । हे तो सहज नीच लोक ॥ ९ ॥
अवघे बाह्य रंग । आत हिरवे वरी सोंग ॥ १० ॥
तुका म्हणे देवा । काय निद्रा केली धावा ॥ ११ ॥

शब्दार्थ व टीपा – होन–नाणे, बेना–स्वतःची मुलगी, धारणा–भाव, कळीं–कलियुगात, रंक–गरीब, द्विज–ब्राह्मण, पातडीं–पचांगे, मुदबख–स्वयपाकगृहातील जमाखर्च.

अर्थ – समकालीन दुःस्थितीचे वर्णन करताना तुकोबा म्हणतात, लग्नाची झालेली मुलगी दुसऱ्यास देताना लोक तिच्याबद्दल हातात सुवर्णाची नाणी घेऊन तिचा भाव ठरवितात १ असे या कलीयुगात उलटे धर्म बनले आहेत पुण्यवान आहेत ते गरीब बनले असून पापी बलिष्ठ झाले आहेत २ सर्वांनी आपापले आचार सोडले

ब्राह्मणानी आपला धर्म सोडला आणि ते चहाडखोर व चोर बनले आहेत ३ आपले टिळे व पचाग लपवून, सोडून देऊन ते कातड्याची विजार घालू लागले आहेत ४ न्यायाच्या किंवा राजाच्या सिंहासनावर बसतात व अन्नाशिवाय प्रजेस पीडा देतात ५ स्वयपाकगृहात राहून साधा जमाखर्च लिहितात व तेलतुपाचा हिशेब करून कसे तरी जिणे जगतात ६ नीच मागसाचे चाकर होऊन चुकले की वरिष्ठाकडून वारवार मार खातात ७ राजे लोक प्रजेस पीडा फारच देतात जमीनदार गरिबाला फार तोडून बोलतात ८ ब्राह्मण क्षत्रियाची ही दशा, मग वैश्यशूद्राची काय वर्णन करावी ? ते सहजच आपणही नीच अवस्थेस गेले ९ आत-बाहेर सर्वत्र बाह्य रगाचा देखावा आहे, आतमात्र हिरवेकच्चेच आहेत सर्वजण १० तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तुम्ही झोपला आहात काय ? समाजाची काय ही अवस्था ! लौकर उद्धारासाठी धावून या ना ११

२६८ साळकृत कन्यादान । करिता पृथ्वीसमान[1] ॥ १ ॥
परि ते न कळे या मूढा । येइल कळो भोग पुढा ॥ २ ॥
आचरता कर्म । भरे पोट राहे धर्म ॥ ३ ॥
सत्या देव साहे । ऐसे कल्पनिया पाहे ॥ ४ ॥
अन्न मान धन । हे तो प्रारब्धा आधीन ॥ ५ ॥
तुका म्हणे सोस । दुःख[2] आता पुढें नास ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा –साळकृत–अलकारासहित, सोस–हव्यास, नास–नाश

अर्थ – अलकार वगैरे घालून मुलगीचे दान केले की ते कन्यादान पृथ्वीच्या दानाप्रमाणे होणार आहे १ पण ते या मूर्खास समजत नाही पुढे भोगावयास लागले म्हणजे कळेल मग सर्व २ ज्याचे त्याने आपले विहित धर्म केले की पोट भरून आनद होईल एवढा धर्म होतो ३ सत्याला देवाचे नेहमी साहाय्य असते सत्याने वागून तर पाहा ४ अन्न, मान, धन या गोष्टी आपल्या प्रारब्धाच्या आधीन आहेत ५ तुकाराम महाराज म्हणतात, पुढल्याहि गोष्टीचा हव्यास धरलास की पुढे खचित नाश आहे असे समजावे किंवा आता सुख वाटले तरी पुढे नाशच असतो ६

२६९ दिवट्या वाद्यें लावुनि खाणे । करूनि मडण दिली हातीं ॥ १ ॥
नवरा नेई नवरी घरा । पूजन वरा पाद्याचे ॥ २ ॥
गौरविली विहीण व्याही । घडिले काहीं ठेवू नका ॥ ३ ॥
करू द्यावे न्हावे वरें । ठायींचे का रे न कळेचि ॥ ४ ॥
व न्हाडियाचे लागे पाठीं । जैसी उटिका तेलीं ॥ ५ ॥
तुका म्हणे जोडिला थुका । पुढें नरका सामग्री ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – मडण–सुशोभा

अर्थ – लग्नाच्या वेळी घरात दिवे लावून, वाद्ये वाजवून, पक्वान्नाचे भोजन करून अलकारानी नटलेली नवरी मुलगी नवऱ्या मुलाच्या हातात देतात १ मग नवरा तिला थाटामाटाने घरी नेतो, नवऱ्याच्या पायाचे या वेळी पूजन वगैरे होते २ व्याह्याला व विहिणीला पोषाख वगैरे देऊन त्याचा गौरव केला जातो व जर काही कमी जास्त समारभात घडले असेल तर मनात ठेवू नका असे सागितले जाते ३ नवऱ्याचे न्हाणे वगैरे जे काही असेल ते सर्व यथासाग करू द्यावे, पण या सर्वांच्या मुळाशी असणारी समजुतीची गोष्ट लोकाना कशी कळत नाही ? ४ जशी तेलामध्ये उटिका जिरून जाते त्याप्रमाणे ही विहिण भाडखारपणे या वऱ्हाडियांच्या पाठीमागे

१ पृथ्वी दानाच्या समान, २ सुख

लागते किंवा उटीची द्रव्ये जशी तेलात मुरत जातात तसे हे लोक एकमेकाच्या ध्यानात बुडून जातात पण मुख्य गोष्ट मुलीचा पैसा घेऊ नये हे मात्र कुणास समजत नाही ५ अशा या तुमच्या कर्मामुळे तुकाराम महाराज म्हणतात, तोंडावर थुकण्याचे व पुढे मिळणाऱ्या नरकाचे मात्र साधन तुम्ही करून ठेविले आहे ६

२७० ब्रह्महत्या मारिल्या गाई । आणीक काई पाप केले ॥ १ ॥
ऐका जेणे विकिली कन्या । पवाडे त्या सुन्याचे ॥ २ ॥
नरमास खादली भाडी । हाका मारी म्हणोनि ॥ ३ ॥
अवघें पाप केले तेणे । जेणे सोने अभिळाषिले ॥ ४ ॥
उच्चारिता मज तें पाप । जिव्हे काप सुटतसे ॥ ५ ॥
तुका म्हणे कोरान्न राड । बेटा भाड मागे ना का ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – सुन्याचे–कुत्र्याचे भाडी–कुटणखाना चालवून मिळविलेला पैसा, अभिळाषिले–इच्छिले, भाड–भाडखोर मनुष्य

अर्थ – त्याच्या हातून ब्रह्महत्या घडली, त्याने जणु गाई मारल्या आणखी काही पापे त्याने केली १ त्याने म्हणजे कुणी ? ऐका तर ज्याने आपली कन्या विकली त्या कुत्र्याची कीर्ती नीट ऐका २ या अधमाने मुलीच्या लग्नात पैसा घेऊन नरमास खाल्ल्याचे व कुटणखाना चालवून पैसे मिळविल्याचे पाप याने केले म्हणून तर त्याच्या नावाने हाका मारतो आहे ३ जगातील सर्व पापे त्याने केलेली आहेत असे समजा कारण त्याने मुलीला विकून सोन्याची अभिलाषा धरलेली असते ४ त्याचे पाप उच्चरतानाही माझ्या जिभेचा थरकाप होत आहे ५ तुकाराम महाराज म्हणतात, मुलीचे द्रव्य घेणार, तिचा बाप हा भाडखोर व आई राड भिक्षा का मागेनात ! ६

२७१ याचा कोणी करी पक्ष । तो ही त्याशी समतुल्य ॥ १ ॥
फुकासाठीं पावे दु खाचा विभाग । पूर्वजासि लाग निरयदंडीं ॥ २ ॥
ऐके राजा न करी दड । जरि या लड दुष्टासि ॥ ३ ॥
तुका म्हणे त्याचे अन्न । मद्यपाना समान ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – पक्ष–बाजू निरयदडी– नरकाच्या शिक्षेस

अर्थ – अशा प्रकारे कन्येची विक्री करून जे पैसे मिळविणारे असतील, त्याची बाजू घेणारे जे असतील तेही त्याच गुन्हेगारासारखे समजावेत १ त्याची बाजू घेतल्याने त्याला फुकट दु ख मात्र होते आणि तो स्वत च्या पूर्वजानाही नरकाच्या शिक्षेस पाठवितो २ जो राजा अशा दुष्टाना दड करीत नाही, ३ तो अन्न खात असला तरी त्याचे ते सेवन मद्याचे आहे असेच समजावे ४

२७२ कपट काही एक । नेणे भुलवायाचे लोक ॥ १ ॥
तुमचे करितो कीर्तन । गातो उत्तम ते गुण ॥ २ ॥
दाऊ नेणे जडीबुटी । चमत्कार उठाउठी ॥ ३ ॥
नाहीं शिष्यशाखा । सांगो अयाचित लोका ॥ ४ ॥
नव्हे मठपति । नाहीं चाहुराची वृत्ति ॥ ५ ॥
नाहीं देवार्चन । असे मांडिले दुकान ॥ ६ ॥
नाहीं वेताळ प्रसन्न । काहीं सांगों खाण खुण ॥ ७ ॥
नव्हे पुराणिक । करणे सांगणें आणीक ॥ ८ ॥
नेणें वाद घटा पटा । करिता पडित करटा ॥ ९ ॥

नाहीं जाळीत भणदीं । उदो म्हणोनि आनंदीं ॥ १० ॥
नाहीं हालवीत माळा । भोंवतें मेळवुनि गबाळा ॥ ११ ॥
आगमीचें कुडें नेणें । स्तंभन[1] मोहन उच्चाटणें ॥ १२ ॥
नव्हें यांच्या ऐसा । तुका निरयवासी पिसा ॥ १३ ॥

शब्दार्थ व टीपा :– जडीबुटी–त्वरित गुण देणारी धातुरमातुर औषधें, आयाचित–न विचारता, धाहूर–१२० बिघ्यांची जमीन, वृत्ति–निर्वाहाचे साधन, खाण खुण–गुपिते, करंटा–दुर्दैवी, भणदी–धूप जाळण्याची पात्रें, उदो–उदय असो, उदय असो जसे देवीचे भक्त म्हणतात त्याप्रमाणे, गबाळा–वायफट लोकाना, आगमीचे–वेदान्ताचे कोडे, स्तंभन–जागच्या जागी खिळून टाकण्याची विद्या, मोहनी–मोहिनी विद्या किंवा मौन, उच्चाटन–जारणमारणापैकी एक विद्या, निरयवासी–नरकलोकातील.

अर्थ:– आपण कोण आहो, कोण नाहीत याचा स्पष्ट उलगडा करताना तुकारामबुवा सविस्तर सांगत आहेत की, लोकांना फसविण्याचे कपट काही मी जाणीत नाही. १ देवा, फक्त तुमचेच कीर्तन करून तुमचे उत्तम गुण मात्र गात असतो. २ लोकांना नादविण्यासाठी मजजवळ काही जडीबुट्टी त्यांना दाखविण्यास नाही; त्यामुळे त्वरित चमत्कारही मला करता येत नाहीत. ३ माझी शिष्यशाखाही मोठी नाही जे कोणी न विचारता किंवा न बोलविता येतात त्यांना काही थोडे सांगतो एवढेच. ४ मी तर देवा, एखाद्या मठाचा अधिपती नव्हे व मला धाहूरभर जमिनीचे निर्वाहाचे एखादे साधनही नाही. ५ देवाची पूजा करताना धूप, दीप, नैवेद्य, आरती यांचा पसारा मांडून मी दुकानही घातले नाही ६ लोकांना काही गुपिते सांगावीत, त्यांच्या मनांतील काही गोष्टी ओळखाव्यात यासाठी मला एखादा वेताळही प्रसन्न नाही ७ लोकांना पुराण सांगून नादी लावणारा पुराणीकही मी नाही. सांगावे एक व करावे दुसरे असे मी करीत नाही. ८ मला घटापटादी शब्दांच्या साहाय्याने दुर्बोध पंडितांप्रमाणे वादविवादही करता येत नाही. ९ किंवा धुपाटण्यात ऊद वगैरे धुपवून, जाळून मी आनंदीचा, अंबाबाईचा उदो उदो करीत नाही. १० चार अडाणी किंवा वायफट लोकांना भोवती जमवून मी नामजपाच्या माळा ओढण्याचे नाटकही करीत नाही. ११ मी वेदान्ताचे कोडे किंवा अथर्ववेदातील स्तंभन, मोहन, उच्चाटण इत्यादी जारणमारणादी क्रियाही जाणीत नाही. १२ तुकाराम महाराज म्हणतात, मी वर सांगितलेल्या लोकांसारखा नाही, हे वेडे लोक वरील-सारखे प्रकार करून नरकाची जोड करतात. मी हरिभक्तीखेरीज दुसरे काहीच करीत नाही १३

विवरण :– तुकोबांनी व इतर साधुसंतांनी सर्वांना अतिशय सुलभ असा विठ्ठलभक्तीचा मार्ग वारंवार सांगितला आहे. नामस्मरण, भजन, कीर्तन, एकादशी, सोमवार ही व्रतें, पंढरीची वारी, गळ्यात तुळशीची माळ, गोपीचंदनाचे टिळे, तुळशीची पूजा यासारखे अनेक सोपे उपचार किंवा सहज सुलभ साधनें सांगितली आहेत. परंतु बुवांच्या वेळी सामाजिक भ्रष्टाचार सर्व बाजूंनी होत होता, लोकांचे प्रपंच विस्कटले होते, धार्मिक आचारविचार नष्ट झाले होते, देवदेवतें यांचा सुळसुळाट झाला होता. भोंदू लोक अशा प्रसंगी वरवर दिमाख व चमत्कार दाखवून सर्वसामान्य जनतेस फसवीत होते. त्याचा भरपूर समाचार बुवांनी अभंगातून घेतलेला आहे

भोंदू व लबाड लोक सामान्य स्त्रीपुरुषांना कसे फसवतात त्याचे मोठे समर्पक व बोलके चित्र या अभंगात बुवांनी काढले आहे. कुणी लोकांना फसविण्यासाठी कपट करतात, कुणी जादुटोणा करून, जडीबुट्टी देऊन, चमत्कार दाखवून लोकांना फसवितात कुणी मठाधिपती असतात. कुणी विलासी असतात, कुणाची जमिनीची व संपत्तीची थोरवी असते, कुणी पूजेचे बाह्य अवडंबर माजवून बसलेले असतात कुणाला दुसऱ्याच्या मनातील ओळखणारी वेताळा-सारखी भूतसृष्टी प्रसन्न असते. अंगाराधुपारा देऊन हे लोक जनतेस फसवीत असतात. पुराणात एक सांगणारे व आचरणात दुसरे करणारे कुणी ढोंगी पुराणीक असतात, कुणी घटाकाश, पटाकाशासारख्या शाब्दिक बडबडीने वेदान्ताची व्यर्थ चर्चा करीत असतात कुणी देवीच्या नावे दिवटी पाजळवून आनंदीचा उदो उदो करतात. कुणी

१ स्तंभ आणि उच्चाटणे.

ढोंगीपणाने उगाच माळ हालवून, जपाचे नाटक करून गवाळ्या लोकांना फसवितात कुणी जारणमारणाच्या आसुरी विद्येच्या पाठीमागे असतात पण हे सव लोक बुवाच्या मते ढोंगी आहेत हे समाजातील भोळ्याभावड्या स्त्रीपुरुषाना लुबाडतात स्वत तुकारामबुवा मात्र केवळ विठ्ठलाचे कीर्तन व गुणवर्णन करून हरिभक्तीचा प्रसार करतात असा भावार्थ

२७३ रडोनिया मान । कोण मागता भूषण ॥ १ ॥
देवे दिले तरी गोड । राहे रुचि आणि कोड ॥ २ ॥
लाविता लावणी । विके भिके केज्या दानी ॥ ३ ॥
तुका म्हणे धीरा । विण कैसा होतो हिरा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – कोड–कौतुक, केजें–धान्य

अर्थ – दुसऱ्याजवळ रडून भाकून मान मिळविण्यात कोणते भूषण आहे ? देवाने आपण होऊन जे दिले त्यात गोडी आणि कौतुक आहे २ स्वत शेतात धान्य पेरून नतर ते विकण्यात वा भिकाऱ्याला दान देण्यात काही अर्थ आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, मोठेपणा न मागता यायला पाहिजे धीर धरल्यासच धीर पुरुषाचे महत्त्व येईल ४

२७४ पूज्या एकासनी आसनी आसन । बैसता गमन मातेशी ते ॥ १ ॥
सागतो ते धर्म नीतीचे सकेत । सावधान हित व्हावे तरी ॥ २ ॥
सता ठाया ठाव पूजनाची इच्छा । जीवनीच वळसा सापडला ॥ ३ ॥
तुका म्हणे एकाएकीं वरासन । दुजें तेथें भिन्न अशोभ्य ते ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – सकेत–सिध्दान्त वळसा–फेरा किंवा रहस्य, अशोभ्य–विशोभित, वरासन–श्रेष्ठ आसन

अर्थ – ज्या आसनावर आपणास पूज्य असणारी वस्तू अथवा व्यक्ती आहे त्याच आसनावर आपण बसल्यास आईशी गमन केल्याचे पाप लागेल १ रोज वागण्यातील धर्मनीतीचे सकेत मी नीट सागत आहे ते तुम्हास तुमचे हित व्हावेसे वाटत असेल तर सावधपणाने ऐका २ सताची पूजा ज्या ठिकाणी होत असते तेथेच स्वत च्या पूजनाची इच्छा धरणे हे जन्ममृत्यूच्या फेऱ्यात सापडण्यासारखेच आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, सताच्या श्रेष्ठ आसनावर दुसरा एखादा सामान्य मनुष्य जाऊन बसेल तर सारेच दृश्य विशोभित दिसेल ४

२७५ जेणे मुखें स्तवी । तेचि निंदे पाठी रावी ॥ १ ॥
ऐसी अधमाची याती । लोपी सोने खाय माती ॥ २ ॥
गुदद्वारा वाटें । मिष्टान्नाचा नरक लोटे ॥ ३ ॥
विंचु लाभाविण । तुका म्हणे वाहे शीण ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – स्तवी–स्तुती करतो, याती–जाती

अर्थ – हा मनुष्य कसा आहे पाहा ज्या मुखाने स्तुती करतो, त्याच मुखाने मागून हा निंदा करतो १ अशी ही या अधमाची जात आहे हा जवळचे सोने पुरून ठेवून माती खात असतो २ मिष्टान्नाचे जेवण करावे व गुदद्वाराच्या वाटेने त्याचीच विष्टा व्हावी तसे याचे हे करणे असते ३ काही एक फायदा नसताना विंचू आपल्या नांगीत विषाचा साठा वाहत असतो तसे या अधम माणसाचे असते ४

२७६ अधमाची यारी । रग पतगाचे परी ॥ १ ॥
विटे न लगता क्षण । मोल जाय वाया विण ॥ २ ॥
सर्पाचिया परी । विषें भरला कल्हारीं ॥ ३ ॥
तुका म्हणे देवा । मज क्षणी ऐसे दावा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– यारी–सगत, प्रीती, कल्हारीं–कमळात, हृदयकमळात, क्षणी–नकारात्मक अर्थ.

अर्थ :– अधम माणसाची प्रीती पतंगाच्या रंगाप्रमाणे क्षणभंगुर असते. १ एक क्षणात ती विटून जाते. तिची किंमत व्यर्थ होते २ याच्या हृदयकमळात सर्पाप्रमाणे विष नेहमी भरलेले असते ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, असला हा अधम मला दारातसुद्धा नको. ४

२७७ आणिकांची स्तुति आम्हां ब्रह्महत्या । एका वांचूनि त्या पांडुरंगा ॥ १ ॥
आम्हां विष्णुदासां एकविध भाव । न म्हणों या देव आणिकांसि ॥ २ ॥
शतखंड माझी होईल रसना । जरी या वचना पालटेन ॥ ३ ॥
तुका म्हणे मज आणिका संकल्पें । अवघींच पापें घडतील ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– आणिकाची–इतर देवाची, शतखंड–शंभर तुकडे, रसना–जीभ.

अर्थ :– त्या एका पांडुरंगाशिवाय इतर देवाची स्तुती आम्ही केली तर आमचेकडून ब्रह्महत्येचे पातक घडले असे समजा. १ आम्हा विष्णुदासाचा भाव एकच असतो व आम्ही इतर देवदेवतांना देवही मानीत नाही २ या माझ्या वचनात जर अतर पडेल तर माझ्या जिभेचे शंभर तुकडे होतील. ३ या पांडुरंगप्रीतीशिवाय दुसरे काही भाव माझ्या मनात येतील तर माझ्या हातून जगातील सर्वच पापे घडल्यासारखे होईल असे तुकाराम महाराज म्हणतात. ४

२७८ तान्हेल्याची धणी । फिटे गंगा नव्हे उणी ॥ १ ॥
माझे मनोरथ सिद्धी । पाववावे कृपानिधी ॥ २ ॥
तूं तों उदारांचा राणा । माझी अल्पचि वासना ॥ ३ ॥
कृपादृष्टीं पाहे । तुका म्हणे होईं साहे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– धणी–तृप्ती, समाधान, उणी–कमी.

अर्थ :– गंगेच्या पाण्याचे सेवन केल्यानतर तृषाक्रान्ताची इच्छा तृप्त होते तो सतुष्ट होतो, पण गंगेचे पाणी काही कमी होत नाही. १ तेव्हा कृपेच्या सागरा, माझे मनोरथ एकदा पूर्ण करा ना. २ देवा, तुम्ही तर उदाराचे राजे आहात व माझी मागणीही अगदी अल्प आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, केवळ कृपादृष्टीने देवा, माझ्याकडे पाहा व मला साह्य करा ४

२७९ संताचा अतिक्रम । देवपूजा तो अधर्म ॥ १ ॥
पेंसी दगड तैसे वरी । मंत्रपुष्पें देवा शिरीं ॥ २ ॥
अतीतासि गाळी । देवा नैवेद्यासी पोळी ॥ ३ ॥
तुका म्हणे देवा । ताडण भेदकांची सेवा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– गाळी–घालवून देतो, शिवी, भेदक–देव व सत याच्यात भेद करणारे.

अर्थ :– घरी यजाने देवपूजा चालू असताना दारात संत आले व त्यांचा सत्कार जर घडला नाही तर तो अधर्म आहे. १ अशा वेळी देवाला भक्तिभावाने मंत्रपुष्पे वाहिली तरी ती दगडाच्या वर्षावाप्रमाणे देवासही वाटतील. २ दाराशी अतिथी आला असताना त्याला घालवून देतो किंवा शिवी देतो व देवाला नैवेद्य म्हणून पुरणाची पोळी दाखवितो हाही अधर्मच. ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा प्रकारच्या भेदबुद्धीने केलेली सेवा ही सेवा नसून एक प्रकारची माराची शिक्षाच नव्हे काय ? ४

२८० करणें तें देवा । हेचि एक पावे सेवा ॥ १ ॥
अवघें घडे येणें सांग । भक्त देवाचें तें अंग ॥ २ ॥

हेचि एक वर्म । काय बोलिला तो धर्म ॥ ३ ॥
तुका म्हणे खरें । खरें त्रिवाचा उत्तरें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– वर्म–रहस्य, त्रिवाचा–तीन वेळा उच्चार करून.

अर्थ – संतांची सेवा हीच खऱ्या अर्थाने देवास पोचते. १ भक्त किंवा संत हा एक देवाचेच भाग असल्यामुळे त्याच्या पूजनाने सर्व काही गोष्टी परिपूर्ण होतात २ धर्म म्हणून जो सांगितला जातो त्याचे हेच एक रहस्य आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी तीन वेळा उच्चार करुन सांगत आहे हेच खरे आहे. ४

२८१ मागें नेणपणे घडलें तें क्षमा । आतां देतों सीमा करूनियां ॥ १ ॥
परनारीचें जया घडलें गमन । दावीतो वदन जननीरत ॥ २ ॥
उपदेशा वरी मन नाही हातीं । तो आम्हा पुढती पाहूं नये ॥ ३ ॥
तुका म्हणे साक्षी असो द्यावें मन । घातली ते आण पाळावया ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– सीमा–मर्यादा

अर्थ :– मागे न जाणता जे काय घडले असेल ते असो त्याची तुम्हास क्षमा आहे. पण आता येथून पुढे मात्र नीट रीत किंवा मर्यादा घालून देतो ती नीट ऐका १ परस्त्रीगमन ज्यास घडले आहे व जो उजळ माथ्याने वर तोंड दाखवीत आहे त्यास आईशी गमन करण्याचे पातक लागते २ मी हा उपदेश केल्यावरही ज्याचे मन स्वाधीन राहात नाही, त्याच्या मुखाचे दर्शनही मला आता यापुढे नको ३ तुकाराम महाराज म्हणतात, आम्ही घातलेली शपथ पाळण्यासाठी तुम्ही आपले मनच प्रथम साक्षी ठेवा ४

२८२ आणिकांच्या घातें । ज्याचीं निवतील चित्तें ॥ १ ॥
तेचि ओळखावे पापी । निरयवासी शीघ्रकोपी ॥ २ ॥
कान पसरोनी । ऐके वदे दुष्ट वाणी ॥ ३ ॥
तुका म्हणे भांडा । धीर नाहीं ज्याच्या तोंडा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– निरयवासी–नरकात राहणारे, भांड–भांडखोर.

अर्थ – दुसऱ्याचा घातपात केल्यामुळे ज्याच्या चित्ताला समाधान वाटते, १ तो पापी समजावा तो शीघ्रकोपी मानून त्याचा वास नरकात असतो असेच समजावे २ तो नेहमी कान टवकारून वाईट बोलणे ऐकत असतो; स्वत बोलत असतो ३ तुकाराम महाराज म्हणतात, असा मनुष्य नुसता भांडखोर असतो त्याच्या तोंडाला धरबंध नसतो कधी. ४

## हनुमंतस्तुति–अभंग ४

२८३ शरण शरण जी हनुमंता । तुज आलों रामदूता ॥ १ ॥
काय भक्तीच्या त्या वाटा । मज दावाव्या सुभटा ॥ २ ॥
शूर आणि धीर । स्वामिकाजीं तूं सादर ॥ ३ ॥
तुका म्हणे रुद्रा । अंजनीचिया कुमरा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– सुभटा–श्रेष्ठ वीरा, सादर–तत्पर, रुद्रा–शिवा, अजनी–हनुमंताची आई

अर्थ :–मारुतिराया, हनुमंता, तुम्ही श्रीरामचंद्राचे सेवक आहात. म्हणून मी तुम्हास पुनः पुन वन्दन करतो. १ हे श्रेष्ठ अशा वीर पुरुषा, भक्तीच्या ज्या वाटा आहेत त्या मला दाखवा ना. २ तुम्ही शूर व धैर्यवान आहात, स्वामीच्या, रामचंद्राच्या कोणत्याही कामासाठी तुम्ही तत्पर असता. ३ तुकाराम महाराज म्हणतात, अंजनीमातेच्या कुमारा, हनुमंता, तुम्ही प्रत्यक्ष शिवाचेच रूप आहात. ४

विवरण – तुकारामबुवांचे आराध्य दैवत पंढरपूरचे श्रीविठ्ठल हेच असले तरी याच श्रीविठ्ठलाच्या म्हणजे श्रीकृष्णाच्या पूर्वावतारी रामचंद्रांचा एकनिष्ठ भक्त हनुमंत याची महती भागवत सांप्रदायी साधुसंतांनी विशेष मानली आहे. शक्ती, बुद्धी व स्वामीच्या कार्याविषयी तत्परता याबद्दल हनुमंताचे नाव प्रसिद्ध आहे. विठ्ठलरखुमाईंच्या दोन्ही अंगास गरुड व हनुमंत यांचीच जोडी हात जोडून उभी असते. 'गरुड हनुमंत पुढे उभे राहती' असे वर्णन विठ्ठलाच्या प्रसिद्ध आरतीत आहे. याला शंकराचा अवतार मानतात. नामदेवांनी याचे चरित्र अगदी थोडक्यात वर्णन केले आहे. 'पिंड धारीनें झडपिला । अंजनीनें तो सेविला ॥ अंजनीच्या तपासाठी । महारुद्र आले पोटीं ॥ चैत्र शुद्ध पौर्णिमेसी । सूर्योदयसमयासी ॥ महारुद्र प्रगटले । नामा म्हणे म्यां वंदिले–' ॥ भक्ती व शक्ती याचे प्रतीक असलेल्या या हनुमंताच्या श्रेष्ठतेचे वर्णन सर्वत्र मिळते. एकनाथांनी याचे वर्णन, 'वानराचा वेष सुवर्ण कौपीन। दिसतो शोभायमान कुंडले तों। जन्मताची जेणे सूर्याते धरियलें। इंद्रादिकां दिले थोर मार' अशा शब्दांत केले आहे.

खालील तीनचार अभंगांतून तुकारामबुवांनी हनुमंताची स्तुती करून त्याच्या कार्याची ओळख करून दिली आहे. हनुमंत हा सुमेरुचा राजा केसरिन व गौतमकन्या अंजली यांचा पुत्र होय. वायुपुत्र म्हणूनही याचा लौकिक आहे. दशरथाच्या पुत्रकामेष्टी यज्ञातील पायसाचा भाग घारीच्या तोंडून पडलेला अंजनीच्या ओंजळीत पडला व त्याच्या सेवनाने तिला हा पुत्र झाला. या मोठ्या बलवान, ज्ञानवान सेवकाचा महिमा रामायणात विशेषत्वाने दिसून येतो. रावणाने सीतेचे हरण केल्यानंतर तिच्या शोधासाठी जे प्रयत्न झाले त्यांत याच्या प्रयत्नांचे महत्त्व विशेष होते. दृढप्रयत्नांनी याने समुद्र उल्लंघून लंकेत प्रवेश केला. अशोकवनातील सीता याने शोधून काढली. रामाची मुद्रा दाखवून खूण पटविली. नंतर याने अशोकवनाचा नाश केला. रावणाकडून आलेल्या जंबुमाळि विरुपाक्ष इत्यादी पाच सेनापतींचा याने पराभव केला. नंतर इंद्रजिताने याला ब्रह्मास्त्राने बांधून रावणासमोर आणले. याचा मृत्यू शेपटीत असल्याने शेपटीस आग लावण्याचे ठरले. शेपटीस सर्व लंकेतील वस्त्र गुंडाळली तरी ती उघडीच राही, तेल ओतल्यावर रावणाने फुंकर मारल्याबरोबर त्याची दाढी जळून गेली अशी कथा आनंद रामायणात दिलेली आहे. पुढे याने आपल्या पेटविलेल्या शेपटीने सारी लंका जाळून टाकली.

प्रत्यक्ष युद्धाच्या प्रसंगी तर याने हजारो राक्षस मारिले. वानरांना सजीव करण्यासाठी निरनिराळ्या औषधी वनस्पती यानेच आणल्या. याने रावणाचा पराभव केला. लक्ष्मण मूर्च्छित झाल्यावर याने द्रोणागिरी खांद्यावर उचलून आणला. युद्धसमाप्तीनंतर याने रामावरची निष्ठा सोडली नाही. राज्याभिषेकाच्या वेळी हनुमंतानेच समुद्राचे पाणी आणले. रामचंद्राबरोबर याचीही कीर्ती वाढली व एक आदर्श सेवकभक्त म्हणून याचे नाव प्रसिद्ध झाले. सप्त चिरंजीवांपैकी हा एक आहेच, अर्जुनाचे रथावर याचे स्थान असे. रामावर एवढी निष्ठा होती की ज्यात राम नाही त्या रत्नाचाही लोभ त्याला नसे. रामभक्तीचा आदर्श म्हणजे हनुमंत होय.

२८४ केली सीताशुद्धी । मूळ रामायणा आधीं ॥ १ ॥
ऐसा प्रतापी गहन । सुरा सकळां[1] भक्तांचे भूषण ॥ २ ॥
जाऊनि पाताळा । केली देवाची अवकळा ॥ ३ ॥
राम लक्ष्मण । नेले आणिले चोरून ॥ ४ ॥
जोडूनिया कर । उभा सन्मुख समोर ॥ ५ ॥
तुका म्हणे जपें । वायुसुता जाती पापें ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा :– सीताशुद्धी–सीतेचा शोध, गहन–श्रेष्ठ

अर्थ :– या हनुमंतानेच सीतेचा शोध केला. सर्व रामायणकथेस याच गोष्टीचे मूळ आहे. १ असा हा पराक्रमी हनुमंत श्रेष्ठ असून सर्व देवांना व भक्तांना भूषणभूत झालेला आहे. २ यानेच पाताळात जाऊन देवांची फजिती केली होती. ३ अहिरावणमहिरावण यांनी रामलक्ष्मणास चोरून नेले होते, तेव्हा यानेच त्यांचा वध करून

१ सुरा सकळ मोहन

रामलक्ष्मणास सोडवून आणले. ४ हा हनुमंत रामचंद्राजवळ दोन्ही हात जोडून नेहमीच उभा असतो ५ तुकाराम महाराज म्हणतात, या वायुपुत्राच्या जपाने सर्व पापाचा नाश होत असतो. ६

२८५ काम घातला बांदोडी। काळ[1] केला देशधडी ॥ १॥
तया माझें दंडवत। कपिकुळीं हनूमंत॥ २॥
शरीर वज्रा ऐसें। कवळी ब्रह्मांड जो पुच्छें ॥ ३॥
रामाच्या सेवका ॥ शरण आलों म्हणे तुका॥ ४॥

शब्दार्थ व टीपा – बांदोडी–नदीत

अर्थ :– या हनुमताने कामास जिंकून त्याला बंदिवासातच टाकले व यमास किंवा काळास देशोधडीस लाविले. हा चिरंजीव राहिला. १ वानरवंशातील या हनुमतास माझे नमस्कार असोत. २ या हनुमंताचे शरीर वज्रासारखे कठिण असून याचे शेपूट एवढे आहे की त्याचा वेढा सर्व ब्रह्मांडालाही बसेल. ३ अरे रामाच्या सेवका, हनुमता, मी तुकाराम तुम्हास शरण आलो आहे. ४

२८६ हनुमंत महाबळी। रावणाची दाढी जाळी ॥ १ ॥
तया माझा नमस्कार। वारंवार निरंतर ॥ २ ॥
करोनी उड्डाण। केले लंकेचे शोधन[2] ॥ ३ ॥
जाळियेली लंका। धन्य धन्य म्हणे तुका ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– महाबळी–मोठा पराक्रमी, शोधन–शोध, शुद्ध

अर्थ :– हा हनुमंत मोठाच बलवंत आहे, कारण याने त्या बलाढ्य व मदोन्मत्त रावणाची दाढीच जाळून टाकली. १ त्या श्रेष्ठ व बलवान हनुमतास माझा नमस्कार पुन: पुन: असो २ समुद्रावर उड्डाण करुन याने सर्व लंकेचा शोध लावला, त्या जाळून शुद्ध केली ३ याने सारी लंका जाळून रावणाच्या मदमत्त अशा वैभवाचा नाश केला मारुतीचा हा पराक्रम फार मोठा असून तुकाराम महाराज धन्य धन्य म्हणून त्याचा गौरव करतात ४

२८७ कुंभ अवघा एक आवा। पाकीं एकीं गू फेडावा ॥ १ ॥
ऐसे भिन्न भिन्न साटे। केले प्रारब्धाने वांटे ॥ २ ॥
हिरे दगड एक खाणी। कंचे विजातीसी पाणी ॥ ३ ॥
तुका म्हणे शिरीं। एक एकाची पायरी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – कुंभ–मडके, पाकी–स्वयपाकात, फेडावा–काढण्यासाठी, साटे–प्रकार, पाणी–तेज

अर्थ :– सर्व मडकी ही कुंभाराच्या एकाच आव्यात तयार होतात, परंतु एक स्वयपाक करण्यासाठी वापरले जाते व दुसरे गू काढण्यास उपयोगात येते १ याच न्यायाने प्रारब्धाने माणसाचे निरनिराळे प्रकार केले आहेत. २ हिरे व दगड एकाच खाणीतून जन्मास येतात, पण हिऱ्यास चमकदार पाणी असल्याने ते वेगळ्या जातीचे ठरतात व दगड दगडच रहातात ३ तुकाराम महाराज म्हणतात, यामुळे एकेकाचे नशीब पाहा कसे बनते, एक हिरा राज्याच्या डोक्यावरील मुकुटात जाऊन बसतो व दुसरा दगड म्हणून कुठेतरी पायरीला बसतो ४

२८८ मांडे पुऱ्या मुखें सांगो जाणे मात। तोंडीं लाळ हात चोळी रिते ॥ १ ॥
ऐसियाच्या गोष्टी फिक्या मिठेंविण। रुचि नेदी अन्न चवी नाहीं ॥ २ ॥
बोलों जाणे अंगी नाहीं शूरपण। काय तें वचन जाळावें ते ॥ ३ ॥
तुका म्हणे बहुतोंडे जे वाचाळ। तेंग तेंच मूळ लटिक्याचें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – मात–गोष्ट, रिते–रिकामे, बहुतोंडे–फार बोलणारे, तेंग–तेच, लटिक्याचे–खोटयाचे.

---

१ काळ घातला तोरडी, २ दहन

अर्थ :- मांडे, पुऱ्या यांच्या नुसत्या गोष्टीच तोंडाने म्हटल्याने काय साधते ? तोंडास फक्त पाणी सुटते व हात मात्र रिकामेच राहून एकमेकांवर चोळले जातात १ असे नुसते बोलणाऱ्या माणसाच्या गोष्टी मिठाशिवाय असणाऱ्या अन्नाप्रमाणे फिक्याच असतात, त्या अन्नाला व त्या बोलण्याला कसलीच चव नसते. २ तोंडाने खूप बडबड करतो, पण अंगी शूरपणा मुळीच नाही ; त्याच्या तोंडाची बडबड काय जाळायची ? तिचा काहीच उपयोग नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, असे अतिशय व वृथा बडबड करणारे पुष्कळजण मोठे वाचाळ असतात पण त्याचे सारे बोलणे सर्व खोटेपणाचेच मूळ असते. त्यात सत्याचा किंवा स्वानुभवाचा अंशही कधी असत नाही. ४

२८९ न लगे चंदना सांगावा[१] परिमळ । वनस्पतिमेळ हाकारुनी ॥ १ ॥
अंतरींचें धांवे स्वभावें बाहेरी । धरितां ही परी आवरे ना ॥ २ ॥
सूर्य नाहीं जागें करीत या जना । प्रकाश किरण कर म्हून ॥ ३ ॥
तुका म्हणे मेघ नाचवी मयूरें । लपवितां खरें येत नाहीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :-परिमळ-सुवास, अंतरींचें-मनातील, म्हून-म्हणून, मयूरें-मोर.

अर्थ :- रानावनातील इतर झाडाझुडपांना आपल्या अंगच्या सुवासाबद्दल चंदनास सांगावे लागत नाही तो आपोआपच प्रकट होत असतो १ जे अंतरंगात म्हणजे मनात आहे ते स्वभावतःच बाहेर धावत असते, व्यक्त होत असते. त्याला आवरून धरले तरी ते आवरत नाही. २ आपले प्रकाशकिरण तेजस्वी आहेत असे म्हणून लोकांना सूर्य स्वतः होऊन काही सांगायला जात नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, मेघ दिसताच मयूर आपोआप नाचू लागतात, त्यांनाही सांगावे लागत नाही. जे खरे आहे ते लपविता येत नाही. ४

२९० चंदनाचे हात पायही चंदन । परिसा नाहीं हीन कोणी अंग ॥ १ ॥
दीपा नाहीं पाठीं पोटीं अंधकार । सर्वांगें साकर अवघी गोड ॥ २ ॥
तुका म्हणे तैसा सज्जनापासून । पाहातां अवगुण मिळेचि ना ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा :- हीन-कमी प्रतीचे, साकर-साखर.

अर्थ :- चंदनाचे हातपाय, खोडमूळ सर्व अगच चंदनमय असते. परिसाची कोणतीही बाजू कधी हीन नसते. तो अंतर्बाह्य परीसच असतो. १ दिव्यास मागेपुढे अंधार कसा दिसणार ? साखर सर्वांगाने गोडच असणार. २ तुकाराम महाराज म्हणतात, त्याप्रमाणेच सज्जन सर्व बाजूंनी सज्जनच असायचा अवगुण पाहता कुठेही दिसणार नाही. ३

२९१ मन करा रे प्रसन्न । सर्व सिद्धीचें कारण ।
मोक्ष अथवा बंधन । सुख समाधान इच्छा तें ॥ १ ॥
मनें प्रतिमा स्थापिली । मनें मना पूजा केली ।
मनें इच्छा पुरविली । मन माऊली सकळांची ॥ २ ॥
मन गुरु आणि शिष्य । करी आपुलेंचि दास्य ।
प्रसन्न आपआपणास । गति अथवा अधोगति ॥ ३ ॥
साधक वाचक पंडित । श्रोते वक्ते ऐका मात ।
नाहीं नाहीं आनुदैवत । तुका म्हणे दुसरें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- सिद्धी-जे साधायचे ते, मात-गोष्ट, आनु-दुसरे.

अर्थ :- तुम्ही आपले मन आधी प्रसन्न ठेवा. कारण जे साधायचे आहे त्या सिद्धीचे सर्व कारण मन हेच आहे. मोक्ष अथवा बंधन, सुख, समाधान, इच्छा वगैरे जे काही आहे ते सर्व मनापासूनच मिळते. १ दगडाची

१ पुसावा

प्रतिमा अथवा मूर्ती मनाने स्थापन केली व तिची मनोमय पूजा मनानेच केली, मनानेच सर्व इच्छा पुरविल्या, आणि सर्व वासनांची, सकल्पांची माऊली मनच होय २ गुरु आणि शिष्य हे मनानेच प्रकार कल्पिले मनच स्वतःचे दास्य करू लागते. मनच स्वत वर स्वत.च प्रसन्न असते चांगली किंवा वाईट गती या मनामुळेच प्राप्त होत असते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, साधकानो, पंडितानो, वाचकानो, श्रोत्यानो, वक्त्यानो, एक गोष्ट ऐका ती ही की या मनाखेरीज दुसरे दैवत नाही ४

**विवरण :–** भागवत धर्मीय संतानी चित्तशुद्धीवर फार भर दिलेला आहे. मन हे सर्व सिद्धीचे साधन असल्याने ते शुद्ध राखणे, त्यास वळण देणे, ते ताब्यात ठेवणे, त्यावर संस्कार करणे, ते ईश्वराच्या ठिकाणी स्थिर करणे याची फार आवश्यकता संतानी सांगितली आहे मन हे अति चचल, अति अवखळ, हट्टी, दुराग्रही असल्याने व सर्व सुखाचेही साधन तेच असल्याने त्याची मशागत ही फार महत्त्वाची मानली जाते मन स्थिर झाल्याशिवाय, शांत झाल्याशिवाय कसलेही सुख नाही वरवर कसलाही डौल मिरविला तरी मन स्वस्थ नसेल तर सारे व्यर्थ आहे म्हणून मनोजयास, मनाच्या स्थिरतेस फारच महत्त्व आहे

पण ही स्थिरता यावी कशी ? मन स्वभावत च चचल आहे, प्रमाद करणारे आहे, त्याचा निग्रह करून त्यास ताब्यात ठेवणे फार कठिण आहे पण अभ्यासाने व वैराग्याने त्यावर स्वामित्व मिळविता येते असा गीतेचा आदेश आहे **‘ चञ्चल हि मन कृष्ण प्रमाथि बलवद्दृढम् । तस्याहं निग्रहं मन्ये वायोरिव सुदुष्करम् ’** असा मनाचा स्वभाव आहे वाऱ्याची मोट बांधणे जितके अवघड तितकेच मन वळविणे अवघड या अस्थिर मनाचे मोठे समर्पक वर्णन ज्ञानदेवानी करून म्हटले आहे, **‘ हे मन कैसे केवढें । ऐसें पाहों म्हणो तरी न सापडे । एऱ्हवीं राहाटावया थोडें । त्रैलोक्य यया ॥ म्हणोनि ऐसे कैसे घडेल । जें मर्कट समाधी येईल । ना राहा म्हणतलिया राहेल । महा-वातु ॥ जें बुद्धीतें सळी । निश्चयातें टाळी । धैर्येसीं हातफळी । मिळऊनी जाय ॥ जें विवेकातें भुलवी । संतोषासी चाड लावी । बैसिजे तरी हिंडवी । दाही दिशा ॥ परि वैराग्याचेनि आधारें । जरि लाविलें अभ्यासाचिये मोहरे । तरि केतुलेनि एके अवसरे । स्थिरावेल ’**

या मनाची अस्थिरता बहुतेक सर्वांनी वर्णन केली आहे **‘ चपळ मन माझें नावरें आवरीता ’** म्हणून रामदासानी मनासच केलेला उपदेश प्रसिद्ध आहे हे चचल मन कसे फसवे आहे व कसे झुकांड्या देत असते याचे मोठे सुंदर वर्णन एकनाथानी आपल्या भागवतात केले आहे **‘ निग्रहावया निज मन । साधक साधितो प्राणापान । त्यासीही छेळोनिया मन । जाय निघोन तत्काळ ॥ मनोनिग्रह करिता देख । मन खवळे अधिकाधिक । मनोनेमी सज्ञान लोक । शिणले साधक साधनीं ॥ वारा बांधवेल मोटें । अग्नि प्राशवेल अवचटें । समुद्र घोटवेल घोटें । मन आत्मनिष्ठें तरी न ये ॥ आकाश करवेल चौघडी । महामेरु बांधवेल पुडी । शून्याची मुरडवेल नरडी । परि या मनाच्या वोढी अनिवार ॥ ’**

अशा या दुराग्रही, हट्टी आणि चचल मनास वश करता येते ते वैराग्य, सत्सग, प्राणायाम, हरिभक्ती, नामस्मरण, भजन इत्यादी उपायानी नाथानी भागवतात मन स्थिर करण्याचे उपाय भिक्षुगीतात सांगितले आहेत मनाशी वैर करावे, मनाशी मैत्री करावी, मनाविषयी उदासीन राहावे असे तीन मार्ग मनोजयाचे त्यानी सुचविले आहेत **‘ वैर करोनि मनचि मारावें । मित्रत्वें मनें मन साधावें । इयें दोन्ही जें न समवें । तें उपेक्षावें मनातें ॥ ’** मनोनिग्रहावरचे नाथाचे हे निरुपण अतिशय महत्त्वाचे व समर्पक असे आहे सर्व साधुसंतानी या मनास ताब्यात ठेवण्यासाठी उपाय सुचविले आहेत **‘ आधीं मन घेई हातीं । तोचि गणराज गणपती ॥ मन इंद्रियांचा राजा । त्याची सर्वभावें पूजा ’** असे तुकोबानीच एका अभगात पुढे म्हटले आहे **‘ मन माझें चपळ न राहे निश्चळ । घडी एकी पळ स्थिर नाहीं ’** या शब्दात त्यानी मनाची चचलता वर्णन करून **‘ तुका म्हणे मन चंचळ । हातीं येईल गुरुच्या बळें ’** असा एक उपायही सुचविला आहे

मनानेच मनाला जिंकावयाचे असल्याने हे फार कठिण काम वाटते नाथानी **‘ जेंवि हिरेनि हिरा चिरिजे । तेवी मनेंचि मन धरिजे ’** म्हणून सांगितले आहे. हिऱ्यानेच हिरा चिरावा लागतो, त्याप्रमाणे मनानेच मनास जिंकावे

लागते. भावार्थ रामायणात एकनाथांनी मनोजयाचा एक उपाय सुचविला आहे. ते म्हणतात, 'मनें मनातें आवरावें। मनें मनातें निग्रहावें। मनें मनातें धरावें। मनें मारावें मनातें॥' या मार्गाने जर मन स्वाधीन झाले, श्रीहरीकडे वळले तर मग सर्व सुख हाती आलेच म्हणून समजावे. जर असे हे मन हाती येईल तर काय काय सिद्ध होईल, याचे वर्णन करताना नाथांनी म्हटले आहे, 'या मनाची एक उत्तम गती। जरी स्वयें लागलें परमार्थी। तरी दासी करी चारी मुक्ती। दे बांधोनि हातीं परब्रह्म॥' एवढे या मनाचे सामर्थ्य आहे.

यासाठीच तुकारामबुवा या मनास प्रसन्न करा म्हणून सांगतात. या मनास वश करून घेतल्याने रोज नवीन नवीन जागृती येत राहील असे त्यांनी 'तुका म्हणे मना पाहिजे अंकुश। नित्य नवा दीस जागृतीचा' या शब्दात सांगितले आहे. तुकोबांनी स्वतःच्या आयुष्याचा जो मथून मथून क्रम दिला आहे त्यावरून त्यांनाही या मनास ताब्यात ठेवण्यासाठी केवढे सायास पडले असावेत याची कल्पना येते. 'आवरितां मन नावरे दुर्जन। घात करी मन माझें मज,' 'निरोधितें परी न मोडे विकार। बहू हीं दुस्तर विषय द्वारें', 'एकाचेंही मज न घडे दमन। अवघीं नेमून कैसा राखों' यासारख्या ओळीतून तुकोबांच्या मनोनिग्रहाच्या प्रयत्नाची थोडीफार कल्पना येते. 'कोण तुम्हांवीण मनाचा चालक। दुजे सांगा एक नारायणा?' म्हणून एके ठिकाणी प्रश्न विचारून त्यांनी आपल्या अवखळ मनास काही उपाय सुचविले आहेत. 'मना एक करीं। म्हणे मी जाईन पंढरी।', 'देवाचिये पायीं मना देईं बुडी। नको धांवों थोडीं इंद्रियांचे' असा काही ओळीतून त्यांनी मनास वश करण्याचे मार्गही सुचविले आहेत. या सर्व प्रयत्नाचा अर्थ हाच की सर्व सिद्धीचे वा बंधमोक्षाचे खरे कारण मन हे एकच आहे 'मन एव मनुष्याणां कारणं बन्धमोक्षयोः' हाच विचार तुकाराम महाराजांच्या समोर असावा या मनामुळेच मोक्ष वा बंधन याची प्राप्ती होते

२९२ मायबापें जरी सर्पीण बोका। त्यांचे संगें सुखा न पवे बाळ॥ १॥
चंदनाचा शूळ सोनियाची बेडी। सुख नेदी फोडी प्राण नाशी॥ २॥
तुका म्हणे नरकीं घाली अभिमान। जरी होय ज्ञान गर्व ताठा॥ ३॥

शब्दार्थ व टीपा :- संगें-संगतीत, न पवे-पावत नाही.

अर्थ :- आई सर्पीण व बाप बोका असल्यावर त्यांच्या संगतीत मुलाला सुख कसले लाभणार? तो कधीच सुखी होणार नाही कारण सर्पीण अंडी नासणार व बोका पिले खाणार. १ चंदनाचा शूळ असला आणि बेडी सोन्याची असली तरी सुख कसे वाटणार? चंदनाचा शूळ आपले प्राणघाताचे काम करणारच. त्याच्या सुगंधाचा वा थंडपणाचा काय उपयोग? सोन्याची बेडी नाशच करणार. २ तुकाराम महाराज म्हणतात, त्याचप्रमाणे ज्ञानाचा गर्व झाला म्हणजे सुख न होता दुःखाचा नरकच प्राप्त होणार. ३

२९३ शिकल्या बोलाचे सांगतील वाद। अनुभव भेद नाहीं कोणा॥ १॥
पंडित हे ज्ञानी करितील कथा। न मिळती अर्था निजसुखा॥ २॥
तुका म्हणे जैसी लांचासाठीं ग्वाही। देतील हे नाहीं ठावी वस्तु॥ ३॥

सत्त्वरजतमबाधा । नव्हे हरिभक्तासि कदा ॥ ३ ॥
खाय बोले करी । अवघा त्याच्या अंगें हरी ॥ ४ ॥
देवभक्तपण । तुका म्हणे नाहीं भिन्न ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– प्रारब्ध–पूर्वजन्माचे कर्म, संचित–जे भोगानेच संपणारे असत ते कर्म, क्रियमाण– चालू घडीचे कर्म

अर्थ – ईश्वराच्या भक्ताना पूर्वजन्मीचे कर्म, भोगावयाचे साठलेले कर्म– चालू घडीचे कर्म अशा रूपात प्रारब्ध, संचित व क्रियमाण वगैरे सर्व कर्मभोग काही नसतात १ हा भक्त सर्व बाजूनी देवच बनून राहिलेला असतो अंतर्बाह्य त्याला देवत्व प्राप्त झालेले असते २ या हरिभक्ताना सत्त्व, रज, तम या त्रिगुणाची बाधा कधीच होत नसते ३ प्रत्यक्ष श्रीहरी या भक्ताच्याबरोबर खातो, बोलतो, कामें करतो, सर्व कर्मे देव त्यांच्याबरोबरच करतो ४ तुकाराम महाराज म्हणतात याप्रमाणें देव व भक्त भिन्न नसून एकच आहेत ५

२९५ शास्त्राचें जें सार वेदाची जो मूर्ति । तो माझा सांगाती प्राणसखा ॥ १ ॥
म्हणउनी नाहीं आणिकाचा पांग । सर्व जाले सांग नामें एका ॥ २ ॥
सगुण निर्गुण जयाचीं हीं अंगें । तोचि आम्हा संगें क्रीडा करी ॥ ३ ॥
तुका म्हणे आम्ही विधीचे जनिते । स्वयंभू आइते केले नव्हो ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – सांगाती–सोबती, जिवलग मित्र, पांग–गरज, सांग–पूर्ण, विधी–सृष्टी निर्माण करणारा ब्रह्मदेव, जनिते–जन्म देणार, स्वयंभू–स्वत होऊन झालेले

अर्थ – सर्व शास्त्राचे सार जे वेद त्याची मूर्तीच माझा जिवलग असा प्राणसखा मित्र आहे १ म्हणून मला दुसऱ्याच्या संगतीची गरजच नाही याच्या एका नामस्मरणाने सर्व मनोरथ पूर्ण झाले आहेत २ सगुण व निर्गुण ही ज्याची दोन प्रमुख अंगे आहेत तोच आमच्याबरोबर क्रीडा करीत असतो ३ तुकाराम महाराज म्हणतात, आम्ही प्रत्यक्ष ब्रह्मदेवाचे बाप आहोत, आम्हीच त्याला निर्माण केले, त्याने आम्हास नाही आम्ही स्वत होऊनच निर्माण झालो कुणी तरी आम्हास आयते बनविले असे नाही ४

विवरण – या एक लहानसा पण तत्त्वपूर्ण अभंगात बुवानी तीन सिद्धान्त स्पष्टपणे सांगितले आहेत पहिला असा की त्यांचा परमेश्वर हा वेदांचे व शास्त्रांचे सार आहे तो वेदप्रणीत आहे. ' वेदाचा तो अर्थ आम्हांसचि ठावा ' म्हणणाऱ्या तुकोबानाच हे शोभून दिसणार आहे 'वेद अनंत बोलीला अर्थ इतुकाचि साधिला। विठोबासी शरण जावे ' हाच अर्थ तुकोबानी वेदातून काढलेला आहे तुकारामबुवांचा विठ्ठल हा वेदाचा शास्त्राचा, पुराणाचा एक पुतळाच आहे 'सावळें रूप त्याचें डोळा । सा चौ अठराचा मेळा ' असा उल्लेख त्यानी एका अभंगात केला आहे हा पदरीचा राणा म्हणजे 'सकळ शास्त्राचे हें सार। हे वेदाचे गव्हार ' म्हणून दुसऱ्या एका ठिकाणी बुवानी म्हटले आहे दुसरा सिद्धान्त तुकाराम महाराजांच्या या अभंगातील असा आहे की हा आमचा देव सगुण आहे आणि निर्गुणही आहे सगुणनिर्गुणाचा भेद हा वरवरचा आहे निर्गुण हा शब्दच एका गुणाचे वर्णन करणारा आहे भोगासाठी, प्रेमासाठी भक्तीसाठी निर्गुणच सगुण झाला, निराकार जो तो साकार झाला पण म्हणून तो फार निराळा झाला असे नाही 'तुज सगुण म्हणूं कीं निर्गुण रे सगुण निर्गुण एक गोविंदु रे ' अशी प्रचीती सर्व साधुसंताचीच आहे ' जेथुनि उद्गारु प्रसवे ॐकारु । तोचि हा श्रीधरू गोकुळीं वसे ' असे याचे वर्णन निवृत्तीनाथानी केले आहे 'सगुणीं निर्गुण निर्गुणीं सगुण। दोन्ही भिन्नपण नसे मुळीं', 'निर्गुणा अंगीं सगुण बाणले। निर्गुण सगुण एकत्वा आले।' अशा शब्दात श्रीज्ञानदेवानाही सगुणनिर्गुणाचे ऐक्य प्रस्थापित केले आहे तुकारामबुवांचे तर शेकडो अभंग या विषयी आहेत 'अद्वयचि द्वय झालेंचि कारण। धरिलें नारायणे भक्तिसुखें।' यासारख्या ओळीतून तुकोबा हा सिद्धान्त चटकन मांडून जातात

तिसरा एक महत्त्वाचा सिद्धान्त तुकोबानी या अभंगात मांडला आहे तो असा की देवाच्याही आधी आपण भक्त स्वयंभू आहोत देवाने, ब्रह्मदेवाने हे सर्व चराचर विश्व निर्माण केले असे आपण मानतो, पण येथे बुवांची

धारणा अशी की आम्ही भक्तानीच ब्रह्मदेवासही जन्म दिला आम्ही भक्त आहोत म्हणून देवास देवपणा आहे-आम्ही पतित आहोत म्हणून तो पतितपावन म्हणून नावारूपास आला आहे नाही तर त्याला कोण पुसतो ? 'जरि मी नव्हतों पतित। तरि तू पावन कैंचा तेथ ?' म्हणून त्यानी एकदा परमेश्वरास विचारलेच आहे 'लोहें महिमान परिसा। नाहीं तरी दगड जैसा' लोखड आहे म्हणून परिसाचे महत्त्व भक्त आहे म्हणून देवाचा महिमा मूळ आहे म्हणून तर ती बाई आईपणास आली बाईने मुलास जन्म दिला खरा, पण या मुलानेही आपल्या जन्माबरोबर बाईस आईपणाचा जन्म दिला भक्ताने ईश्वराचे स्थान स्थिर केले असा मौजेचा खेळ आहे हा

२९६ ऐका महिमा आवडीचीं। बोरे खाय [1]भिलटीचीं ॥ १ ॥
थोर प्रेमाचा भुकेला। हाचि दुष्काळ तयाला।
अष्टमा सिद्धींला। न मनी क्षीरसागराला ॥ २ ॥
पव्हे सुदामदेवाचे। फके मारी कोरडेच ॥ ३ ॥
न म्हणे उच्छिष्ट अथवा थोडे। तुका म्हणे भक्तीपुढें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – आवडीची-प्रेमाची, भिलटीचीं-शबरी नावाच्या भिल्लीणीची, पव्हे-पोहे, फके-मूठ

अर्थ – भक्तांचा महिमा केवढा असतो तो नीट ऐका ना. या रामाने प्रेमापोटी शबरीची उष्टी बोरे वनवासात असताना तिचे प्रेम पाहून खाल्ली. १ हा ईश्वर भक्ति-प्रेमाचा मोठाच भुकेलेला असतो, त्याच्या घरी याचाच दुष्काळ असतो त्याला खरे म्हणजे आठही सिद्धी व क्षीरसागर याचा लाभ असूनही तो त्याना मानीत नाही २ दरिद्री सुदाम मित्राचे पोहे खाण्यासाठी हा लोभावलेला असतो घरी दुधाचा समुद्र असूनही ते पोहे कोरडेच खावयास याला आनद वाटतो ३ प्रीतीच्या पोटी तो वस्तू उष्टी आहे की थोडी आहे हेही पाहात नाही ४

विवरण – देवास भक्ताचे प्रेम किती थोर वाटते, तो त्याच्यासाठी किती आसुसलेला असतो याचे वर्णन महाराजानी अनेक अभगातून केले आहे येथे शबरीच्या उष्ट्या बोराच्या कथेचा सक्षेपान उल्लेख केला आहे शबरी एक भिल्लीण ही रामावताराच्या वेळी दक्षिणेत मातग ऋषीची व त्याच्या शिष्याची सेवा करून राहात असे रामचद्र वनवासात असताना जेव्हा या अरण्यात आले तेव्हा हिने रामलक्ष्मण याचे उत्तम स्वागत केले रामाचे आगतस्वागत करून हिने ताजी बोरे रामचद्रास खावयास दिली ती चागली चागली अशी निवडून, चाखून पाहून तिने रामासाठीच केवळ ठेविली होती अशी कल्पना सुदामदेव श्रीकृष्णाचा परममित्र दरिद्री व अशक्तच राहिला, पण श्रीकृष्णभेटीस तो त्याच्या सुवर्णाच्या राजवाड्याकडे निघाला तेव्हा त्याने फडक्यात मूठभर पोहे बाधून घेतले श्रीकृष्णाने मोठ्या प्रेमाने ते कोरडेच खाल्ले अशी कथा आहे

२९७ कोणे तुझा सांग केला अंगीकार। निश्चिंति त्वां थोर मानियेली ॥ १ ॥
कोणे ऐसा तुज उपदेश केला। नको या विठ्ठला शरण जाऊं ॥ २ ॥
तेव्हा तुज कोण घालील पाठीसी। घासील भूमीसी वदन यम ॥ ३ ॥
का रे नागवसी आयुष्य खातो काळ। दिसेदिस बळ क्षीण होतें ॥ ४ ॥
तुका म्हणे यासि सांगा कोणी तरी। विसरला हरी मायबाप ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – अगीकार-स्वीकार, वदन-तोंड, नागवसी-फसतोस

अर्थः–तुझा कुणी स्वीकार केला आहे म्हणून तू एवढ्या निश्चिततेने वागू लागला आहेस ? १ या विठ्ठलाला शरण जाऊ नये असा तुला उपदेश तरी कुणी केला आहे रे ? २ जेव्हा यम पाठीशी लागेल व तुझे तोंड भूमीला लागेल, तेव्हा तुझी बाजू कोण साभाळणार आहे ? ३ उगाच कां आयुष्य फुकट घालवितोस ? नागविला जातोस ? फसतोस ? हा काळ आयुष्य घालवीत बसला आहे ना दिवसेदिवस बळही क्षीण होते ४ तुकाराम महाराज म्हणतात, याला कुणी तरी सांगायला हवे कारण हा मायबाप असा जो श्रीहरी त्यास विसरला आहे. ५

१ भिल्लणीची
तु गाथा . १९

२९८ साधूनी बचनाग खाती तोळा तोळा । आणिकाते डोळा न पाहवे ॥ १ ॥
साधूनी भुजंग धरितील हातीं । आणिके कापती देखोनिया ॥ २ ॥
असाध्य ते साध्य करितां सायास । कारण अभ्यास तुका म्हणे ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा – साधूनी–साधन करून, बचनाग–भयंकर वीष, भुजग–विषारी सर्प, सायास–प्रयत्न

अर्थ –' अभ्यास करून, साधने करून एवढी तयारी होते की दुसऱ्याना डोळ्यानी पाहावणार नाही. काही लोक भयानक असे बचनागाचे वीष लोक तोळा तोळा खातात. १ त्याचप्रमाणे दुसऱ्याना पाहताच थरकाप उडेल असे भयानक विषारी सर्पही हे लोक अगावर धारण करतील. २ तुकाराम महाराज म्हणतात, प्रयत्न केला की सर्व काही साध्य होते जे असाध्य म्हणजे साधावयास कठिण वाटते ते प्रयत्न किंवा अभ्यास केला की सहज प्राप्त होते ३

२९९ आमचे गोसावी अयाचितवृत्ति । करवी शिष्याहातीं उपदेश ॥ १ ॥
दगडाची नाव आधीच ते जड । ते काय दगड तारूं जाणे ॥ २ ॥
तुका म्हणे वेष विटंबिला त्यानीं । सोंगसंपादणी करितो परी ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा – अयाचितवृत्ति–न मागण्याची वृत्ती, परी–प्रकार

अर्थ – आमची वृत्ती गोसाव्यासारखी, न मागण्याची आहे कुणी न मागता काही दिले तरच आम्ही ते घेतो, असे शिष्याकडून सर्वांना सागून काही गुरू दक्षिणा व शिधासामग्री मिळवितात, त्याचा काय उपयोग १ दगड आधीच जड, त्याची नाव दुसऱ्या दगडास कशी तारणार ? २ तुकाराम महाराज म्हणतात, अशा साधुसंतानी जे अशा सोंगसंपादणीचे प्रकार केले, त्यामुळे त्यानी साधुत्वाचे वेष विटाळून टाकले त्या पोषाखाचीच त्यांनी विटबना केली ना ३

३०० मृगजळा काय करावा उतार । पाववया पार[1] पैल थडी ॥ १ ॥
खापराचे होन खेळती लेकुरे । कोण त्या वेव्हारे[2] लाभ हाणि ॥ २ ॥
मंगळदायक करिती कुमारी । काय त्याची खरी सोयरीक ॥ ३ ॥
स्वप्नींचे जें सुखदुःख जाले काहीं । जागृतीं तो नाही साच भाव ॥ ४ ॥
सारीं जालीं मेली लटिकें वचन । बद्ध मुक्त शीण तुका म्हणे ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – पार–पलीकडच्या काठ, होन–नाणे, मगलदायक–लग्नाचा सोहळा

अर्थ – केवळ मृगजळाचीच नदी आहे, तिथे उतार कसला करावा ? पलीकडच्या तीरावर जाण्याची सोय करण्याची येथे काय जरूरी आहे ? १ लहान मुले खापराच्या तुकड्याची नाणी घेऊन व्यापाराचा खेळ खेळतात त्याच्या व्यवहारात किंवा व्यापारात नफातोटा कसला असतो ? २ मुली आपापसात बाहुलाबाहुलींचे लग्न लावतात, पण ती त्याची सोयरीक खरी की काय ? ३ स्वप्नात काही सुखदु ख झाले तरी जागेपणी त्याचा भाव काही खरा नसतो ४ त्याचप्रमाणे या सर्व जगात सारी जन्मास आली, मेली हे वचन खरे नाही आपण बद्ध, आपण मुक्त असे मानणेही व्यर्थ शीण म्हणजे त्रास मात्र आहे ५

विवरण :– या अभगात एक तात्त्विक विचार बुवानी मोठ्या कुशलतेने अनेक प्रकारचे दृष्टान्त देऊन माडला आहे आपण पापी आहोत, आपण बद्ध आहोत, आपण पाशात अडकलेलो आहोत अशी आपली सारखी तक्रार असते व अनत साधने करून आपणास या बधनातून मुक्त व्हायचे असते, परतु एकदा श्रीहरीच्या चरणी मन विसावले की मग हे बधन सुटते, हा पाश मोकळा होतो, म्हणजे बद्धत्वाची अवस्थाच नाही अशी यथार्थ जाणीव होते मृगजळ जसे खोटे, स्वप्नीची सुखदु खे जशी खोटी, बाहुलाबाहुलीची लग्ने जशी खोटी, खापराची नाणी जशी खोटी तसाच बद्धमुक्तीचा भाव खोटाच आहे जीव बद्ध व परमेश्वर मुक्त असे नाही एका थोर भूमिकेवर हा भेदच संपतो

१ तीर, २ व्यापारें

'भुक्त कासया म्हणावें। बंधन तें नाहीं ठावें ॥' असा एक तुकोबाचा अर्थपूर्ण चरण आहे बंधनाची खोटी कल्पना गळली की मुक्तीची कल्पना आपोआपच गळते ना आणि यासाठी थोर संतांनी मोक्ष अथवा मुक्ती याची काळजी कधीच केलेली नाही

३०१ माझें म्हणता याला का रे[1] नाहीं लाज। कन्या पुत्र भाज धन वित्त ॥ १ ॥
कोणी सोडवी ना काळाचे हातींचें। एकाविणें साचे नारायणा ॥ २ ॥
तुका म्हणे किती सांगावे चांडाळा। जेणे जीवकळा[2] कोण्या जोतो ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा – भाज–बायको, जीवकळा–जीवनाचे रहस्य

अर्थ – हा भला गृहस्थ माझें माझें म्हणत असतो, याला लाज कशी वाटत नाही? माझी कन्या, माझा पुत्र, माझी बायको, माझें धन, माझी संपत्ती असे हा म्हणतो याला लाज कशी वाटत नाही? १ प्रत्यक्ष यम येऊन दारात उभा राहिला की एका परमेश्वरावेरीज याला त्याच्या हातून कुणीही सोडविणार नाही २ तुकाराम महाराज म्हणतात, या चांडाळास सांगावे तरी किती? जीवनाचे रहस्य हा जाणीतच नाही कसा तरी जगून राहतो फक्त ३

३०२ आंधळ्यासि जन अवघेचि आंधळे। आपणासि डोळे दृष्टी नाहीं ॥ १ ॥
रोग्या विषतुल्य लागे हें मिष्टान्न। तोंडासि कारण चवी नाहीं ॥ २ ॥
तुका म्हणे शुद्ध नाहीं जो आपण। तया त्रिभुवन अवघें खोटें ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा – विषतुल्य–विषासारखे

अर्थ – आंधळ्या माणसास सर्व जगच आंधळे असे वाटते कारण त्याला स्वतःला डोळे व दृष्टी नाही १ रोगी माणसाला मिष्टान्न वाढले तरी त्याला त्याच्या तोंडास चव नसल्यामुळे ते विषासारखे वाटते २ त्याचप्रमाणे स्वतः शुद्ध भावाचा नाही त्याला सर्व त्रिभुवनही खोटें वाटते ३

३०३ छळी विष्णुदासा कोणी। त्याची अमंगळ वाणी ॥ १ ॥
येऊं न द्यावा समोर। अभागी तो दुराचार ॥ २ ॥
नावडे हरिकथा। त्याची व्यभिचारीण माता ॥ ३ ॥
तुका म्हणे याति। भ्रष्ट तयाची ते मति ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – विष्णुदासा– भक्तास, याति-जात, मति–बुद्धी

अर्थ – जो परमेश्वराच्या भक्तास छळतो त्याची वाणी अमंगल समजावी १ तो अभागी व दुराचारी समजून त्यास समोरसुद्धा येऊ देऊ नये २ ज्याला हरिकथा आवडत नाही त्याची आई व्यभिचारिणी समजावी ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा माणसाची जात भ्रष्ट झालेली समजावी, त्याची बुद्धीही खोटीच मानावी ४

३०४ बोलविसी तैसें आणीं अनुभवा। नाहीं तरी देवा विटंबना ॥ १ ॥
मिठेंविण काय करावें मिष्टान्न[4]। शव जीवेंविण शृंगारिलें ॥ २ ॥
संपादणीविण विटंबिलें सोंग। गुणेंविण चाग रूप हीन ॥ ३ ॥
कन्यापुत्रेंविण मंगळदायकें। वेचिलें हें फिकें द्रव्य तरी ॥ ४ ॥
तुका म्हणे तैसी होते मज परी। न देखें अंतरीं प्रेमभाव ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – शव–प्रेत संपादणी–वतावणीचे आचरण, चाग–चांगले, मंगळदायक–लग्नसमारंभ, वेचिले–खर्च केले, अंतरीं–मनात

१ नाहीं, २ जीवनकळा, ३ हो का तयाची भलती, ४ पक्वान्न

अर्थ – देवा, माझ्याकडून जसे बोलविता तसा अनुभव द्या ना नाही तर सर्वत्र विटंबना होणार आहे माझी १ मिष्टान्न अथवा पक्वान्न जरी झाले तरी मिठाशिवाय त्याची काय गोडी ? जीव नसलेले शरीर शृंगारून काय उपयोग ? २ वतावणी नीट न झाली तर सव सोंग व्यपच आहे चांगले गुण नसतील तर चांगल्या रूपास काय करायचे ? ३ अगणित द्रव्य खर्च केले व बाहुलाबाहुलीचे लग्न केले, त्याचा काहीच उपयोग नाही कारण या लग्नात खरी कन्या किंवा खरा पुत्र यापैकी कोणीच नसते ४ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, काही अनुभव तुम्ही दिला नाही तर माझीही अवस्था अशीच होईल यात सशय नाही ५

३०५ अगीं ज्वर तया नावडे साकर । जन तो इतर गोडी जाणे ॥ १ ॥
एकाचिये तोंडीं पडिली ते माती । अवघे ते खाती पोटभरी ॥ २ ॥
चारिता बळें येत असे दाती । मागोनिया घेती भाग्यवत ॥ ३ ॥
तुका म्हणे नरो सचित हें बरें । तयासि दुसरे काय करी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – ज्वर-ताप सचित-पूवकम

अर्थ –ज्याच्या अगात ताप आहे त्यास साखर गोड लागणार नाही इतर लोकानाच तिची गोडी समजणार १ एखाद्याच्या तोंडात अन्न पडले तर ते मातीसारखे होऊन जाते, पण दुसऱ्याना मात्र ते पोटभर खाल्ल्याचा आनंद मिळतो २ प्रयत्न करून जरी त्याला अन्न चारले तरी ते त्याच्या दाती यते त्याला खाववत नाही, पण दुसरे भाग्यवत असतात ते मात्र आवडीने मागवून घेऊन त्याचा स्वाद लुटतात ३ तुकाराम महाराज म्हणतात एखाद्याचे पूवकर्मच बरे नसेल तर तो काय करणार ? त्याला दुसरा मनुष्य तरी काय करणार ? ४

३०६ धिग जीणे तो बाईले आधीन । परलोक मान नाही दोन्ही ॥ १ ॥
धिग जीणे ज्याचे लोभावरी मन । अतीतपूजन घडेचि ना ॥ २ ॥
धिग जीणे आळस निद्रा जया फार । अमित आहार अघोरिया ॥ ३ ॥
धिग जीणे नाहीं विवेक वैराग्य । झुरे मानालागीं साधुपणा ॥ ४ ॥
तुका म्हणे धिग ऐसे जाले लोक । निंदक वादक नरका जाती ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – धिग-तुच्छ अतीतपूजन-अतिथीचे पूजन अमित-अमर्याद अघोरिया-अघोर कम करणाऱ्यास

अर्थ – जो बाईलवेडा आहे ज्याचे वागण बायकोच्याच तत्राप्रमाण आहे त्याचे जगणे व्यर्थ आहे त्याला या लोकात मान नाही, परलोकात स्थान नाही १ ज्याचे चित्त केवळ लोभावर, फायद्यावरच असते व ज्याला कधी अतिथींचे पूजन घडत नाही त्याचेही जिणे व्यर्थ होय २ ज्या माणसास फार आळस फार झोप, ज्याचे खाणे फार व जो अघोर कर्म करणारा आहे त्याचेही जिणे व्यर्थ आहे ३ ज्याला कुठल्याही गोष्टीचा विवेक नाही, ज्याला वैराग्याचा विचार शिवत नाही, व जो केवळ मानासाठी, साधुत्वाच्या डौलासाठी झुरतो त्याचेही जिणे व्यर्थ आहे ४ तुकाराम महाराज म्हणतात, असे जिणे कित्येक लोकाचे व्यर्थ झाले आहे हे केवळ निंदा करणारे, वाद करणारे असून ते नरकातच जाणारे आहेत ५

३०७ अरे हे देह व्यर्थ जावे । ऐसे जरी तुज व्हावे ।
द्यूतकर्म मनोभावे । सारीपाट खेळावा ॥ १ ॥
मग कैचे हरिचे नाम । निजेलिया जागा राम ।
जन्मोजन्मींचा अधम । दुःख थोर साधिले ॥ २ ॥
विषयसुखाचा लंपट । दासीगमनीं अतिधीट ।
तया तेचि वाट । अधोगती जावया ॥ ३ ॥

अणीक एक कोड । नरका जावयाची चाड ।
तरी संतनिंदा गोड । करीं कवतुकें सदा ॥ ४ ॥
तुका म्हणे ऐसे । मना लावीं राम पिसे ।
नाहीं तरी आलिया सायासे । फुकट जासी ठकोनी ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – कोड–हौस, राम पिसे–देवाची आवड, सायासे–प्रयत्नाने, ठकोनी–फसून

अर्थ – अरे गृहस्था, हा नरजन्म फुकट जावा असे तुला वाटत असेल तर तू द्यूत खेळ ना सारीपाटाचा डाव मांडून सारखा बैस १ मग देवाचे नाव कसले आले आहे? जागा असून झोपल्याचे सोंग जो करतो त्यास कुठला राम ? कुठला देव ? असा हा मनुष्य जन्मोजन्मीचाच अधम समजावा त्याने फार मोठ्या दु:खाचे साधन करून ठेविलेले असते २ जो विषयसुखाविषयी लंपट आहे, दासींशी संबंध ठेवण्यात जो धीट आहे त्याच्या आयुष्याची वाट अशीच अधोगतीचीच मानावयास हवी ३ आणखी कुणास नरकासच जायची हौस असेल तर नेहमी कौतुकाने संतांची निंदा करावी म्हणजे ठीक होईल ४ तुकाराम महाराज म्हणतात, अरे, तुझ्या मनाला रामाचे वेड लावून घे ना नाही तर मोठ्या प्रयत्नाने मिळालेला हा नरजन्म फुकट जाईल ना ! विनाकारण फसशील ना तू ५

३०८ अवघें ब्रह्मरूप रिता नाहीं ठाव । प्रतिमा तो देव कैसा नव्हे ॥ १ ॥
नाहीं भाव तया सांगावें तें किती । आपुलाल्या मतीं पापांडिया ॥ २ ॥
जया भावें संत बोलिले वचन । नाहीं अनुमोदन शाब्दिकासि ॥ ३ ॥
तुका म्हणे संतीं भाव केला बळी । न कळतां खळीं दूषिला देव ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – रिता–रिकामा, ठाव–स्थान, प्रतिमा–मूर्ती, पापांडिया–नास्तिकाना, अनुमोदन–अनुभव, खळीं–दुष्ट लोकाना

अर्थ – सर्व जगच ब्रह्मरूप आहे रिकामी जागा कुठही नाही, असे असताना मूर्तीत देव नाही असे कसे म्हणता ? १ ज्याच्या मनांत भावच नाही, त्याना सांगावे तरी किती ? असे नास्तिक लोक आपापल्या मतानाच धरून असतात २ संत ज्या भावनेने बोलतात त्याची प्रचीती केवळ शब्दज्ञान करून घेणाराना येत नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, संतानी केवळ भावालाच बलवान केले, महत्त्व दिले पण हे रहस्य न कळल्यामुळे दुष्ट लोकानी देवालाच दूषण दिले ४

विवरण – तुकारामादी संत हे सगुण ध्यानाचे मोठे उपासक होत निर्गुण, निराकारच आपल्या आवडीसाठी देव व भक्त यांच्या रूपाने प्रकट झाला सगुणावर ध्यान केंद्रित करणे सुलभ झाले हा देव भक्ताला आलिंगन देण्यासाठी दोन सोडून चार हात धारण करून प्रकट होत राहिला यास नाना आकारानी व रूपानी सौंदर्य प्राप्त झाले देवाची खूण म्हणून एखादी मूर्ती वा एखादी प्रतिमा समोर आली म्हणून काही बिघडते असे नाही सर्वत्र ब्रह्मतत्त्व पसरले आहे किंवा ब्रह्मतत्त्वच सर्व चराचर विश्वात व्यक्त झाले आहे असे असेल तर प्रतिमेत किंवा मूर्तीत ते नाही असे म्हणता येणार नाही मग मूर्तीवर भाव ठेवून तिची भक्ती केल्यास बिघडले कुठे ? असा तुकोबाच्या म्हणण्याचा भावार्थ, अधिक विवेचन क्र २६२ च्या अभंगावरील पाहावे

३०९ एक तटस्थ मानसीं । एक सहजचि आळसी ॥ १ ॥
दोन्ही दिसती सारिखीं । वर्म जाणे तो पारखी ॥ २ ॥
एक ध्यानीं करिती जप । एक बैसुनि घेती झोप ॥ ३ ॥
एका सर्वस्वाचा त्याग । एका पोटासाठीं जोग ॥ ४ ॥
एका भक्ति पोटासाठीं । एका देवासवें गांठी ॥ ५ ॥
वर्म पोटीं एकां । फळें दोन म्हणे तुका ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – मानसीं–मनात, वर्म–खूण, रहस्य, जोग–भिक्षा

अर्थ – कुणी एक मनुष्य तटस्थ राहून ध्यानात मग्न आहे व दुसरा स्वभावत च आळशी आहे १ ही दोनही माणसे एकसारखी वरवर दिसतात पण दोहोंच्यांतील फरक जाणणारे असतात तेच खरे पारख करणारे होत २ कुणी खरोखरीची ध्यानधारणा करतात, जपजाप्य करतात व दुसरे नुसतीच झोप काढतात, पण दोहोंत फारच फरक आहे ३ एकाचा त्याग सर्वस्वाचा असून चित्त प्रभूशी रममाण झालेले असते, तर दुसऱ्या ढोंगी माणसाचे काम केवळ पोटासाठी भिक्षा मागण्याचे होते ४ एकाची भक्ती पोटासाठी असते, तर दुसऱ्याची देवाची भेट घेण्यासाठी असते ५ या बाबतीतील रहस्य तुकाराम महाराज म्हणतात असे आहे की, वरवर एकसारख्या दिसणाऱ्या कर्मांचे फळ मात्र भिन्न भिन्न असते ६

३१० काय कळे बाळा । बाप सदैव दुबळा ॥ १ ॥
आहे नाहीं हे न कळे । हातीं काय कोण्या वेळे ॥ २ ॥
देखिले तें दृष्टी । मागे घालूनिया मिठी ॥ ३ ॥
तुका म्हणे भावे । माझ्या मज समजावें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – सदैव–भाग्यवत

अर्थ – आपला बाप भाग्यवत आहे की दुबळा दरिद्री आहे, हे काय लहान मुलाला समजत असते ? १ आपण मागीत आहोत ती वस्तू बापाजवळ आहे की नाही हे काय त्यावेळी मुलाला समजत असते का ? २ त्याला एवढेच माहीत असते की, जे पाहिले ते मागायचे, बापाला मिठी घालून त्याचा हट्ट धरायचा ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, याच भावाने मी तुम्हास मागत आहे माझी समजूत काढावी ४

३११ भजन घाली भोगावरी । अकर्तव्य[1] मनीं धरी ॥ १ ॥
धिग त्याचे साधुपण । विटाळूनी वर्ते मन ॥ २ ॥
नाहीं वैराग्याचा लेश । अर्थचाड जीवे आस[2] ॥ ३ ॥
हे ना ते से जाले । तुका म्हणे वाया गेले ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – अकर्तव्य–जे करू नये ते कर्म जीवें–मनापासून, जीवे–जिवत राहता

अर्थ – या माणसाचे भजन भोगासाठीच असते जे कर्म करू नये त्यासाठी, भोगासाठीच त्याचा तरही करता येणार नाही अशाच्या प्राप्तीसाठीच हे भजन त्याचे असते १ अशा माणसाच्या साधुत्वाचा धिक्कार असो त्याचे मन विटाळूनच जगात वावरत असते २ त्याच्या मनात वैराग्याचा लेशही नसतो त्याला पैशाची हौस मनापासून असते त्यासाठीच तो जगत असतो ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा माणसाला काही प्राप्त होत नाही त्याला इहलोकी समाधान मिळत नाही त्यास परलोकातही स्थान नसते त्याचे जीवितच वाया गेलेले असते ४

३१२ एकादशीस अन्न पान । जे नर करीती भोजन ।
श्वानविष्ठे समान । अधम जन तो एक ॥ १ ॥
ऐका व्रताचे महिमान । नेमें आचरती जन ।
गाती ऐकती हरिकीर्तन । ते समान विष्णूशीं ॥ २ ॥
अशुद्ध विटाळसीचे खळ । विष्ठा भक्षिता सांबूळ ।
सापडे सबळ । काळाहातीं न सुटे ॥ ३ ॥
सेज बाज विलास भोग । करी कामिनीशीं संग ।
तया जोडे क्षयरोग । जन्मव्याधी बळिवंत ॥ ४ ॥

---

[1] अनकर्य त [2] जीवे आस

आपण न वजे हरिकीर्तना । अणिका वारी जाता कोणा ।
त्याच्या पापें जाणा । ठेंगणा महा मेरु ॥ ५ ॥
तया दंडी यमदूत । जाले तयाचे अंकित ।
तुका म्हणे व्रत । एकादशी चुकलीया ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – अधम–दुष्ट खळ–दुष्ट, न वजे–जात नाही, वारी–अडवळा आणता

अर्थ – जे लोक एकादशीच्या दिवशी अन्न खातात, सुग्रास अन्नाचे भोजन करतात, त्यांचे खाणे कुत्र्याच्या विष्ठेप्रमाणे समजावे तो माणसेही अधमच म्हणावीत १ या थोर एकादशी व्रताचे माहात्म्य ऐका याचे आचरण लोक नित्यनेमाने करतात या दिवशी लोक परमेश्वराचे कीर्तन करतात, स्वत त्याचे स्तवन गातात, ऐकतात असे लोक प्रत्यक्ष विष्णूसारखेच होत २ या दिवशी विडा खाल्ला तर ते खाणे विटाळशीच्या विटाळाप्रमाणे अशुद्ध मानावे असा पापी मनुष्य बलिष्ठ अशा यमाच्या हातातच सापडत असतो तो काही त्याच्या हातून सुटणार नाही ३ या दिवशी जो खाली शय्या करून स्त्रीशी विलास भोग करतो त्याला क्षयरोग जडतो त्याला जन्माच्या भयंकर अशा व्याधी जडतात ४ असा हा दुष्ट मनुष्य आपण स्वत हरिकीर्तनास तर जात नाहीच, पण दुसरे कोणी जात असतील तर तो अडवळा आणतो याची पापे फार मोठी असतात, त्याच्यापुढे मेरूपर्वत ठेंगणाच वाटावा ५ त्याला यमदूत नेहमीच शिक्षा देतात, ते त्याचेच अंकित होतात तुकाराम महाराज म्हणतात, एकादशी व्रत न केल्याने असा हा परिणाम होतो ६

विवरण – भागवत संप्रदायात एकादशी महाव्रताचे माहात्म्य फार मोठे सांगितले आहे या दिवशी उपवास करून दिवस व रात्र हरिभजनात, नामसंकीर्तनात, प्रभुचिंतनात घालविण्याचा प्रघात आहे विठ्ठलाच्या भक्तांना या एकादशीचे महत्त्व विशेष वाटते मन व वाणी पवित्र असावी, ध्यानधारणा सुलभ व्हावी आत्मचिंतनास सुकरता यावी म्हणून एकादशीचा उपवास सांगितला आहे तुकोबांनी या एकादशी माहात्म्यास वारंवार उचलून धरले आहे न यासाठीच ‘ जया नाहीं नेम एकादशीव्रत । जाणावें तें प्रेत सव लोकीं ’, ‘ एकादशी व्रत सोमवार न करिती । कोण त्यांची गति होईल नेणा ’ ‘ पंधरा दिवसा एक एकादशी । कां रे न करिसी व्रतसार ।’ इत्यादी ओळीतून त्यांना एकादशीचे महत्त्व सांगितले आहे एकनाथांनी एकादशीमाहात्म्य नावाचे स्वतंत्र प्रकरणच लिहिले आहे ‘ अनंत व्रताचिया राशी । पाया लागती एकादशी ।’ असे म्हणून एकादशी व्रत कसे आचरावे हेही त्यांनी विस्ताराने सांगितले आहे तुकारामबुवाप्रमाणेच त्यांनीही म्हटले आहे,

‘ज्यासी न माने एकादशी । तनू जाणावी ती राक्षसी । त्यासी संगती घडे ज्यासी । नरकवासी तो होय ॥ जे एकादशीस भक्षिती अन्न । ते श्वानविष्ठेसमान । तांबुल तें रुधिरपान । रजस्वले स्त्रियेचे । एकादशीस स्त्रीभोग । त्यासी लागे क्षयरोग । यमयातना दु खें अनेक । व्यथा अंगीं तो पावे ॥ जो निंदी एकादशी । नरका जाणे न लगे त्यासी । तो स्वयेंचि नरकवासी । म्हणो आतळला ॥’

उलट जे एकादशी व्रत नियमाने करतात त्यांचे भाग्य कसे असते ? एकनाथांनीच वर्णन केले आहे

‘ जो एकादशी व्रत धरी । तो अतिशय पढिये हरी । या लागी देव त्याचे घरीं । निरंतरी तिष्ठत ॥ जर्थे राहिले हरि वरिष्ठ । तोचि आश्रम होय श्रेष्ठ । ब्रह्मानंदें पिकली पेठ । ग्राहिक तेथें हरिभक्त ॥ ऐसे एकादशीचे व्रत । निर्विकल्प जे आचरत । त्याचे घरीं हरि तिष्ठत । कांतेसहवर्तमान ॥ मापरी एकादशी । भक्त उद्धरती दोष पक्षीं । मोक्षाचिया राशी । तिथियात्रा जोडिती ॥ धरीं जरी व्रतासी दृढभाव । तरी सबाह्य प्रकट देव । करुनी संसार वाव । निजात्मठाव निजपदीं ॥ जो एकादशीचा व्रती, त्यासी तीर्थे पैं सेविती । तेथे पुण्यें भगवप्राप्ती । क्षणमात्र न लागता ॥ ’

या एकादशी व्रताची कथा व माहात्म्य याचे वर्णन पुराणातून आले आहे भागवताच्या नवम स्कंधातील अध्याय चार तें सहामध्ये अंबरीष राजाचे आख्यान आले आहे द्वादशीच्या दिवशी त्याच्या येथे दुर्वास ऋषी अतिथी म्हणून आले त्यांना भोजनास येण्यास उशीर झाला, पण व्रतभंग होऊ नये म्हणून या भगवद्भक्त राजाने तीर्थ घेऊन

एकादशी सोडली त्यामुळे दुर्वास रागावले आपल्या जटेतून त्यानी एक कृत्या निर्माण करून अबरीषावर सोडली राजा विष्णुभक्त असल्यामुळे सुदर्शनचक्र दुर्वासाच्या पाठीमागे लागले दुर्वास धावरून अखेर राजाकडे आले एक वर्षाच्या उपवासानतर त्याने मग दुर्वासासह भोजन करून पारणे फेडले हा अबरीष राजा असा विष्णुभक्त होता हा वार्शी येथील राहणारा असून वारकरी पथीयाना बार्शीच्या भगवानाचे दर्शन यासाठीच प्रिय आहे

३१३ करविता व्रत अर्धे पुण्य लाभे । मोडविता दोघें नरका जाती ॥ १ ॥
शुद्धबुद्धि होय[1] दोघा एक मान । चोरासवे कोण जिवे राखे ॥ २ ॥
आपुले देऊनी आपुलाचि घात । न करावा थोत जाणोनिया ॥ ३ ॥
देऊनिया वेच धाडी वाराणसी । नेदावे चोरासि चद्रवळ ॥ ४ ॥
तुका म्हणे तप तीर्थ व्रत याग । भक्ति हे मारग मोडू नये ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – थोत–व्यर्थ, वेच–खर्च, चद्रबळ–चद्राचे बळ मारग–मार्ग

अर्थ – कुणाकडून का होईना पण एखादे व्रत करविले तर त्यास अर्धे पुण्य लागते त्या व्रताचा भग केला तर मात्र दोघेही नरकास जातात १ दोघाचीही बुद्धी शुद्ध असली तरच दोघाची मनेही एकच होतात चोराच्या सगतीत कुणाला स्वत च्या जिवाची शाश्वती वाटणार ? २ आपले देऊन आपलाच घात होणार असेल तर तसे व्यर्थ न करणे हेच योग्य नाही का ? ३ एखादा काशीयात्रेस जात असेल तर त्याला खर्चासाठी पैसे देऊन पाठवावे पण चोरास मात्र चद्राचे बळ अनुकूल असल्याचेही सागू नये ४ तुकाराम महाराज म्हणतात, तीर्थव्रत याग हा भक्तीचा मार्ग आहे, तो सोडू नये कधी ५

३१४ इनामाची भरली पेठ । वाहाती दाट मारग ॥ १ ॥
अवघेची येती वाण । अवघे शकुन लाभाचे ॥ २ ॥
अडचणी त्या केल्या दुरी । देण्या उरी घेण्याच्या ॥ ३ ॥
तुका म्हणे जोडी जाली । ते आपुली आपणा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – वाण–जिनस उरी–बाकी

अर्थ –या पढरपुरात भक्तजनाचे घनदाट मार्ग सुरू झाले आहेत ही एक त्याची इनामाची पेठच आहे १ या पेठेत सर्व वस्तू येतात येथे सर्व शकुन लाभदायक होतात २ या ठिकाणी सर्व प्रकारच्या अडचणी दूर होतात, देण्याघेण्यातील बाकी येथे काही उरत नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, या पेठेत ज्याने आपला स्वत चाच लाभ करून घेतला तो धन्य होय ४

३१५ वेदाचे गव्हर न कळे पाठका । अधिकार लोका नाहीं येरा ॥ १ ॥
विठोबाचे नाम सुलभ सोपारें । तारी एक सरे भवसिंधु ॥ २ ॥
जाणत्या असाध्य मत्र तत्र काळ । येर तो सकळ मूढ लोक ॥ ३ ॥
तुका म्हणे विधि निषेध लोपला । उच्छेद या जाला मारगाचा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – गव्हर–अतरग मर्म सोपारें–सोपे एकसरें–एकदम

अर्थ –नुसते शब्द पाठ करणाऱ्या शास्त्रीपडिताना वेदाचा अर्थ समजत नाही व दुसऱ्याही लोकाना त्याचा अधिकार नाही १ एका विठ्ठलाचेच नाव सहज, सुलभ व सोपे आहे ते एकदम ससारसागर तरून नेण्यास समर्थ आहे २ जे केवळ मत्र, तत्र व काळवेळ मानाव जाणतात त्याना मात्र हे असाध्य आहे, व इतर लोक तर मूर्खच आहेत ३ तुकाराम महाराज म्हणतात विधिनिषेध सपल्यामुळे या मार्गाचा नाश झाला आहे ४

[1] दोघा होय

३१६ विधीनें सेवन । विषयत्यागातें समान ॥ १ ॥
मुख्य धर्म देव चित्तीं । आदि अवसान अंतीं ॥ २ ॥
बहु अतिशय खोटा । तर्कें होती बहु वाटा ॥ ३ ॥
तुका म्हणे भावें । कृपा करीजेते देवें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– विधीनें–योग्य मार्गानें, आदि–प्रारंभ, अवसान–शेवट.

अर्थ :–योग्य मार्गानें किंवा शास्त्र सांगेल त्या मार्गानें विषयसेवन केले तर ते विषयत्यागाएवढेच श्रेष्ठ होय. १ या धर्माचे मुख्य रहस्य असे की देह धारण केल्यापासून तो तो नष्ट होईपर्यंत देवास मनात वागवावे हे उत्तम. २ कोणत्याही गोष्टीची अतिशय चिकित्सा खोटी आहे; कारण केवळ बुद्धीच्या वाटेने, केवळ तर्काच्या मार्गाने पुष्कळ पर्यायांच्या वाटा निर्माण होऊन कार्यनाश मात्र होतो. ३ तुकाराम महाराज म्हणतात, ईश्वराविषयी एकचित्ताने भाव ठेविल्यासच त्याची कृपा प्राप्त होते. ४

३१७ येथींचिया अळंकारें । काय खरें पूजन ॥ १ ॥
वैकुंठींच्या लावूं वाटा । सर्व सांटा ते ठायीं ॥ २ ॥
येथींचिया नाशवंतें । काय रितें चाळवूं ॥ ३ ॥
तुका म्हणे वैष्णव जन । माझे गण समुदाय ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:–येथींचिया–या जगातील, साटा–साठा, गण–समुदाय

अर्थ :– या लोकातील अलंकाराने भूषविणे हे काय खरे पूजन आहे ? हे तर सर्व नाश पावणारे अलंकार होत १ म्हणून वैकुंठाच्या वाटा निर्माण करू. कारण सर्व सुखांचा साठा तिथे आहे. २ या जगातील सर्वच प्रकार नाशवंत आहेत. मग त्यांच्या नादाने उगाचच लोकाना कशासाठी फसवू ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, वैष्णवजन किंवा विष्णुभक्त हाच माझा आवडता समुदाय आहे. तोच मला प्रिय आहे. ४

३१८ उजळावया आलों वाटा । खरा खोटा निवाड ॥ १ ॥
बोलविले बोल बोलें । धनीविठ्ठला सन्निध ॥ २ ॥
तरी मनीं नाहीं शंका । बळें एका स्वामींच्या ॥ ३ ॥
तुका म्हणे नये आम्हां । पुढें कामा गबाळ ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :–उजळावया–स्वच्छ करण्यासाठी

अर्थ :– भक्तिमार्गाच्या वाटा स्वच्छ करण्यासाठी, त्याच्यावर प्रकाश टाकण्यासाठीच मी येथे आलो आहे. मला खऱ्याखोट्याचा निवाडा करावयाचा आहे. १ ईश्वर, विठ्ठल हा माझा धनी आहे. तो ज्याप्रमाणे बोलवील त्याप्रमाणे मी बोलतो. २ त्या माझ्या स्वामीच्या पाठबळामुळे मी बोलत असल्याने मला कसलीच शंका नसते ३ तुकाराम महाराज म्हणतात, आमच्यापुढे गबाळ्यासारखे काम कधीच चालणार नाही. ४

विवरण– या एका लहानशा अभगात तुकारामबुवा आपल्या आयुष्याचा हेतू स्पष्टपणे सागत आहेत. आपण जे बोलत आहोत तो देवाचाच निरोप आहे अशी भावना त्यांची नेहमीच होती. भाडार फोडून तो धन्याचा माल आपण भारवाहीप्रमाणे वाहतो अशी त्यांची श्रद्धा होती जो कृपावत सखा पाडुरग तोच बोलविता असून आपली वाणी त्याचीच आहे असे ते वारवार सागतात. 'नव्हती माझे बोल बोले पाडुरंग ।' अशी त्यांची निष्ठा होती आपण भक्तिमार्गाचा प्रसार करण्यास आलो आहोत, सताचा मार्ग स्वच्छ करावयास आलो आहोत, जग सर्व अडरानात सापडले असून त्याच्या वाटा स्वच्छ करण्यासाठी आपण आहोत असेही ते अनेकदा बोलतात

एकादशी सोडली त्यामुळे दुर्वास रागावले आपल्या जटेतून त्यांनी एक कृत्या निर्माण करून अंबरीषावर सोडली राजा विष्णुभक्त असल्यामुळे सुदर्शनचक्र दुर्वासाच्या पाठीमागे लागले दुर्वास धावरून अखेर राजाकडे आले एक वर्षाच्या उपवासानंतर त्याने मग दुर्वासासह भोजन करून पारणे फेडले हा अंबरीष राजा असा विष्णुभक्त होता हा वार्शी येथील राहणारा असून वारकरी पंथीयाना वार्शीच्या भगवानाचे दर्शन यासाठीच प्रिय आहे

३१३ करविता व्रत अर्धे पुण्य लाभे । मोडविता दोघे नरका जाती ॥ १ ॥
शुद्धबुद्धि होय[1] दोघां एक मान । चोरासवे कोण जिवें राखे ॥ २ ॥
आपुले देऊनी आपुलाचि घात । न करावा थीत जाणोनिया ॥ ३ ॥
देऊनिया वेच धाडी वाराणसी । नेदावे चोरासि चंद्रबळ ॥ ४ ॥
तुका म्हणे तप तीर्थ व्रत याग । भक्ति हे मारग मोडू नये ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा.– थीत–व्यय, वेच–खर्च, चंद्रबळ–चंद्राचे बळ, मारग–मार्ग

अर्थ –कुणाकडून का होईना पण एखादे व्रत करविले तर त्यास अर्धे पुण्य लागते त्या व्रताचा भंग केला तर मात्र दोघेही नरकास जातात. १ दोघांचीही बुद्धी शुद्ध असली तरच दोघांची मनेही एकच होतात चोराच्या संगतीत कुणाला स्वत च्या जिवाची शाश्वती वाटणार ? २ आपले देऊन आपलाच घात होणार असेल तर ते व्यर्थ न करणे हेच योग्य नाही का ? ३ एखादा काशीयात्रेस जात असेल तर त्याला खर्चासाठी पैसे देऊन पाठवावे पण चोरास मात्र चंद्राचे बळ अनुकूल असल्याचेही सांगू नये ४ तुकाराम महाराज म्हणतात, तीर्थव्रत, याग हा भक्तीचा मार्ग आहे, तो सोडू नये कधी ५

३१४ हरिनामाची भरली पेठ । वाहाती दाट मारग ॥ १ ॥
अवघेची येती वाण । अवघे शकुन लाभाचे ॥ २ ॥
अडचणी त्या केल्या दुरी । देण्या उरी घेण्याच्या ॥ ३ ॥
तुका म्हणे जोडी जाली । ते आपुली आपणा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – वाण–जिनस, उरी–बाकी

अर्थ :–या पंढरपुरात भक्तजनाचे घनदाट मार्ग सुरू झाले आहेत ही एक त्याची हरिनामाची पेठच आहे १ या पेठेत सर्व वस्तू येतात येथे सर्व शकुन लाभदायक होतात २ या ठिकाणी सर्व प्रकारच्या अडचणी दूर होतात, देण्याघेण्यातील बाकी येथे काही उरत नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, या पेठेत ज्याने आपला स्वत चाच लाभ करून घेतला तो धन्य होय ४

३१५ वेदाचे गव्हर न कळे पाठका । अधिकार लोकां नाहीं येरां ॥ १ ॥
विठोबाचे नाम सुलभ सोपारें । तारी एक सरे भवसिंधु ॥ २ ॥
जाणतया असाध्य मंत्र तंत्र काळ । येर तो सकळ मूढ लोक ॥ ३ ॥
तुका म्हणे विधि निषेध लोपला । उच्छेद या जाला मारगाचा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – गव्हर–अंतरंग, मर्म सोपारें–सोपे, एकसरें–एकदम

अर्थ –नुसते शब्द पाठ करणाऱ्या शास्त्रीपंडितांना वेदाचा अर्थ समजत नाही व दुसऱ्याही लोकांना त्याचा अधिकार नाही १ एका विठ्ठलाचेच नांव सहज, सुलभ व सोपे आहे ते एकदम संसारसागर तरून नेण्यास समर्थ आहे २ जे केवळ मंत्र, तंत्र काळवेळ यांनाच जाणतात त्यांना मात्र हे असाध्य आहे, व इतर लोक तर मूर्खच आहेत. ३ तुकाराम महाराज म्हणतात, विधिनिषेध लपल्यामुळे या मार्गाचा नाश झाला आहे ४

---

१ दोघां होय

३१६ विधीनें सेवन । विषयत्यागातें समान ॥ १ ॥
मुख्य धर्म देव चित्तीं । आदि अवसान अंतीं ॥ २ ॥
बहु अतिशय खोटा । तर्के होती बहु वाटा ॥ ३ ॥
तुका म्हणे भावें । कृपा करीजेते देवें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- विधीनें-योग्य मार्गाने, आदि-प्रारंभ, अवसान-शेवट

अर्थ :- योग्य मार्गाने किंवा शास्त्र सांगेल त्या मार्गाने विषयसेवन केले तर ते विषयत्यागाएवढेच श्रेष्ठ होय. १ या धर्माचे मुख्य रहस्य असे की देह धारण केल्यापासून तो तो नष्ट होईपर्यंत देवास मनात वागवावे हे उत्तम. २ कोणत्याही गोष्टीची अतिशय चिकित्सा खोटी आहे; कारण केवळ बुद्धीच्या वाटेने, केवळ तर्काच्या मार्गाने पुष्कळ पर्यायाच्या वाटा निर्माण होऊन कार्यनाश मात्र होतो. ३ तुकाराम महाराज म्हणतात, ईश्वराविषयी एका-चित्ताने भाव ठेविल्यासच त्याची कृपा प्राप्त होते. ४

३१७ येथींचिया अळंकारें । काय खरें पूजन ॥ १ ॥
वैकुंठींच्या लावूं वाटा । सर्व सांटा ते ठायीं ॥ २ ॥
येथींचिया नाशवंतें । काय रिते चाळवूं ॥ ३ ॥
तुका म्हणे वैष्णव जन । माझे गण समुदाय ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा -येथींचिया-या जगातील, सांटा-साठा, गण-समुदाय

अर्थ - या लोकातील अलंकाराने भूषविणे हे काय खरे पूजन आहे ? हे तर सर्व नाश पावणारे अलंकार होत १ म्हणून वैकुंठाच्या वाटा निर्माण करू. कारण सर्व सुखाचा साठा तिथे आहे. २ या जगातील सर्वच प्रकार नाशवंत आहेत. मग त्याच्या नादाने उगाचच लोकाना कशासाठी फसवू ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, वैष्णवजन किंवा विष्णुभक्त हाच माझा आवडता समुदाय आहे. तोच मला प्रिय आहे. ४

३१८ उजळावया आलों वाटा । खरा खोटा निवाड ॥ १ ॥
बोलविले बोल बोले । धनीविठ्ठला सन्निध ॥ २ ॥
तरी मनीं नाहीं शंका । बळें एका स्वामीच्या ॥ ३ ॥
तुका म्हणे नये आम्हां । पुढें कामा गबाळ ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :-उजळावया-स्वच्छ करण्यासाठी

अर्थ - भक्तिमार्गाच्या वाटा स्वच्छ करण्यासाठी, त्याच्यावर प्रकाश टाकण्यासाठीच मी येथे आलो आहे. मला खऱ्याखोट्याचा निवाडा करावयाचा आहे १ ईश्वर, विठ्ठल हा माझा धनी आहे. तो ज्याप्रमाणे बोलवील त्याप्रमाणे मी बोलतो २ त्या माझ्या स्वामीच्या पाठबळामुळे मी बोलत असल्याने मला कसलीच शंका नसते ३ तुकाराम महाराज म्हणतात, आमच्यापुढे गबाळ्यासारखे काम कधीच चालणार नाही. ४

विवरण- या एका लहानशा अभंगात तुकारामबुवा आपल्या आयुष्याचा हेतू स्पष्टपणे सांगत आहेत आपण जे बोलत आहोत तो देवाचाच निरोप आहे अशी भावना त्यांची नेहमीच होती भांडार फोडून तो धन्याचा माल आपण भारवाहीप्रमाणे वाहतो अशी त्यांची श्रद्धा होती जो कृपावंत सखा पांडुरंग तोच बोलविता असून आपली वाणी त्याचीच आहे असे ते वारंवार सांगतात 'नव्हती माझे बोल बोले पांडुरंग।' अशी त्यांची निष्ठा होती आपण भक्तिमार्गाचा प्रसार करण्यास आलो आहोत, संताचा मार्ग स्वच्छ करावयास आलो आहोत, जग सर्व आडरानात सापडले असून त्याच्या वाटा स्वच्छ करण्यासाठी आपण आहोत असेही ते अनेकदा बोलतात

नेदी होऊ तुटी । मेळवीन दृष्टादृष्टी ॥ ३ ॥
तुका म्हणे देवा । चिंतन ते तुझी सेवा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – वर्म–रहस्य भावें–तुजविषयीच्या भक्तिभावामुळे, कासवाचे परी–आपले सर्व अवयव पोटाशी धरून कासव ज्याप्रमाणे असतें तसें

अर्थ – देवा, तुझे रहस्य मला माझा जो तुजविषयी भक्तिभाव आहे त्यामुळे सापडले आहे १ कासवाप्रमाणे मी सर्व अवयव आत धरून तुझें रूप मनात साठवून ठेवीन २ तुझ्या रूपाची व माझी तुटातूट होऊ देणार नाही [illegible] दृष्टीस दृष्टी मिळवून राहीन ३ तुकाराम महाराज म्हणतात देवा तुमचे चिंतन हीच खरी तुमची सेवा आहे ४

३२५ गहू एक जाती । परी त्या पाधाणी नासिती ॥ १ ॥
धर्म जाणावे ते सार । कोठें काय थोडें फार ॥ २ ॥
कमाईच्या सारें । जाति दाविती प्रकार ॥ ३ ॥
तुका म्हणे मोल । गुणा मिथ्या फिके बोल ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा –पाधाणी–आडाणी बायका, कमाई–मेहनत

३१६ विधीनें सेवन । विषयत्यागातें समान ॥ १ ॥
मुख्य धर्म देव चित्तीं । आदि अवसान अंतीं ॥ २ ॥
बहु अतिशय खोटा । तर्कें होती बहु वाटा ॥ ३ ॥
तुका म्हणे भावें । कृपा करीजेते देवें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– विधीनें–योग्य मार्गाने, आदि–प्रारंभ, अवसान–शेवट

अर्थ :– योग्य मार्गाने किंवा शास्त्र सांगेल त्या मार्गाने विषयसेवन केले तर ते विषयत्यागाएवढेच योग्य होय. १ या धर्माचे मुख्य रहस्य असे की देह धारण केल्यापासून तो तो नष्ट होईपर्यंत देवास मनात बाळगावे हे उत्तम. २ कोणत्याही गोष्टीची अतिशय चिकित्सा खोटी आहे; कारण केवळ बुद्धीच्या वाटेने, केवळ तर्काच्या मार्गाने पुष्कळ पर्यायांच्या वाटा निर्माण होऊन कार्यनाश मात्र होतो. ३ तुकाराम महाराज म्हणतात, ईश्वराविषयी एकचित्ताने भाव ठेविल्यासच त्याची कृपा प्राप्त होते. ४

३१७ येर्‍हींचिया अळंकारें । काय खरें पूजन ॥ १ ॥
वैकुंठींच्या लावूं वाटा । सर्व सांटा ते ठायीं ॥ २ ॥
येर्‍हींचिया नाशवंतें । काय रितें चाळवूं ॥ ३ ॥
तुका म्हणे वैष्णव जन । माझे गण समुदाय ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :–येर्‍हींचिया–या जगातील, सांटा–साठा, गण–समुदाय

अर्थ :– या लोकातील अलंकाराने भूषविणे हे काय खरे पूजन आहे ? हे तर सर्व नाश पावणारे अलंकार होत. १ म्हणून वैकुंठाच्या वाटा निर्माण करू. कारण सर्व सुखाचा साठा तिथे आहे. २ या जगातील सर्वच प्रकार नाशवंत आहेत. मग त्यांच्या नादाने उगाचच लोकांना कशासाठी फसवू ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, वैष्णवजन किंवा विष्णुभक्त हाच माझा आवडता समुदाय आहे. तोच मला प्रिय आहे. ४

३१८ उजळावया आलों वाटा । खरा खोटा निवाड ॥ १ ॥
बोलविले बोल बोले । धनीविठ्ठला सन्निध ॥ २ ॥
तरी मनीं नाहीं शंका । बळें एका स्वामींच्या ॥ ३ ॥
तुका म्हणे नये आम्हां । पुढें कामा गबाळ ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :–उजळावया–स्वच्छ करण्यासाठी

अर्थ :– भक्तिमार्गाच्या वाटा स्वच्छ करण्यासाठी, त्याच्यावर प्रकाश टाकण्यासाठीच मी येथे आलो आहे. मला खऱ्याखोट्याचा निवाडा करावयाचा आहे. १ ईश्वर, विठ्ठल हा माझा धनी आहे. तो ज्याप्रमाणे बोलवील त्याप्रमाणे मी बोलतो. २ त्या माझ्या स्वामीच्या पाठबळामुळे मी बोलत असल्याने मला कसलीच शंका नसते ३ तुकाराम महाराज म्हणतात, आमच्यापुढे गबाळ्यासारखे काम कधीच चालणार नाही. ४

विवरण– या एका लहानशा अभंगात तुकारामबुवा आपल्या आयुष्याचा हेतू स्पष्टपणे सांगत आहेत आपण जे बोलत आहोत तो देवाचाच निरोप आहे अशी भावना त्यांची नेहमीच होती भांडार फोडून तो धन्याचा माल आपण भारवाहीप्रमाणे वाहतो अशी त्यांची श्रद्धा होती. जो कृपावंत सखा पांडुरंग तोच बोलविता असून आपली वाणी त्याचीच आहे असे ते वारंवार सांगतात 'नव्हती माझे बोल बोले पांडुरंग ।' अशी त्यांची निष्ठा होती आपण भक्तिमार्गाचा प्रसार करण्यास आलो आहोत, सताचा मार्ग स्वच्छ करावयास आलो आहोत, जग सर्व आडरानात सापडले असून त्याच्या वाटा स्वच्छ करण्यासाठी आपण आहोत असेही ते अनेकदा बोलतात

एकादशी सोडली. त्यामुळे दुर्वास रागावले. आपल्या जटेतून त्यानी एक कृत्या निर्माण करून अंबरीषावर सोडली राजा विष्णुभक्त असल्यामुळे सुदर्शनचक्र दुर्वासाच्या पाठीमागे लागले दुर्वास धावरून अखेर राजाकडे आले. एक वर्षाच्या उपवासानतर त्याने मग दुर्वासासह भोजन करून पारणे फेडले. हा अंबरीष राजा असा विष्णुभक्त होता हा वार्शी येथील राहणारा असून वारकरी पंथीयाना वार्शीच्या भगवानाचे दर्शन यासाठीच प्रिय आहे

३१३ करवितां व्रत अर्धे पुण्य लाभे । मोडवितां दोघें नरका जाती ॥ १ ॥
शुद्धबुद्धि होय[1] दोघां एक मान । चोरासवें कोण जिवें राखे ॥ २ ॥
आपुलें देऊनी आपुलाचि घात । न करावा थीत जाणोनियां ॥ ३ ॥
देऊनियां वेच धाडी वाराणसी । नेदावें चोरासि चंद्रबळ ॥ ४ ॥
तुका म्हणे तप तीर्थ व्रत याग । भक्ति हे मारग मोडूं नये ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा:- थीत–व्यर्थ, वेच–खर्च, चद्रबळ–चद्राचे बळ, मारग–मार्ग

अर्थ – कुणाकडून का होईना पण एखादे व्रत करविले तर त्यास अर्धे पुण्य लागते. त्या व्रताचा भंग केला तर मात्र दोघेही नरकास जातात. १ दोघाचीही बुद्धी शुद्ध असली तरच दोघांची मनेही एकच होतात. चोराच्या संगतीत कुणाला स्वत:च्या जिवाची शाश्वती वाटणार ? २ आपले देऊन आपलाच घात होणार असेल तर तसे व्यर्थ न करणे हेच योग्य नाही का ? ३ एखादा काशीयात्रेस जात असेल तर त्याला खर्चासाठी पैसे देऊन पाठवावे पण चोरास मात्र चद्राचे बळ अनुकूल असल्याचेही सागू नये. ४ तुकाराम महाराज म्हणतात, तीर्थव्रत, याग हा भक्तीचा मार्ग आहे; तो सोडू नये कधी. ५

३१४ इनामाची भरली पेठ । वाहाती दाट मारग ॥ १ ॥
अवघेची येती वाण । अवघें शकुन लाभाचे ॥ २ ॥
अडचणी त्या केल्या दुरी । देण्या उरी घेण्याच्या ॥ ३ ॥
तुका म्हणे जोडी जाली । ते आपुली आपणा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- वाण–जिन्नस, उरी–बाकी

अर्थ :–या पंढरपुरात भक्तजनांचे घनदाट मार्ग सुरू झाले आहेत. ही एक त्याची इनामाची पेठच आहे १ या पेठेत सर्व वस्तू येतात. येथे सर्व शकुन लाभदायक होतात. २ या ठिकाणी सर्व प्रकारच्या अडचणी दूर होतात, देण्याघेण्यातील बाकी येथे काही उरत नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, या पेठेत ज्याने आपला स्वत:चाच लाभ करून घेतला तो धन्य होय ४

३१५ वेदाचे गव्हर न कळे पाठकां । अधिकार लोकां नाहीं येरां ॥ १ ॥
विठोबाचें नाम सुलभ सोपारें । तारी एक सरें भर्वासिंधु ॥ २ ॥
जाणत्या असाध्य मंत्र तंत्र काळ । येर तो सकळ मूढ लोक ॥ ३ ॥
तुका म्हणे विधि निषेध लोपला । उच्छेद या जाला मारगाचा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- गव्हर–अतरग, मर्म, सोपारें–सोपे, एकसरें–एकदम

अर्थ –नुसते शब्द पाठ करणाऱ्या शास्त्रीपंडिताना वेदांचा अर्थ समजत नाही व दुसऱ्याही लोकाना त्याचा अधिकार नाही. १ एका विठ्ठलाचेच नांव सहज, सुलभ व सोपे आहे. ते एकदम संसारसागर तरून नेण्यास समर्थ आहे. २ जे केवळ मंत्र, तंत्र काळवेळ यानाच जाणतात त्यांना मात्र हे असाध्य आहे; व इतर लोक तर मूर्खच आहेत. ३ तुकाराम महाराज म्हणतात, विधिनिषेध सपल्यामुळे या मार्गाचा नाश झाला आहे. ४

---

१ दोघा होय.

३१६ विधीनें सेवन । विषयत्यागातें समान ॥ १ ॥
मुख्य धर्म देव चित्तीं । आदि अवसान अंतीं ॥ २ ॥
बहु अतिशय खोटा । तर्कें होती बहु वाटा ॥ ३ ॥
तुका म्हणे भावे । कृपा करीजेते देवे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – विधीनें–योग्य मार्गाने, आदि–प्रारभ, अवसान–शेवट

अर्थ :–योग्य मार्गाने किंवा शास्त्र सागेल त्या मार्गाने विषयसेवन केले तर ते विषयत्यागाएवढेच श्रेष्ठ होय. १ या धर्माचे मुख्य रहस्य असे की देह धारण केल्यापासून तो तो नष्ट होईपर्यंत देवास मनात वागवावे हे उत्तम २ कोणत्याही गोष्टीची अतिशय चिकित्सा खोटी आहे, कारण केवळ बुद्धीच्या वाटेने, केवळ तर्काच्या मार्गाने पुष्कळ पर्यायाच्या वाटा निर्माण होऊन कार्यनाश मात्र होतो ३ तुकाराम महाराज म्हणतात, ईश्वराविषयी एकचित्ताने भाव ठेविल्यासच त्याची कृपा प्राप्त होते ४

३१७ येथींचिया अळकारें । काय खरें पूजन ॥ १ ॥
वैकुंठींच्या लावू वाटा । सर्व साटा ते ठायीं ॥ २ ॥
येथींचिया नाशवते । काय रिते चाळवूं ॥ ३ ॥
तुका म्हणे वैष्णव जन । माझे गण समुदाय ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा –येथींचिया–या जगातील साटा–साठा, गण–समुदाय

अर्थ – या लोकातील अलकाराने भूषविणे ह काय खरे पूजन आहे ? हे तर सर्व नाश पावणारे अलकार होत १ म्हणून वैकुठाच्या वाटा निर्माण करु कारण सर्व सुखाचा साठा तिथे आहे २ या जगातील सर्वच प्रकार नाशवत आहेत मग त्याच्या नादाने उगाचच लोकाना कशासाठी फसवू ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, वैष्णवजन किंवा विष्णुभक्त हाच माझा आवडता समुदाय आहे तोच मला प्रिय आहे ४

३१८ उजळावया आलो वाटा । खरा खोटा निवाड ॥ १ ॥
बोलविले बोल बोले । धनीविठ्ठला सन्निध ॥ २ ॥
तरी मनीं नाहीं शका । बळें एका स्वामीच्या ॥ ३ ॥
तुका म्हणे नये आम्हा । पुढें कामा गबाळ ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा –उजळावया–स्वच्छ करण्यासाठी

अर्थ – भक्तिमार्गाच्या वाटा स्वच्छ करण्यासाठी, त्याच्यावर प्रकाश टाकण्यासाठीच मी येथे आलो आहे. मला खऱ्याखोट्याचा निवाडा करावयाचा आहे १ ईश्वर, विठ्ठल हा माझा धनी आहे. तो ज्याप्रमाणे बोलवील त्याप्रमाणे मी बोलतो २ त्या माझ्या स्वामीच्या पाठबळामुळे मी बोलत असल्याने मला कसलीच शंका नसते ३ तुकाराम महाराज म्हणतात, आमच्यापुढे गबाळ्यासारखे काम कधीच चालणार नाही ४

विवरण– या एका ल्हानशा अभगात तुकारामबुवा आपल्या आयुष्याचा हेतू स्पष्टपणे सागत आहेत आपण जे बोलत आहोत तो देवाचाच निरोप आहे अशी भावना त्याची नेहमीच होती भाडार फोडून ता धन्याचा माल आपण भारवाहीप्रमाणे वाहतो अशी त्याची श्रद्धा होती जो कृपावत सखा पाडुरग तोच बोलविता असून आपली वाणी त्याचीच आहे असे ते वारवार सागतात 'नव्हती माझे बोल बोले पाडुरग ।' अशी त्याची निष्ठा होती आपण भक्तिमार्गाचा प्रसार करण्यास आलो आहोत, सताचा मार्ग स्वच्छ करावयास आलो आहोत, जग सर्व आडरानात सापडले असून त्याच्या वाटा स्वच्छ करण्यासाठी आपण आहोत असेही ते अनेकदा बोलतात

३१९ बोलावे तें धर्मा मिळे । बरे डोळे उघडूनि ॥ १ ॥
काशासाठीं खावे शेण । जेणें जन थुंकी तें ॥ २ ॥
दुजें ऐसें काय बळी । जें या जाळी अग्नीसि ॥ ३ ॥
तुका म्हणे शूर रणीं । गाढे मनीं थुरथुरी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – गाढे–भित्रे

अर्थ – नीट डोळे उघडे ठेवून जें बोलायचे ते धर्मास अनुकूल असेल ते नेहमी बोलावे १ ज्या बोलण्यावर लोक तिरस्काराने थुंकतील असे बोलून कशाला शेण खावे? २ सत्य व स्पष्ट बोलणे हे अग्नीप्रमाणे असल्याने या अग्नीस कोण जाळील? कोण असा शूर आहे? ३ तुकाराम महाराज म्हणतात, असा सत्य व स्पष्ट आणि धर्मानुकूल बोलणाराच रणांगणावरील शूराप्रमाणे असतो भित्रा मनुष्य मात्र मनात उगाच पुटपुटत राहतो ४

३२० बरा देवा कुणबी केलो । नाहीं तरी दंभेंचि असतो मेलो ॥ १ ॥
भलें केलें देवराया । नाचे तुका लागे पाया ॥ २ ॥
विद्या असती काहीं । तरी पडतो अपायीं ॥ ३ ॥
सेवा चुकतो संताची । नागवण हे फुकाची ॥ ४ ॥
गर्व होता ताठा । जातो यमपंथें वाटा ॥ ५ ॥
तुका म्हणे थोरपणे । नरक होती अभिमानें ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – दंभेंचि–अहंकारानेच, अपायीं–संकटात

अर्थ – देवा, मला कुणबी केलेस हे फार चांगले झाले नाही तर ब्राह्मणजन्माच्या अभिमानाखालीच मी मेलो असतो १ देवराया, ही चांगलीच गोष्ट झाली म्हणूनच तुमच्या पायाशी राहून तल्लीनतेने मी नाचू शकतो २ दुसरी काही थोडी बहुत जरी विद्या मजजवळ असती तर मी मोठ्या संकटातच पडलो असतो ३ मग संतांची सेवाही माझ्या हातून झाली नसती विनाकारण माझी फसवणूक मात्र झाली असती ४ मला मग गर्व झाला असता व उगाच मी ताठून गेलो असतो यमाच्या म्हणजे मृत्यूच्याच वाटेने मग मला जावे लागले असते ५ तुकाराम महाराज म्हणतात थोरपणाच्या अभिमानाने नरकवास मात्र मिळतो ६

विवरण – या अभंगात महत्त्वाचे असे दोन विचार आहेत ब्राह्मणकुळात आल्याने नुसता दंभ, अहंकार निर्माण होऊन खरी ज्ञानलालसा वा भक्तिभावना याचा लवलेशही उरत नाही असे दृश्य तुकोबाना त्याच्या सभोवती स्पष्टपणे दिसत असावे म्हणूनच ते आपण कुणबी झालो हे फार चांगले असे कृतार्थतेने म्हणत आहेत आपण कुणबी आहोत असे तुकोबानी अनेक ठिकाणी म्हटले आहे 'आळस न करी या लाभाचा । तुका विनवी कुणबियाचा', 'तुका कुणबियाचा नेणे शास्त्रमत । एक पंढरीनाथ विसंबेना'– इत्यादी ओळींतून आपण कुणबी आहोत असा उल्लेख तुकोबा स्वत चा करितात तुकोबांचे वधू का होवा यानीही 'आता निदसुर नसावें । गाठ पडली कुणब्यासवें' असेच म्हटले आहे तुकोबाची शिष्या बहिणाबाई हिनेही आपल्या गुरुचे वर्णन करताना 'स्वप्नींचा अनुग्रह गुरु केला शूद्र । तोही बळी भद्र ज्ञानहीन', असा उल्लेख केला आहे तेव्हा तुकाराम हे कुणबवाणी कुणबीवाणी किंवा मराठावाणी होते कुणबी-वाणी, अडनाव आंबीले, कुळी मोरे' असा उल्लेख तुकोबाच्या वंशातही आहे तुकोबा कुणबी असले तरी त्याचे घराणे मराठा जातीचे होते त्यानी स्वत स शूद्र यातीचे आपण म्हणून उल्लेख केला आहे तुकोबाची शूद्र याती, त्याचे कुणबीपण, त्याचा वैश्य व्यवसाय, त्याचे आंबीले हे आडनाव, मोरे हे कुळ इत्यादीसबंधीचे सविस्तर विवेचन पुढे 'याती शूद्र वंश केला वेवसाय' या त्याच्या प्रसिद्ध अशा या ग्रंथातील अभंग क्रमांक १३३३ मध्ये केले आहे

३२१ दाता नारायण । स्वयें भोगिता आपण ॥ १ ॥
आता काय उरलें वाचें । पुढें शब्द बोलायाचे ॥ २ ॥

वेखती जे डोळे । रूप आपुलें तें खेळे ॥ ३ ॥
तुका म्हणे नाद । जाला अवघा गोविंद ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – दाता–देणारा, नाद–ध्वनी.

अर्थः– प्राणिमात्रास हवे ते देणारा तो नारायण असून त्या सर्व वस्तूंचा भोग घेणाराही तोच एक आहे १ मग मी भोगले, मी भोगले असे शब्द बोलण्यात तरी अर्थ कसला आहे ? २ जेथे दृष्टी टाकावी तेथे स्वतःचे रूप दिसावे अशी आत्मीयता अंगी बाणली आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, जेवढा म्हणून ध्वनी अथवा नाद आहे तेवढा गोविंदरूपी ईश्वरच सर्वत्र भरून राहिला आहे खास. ४

३२२ कृपा करुनी देवा । मज साच तें दाखवा ॥ १ ॥
तुम्ही दयावंत कैसे । कीर्ति जगामाजी वसे[1] ॥ २ ॥
पाहोनियां डोळां । हातीं ओढवाल काळा ॥ ३ ॥
तुका म्हणे देवा । माझा करावा कुडावा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपाः– साच–खरे, कुडावा–कुंपण घालून रक्षण

अर्थः–देवा, माझ्यावर कृपा करा व जे खरे असेल तेच मला दाखवा; तेच माझ्या प्रचीतीस आणून द्या. १ तुम्ही दयावंत कसे आहात यासंबंधीची कीर्ती सर्व जगात पसरून राहिलेली आहे. २ तुम्ही स्वतःच्या डोळ्यांनी मजकडे पाहात असूनही मला काळ ओढीत आहे हे ठीक नव्हे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तुम्ही तुमच्या कृपेचे कुंपण घालून माझे रक्षण करावे. ४

३२३ ठायींची ओळखी । येइल टाकूं टाका सुखीं ॥ १ ॥
तुमचा जाईल ईमान । माझे कपाळीं पतन ॥ २ ॥
ठेविला तो ठेवा । अभिळाषें बुडवावा ॥ ३ ॥
मनीं न विचारा । तुका म्हणे हे दातारा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– ईमान–प्रामाणिकपणा, पतन–नरकात जाणे, अभिळाषें–लोभाने.

अर्थ :– देवा, तुमची व आमची मूळची ओळख एका ठिकाणचीच आहे. ती काय तुम्हांला सुखासुखी टाकता येईल ? सहजासहजी टाकता येत असेल तर टाका ना. १ पण यामध्ये मग तुमचाच प्रामाणिकपणा जाईल ना आणि माझ्या नशिबात मात्र कायमचे पतन अथवा नरकवास येईल. २ आणि मग मला असे होईल की तुमच्यावरील विश्वासाचा जो ठेवा मी ठेविला होता, तो लोभाने बुडवावा असे होईल. ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, दातारा, असला विचार सुद्धा मनात आणू नका. ४

विवरण :– देवाची आपली ओळख मूळच्या स्थानापासूनच आहे असा एक महत्त्वाचा विचार तुकोबांनी या अभंगात मांडला आहे. सर्व चराचर जगत व्यक्त होण्याआधी एकच तत्त्व स्फुरणरूपात होते. त्या परब्रह्माला एकाकी न रमेना म्हणून ते अनेकत्वाने साकार झाले 'बीजचि झालें तरु । अथवा सोनेंचि अलंकारु' अशा भाषेत संतानी या व्यक्ताचे वर्णन केले आहे. तुकोबाची शिष्या बहिणाबाई हिने तर 'तुम्ही आम्ही एक एकाचि गांवींचे । विसरलों त्याचें फळ मागें' म्हणून आपली 'ठायींची ओळखी' स्पष्ट केली आहे. दुसऱ्या एका अभंगात 'तुम्ही आम्ही दोघे होतों एके ठायीं' अशी जाणीव देऊन तिने म्हटले आहे, 'तुम्यावि हितानें वाढला संसार । आम्ही का रे दूर अंतरलों?'

३२४ तुझें वर्म ठावें । माझ्या पाडियेलें भावें ॥ १ ॥
रूप कासयाचे परी । धरुनि राहे न अंतरीं ॥ २ ॥

[1] असे

नेदी होऊं तुटी । मेळवीन दृष्टादृष्टी ॥ ३ ॥
तुका म्हणे देवा । चिंतन ते तुझी सेवा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– वर्म–रहस्य, भावें–तुजविषयीच्या भक्तिभावामुळे, कासवाचे परी–आपले सर्व अवयव पोटाशी धरून कासव ज्याप्रमाणे असते तसे.

अर्थ :– देवा, तुझे रहस्य मला माझा जो तुजविषयी भक्तिभाव आहे त्यामुळे सापडले आहे. १ कासवाप्रमाणे मी सर्व अवयव आत धरून तुझे रूप मनात साठवून ठेवीन. २ तुझ्या रूपाची व माझी तुटातूट होऊ देणार नाही. अगदी दृष्टीस दृष्टी मिळवून राहीन. ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा,तुमचे चिंतन हीच खरी तुमची सेवा आहे. ४

३२५ गहूं एक जाती । परी त्या पाधाणी नासिती ॥ १ ॥
वर्म जाणावें तें सार । कोठें काय थोडें फार ॥ २ ॥
कमाईच्या सारें । जाति दाविती प्रकार ॥ ३ ॥
तुका म्हणे मोल । गुणा मिथ्या फिके बोल ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :–पाधाणी–आडाणी बायका, कमाई–मेहनत

अर्थ :–एकाच गव्हाचे पुष्कळ प्रकार होऊ शकतात; पण अडाणी बायकांना त्याचे मर्म न समजल्यामुळे त्या त्यांचा नाश करतात. १ यासाठी जे काही थोडेफार वर्म असेल ते जाणून घेणे हेच मुख्य आहे. २ जितकी मेहनत चांगली होईल तितके ते प्रकार चांगले होतील हे खरेच आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, खरे मोल गुणाचे आहे. इतर सर्व बोल व्यर्थ होत. ४

३२६ पुण्यवंत व्हावें । घेतां सज्जनांचीं नांवें ॥ १ ॥
नेघे माझे वाचे तुटी । महा लाभ फुकासाठी ॥ २ ॥
विश्रांतीचा ठाव । पायीं संतांचिया भाव ॥ ३ ॥
तुका म्हणे पापें । जातीं संतांचिया जपें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– ठाव–ठिकाण

अर्थ :–संतसज्जनाची नावे घेऊन आपण पुण्यवंत व्हावे. १ यासाठीच माझी वाणी त्याची नावे घेण्यास कटाळा करीत नाही. फुकट असा हा महालाभ होतो. २ या साधुसंतांच्या पायांवरील भक्तिभाव हेच एक विश्रांतीचे ठिकाण मला आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, या संतांच्या दर्शनाने सर्व पापे नाहीशी होतात. ४

३२७ देव होईजेत देवाचे संगती । पतन पंगती जगाचिया[1] ॥ १ ॥
दोहींकडे दोन्ही वाहातील वाटा । करितील सांटा आपुलाला ॥ २ ॥
दाखविले परी नाहीं वांजिजेतां । आला तो तो चित्ता भाग भरा ॥ ३ ॥
तुका म्हणे अंगीं आवडीचें बळ । उपदेश मूळबीजमात्र ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :–सांटा–संग्रह.

अर्थ :– देवाची संगत असेल तर आपणास देव होता येईल. आणि जगांतील सामान्य लोकांच्या सहवासाने आपले पतन होईल. १ या दोन वाटा दोन निरनिराळ्या दिशांनी जाणाऱ्या आहेत; व त्या आपापल्या कर्मांचा संग्रह करणाऱ्या आहेत. २ वरील दोन वाटा मी दाखविल्या, पण आता जो भाग टाळता न येण्यासारखा आहे तो भाग चित्तात धरून आपले हित साधा. ३ तुकाराम महाराज म्हणतात, या मार्गाची प्रीती मूळची अंगातच हवी; उपदेशाचे निमित्त केवळ मूळ बीजाप्रमाणे समजावे. ४

---

१ देवाचिया.

३२८ शोधिसील मूळें । त्याचें करीसी वाटोळें ॥ १ ॥
ऐसे संतांचे बोभाट । तुझे बहु जाले तट ॥ २ ॥
लौकिका बाहेरी । घाली रोंखीं जया धरी[1] ॥ ३ ॥
तुका म्हणे गुण । तुझा लागलिया शून्य ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– बोभाट–गवगवा, तट–तऱ्हा, शून्य–मुक्तता.

अर्थ :–देवा, ज्यांची मुळे तुम्ही शोधता त्याचे वाटोळे करता. १ असा तुमच्या विषयीचा गवगवा सर्व साधुसंतांनी केलेला आहे. तुमच्या अशा तऱ्हा किती सांगाव्यात ? २ तुम्ही ज्याच्यावर रोखून धरता त्यास तुम्ही सर्व लौकिकाच्या बाहेर घालवून देता. ३ तुकाराम महाराज म्हणतात, तुझा एकदा गुण लागला की त्या माणसास लौकिकापासून मुक्तता मिळते. त्याचे लौकिक जीवन शून्य होते. ४

३२९ वैद्य वाचविती जीवा । तरी कोण ध्यातें देवा ॥ १ ॥
काय जाणों कैसी परी । प्रारब्ध तें ठेवी उरी ॥ २ ॥
अंगीं दैवत संचरे । मग तेथें काय उरे ॥ ३ ॥
नवसें कन्यापुत्र होती । तरि कां करणें लागे पती ॥ ४ ॥
जाणे हा विचार । स्वामी तुकयाचा दातार ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– परी–प्रकार, उरी–शिल्लक.

अर्थ :–वैद्याच्या औषधाने जर माणसाचे रोग नष्ट होत असतील तर मग देवाच्या ध्यानाची गरज काय ? १ प्रारब्धाने जे शिल्लक ठेविले असेल तसे होईल असे असले, तरी खरोखर काय घडेल ते समजत नाही २ एकदा अंगात दैवत संचारले म्हणजे काही तेथे उरत नाही ३ जर नवसासायासाने मुलगे-मुलगी होणार असतील तर मग नवरा करण्याची गरजच काय आहे ? ४ तुकाराम महाराज म्हणतात, या सर्व बाबींचा विचार तुकयाचा स्वामी जाणतो; तुकोबाच्या काही नीट ध्यानात येत नाही ५

३३० मारगीं बहुत । याचि गेले साधुसंत ॥ १ ॥
नका जाऊं आडरानें । ऐसीं गर्जती पुराणें ॥ २ ॥
चोखाळिल्या वाटा । न लगे पुसाव्या धोपटा ॥ ३ ॥
झळकती पताका । गरुड टके म्हणे तुका ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :–धोपटा–सरळ, टके–टोकास

अर्थ :–ईश्वराचे भजनपूजन, नामस्मरण याच मार्गाने पुष्कळ साधुसंत गेले आहेत आजपर्यंत. १ उगाच भलत्यासलत्या आडमार्गाने जाऊ नका अशी गर्जना सर्व पुराणे करीत आहेत. २ हा भक्तीमार्ग अनेकांनी चोखाळून स्वच्छ केलेला असल्याने याच्या वाटा कुणास विचाराव्या लागत नाहीत. धोपट मार्गाने जाता येते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, या मार्गाने जाणाऱ्या वैष्णवांच्या पताका झळकत असून त्यांच्या अग्रभागावर गरुडाचे वास्तव्य आहे. ४

३३१ कार्तिकीचा सोहळा । चला जाऊं पाहूं डोळां ।
आलें वैकुंठ जवळां । सन्निध[2] पंढरीये ॥ १ ॥
पीक पिकलें घुमरी । प्रेम न समाये अंबरीं ।
अवघी मातली पंढरी । घरोघरीं सुकाळ ॥ २ ॥

---

१ धरी. २ पंढरीये सन्निध.

चालती स्थिर स्थिर । गरुड टकयाचे भार ।
गर्जती गंभीर । टाळ श्रुति मृदंग ॥ ३ ॥
मिळालिया भद्रजाती । कैशा आनंदें डुलती ।
शूर उठावती । एका एक आगळे ॥ ४ ॥
नामामृत कल्लोळ । वृंदें कोंदलीं सकळ ।
आले वैष्णवदळ । कळिकाळ कांपती ॥ ५ ॥
आस करिती ब्रह्मादिक । देखुनि वाळवंटीचें सुख ।
धन्य धन्य मृत्युलोक । म्हणती भाग्याचे कैसे ॥ ६ ॥
मरण मुक्ति वाराणसी । पितृऋण गया नासी ।
उधार नाहीं पंढरीसि । पायापाशीं विठोबाच्या ॥ ७ ॥
तुका म्हणे आतां । काय करणें आम्हा चिंता ।
सकळ सिद्धींचा दाता । तो सर्वथा नुपेक्षी ॥ ८ ॥

शब्दार्थ व टीपा :–घुमरी–विपुल, पुष्कळ, गरुड टकयाचे–गरुड अग्रभागी असणाऱ्या निशाणाचे, श्रुति–वीणा, भद्रजाती–सुलक्षणी हत्ती, वृंदें–समुदाय, नासी–नाश करते, नुपेक्षी–उपेक्षा करीत नाही

अर्थ :–चला, कार्तिकी एकादशीचा सोहळा पंढरपुरास जाऊन दोन्ही डोळ्यांनी पाहू या पंढरीचे वैकुंठ अगदी जवळच आले आहे १ येथे हरिनामाचे पीक विपुल प्रमाणात आले असून प्रभुप्रेम आभाळात मावेनासे झाले आहे प्रभुप्रेमाने सर्व पंढरी सामावून गेली आहे घरोघरी प्रेमाचा सुकाळच झाला आहे २ वैष्णवांचे गट जागजागी स्थिर होऊन चालत आहेत. त्यांच्या निशाणावर गरुडाची खूण आहे नामघोषाचा गजर त्यांनी चालविला आहे टाळ, वीणा, मृदंग यांची साथ त्यांना मिळत आहे ३ सुलक्षणी हत्ती जसे झुलत डुलत चालतात तसे हे वैष्णववीर आनंदाने डुलत डुलत नामघोषाच्या नादात चालले आहेत एकापेक्षा एक शूर असे हे वैष्णववीर भगवद्भक्तीचा उठाव करीत आहेत ४ हरीच्या नामामृताचा कल्लोळ चालला असून सर्वत्र वैष्णवांचे समुदाय दाटून आले आहेत या वैष्णववीरांच्या समुदायापुढें प्रत्यक्ष यमही थरथर कापत उभा राहतो. ५ पंढरपूरच्या या वाळवंटाचे सुख पाहून त्याची इच्छा प्रत्यक्ष ब्रह्मदेवही करीत आहेत या मृत्युलोकाचे भाग्य केवढे थोर ! धन्य धन्य या मृत्युलोकाची ! असे उद्गारही ते काढतात ६ काशीला मुक्ती मिळते पण तेथे मरण यावे लागते गयेस गेल्यानंतर पितृऋणातून मुक्त होता येते पंढरपुरास मात्र या गोष्टी उधारीवर नसतात विठ्ठलाच्या पायाशी याचा लाभ त्वरित होत असतो ७ तुकाराम महाराज म्हणतात, आम्ही आता चिंता कशासाठी करावी ? सर्व सिद्धीस देणारा तो दाता पांडुरंग समर्थ असा असून तो आपल्या भक्तांची उपेक्षा कधीही करीत नाही ८

विवरण – भागवत संप्रदायात आषाढी व कार्तिकी एकादशीचे माहात्म्य फार सांगितले गेले आहे या दोनही प्रसंगी पंढरपूर येथे मोठा भरत असून विठ्ठलाच्या गजराने अवघे वाळवंट दुमदुमून जाते उभ्या महाराष्ट्रातील भक्तगण खांद्यावर गरुडपताका घेऊन यात्रेस येत असतात निरनिराळ्या ठिकाणाहून संतांच्या पालख्याही येतात टाळ, मृदुंग, वीणा, हरिभजन यांनी सारे वातावरण पवित्र होऊन जाते या एका अभंगात तुकारामबुवा मुख्यतः कार्तिकी एकादशीच्या सोहळ्याचे वर्णन करीत आहेत आषाढी एकादशीएवढेच कार्तिकी एकादशीचेही महत्व वारकरी संप्रदायात असते ही एकादशी प्रबोधिनी एकादशी म्हणून प्रसिद्ध असून चातुर्मासात भगवान शेषशय्येवर शयन करीत असतात पण या एकादशीस त्यांना जागे करण्यासाठी स्तोत्रपाठ, भजन, पूजन, काकडआरती, गायन, वादन इत्यादींच्या साहाय्याने स्तवन केले जाते ' उत्तिष्ठोत्तिष्ठ गोविंद त्यज निद्रां जगत्पते । त्वयि सुप्ते जगन्नाथ जगत् सुप्तं भवेदिदम् ' यासारख्या मंत्राने परमेश्वराची प्रार्थनाही केली जाते पंढरपूर येथील सोहळा याही एकादशीचा अवर्णनीय असतो

३३२ जया दोषां परीहार । नाहीं नाहीं धुंडितां शास्त्र ।
ते हरती अपार । पंढरपुर देखिलिया ॥ १ ॥
धन्य धन्य भीमातीर । चंद्रभागा सरोवर ।
पद्मातीर्थीं विठ्ठल वीर । क्रीडास्थळ वेणुनादीं ॥ २ ॥
सकळतीर्थांचें माहेर । भूवैकुंठ निर्विकार ।
होतो नामाचा गजर । असुरकाळ कांपती ॥ ३ ॥
नाहीं उपमा द्यावया । सम तुल्य आणिका ठाया ।
धन्य भाग्य जयां । जे पंढरपूर देखती ॥ ४ ॥
उपजोनि संसारीं । एक वेळ पाहें पा पंढरी ।
महा दोषां कैंचो उरी । देवभक्त देखिलिया ॥ ५ ॥
ऐसी विष्णूची नगरी । चतुर्भुज नर नारी ।
सुदर्शन घरटी करी । रीग न पुरे कळिकाळा ॥ ६ ॥
तें सुख वर्णावया गति । एवढी कैंची मज मति ।
जे पंढरपुरा जाती । ते पावती वैकुंठ ॥ ७ ॥
तुका म्हणे या शब्दाचा । जया विश्वास नाहीं साचा ।
अधम जन्मांतरिचा । तया पंढरी नावडे ॥ ८ ॥

शब्दार्थ व टीपा :–परीहार–निग्मन, आणिका–दुसऱ्या, उपजोनि–जन्मास येऊन.

अर्थ :–हातून इतके दोष घडले आहेत की त्यांचे निरसन व्हावे म्हणून, ते दूर व्हावेत म्हणून सर्व शास्त्रे तपासून पाहिली; तरी उपाय सापडत नाही पण हे पंढरपूर क्षेत्र पाहिल्यानंतर मात्र सारे दोष निघून जातात. १ हे भीमातीर धन्य होय. चंद्रभागा सरोवरही धन्य होय. या ठिकाणी पद्मतीर्थावर हे विठ्ठलवीर म्हणजे विष्णुभक्त जमलेले आहेत. त्याचे क्रीडेचे स्थान वेणुनाद हेच आहे. २ सर्व तीर्थस्थानाचे माहेर म्हणजे हे पंढरपूर असून या भूमीवरचे निर्विकार असे हे प्रत्यक्ष वैकुंठच आहे. येथे विठ्ठलनामाचा गजर सतत होत असून त्यामुळे प्रत्यक्ष यमाचाही थरकाप उडालेला आहे. ३ या पंढरपूर क्षेत्राचा महिमा वर्णन करण्यास दुसरी साजेल अशी उपमा द्यावयास वस्तूच नाही. जे लोक हे पंढरपूर पाहतात त्यांचे भाग्य केवढे थोर मानावयास हवे ४ या जगात जन्मास येऊन एक वेळ तरी पंढरपूरचे दर्शन घ्यावे तेथील दैवत श्रीविठ्ठल व त्याचा महाभक्त पुंडलीक यांचे दर्शन घेतल्यावर महापापांचाही दोष उरणार नाही. ५ अशी ही श्रीविष्णूची नगरी आहे. येथील स्त्री-पुरुष चतुर्भुज असून त्यांच्या रक्षणासाठी सुदर्शन चक्र एकसारख्या फेऱ्या घालीत असते. यमाच्या शिरकावाला थोडीही संधि मिळत नाही. ६ पंढरपूरचे हे सौख्य वर्णन करण्याएवढी बुद्धी मला कुठें आहे ? जे स्वतःच पंढरपूरला जातात त्यांनाच या वैकुंठाची प्राप्ती होते. ७ तुकाराम महाराज म्हणतात, या शब्दाचा ज्यांना विश्वास वाटत नाही व ज्याना पंढरपूर आवडत नाही तो जन्मोजन्मींचा अधमच म्हणावयास हवा. ८

३३३ एक नेणतां नाडलीं । एकां जाणिवेची भुली ॥ १ ॥
बोलों नेणें मुकें । वेडें वाचाळ काय निकें ॥ २ ॥
दोहीं सवा नाड । विहीर एकीकडे आड ॥ ३ ॥
तुका म्हणे कर्म । तुझें कळों नेदी वर्म ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– नाडलीं–फसली. भुली–भूल, निकें–चांगले, सवा–बाजूंस.

अर्थ :- कित्येक लोकांना काही कळतच नाही म्हणून ते फसतात; तर दुसऱ्या कित्येकांना आपणास फार कळते या ज्ञानाच्या अहंकाराने ते पछाडलेले असते भूल पडलेली असते १ मुक्याला बोलता येत नाही म्हणून त्याचा उपयोग होत नाही, ज्याला बोलता येते तो तर वाचाळ होतो, तेही काही चांगले नव्हे २ दोन्ही बाजूंनी अड चणच असते एकीकडे आड व दुसरीकडे विहीर अशी परिस्थिती निर्माण झालेली असते ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, आमचे कर्मच आम्हांस तुझे रहस्य समज देत नाही असे दिसते ४

३३४ म्हणवितो दास । मज[1] एवढी च आस ॥ १ ॥
परी तें अगीं नाहीं वर्म । करीं आपुला तू धर्म ॥ २ ॥
बडबडितो तोंडें । रिते भावेविण धेंडें ॥ ३ ॥
तुका म्हणे बरा । दावू जाणतो पसारा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – आस–इच्छा, धेंडे–अर्धवट मनुष्य

अर्थ – देवा, मी तुमचा दास आहे असे मी सारखे म्हणत असतो, आणि मलासुद्धा ही एवढी एकच आशा आहे १ पण देवा, दास्य भक्तीचे जे मर्म आहे ते मला माहीत आहे असे नाही तरी तू तुला तुझ्या धर्मा-प्रमाणे जे पतितपावनाचे कार्य करायला हवेस ते मात्र कर २ मी आपल्या तोंडाने नुसतीच बडबड करीत असतो, पण हे माझे बोलणे अर्धवट माणसाच्या प्रमाणे भावाशिवाय रिकामेच असते ३ तुकाराम महाराज म्हणतात बरवर साधुत्वाचा पसारा मात्र मी चांगलाच दाखवू शकतो ४

३३५ पूजा समाधाने । अतिशयें वाढे[2] सीण ॥ १ ॥
हे तो जाणा तुम्ही सत । आहे बोलिली ते नीत ॥ २ ॥
पाहिजे ते केले । सहज प्रसंगीं घडले ॥ ३ ॥
तुका म्हणे माथा । पायीं ठेवीं तुम्हा संता ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – अतिशय–हव्यास, नीत–नीती

अर्थ – मनाचे समाधान हीच खरी परमेश्वराची पूजा होय, किंवा समाधानाने परमेश्वराची पूजा करावी उगाच बाह्य फापटपसाऱ्याची हौस मात्र नसावी त्यामुळे त्रास मात्र वाढतो १ संत लोकहो, हे तुम्ही जाणताच अशी ही चांगली नीती मी तुम्हास सांगितली आहे २ जे सहजासहजी घडण्यासारखे आहे ते तुम्ही केले पाहिजे ३ तुकाराम महाराज म्हणतात तुम्हां संतांच्या पायावर मी माझा माथा ठेविला आहे ४

३३६ स्वप्नींचिया गोष्टी । मज धरिले होतें वेठी ।
जालिया सेवटीं । जाले लटिके सकळ ॥ १ ॥
वाया भाकिली करुणा । मूळ पावावया सिणा ।
राव रंक राणा । कैंचे स्थानावरि आहे ॥ २ ॥
सोसिले ते अंगें । खरे होते नव्हता जागें ।
अनुभव ही सांगें । दु खें डोळे उघडीले ॥ ३ ॥
तुका म्हणे संतीं । सावचित केलें अंतीं ।
नाहीं तरि होती । टाळी बैसोनि राहिली ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – वेठी–बळजबरीने कामास लावणं सिणा–त्रास, राव–श्रीमंत रंक–दरिद्री, सावचित–सावधान चित्त टाळी बसणे–तोंड बंद होणे

१ एवढीच मज आस २ वाट

अर्थ – एखाद्या स्वप्नामधील गोष्टींप्रमाणे या कामक्रोधानी मला वेठीस धरले होते, जन्ममृत्यूने मला बळजबरीने कामास जुंपले होते १ मग या आपत्तीतून सुटावे म्हणून स्वप्नात मी व्यर्थच ईश्वराची प्रार्थना केली पण त्यापासून मला त्रासच झाला जागे होऊन पाहतो तो स्वप्नातील श्रीमंत, राजा, दरिद्री, भिकारी हे काही त्याच्या स्थानावर नव्हते २ जोपर्यंत मी आत्मबोधाने जागाच झालो नव्हतो तेव्हा स्वप्नातील तो त्रास मी स्वत भरपूर सोसला आता जागृत असताना तोच अनुभव हे सागत आहे या दु खाने मात्र माझे डोळे पुरते उघडले. मी सावध झालो ३ तुकाराम महाराज म्हणतात, या साधुसतानीच मला या स्वप्नातील दु खातून सावध केले नाही तर पहिल्याने या हरिनामाविषयी माझे तोंड बदच होते. ४

३३७ आसुरी स्वभाव निर्दय अंतर । मानसीं निष्ठुर अतिवादी ॥ १ ॥
याति कुळ येथें असे अप्रमाण । गुणाचें कारण असे अंगीं ॥ २ ॥
काळकुट पितळ सोने शुद्ध रंग । अंगाचेच अंग साक्षी देतें ॥ ३ ॥
तुका म्हणे बरी जातीसवे भेटी । नवनीत पोटीं सांटविले ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – मानसीं–मनात, अतिवादी–वृथा वाद करणारा

*अर्थ – काही लोकाचा स्वभावच आसुरी असून अत करण निर्दय असते अशी माणसे मनाची निष्ठुर असून* वृथा वाद करणारी असतात १ अशा वेळी अमुक एक चागल्या कुळातील, अमुक वाईट कुळातील असा विचारच *अयोग्य असतो अगच्या गुणाचे महत्त्व या* ठिकाणी प्रमुख असते २ पितळ व सोने दोनही पिवळ्या रगाची असली तरी पितळ कालान्तराने काळेकुट्ट पडते व सोने आपल्या शुद्ध व तेजस्वी रगाने नेहमी चमकून राहते. दोघाची अगेच त्याच्या गुणावगुणाची साक्ष देतात ३ तुकाराम महाराज म्हणतात, चांगल्या जातीच्या माणसाची मला भेट व्हावी. मी त्याचा सहवास नवनीताप्रमाणे पोटात साठवीन किंवा प्रभुप्रीतीचे नवनीत ज्याने आपल्या पोटी साठविले आहे अशा चांगल्या जातीच्या माणसाशी माझी भेट व्हावी ४

विवरण – या अभगातील 'याति कुळ येथें असे अप्रमाण । गुणाचे कारण असे अगीं' हा विचार भागवत-धर्मीय परपरेत शोभून दिसणारा असाच आहे अगच्या गुणावरून पारख व्हावी. वरवरच्या जन्मजात जातीवरून होऊ नये आणि भक्तीच्या क्षेत्रात तर हे जातिभेदाचे वेड असू नये असा एक आग्रहाचा विचार सर्व सतानी सागितलेला आहे एकदा ईश्वराकडे मोहरा वळला म्हणजे हा अमुक एक जातीचा अशी स्थिती उरतच नाही तुकारामबुवानीच एका ठिकाणी म्हटले आहे, 'भावना भेदाची जाय उठाउठी । तुका म्हणे भेटीं गोविंदाचे' जे ईश्वराचे भक्त झाले, ज्याना तो ध्यास लागला त्याच्या बाबतीत यातिकुळाचा विचार हा बरोबर नसतो 'याति-कुळ माझें गेलें हारपोनि' असे स्वत ज्ञानेश्वरानीहा म्हटले आहे तुकारामबोवानी तर स्पष्टच निर्वाळा दिला आहे की, 'जिहीं म्हणविले हरीचे अकित । जातीचे ते होत कोणी तरी ॥ जातीकुळ नाहीं तयासी प्रमाण । अनन्या अनन्य तुका म्हणे' एकदा परमेश्वराला शरण गेल्यावर मग वर्ण व जाती हा भेद उरत नाही हे ज्ञानदेवानीही नवव्या अध्यायात ज्ञानेश्वरीत स्पष्ट केल्याचे आपण पाहिलेच आहे तुकारामबुवानी त्याचेच मत पुढे आणखी स्पष्ट केले आहे 'वर्णा-भिमान विसरलीं याती । एरएकां लोटांगणीं जाती रे' हरिभक्ताची एकदा पदवी मिळाली की मग हरिभक्त हीच एक जात इतराच्याही दृष्टीस उरते चोखोबाची जात मग कुणामच दिसली नाही या यातिहीन भक्ताची महती गाताना जनाबाईने म्हटले आहे 'चोखामेळा अनामिक । भक्तराज तोचि एक ॥ परब्रह्म त्याचे घरीं । न सागतां काम करी ॥' एकनाथानीही 'चोखियाची भक्ती कैसी । प्रेमें आवडे देवासी ॥' म्हणून चोखोबाचा गौरव केला आहे कारण या अभगात सागितल्याप्रमाणे गुणाचे कारणच माणमाची पारख करीत असते

३३८ बाळपणीं हरि । खेळे मथुरेमाझारी ।
पायीं घागरिया सरी । कडदोरा वाकी ।

मुख पाहे माता । सुख न माये चित्ता ।
धन्य मानव संचिता । वोडवलें आजि ॥ १ ॥
बाळ चांगलें वो । बाळ चांगलें वो ।
म्हणतां चांगलें । वेळ लागे तया बोलें ।
जीवापरीस तें वाल्हें । मज आवडतें ॥ २ ॥
मिळोनियां याति । येती नारी कुमारी बहुती ।
नाहीं आठव त्या चित्तीं । देहभाव कांहीं ।
विसरल्या घरें । तान्हीं पारठीं लेकुरें ।
धाक सांडोनियां येरें । तान भूक नाहीं ॥ ३ ॥
एकी असतील घरीं । चित्त तयापासीं परी ।
वेगीं करोनि वोसरी । तेथें जाऊं पाहे ।
लाज सांडियेली वोज । नाहीं फजितीचें काज ।
सुख सांडोनियां सेज । तेथें धाव घाली ॥ ४ ॥
वेधियेल्या बाळा । नर नारी या सकळा ।
बाळा खेळवी अवला । त्याही विसरल्या ।
कुमर कुमारी । नाभाव हा शरीरीं ।
दृष्टी न फिरे माघारी । तया देखतां हे ॥ ५ ॥
वैरभाव नाहीं । आप पर कोणीं कांहीं ।
शोक मोह दुःख ठायीं । तया निरसलीं ।
तुका म्हणे सुखी । केलीं आपणांसारिखीं ।
स्वामी माझा कवतुकें । बाळवेपें खेळे ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा :–मथुरेमाझारी–मथुरेमध्ये, कडदोरा–करदोटा, वोडवले–प्राप्त झाले, वाल्हे–प्रिय, वोसरी–कमी करून, वोज–चिंता, काळजी.

अर्थ :–हा श्रीकृष्ण लहानपणी मथुरेमध्ये खेळत होता. या बालकृष्णाच्या पायांत घागऱ्या व गळ्यात सरी, कमरेस करदोटा व दंडांत वाक्या असे अनेक दागिने शोभून दिसतात. या शोभिवंत मुलाचे मुख पाहताच आईचा आनंद तिच्या मनात मावत नाही. माझे भाग्य व पूर्वसंचित चांगले असल्यामुळे मी हे सुख प्राप्त करून धन्य होत आहे असे ती म्हणाली. १ हे माझे मूल फार चांगले आहे हो. इतके चांगले की ते चांगले म्हणण्यासही वेळ पुरत नाही हे बाळ मला माझ्या जिवापेक्षाही आवडले. २ या माझ्या लाडक्या मुलास पाहण्यासाठी गावातील सर्व जातींच्या बायका व मुली पुष्कळ येतात. त्यांना देहभावाचीही स्मृती नसते. श्रीकृष्णाच्या प्रेमापुढे त्या आपली घरे व तान्ही मुले यांनाही विसरल्या. त्यांना घरांतील वडील माणसांचा धाकच उरला नाही. त्यांची तहानभूकही हारपून गेली. ३ काही गोपी आपापल्या घरी असल्या तरी त्यांचे चित्त मात्र या बाळकृष्णाकडेच असते. त्याला पाहण्यासाठी घरची कामे लगबगीने करून त्या त्याच्याकडे जाण्याची इच्छा करतात. त्यांना आता लौकिक जीवनाची लाज नाही की शरीराचीहि चिंता उरलेली दिसत नाही. घरची सुखशय्या सोडून त्या श्रीकृष्णास पाहण्यासाठी धावतात. ४ या माझ्या बाळास पाहण्यासाठी गोकुळातील सर्व स्त्री-पुरुष नादावलेले आहेत. त्या सर्व स्त्रिया याच मुलास खेळवू लागल्या. आपण कुमार की कुमारी हा भावही त्यांच्या मनांत उरला नाही. या श्रीकृष्णास पाहताच त्यांची दृष्टी

कधीच मागे फिरत नाही. ५ याच्याकडे लक्ष येथताच त्याच्यांतील वैरभाव व आपपर विचार संपला त्यांना कसलाही शोक, मोह किंवा दु:खभाव उरलेला नाही तुकाराम महाराज म्हणतात, या श्रीकृष्णाने त्या सर्वांना आपल्यासारखेच शेवटी सुखी केले. याप्रमाणे हा माझा स्वामी श्रीकृष्ण सर्वांशी मोठ्या कौतुकाने खेळत असतो. ६

३३९ अशोकाच्या वनीं सीता शोक करी।
काहो अंतरले रघुनाथ दुरी।
येउनि गुंफेमाजी दुष्टें केली चोरी ।
कां हो मज आणिलें अवघड लंकापुरी ॥ १ ॥
सांगा वो त्रीजटे सखिये ऐसी मात।
देईल कां नेदी भेटी रघुनाथ।
मन उताविळ जाला दुरी पंथ।
राहों न सके प्राण माझा कुडी आंत ॥ २ ॥
काय दुष्ट आचरण होतें म्यां केलें।
तीर्थ व्रत होतें कवणाचें भंगीलें।
गाईवत्सा पत्नीपुरुषा विघडिलें।
न कळे वो संचित चरण अंतरले ॥ ३ ॥
नाडियेलें आशा मृगकांतिसोनें।
धाडिलें रघुनाथा पाठिलागे तेणें।
उलंघिली आज्ञा माव काय मी जाणें।
देखुनी सूनाट घेऊनि आलें सुनें ॥ ४ ॥
नाहीं मूळ मारग लाग अशोक सोये।
एकाविण नामें रघुनाथाच्या माये।
उपटी पक्षिया एक देउनि पाये। उदकवेढ्यामध्यें तेथें चाले काये ॥ ५ ॥
जनकाची नंदिनी दुःखें ग्लानी थोरी। चुकली कुरंगिणी मेळा तैशा परी ॥
संमोखी त्रीजटा स्थिर स्थिर वो करी। घेइल तुकयास्वामी राम लंकापुरी ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा :–गुंफेमाजी–झोपडीत, कुडी–शरीर, त्रिजटा–सीतेच्या रक्षणासाठी रावणाने ठेवलेल्या राक्षसीपैकी एक, नाडियेले–फसविले, माव–माया, सुनाट–रिकामे, सुनें–कुत्रे, लाग–उपाय, पक्षिया–जटायूस, नंदिनी–मुलगी, स्थिर–शांत

झाला ? ३ त्या सुवर्णमृगाच्या तेजाच्या आशेनेच मला फसविले त्याच आशेत गुतून मी रघुनाथास त्याच्यामागे घातले आणि लक्ष्मण भावजींची मी आज्ञा मोडली व रेषेबाहेर आले मी त्या राक्षसाची माया कशी ओळखणार ? झोपडी रिकामी पाहून त्या रावणरूपी कुश्र्याने मला येथे बळजबरीने आणले की ग ४ आता या सकटातून सुटण्यासाठी त्या रघुनाथाच्या नामाशिवाय दुसरा काही मार्ग अयवा उपाय दिसत नाही. त्या दुष्ट रावणाने त्या जटायू पक्ष्याच्या अगावर पाय देऊन त्याचे पख उपटले व त्यास मारले समोवती पाण्याने वेढलेल्या स्थितीत त्या बिचाऱ्याचे काहीच चालले नाही' ५ अशा प्रकारे ती जनकराजाची मुलगी दु खाने व्याकुळ झाली आपल्या मेळाव्यातून एखादी हरिणी चुकावी तशी तिची अवस्था झाली समोरची त्रिजटा तिला शात करण्याचा प्रयत्न करू लागली, व तुकाराम महाराज म्हणतात, की राम लौकरच लकेस येऊन तिची सुटका करील असे तिने सांगितले ६

३४० वीट नेघे ऐसें राधा । जेणें बाधा उपजे ना ॥ १ ॥
तरीच ते गोड राहे । निरे पाहे स्वयभ ॥ २ ॥
आणिका गुणा पोटीं वाव । दासी भाव आपुला ॥ ३ ॥
तुका म्हणे शुद्ध जाती । ते मागुती परतेना ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा –नेघे–घेणार नाही, निरे–शुद्ध

अर्थ '– ज्याचे भरपूर सेवन केले तरी जे वाधणार नाही असे अन्न शिजवून तयार करा याच्या सेवनाने कसलीच बाधा येणार नाही १ तरच ते गोड राहील नाही तरी ते मुळातच शुद्ध आहे राधवून बिघडवू नका २ जे शुद्ध मुळातच आहे त्यात इतर गुणाच्या शिरकाव होत असताना आपला अवगुण मात्र दिसू नये ३ तुकाराम महाराज म्हणतात, जे जातीने खरे शुद्ध असतात ते कधी मागे परत फिरत नाहीत ४

३४१ नव्हतो सावचित । तेणे अतरले हित ॥ १ ॥
पडिला नामाचा विसर । वाढविला ससार ॥ २ ॥
लटिक्याचे पुरीं । वाहोनिया गेलो दुरी ॥ ३ ॥
तुका म्हणे नाव । आम्हा सापडला भाव ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – सावचित–सावध, लटके–खोटे

अर्थ – प्रभुनामाविषयी मी या ससारात सावध चित्ताने राहिलो नाही म्हणून माझ्या खऱ्या हितास मी अतरलो १ त्याच्या नावाचा विसर पडून हा माझा ससार मी वाढविला २ वरवर दिसणाऱ्या पण खोट्या अत णाऱ्या या मायिक पसाऱ्याच्या पुरात मी वाहून गेलो ३ तुकाराम महाराज म्हणतात, पण आता ही हरिभक्तीची नाव मला तरून जाण्यास सापडली आहे ४

३४२ अन्नाच्या परिमळें जरि जाय भूक । तरि का हे पाक घरोघरीं ॥ १ ॥
आपुलाले तुम्ही करा रे स्वहित । वाचे स्मरा नित्य राम राम ॥ २ ॥
देखोनि जीवन जरि जाय तान । तरि का साटवण घरोघरीं ॥ ३ ॥
देखोनिया छाया सुख न पवीजे । जव न बैसीजे तया तळीं ॥ ४ ॥
हित[1] तरी होय गाता आईकता । जरि राहे चित्ता दृढ भाव ॥ ५ ॥
तुका म्हणे होसी भावेचि तू मुक्त । काय करिसी युक्त जाणिवेची ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा –परिमळें–सुवासाने, जीवन–पाणी, तान–तहान, न पवीजे–मिळत नाही, जाणिवेची–ज्ञानाची.

---

१ सुख

अर्थ .– असाच्या नुसत्या वासाने भूक जात असती तर मग घरोघरी लोकांनी स्वयपाक कशासाठी केला असता ? १ म्हणून मी तुम्हास सांगत आहे की तुम्ही आपापले हित साधण्यासाठी वाणीने नित्य रामनामाचे स्मरण करा. २ पाण्याकडे नुसते पाहून कधी तहान जाते का ? अशी तहान भागत असती तर घरोघरी पाण्याची साठवण करण्याची जरूरीच नव्हती. ३ झाडाची नुसती सावली पाहून कुणास सुख लाभणार ? त्याच्या तळाशी जाऊनच सावलीचे सुख भोगले पाहिजे. ४ आपल्या चित्तामध्ये एक भाव असेल तरच त्या ईश्वराच्या स्तुतीचे गाणे गाइल्याने, ऐकिल्याने सुख वाटेल. ५ तुकाराममहाराज म्हणतात, यासाठी ध्यानात धर की, तुला दृढ भावानेच भक्ती मिळेल. ज्ञानाची खटपट तुला हवी कशासाठी ? ६

३४३ काय उणें आम्हां विठोबाचे पाई । नाहीं ऐसें काई येथें एक ॥ १ ॥
तें हें भोवतालें ठायीं वांटूं मन । बराडी करून दारोदारीं ॥ २ ॥
कोण बळी माझ्या विठोबा वेगळा । आणीक आगळा दुजा सांगा ॥ ३ ॥
तुका म्हणे मोक्ष विठोबाचे गांवीं । फुकाचीं लुटावीं भाडारें तीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – उणें–कमी, बराडी–भिकारी, बळी–बळवत, आगळा–समर्थ

अर्थ :– या विठोबाच्या पायाशी आल्यावर आम्हास काय कमी आहे ते सांगा. या पायापाशी आल्यावर मिळत नाही असे काही आहे काय ? १ भोवती सर्वत्र मन वाटून, भिकारी होऊन दारोदार फिरण्याची घरे म्हणजे जरूरीच नाही. २ माझ्या या विठ्ठलाखेरीज दुसरा कुणी एवढा बळवत आहे काय ? असेल तर सांगा ना ३ तुकाराम महाराज म्हणतात, तुम्हास हवा असलेला मोक्ष याच विठोबाच्या पायाशी आहे, याच्या गावी मोक्ष आहे. ही मोक्षाची भाडारे अगदी फुकट लुटावीत ४

३४४ सेवितों रस तो वाटितों आणिकां । घ्या रे होऊं नका राणभरी ॥ १ ॥
विटेवरी ज्याचीं पाउलें समान । तोचि एक दानशूर दाता ॥ २ ॥
मनाचे संकल्प पाववील सिद्धी । जरी राहे बुद्धी याचे पायीं ॥ ३ ॥
तुका म्हणे मज धाडिलें निरोपा । मारग हा सोपा सुखरूप ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – रस–भक्तिभाव, मारग–मार्ग

अर्थ – पांडुरंगाच्या भक्तीचा हा रस मी स्वत सेवन करतोच, पण हा इतरानाही मी वाटतो हा तुम्ही सारेजण पोटभर घ्या उगाच वणवण करीत सान्या रानभर भटकू नका. १ ज्या विठ्ठलाची गोजिरवाणी पावले विटेवर शोभून दिसतात तोच एक दानशूर असा दाता आहे. २ त्याच्या ठिकाणी जर आपली बुद्धी स्थिर राहिली तर, निष्ठा जडली तर, तुमच्या मनातील सर्व सकल्प सिद्धीस जातील. ३ तुकाराम महाराज म्हणतात, हा सोपा व सुखाचा सर्वांना सांगण्यासाठी देवाचा निरोप घेऊनच मला त्याने धाडिले आहे. ४

विवरण – आपण आपल्या बळावर बोलत नाही, आपण ईश्वराचे निरोप आहोत अशी भूमिका तुकाराम महाराजानी अनेकदा घेतलेली आहे सर्व सत्ता त्या प्रभूची वा श्रीविठ्ठलाची असल्याने तोच आपल्या मुखातून शब्द वदवितो, असेही त्यानी काही ठिकाणी म्हटले आहे साळुंकी मजुळ वाणीने बोलत असली तरी तिचा बोलविता धनी वेगळाच असतो असे त्यानीच एका अभगात म्हटले आहे ' तुका म्हणे मज बोलविता देव ', ' आपुलिया बळें नाहीं मी बोलत ' या ओळीवरून तुकोबाच्या मनामागे प्रेरणा ईश्वराची होती ते ईश्वराचा निरोप सागणारे होते धन्याचा माल भक्तजनासाठी भरपूर प्रमाणात वाटण्यासाठी ते आले होते हे स्पष्ट होते त्याचे कवित्वही याच ईश्वरी प्रेरणेतून आकाराला आलेले होते तेव्हा ही वाणी आमच्या पदरची नाही. ' नाशिवे युक्तीचा नव्हे हा प्रकार । मज विश्वभर बोलवीतो ', ' वदवी गोविंद तेंचि वदें ' तो गोविंद बोलवील तसे आम्ही बोलणार असा भावार्थ या सर्व वचनाचा.

३४५ ऐसे ऐसियानें भेटती ते साधु । ज्याच्या दरशनें तुटे भवबदु ।
जे का सच्चिदानदीं नित्यानदु । जे का मोक्षसिद्धी तीर्थ वदू रे ॥ १ ॥
भाव सर्वकारण मूळ बदु । सदा समबुद्धि नास्तिक्यभेदु ।
भूतकृपा मोडीं द्वेषकदु । शत्रु मित्र पुत्र सम करीं बधु रे ॥ २ ॥
मन बुद्धि काया वाचा शुद्ध करीं । रूप सर्वत्र देखोनि नमस्कारीं ।
लघुत्व सर्वभावे अगीकारीं । साडीमाडी मोतूपण ऐसी थोरी रे ॥ ३ ॥
अर्थकामचाड नाहीं चित्ता[1] । मानामान मोह माया मिथ्या ।
वर्ते समाधानीं जाणोनि नेणता । साधु भेट देती तया अवचिता रे ॥ ४ ॥
मनीं दृढ धरीं विश्वास । नाही साडीमाडीचा सायास ।
साधुदर्शन नित्यकाळ त्यास । तुका म्हणे जो विटला जाणीवेस रे ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – भवबधु–ससारपाश, साडीमाडी–मोडणेताडणे याचा व्याप, सायास–प्रयत्न

अर्थ – ज्याच्या दशनाने ससारपाशातून मनुष्य मुक्त होतो असे साधुसत पुढे दिलेल्या कारणामुळे भेटतात ते नेहमीच त्या सच्चिदानदास वदन करणारे असतात त्या नित्यानदस्वरूपात असणाऱ्या साधुसताचा सहवास मोक्षसिद्धीच्या तीर्थप्रमाणेच असतो त्याना वदन करू या. १ याच्या भेटीचे एक प्रमुख व सबळ कारण म्हणजे आपल्या मनात भक्तिभाव हवा नास्तिक्यबुद्धीचा नाश व्हावयास हवा सर्व प्राणिमात्रावर दया असावी मनातील द्वेषाचा कद मोडून टाकावा शत्रू, मित्र, पुत्र, बधू याच्यावर समत्वानेच प्रेम करावे २ आपले मन, आपली बुद्धी, वाणी, शरीर याची, तू शुद्धी कर सर्वत्र परमेश्वराचेच रूप स्मरून त्याला नमस्कार कर सर्व बाजूनी आपण लघु आहोत अशी भावना मनात धर मी मोठा, तू लहान अशा भेदाचा किंवा अशा थोरवीचा त्याग कर ३ ज्याच्या मनात धनलोभ मुळीच नाही, ज्यास मानापमान नाही, मोह नाही, जो नेहमी समाधानानेच वागत असतो, जो आपल्या ज्ञानाचा गर्व करीत नाही, त्यासच अवचितपणे साधुसत भेटतात ४ तू मनात ईश्वरावर दृढ विश्वास ठेव मग इतर खटपट करण्याचा मुळी तुला शीण नको तुकाराम महाराज म्हणतात जो आपल्या अगी असणाऱ्या ज्ञानास विटला आहे त्यास नित्य साधुपुरुषाचे दर्शन होत असते ५

३४६ भवसागर तरता । का रे करीतसा चिंता ।
पैल उभा दाता । कटीं कर ठेवुनिया ॥ १ ॥
त्याचे पायीं घाला मिठी । मोल नेघे जगजेठी ।
भावा एका साठीं । खादा वाहे आपुल्या ॥ २ ॥
सुखें करावा ससार । परि न सडावे दोन्ही वार ।
दया क्षमा घर । चोजवीत येतील ॥ ३ ॥
भुक्तिमुक्तीची चिंता । नाहीं दैन्य दरिद्रता ।
तुका म्हणे दाता । पाडुरग वोळगिल्या ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – पैल–पलीकडे, नेघे–घेत नाही चोजवीत–शोधीत, वोळगिल्या–प्रसन्न झाल्यावर

अर्थ – हा ससारसागर तरून जाण्यास एवढी चिंता तुम्ही कसली करता ? पलीकडच्या तीरावर कटीवर हात ठेवून प्रत्यक्ष पाडुरग दाता, हवे ते देणारा उभा आहे ना ! १ त्याच्या पायाशी एकदा मिठी घाला तो विश्वचालक परमेश्वर काहीही मोल मागणार नाही केवळ तुमची भक्ती पाहून तुम्हांस खांद्यावर घेऊन ससार सागरातून तुम्हास वाचवील २ तुम्ही सुखाने आपला ससार करावा पण आषाढी एकादशी व कार्तिकी एकादशी

---

[1] चिंता

हे दोन दिवस मात्र विसरू नका या मार्गाने वागला तर दया, क्षमा, इत्यादी वृत्ती तुमचे घर शोधीत येतील ३ ऐहिक भोग व पारलौकिक मुक्ती याची काळजीच तुम्ही करू नये. तुम्ही स्वत मध्ये दैन्य व दरिद्रता कधीच धारण करू नये तुकाराम महाराज म्हणतात, एक हा पाडुरग प्रसन्न झाल्यावर, या दासाच्या आश्रयाने तुम्हास कसलीच चिंता उरणार नाही ४

३४७ जें कां रंजले गांजले । त्यासि म्हणे जो आपुले ॥ १ ॥
तोचि साधु ओळखावा । देव तेथेंचि जाणावा ॥ २ ॥
मृदु सबाह्य नवनीत । तैसें सज्जनाचें चित्त ॥ ३ ॥
ज्यासि आपगिता नाहीं । त्यासि धरी जो हृदयीं ॥ ४ ॥
दया करणें जें पुत्रासी । तेचि दासा आणि दासी ॥ ५ ॥
तुका म्हणे सांगूं किती । तोचि भगवताची मूर्ती ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा .–रजले–त्रासले, आपगिता–साभाळणारा

अर्थ – जे लोक या ससारतापाने त्रासलेले आहेत, गाजलेले आहेत त्याना जो आपले म्हणून जवळ करतो, १ तोच खरा साधू म्हणून ओळखावा इतकेच नव्हे तर त्याच्या ठिकाणीच देव आहे असे समजावे २ लोणी जसे अतर्बाह्य मऊ असते त्याप्रमाणेच सज्जनाचे चित्त कोवळे असते ३ ज्याना कोणीही ममतेने साभाळणारा नाही त्याना जो पोटाशी धरून आश्रय देतो, ४ जो आपल्या स्वत च्या मुलावर जी माया करतो तीच दासदासींवरही करीत असतो, तोच साधू समजावा ५ तुकाराम महाराज म्हणतात, आणखी किती सागू ? तो प्रत्यक्ष भगवताचीच मूर्ती समजावा ६

विवरण – तुकाराम महाराजाचा हा अतिशय प्रसिद्ध व लोकप्रिय असा अभग आहे दीन, दु खी पीडित, रजलेगाजलेले जे कुणी आहेत त्याना उदार अत करणाने जवळ करावे, त्याच्यावर दया करावी, स्वत च्या मुलाबाळाप्रमाणे त्याचीही जपणूक करावी हा एक थोर विचार बुवानी येथे सागितला आहे साधुत्वाची, देवत्वाची खूणही त्यानी याच सदर्भात सागितली आहे दीनदु खिताना जवळ करणारा जो साधुपुरुष तोच प्रत्यक्ष भगवत होय हा एक मोठा विचार भागवत सप्रदायातील मानावा लागेल अगदी सोप्या, सरळ, साध्या व हृदयाचा ठाव घेणाऱ्या भाषेत बुवानी साधुत्वाचे लक्षण सागितले आहे सर्व धर्माचे हेच सार आहे नुसता आत्मोद्धार उपयोगी पडत नाही या आत्मोद्धाराचेच एक अग म्हणजे जनसेवा 'आई चिंता करितों विश्वाची' असे समर्थ रामदास लहानपणीच म्हणाले होते पुढे साऱ्या हिंदुस्थानाचे भ्रमण केल्यावर लोकाची दु स्थिती पाहून त्यानी उद्गार काढले 'कैसी वाचतील जनें ?' या लोकाच्या ससाराचे, परमार्थाचे होणार तरी काय ? असा एक प्रश्न साधुसताच्या मनात निर्माण होतोच 'चिंतेनें उर फाटतो' अशा भाषेत समर्थांनी या चिंतेची धार व्यक्त केली आहे

धनिकाना बुद्धिमताना कुणीही जवळ करील, पण दीनदरिद्री व ससारतापाने पोळलेल्या जीवाना कोण आसरा देणार ? त्याच्यावर मायेचे पाघरूण कोण घालणार ? त्याना जवळ करून सन्मार्ग कोण दाखविणार ? जो दुसऱ्याची पीडा जाणत तो दूर करतो तोच खरा वैष्णव होय असे गुजरातचे थोर सत नरसी मेहता यानी म्हटले आहे सताचा अवतार यासाठीच असतो दुरिताचे तिमिर नष्ट व्हाव, दुष्टाची दुष्ट बुद्धी नाहीशी व्हावी जगाचे पापताप दूर व्हावत, विश्वातील अंधार दूर व्हावा, बद्ध मुक्त व्हावेत, बुडालेले वर यावत, दु खिताची सकटे दूर व्हावीत यासाठी सताचे अवतार होत 'तैसीं बोधिलीं सोडीत । बुडालीं काढीत । साकडीं फेडित । आर्तांचिया' साधुसत वावरत असतात असे ज्ञानेश्वरानी सागितले आहे तुकारामबुवाही याच उपकारासाठी उत्सुक होते त्याना स्वत स आत्मसुखाचा लाभ झाला तर या भक्तिरसाचे सेवन इतराना घडावे अशी त्याची इच्छा होतीच 'आपण जेवुनि जेववी लोका । सतर्पण करी तुका' अशी त्याची भूमिका होती दीनदरिद्री व दु खी जीवाचे दु ख ओळखून वागणे, त्याचा दु खभार हलका करणे यासारखे दुसरे पुण्यकर्म नाहीच असे समजावे

३४८ याजसाठीं भक्ति । जगीं रूढवावया[1] ख्याति ॥ १ ॥
नाहीं तरी कोठें दुजें । आहे बोलाया सहजें ॥ २ ॥
गौरव यासाटीं । स्वामिसेवेची कसोटी ॥ ३ ॥
तुका म्हणे अळंकारा । देवभक्त लोकीं खरा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– रूढवावया–वाढविण्यासाठी, ख्याती–प्रसिद्धी.

अर्थ :– दुःखी कष्टी जीवाना तारण्यासाठीच या भक्तीच्या प्रसिद्धीची वाढ व्हावयास हवी. १ नाही तर दुसऱ्यापणाने बोलावे असे ईश्वर व जीव यात द्वैत आहे कुठे ? २ केवळ भक्तीचा गौरव व्हावा म्हणून हा स्वामी, हा सेवक असा वरवरचा दुजाभाव आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवभक्ताचे नाते हाच एक खरा अलंकार या लोकात आहे ४

३४९ अमंगळ वाणी । नये ऐकों ते कानीं ॥ १ ॥
जो हे दूषी हरिची कथा । त्यासि क्षयरोगव्यथा ॥ २ ॥
याति वर्ण श्रेष्ठ । परि तो चांडाळ पापिष्ठ ॥ ३ ॥
तुका म्हणे पाप । माय नावडे ज्या बाप ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– याति–जात

अर्थ :– देवा, जी वाणी अमंगल आहे ती माझ्या कानावर सुद्धा येऊ नये. १ जो हरीच्या कथेला दूषण देतो त्याला क्षय रोगाची व्यथा लागली आहे असे समजावे २ मग तो श्रेष्ठ वर्णाचा ब्राह्मण असला तरी तो पापी, चांडाळच समजावा ३ तुकाराम महाराज म्हणतात, ज्यास स्वतःचे आईबाप आवडत नाहीत, नकोसे झाले आहेत, तो पापीच समजावा. ४

३५० कैसा सिंदळीचा । नव्हे ऐसी ज्याची वाचा ॥ १ ॥
वाचें नुच्चारी गोविंदा । सदा करी परनिंदा ॥ २ ॥
कैसा निरयगांवा । जाऊं न पवे विसावा ॥ ३ ॥
तुका म्हणे दंड । कैसा न पवे तो लंड ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– सिंदळीचा–जारिणीच्या पोटचा, नुच्चारी–उच्चारीत नाही, निरयगाव–नरक, लंड–नास्तिक.

अर्थ :– जो पुढे दिल्याप्रमाणे श्रीहरीचे नाव घेत नाही तो जारिणीच्या पोटचाच नव्हे काय ? १ तो कधीही वाणीने गोविंदाचे नाव घेत नाही. सतत दुसऱ्याची निंदा करतो २ तो नरकाच्या गावी जाऊनच विसावा घेणार नाही का ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा या नास्तिकास चांगलाच दंड होणार असतो. ४

३५१ आचरणा ठाव । नाहीं अंगीं स्वता भाव ॥ १ ॥
करवी आणिकाचे घात । खोडी काढूनि पंडित ॥ २ ॥
श्वानाचियापरी । मिष्टान्नासि विटाळ करी ॥ ३ ॥
तुका म्हणे ऐसा । सटवेचि ना पांचा दिसां ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– ठाव–पत्ता, खोडी–दोष, सटवणे–बाधणे

अर्थ – ज्याला शुद्ध आचरणाचा पत्ताच नाही ; व ज्याच्या स्वतःच्या अंगी भक्तिभाव नाही, १ असा हा पंडित दुसऱ्याचा दोष काढून त्याचा घात करतात किंवा करवितात २ एखादे कुत्रे मिष्टान्नास शिवून भ्रष्ट करते, तसे वागणे या दुष्टाचे असते ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा या दुष्ट माणसास इतके आयुष्य तरी

[1] वाढवाया

कसे लागले ? जन्मतःच पाचव्या सहाव्या दिवशी याला सटवीच्या किंवा सटवाईच्या फेऱ्याची बाधा कशी झाली नाही ? ४

३५२ गर्भाचें धारण । तिने वागविला सिण ॥ १ ॥
व्याली कुऱ्हाडीचा दांडा । वर न घलीच धोंडा ॥ २ ॥
उपजला काळ । कुळा लाविला विटाळ ॥ ३ ॥
तुका म्हणे जाय । नरका अभक्ताची माय ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – सिण–त्रास, काळ–यम, माय–आई

अर्थ – असा जो अभक्त त्याच्या गर्भधारणेने आईस शीण मात्र व्यर्थ झाला १ आपल्याच गोतास काळ होणारा कुऱ्हाडीचा दांडा ती जणु व्याली उपजताच तिने त्याच्या मुखावर धोंडा घालून त्यास मारून का नाही टाकले ? २ हा तिच्या पोटी जणु प्रत्यक्ष यमच जन्मास आला व त्याने सर्व कुळास बट्टा लाविला ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा या दुष्ट अभक्ताची आई नरकास जाते ४

३५३ पतनासि जे नेतो । तिचा खोटा स्नेह प्रीती ॥ १ ॥
विधीपुरतें कारण । बहु वारावे वचन ॥ २ ॥
सर्वस्वासि नाडी । ऐसी लाघवाची बेडी ॥ ३ ॥
तुका म्हणे दुरी । राखता हे तोंची बरी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – वारावे–दूर करावे, नाडी–आड येते, फसवित

अर्थ – जी स्त्री आपल्या पतीस पतनाकडेच नेत असते तिचा स्नेह किंवा तिचे प्रेम या सर्व बाबी खोट्याच समजाव्यात १ केवळ शास्त्रविधीपुरताच तिच्याशी संबंध ठेवावा तिच्याशी फार बोलणे दूर करावे, फार बोलू नये तिच्याशी २ ती सर्वस्वाच्या आड येणारी, फसविणारी असून लाघवाची, गोड गोड बोलाची ती एक बेडीच असते ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशी ही स्त्री जितकी दूर ठेवता येईल तितकी बरी त्यातच आपले सुख आहे ४

३५४ देव आड जाला । तो भोगिता मी उगला ।
अवघा निवारला । शीण शुभाअशुभाचा ॥ १ ॥
जीवशिवाचें भातुकें । केलें क्रीडाया[1] कौतुकें ।
कैंचीं येथें लोकें । हा आभास अनित्य ॥ २ ॥
विष्णुमय खरें जग । येथें लागतसे लाग ।
वांटिले विभाग । वर्णधर्म हा खेळ तयाचा ॥ ३ ॥
अवघी एकाचीच वीण । तेथें कैंचें भिन्नाभिन्न ।
वेदपुरुष नारायण । तेणें केला निवाडा ॥ ४ ॥
प्रसादाचा रस । तुका लाधला सौरस ।
पायापाशीं वास । निकट नव्हे निराळा[2] ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – उगला–उगाच, भातुकें–भातुकलीचा खेळ, लाग–संबंध, सौरस–गोडी

अर्थ – आता आमच्यासमोर देव उभा राहून आड आला व तोच सर्व भोगत असून मी मात्र उगाच उभा आहे सर्व शुभाशुभ कर्मांचा शीण जो अवघा होता तो त्याने स्वतःकडे भोक्तृत्व घेऊन दूर केला १ केवळ क्रीडा

१ होत कवतुकें, २ निरोपी

करण्यासाठी मुली भातुकलीचा खेळ करतात त्याप्रमाणे त्याने शिवाशिवीचा खेळ केवळ स्वतःच्या कौतुकासाठी मांडलेला आहे या ठिकाणी विविध प्रकारचे लोक म्हणजे हे आपले, हे परके असे आहेत तरी कुठे ? जो दिसतात तो सर्व आभासच आहे अनित्य आहे २ तात्त्विक दृष्टीने पाहिले तर हे सर्व जगच विष्णुमय नव्हे काय ? आपला संबंध तिथे जडत असला तरी व वर्णधर्माप्रमाणे वाटणी झालेली असली तरी हा एक प्रकारचा क्रीडेचाच प्रकार नव्हे काय ? ३ खरे पाहिले असता हे सर्व चराचर जगत म्हणजे त्या एकाचीच वीण नव्हे काय ? मग तेथे भिन्नतेचा प्रकार असणार कुठून ? असा निर्णय जो वेद पुरुष नारायण त्यानेच घेतलेला आहे ४ तुकाराम महाराज म्हणतात त्या प्रसादाची गोडी मला भाग्याने मिळालेली आहे म्हणूनच मला त्या प्रभूच्या पायाशी निवास करण्याची संधी मिळाली आहे मी आता येथून निराळा कधीच होणार नाही ५

विवरण – तुकोबाच्या या एका सुबोध अभंगात एक फार मोठे तत्त्व स्पष्ट झाले आहे केवळ स्वतःच्या सुखासाठी ते चित्तत्त्व बहुविध रूपानी व्यक्त झाले वास्तविक पाहता ही विविधता खरी नव्हे निरनिराळ्या रूपांची वाटणी, वर्णविभाग हे सर्व खेळच होत परंतु मूळचे तत्त्व फार वेगळे आहे या सर्व विविधतेतून एक प्रकारचे अतूट असे सूत्र आहे 'मयि सर्वमिदं प्रोतं सूत्रे मणिगणा इव दोऱ्यात अनेक मणी ओवावेत त्याप्रमाणे माझ्या ठिकाणीच हे सर्व विश्व ओविलेले आहे असे गीतेत भगवंतानी सांगितले आहे सूत्र व त्यात ओवलेले मणी या गीतेच्या दृष्टान्तातील कमतरता भरून काढताना ज्ञानेश्वरांनी एक बहारदार अशी तत्त्वदर्शी ओवी लिहिलेली आहे 'सुवर्णाचे मणी केले। ते सोनियाचे सुतीं वोविले। तैसे म्यां जग धरिलें। सबाह्याभ्यंतरीं'॥ असा हा एकाचाच विस्तार असल्यामुळे 'अवघी एकाचीच वीण। तेथें कैंचे भिन्नाभिन्न' असा महत्त्वाचा प्रश्न बुवांनी उत्पन्न केला आहे

## मंबाजी गोसावी यांनीं स्वामीस पीडा केली–अभंग

३५५ न सोडीं न सोडीं न सोडीं। विठोबा चरण न सोडीं ॥ १ ॥
भलतें जड पडो भारी। जीवावरी आगोज ॥ २ ॥
शतखंड देह शस्त्रधारी। करितां परी न भीयें ॥ ३ ॥
तुका म्हणे केलीं आधीं। दृढ बुद्धी सावध ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – जड–दुःख, संकट, आगोज–भयंकर

अर्थ – विठ्ठला, मी तुझे पाय सोडणार नाही असे त्रिवार सांगतो अगदी भयंकर वाटेल असा भार मजवर मोठाच पडला आहे विठ्ठला २ शस्त्रधारण करणाऱ्याने मजवर जरी आघात करून शेकडो तुकडे माझ्या देहाचे केले तरी मी भिणार नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, आरंभीच सावध होऊन मी बुद्धी दृढ केली आहे सावध केली आहे ४

३५६ बरवे बरवें केले विठोबा बरवें। पाहोनि आंत क्षमा अंगीं काटीवरी मारविलें ॥ १ ॥
शिव्या गाळी नीत नाहीं। बहु फार विटंबिलें ॥ २ ॥
तुका म्हणे क्रोधा हातीं। सोडवूनि घेतलें रे ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा – बरवें–चांगले, काटीवरी–काठ्यांनी

अर्थ – विठ्ठला, हे फार चांगले केले तुम्ही माझ्या अंगची क्षमा वृत्ती पाहून मंबाजीबुवाकडून मला काठ्यांनी तुम्ही मारविले १ नीतीनियम सोडून त्याने मला फार शिवीगाळ करून माझी पुरतीच विटंबना केली २ तुकाराम महाराज म्हणतात देवा तुम्ही क्रोधापासून यावेळी माझे रक्षणच केले ३

३५७ पावलों पावलों। देवा पावलों रे ॥ १ ॥
बरवें संचित होतें तैसें जालें रे। आतां काय बोलों रे ॥ २ ॥
सोज्ज्वळ कटकवाटा भावें करूं गेलों रे। तुका म्हणे करूनि वेगळा केलों रे ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा :– संचित–पूर्वजन्मीचे साठलेले कर्म, सोज्ज्वळ–नीट, स्वच्छ, कटकवाटा–काट्यांनी भरलेल्या वाटा

*अर्थ :–* देवा, माझ्या पूर्वसंचित कर्माप्रमाणें मला फळ मिळाले १ मागले कर्म मी केले असावे; त्याप्रमाणे घडून आले. आता त्यावर मी काय बोलावे ? २ मवाजी गोसाव्याने प्रदक्षिणेच्या मार्गात काट्या पसरल्या होत्या त्या मोठ्या भक्तिभावाने लोकांना त्रास होऊ नये म्हणून मी दूर केल्या पण तुकाराम महाराज म्हणतात, त्या गोसाव्याने गला घेऊन दूर केले की हो ३

३५८ का होती कां होती । देवा एवढी फजीती ॥ १ ॥
मुळीं वर्म नसतो चुकलो । तो मी ऐसे चित्तीं ॥ २ ॥
होणार होऊनि गेले । मिथ्या आता खंती रे ॥ ३ ॥
तुका म्हणे पुरे आता । दुर्जनाची संगती रे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – वर्म–रहस्य, खंती–काळजी

*अर्थ :–* देवा, माझी एवढी फजिती का होत असते रे ? देवा, मुळातले रहस्य जर मला समजले असते तर अशी फजिती झाली नसती १ मुळातच हा दुर्जन आहे असे समजण्याचे माझे चित्तात आले नाही २ अरे, आता जे व्हायचे ते होऊन गेले आता त्याची काळजी करणे खोटेपणाचेच आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, आता मला दुर्जनाची संगत नको हो देवा ४

३५९ सोडवा सोडवा । सोडवा हो अनंता ॥ १ ॥
तुजविण ऐसा । कोण दुजा प्राणदाता ॥ २ ॥
कोणा लाज नेणा ऐसे । आणिका शरण आम्ही[1] जाता ॥ ३ ॥
तुका म्हणे सखया । माझ्या रखुमाईच्या कांता ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– दुजा–दुसरा, आणिका–दुसऱ्याना.

*अर्थ :–* अनंता, परमेश्वरा, मला आता या सर्व उपाधींतून सोडवा ना ? १ देवा, तुझ्याशिवाय दुसरा कोण माझे प्राण रक्षण करणारा आहे ? २ मी जर दुसऱ्या दैवताना शरण गेलो, तर त्याची लाज तुमच्याशिवाय कुणास वाटणार आहे ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, हे रखुमाईच्या कांता, विठ्ठला, मला या त्रासातून मुक्त करा ४

विवरण – वरील चारपाच अभंगातून तुकारामबुवाच्या आयुष्यातील एका महत्त्वाच्या प्रकरणाचा निर्देश आहे तुकोबाच्या वेळी मवाजी नावाचा एक ब्राह्मण चिंचवडहून देहू येथे स्थायिक झाला होता देहूच्या पीलशेटी नावाच्या एका गृहस्थाने मठ वगैरे बांधण्यासाठी आपल्या शेतातील शिवगंगा नावाचा एक भाग मवाजी गोसाव्यास दिला मवाजीने त्यावर फुलझाडे वगैरे लावून एक छोटासा बगीचा तयार केला लोकांना मंत्र वगैरे देऊन मवाजी थोडाफार गुरुपणाही करीत असे त्याची शिष्यशाखाही मोठी होती, परंतु तुकाराम महाराजांचा भजनकीर्तनाचा संप्रदाय वाढला तेव्हा सर्व लोकांची गर्दी तुकोबाच्या भोवती होत राहिली मवाजीस या गोष्टीचे वैषम्य वाटले तो मनातून तुकोबाचा द्वेष करू लागला

हा प्रकार व्हायला एक निमित्त सापडले तुकोबाच्या सासऱ्यानी, अमाजी गुळवे यानी त्याना एक म्हैस घेऊन दिली ही म्हैस एकदा कुंपण ओलांडून मवाजीच्या परड्यात शिरली तिने झाडांची थोडी नासधूसही केली अर्थातच मवाजीला फार राग आला, त्याने तुकोबाना अपशब्द बोलायला सुरवात केली परंतु तुकोबा शांत राहिले पण मवाजीचा स्वभाव पालटला नाही त्याने एकादशीस लोक विठ्ठलमंदिरात येतील व आपल्या परड्यास उपद्रव होईल या भीतीने प्रदक्षिणेच्या वाटेवर काटेरी कुंपण घालून अडथळा निर्माण केला भक्ताना प्रदक्षिणा घालताना त्रास होऊ नये म्हणून

[1] तुम्ही

तुकोबानी हे काटेरी कुपण काढून टाकले हे काम होत असतानाच मबाजी सतापून धावतच तेथे आला कुपणाचीच एक काटेरी काठी उपटून तिने तुकोबास मारहाण करण्यास त्याने प्रारभ केला एक काठी वापरून निरुपयोगी झाली, की तो दुसरी घेई असा दहा काठ्या झाल्या तरी तुकोबाची शाती ढळली नाही तुकोबाना वाटले, देव आपल्या क्षमावृत्तीची परीक्षाच पाहात आहे या मबाजीवर रागवावे हे त्याच्या मनात येईच ना इतर भक्त मडळीनी व अवलीने अथवा जिजाईने हळुवार हाताने त्याच्या अगात रुतलेले काटे काढले एकादशीस तुकोबाचे कीर्तन सुरु झाले मबाजी कीर्तनाला आला नव्हता तुकोबा स्वत त्याच्या घरी गेले व त्याची त्यानी क्षमा मागितली आपणास मार देताना त्याला काही त्रास तर फार झाला नाही ना ? अशी त्यानी चौकशी केली ! पुढे मबाजीबुवा लज्जित झाला व कीर्तनास जाऊ लागला

३६० पुत्राची वारता । शुभ ऐके जेवीं माता ॥ १ ॥
तैसे राहो माझें मन । गाता ऐकता हरिगुण ॥ २ ॥
नादें लुब्ध जाला मृग । देह विसरला अंग ॥ ३ ॥
तुका म्हणे पाहे । कासवीचे पिले माये ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – वारता–बातमी

अर्थ :– दूर गेलेल्या मुलाची शुभ वार्ता ऐकून ज्याप्रमाणे आईस आनद होतो, १ त्याचप्रमाणे या श्रीहरींचे गुण गाऊन, ऐकून माझ्या मनास आनद होत असतो २ पारध्याच्या गाण्यास जसे हरिण लुब्ध होते व देहभान विसरुन जाते तशीच अवस्था माझी झाली आहे ३ मोठ्या प्रेमानें कासवीची पिले आपल्या आईकडे पाहात असतात त्याप्रमाणे देवा, माझे लक्ष तुझ्याकडेच लागून राहिले आहे आईच्या दृष्टीवर पिलाचे पोषण होते असा कासवीच्या बाबतीत सकेत आहे ४

३६१ ध्यानी योगीराज बैसले कपाटीं । लागे पाठोवाठीं तयाचिया ॥ १ ॥
तान भुक त्याचे राखे शीत उष्ण । झाले उदासीन देहभाव ॥ २ ॥
कोण सखें तया आणीक सोयरें । असे त्या दुसरें हरीविण ॥ ३ ॥
कोण सुख त्याच्या जीवासि आनद । नाहीं राज्यमद घडी तया ॥ ४ ॥
तुका म्हणे विष अमृता समान । कृपा नारायण करिता होय ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – कपाटीं–डोगराच्या गुहेत, राज्यमद–राज्याचा लोभ, घडी–क्षणभर

अर्थ – जे लोक सर्वसगपरित्याग करून, ध्यानस्थ होऊन डोंगराच्या गुहेत जाऊन बसले त्या योगीराजाच्या पाठोपाठ देव त्याच्या सरक्षणासाठी नेहमी असतो १ त्याची तहान, भूक, त्याचा शीतोष्णापासूनचा त्रास यांची काळजी तोच घेत असतो कारण हे योगीराज किंवा विरक्त पुरुष देहाविषयी नेहमीच उदासीन असतात २ त्याना या श्रीहरीखेरीज त्याची चिंता पाहणारे दुसरे सखेसोयरे कोण आहेत ? ३ त्या रानावनात त्याच्या जीवास कसले सुख असते ? त्यांच्या मनास दुसरा कसला आनद असतो ? एक क्षणभर देखील राज्यसुखाचा लोभ त्यांना वाटत नाही ४ तुकाराम महाराज म्हणतात, अशा महात्म्याना विष आणि अमृत याची गोडी सारखीच वाटते त्या नारायणाच्या कृपेमुळे सर्वत्र समभाव निर्माण होतो ५

३६२ न व्हावे तें जालें देखियेलें पाय । आता फिरु काय मागें देवा ॥ १ ॥
बहु दिस होतों करीत हे आस । तें आले सायासे फळ आजि ॥ २ ॥
कोठवरि जिणे ससाराच्या आशा । उगवो हा फासा येथूनिया ॥ ३ ॥
बुडालों तयाचा मूळ ना मारग । लागे तो लाग साडूनिया ॥ ४ ॥

पुढें उलंघितां दुःखाचें डोंगर। नाहीं अंतपार गर्भवासा ॥ ५ ॥
तुका म्हणे कास धरीन पीतांबरीं। तूं भवसागरीं तारूं देवा ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा :– आस–इच्छा, सायासें–प्रयत्नाने, फासा–पाश, उगवो–सुटावा, लाग–लाभ, तारू–नाव

अर्थ :– देवा जे सहजासहजी घडणार नाही ते आज घडले की रे. मी आज तुझे पवित्र चरण पाहिले. आता काय या थोर लाभापासून मी मागे फिरू ? १ पुष्कळ दिवस झाले, मी हीच इच्छा करीत होतो. ते फळ तुझ्या चरणदर्शनाने मोठ्या प्रयत्नाने माझ्या हातात आले. २ या संसाराच्या आशेत राहून देवा, कुठवर जगावे ? आता या श्रीविठ्ठलाच्या चरणामुळे संसाराच्या पाशातून मी सुटावे. ३ असला हा विठ्ठलप्राप्तीचा लाभ सोडून देऊन जे संसार-सागरात बुडून गेले त्यांचा काहीही ठावठिकाणा सापडत नाही. ४ जर तुझी संगत मिळाली नाही तर देवा, पुढे दु.खाचे डोंगरच्या डोंगर ओलांडताना पुनः पुनः गर्भवासाचे जे दुःख भोगावे लागले त्यास अंत नसतो. ५ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, म्हणून मी तुमच्या पीतांबराची कास धरूनच उभा राहीन. कारण तूच या भवसागरातील माझी नाव आहेस विठ्ठला. ६

३६३ वैकुंठा जावया तपाचे सायास। करणें जीवा नास न लगे कांहीं ॥ १ ॥
तया पुंडलिकें केला उपकार। फेडावया[1] भार पृथीवीचा ॥ २ ॥
तुका म्हणे सोपी केली पायवाट। पंढरी वैकुंठ भूमीवरी ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा – तपाचे–तपश्चर्येचे, सायास–कष्ट.

अर्थ – त्या वैकुंठास जाण्यासाठी माणसास तपश्चर्या करून फार मोठमोठे प्रयत्न करावे लागतात प्रसंगी जीवाचा नाशही करावा लागतो. १ परंतु तो पुंडलीक महामुनी किती थोर पाहा. त्याने मोठाच उपकार पृथ्वीवरील भार हलका करण्यासाठी केला आहे. २ कारण त्याने भूवैकुंठ पंढरपूर येथे विठ्ठलाला उभे करून अतिशय सोपी व सुलभ अशी पायवाट निर्माण केली आहे; असे तुकाराम महाराज म्हणतात. ३

३६४ शोकें शोक वाढे। हिंमतीचे धीर गाढे ॥ १ ॥
येथें केले नव्हे काई। लंडीपण खोटें भाई ॥ २ ॥
करिती होया होय। परी नव्हे कोणी साह्य ॥ ३ ॥
तुका म्हणे घडी। साधिलिया एक थोडी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा : – गाढे–मोठे, लंडीपणा–भित्रेपण, घडी–वेळ

अर्थ :– लोकहो, शोकाने शोकच फार वाढतो म्हणून हिंमत धरून मोठे धैर्य वाढवा. १ या नरजन्मास येऊन काय न करावे ? तर बंधूनो येथे भित्रेपणा मात्र खोटा आहे. २ परमार्थाच्या विचाराविषयी अथवा ईश्वर-भक्तिविषयी सर्व जण होय होय असेच म्हणतात, पण शेवटी प्रत्यक्ष मदत करण्याचा प्रसंग आला की कुणीच साह्य करीत नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, ईश्वरभक्ती करण्याची नरजन्मातील ही एक वेळ साधली तर पुष्कळच लाभ आहे ४

३६५ म्हणउनी खेळ मांडियेला ऐसा। नाहीं कोणी दिशा वर्जीयेली ॥ १ ॥
माझिया गोतें हें वसलें सकळ। न देखिजे मूळ विटाळाचें ॥ २ ॥
करूनि ओळखी दिली एकसरें। न देखों दुसरें विषमासी ॥ ३ ॥
तुका म्हणे नाहीं काळापाशी गोवा। स्थिति मति देवा वांचूनियां ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– वर्जीयेली–सोडली, गोतें–नातेवाईकानी, गोवा–आडवणूक

१ हरावया

अर्थ – म्हणूनच मी हा असा खेळ आज मांडिला आहे यात कोणतीही दिशा मी वगळलेली नाही १ हे सभोवती जे दिसत आहे ते माझ्याच नातेवाईकाच्या संबधातील जगत आहे विटाळाचा भेद मला कुठेच दिसत नाही २ त्या श्रीविठ्ठलाने तो स्वत च सर्वत्र भरून राहला आहे अशी मला ओळख पटवून दिली असल्यामुळे दुसरा विपरीत भावच माझ्या मनात कधी येत नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, त्या काळापाशी माझ्या चित्ताची आडवणूक झालेली नाही माझी स्थिती, माझी बुद्धी त्या देवापासून निराळी मुळीच नाही ४

३६६ वैष्णव तो जया। अवघी देवावरी माया ॥ १ ॥
नाहीं आणिक प्रमाण। तन धन तृण जन ॥ २ ॥
पडता जड भारी। नेमा न टळे निर्धारीं ॥ ३ ॥
तुका म्हणे याती। हो का तयाची भलती ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – तन–शरीर जड–संकट

अर्थ – ज्याची सव प्रीती त्या देवावर असते तोच खरा वैष्णव होय १ त्याला शरीर, संपत्ती, लोक हे गवताप्रमाणे क्षुल्लक वाटतात त्याला दुसऱ्या कशाचीही इच्छा नसते तो देवालाच प्रमाण मानतो २ केवढेही मोठे संकट आले तरी तो आपल्या नेहमीच्या नित्य उपासनेत अथवा भक्तीत निर्धाराने व्यत्यय आणीत नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात तो एकदा ईश्वराशी जडला की मग त्याची जात कोणती का असेना ४

३६७ करोत तपादि साधने। कोणी साधो गोराजने ॥ १ ॥
आम्ही न वजो तया वाटा। नाचू पंढरीचोहटा ॥ २ ॥
पावोत आत्मस्थिति। कोणी म्हणोत उत्तम मुक्ति ॥ ३ ॥
तुका म्हणे छंद। आम्हा हरिच्या दासा निंद्य ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा –गोराजनें- ईश्वराच्या प्राप्तीसाठी स्वत स जाळून घेण्यासारखी अघोर साधन, न वजो–जाणार नाही, चोहटा–चव्हाट्यावर

अर्थ – कुणी तपश्चर्यादी साधन करोत, अथवा कुणी ईश्वराच्या प्राप्तीसाठी स्वत स जाळून घेण्याचे अघोरी उपाय करोत १ आम्ही काही त्या वाटाकडे चुकूनही जाणार नाही आम्ही केवळ पंढरपूरच्या चव्हाट्यावरच श्रीहरीचे नाम घेत नाचत राहू २ कुणाला आत्मस्थितीचे ज्ञान लाभो कुणाला मुक्ती ही उत्तम स्थिती असे म्हणावेसे वाटो, ३ तुकाराम महाराज म्हणतात, हे असले विठ्ठलभजनाखेरीजचे छंद आम्हासारख्या भक्तांना निंद्य वाटतात ४

## स्वामीस सद्गुरूची कृपा जाली–अभंग ४

३६८ सद्गुरुरायें कृपा मज केली। परी नाहीं घडली सेवा कांहीं ॥ १ ॥
सांपडविलें वाटे जाता गंगास्नाना। मस्तकीं तो जाणा ठेविला कर ॥ २ ॥
भोजना मागती तूप पावशेर। पडिला विसर स्वप्नामाजी ॥ ३ ॥
कांहीं कळे उपजला अंतराय। म्हणोनिया काय त्वरा जाली ॥ ४ ॥
राघवचैतन्य केशवचैतन्य। सांगितली खुण माळिकेची ॥ ५ ॥
बाबाजी आपलें सांगितलें नाम। मंत्र दिला राम कृष्ण हरी ॥ ६ ॥
माघशुद्ध दशमी पाहूनि गुरुवार। केला अंगीकार तुका म्हणे ॥ ७ ॥

अर्थ .– सद्गुरुराजा, मजवर तुम्ही फार मोठी कृपा केलीत परंतु माझ्याकडून तुमची म्हणावी अशी काही सेवा झाली नाही १ मी गंगेस स्नानासाठी जात असतानाच त्यांनी मला वाटेत पकडले व माझ्या मस्तकावर आपला अभय हात ठेविला २ त्यांनी भोजनासाठी माझ्याजवळ पावशेर तूप मागितले परंतु मला त्याचा विसर पडला, हे सर्व स्वप्नात घडले ३ सद्गुरूच्या वा ईश्वराच्या सेवेत काही अंतर पडले की काय न जाणो, म्हणून त्वरा करून सद्गुरू मला सोडून दूर निघून गेले ४ राघव चैतन्य, केशव चैतन्य अशी आपल्या परंपरेची खूण त्यांनी मला सांगितली ५ आणि स्वतःचे नाव बाबाजी चैतन्य असे सांगून त्यांनी मला 'राम कृष्ण हरि' हा सोपा मंत्र दिला ६ या दिवशी माघ शुद्ध दशमी, गुरुवार, हा पुण्यदिवस होता तो पाहूनच त्यांनी माझा स्वीकार केला असे तुकाराम महाराज म्हणतात ७

विवरण .– संतवर्य तुकाराम महाराज यांना सद्गुरुनाथांची कृपा झाली, त्यांनी त्यांचा स्वीकार केला, असा अतिशय महत्त्वाचा प्रसंग या व या पुढच्या तीन अभंगांत त्यांनीच स्वतः वर्णन केलेला असल्यामुळे या अभंगांना सांप्रदायिकात अतिशय महत्त्व प्राप्त झाले आहे वैराग्य पूर्णपणे अंगी बाणल्यानंतर तुकोबांचे पूर्ण लक्ष ईश्वराकडेच लागून राहिले होते वृक्षवल्लीच्या सहवासात व वनचरांच्या संगतीत ते आपल्याशीच वादविवाद करून रंगून होते आपली बुद्धी स्थिर करीत होते आपल्या मनास पांडुरंगचरणी दृढ करीत होते पांडुरंगाच्या दर्शनासाठी त्यांचे मन तळमळत असे त्यांच्या चित्ताची उलघाल होत असे पण परमार्थाच्या मार्गावरील त्यांची पावले चित्तशुद्धीच्या मार्गाने झपाझप अशी पडत होती रोज नवीन जागृति त्यांना येई 'तुका म्हणे मना पाहिजे अंकुश। नित्य नवा दीस जागृतीचा' या शब्दांत त्यांनी स्वतःच्या आत्मविचाराचे मर्म सांगितले आहे त्यांनी संसार व व्यवहार जवळ जवळ सोडलेलाच होता एकांतात ग्रंथांचे अध्ययन व ईश्वराचे चिंतन त्यांचे सुरू होते अध्यात्मसाधनेत मग्न असणाऱ्या तुकोबांना मग एके दिवशी सद्गुरू श्रीबाबाजी चैतन्य यांचा स्वप्नात उपदेश झाला कारण सद्गुरूच्या स्वीकारासेरीज परमार्थ-ज्ञान थिटे पडते जणू ज्ञानेश्वरांनी म्हटले आहे, 'शब्दजात आलोडिले। अथवा योगादिक जें अभ्यासिलें। तें तैंचि म्हणों ये आपुलें। जें सानुकूळ श्रीगुरू॥' श्रीगुरूची अनुकूलता लाभली तरच सर्व साधनांची वा परमार्थप्राप्तीची सार्थकता होय असा हा श्रीगुरूंचा महिमा वर्णन करिताना अत्यंत बहारदार पद्धतीने श्रीज्ञानेश्वरांनी तेराव्या अध्यायात 'आचार्योपासनम्' या शब्दावर जे अतिशय विस्तृत व जिव्हाळ्याचे भाष्य केले आहे त्याला इतरत्र जोड नाही

याच वृत्तीस अनुसरून तुकोबांना चैतन्य संप्रदायातील बाबाजी महाराज यांचा उपदेश स्वप्नात झाला सद्गुरूंनी तुकोबांचेवर पूर्ण कृपा केली त्यांना रामकृष्ण हरि हा मंत्र मिळाला हा उपदेश तुकारामबुवा स्वप्नात इंद्रायणीच्या गंगेच्या काठी स्नानास जात असताना झाला श्रीगुरूंनी त्यांच्या मस्तकावर हात ठेऊन कृतार्थ केले सद्गुरुनाथांनी त्यांना भोजनासाठी पावशेर तूप मागितले, पण विस्मृतीमुळे तुकोबांच्या हातून ते मिळाले नाही आपल्या हातून ते मिळाले नाही हाच आपल्या हातून अंतर पडल्याचा प्रसंग घडला म्हणून सद्गुरूंनी निघून जाण्याची घाई केली की काय ? अशी चुटपुट तुकोबांच्या मनास लागली या बाबाजी चैतन्यांनी राघव चैतन्य व केशव चैतन्य अशी आपली परंपरा निवेदन केली हा दिवस माघ शुद्ध दशमी गुरुवार हा होता इतका सर्व तपशील तुकोबांच्या गुरुप्राप्तीसंबंधीचा महत्त्वाचा आहे

तुकारामांना हा मंत्रोपदेश देणारे सद्गुरुनाथ कोण ? ते त्यांना केव्हा, कुठे भेटले ? त्यांनी जाण्याची त्वरा का केली ? त्यांनी पावशेर तूप का मागितले ? वगैरे महत्त्वाचे प्रश्न आहेत तुकोबांच्या गुरुपरंपरेचा शोध घेण्याचे महत्त्वाचे कार्य आजपर्यंत अनेक संशोधकांनी विशेषतः श्री वा सी बेंद्रे यांच्यासारख्या अभ्यासकांनी केले आहे श्री बेंद्रे यांच्या मते हा गुरुपदेश तुकोबांना ओतुरास 'गगावाट' नावाच्या वाटेस तुकोबा असताना झाला सद्गुरूच्या स्पर्शाने तुकोबांना भावावस्था प्राप्त झाली असावी असाही स्वप्नाचा अर्थ त्यांनी केलेला आहे या भावानंदात तुकोबा पूर्णपणे मग्न झाले असल्यामुळे खूप वेळ झाला तरी त्यांना जाग आली नाही एवढ्यात बाबाजी चैतन्य निघून गेले मग सावध झाल्यानंतर तूप द्यायचे विसरून राहून गेले म्हणून तुकारामबुवांना वाईट वाटले साधु, संन्यासी, वैरागी यांना तूप देण्याची प्रथा असे तुकोबांचा हा गुरूपदेश इंग्रजी कालगणनेप्रमाणे २३ जानेवारी १६४० या दिवशी झाला असल्याचा शोध श्री बेंद्रे यांचा आहे

चैतन्य संप्रदायाच्या परंपरेचा शोधही आज मोठ्या प्रमाणावर झालेला आहे. या पंथाचा बंगालमधील गौरांग प्रभू किंवा चैतन्य प्रभू यांच्या पंथाशी काही संबंध आहे की काय ? असा एक तर्क संशोधकाच्या मनात नेहमी असतो. पण तो तसा नाही असे मानण्याकडे कल काही आधुनिक अभ्यासकाचा आहे.

**राघव चैतन्याचे** बालपण गिरनारच्या भोवती गेले. त्यांचा संचार महाराष्ट्र, उत्तर हिंदुस्थान, तेलंगण इत्यादी भागात नेहमी असे. राघव चैतन्याचे मूळचे नाव रघुनाथ. गिरिनारच्या एका भागात '**शौर्यकुळात**' याचा जन्म झाला. वडिलांच्या आज्ञेवरून रघुनाथाने श्रीदत्ताची उपासना केली. दत्ताच्या अनुग्रहानंतर त्याच्याच प्रेरणेवरून हे जुन्नर जवळच्या ओतुरच्या डोंगरात व तपोवनात अनुष्ठान करू लागले. पुष्पावती नदीच्या तीरावरील शिवाची कडक उपासना यांनी केली. शेवटी व्यासांनी यांना दर्शन दिले व यांचे नाव राघव चैतन्य असे ठेऊन '**ॐ नमो भगवते वासुदेवाय**' हा मंत्र दिला. दत्तानेही चतुःश्लोकी भागवताची शिकवण देऊन संप्रदाय वाढविण्यास सुचविले. पुढे लेण्याद्रीसारख्या ठिकाणी गहन यांनी आपली योगसाधना वाढविली. यांचा शिष्य केशव भट राजर्षी याच्या संगतीने यांचा मुसलमानी राजवटीशीही परिचय वाढला. या नव्या संबंधामुळे यांची कीर्ती कल्याणी, गुलबर्गा या भागातही खूप वाढली. आळंदचे पंडित व जोशी यांचे अनुयायी झाले. प्रसिद्ध राजर्षी केशवभट यास सन १५४८-४९ मध्ये दीक्षा देऊन यांनी त्यांचे नाव केशव चैतन्य असे ठेविले. केशव चैतन्याबरोबर यांनी तीर्थयात्राही केली. सन १५६२ च्या सुमारास राघव चैतन्य यांनी जिवंत समाधी घेतली. यांचा जन्म सन १४६० नंतरचा असावा. यांना मुसलमानी परंपरेत हजरत लाडले मशायकही ऊर्फ राघव दराज आळंद शरीफ या नावाने ओळखत असत. राघव चैतन्यांनी संस्कृत व मराठी भाषेत अनेक ग्रंथ लिहिले. ब्रह्मस्वरूप, मायाविचार, ईशस्तवन, योगनिद्रा, सनातन धर्मविचार, इंद्रियदमन, त्रिगुणलीला, बुद्धिविलास ही त्यांच्या काव्यग्रंथांची नावे होत.

**केशव चैतन्य** हे या राघव चैतन्याचे प्रमुख शिष्य होत. यांचा जन्म राजर्षी कुळात झाला. हा मोठा राजकारणी व शूर असून यास राघव चैतन्याच्या सहवासात वैराग्याचे महत्त्व पटले. राघव चैतन्याकडून गुरुदीक्षा मिळाल्यानंतर यांचे नाव केशव चैतन्य म्हणून प्रसिद्ध झाले. राघव चैतन्य समाधिस्थ झाल्यानंतर केशव चैतन्य काही दिवस आळंद, मान्यहाळ, ओतूर येथे राहात असत. ओतुरास गंगावाटेवर यांचा मठ असे. शिष्यगणही यांना मोठ्या प्रमाणावर लाभला होता. केशव चैतन्यांनी सन १५७१ मध्ये समाधी घेतली. यांचाही परमार्थातील अधिकार मोठा असून यांनी भक्तिप्रकाश, वैकुंठपद, वासनामयदेह, गीताभागवतसार, परमार्थ विचार असे ग्रंथ लिहिले होते.

**बाबाजी चैतन्य** हे या केशव चैतन्याचे शिष्य होत. हे ब्रह्मचारी असून यांनी राघव चैतन्याच्या समाधीची सेवा बरीच वर्षे केली होती. यांचा मान्यहाळीसही एक मठ असे. यांची उपासना भक्तीप्रधान असून यांची कीर्ती महाराष्ट्रात व तेलंगणात पसरली होती. हिंदू मुसलमान असे अनेक शिष्य यांना मिळाले. यांचे गुरु केशव चैतन्य हे हजरत ख्वाजा बंदे नवाज व हे हजरत शेख शहाबुद्दीनसाहेब मान्यहाळ अशा नावांनी प्रसिद्ध होते. ओतुरासही यांचे वास्तव्य असे.

पुढच्या अभंगात समाधान व्यक्त केले आहे. वारकरी सम्प्रदायात या ' राम कृष्ण हरि ' मंत्राचे फारच महत्व मानले जाते 'भजन-कीर्तनास प्रारंभ यानेच होतो याचाच जप साधक करीत असतात. या सोप्या मनाने ईश्वर सर्वांना सहज व सुलभ करून दिला अशी श्रद्धा सांप्रदायिकांची आहे

*या मंत्राचा उच्चार निवृत्तिनाथ, ज्ञानदेव यांनीही केलेला आहे*

' रामकृष्ण माळा नित्य जप करी । तयासी संसारीं सुख आहे ', ' रामकृष्ण मूर्ती जपा आवृत्ति ', ' रामकृष्ण मंत्र जनांसी उद्धार ' अशा शब्दांत निवृत्तिनाथांनी या मंत्राचे महत्त्व विशद केले आहे ज्ञानेश्वर महाराजांनीही ' रामकृष्ण सणू आम्हां नित्य दिवाळी ', ' रामकृष्ण नेम गुरु भजनें ', ' हें योगियाचें निज जीवन । रामकृष्ण नारायण', ' ज्ञानदेवा ध्यानीं रामकृष्ण मनीं ' या शब्दांतून या प्रसिद्ध मंत्राचा गौरव केलेला आहे ' नाम मंत्र आम्हां हरि रामकृष्ण' असे मुक्ताबाईने म्हटले आहे. ' मंत्रामाजी मंत्र सार । रामकृष्ण हा उच्चार', ' रामकृष्ण हें वाचें उच्चारा । इतुकेंचि पुरें आम्हां ' इत्यादी चरणातून नामदेवानी या मंत्राचे माहात्म्य वर्णन केले आहे पुढे एकनाथतुकारामांनी तर या मंत्राचा उच्चार वारंवार करून भक्तिमार्गाची वाट सर्वसामान्य प्रापंचिकांनाही सुलभ करून दिली 'रामकृष्ण ऐसीं उच्चारोन नामें,' ' रामकृष्ण गानीं गात । टाळ चिपळ्या वाजवीत ', ' रामकृष्ण गोविंद नारायण हरी । केशवा मुरारी पांडुरंगा ' अशा अनेक चरणातून तुकोबांनी या मंत्राचा उच्चार वारंवार केलेला आहे.

३६९ माझिये मनींचा जाणोनियां भाव । तो करी उपाव गुरुराजा ॥ १ ॥
आवडीचा मंत्र सांगितला सोपा । जेणें नव्हे गुंपा कांहीं कोठें ॥ २ ॥
जाती पुढें एक उतरले पार । हा भवसागर साधुसंत ॥ ३ ॥
जाणत्या नेणत्या ज्या जैसी आवडी । उतार सांगडी तापे पेटीं ॥ ४ ॥
तुका म्हणे मज दावियेला तारू । कृपेचा सागरु पांडुरंग ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– उपाव–उपाय, गुंपा–गुंतागुंत, सांगडी–नौका, तापे–ताफे, पेटीं–नदीतून तरून जाण्याचे साधन.

अर्थ :– या सद्‌गुरुनाथाने माझ्या चित्तातील भाव जाणून मला हा मार्ग उपायाचा म्हणून सांगितला, १ तो असा की हा माझ्या आवडीचा मंत्र सोपा असा ' राम कृष्ण हरि ' असा सांगितला. त्यात कसलीही गुंतागुंत नाही. २ या सोप्या मंत्राच्या साह्याने अनेक साधुसंत यापूर्वी भवसागर तरून गेले आहेत ३ हा मंत्र सर्वांना सुलभ असा आहे. जाणत्यांना किंवा नेणत्यांना आपापल्या आवडीप्रमाणे याचा लाभ घेता येतो. या साधकांना हा मंत्र म्हणजे एकप्रकारची भवसागर तरून जाणारी नौकाच आहे. भवसागर पार करणारा हा एक ताफाच आहे. भवनदी तरून जाण्यास हे एक महत्त्वाचे साधन आहे. ४ तुकाराम महाराज म्हणतात, या पांडुरंगाने, या कृपेच्या सागराने भवसागरातून तरून जाणाऱ्या तारूचेच, नावेचेच ज्ञान मला दिले आहे. ५

३७० घालूनियां भार राहिलों निश्चितीं । निरविलें संतीं विठोबासि ॥ १ ॥
लावूनिया हातें कुरवाळिला माथा । सांगितलें चिंता न करावी ॥ २ ॥
कटीं कर सम चरण साजिरे । राहिला भीवरे तीरीं उभा ॥ ३ ॥
खुंटले सायास अणिकि या जीवा । धरिले केशवा पाय तुझे ॥ ४ ॥
तुज वाटे आतां ते करी अनंता । तुका म्हणे संतां लाज माझी ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– भार–ओझे, निरविलें–स्वाधीन केले, सायास–प्रयत्न

अर्थ :– मी आता या संतावर माझे ओझे घालून निश्चिंत झालो आहे या संतांनी मला विठ्ठलाच्या स्वाधीन केले १ या विठ्ठलाने मला जवळ घेऊन आपल्या हाताने माझा माथा कुरवाळिला; व काही चिंता करू

नकोस असे मला सांगितले. २ या विठ्ठलाचे हात त्याच्या कमरेवर आहेत, त्याची पावले एकसारखी असून अत्यंत सुशोभित अशी आहेत. हा विठ्ठल भिवरा नदीच्या तीरावर आपल्या भक्तासाठी उभा आहे ३ देवा, आता या जीवाकडून दुसरे कुठलेही प्रयत्न होणार नाहीत. केशवा, तुझेच पाय म्हणून मी धरिले आहेत ४ हे अनंता, आता तुला जे वाटेल ते माझ्याविषयी कर. तुकाराम महाराज म्हणतात, या संतांनी मला तुझ्याकडे सोपविले असल्यामुळे माझी लाज त्यानाच आहे. ५

३७१ माझिये मनींचा जाणा हा निर्धार । जिवासि उदार जालों आतां ॥ १ ॥
तुजविण दुजें न धरीं आणिका । भय लज्जा शंका टाकियेली ॥ २ ॥
ठायींचा संबंध तुज मज होता । विशेष अनंता केला संतीं ॥ ३ ॥
जीवभाव तुझ्या ठेवियेला पायीं । हेचि आतां नाहीं लाज तुम्हां ॥ ४ ॥
तुका म्हणे संतीं घातला हाबाला । न सोडीं विठ्ठला पाय आतां ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा:– निर्धार–निश्चय, आणिका–दुसऱ्यास, ठायींचा–मूळचाच

अर्थ – आता माझ्या मनाचा निश्चय तुम्ही जाणून असा. मी आता माझ्या जिवावर उदार झालो आहे १ देवा, आता मी तुझ्याशिवाय कोणाचाच आश्रय धरणार नाही. भीती, लाज, शंका यांचा मी पूर्णच त्याग केला आहे. २ देवा, तू व मी एकच असल्यामुळे तुझामाझा संबंध हा मूळचाच आहे; तोच या संतांनी विशेषकरून ध्यानात आणून दिला ३ आता मी माझा जीवभाव तुझ्याच पायावर ठेविला आहे पण याची तुला लाज आहे असे कसे दिसत नाही ? ४ तुकाराम महाराज म्हणतात, आता मी संतावर सर्वस्वी विश्वास ठेविल्यामुळे, आता विठ्ठला, त्यांनी मला तुझ्या स्वाधीन केले आहे, मी तुझी पावले आता सोडणार नाही ५

विवरण.– तुकाराम महाराजाचे हे चार अभंग त्याच्या गुरूपदेशाचे म्हणून फारच प्रसिद्ध व महत्त्वाचे आहेत अनेक महत्त्वाच्या बाबींचा स्पष्ट निर्देश यात आहे आपली गुरुपरंपरा, उपदेशाचा दिवस, गुरुमंत्र याचा उल्लेख केल्यानंतर तुकारामबुवानी हा आपला मार्ग अगदी सोपा, फार गुंतागुंत नसलेला असा सांगितलेला आहे घरी असलेली विठ्ठलाची भक्तीच तुकोबाना गुरूपदेशातून मिळाली कृपेचा सागर जो पांडुरंग तोच भवसागर तरून जाण्यास नौकेच्या रूपाने मिळाला असा त्यांच्या बोलण्यातील भावार्थ होय याच मार्गानी पूर्वीचे साधुसंत गेले असल्याचाही उल्लेख 'जाती पुढे एक उतरले पार' या शब्दात आला आहे तोही महत्त्वाचा आहे

ज्याचा जसा अधिकार तशी सोय या मार्गात असल्याचीही ग्वाही महत्त्वाची आहे 'उतार सांगडी तारें पेटीं' यांच्या साहाय्याने भवसागर तरून जाण्याचे कार्य ज्याच्या त्याच्या शक्तीप्रमाणे व अनुकूलतेप्रमाणे करायचे असते ज्याच्या त्याच्या अधिकाराप्रमाणे या मार्गाची चाल असते 'सडे जे देखिले। ते ध्यानदास लाविले। परिग्रही घातले तरियावरी' म्हणजे जे ब्रह्मचारी, सन्यासी वगैरे सडे होते त्याना योगमार्गाची दीक्षा दाखविली जाते व जे परिग्रही म्हणजे दाराप्रमुळे व संसार यांचे धनी होते, त्याना नामाच्या नौकेवर घातले असा खुलासा श्रीज्ञानदेवानीही केलेला आहे ज्ञानेश्वरीत या साधनाचा रूपक असा उल्लेख आलेला आहे काही जण 'ऐक्याचिया उतरा' घेऊन पैल तीराला जातात कोणी देवस्मरणाचिया सांगडी' बरोबर घेऊन निघालेले असतात कुणी 'यजनक्रियेची पेटी। पाठीशी घातली पोटीं' अशा अवस्थेत मार्गस्थ झालेले असतात, तर कुणी 'आत्मनिवेदनाचे तराडें' (तारू) साह्यास घेऊन भवसागरातून तरून जाण्याच्या तयारीत असतात तुकारामबुवानी ज्ञानदेवराच्या ज्ञानेश्वरीतील सातव्या अध्यायातील या कल्पनांशी सांगड आपल्या विचाराशी घातलेली दिसते

परमार्थमार्गात श्रीगुरू हाच नेहमी तारणारा असल्याने साधुसंतांनी आपल्या श्रीगुरुनाथाचा महिमा मोठ्या प्रेमाने वर्णन केलेला आहे शिष्य आपल्या गुरूविषयी केवढे प्रेम दाखवितो ? तर 'सयाह्य आपुलें। जेणें गुरुकुळीं पोसिलें । आरणपें केलें । भक्तीचें घर ॥ गुरुगृह जये देशीं । तो देशुचि वसे मानसीं।' अशा भाषेत ज्ञानेश्वरांनी श्रीगुरूचे माहात्म्य वर्णन केले आहे सद्गुरुनाथ कसा असतो, काय करतो, यासंबंधी एकनाथानी म्हटले आहे.

' तरी तो कार्यवाचामनें । अति कृपाळु दीनाकारणें । तोडी शिष्याचीं भवबंधनें । उठवी ठाणें अहंकाराचें ॥ जो शब्दज्ञानें पारंगतु । ब्रह्मानंदें सदा डुल्लतु । शिष्य प्रबोधनीं समर्थु । यथोचितु निजमार्गे । ' शिष्यप्रबोधन हे श्रीगुरूचे महत्त्वाचे कार्य बाबाजी चैतन्यानी तुकारामबुवांच्या चित्ताचे प्रबोधन केले तुकारामबुवांनी समकालीन भोंदू गुरूंची थट्टा केली आहे त्यांच्यासारख्या श्रेष्ठ संताला स्वत श्रीगुरू बाबाजी चैतन्य शोधीत आले हाही योग कमी महत्त्वाचा नाही

३७२ देव सखा जरी । जग अवघें कृपा करी ॥ १ ॥
ऐसा असोनि अनुभव । कासाविस होती जीव ॥ २ ॥
देवाचें जतन । तया बाधूं न शके अग्न ॥ ३ ॥
तुका म्हणे हरी । प्रल्हादासि यत्न करी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – जतन–जपणूक, यत्न–यतन, जतन, रक्षण

अर्थ – देव एकदा सोबती झाल्यावर, त्याची कृपा झाल्यावर सगळ्या जगाची आपल्यावर कृपा झाल्यासारखी असते १ असा अनुभव असूनही जीव उगाचच कासावीस होत असतात २ ज्याला देवाने संरक्षण दिले, ज्याची जपणूक ईश्वराने केली त्याला प्रत्यक्ष अग्नीही बाधा करू शकत नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, त्या प्रल्हादासही अग्नीच्या संकटातून ईश्वरानेच सांभाळिले ४

विवरण – एकदा देवाने कृपा केली म्हणजे मग प्रत्यक्ष अग्नीसारख्या प्रखर पंचमहाभूताचाही त्रास होत नाही हे सांगताना बुवांनी प्रल्हादाचे एकच उदाहरण दिले आहे ते योग्यच आहे प्रल्हाद हा हिरण्यकशिपू व कयाधू यांचा मुलगा हा मोठा विष्णुभक्त होता याने बाळपणीच भक्तीचे स्तोम त्याच पढीत हिरण्यकशिपूस न आवडल्यामुळे प्रल्हादाचा छळ करण्यास त्याच्या बापाने सुरुवात केली हत्तीच्या पायास बांधून तुडविणे, सर्प डसविणे, वारुणीपाशानें बांधणे, शस्त्रप्रहार करणे, कड्यावरून लोटून देणे, अग्नीत टाकणे यासारख्या उपायांनी प्रल्हादाचा छळ झाला पण अत्यंत शांत चित्ताने त्याने तो सहन केला व ईश्वराची भक्ती आणखी दृढ केली शेवटी ईश्वराने नृसिंहाचा अवतार धारण करून प्रल्हादाच्या बापाचा वध केला याची विष्णुभक्ती श्रेष्ठ प्रकारची असून हा थोर नृसिंहभक्त म्हणूनही प्रसिद्ध आहे

३७३ भले म्हणवितां संतांचे सेवक । आइत्याची भीक सुखरूप ॥ १ ॥
ठसाविता बहु लागती सायास । चुकल्या घडे नास अल्प वर्म ॥ २ ॥
पाकसिद्धी लागे संचित आइतें । घडतां सोई तें तेव्हां गोड ॥ ३ ॥
तुका म्हणे बरे सांगताचि गोष्टी । रणभूमि दृष्टि न पडे तों ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – आयते–श्रम न करता मिळालेले, सायास–श्रम, नास–नाश, संचित–साहित्य

अर्थ – आम्ही संतांचे सेवक आहोत असे म्हणताना बरे वाटते संतमाहात्म्याची आयती मिळालेली भीक आपणास बरी वाटते १ पण त्यांचा महिमा मनात ठसावयास फार श्रम पडतात काही थोडे जरी चुकले तरी संतत्वाचे मर्म नाहीसे होईल हेही ध्यानात हवे २ चांगल्या स्वयंपाकाच्या प्राप्तीसाठी साधनसाहित्याची तयारी आयती असेल तर उत्तम तरच सर्व स्वयंपाक गोड व रुचकर लागतो ३ युद्धाच्या वार्ता दूर राहूनच करावयास गोड असतात प्रत्यक्ष रणक्षेत्र दृष्टीस पडले नाही तोपर्यंतच या वार्ता मनोरंजक असतात त्याप्रमाणे संतपणाच्या गोड गोष्टी होत ४

३७४ संतसमागम एक्यादिया परी । राहावे त्याचे द्वारीं[1] श्वानयाती ॥ १ ॥
तेथें रामनाम होईल श्रवण । घडेल भोजन उच्छिष्टाचें ॥ २ ॥

---

[1] परीं

कामारी बटीक सेवेचे सेवक । दीनपण रक तेथें भलें ॥ ३ ॥
तुका म्हणे सर्व सुख त्या संगती । घडेल पंगती संतांचिया ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– समागम–सहवास, परी–प्रकाराने, श्वानयाती–कुत्र्याची जात होऊन, कामारी–काम करी, रक–गरीब

अर्थ – संतांचा सहवास अगदी हलक्या मार्गाने साधता आला, त्यांच्या दारांत कुत्र्याच्या जातीचे होऊन राहता आले तरी राहावे, १ कारण त्या ठिकाणी रामनामाचे श्रवण होईल व संतांच्या भोजनानंतर उच्छिष्टाचे सेवन करायला मिळेल २ तेथे कामकरी बटीक अशा गरीब वृत्तीनेही राहावे व संतांची सेवा करावी. ३ तुकाराम महाराज म्हणतात, त्या संतांच्या संगतीत सर्व प्रकारची सुखें प्राप्त होतील त्यांच्या पंगतीत सुखमय असे भोजन घडेल. ४

३७५ एकली राणागोविंदा सवें । गेले ठावें तें जालें ॥ १ ॥
मज न म्हणा न म्हणा शिंदळी । नाहीं विषम जवळीं आतळलें ॥ २ ॥
नव्हती देखिली म्यां वाट । म्हणोनि हा धीट संग केला ॥ ३ ॥
भेणें मिठी दिधली गळां । सेजे जवळ दडालें ॥ ४ ॥
सलगी धरी पयोधर । साहाती करमुर सवें ॥ ५ ॥
आहेव मी गर्भीणपणें । हे सांगणें कां लागे ॥ ६ ॥
तुका म्हणे सेवटा नेलें । संपादिलें उभयता ॥ ७ ॥

शब्दार्थ व टीपा – शिंदळी–वाईट चालीची स्त्री, विषम–विरुद्ध, संग–सहवास, सोबत, भेणें–भयाने करमुर–एक प्रकारचे शस्त्र, आहेव–सौभाग्यवती

अर्थ :–त्या गोविंदाबरोबर रानावनात मी एकटी गेले हे तुम्हांस कळले वाटते ? १ पण त्यासाठी मला वाईट चालीची म्हणू नका असे मी पुन पुन सांगते हो मी त्याच्याजवळ गेले ही काही लोकविरुद्ध गोष्ट मी केली असे नाही २ मी या रानची वाट कधी पाहिली नव्हती, मला ती माहीत नव्हती म्हणून धीटपणाने त्याची सोबत घेतली ३ रानावनातील श्वापदांच्या भयाने मी त्याच्या गळ्यास मिठी मारली, मी त्याच्या शेजेजवळ दडून राहिले, म्हणून काय झाले ? ४ त्याने गमतीने, थट्टेने माझे स्तन धरले, पण मी मात्र त्याचे करणे एक प्रकारच्या शस्त्राप्रमाणे मानले, सहन केले ५ मी गर्भिण असले तरी मनात संशय धरू नका तुम्ही मी सौभाग्यवती आहे ना ? तुम्हास हे सर्व सांगायला हवे का ? ६ तुकाराम महाराज म्हणतात याप्रमाणे माहिती देऊन तिने उभयतांचा लौकिक वाढवून आपले कार्य शेवटास नेले ७

विवरण – यथून पुढेच काही अभंग शृंगारमिश्रित अशा भक्तिभावनेचे आहेत श्रीकृष्णाशी आलेला संबंध गौळणींच्या वा गोपींच्या निमित्ताने किती विविध प्रकारचा होता, त्यात किती नाजूक छटा होत्या, याचे मोठे मनोहर वर्णन तुकाराममुखाने विविध प्रसंगांत केलेले आहे वरवरची भाषा शृंगाराची व स्त्रीपुरुष प्रेमाची, परंतु बोध किंवा अनुभव मात्र श्रीकृष्णप्राप्तीचा, भक्तीचा असा हा प्रकार या अभंगाचा आहे मागे अभंग क्र ७ वर विवरण केले आहे ते पाहावे

३७६ होते बहुत हे दिवस मानसीं । आजि नवस हे फळले नवसीं ॥
व्हावी भेटी ते जाली गोविंदासीं । आतां सेवा करीन निश्चयेसीं वो ॥ १ ॥
स्थिर स्थिर मजचि साहे करा । बहु कष्ट सोसिल्या येरझारा ।
येथें आड मज न साहावे वारा । देऊनि कवाड आलें तें दुसरें वारा वो ॥ २ ॥

मूळ सत्ता हे सायासाची जोडी। नेदी वेगळें होऊं एक घडी।
नाहीं लौकिक स्मरला आवडी। आतां येणें काळें या वो लोभें वेडी वो ॥ ३ ॥
उदयीं उदय साधिला अवकाश। निश्चितीनें निश्चिती सावकाश।
धरियें गोडी बहुत आला रस। तुका म्हणे हा मागुता न ये दिवस वो ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – साहे–मदत, सायासाची–प्रयत्नाने

अर्थ – या गोविंदाची भेट व्हावी असे माझ्या मनात फार दिवसापासून होते आज मात्र माझे सर्व नवस फळास आले आहेत, पूर्ण झाले आहेत कारण आज त्या गोविंदाची व माझी भेट झाली आहे आता मी त्याची जन्मभर सेवा करीत राहीन १ तुम्ही मात्र स्थिर राहून मला साह्य करा मी आजवर जन्ममृत्यूच्या खेपा घालून खूप कष्ट सहन केले आता येथे मला दुर्जेपणाचा वारा सुद्धा सहन होत नाही मी आज दुर्जेपणाचे दार लावून आले आहे दुर्जेपण आता दूर सारा २ मूळ स्वरूपाच्या सत्तेत असणारे हे स्थान मी मोठ्या प्रयत्नाने मिळविले आहे आता त्याच्यापासून एक क्षणभरही मी दूर होणार नाही यासाठी मी लौकिकाचीही फिकीर करणार नाही आता यावेळी याचाच लोभ मला जडून मी त्याच्या नादाने वेडी झाले आहे हो ३ निजात्मबोधाच्या उदयाने माझाही उदय झाला मी निश्चित झाले आहे याची गोडी फार लागल्यामुळे तिचाही आस्वाद फार चांगला आहे. तुकाराम महाराज म्हणतात, असा हा भाग्याचा दिवस मागितला तरी पुन दिसणार नाही ४

३७७ स्वयें सुखाचे जाले अनुभव। एक एकीपाशीं सांगतील भाव।
अवघ्या अवघा हा कैसा नवलाव। सर्वसाक्ष तेथेंचि त्याचा जीव वो ॥ १ ॥
आपआपणाशीं करिती नवल। परि वादावाद न खंडिती बोल।
एका मेघश्यामें जलधर वोल। रसीं उताविळ हृदय सखोल वो ॥ २ ॥
एक विषय तो सकळांचा हरि। त्याच्या आवडीनें आवडी इतरीं।
अध बहिर हे प्रेतलोकाचारी। त्याची कीर्ति गाइली पुराणांतरीं वो ॥ ३ ॥
स्तुति पराविया मुखें रुचिकर। प्रीतिपात्राच्या गौरवीं आदर।
परस्परें हें सादरा सादर। योग सज्जनाच्या सुखा नाहीं पार वो ॥ ४ ॥
भक्तिवल्लभ न तुटे चराचरीं। आप्त अनाप्त हे ऐशी ठेवी उरी।
दुरी जवळी सचिता एसे धरी। रगा रगा ऐसे होणें लागे हरि वो ॥ ५ ॥
तुका लाधला हे उच्छिष्ट भोजन। आला बाहेरी प्रेमें वोसंडून।
पडिलें कानीं त्या जीवाचें जतन। धरियेलें एकाभावें हृदयीं चरण वो ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – नवलाव–नवल, जलधर–मेघ, पराविया–दुसऱ्याच्या

अर्थ – श्रीकृष्णप्राप्तीचा अनुभव असा स्वत स आल्यानतर त्या गोपी एकमेकींना तो मोठ्या प्रीतीने सागू लागल्या हा श्रीकृष्ण नाना रूपे घेऊन सर्वांनाच कसा मिळाला ? हे नवल कसे घडले हो ? तो सर्वसाक्षी जो श्रीकृष्ण त्याच्याच ठिकाणी त्यांचा जीव जडून राहिला १ मग त्या आपापसात नवल करू लागल्या त्याच्या विषयीच्या वादविवादात सुख असल्यामुळे त्या ते सोडीत नाहीत या एका मेघश्यामाच्या, कृपेच्या मेघाच्या ओलाव्यामुळे त्यांचे हृदय प्रीतीने द्रवून गेले आहे २ त्या सर्व गोपींचा एकच विषय म्हणजे तो श्रीहरीच बनला आहे त्याच्यावरील प्रीतीमुळे त्यांना इतर वस्तूवरील प्रीती ध्यानात येते बाह्य लौकिकाविषयी या गोपिका अध, बहिऱ्याच झाल्या आहेत लोकांच्या बोलण्याकडे त्यांचे लक्ष नाही परतु त्याची कीर्ती सान्या पुराणांनी गाइली आहे ३ आपल्या आवडत्या व प्रीतीच्या माणसाची स्तुती कुणी दुसऱ्याने केली तर ती अधिक रुचकर लागते कारण आपल्या प्रीतीपात्राचा गौरव त्यात असतो व त्याच गौरवाविषयी आवड आपल्या मनात निर्माण होते म्हणून या गोपी परस्परांशी

मोठ्या आदराने श्रीकृष्णाच्या गुणगानात तल्लीन झाल्या या सज्जनाच्या सहवासाच्या सुखास अंत नाही ४ या भक्तीचे प्रेम चराचर सृष्टीत निर्माण झालेले असते ते कधीं तुटत नाही त्याच्या ठिकाणी आपपरभावही निर्माण होत नाही, हा आप्त म्हणून जवळचा, हा दूरचा असा विचार तेथे नसतो त्याच्याजवळ किंवा त्याच्याहून दूर हे ज्याच्या त्याच्या संचित कर्माप्रमाणे ठरते ज्याच्या त्याच्या मनात कर्माचा जसा रंग असेल तसा श्रीहरी त्याला जवळचा व दूरचा वाटतो ५ या गोपींच्या व संताच्या उच्छिष्टाचे भोजन मात्र या तुकारामास मिळाले आहे आतबाहेरून प्रेमाचा पूर ओसडून आला आहे या गोपिकांची श्रीकृष्णस्तुती ज्याच्या कानी पडली त्या जीवाचे जतन आपोआपच होते तुकाराम महाराजसुद्धा हे श्रीचरण हृदयाशी धरतात ६

३७८ आजि कां वो तूं दिससी दुश्चिती । म्हणी एका मन लगे तुझ्या चित्तीं ।
दिले ठेवूं ते विसरसी हातीं । नेणों काय बैसला हरि चित्तीं वो ॥ १ ॥
सर सर परती जालीस आता भाड । कैसे दाखविसी जगासी या तोंड ।
व्याली माय ते लाजविली रांड । नाही थार दो ठायीं जाला खंड वो ॥ २ ॥
होतें तैसें ते उमटलें वरी । बाहेच सपादणी अंतरींची चोरी ।
नाहीं मर्यादा नि:संग[1] बावरी । मन हे गोविंदीं देह काम करी वो ॥ ३ ॥
नाहीं करीत उत्तर कोणासवें । पराधीन भोजन दिले खावें ।
नाहीं अचळ सावरावा ठावें । देखो उदासीन तुज गे देहभावें वो ॥ ४ ॥
कोठें नेणों हा फावला एकांत । सदा किलकिल भोंवतीं बहुत ।
दोघे एकवाटा बोलावया मात । नाहीं लाज धरिली दिला हात वो ॥ ५ ॥
करी कवतुक खेळ खेळे कान्हा । दावी लाघव भाउवी सासुसुना ।
परा भक्ति हे शुद्ध तुम्ही जाणा । तुका म्हणे ऐसें कळो यावें जना वो ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – दुश्चिती–उदास भाड–भाडखोर, अचळ–पदर, किलकिल–किलबिल, गोंगाट, लाघव–कौतुक

अर्थ – एक सासू आपल्या सुनेला म्हणत आहे आज तू मुली, अशी उदास का ग दिसत आहेस? एका कामात तुझे चित्त लागेना तर इतर जी वस्तू ठेवून देतेस ते स्थान तू विसरून जातेस तुझ्या चित्तात काय त्या श्रीहरीने ठाण दिले आहे काय न कळे १ दूर हो तू दूर हो तू पुरतीच भाडखोर व निर्लज्ज झालीस आता या जगात तोंड कसे दाखवणार आहेस ? तुला जन्म देणारी तुझी आई रांडच म्हटली पाहिजे तिने सर्वांनाही लाजविले आहे तुला जन्म देऊन सासरमाहेर या दोन्ही बाजूचा तुझा संबंध तुटला ना २ तुझ्या मनात जे काळेबेरे होते तेच बाहेर प्रकटले कितीही बाहेरची बतावणी केलीस तरी तुझ्या मनात जे चोरकपट होते ते प्रकट झालेच की तुला आता काहीच मर्यादा नाही राहिली तू अगदी नि:संग व बावरी बनली आहेस तू वरवर कामात देह राबवीत असलीस तरी तुझ्या मनात त्या गोविंदास कायमचे स्थान दिले आहे ३ तू धड कोणाशी बोलत नाहीस कुणाला उत्तर देत नाहीस पराधीनासारखी वागतेस, कुणी भोजन दिले तरच घेतेस, अंगावरला पदर सावरायाचे हेही भान तुला उरत नाही तुझा सारा देहभावच उदासीन होऊन गेलेला आहे ४ तसे पाहिले तर तुझ्या भोवती हा नेहमीच गजबजाट असतो पण तुला कुठे एकान्त मिळाला कुणास माहीत ! दोघानी एकत्र राहून कसे व कुठे बोलणे केलेत हे कळत नाही लाजलज्जा सोडून तू हरीच्या हातात हात दिलास तरी कसा ग ? ५ तुकाराम महाराज म्हणतात, याप्रमाणे तो श्रीकृष्ण कौतुकाने खेळ खेळतो सासूसुनांचे भांडण लावून कौतुक पाहतो तो परंतु ही श्रेष्ठ प्रकारची भक्ती तुम्ही जाणा सर्व लोकांनी ही भक्ती समजावून घ्यावी ६

[1] नि:शंक

३७९ भरिला उलंडूनि रिता करी घट । मीस पाणियाचें गोविंदाची चट ।
चाले झडझडां उसंतूनि वाट । पाहे पाळतूनि उभा तोचि नीट वो ॥ १ ॥
चाळा लावियेले गोप गोपीनाथें । जाणे आवडीचें रूप जेथें तेथें ।
दावी बहुतांच्या बहुवेषपंथें । गुणातीतें खेळ मांडियेला येथें वो ॥ २ ॥
मनीं आवडे तें करावें उत्तर । कांहीं निमित्ताचा पाहोनि आधार ।
उगा राहे कां मारिसी कंकर । मात वाढविसी उत्तरा उत्तर वो ॥ ३ ॥
धरिली खोडी दे टाकोनियां मागें । न ये विनोद हा कामा मशीं संगें ।
मिठी घालीन या जीवाचिया त्यागें । नाहीं ठाउकीं पडिलीं तुझीं सोंगें रे ॥ ४ ॥
सुख अंतरींचें बाह्य ठसठसी । म्हणे विनोद हा काय सांग यासी ।
तुज मज काय सोयरीक ऐसी । नंदानंदन या थोरपणें जासी रे ॥ ५ ॥
करी कारण तें कळों नेदी कोणा । सुख अंतरींचें बाह्य रंग जाणा ।
मन मिनलें रे तुका म्हणे मना । भोग अंतरींचा पावे नारायणा वो ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा :– उलंडूनि–साडून, रिता–रिकामा, मीस–निमित्त, चट–मवय, कंकर–खडा

अर्थ :– श्रीकृष्णाच्या दर्शनाची लालसा या गोपींच्या मनात पाहा शिरो आहे. घरी पाण्याने भरलेला घट त्यांनी साडून दिला व पाणी भरण्याचे निमित्त करून त्या गोविंदाच्या दर्शनास चटावलेल्या गोपी नदीपलीकडे निघाल्या. श्रीकृष्णाकडे जाणारी वाट त्या झपाझपा चालू लागल्या आणि तो श्रीहरी आपलीच वाट पाहात आहे असे त्यांनी पाहिले. १ अशा प्रकारे या श्रीकृष्णाने या गोपगोपिकांना चागलेच वेडावून सोडले आहे. त्यांना आपल्या प्रीतीचे असे हे कृष्णरूपच जिथे तिथे दिसते. या गुणातीत श्रीकृष्णाने नाना वेष धारण करून हा खेळ मांडिला आहे. २ मनात जे आहे त्यास अनुसरून काही भाषण करावे त्याच्याशी, अशा आवडीच्या निमित्ताचा आधार घेऊन त्या म्हणू लागल्या, 'कृष्णा, उगी रहा ना! उगाच खडा का मारतोस? माझ्याशी बोलणे वाढवून का उत्तर देतोस? ३ अशी ही खोडी सोड तू टाकून दे ना. ही तुझी थट्टा माझ्यापाशी नाही चालणार. मी आपला जीव सोडून तुला मिठी देईन. तुझी असली सोंगे मला चांगलीच माहीत नव्हती रे.' ४ अशा प्रकारे या गोपींच्या हृदयात साठवलेले श्रीकृष्ण-प्रीतीचे सुख बाहेर प्रगटून येते. त्या म्हणतात, 'अशा या विनोदाचा अविर्भाव तू आमच्याशी का करतोस? अशा थट्टेचे तुझे व आमचे नाते तरी आहे का? तू नंदाच्या थोरपणावर जाऊ नकोस. तू श्रीमंताचा पोर म्हणून ऐट दाखवू नकोस.' ५ तुकाराम महाराज म्हणतात, हा श्रीकृष्ण काय काम करील ते कुणासही समजू देत नाही. या गोपींच्या बाह्य आचरणाचे रंग विविध प्रकारांचे असले तरी त्यांच्या मनातील सुख मात्र मोठेच आहे. या गोपींचे मन श्रीकृष्णाच्या मनाशी मिळून गेले आहे. त्यामुळे या गोपींचे सर्व भोग त्या श्रीकृष्णालाच प्राप्त होतात. ६

३८० आजि नवल मी आलें येणें राणें । भेटी अवचिती नंदाचिया कान्हें ।
गोवी सांगती वो सकळ ही जन । होतें संचित आणियेलें तेणें वो ॥ १ ॥
गेलें होउनि न घले आतां कांहीं । साद घालितां जवळी दुजें नाहीं ।
अंगीं जडला मग उरलें तें काई । आतां राखतां गुमान भलें बाई वो ॥ २ ॥
बहुत कामें मज नाहीं आराणूक । एक सारितां तों पुढें उभें एक ।
आजि मी टाकोनि आले सकळिक । तंव रचिलें आणिक कवतुक वो ॥ ३ ॥
चिंता करितां हरिली नारायणें । अंगसंगें मिनतां[1] दोघेजणें ।
सुखें निर्भर जालियें त्याच्या गुणें । तुका म्हणे खुंटलें येणें जाणें वो ॥ ४ ॥

---

१ आता

शब्दार्थ व टीपा :– गोवी– गतागुत, साव घालणे–हाक मारणे, गुमान–गुप्त, आराणूक–सौख्य, निभंर–पूर्ण, विश्राती, सुटले–सपले

अर्थ :– आज फारच नवल झाले, कारण मी या रानात आले व गोविंदाची अवचितपणे भेट झाली हो सर्व माणसे या भेटीविषयी फार गुतागुत सागत असत; पण हा नदाचा कान्हा माझ्या पूर्व पुण्याईने आज मला भेटला हो १ आता जे व्हायचे ते होऊन गेले आता दुसरा काही उपायच उरला नाही बरे, त्यावेळी कुणास तरी हाक मारावी तर कुणी दुसरे तिथे नव्हतेच मग तो श्रीकृष्ण माझ्या अगाशी जडला मग आता काय उरले ? आता बाई सर्व गुप्तपणे ठेवावे, कुणास काही सांगू नये हेच खरे २ आतापर्यंत मला पुष्कळ कामे होती, एक सपले, की दुसरे उपस्थित होई मला कशी ती विश्राती नव्हती पण आज मात्र मी ती सर्व कामे सोडिली व येथे आले तो त्या श्रीकृष्णाने येथे आणखीनच एक नवे कौतुक रचले पाहा ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशी चिंता ती गोपी करीत असतानाच ती नारायणाने दूर केली दोघाची अर्थ एकमेकास मिळाल्यानतर दोघानाही सपूर्ण सुख झाले व त्यामुळे पुन जन्मास येणे जाणे सपले ४

३८१ मैं भुली घरजानी वाट । गोरस बेचन आयें हाट ॥ १ ॥
कान्हा रे मनमोहन लाल । सब ही बिसरु देखें गोपाल ॥ २ ॥
काहा पग डारू देख आनेरा । देखें तो सब वोहिने घेरा ॥ ३ ॥
हूं तो थकित भैर तुका । भागा रे सब मनका धोका ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– मैं–मी, भुली–विसरले, हाट–बाजार, पग–पाऊल

अर्थ – एक गोपी म्हणत आहे, मी या बाजारात गाईचे दूध विकण्यासाठी आले होते पण आता परत जाताना घराची वाटच विसरून गेले आहे १ या मनमोहन कन्हैयाने, लालाने माझे चित्त हरण केले या गोपाळाच्या नादात मी सर्व विसरून गेले २ मी आता पाऊल तरी कुठे टाकू ? जिकडे तिकडे त्याच्या रूपानी मला घेरले आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, हे सर्व लाघव पाहून ती गोपी चकित होऊन गेली. तिच्या मनातील सर्व प्रकारची भीती नष्ट झाली ४

विवरण – येथून पुढचे दोन व हा एक असे तीन अभग मराठी भाषेतील नाहीत ते हिंदी भाषेतील आहेत. मराठी सतानी हिंदी भाषेत फार मोठी रचना केलेली आहे राम व कृष्ण ही दोन प्रधान दैवते उत्तर हिंदुस्थानातील गगा, यमुना हिमालय द्वारका, मथुरा, वृन्दावन काशी, पुरी ही प्रमुख तीर्थस्थान उत्तरेसच तेव्हा पूर्वीपासून यात्राच्या निमित्ताने उत्तर हिंदुस्थानात सारखी येजा असे नामदेव दोन वळा उत्तरेत पजाबापर्यंत गेले होते पहिल्या खेपेस त्याच्याबरोबर ज्ञानेश्वरादिकाच सतमडळही होते एकनाथस्वामीनीही काशीयात्रा केलेली होती रामदास तर साऱ्या भारतात बारा वर्षेपर्यंत भ्रमण करीत होते लोकस्थिती डोळसपणे पाहात होते उत्तरेचे साधुसतही दक्षिणेकडे रामेश्वरापर्यंत येत असत याच्या वैचारिक देवाण घेवाणीची भाषा अर्थातच सस्कृत किंवा हिंदी असावी श्रीकृष्णाच्या, श्रीरामाच्या भक्तिभावाने ते एकत्र बाधले गेले होते सर्व भारतीय साधुसताची निष्ठा एक आहे अनुभूती एक आहे भक्तिमार्गाची चाल एक आहे भाषेचा, धर्माचा जातीचा विचार बाजूस राहून या साधुसताच्या प्रचारकार्यात एक परमेश्वराची जवळीक हेच नाते दृढ होते कबीर, तुलसीदास, सूरदास, श्री चैतन्यदेव नरसीमेहता त्यागराज, पुरदरदास इत्यादी सतकवी श्रीकृष्ण, श्रीराम श्रीविठ्ठल याच्या प्रेमाने बद्ध झालेले असल्यामुळे त्याची अनुभूती समान होती

मराठी सतानी हिंदी भाषेत रचने कशासाठी केली ? हिंदी भाषाच जाणणाराची सोय त्यात किती होती याविषयी तर्क करणे कठिण आहे पण एक अदाज असा की सूरदास नददास, मीराबाई इत्यादी कृष्णभक्त कवीनी व सतानी हिंदी भाषेतून अवीटपणे श्रीकृष्णाचे स्तवन केले आहे त्याच्या लीला गाइल्या आहेत हिंदी, विशेषत व्रजभाषा ही जणू कृष्णलीला गाण्यासाठीच तयार झाली अनेक साधुसताच्या व कृष्णलीलाच्या सहवासाने पवित्र बनलेली ही भाषा याच प्रेमापोटी एकदा वापरून पाहण्याची इच्छा मराठी सतानी व्हावी हे साहजिकच आहे या एका वृत्तीतून मराठी सताच्या हिंदी भाषेतील कृष्णलीलाकडे पाहण्यासारखे आहे

३८२ हरिबिन रहिया न जाये जिहिरा । कबकी थाडी देखें राहा ॥ १ ॥
क्या मेरे लाल[1] कवन चुकी भई । क्या मोहिपासितो बेर लगाई ॥ २ ॥
कोई सखी हरी जावे बुलावन । बार हि डारू उसपर तन ॥ ३ ॥
तुका प्रभु कब देखें पाऊ । पासीं आऊ फेर न जाऊ ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – जिहिरा–प्राण, थाडी–वाट, बेर–वळ, तन–शरीर

अर्थ – या श्रीहरीशिवाय माझा आता प्राण राहाणार नाही मी किती तरी वेळ झाला त्याची वाट पाहात उभी आहे १ माझ्या लाला, कृष्णा माझ्या हातून काही चूक झाली का रे ? माझ्याकडे येण्यास एवढा वेळ तरी का केलास ? २ कुणी एखादी सखी या श्रीहरीला बोलावणारी भेटेल तर मी तिच्यावरून जीव ओवाळून टाकीन ३ तुकाराम महाराज म्हणतात, या प्रभूचे पाय मी कधी बरे पाहीन ? एकदा त्याच्यापाशी पोचल्यावर मग मी परत फिरणार नाही ४

३८३ भलो नदाजीको डिकरो । लाज राखीलीन हमारो ॥ १ ॥
आगळ आवो[2] देवजी कान्हा । मैं घरछोडी[3] आहे म्हाना ॥ २ ॥
उनसु कळना[4] नव्हे तो भला । खसम अहकार दादुला ॥ ३ ॥
तुकाप्रभु परबल[5] हरी । छपी आहे हु जगाथी न्यारी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा –डिकरो–मुलगा, आगळ–पुढे, खसम–नवरा, रागीट परबल–बलवान

अर्थ – हा नदराजाचा मुलगा फार चांगला आहे कारण त्यानेच माझी लाज राखली आहे १ नदाच्या कृष्णा, जरा पुढे ये ना तुझ्यासाठी मी घर सोडून भेटण्यासाठी आले आहे २ माझा अहकाररूपी पती फार रागीट आहे, त्यास कळता कामा नये नाही तर तो फार रागवेल ३ तुकाराम महाराज म्हणतात हा प्रभू फार बलवान आहे याच्या मागेच मी या जगापासून वेगळी होऊन लपली आहे ४

३८४ नका काहीं उपचार माझ्या शरीरा । करू[6] न साहती बहु होतो उबारा ।
मनोजन्य व्यथा वेध जाला अतरा । लवकरी आणा नदाचिया कुमरा[7] ॥ १ ॥
सखिया वेशिया तुम्ही प्राणवल्लभा । निवेदिला भाव आर्तभूत या लोभा ।
उमटली अगीं वो सांवळी प्रभा । साच हे अवस्था कळे मज माझ्या क्षोभा ॥ २ ॥
नये कळो नेदावी हे दुजियासि मात । घडावा तयासी उत्कठा एकात ।
एकाएकी साक्षीं येथें आपुले चित्त । कोण्या काळें होईल नेणों भाग्य उदित वो ॥ ३ ॥
स्वाद सीण देहभान निद्रा खडन । पाहिले तटस्थ उन्मळित लोचन ।
अवघे वोसाऊन उरले ते चरण । तुका म्हणे दर्शनापें आले जीवन[8] ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – उबारा–उष्णता वेशिया–आधार

अर्थ – श्रीकृष्णाच्या विरहाने तापलेली एक विरहिणी आपल्या मैत्रिणीस म्हणत आहे माझ्या शरीराला काही शीतोपचार करू नका मैत्रिणींनो तुमचे उपचार काही मला आता सहन होत नाहीत त्यांच्यामुळे फारच उष्णता वाढत आहे माझा रोग माझ्या मनात झालेला आहे त्याचे दु ख मनास होणारे आहे एकच उपाय करता येण्यासारखा आहे तो करा त्या नदाच्या कुमाराला लौकर आणा बर १ अग सख्यांनो, मैत्रिणींनो, तुम्हीच मला अशा प्रसगी मोठा आधार आहात म्हणून माझ्या मनातील हा तीव्र भाव मी तुम्हांस सागितला हो त्या श्रीकृष्णाचा वेध माझ्याकडे पाहा किती आहे त्याची सावळी प्रभा माझ्या अगात उमटून आली आहे हो सव स्थिती खरीच

१ जाल २ आवे ३ मे घर छाडी आहे म्हाणा ४ उन्हसु कळना वेतो भला ५ परवली ६ न साहाते मज बहु होतो उबारा ७ कुमारा वो ८ भावना वो
तु गाथा २४

आहे, हे माझ्या या अवस्थेवरून समजेल तुम्हांस. २ माझ्या मनाची ही अवस्था कुणा दुसऱ्यास सांगू नका बरं. त्या श्रीहरीशी एकान्त घडावा अशीच मनात उत्कट इच्छा आहे. यास आपले एकट्याचेच चित्त साक्षीस असावे. असे भाग्य माझे केव्हा उदयास येईल ग ? ३ रुची, शीण, देहभान, निद्रा यांचा नाश होऊन तटस्थ अशी अवस्था केव्हा प्राप्त होईल ? डोळे अर्धोन्मीलित कधी होतील ? सर्व काही नाहीसे होऊन त्या श्रीहरीचेच चरण मला केव्हा दिसतील बरे ?' तुकाराम महाराज म्हणतात माझ्या जीवालाच जगपणाऱ्या त्या देवाचे दर्शन मला झाले. ४

३८५ पडिली भुली धांवतें सैराट । छंद गोविंदाचा चोजवितें वाट ।
मागें सांडोनि सकळ बोभाट । वंदी पदांबुजें ठेवुनि ललाट वो ॥ १ ॥
कोणी सांगा या गोविंदाची शुद्धी । होतें[१] वहिलें लपाला आतां खांदीं ॥
कोठें आड आली हे देहबुद्धी । धांवा आळवीं करुणा कृपानिधी वो ॥ २ ॥
मागें बहुताचा अंतरला संग । मुळें जयाचिया तेणें केला त्याग ।
पहिलें[२] पाहातां तें हरपलें अंग । खुंटली वाट नाहींसे जालें जग वो ॥ ३ ॥
शोकें वियोग घडला सकळांचा । गेल्या शरण हा अन्याय आमुचा ।
केला उच्चार रे घडल्या दोषांचा । जाला प्रगट स्वामी तुकयाचा वो ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– भुली–मोह, भ्रम सैराट–स्वैरपणे, चोजवितें–शोधितें, शुद्धी–शोध, वहिलें–सत्वर

अर्थ –त्या श्रीकृष्णाच्या नादाची भूल मला पडली आहे. मोह निर्माण झाला आहे. त्या गोविंदाचाच एक छंद मला लागला असून मी त्याचीच वाट शोधीत आहे. लोक काय म्हणतात हे सर्व सोडून मी त्याच्या चरणावर डोके ठेवून त्यास वंदन करीत आहे १ त्या गोविंदाचा शोध कुणी तरी करील काय ? हा सत्वर कुठे तरी झाडांच्या खांदी-मागे लपला काय ? का माझीच देहबुद्धी कुठे आड आली म्हणून तो मला दिसत नाही काय ? त्या करुणेच्या सागराला, कृपेच्या निधीला आळवून कुणी तरी बोलवा हो २ या कृष्णाच्यासाठी मी मागील सर्व संबंधियांचा संग सोडला; आणि हा सर्व ज्याच्यासाठी सोडला तोही मला सोडून गेला ना. पुढे त्याची मूर्ती मला आता दिसेना व मागच्या जगाचीही वाट खुंटल्यासारखीच झाली की हो ३ त्या गोपींचा शोक वियोगामुळे फार झाला. सगळ्यांना त्या प्रभूचा वियोग घडला. मग त्या श्रीहरीला शरण गेल्या आम्ही फार अन्याय केला असे म्हणू लागल्या. हातून घडलेल्या दोषांचा त्यांनी उच्चार केला आणि मग तुकाराम महाराज म्हणतात, माझा स्वामी प्रकट झाला ४

३८६ काय उणें का करितोसि चोरी । किती सांगो तुज नाइकसी हरी ।
परपरता[३] तूं पळोनि जासी दुरी । अन्यावर या लौकिका बाहेरी वो ॥ १ ॥
माया करुणा हे करिते बहुत । किती सोसूं या जनांचे[४] आघात ।
न पुरे अवसरु हेचि नित्यानित्य । तूंचि सोडवीं करूनि स्थिर चित्त वो ॥ २ ॥
बहुत कामें मी गुंतलियें घरीं । जासी डोळा तूं चुकावूनि हरी ।
करितां लाग न येसीच पळभरी । नाहीं सायासाची उरों दिली उरी वो ॥ ३ ॥
तुज म्हणीयें मी न सगें अनंता । नको जाऊं या डोळियां परता ।
न लगे जोडी हे तुजविण आतां । तुकयास्वामी कान्होबा गुणभरिता वो ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– परपरता–परा वाचेच्या पलीकडील

अर्थ :– श्रीकृष्णाच्या विविध खोड्या पाहून त्याची आई यशोदा त्याला एकदा म्हणाली, 'कृष्णा, अरे, आपल्या घरी काय कमी आहे रे ? म्हणून तू दुसऱ्याच्या घरी जाऊन चोऱ्या करतोस ? तुला सांगावे तरी किती रे

१ होते वाईल लपाले. २ पैल ३ परे परता ४ जगाचे

हरी ? तू काही माझे ऐकत नाहीस. तुला सांगावे तरी कसे ? कारण तू परा वाचेच्याही पलीकडे पळून जातोस मोठाच अनावर तू झाला आहेस. लौकिका वेगळा होऊन बसला आहेस' १ अशी ही कृष्णाची आई मोठ्या करुण वाणीने म्हणत आहे, 'मी आता किती लोभाचे आघात तुझ्यामुळे सोसू रे ? मला इतर कामांस वेळच मिळत नाही, रोज हीच कटकट वाढत आहे. कृष्णा, तूच शांतचित्ताने मानून मला सोडीव रे बाबा. २ घरी पुष्कळ कामे असून त्यांत मी गुंतून राहिले आहे; आणि तू डोळा चुकवून बाहेर जातोस. काही केल्या तू क्षणभरसुद्धा परत येत नाहीस. तुला पकडण्यासाठी काही प्रयत्न करावेत असे उरलेच नाहीत ३ अनंता, आता यापुढे मी तुला पुन काही कामे सांगणार नाही. पण तू आता माझ्या डोळ्यांपुढून जाऊ नकोस दूर. तुझ्याशिवाय मला आता दुसऱ्या कोणाचीही प्राप्ती नको आहे.' तुकाराम महाराज म्हणतात, हा तुकयाचा स्वामी कान्होबा असा गुणसंपन्न आहे. ४

२८७ घाली कवाड टळली वाड राती । कामें व्यापिली कां पडिली दुश्चित्ती ।
कोणें लागला गे सदैवेचे हातीं । आजि शून्य शेजे नाहीं दिसे पती वो ॥ १ ॥
बोले दूतिकेशीं राधा हें वचन । मशीं लाघव दावी नारायण ।
म्हणे कोमळ परी बहु गे निर्गुण । याशीं न बोलें कळला मज पूर्ण वो ॥ २ ॥
धाडिलें गरुडा आणिलें हनुमंता । तें पाचारिलें होउनि ये वो सीता ।
लाजिनली रूप न ये पालटितां । जाला भीमकी आपण रामें सीता वो ॥ ३ ॥
सत्यभामा दान करी नारदासी । तें कळला वो मज हृषीकेशी ।
तुळे घालितां न ये कनक वो रासी । सम तुके एक पान तुळसी वो ॥ ४ ॥
मज भुली पडली कैशापरी । आम्हां भोगूनि म्हणे मी ब्रह्मचारी ।
दिली वाट यमुने मायें खरी । तुम्हां आम्हां न कळे अद्यापवरी वो ॥ ५ ॥
जाणे जीवींचें सकळ नारायण । असे व्यापूनि तो न दिसे लपून ।
राधा संबोखिली प्रीती आलिंगून । तुका म्हणे येथें भावचि कारण वो ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – कवाड–दार, वाड–मोठी, संबोखिली–समजूत काढली.

अर्थ : – 'फार रात्र झाली आहे. आता दार लाव. या राधेचे हृदय श्रीकृष्णाच्या विरहाने व्यापून जाऊन ती उदास झाली आहे हा पुण्य सुदैवी स्त्रीच्या हाती सापडला की काय ग ? आज माझी शेज तर पतीशिवाय शून्य दिसत आहे ! ' अशा प्रकारचे वचनही राधा आपल्या सखीजवळ बोलत आहे; ती म्हणते, 'हा नारायण मोठे कौतुक मला दाखवितो. हा मनाचा मोठा कोमळ आहे ग; पण फार निर्गुण, अवगुणी बरं. मी आता त्याच्याशी बोलणारच नाही. तो संपूर्णपणे मला समजला आहे. २ द्वारकेस असताना श्रीहरीने गरुडास पाठवून हनुमंताला बोलावून आणले; व स्वतः श्रीहरी रामरूप झाले व सत्यभामेस सीता होऊन तू ये असे त्यांनी सांगितले. पण सत्यभामेस आपले रूप एकदम पालटून सीता होता येईना तेव्हा ती फार लाजली तेव्हा मग रुक्मिणी सीता झाली व हा स्वतः राम झाला. ३ सत्यभामेने नारदास या श्रीहरीचे दान केले तेव्हाच तो कसा आहे हे मला समजले. श्रीकृष्णाची तुला करण्यासाठी सत्यभामेने आपल्या दागिन्यांच्या सर्व राशीच्या राशी घातल्या तरी त्याची तुलना होईना, पण रुक्मिणीने एक तुळशीचे पान टाकल्या बरोबर तुला पुरी झाली. ४ मला कसा विसर पडला, कुणास माहीत ? आम्हांस भोगून हा मी ब्रह्मचारी आहे असेच म्हणाला होता त्या वेळेस हे वाक्य म्हटल्याबरोबर यमुनेने वाट दिली. अजूनपर्यंत तुम्हाआम्हास याची थोरवी समजलीच नाही. ५ हा नारायण श्रीहरी सर्व जीवांचे विचार जाणतो. कारण तो सर्वत्र व्यापून राहिलेला असून तो लपून राहिला असल्यामुळे दिसत नाही एवढेच. तुकाराम महाराज म्हणतात, राधेची स्वतः विषयीची प्रीती जाणून त्याने तिला आलिंगन देऊन तिची समजूत काढली कारण भावभक्तीनेच हा प्रभू सर्वांनाच प्राप्त होतो. ६

३८८ मिळोनि गौळणी देती यशोदे गाऱ्हाणीं ।
दहिं दुध तुप लोणी शिका नुरे काहीं ।
मेळवुनी पोरे तेथें रिघे एकसरें ।
वेगीं आणोनी सामोरे तेथें लोणी खाय ॥ १ ॥
हरि सोकला वो हरि सोकला वो ।
सोकला तो वारी[1] तुज लाज नाहीं तरी ।
आम्हा सापडता उरी तुज मज नाहीं ॥ २ ॥
तुज वाटतसे कोड[2] यासि लागतसे गोड ।
काय हासतेसी वेड तुज लागले वो ।
आम्ही जाऊ तुजवरी पोरे चाळविल्या पोरी ।
काय सागो भाडखोरी लाज वाटे आम्हा ॥ ३ ॥
मुख मळिण वदन उभा हाडतिये घोणे ।
तव दसवती म्हणे आणा शीक लावू ।
थोर आणिला काटाळा घरी दारीं लोकपाळां ।
डेरा रिघोनि गुसळा तेथें लोणी खाय ॥ ४ ॥
मिळोनि सकळा दावे लावूनिया गळा ।
कैशा बाधिती उखळा येथें राहे उगा ।
बरा सापडलासी हरी आजिच्याने करिसिल चोरी ।
डोळे घालुनिया येरी येरीकडे हासे ॥ ५ ॥
फाकल्या सकळा उपडूनिया उखळा ।
मोडी वृक्ष विमळार्जुन दोन्ही ।
उठिला गजर दसवती नव्हे थोर ।
धावे तुक्याचा दातार आळगिला वेगीं ॥ ६ ॥

*शब्दार्थ व टीपा* – *रिघे–शिरतो एकसरे–एकदम, वारी–आवर कोड–कौतुक हाडतिये–गळ्याखालचा* खळगा, घोणे–माना खाली घालून बसणे

अर्थ – साऱ्या गौळणी मिळून श्रीकृष्णाच्या खोड्याबद्दल यशोदा मातेजवळ गाऱ्हाणी सागू लागल्या त्या म्हणू लागल्या की, आमच्या घरी शिक्यावर दही, दूध लोणी तूप यापैकी तुझा मुलगा श्रीहरी काहीच उरू देत नाही गावातील पोरे तो जमवितो व घरात एकदम शिरून शिक्यावरील लोणी आमच्यासमोर खातो १ हा तुझा हरी असा धीटपणा करून लोणी खायला शोकावला आहे तू त्याला आवर बाई, नाही तर तुलाही लाज नाही असे मानू आम्ही, मग तो आमच्या हातात सापडला तर मात्र मग तुझे आमचे नाते विसरून आम्हीच त्याला शिक्षा करू २ तुला या तुझ्या मुलाचे भारी कौतुक वाटते व त्यालाही ते मोठे गोड वाटते तू हसतेस काय ग ? तुला काय वेडबीड लागले की काय ? आम्ही आपल्या तुझ्या मोठपणामुळ याच्याकडे दुर्लक्ष करतो, पण या तुझ्या मुलाने आमच्या मुलींना नादी लाविले आहे भाडखोर बाई, तुला काय सागू ? आम्हाला भारीच लाज आता याच्यामुळे वाटू लागली आहे ३ त्यावेळी जवळच श्रीकृष्ण म्लान मुख करून मान खाली घालून उभा होता त्यावर यशोदा माता म्हणाली, ' त्याला

१ वरी २ कोडें

आणा इकडे, आपण त्याला काही शिकवू किंवा शिक्षा करू. घरी दारी सर्वत्र भारी त्रास देऊन त्याने सर्वांना कटाळा आणला आहे, घरीसुद्धा ताक घुसळताना हा एकदम येतो व लोणी खाऊन जातो' ४ मग सर्वजणींनी मिळून एक दावे आणले व ते कृष्णाच्या गळ्यात घालून त्याला उखळीशी घागले बांधून टाकले. तसा तो तेथे उगाच राहिला मग त्या श्रीकृष्णास म्हणाल्या, आता बरा सापडलास; आता करशील का चोरी ? असे म्हणन त्या एकमेकींकडे पाहून, डोळे मिचकावून हासू लागल्या ५ शेवटी त्या गौळणी आपआपल्या घरी गेल्यावर त्या उखळासहित श्रीकृष्ण चालू लागला दारातच शापाने दग्ध झालेले नलकूबर व मणिग्रीव या नावाचे दोन वृक्ष होते त्याच्या मादीत तो अडकला. थोडा जोर करताच कडाडून आवाज झाला वृक्ष मोडून गेले. आवाज ऐकून यशोदेस दम निघेना, ती त्वरेने बाहेर आली तिने धावत येऊन तुकोबाच्या स्वामीस आलिंगन दिले. ६

विवरण – या मागचे व पुढचे काही अभंग गौळणीच्या स्वरूपाचे आहेत श्रीकृष्णाने बालपणी गोकुळात ज्या खोड्या केल्या त्याचे अतीव मनोहर वर्णन मराठी संतानी अभंगातून केलेले आहे श्रीकृष्णाच्या खोड्या विविध प्रकारच्या असत दही, दूध, लोणी चोरून खाणे, नदीवर गौळणींची थट्टा करणे, सासूसुनात भांडणे लावणे, नवरा-बायकोत भेद निर्माण करणे अशा त्याच्या खोड्यानी गोकुळात व गोपगोपींना त्रास निर्माण झाला होता परंतु हा त्रास कौतुकाचा होता श्रीकृष्णाचे सौंदर्य, त्याचे मोहक रूप, त्याच्या लडिवाळ लीला, त्याचे लाघव, त्याची हसरी मुद्रा याचा लोभ सर्वांनाच असे त्याच्यावरील गोपीचा व यशोदेचा रागही लटकाच असे गोपी नाना प्रकारची गाऱ्हाणी यशोदा मातेकडे आणीत असत मग यशोदा त्याची समजूत काढीत असे कधी त्यानाच दोष देई, तर कधी आपल्याच मुलास दोष देई

या कृष्णलीलावर मराठी संताच्या गौळणी भक्तिरसानी आर्द्र झालेल्या आहेत श्रीकृष्णबाललीलाचे कौतुक त्यानी विविध प्रकारानी वर्णन केले आहे 'रांगतु रंगणीं चोरितु लोणी । धावोनि धरिती गौळणी', 'त्वचेचिया राना धाडू नको मना', 'काय सांगू तूतें बाई, काय सांगू तूतें' इत्यादी ज्ञानेश्वराच्या गौळणी प्रसिद्ध आहेत 'परब्रह्म निष्काम तो हा गौळिया घरीं । बाळ्या बाळे भवु कृष्ण नवनीत चोरी', 'तळवे तळहात टेकीत । डाव्या गुडघ्यानें रांगत', 'बाळ सगुण गुणाचे तान्हें ग । बाळ दिसते गोजिरवाणें', 'कान्हु धवाल ले धवाल आपुल्या गाई' इत्यादी नामदेवाच्या गोड गौळणीनी उभ्या महाराष्ट्रातील भाविकाना कित्येक शतके गुंग करून सोडले आहे श्रीकृष्ण भारी खोड्या करतो म्हणून तक्रार करणाऱ्या गोपी एखाद्या दिवशी श्रीकृष्ण आला नाही तर तो का नाही आला, म्हणूनही तक्रार करण्यास तयार असत एकनाथानी तर या गोकुळच्या गोपीच्या गाऱ्हाण्यावर अनेक गोड गौळणी लिहून मोठी बहार केली आहे 'गौळणी सांगती गाऱ्हाणी । रात्रीं आले चक्रपाणी,' 'भिंगाचे भिंगुले खांद्यावर आंगुले । नाचत तान्हुले यशोदेचे', 'चला जाऊ वृन्दावना । मुरली वाजवि कान्हा', 'माझा कृष्ण देखिला काय । कोणी तरी सांगा गे', 'आल्या पाच गौळणी पाच रंगाचे शृंगार करूनी' यासारख्या गौळणीतून नाथानी श्रीकृष्णाचे सारे लाघव मतिमत उभे केले आहे या गौळणीच्या अभंगातून मुख्यत श्रीकृष्णाच्या बाललीलाचे किंवा खोड्याचे वर्णन असले तरी त्या निमित्ताने सुंदरसा बोधही फार थोर दर्जाचा मधून मधून मिळतो

या अभंगात सर्व गौळणींनी यशोदेपाशी तक्रार केल्यावर सर्वांनी मिळून श्रीकृष्णास उखळाशी बांधल्याचा उल्लेख आहे या उखळासहितच श्रीकृष्ण मग अंगणात आला अंगणात अर्जुन या नावाचे दोन वृक्ष होते. ऐश्वर्य-मदाने उन्मत्त झालेल्या या दोन कुबेरपुत्राची कथा भागवतात आहे नारदाच्या शापामुळे हे वृक्षरूप पावलेले होते कुबेरपुत्र नलकूबर व मणिग्रीव या दोघांचा उद्धार श्रीकृष्णाने यावेळी केला या कुबेरपुत्रांनी श्रीकृष्णाची प्रेमाने स्तुती केली व श्रीकृष्णाने त्या उभताना अभयदान दिले.

**३८९ गोरस घेउनी सातें निघाल्या गौळणी । तंव ती कृष्णाची करणी काय करी तेथें ।**
**जाला पानसरा मिठी घातली पदरा । आधीं दान माझें सारा मग चाला पर्थें ॥ १ ॥**

सर[1] जाऊं दे परता। मुळीं भेटलासी आतां। नाट लागलें संचिता। खेपा खुंटलिया ॥ २॥
आसुडी पदरा धरी आणीक दुसरा। येरी झोंबतील करा काय वेडा होसी।
आलों गेलों बहु वेळां नेणों गोरा कीं सांवळा। सर परता गोवळा काय बोलतोसी[2] ॥ ३॥
आम्ही येथें अधिकारी मागें केली तुम्ही चोरी। आतां कळलियावरी मागें केलें त्याचें।
बोलिल्या हांसुनी आम्ही सासुरवासिनी। कां रे झोंबसी दुरूनी करी मात कांहीं ॥ ४॥
वांयां परनारी कैशा धरिसी पदरीं। तयां कळलिया उरी तुज मज नाहीं।
जडला जिव्हारीं फांकों नेदी तया नारी। जेथें वर्म तें धरी जाऊं पाहे तिथेंचें ॥ ५॥
तया हातीं सांपडल्या हाटीं पाटीं चुकविल्या। कृष्णमिळणीं मिळाल्या त्याही न फिरती।
तुका म्हणे संती वांयां न धरावी चित्तीं। होतें तुमच्या संचितीं बोडवलें आजि ॥ ६॥

शब्दार्थ व टीपा – सर्ते–बाजारास, पानसरा–आडवा, समोर, नाट–धक्का, परता–दूर, संती–चिंता.

अर्थ :– सर्व गौळणी दही दूध डोक्यावर घेऊन बाजारास निघाल्या. त्यावेळी श्रीकृष्ण तिथे काय करू लागला ? तो त्यांच्या समोर आला व त्याने त्याच्या पदरास धरिले व म्हटले, आधी माझे दान द्या. मला दूध लोणी द्या व मग जा आपल्या मार्गाने. १ मग त्या म्हणाल्या, 'दूर हो, आम्हाला जाऊ दे मला त्याच वेळी तू भेटलास व आमच्या संचित कर्माला तू धक्का लावलास. आमच्या जन्ममरणाचे खेटे यामुळे चुकले २ यावर श्रीकृष्णाने आणखी दुसरीचा पदर धरून तिलाही हासडले. त्यावेळी आणखी इतर गौळणी त्याच्या हाताला झोंबून बोलू लागल्या, 'अरे काय वेडा की काय तू ? आम्ही किती तरी वेळा या मार्गाने आलो व गेलो, पण तू गोरा की काळा हे देखील आम्हांस समजले नाही. गाईराख्या, चल दूर हो पाहू आधी उगाच काय वाटतेच बोलतोस ?' ३ त्यावर श्रीकृष्ण त्यांना म्हणाला, 'मी या ठिकाणचा अधिकारीच आहे पापूर्वी तुम्हीच लबाडी करून अपराध केला आहे आता मला सर्व कळले आहे.' त्यावेळी सर्व गौळणी त्याला हसून म्हणाल्या, 'अरे कृष्णा, आम्ही तर सासुरवासिनी गरीब गौळणी आहोत. काही तरी खोडी काढून तू आमच्या अंगाला का रे झोंबतोस ? काय बोलायचे असेल तर ते दुरून बोल ना. ४ विनाकारण दुसऱ्याच्या स्त्रियांच्या पदरास का धरतोस? ही तुझी करणी आमच्या घरच्या माणसांना माहीत झाली तर मात्र तुझ्याआमच्यात काही बरे संबंध राहणार नाहीत.' असे त्या गौळणी म्हणत आहेत तो त्यांच्या हृदयात श्रीकृष्ण स्वतःच प्रकट झाला व त्यायोगे त्यांना दूर कुठे जाता येईना. त्यांचे जे वर्म तेच त्याने धरून ठेविले त्यांच्या चित्तात तो दृढ झाला. ५ अशा प्रकारे बाजारात जात असताना त्या गौळणी त्याच्या हाती सापडल्या व त्यामुळे जन्माला येण्याजाण्याची यातायात चुकविली. श्रीकृष्ण स्वरूपी त्या मिळाल्या त्या काही परत लौकिक वृत्तीवर आल्या नाहीत तुकाराम महाराज म्हणतात, चित्तात व्यर्थ चिंता बाळगू नये तुमच्या प्रारब्धात असेल तसेच घडेल. ६

३९० हरी तुझी कांति रे सांवळी। मी रे गोरी चांपेकळी।
तुझ्या दर्शनें[3] होइन काळी। मग हें वाळी जग मज ॥ १ ॥
उगला राहें न करीं चाळा। तुज किती सांगों रे गोवळा।
तुझा खडबड कावळा। अरे नंदबाळा आलगटा ॥ २ ॥
तुझिये अंगीं घुरट घाणी। बहु खासी दुध तुप लोणी।
घरिचें बाहेरिल आणोनी। मी रे चादणी सकुमार ॥ ३ ॥
मज ते हांसतील जन। धिःकारिती मज देखोन।
अंगीं तुझें देखोनि लक्षण। मग विटंबणा होइल रे ॥ ४ ॥

१ सर जाऊं दे रे सर जाऊं दे परता  २ वेडा होसी  ३ स्पर्शें.

तुज लाज भय शंका नाहीं । मज तंव सज्जन पिशुन व्याही ।
आणीक मात बोलूं कांहीं । कसी भीड नाहीं तुज माझी ॥ ५ ॥
वचन मोडी नेदी हात । फळलें न साहेची मात ।
तुकयास्वामी गोपीनाथ । जीवन्मुक्त करूनि भोगी ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा :– वाळी–टाकतील, उगला–उगाच, खडबड–खरखरीत, माथळा–धोगडी, आलगटा–छांदिष्टा, घुरट–उग्र, पिशुन–दुष्ट.

अर्थ :– अरे श्रीकृष्णा, तुझा रंग सावळा आहे, आणि मी तर चाफेकळीप्रमाणे गोरीपान आहे. तुझ्या दर्शनाने मी काळी होईन ना ! मग हे सर्व लोक मला टाकतील रे. १ अरे उगाच राहा ना चाळा करू नकोस, तुला किती सांगावे रे ? अरे छांदिष्टा, नंदकुमारा, तुला किती सांगावे रे? २ तू फार दूध तूप लोणी खातोस म्हणून तुझ्या अंगास उग्र वास येत आहे. लोकांच्या घरचे दूध लोणी बाहेर आणून तू खातोस आणि मी तर नाजूक घादगीच आहे ३ हे लोक मला हसतील, मला पाहून माझा धिःकार करतील. तुझ्या दर्शनाने माझे काळे झालेले अंग पाहून ते माझी पुरतीच विटंबना करतील रे. ४ तुला काही लाज भय शंका लौकिकाची चाड दिसत नाही. मला मात्र सज्जन व काही दुष्ट सोयरे धायरे व व्याही आहेत. आणखी किती हकीगत तुला सांगू रे ? तुला कशी भीड वा मर्यादा वाटत नाही ? ५ तुकाराम महाराज म्हणतात, हा माझा स्वामी श्रीकृष्ण गोपींना दिलेले वचन मोडतो. हातावर हात देत नाही त्याला त्यांनी सांगितलेली कुठलीच गोष्ट पटत नाही, सहन होत नाही. तो त्यांना भोग देऊन जीवन्मुक्ती देतो ६

३९१ सात पांच गौळणी आलिया मिळोनी यशोदे गाऱ्हाणें देती कैसें ।
काय व्यालीस पोर चोरटें सिरजोर जनावेगळेंची कैसें ।
दहि दुध लोणी शिंकां नुरेचि कांहीं कवाड जैशाचें तैसें ।
चाळवूनि नाशिलीं कन्याकुमरें आमुच्या सुनांसि लाविलें पिसें गे वाइये ॥ १ ॥
आसुनि तरी यासि सांगें बरव्या परी नाहीं तरी नाहीं उरी जीवेसाटीं ॥
मिळोनि सकळ जणी करूं वाखा सखी तुज मज होईल तुटी गे वाइये ॥ २ ॥
नेणे आपपर लौकिक वेव्हार भलते ठायीं भलतें करी ।
पाळतुनि घरीं आम्ही नसतां तेथें आपण संचार करी ।
सोगया चुंबन देतो आलिंगन लोळे सेजावाजावरी ।
शिंकीं कडा फोडी गोसाचे डेरे धरितां न सांपडे करीं गे वाइये ॥ ३ ॥
आता याची चाड नाहीं आम्हां भीड सांपतां कोड पुरवूं मनिचें ।
सोसिलें बहु दिस नव्हता केला निस म्हणुनि एकुलतें तुमचें ॥
चरण खांबीं जीवें बांधेन सरिसा जवे न चले कांहीं याचें ।
अर्थ प्राण देतां न सोडी सर्वथा भलते हो या जिवाचें गे वाइये ॥ ४ ॥
घेउनी जननी हातीं चक्रपाणी देतिसे गौळणी वेळोवेळां ।
निष्ठुर वाद क्षणीं बोलाल सकळा क्षोभ जाइल माझ्या बाळा ।
जेथें लागे हात वाढतें नवनीत अमृताच्या कल्लोळा ।
देखोनि तुकयास्वामी देश देहभाव विसरल्या सकळा गे वाइये ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा–कवाड–दार, पिसे–वेड, वाखा–नाग, सोगया–सोग्यास, निस–निवाडा, कल्लोळ–पूर

अर्थ :– गोकुळातील पाच सात गौळणी मिळून कृष्णाने केलेल्या खोडयाबद्दल यशोदामातेजवळ गाऱ्हाणी सांगण्यासाठी जमा झाल्या व म्हणू लागल्या, 'काय या चोरट्या पोरास जन्म दिलास ग. मोठे शिरजोर असून मुलखा-

वेगळेच आहे हे पोर तुझे आमच्या घरी शिंक्यावरचे दही, दूध, लोणी शिंक्यावर उरतच नाही कुठून येतो हा तुझा पोर? कारण दार पाहिले तर ते जसेच्या तसे लावलेले असते या तुझ्या मुलाने आमच्या मुलांमुलींना नादावून सोडले आणि आमच्या सुनाना वेड लाविले ना या कृष्णाने १ तू अजून तरी याला नीट समजावून साग ना या गोष्टी बऱ्या नाहीत असे याला बजाव नाही तर आम्ही आमच्या जिवाची सुद्धा परवा करणार नाही आम्ही सर्वजणी मग मिळून आमचा नाश करून घेऊ मग मात्र तुमच्या आमच्यात अंतर निर्माण होईल २ हा तुझा पोरगा आपले परके असा लौकिकातील काही भेदच ठेवीत नाही भलत्याच गोष्टी करीत बसतो हा पाळत ठेऊन हा आम्ही घरी नाही असे पाहून हा आमच्या घरात शिरतो व आमच्या सुनाचे त्यांच्या सोंगास धरून चुंबन घेतो, आलिंगन देतो व त्यांच्या बाजवर देखील लोळत राहतो हा तुझा मुलगा हा आमच्या दहचादुधाचे घट कडाकडा फोडून टाकतो, यशोदाबाई याला धरू पाहावे तर हा हातात सुद्धा लागत नाही ३ आता मात्र याची भीडमुर्वत आम्ही काही ठेवणार नाही तो आमच्या हातास लागला तर मग आमच्या मनास येईल ते आम्ही करू आम्ही खूप दिवस याचा नाश सोसला तुझे हे एकुलते एक पोर म्हणून आम्ही आतापर्यंत याच्या खोड्याकडे दुर्लक्ष केले निवाडा केला नव्हता पण आता तो हातात सापडला म्हणजे आम्ही त्याचे पाय जवळच्या खांबाला बांधून टाकू मग काही त्याचे चालणार नाही मग याने द्रव्य दिले प्राण दिला तरी आम्ही काही याला सोडणार नाही, मग जिवाचे काय वाटेल ते होवो यशोदाबाई ! ४ तेव्हा यशोदा मातेने श्रीकृष्णाला धरून गौळणींच्या हाती दिले व म्हटले, ' हा पाहा माझा मुलगा तुम्ही सव निष्ठुरपणे या माझ्या बाळाला बोलाल व तुमचा हा क्षोभ त्याला बाधेल मात्र याची गुणवत्ता अशी आहे की याचा हात जिथे लागेल तिथे दूधलोण्याचाच काय पण अमृताचाही पूर लोटतो ' तुकाराम महाराज म्हणतात, माझ्या स्वामीस पाहून मग त्या गौळणी देहास व स्वत त्या देहभानास विसरून गेल्या ५

३९२ विरहतापें फुंदे छंद करिते जाती । हा गे तो गे सावधान सवेंचि दुश्चिती।
न साभाळुनि अंग लोटी पाहे भोवतीं । वेगळीच पडो पाहे कुळाहुनिया ती ॥ १ ॥
खुंटलीसी जाली येथें अवघियाची गती । आपुलीं पराची कोण नेणे भोवती ।
त्याची' नावें बोभे अहो अहो श्रीपती । नवल व हा येरा वाटोनिया हासती ॥ २ ॥
बाहेरीच धावे राना न धरीच घर । न कळे बंधना जाला तेणे संचार ।
विसरूनि गेली सासुरें कीं माहेर । एका अवलोकी एका पडिला विसर ॥ ३ ॥
तुका म्हणे तुम्ही अवघ्या राहा निश्चळा । न ये आता येऊं येथें सर्वथा बळा ।
त्याचा त्याच्या मुखें अवघाची निर्वाळा । वहुता मतें तर्कवाद निराळा ॥ ४ ॥

*शब्दार्थ व टीपा – फुंदे–हुदका देई, बोभे–हाका मारी, निश्चळ–स्तब्ध*

अर्थ – एक गोपी या श्रीकृष्णाच्या विरहतापाने हुदके देत देत नानाप्रकारचे शब्द बरळत आहे ती म्हणते ' अग हा पाहा हरी तो पाहा हरी ' मग लागलीच सावध होऊन उदास बनते ही मग तिला धीर निघत नाही ती पडून राहते सभोवती पाहते आपल्या जातिकुळातून ती वेगळीच झालेली असते १ तिला सावध करण्याविषयी सर्वांचे प्रयत्न सपले तो सभोवतीच्या माणसानाही आपली की दुसऱ्याची अशी ओळखीनाशी झाली फक्त श्रीकृष्णा श्रीकृष्णा, अशा हाका मात्र ती मारू लागली तेव्हा भोवतीच्या इतर गौळणींना नवल वाटून त्या हसू लागल्या २ ती गोपी घरात न राहता बाहेर रानावनातच धावू लागली तिला भगवद्भक्तीमुळे कुठलेच बधन उरले नाही सासरमाहेर याचा तिला विसर पडला केवळ श्रीहरीलाच ती पाहात असल्यामुळे इतराचा तिला विसर पडला ३ तुकाराम महाराज म्हणतात, तुम्ही सव गौळणी आता स्तब्ध राहा आता येथे कुणी कसलीही बळजबरी करू नये त्याच्या त्याच्या मुखाने येथे निर्णय झालेला आहे बहुमताने व तर्कवादानेच येथे निर्णय ठरलेला आहे आता उगाच आणखी वाद नको ४

१ त्याच्या नावें वो बोभे बोभे आवो श्रीपती

३९३ ये रे कृष्णा खुणाविती खेळो भातुके । मिळालिया बाळा एके ठायीं कवतुके ।
कळों नेदी माया त्याचे त्यास ठाउके । खेळतोसे दावी लक्षलक्षापें मुके ॥ १ ॥
अखडित चटे त्यानीं लावियेला कान्हा । आवडे तया[1] त्या वाहाती सकल्प मना ।
काया वाचा मनें रूपीं गुतल्या वासना । एकाताचे सुख जाती घेवोनिया राणा[2] ॥ २ ।
अवघियाचा जाणे जाला मेळासा हरी । मिळोनिया जावे तेथें तया भीतरी ।
कळो नेदी घरिच्या करी गोवूनी चोरी । हातोहाती नेती परपरत्या दुरी ॥ ३ ॥
आनदें निर्भर आपणाशीं आपण । क्रीडतील बाळा त्यजिले पारिखें जन ।
एकाएकीं तेथें नाहीं दुसरे भिन्न । तुका म्हणे एका नारायणा वाचून ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – भातुके–भातुकलीचा खेळ चटे–सवयी

*अर्थ* – अरे कृष्णा ये ना, आपण भातुकलीचा खेळ खेळू सव गौळणी एकत्र जमून असे त्या कृष्णाला म्हणाल्या पण हा देव त्याची माया कुणास समजू देत नाही त्याची त्यासच ठाऊक असते आपण खेळतो आहोत असे दाखवीत असला तरी त्याचे लक्ष स्वरूपस्थानी मुकेपणाने होते १ गवळणीनी या कृष्णास अनेक सवयी लाविल्या नाना सकल्पानी आवडेल त्या भावनेने त्या त्याला चितू लागल्या कायेने, वाणीने, मनाने, वासनेने त्याचे सर्वस्व त्या प्रभूतच गुतून राहिले एकान्तात मिळणारे त्या श्रीहरीचे सुख त्या रानावनात मिळवू लागल्या २ सर्व गौळणींचा जमाव जमला आहे असे पाहून या श्रीकृष्णाने त्याच्यात मिसळून जाण्याचा सकल्प केला व कुणासही कळू न देता त्याने त्याच्या घरी प्रवेश करून चोरी केली व त्याना हातोहात फसवून घार्णीच्या पलीकड असणारे त्याचे चित्तच त्याने चोरून घेतले ३ मग त्या गौळणी आपणाशीच आपण अशा नादात मोठ्या आनदाने क्रीडा करू लागल्या त्यानी इतर परक्या लोकाचा त्याग केला व त्या दुसऱ्या कुठल्याही वस्तूस न मानता तुकाराम महाराज म्हणतात, एका श्रीकृष्णास स्मरून एकाएकीच राहिल्या ४

३९४ खेळता मुरारी जाय सरोवरा तिरीं । तव नग्नचि या नारी तेथे देखियेल्या ।
माडिले विदान ख्याल सुखाचे सधान । अग लपवूनी मान पिलगत चाले ॥ १ ॥
ख्याल माडिला रे ख्याल माडिला रे ।
पाया पडता रे । न सोडी नेदी साउला रे ॥ २ ॥
साडचा साउलीं[3] पातळें गोंडें फसणिया चोळचा ।
युगी घेऊनि सकळा कळबावरी पळे ।
खादी[4] धरूनिया करीं दृष्टि घालोनि सामोरी ।
बैसे पाला वोढी वरी खदखदा हासे ॥ ३ ॥
आनदें कल्लोळ बाळा खेळती सकळ देती उलटिया चपळ ।
एकी एकीहूनि म्हैस वेल सुर काडी ।
एकी उगविती[5] कोडीं ।
नाना परीच्या निकडी[6] खेळ माडियेला ॥ ४ ॥
एकी आलिया बाहेरी पाहे लुगडें तव नारी ।
म्हणे नाहीं नेलें चोरी काय जाणो केव्हा ।

---

१ तया त सकल्प वाहाती मना तया त्या सकल्प वाहाती मना २ राना ३ पातळा, ४ खादी घालुनिया, ५ नागविती, ६ निकडी

केला सकळीं हाकारा तंव आलिया बाहेरा ।
आतां म्हणतील घरां जावें कैशा परी ॥ ५ ॥
तंव हासे वनमाळी वरी पाहोनी सकळी ।
लाजे रिघालिया जळीं मागें पुढें हात ।
लाज राखावी गोपाळा आम्हांजणींची सकळां ।
काय मागसी ये वेळा देऊं गुळवाटी ॥ ६ ॥
जोडोनियां कर या गे सकळी समोर ।
वांयां न बोलावे फार वडबड कांहीं ।
भातुकें भूषण नाहीं चाड नेघें धन ।
करा एक चित्त मन या गे मजपाशीं ॥ ७ ॥
एक एकीकडे पाहे लाज सांडूनियां राहे ।
म्हणे चला आतां सये जाऊं तयापाशीं ।
जोडोनियां हात कैशा राहिल्या निवात ।
तुका म्हणे केली मात लाज राखिली तयांची ॥ ८ ॥

शब्दार्थ व टीपा :– विंदान–कौशल्य, ख्याल–खेळ, पिलंगत–झाकवून, साउलीं–वस्त्रे, बुथी–तोंडावरून घेण्याचे वस्त्र, हाकारा–गोंगाट, भातुके–खाऊ वगैरे, चाड–हौस, निवात

अर्थ – खेळता खेळता श्रीकृष्ण एके दिवशी यमुनेच्या तीरावर येऊन पोचला तेव्हा त्याने नग्न अवस्थेत न्हात असलेल्या स्त्रिया पाहिल्या त्यावेळी त्याने तेथे मौजेची क्रीडा सुरु केली आपले अंग दिसू न देता, मान खाली घालून त्याने गमतीचा खेळ केला. १ या श्रीकृष्णाने असा खेळ केला की काही विचारू नका. पाया पडल्याखेरीज त्याची वस्त्रे त्याने दिली नाहीत २ कुणाच्या साड्या, कुणाची पातळे, कुणाच्या वेणीतले गोंडे, कुणाच्या चोळ्या, कुणाचे तोंडावर घेण्याचे वस्त्र, अशी सर्व वस्त्रे घेऊन तो पळाला व शेजारच्या कदंबाच्या झाडावर चढून हातात फांदी धरून समोर नग्न स्त्रियाकडे त्याने आपली 'दृष्टी वळविली गोपींची ती धादल पाहून झाडाच्या पानाच्या आड आपले मुख लपवून तो खदखदून हसू लागला ३ आनंदाच्या कल्लोळात रममाण होऊन त्या गोपी पाण्यात खेळत होत्या कित्येक जणी मोठ्या चपळाईने पाण्यात उड्या मारीत होत्या दुसऱ्या काहीजणी आपापसात स्पर्धा लावून म्हशींप्रमाणे पाण्यात डुबून लांबवर निघत होत्या कित्येकजणी नाना प्रकारचे खेळ करीत होत्या ४ मग काहीजणी बाहेर काठावर येऊन आपापली लुगडी पाहू लागल्या, तो ती वस्त्रे तेथे त्याना दिसेनात मग त्या एकमेकीस म्हणत राहिल्या, 'या ठिकाणी आपली लुगडी दिसत नाहीत कुणी चोराने नेली काय ? केव्हा नेली ?' मग सगळ्यानी एकच गोंगाट करून म्हटले, आता घरी तरी जावे कसे ? ५ इतक्यात वृक्षावरील श्रीकृष्ण हसला, तेव्हा त्यांचे लक्ष त्याच्याकडे गेले मग त्या लाजल्या व मागेपुढे हात धरून त्या पुनः पाण्यात शिरल्या व श्रीकृष्णास म्हणू लागल्या, 'कृष्णा, आमची सर्वांची लाज राख, काय मागशील ती गूळवाटी आम्ही तुला देऊ '६ त्यावर कृष्ण म्हणाला, 'तुम्ही सर्वजणी हात जोडून माझ्यासमोर यावे, व्यर्थ बडबड उगाच करू नका मला खाऊची किंवा धनाची मुळीच गरज नाही एकचित्त मन करून मला वंदन करा म्हणजे झाले' ७ मग त्या गोपी एकमेकींकडे पाहू लागल्या व आपण सारी लाज सोडून चला त्या कृष्णास जाऊन वंदू या, असे म्हणत राहिल्या मग त्यांनी हात जोडून, निवान्त राहून त्या श्रीकृष्णाची प्रार्थना केली तुकाराम महाराज म्हणतात, अशा योगाने श्रीकृष्णाने त्या सर्व गोपींची लाज राखली ८

विवरण – श्रीकृष्णचरित्रातील हा एक प्रसंग भागवत, ब्रह्मवैवर्त पुराणातून आलेला आहे श्रीकृष्णासारखा पती आपणास मिळावा म्हणून गोकुळातील कुमारींनी हेमंतऋतूत कात्यायिनी देवीचे व्रत केले भद्रकाली नावाच्या

कात्यायिनी देवीची आराधना करून त्या श्रीकृष्णस्वरूपात दंग झाल्या होत्या. एके दिवशी श्रीकृष्णचरित्राचे गुणगान करीतच आपली वस्त्रे काठावर ठेवून त्या पाण्यात विहार करू लागल्या. श्रीकृष्णाने त्यांची वस्त्र दूर करून ती कदंब वृक्षावर नेऊन ठेविली. गोपी त्याला वस्त्र देण्याबद्दल गळ्याइतक्या पाण्यात राहून विनवू लागल्या. 'आपण थंडीने काकडत आहोत, आमची वस्त्रे द्या ना' अशी त्यांनी परोपरीने त्याला विनंती केली. त्याने सांगितले की, 'नग्न होऊन तुम्ही या यमुनेत स्नान करीत होता त्यामुळे तुमच्या व्रताचा भंग झाला आहे. आता मला हात जोडून नमस्कार करा म्हणजे तो दोष दूर होईल.' मग गोपी बाहेर आल्या व त्यांनी लज्जेचा भाव दूर सारून श्रीकृष्णास वंदन केले व श्रीकृष्णाने त्यांची वस्त्रे त्यांना परत दिली. सर्व भावनांचा त्याग करूनच ईश्वरास शरण जावे लागते असे या कथेने तात्पर्य सांगण्यात येते. त्या मुग्ध युवतींना श्रीकृष्णाविषयी आणखीच प्रीती वाटू लागली. घरी जाण्याचेही भान त्यांना उरले नाही व त्यांना त्यांच्या मनासारखेच घडेल असे आश्वासन देऊन त्यांना गोकुळात परत जाण्यास श्रीकृष्णाने प्रवृत्त केले. मग अंतर्यामी श्रीकृष्णाचे स्मरण करीतच त्या गोकुळात परत फिरल्या.

३९५ धरिला पालव न सोडी माझा येणे । काहीं करिता या नंदाचिया कान्हे ।
एकली न येतें मी ऐसे काय जाणे । कोठें भरले अवघड या राणे रे ॥ १ ॥
सोडीं पालव जाऊं दे मज हरी । वेळ लागला रे कोपतील घरीं ।
सासू दारुण सासरा आहे भारी । तुज मज सांगता नाहीं उरी रे ॥ २ ॥
सख्या[1] वशिया होत्या मजपाशीं । तुज फावले रे फाकता तयासी ।
होतें अंतर तर सांपडते कैसी । एकाएकी अंगी जडलासी रे ॥ ३ ॥
कैसी भागली हे करिता उत्तर । शक्ति मावळल्या आसुडिता कर ।
स्वामी तुकयाचा भोगिता चतुर । भोग भोगी त्याचा राखे लोकाचार वो ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – पालव–पदर, वशिया–प्रिय. फाकता–दूर होताच.

अर्थ – या कृष्णाने माझा पदर धरला आहे. तो काही केल्याने आता सोडायला तयार नाही. असे हा नंदाचा कान्हा काही करील हे मला ठाऊक असते, तर मी येथे एकटी आलेच नसते. या भारी अशा अवघड रानात कशी येऊन पडले आहे कुणास माहीत? १. श्रीहरी, तू माझा पदर सोड ना. मला घरी जाऊ दे. घरी जायला मला वेळ लागला तर सर्वजण माझ्यावर रागावतील ना. माझ्या घरी माझे सासुसासरे फार रागीट आहेत. त्यांना जर हे समजले तर ते तुझी माझी काही भीड उरू देतील असे नाही. २. माझ्या प्रिय मैत्रिणी माझ्याजवळ होत्या. त्या दूर होताच तुला माझी खोडी काढण्याचे फावले रे. मी तुझ्यापासून दूर असते तर तुला सापडलेच नसते. पण तू माझ्या अगदी निकटच अंगाशी होतास. ३. याप्रमाणे तिने श्रीकृष्णास म्हटल्यावर ती श्रमाने थकून गेली. कारण त्या श्रीकृष्णाने तिचा हात हिसकल्यामुळेच ती फारच कष्टी झाली होती. तुकाराम महाराजांचा हा स्वामी असे भोग घेण्यात एवढा चतुर आहे की तो ज्यांच्याशी भोग भोगतो त्यांचा लौकिक आचार तो नीट सांभाळीत असतो. ४.

३९६ गाई गोपाळ यमुनेचे तटीं । येती पाणिया मिळोनि जगजेटी ।
चेंडू चौगुणा खेळती वाळवटीं । चला चला म्हणती पाहू दृष्टी वो ॥ १ ॥
ऐशा गोपिका त्या कामातुरा नारी । चित्त विह्वळ देखावया हरी ।
मिस पाणियाचे करितील घरीं । बारा सोळा मिळोनि परस्परीं वो ॥ २ ॥
चिरें चोळिया त्या धुतां विसरती । ऊर्ध्व लक्ष लागले कृष्णमूर्ती ।
कोणा नाठवे कोण कुळ याती । जालीं तटस्थ[2] सकळ नेत्रपातीं वो ॥ ३ ॥
दंतधावनाचा मुखामाजी हात । वाद्यें वाजती नाइके जनमात ।
करी श्रवण कृष्णवेणुगीत । स्वामी तुकयाचा पुरवील मनोरथ वो ॥ ४ ॥

१ सखिया वशिया होतिया, २ ताटस्त

शब्दार्थ व टीपा – मिस–निमित्त, चिरें–वपडे, तटस्थ–तटस्थ, दंतधावन–दात घासणे

अर्थ – या श्रीकृष्णाबरोबर गाई व गोपाळ हे यमुनेचे पाणी पिण्यासाठी नदीच्या तीरावर सर्व मिळून येतात व चौगुणांचा चेंडू वाळवटात खेळू लागतात अशा या श्रीकृष्णास चला आपण पाहू या असे त्या गोपी परस्परास म्हणू लागल्या १ अशा या गोपी त्या भगवंताविषयी कामातुर झाल्या असून त्याचे चित्त विव्हळ झालेले असते हरीला पाहण्यासाठीच त्या पाणी भरण्याचे निमित्त करून बारा सोळा गोपिका यमुनेच्या तीरावर येतात २ पण त्यांचे लक्ष वर श्रीकृष्णमूर्तीकडेच एकसारखे लागलेले असल्याने त्या वपडे किंवा धोळघा धुण्याचे विसरूनच जात आपले कूळ काय, आपली जात कोणती याची आठवणही त्यांना श्रीकृष्णवेधात उरत नसे त्या सर्व गोपिकांच्या डोळ्यांची पाती श्रीकृष्णदर्शनाने तटस्थ, स्थिर बनली होती ३ कुणी गोपिका दात घासत होत्या, त्यांचा हात मुखातच राहिला तिथे नाना वाद्ये वाजत होती तो आवाज लोकांच्या गलगल्यामुळे कमी वाटत होता परंतु तुक्याचा स्वामी हा श्रीकृष्ण सर्वांचे मनोरथ पूर्ण करील या सर्व गोपी त्याचे वेणुगीत ऐकण्यात तल्लीन झाल्या होत्या ४

३९७ कोठें मी तुझा धरूं गेले संग । लावियेले जग माझ्या पाठीं ॥ १ ॥
सर सर रे परता अवगुणाच्या गोवळा । नको लावूं चाळा खोटा येथें ॥ २ ॥
रूपाच्या लावण्यें नेली चित्तवृत्ती । न देखें भोवतीं मी ते माझी ॥ ३ ॥
तुकयाचा स्वामी माझे जीवींच बैसला । बोलींच अबोला करूनिया ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – संग–सोबत, गोवळा–गोपाळा

अर्थ – या कृष्णाची संगत करून मी धरली असे मला झाले आहे त्यामुळे सारे जग माझ्या पाठीमागे लागले आहे १ अरे अवगुणी गोपाळा, दूर सर ना तू येथे कसलेही खोटे चाळे करू नकोस २ तुझ्या रूपलावण्याचा वेध मला लागल्याने माझी चित्तवृत्ती तुझ्या स्वरूपी जडली आहे रे तिला मी व माझे भाव दिसेनासे झाले आहेत ३ तुकाराम महाराजांचा हा स्वामी आता त्याच्या जीवात जाऊन स्थिर झाला आहे त्याच्या बोलण्यातच अबोला आहे ४

३९८ गोड लागे परी सांगताचि न ये । बैसे मिठी सये आवडीची ॥ १ ॥
वेधले वो येणे श्रीरंगरंगें । मीमाजी[1] अंगें हारपलीं ॥ २ ॥
परतेचि ना दृष्टी बैसली ते ठायीं । विसावोनि पायीं ठेले मन ॥ ३ ॥
तुकयाच्या स्वामीसवें जाली भेटी । तेव्हां जाली तुटी मागिलांची ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – सये–सखे, आवडीची–प्रेमाची, वेधले–हरून घेतले

अर्थ – या श्रीकृष्णाची संगत इतकी गोड आहे की ती किती गोड आहे हे सांगताच येत नाही सखे, प्रीतीची मिठी त्याच्या पायाशीच मी मारली आहे १ या श्रीरंगाने माझे चित्त हरून घेतले आहे माझी सर्व अंगे विकारासहित माझ्यातच सामावली आहेत २ त्याच्या ठिकाणी जी एकदा दृष्टी स्थिर झाली ती पुन्हा परत वळतच नाही त्याच्याच पायाशी मन विसावले आहे ३ तुकयाच्या या स्वामीशी एकदा जीवाची भेट झाल्यानंतर मग पूर्वीचा संबंध सर्व सुटतो ४

३९९ पाहावया माजी नभा । दिसे शोभा चांगली ॥ १ ॥
बैसला तो माझे मनीं । नका कोणी लाजवूं ॥ २ ॥
जीवा आवडे जीवाहूनि । नव्हे क्षण वेगळा ॥ ३ ॥
जाले विश्वंभरा ऐसी । तुकया दासी स्वामीची ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – नभा–आकाशात

१ मी हे माझी.

अर्थ:- आकाशासारखी निळसर अशी ज्याची शोभा आहे ती पाहावयास मी गेले होते तेव्हा त्याची शोभा फारच चागली दिसली १ तो माझ्या मनात बसला आहे म्हणून कुणी लाजू नका. २ माझ्या जीवाला तो स्वत.च्या जीवापेक्षा आवडतो. माझ्यापासून तो एक क्षणभरही वेगळा होत नाही ३ तुकयादासी ही त्याच्या स्वामीसारखी, विश्वंभरासारखीच बनून गेली आहे. ४

४०० कोणी एकी भुलली नारी। विकितां गोरस म्हणे घ्या हरी॥ १॥
देखिला डोळां बैसला मनी। तो वदनीं उच्चारी॥ २॥
आपुलियाचा विसर भोळा। गोविंद कळा कौतुकें॥ ३॥
तुका म्हणे हांसे जन। नाही कान ते ठायी॥ ४॥

शब्दार्थ व टीपा.- भुलली-विसरली, कळा-कला

अर्थ :- कुणी एक गवळण श्रीकृष्णाच्या नादात इतकी रमून गेली, स्वत स इतके विसरली की, डोक्यावरील ओझे आठवून 'गोरस घ्या, दही दूध घ्या' असे म्हणायच्या ऐवजी ती 'श्रीहरी घ्या' असेच म्हणू लागली १ तिने जो डोळ्यानी पाहिला तोच तिच्या मनात स्थिर झाला असून तो तिच्या तोंडूनही उच्चारला जात आहे. २ तिला स्वत ला आपला विसर पडला व ती गोविंदाच्याच कलाकौतुकात रममाण झाली ३ तुकाराम महाराज म्हणतात, या तिच्या कृत्यास लोक हसतात तरी ती त्याच्याकडे लक्ष देत नाही त्याच्याकडे कानच देत नाही ४

४०१ करूनी आइत सत्यभामा मंदिरीं रे। वाट पाहे ढळोनि गेली रात्री रे।
न येचि देव येतील कामलहरी रे। पडिली दुश्चिती तंव तो कवाड ठिमकारी रे॥ १॥
सर गा परता कळला तुझा भाव रे। कार्या पुरते हे दाविसी लाघव रे।
बोलतोसी ते अवघी तुझी माव रे। जाणोनि आलासी उजडता समयो रे॥ २॥
मीच वेडी तुजला बोल नाहीं रे। दानावेळे विटंबणा जाली काय रे।
मागुती रुद्रासि भेटी दिली तंईं रे। विश्वास तो तुझ्या बोला आझुनि [१]तरी रे॥ ३॥
भ्रम होता तो अवघा कळों आला रे। मानवत होतें मी भला भला रे।
नष्टा क्रिया नाहीं मां तुझ्या बोला रे। तुकयाबंधु स्वामी कानडचा कौसाल्या रे॥ ४॥

शब्दार्थ व टीपा - आइत-सर्व सामग्रीची तयारी, सत्यभामा-श्रीकृष्णपत्नी, कवाड-दार, ठिमकारी-धक्का दिला, माव-खोटी माया, कानडा-न कळण्यासारखा

अर्थ - एके दिवशी श्रीकृष्णपत्नी सत्यभामेने रात्री आपल्या मंदिरात श्रीकृष्णभेटीसाठी सर्व प्रकारचा साजशृंगार करून तयारी केली व सबंध रात्र सपून गेली तरी ती कृष्णाची वाट पाहात बसली परंतु श्रीकृष्ण काही आले नाहीत तिच्या अंगच्या कामलहरी वाढत राहिल्या ती अशा प्रकारे चिंतामग्न असतानाच दारावर कुणी तरी धक्का दिला १ तेव्हा रागाऊन सत्यभामा त्या श्रीकृष्णास म्हणाली, 'दूर सरा तुम्ही, तुमची मजविषयी प्रीती आहे ती समजली मला. केवळ कार्य साधण्यासाठी तुम्ही हे गोडीचे कौतुक दाखविता. पण तुम्ही जे बोलता ते सर्व खोटेच असते जाणूनबुजून जणु माझी थट्टा करण्यासाठीच तुम्ही उजाडता उजाडता आलात २ पण याचा बोल तुम्हास देऊन काय उपयोग? मी भुळी वेडी ना! नारदाला मी तुमचे दान दिले तेव्हा माझी विटंबना झाली ती पुरी वाटली नाही. पुन: रुद्रास भेट दिली त्यावेळीही अशीच विटंबना माझी झाली असे असून अजूनही मी तुमच्यावर विश्वास ठेवीत आहे हेच माझे चुकले ना. ३ माझा सर्व भ्रम होता तो आता समजला, दूर झाला मी तुम्हास भला मानून चालत होते. पण तुमची क्रिया तुमच्या बोलण्याप्रमाणे नाही असे मला कळून आल्यामुळे तुम्ही नष्टाप्रमाणेच मला वाटता. तुकया बंधूचा हा स्वामी सहजासहजी न समजणारा असून मोठा कुशल आहे. ४

१ नाही

विवरण – सत्यभामा ही श्रीकृष्णाची एक पट्टराणी तिने एक नाजुक तक्रार या अभंगात केलेली आहे श्रीकृष्णभेटीसाठी आसुसलेल्या चित्ताने ती रात्री वाट पाहात असताना मध्यरात्र उलटून गेली तरी श्रीकृष्ण आला नाही म्हणून ती रागावली आहे श्रीकृष्ण इतर नायिकांच्या बहुधा रुक्मिणीच्या मंदिरातच रमला असावा अशा शंकेने ती व्यथित होऊन त्याला रागावून बोलत आहे याच वेळी नारदाला देण्याच्या तुलादानाचे समयी सर्व दागिन्यांनी भरलेली पण समतोल न झालेली व रुक्मिणीच्या तुलसीपत्राने समतोल झालेली तुला ध्यानात येताच ती कष्टी झालेली आहे या आपल्या विटंबनेची खोल तीव्र वेदना तिच्या मनात होती नारदांनी स्वर्गाहून आणलेली पारिजातपुष्पे कृष्णास दिली ती त्याने सत्यभामेशिवाय इतर स्त्रियांना दिली याही कृत्याचा राग सत्यभामेस आला तिच्या रागाची अशी निमित्ते वारंवार उमटलेली दिसतात त्यातील एक बारीक निमित्त बुवांनी या अभंगात साकार केले आहे येथून पुढचे काही अभंग तुकयाबंधु' या नावाने मुद्रांकित झालेले आहेत याचा अर्थ तुकारामबंधू म्हणत आहे किंवा तुकारामबंधू सांगत आहे असा घेता येतो तुकाराम महाराजांचे बंधू कान्होबा नावाचे होते त्यांनीही काही अभंग केले असावेत या कान्होबाचा उल्लेखही पुढे काही अभंगातून आहे हा कान्होबा शब्द श्रीकृष्णवाचक किती व तुकोबाच्या बंधूचा उल्लेख म्हणून किती हे सांगणे कठिण आहे

४०२ तव तो हरि म्हणे वो निजांगने वो। लाइ नीच का देसील डोहणे वो।
मजपें दुजें आलें ते देव जाणे वो। शब्द काय हे बोलसी ते उणे वो॥ १॥
पाहा मनीं विचारुनी आधि वो। सांडूनि देह[१] भ्रांति करीं स्थिर बुद्धि वो।
तट केले हे माझें तुझें उपाधी वो। उघडी डोळे आझुनि तरी धरी शुद्धि वो॥ २॥
कोठें तरी दुनियात वर्तलें वो। स्त्रियानीं भ्रतारा दाना दिले वो।
कैसा भला मी नव्हे ते सोसिले वो। रुसतेसी[२] तू उफराटें नवल जाले वो॥ ३॥
काय सांग म्या दैन्य केली कैसी वो। तुझ्या गर्वे आणविले हनुमंतासि वो।
कष्टी केले मज गरुडा भीमकीसि वो। तुकयाबंधु म्हणे खरे खोटें नव्हे यासि वो॥४॥

शब्दार्थ व टीपा – लाइ– अति, डोहणे–टोमण, मजपें–मजकडे तट–वडवड तटा

अर्थ – सत्यभामेचे वरील भाषण ऐकून तो श्रीकृष्ण मग तिला म्हणाला, प्रिये असे अति वाईट बोलून मला टोमणे का देतेस ? माझ्याकडे दुसरे कुणी आले असेल तर एक देवच जाणे उगाच उणेदुणे शब्द का बोलतेस मला ? १ तू मनात नीट विचार करून पाहा ना सर्व भ्रम सोडून तुझी बुद्धी स्थिर करून पाहा आजपर्यंत तुझे माझे अशी वडवड करून जो तटा केलास त्याचा काय उपयोग ? नीट डोळे उघडून अजून तरी शुद्धीवर ये ना २ असे कुठे तरी जगात घडले आहे का ? स्त्रियांनी आपल्या पतीचे दान दिल्याचे कुठे कधी घडले का ? पण ती गोष्ट तू केलीस, व मी ती सोसली असा पाहा मी किती चांगला आहे असे सांगून तूच रुसतेस माझ्यावरच हा उलटाच न्याय म्हणायचा नवलच म्हणायचे ३ सांग बरे, मी काय तुझी विटंबना केली ? तुझा गर्व दूर व्हावा म्हणून मी हनुमंताला आणले यावेळी हनुमंत व गरुड यांच्यात भांडण होऊन गरुडास किती त्रास झाला बरे मलाही राम होण्यासाठी, रुक्मिणीस सीता होण्यासाठी किती त्रास झाला ? तुकयाबंधू म्हणत आहे, खरेच खऱ्याखोट्याचा निवाडाच कुणी करीत नाही ४

४०३ तव ते म्हणे ऐका हृषीकेशी वो। नवाजिले[३] तुम्हीं म्हणा आपणासि वो।
तरी कां वचनुक सुमनासि वो। नट नाट्य बरे सपाटू जाणतोसि[४] वो॥ १॥
सर हो परता परता[५] हो आता हरी। म्हणे सत्राजिताची कुमरी।
जाणतें मी या शब्दाच्या कुसरी। ऐसेंच करून ठकविले आजिवरी॥ २॥

१ देहभ्रांती, २ रुसी ते ३ नावाजीत होता आपणासी ४ जाणसी परी, ५ आता हरी आता हो,

भावे गेले म्हूण न व्हावा वियोग। मनिचे आर्त जन्मातरीं व्हावा सग।
तो तो केले हे पाठमोरे जग। ऐसे काय जाणे हे तुझे रग॥ ३॥
काय करू या नागविले कामें। लागलें तयास्तव इतुके सोसावे ।
नाहीं तरी का नव्हती ठावीं वर्मे। परद्वारीं ऐसा हाकलिती प्रसिद्धनावे॥ ४॥
काय किती सागावे तुझे गुण। न फुटे वाणी निष्ठुर ऐसा निर्गुण।
आप पर न म्हणसी माय बहीण। सासूसुनास लावुनि पाहासी भाडण॥ ५॥
इतुकियावरी म्हणे वैकुंठिंचा राणा। होऊन गेलें तें नये आणू मना।
आता न करीं तैसे करी क्रिया आणा। भक्तवत्सल म्हणे तुकयाबधु कान्हा॥ ६॥

शब्दार्थ व टीपा – नवाजिले–नावाजले, चागले म्हटले, वचनुक–फसवणूक, सत्राजिताची कुमरी–सत्राजिताची कन्या सत्यभामा, कुसरी–कौशल्य, आर्त–इच्छा

अर्थ – श्रीकृष्णाचे हे भाषण ऐकून त्यावर ती म्हणाली, ' हृषीकेशी, देवा, तुम्ही तुमच्या चागुलपणास नावाजिले तरी, मग तुमची अशी फसवणूक का होते हो ? तुमच्या मनात हे सर्व सोंग असून तुम्ही त्याची वतावणी मात्र फार चागली करता १ सत्राजिताची कन्या सत्यभामा मग पुन म्हणाली ' देवा, दूर व्हा आता तुम्ही, तुमच्या शब्दाचे हे कौशल्य मी चागलेच जाणते ना असेच लाघव करून आजवर मला फसविलेत २ देवा, तुमचा वियोग कधीही न व्हावा म्हणून मी तुमच्याकडे आले जन्मोजन्मी तुमची सगत घडावी अशी माझ्या मनाची तीव्र इच्छा म्हणून तर जग पाठमोरे करून त्याची पर्वा न करता, तुमच्याकडे आले पण हे तुमचे असले ढग मला काय माहीत ? ३ काय करू हो देवा ? माझ्या या कामी मनानेच मला फसविले हो म्हणून तर मला इतके सोसावे लागले नाही तर देवा, तुमच्या कृती काय मला माहीत नव्हत्या ? दुसऱ्याच्या स्त्रियाबद्दलची तुमची रहस्ये प्रसिद्धच आहेत ४ देवा, आणखी किती गुण तुमचे सागावेत ? तुमची निष्ठुरता व दुर्गुणता वर्णन करण्यास वाणीसुद्धा समर्थ नाही तुमच्या दृष्टीत आपले परक्याचे असे काही नाहीच आई, बहीण असाही फरक तुमच्या दृष्टीत नाही तुम्ही सासूसुनाचे भाडण लावून देता ५ सत्यभामा जेव्हा इतके निष्ठुरपणे बोलली तेव्हा तो वैकुंठीचा राजा श्रीकृष्ण तिला म्हणाला, ' भामे, आता पूर्वी जे होऊन गेले ते गेले पुन ते काही मनात आणू नकोस मी पुन तसल्या गोष्टी करणार नाही अशी शपथ घेतो पाहा तुझ्यासाठी तुकयाबधू कान्होबा म्हणतात, असा हा श्रीकृष्ण भक्तावर दया करणारा आहे ६

४०४ कान्हो ऐकली रे ऐकली रे। तुजसवे चुकले[1] रे।
भय वाटे वर्नी[2] मज अबळा धाकली रे॥ १॥
निघता घरीं आई वा वारी। तूजसवे का आलियें हरी॥ २॥
लोक वाटा सागती खोटा। परी मी चटा लागलियें॥ ३॥
पिकल्या बोरी जाले सामोरी। काय जाणे कोठें राहिला हरी॥ ४॥
आड खुट जालिया जाळी। काय जाणो कान्हे माडिली रळी॥ ५॥
तुका म्हणे जाऊं आलिया वाटा। पाहो हरी पायीं न मोडे काटा॥ ६॥

शब्दार्थ व टीपा – अबळा–अबला, बलहीन स्त्री, बा–वडील, वारी–नको म्हणत असताना, रळी–मस्करी, थट्टा

अर्थ – श्रीकृष्णा, मी एकटीच आहे रे एकटी तुझ्या बरोबर येऊन चुकले १ आता या वनात मला भय वाटते रे मी एक लहान, बलहीन अशी स्त्री आहे रे, घरून निघताना मला आई, वडील नको म्हणत असताना मी तुझ्या बरोबर का आले कुणास माहीत ? २ वाटेने लोक सांगत होते की, तू खोटा आहेस, लबाड आहेस पण मला

१ चुकली, २ वनी,

तुझ्याच संगतीची चट लागली होती. ३ बोरीचा वृक्ष समृद्ध झालेला पाहून मी त्याच्या समोर आले, पण काय झाले कुणास माहीत, हा श्रीहरी कुठे गेला ? ४ आता पुढे खुंट जाळ्याच तेवढ्या दिसतात. बोरीच्या काटेरी जाळ्याच दिसतात, फळे नाहीत. या हरीनें ही काय मस्करी आरंभिली आहे कुणास माहीत ? ५ तुकाराम महाराज म्हणतात, तो मग म्हणाली, 'चला आपण आल्या वाटेनेच जाऊन त्या श्रीहरीस पाहू या. म्हणजे पायास काटा लागणार नाही' ६

४०५ कयाला मज आयो वारितेसी घरा । खेळतों सोकरा नंदाचा मी ॥ १ ॥
बहु दिसीं जाली यासीं मज[1] भेटी । आतां वाटे तुटी न परावी ॥ २ ॥
कोवळें बोलतो मना आवरतें । डोळियाचें पातें ढापवेना ॥ ३ ॥
आजि सकळांसी आलें चोलुनियां । कां नो पाठी यांमां पुरविली ॥ ४ ॥
तुमचें तें काय खोळंबलें काज । वल्या कां नो मज कोंडा घरी ॥ ५ ॥
तुकयाचा धनी गोकुळनायक[2] । सरा कांहीं एक बोलतो मी ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा :– कयाला–कशाला, आयो–आई, सोकरा–छोकरा, मुलगा, ढापवेना–हालत नाही, चोलुनिया–चोरून, वल्या–चऱ्या, चांगल्या

अर्थ :– आई, मला घरी चल, घरी चल असे का म्हणतेस ? मला का निवारतेस ? मी नंदाचा मुलगा श्रीकृष्ण याच्याशी खेळत आहे ग. १ फार दिवसानी त्याची माझी भेट झाली आहे ना त्याची व माझी तुटी आता होऊ नये अशी इच्छा आहे. २ तो कृष्ण फारच मृदू बोलतो, त्याचे शब्द माझ्या मनास फारच आवडतात. त्याला पाहाताना माझ्या डोळ्याचे पाते हालत नाही ३ आजही सगळ्याना चोरून मी त्याच्याकडे आली आहे. पण तुम्ही माझो पाठ विनाकारण का ग पुरविता ? ४ यात तुमचे काय काम खोळंबिले आहे ? तुम्ही चांगल्या दिसत असून मला का ग घरी कोंडून ठेविता ? ५ तुकाराम महाराज म्हणतात, माझा हा धनी गोकुळाचा नायक श्रीकृष्ण आहे. दूर व्हा. मी त्याच्याशी काही थोडे बोलणार आहे आता ६

४०६ आतां न यें मागें । मी आलें याच्या रागें ।
काय माझें जगें । कोपोनियां करावें ॥ १ ॥
कां गो करित्यां कोल्हाल । तुम्ही भलत्याच सकल ।
वेचाल ते बोल । झुटे होती बोलिले ॥ २ ॥
याचे भेटी माझें मन । स्वरुपीं ठाकलें लोचन ।
वेगळें तें क्षण आतां होऊं नावरे ॥ ३ ॥
काज काम नको जालें । बीजें नावरे बोलिलें ।
याचिया भेदिलें । कामबाणीं अंतर ॥ ४ ॥
या वेगळें होणें । आतां जळो तैसें जिणें ।
घेतले तें मनें । आतां मागें न फिरे ॥ ५ ॥
आतां मोटी वार । माझी[3] नका धरूं चार ।
तुकयाचा दातार । शेजे तो मी सुतलों[4] ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – रागें–प्रीतीनें, करित्या–करता, कोल्हाल–गागाट, झुटे–खोटे, बीजें–दुसऱ्याने, मोटी–मोठी आशा, सुतलों–निजलो

अर्थ – मी काही आता मागे परतणार नाही मी आता या श्रीकृष्णाच्या मागेमागेच आले आहे. जगाने माझ्यामागे काय रागाने बोलायचे असेल ते बोलून घ्यावे. १ तुम्ही सर्वजणी आता गोंगाट का ग करता ? तुम्ही

१ मसी, २ वैकुंठनायक, ३ माजी, ४ सुतले

सर्वजणी आता मला परक्याच आहात. जे काही मला शब्द बोलाल, नावे ठेवाल, ते सर्व खोटे होईल. २ याच्या भेटीमुळे माझे मन व माझे डोळे याच्याच स्वरूपात जडून राहिले आहेत. आता त्याच्यापासून वेगळे असण्याचा एक क्षणही मला आवडणार नाही. ३ मला कसलेही काम आता नकोसे झाले आहे. दुसऱ्याने काही बोललेले मला आवडणार नाही कारण या श्रीकृष्णाच्या कामबाणांनी मी विद्ध झालेली आहे. ४ आता या कृष्णाशिवाय जगणे म्हणजे त्या जिण्यास आग लागो. आता माझ्या मनाने याची सगत निश्चीत केली आहे ती काही मी सोडणार नाही. तेथून काही मागे परतून फिरणार नाही. ५ आता माझ्यासंबंधी काही मोठ्या आशा धरल्या असतील तर त्या सोडून द्या. कारण मी आज तुक्याचा दाता स्वामी श्रीकृष्ण याच्या शय्येवर झोपली आहे. ६

४०७ हरिरता चपळा नारी। लागवरी न रिघती ॥ १
अवघ्या अंगें सर्वोत्तम। भोगी काम भोगता[1] ॥ २ ॥
वाचा वाच्यत्वासि न ये। कोठें काय करावें ॥ ३ ॥
तुका म्हणे देवा ऐशा। देवपिशा उदारा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– हरिरता–हरीशी रममाण झालेल्या, लागवरी–गर्भधारणेच्या स्थितीत, देवपिशा–देवासबधी वेड्या

अर्थ :– श्रीहरीशी रममाण झालेल्या या गोपी फार चपळ असून त्याचा संग गर्भधारण करण्याच्या स्थितीत कधीच येत नाही. १ अनेक भोग जरी त्यांनी भोगले तरी त्या सर्वांगानी उत्तम व पवित्र राहतात. २ त्याचे संबंध, व त्याचे पावित्र्य याचे वर्णन वाणीने करता येण्यासारखे नाही. यासाठी काय करता येण्यासारखे आहे ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, याप्रमाणे या उदार गोळणी देवाविषयी वेड्या झालेल्या आहेत. ४

४०८ गौळणी आल्या वाज[2] । म्हणती या गे[3] राखों आज।
सांपडवुनी माज- । घरांत धरूनी कोंडूं।
उघडें[4] कवाड उभ्या काळोशाचे आड।
साता पांचा एक भीड मौनेंची ठेल्या ॥ १ ॥
नित्य सोंकवला नेदी। सांगों चित्त बोला।
आतां सांपडतां याला कोण सोडी जीवें ॥ २ ॥
जाणोनियां हरी त्याच घरा आला चोरी।
गडियां ठेवुनि बाहेरी पूर्वद्वारें शिरे।
त्यांच्या भयाभीत चाले पिलंगत भोंवतालें।
पाहे तंव देखियेलें नवनीत पुढें ॥ ३ ॥
उतरोनि सिंकें। पाहे चाखोनियां निकें।
गोड तेंचि एका एकें। हातीं लांवविती।
जाणे राखती तयांसि। तेथें अधिकचि नासी।
माग लावी हात पुसी। चोरी जाणावया ॥ ४ ॥
जाणोनियां नारी। मूळ वर्मद्वार धरी।
माज[5] कोडूनी भीतरी। घरांत[6] धरीयेला।
कां रे नागविसी। माझें मुळीं लागलासी।
आणवीन तुजपासीं। मागें खादले तें ॥ ५ ॥

---

१ पुरता, २ वाजें, ३ रे, ४ उभे, ५ माजे, ६ घरात धरी एकला

दोही[1] संधी[2] वाहे । धरूनि नेती माते पाहे ।
काय नासी केली आहे । घरामाजी येणें ।
तुका म्हणे सुख । त्याचें वाढों नेदी दुःख ।
दसवंती कवतुक । करुनी रंजविल्या ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा :– वाजें–त्रासाने, श्रमाने, काळोखाचे–अंधाराच्या, पिलंगत–लपत छपत.

अर्थ :– मोठ्या कष्टाने, त्रासाने गोकुळच्या गौळणी एकत्र झाल्या व म्हणू लागल्या, या ग, आज आपण त्याची राखण करू व सापडताच त्यास माजघरात कोंडून ठेवू. त्यानी मग दार उघडेच ठेविले व त्या पाचसातजणी एकत्र येऊन अंधाराच्या आड मौन धारण करून गप्प राहिल्या. १ मनात म्हणत राहिल्या, हा देव रोज घरी येऊन चोरी करून दूध लोणी खायला सोकावलाय किती सांगितले तरी त्याकडे लक्षच देत नाही आता बरा सापडणार आहे. याला काही कुणी आता जिवत सोडणार नाही २ या गौळणींचा हा बेत जाणून श्रीहरी त्याच घरी चोरी करण्यासाठी आला. त्याने आपले सोबती बाहेर ठेविले व त्याने पूर्वेच्या दाराने आत प्रवेश केला. त्या गोपींच्या भीतीने सभोवताली पाहात पाहात तो लपत छपत चालू लागला आणि त्याने समोर पाहिले तो त्यास लोणी दिसले. ३ मग त्याने शिंक्यावरचे ते लोणी काढले. त्याने ते चाखून पाहिले. त्याला फार गोड लागले आणि त्यातील सर्वांत गोड लोणी होते ते त्याने एकमेकाच्या हातानी लांबविले आणि जिथे गौळणींनी चांगली राखण ठेवली होती तिथे त्याने दह्यादुधाचा घागलाच नाश केला. मग त्या देवाने आपली चोरी समजावी म्हणून लोण्याचे हात जागोजागी पुसले ४ त्या सर्व गौळणींनी मग त्याचे हे मूळ रहस्य जाणले. त्याला घरात कोंडून धरून ठेविले आणि त्यानी म्हटले, 'श्रीकृष्णा, असे आम्हास का सतावतोस ? आमच्या मागे का लागला आहेस ? यापूर्वी तू जे जे खाल्लेस तेही मी परत आणवीन अशाने ' ५ मग त्यानी त्याला दोन्ही बाजूनी धरून त्याच्या आईपाशी नेले व म्हटले, 'या तुझ्या मुलाने आज काय घरात नासाडी केली आहे पाहा.' तुकाराम महाराज म्हणतात, पण त्या श्रीहरीच्या मुखाकडे पाहताच त्या गौळणींना दुःख वाटेनासे झाले. त्या यशोदा मातेनेही मुलाचेच कौतुक करून त्या गोपींचे रंजन केले ६

४०९ आलियें धांवति धांवति भेट होईल म्हूण ।
तंव ते टळली वेळ वो माझा उरला सीण ॥ १ ॥
आतां काय करूं सांग वो मज भेटेल कैसा ।
हरिलागीं प्राण फुटे वो थोरी लागली आशा ॥ २ ॥
लाविला उशीर बहुतीं बहु ओढिती ओढा ।
सांभाळितां साग असांग दुःख पावल्यें पीडा ॥ ३ ॥
जळो आतां संसारु वो कई शेवट पुरे ।
तुकयाच्या स्वामी गोपाळालागीं जीव झुरे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– सीण–त्रास, साग–पूर्ण, असाग–अमर्याद

अर्थ :– या श्रीहरीची भेट होईल म्हणून मी धावतच आले. पण वेळ निघून गेल्यामुळे तो निघून गेला व मला मात्र त्रास झाला १ आता मी काय करू सांग ? तो श्रीकृष्ण मला कसा भेटेल ? त्या श्रीहरीसाठी माझा प्राण फुटून आता बाहेर जात आहे त्याची फार मोठी आशा मला आहे हो २ पुष्कळांची पुष्कळ ओढ असल्यामुळे याच्या भेटीस मात्र उशीर होतो इतर सगळे सांभाळताना हा न मिळाल्यास अमर्याद दुःख होते. ३ हा संसारही त्या श्रीहरीशिवाय असेल तर जळून जावा. याचा कधी शेवट होणार आहे काय ? तुकाराम महाराजांच्या स्वामीच्या साठी, गोपाळासाठी जीव मात्र माझा झुरतच चालला आहे. ४

१ देहि सदे वाहे, २ सदी.

४१० आणीक काय थोडीं । परि तीं[1] फार खोटीं कुडीं ॥ १ ॥
सदा मोकळींच गुरें । होती फजीत तीं पोरें ॥ २ ॥
सदा घालिती हुंबरी । एक एकाचें न करी ॥ ३ ॥
तुका म्हणे घरीं । माय वेळोवेळा मारी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – कुडीं–वाईट

अर्थ – आणखी पोरे काय थोडी आहेत ? पण ती सारी खोटी व वाईट बुद्धीची आहेत १ ज्याच्या इंद्रियरूपी गाई नेहमी मोकळ्याच राहतात त्याची फार फजिती होते २ नेहमीच ते अहमहमची हुंबरी घालतात ते एकमेक एकमेकांसारखे करीत नाहीत ३ मग असल्या पोरांना तुकाराम महाराज म्हणतात, त्याची आई घरी मार देत असते ४

४११ बहुतांचे संगती । बहु पावलों फजिती ॥ १ ॥
बरें केले नंदबाळें । मागिलाचें तोंड काळें ॥ २ ॥
माझा करितील तटा । लपती आलिया बोभाटा ॥ ३ ॥
तुका म्हणे काई । किती म्हणो बाप आई ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – नंदबाळें–श्रीकृष्णाने

अर्थ – अनेक लोकांच्या संगतीने आतापर्यंत मी चांगलाच फजीत पावलो होतो १ पण आता आपली संगत देऊन या कृष्णाने फार चांगले केले मागच्या सर्व सोबत्यांची तोंडेच काळवंडून टाकली २ हे सर्व सोबती माझ्या वावतीतले गाऱ्हाणे सांगून तटा करतात व स्वतःचे काही बाहेर आले की मग लपून बसतात ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा लोकांना, सोयऱ्यांना आईबाप म्हणून मी किती जवळ करावे ? ४

४१२ गाईन ते लीळा चरित्र पवाडे । राखिले सवंगडे सहित गाई ॥ १ ॥
चोरिलें नवनीत बांधविला गळा । जे तुम्हीं गोपाळा छंद केले ॥ २ ॥
मोहिल्या गोपिका पावयाच्या छंदें । केली ते गोविंदें क्रीडा गाऊं ॥ ३ ॥
मायबापा लाड दाखविले कौतुक । तें या आणूं सुख अंतरासी ॥ ४ ॥
निर्दाळिले दुष्ट भक्तां प्रतिपाळी । ऐसा म्हणो बळी आमुचा स्वामी ॥ ५ ॥
तुका म्हणे सरसी असो येणें बोधें । लागोनि संबधें सर्वकाळ ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – लीळा–क्रीडा

अर्थ – आपले स्वतःचे सोबती व गाई याचे तुम्ही रक्षण केले अशा अनंत कृत्यांचे व क्रीडाचे पवाडे मी गात राहीन १ तुम्ही गोकुळात लोणी चोरून आपला गळा बांधून घेतलात श्रीकृष्णा, गोकुळात ज्याच्या क्रीडा केल्यात त्या सर्वांचे मी वर्णन करीन २ तुम्ही तुमच्या मुरलीच्या नादाने सर्व गोपींना वेधून टाकले त्याच्याबरोबर रासक्रीडा केलीत, त्याचे वर्णन आम्ही मोठ्या संतोषाने करू ३ तुम्ही तुमच्या आईबापांना जे लाडाने व कौतुकाने क्रीडाविशेष दाखविले ते सर्व सुख आम्ही आमच्या मनात साठवून ठेवू ४ भक्तांचा सांभाळ करण्यासाठी तुम्ही दुष्टांचा नाश केलात असा हा आमचा बलवान स्वामी आहे असे आम्ही म्हणू ५ तुकाराम महाराज म्हणतात, या आमच्या श्रीकृष्णबोधाचाच विजय नेहमी असावा त्याचाच संबंध सर्वकाळ आम्हास घडावा ६

## डांका–अभंग ८

४१३ चौक भरियेला आसनीं पाचारिली कुळस्वामिनी ।
वैकुंठवासिनि ये धांवोनी झडकरी ॥ १ ॥

[1] तं

रंगा येईं वो विठाई सांवळिये डोळसे ।
तुझें श्रीमुख साजिरें ते मी केधवां देखेंन ॥ २ ॥
रजतमधुपारती । पंचप्राणांची आरती ।
अवघी सारोनी आइती । ये धांवती झडकरी ॥ ३ ॥
मन मारोनियां मेंढा । आशा मनसा तृष्णा सुटी[1] ।
भक्तिभाव नैवेद्य ताटीं । भरोनि केला हाकारा ॥ ४ ॥
डाका अनुहात गजरे । येउनि अंगासी संचरे ।
आपुला घेउनी पुरस्कार । आरोग्य करीं तुकयासी ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– डाका–मोठा नगारा, खुनी माणमाचा तपास करण्यासाठी कुमार वाजविनो ते वाद्य, चौक–देवीला बसण्यासाठी पाटावर वस्त्र ठेवून त्यावर गहू, तांदूळ वगैरे धान्यानी काढलेल्या चतुष्कोणाची आकृती, पाचारिली–बोलाविली, मनसा–इच्छा, हाकारा–पुकारा, पुरस्कार–देणगी

अर्थ :– या आसनावर चौक भरुन कुळस्वामिनीला हाक मारली आहे. ‘वैकुंठवासिनी विठाई ये धावत लौकर’ अशा तीव्र हाकेने तिला जागृत केले आहे. १ विठाई, सावळिये आई, तू डोळस आहेस, माझ्या अंतःकरणाचा रंग ओळखून, भाव पाहून लौकर धावत ये. तुझे सुंदर श्रीमुख मी केव्हा पाहीन असे मला झाले आहे २ रजतमाची धुपारती व पंचप्राणांची आरती अशी सर्व तयारी करून मी आज तू धावत झटकन ये अशी विनवणी करीत आहे. ३ मनरूपी मेंढा एका घावासरसा मारून त्यातील आशा, इच्छा, तृष्णा याना काढून, सुटद्या करून मी भक्तिभावाने नैवेद्य ताटात वाढलेला आहे आणि तुला हाक मारण्यासाठी पुकारा करीत आहे. ४ तुकाराम महाराज म्हणतात, अनुहात नादाचा डाका–नगारा ऐकून या देवीने माझ्या अंगात संचार केलेला आहे आणि आपली देणगी घेऊन मला आरोग्यदान दिले आहे ५

विवरण –येथून पुढचे सात अभंग ‘डाका’ या नावाखाली असून ते सर्व रूपकात्मक असे आहेत. बहुजनांस भक्तिमार्ग प्रिय होण्यासाठी जें लोकवाङ्मयात्मक असे भारूड वाङ्मय साधुसंतानी निर्माण केले त्यातलाच एक प्रकार, ‘डाका’ म्हणजे मोठा नगारा देवाची आरती वगैरे सुरू असताना याच्या आवाजाने आसमंत दुमदुमून जातो या ठिकाणी गोंधळाच्या वेळी जसे प्रमुख व इतर देवदेवताना पाचारण केले जाते त्याचप्रमाणे येथेही महाराष्ट्राची कुलस्वामिनी, संताची कुलदेवता वैकुंठवासिनी ‘श्रीविठाई सावळिये’ हीस पाचारण केले आहे आसन, चौक, धुपारती, आरती, मेंढ्याचा बळी, अनुहात गजर, पुरस्कार वगैरे शब्दातून देवीच्या उपासनेचे रूपक या अभंगात केलेले दिसून येईल

४१४ साच माझा देव्हारा । माक ठेवा भाव खरा ।
त्रिगुणाचा फुलवरा । आणा विनति सांगतों ॥ १ ॥
माझें दैवत हे रंगीं । नाचे वैष्णवाच्या संगीं ।
भरले मग अंगीं । निवाड करी दोहींचा ॥ २ ॥
तुझें आहे तुजपासीं । परि तूं जागा चुकलासी ।
चिघडुनियां नासी । तुझ्या घरिच्यांनीं केली ॥ ३ ॥
आतां न पडे ठावें । वांचूनियां माझ्या देवें ।
अंधकार व्हावे । नासु ठाव शोधावा ॥ ४ ॥

---

[1] तुटी

आधळ्यासी डोळे । देते पागुळासी पाय ।
वाजा पुत्र फळे । नवस पुरविते विठाई ॥ ५ ॥
उगविलीं कोडीं । मार्गे कितेकाचीं बापुडीं ।
तुका म्हणे घडी । न लगे नवस द्या आधीं ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – साच–खरोखर, भाक–विश्वास, फुलवरा–फुलाचा गुच्छ, नासी–नाश, उगविलीं–सोडविली

अर्थ – हा माझा देव्हारा खराच आहे तुम्ही तुमच्या मवमय वचनांचा विश्वास खरा धरून सत्त्व, रज तम या गुणाच्या फुलाचा गुच्छ घेऊन या अशी मी तुम्हास विनती करीत आहे १ माझे हे प्रिय दैवत या वैष्णवाच्या सगतीत रगत येऊन चालत आहे ते माझ्या हृदयात पूर्णपणे भरून असून प्रवृत्तिनिवृत्तींचा निवाडा करीत आहे २ तुझी हरवली आहे अशी वाटणारी वस्तू खर म्हणजे तुझ्यापाशीच असून तू मात्र शोधायची जागा चुकून व्यर्थ वणवण करीत हिडत आहेस तुझ्या अत करणात निवास करणाऱ्या कामक्रोधादी विकारानी तिचा नाश आरभिला आहे ३ आता त्या वस्तूची गोष्ट ओळख माझ्या एका देवावाचून तुम्हारा होणार नाही, मायाशी अधाराचा नाश व्हावा म्हणून त्याचा शोध घेणे आवश्यक आहे ४ ही आमची विठाई आधळ्याना दृष्टी देते, पागळ्या लोकाना पाय देते, निपुत्रिकाना पुत्र देते भक्ताचे सर्व नवस ही परिपूर्ण करते ५ हिने याहीपूर्वी कित्येकाची रहस्ये पूर्णपणे सोडविली असून तुकाराम महाराज म्हणतात, हिला आधी तुम्ही नवस करा तुमची सकटे दूर करण्यासाठी एका क्षणाचाही वेळ लागणार नाही ६

४१५ विनति घातली अवधारी । मज देईं वो अभय करीं ।
पीडिलों खेचरीं । आणीक वारी नावाचीं ॥ १ ॥
रगा येईं वो एकला रग बोडवला ।
हरिनाम उठिला गजर केला हाकारा ॥ २ ॥
देवाचे दैवते । तुज नमिले आदिनाथे ।
ये वो कृपावते । भोगा माझ्या धावति ॥ ३ ॥
न लवीं आता वेळ । आइत सारिली सकळ ।
तुका म्हणे कुळ । आमुचिये दैवते ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – खेचरीं–कामक्रोधादी भुतानी

अर्थ – या कामक्रोधादी भूतानी मी त्रस्त झालो आहे विठाई, तू आपल्या अभय हातानी मला आश्वासन दे इतर भुताची भीतीही निवारण कर ही माझी विनती तू ऐक १ हरिनामाचा पुकारा करून मी मोठा गजर केला आहे त्याच्या रगात तुझ्या कृपेचा रग चढू दे ना २ हे आदिमाये, तू सर्व देवाची देव असून मी तुला मनोभावे नमस्कार करीत आहे तू कृपावत होऊन मला माझ्या प्रारब्धकर्मापासून सोडीव आता तू उशीर लावू नकोस तुझ्या पूजेची ही सर्व सामग्री मी आयतीच तयार केली असून तुकाराम महाराज म्हणतात, तू आमची कुलस्वामिनी आहेस ४

४१६ माझा देव्हारा साचा । नाहीं आणीक कोणाचा ।
त्रिभुवनीं याचा । ठसा न लगे पुसावे ॥ १ ॥
या रे लोटागणी । काहीं करा विनवणी ।
करील झाडणी । भूत काढी ससार ॥ २ ॥

पडिले विषयाचे गोंधळीं । ते त्रिगुण आकळी ।
हरिनाम आरोळी । कानी पडतां ते उठी ॥ ३ ॥
घेतला अहंकारें । काम क्रोध या मत्सरे ।
पळती प्रेमभरें । अवघे ठाव साडुनी ॥ ४ ॥
घेतलासे पुरा । माया ममता आसरा ।
अवघ्या एक सरा । पळती रग देखोनी ॥ ५ ॥
तुका म्हणे द्यावा भाव । फिटेल मनिचा संदेह ।
आणीक न लगे ठाव । काहीं कोठें हिंडावे ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – झाडणी करणे–दूर करण, आकळी–बाधून गेले, आसरा–जलदेवता

अर्थ – हा माझा खरोखरचा देव्हारा आहे याप्रमाणे दुसऱ्या कुणाजवळच तो नाही याची कीर्ती साऱ्या त्रिभुवनात पसरत राहिली आहे याच्यासबंधी कुणास विचारण्याचीही जरूरी नाही १ या माझ्या देवास नमस्कार करून सर्वजण लोटांगण घाला हो त्याला काही नम्र भावाने विनती करा ना तुम्हास लागलेले विकारादींचे भूत हा देव काढून टाकेल संसाराचे भूत दूर करील २ जे नाना विषयाच्या जंजाळात सापडले ते त्रिगुणाच्या बंधनात गुरफटले गेले असून या परमेश्वराच्या नामाची आरोळी ऐकताच ही भुते उठून दूर जातील ३ काम, क्रोध, मत्सर अहंकार इत्यादी भुते याचे प्रेमळपणाने घेतलेले नाव ऐकताच उठून पळून जातील ४ माया, ममता या जलदेवतांनी जो ताप दिलेला आहे त्या याचा रग पाहून तावडतोब दूर पळन जातील ५ तुकाराम महाराज म्हणतात, तुम्ही फक्त तुमच्या मनातील एकचित्त असा भाव द्यावा मग तुमच्या मनाचा संदेह फिटून जाईल मग इतर ठिकाणी आश्रय घेण्यासाठी हिंडण्याचे कारणच पडणार नाही ६

४१७ पुढें येते देवी । तिची जती[१] चालो द्यावी ।
मागील झाडावी । झाडा मान आसडी ॥ १ ॥
एकवीरा आली अंगा । आता निवारील रोगा ।
माझ्या भक्तापाशीं सांगा । पूजा भावे करावी ॥ २ ॥
मेंढा मारावा लोंवाळ । पूजा पावली सकळ ।
तुम्हीं केले बळ । मग मी ठायीं न पडें ॥ ३ ॥
तुका म्हणे मुळीं । लागली ते आली कुळीं ।
वंदुनी सकळीं । जीवे भावे ओवाळा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – जती–जत्रा यात्रा लोंवाळ–गळे लठ्ठ

अर्थ – पुढे येणाऱ्या देवीची यात्रा नेहमी चालू ठेवावी मागची आशा व मानाची भावना याचा त्याग करावा १ ही एकवीरा देवी अंगात आली असून ती तुमचा सर्व रोग दूर करील माझ्या भक्तांना एकनिष्ठन पूजा करण्यास सांगा असे ही सुचविते २ हिच्यासाठी चांगला गलेलठ्ठ मनरूपी मेंढा मारून त्यायोगे तिला सर्व पूजा पोचेल असे पाहावे याशिवाय तुमच्या कुठल्याही बळाने मी सापडणार नाही असे ही सुचविते ३ तुकाराम महाराज म्हणतात, ही देवी आमच्या कुलाचीच आहे या कुलस्वामिनीस सर्वांनी वंदन करावे व तिला जीवेभावे ओवाळावे ४

४१८ अवघ्या जेष्ठादेवी कोण पूजनाचा ठाव ।
धरिताचि भाव कोठें नाहींसे जाले ॥ १ ॥

१ जगति

दिसें सारिखें सारिखें । परि तें कारणीं पारिखें ।
तळीं गेलें देखें । वरी टोले[1] न साहाती ॥ २ ॥
पट एका शिरीं । यथाविधीनें त्या येरी ।
बसकोळच्या घागरी । डेरे रांझण गाडगीं ॥ ३ ॥
तुका म्हणे माना । येथें कोणीं रुसावें ना ।
आपुलाल्या स्थानां । जेथें त्याचि शोभल्या ॥ ४

शब्दार्थ व टीपा – ज्येष्ठा–थोर, पट–सिंहासन, बसकोळचा–वसवट

अर्थ :–सर्वच देवी थोर व समान आहेत असे मानले तरी पूजा करण्यास कोणती घ्यावी याचा निवाडा करावाच लागतो. असा एके ठिकाणी भाव धरताच मग दुसरीकडे पूजा योग्य वाटत नाही. १ सर्व वस्तू सारख्या दिसल्या तरी एखाद्या निमित्ताने, कारणानें त्याची खरी किंमत ध्यानात येते. गाडग्याच्या उतरंडीत तळातील गाडग्यासच का मान असे त्याच्यावरील गाडगी विचारतात; पण त्याना आपल्या वरच्या गाडग्याचे ओझे सहन होत नाही. २ सिंहासनाचा अधिकार एकासच असतो व इतर लोकाना त्याच्या त्याच्या योग्यतेप्रमाणे मान मिळतो. एकाच मातीच्या वसवया गौरी ( लक्ष्मी ), घागरी, डेरे, राजण, गाडगी अशा वस्तू तयार होत असल्या तरी पूज्यस्थानाचे महत्त्व गौरीसच असते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, यासाठी मानाच्या जागेकरिता कुणी रुसू नये. आपापल्या योग्यतेच्या स्थानावरच जो तो शोभून दिसतो. ४

४१९ खेचर खडतर । काळ कांपती असुर ।
नांदे भीमातीर । पंढरपुरपाटणीं ॥ १ ॥
आतां करी कां रे हुंकारा । सहस्र नामें एकसरा ।
दवडिते खेचरा । अंगसंगें धरूनी ॥ २ ॥
सीते जाली झडपणी । राहाणें वासुगीच्या वनीं ।
पावली जननी । झोटि मोकळिया केशी ॥ ३ ॥
लाविलें कावरें । प्रल्हादा ह्मैसासुरें ।
आली येकसरें । दांत खात रंगासी ॥ ४ ॥
वसुदेवाचीं बाळें । सात खादलीं ज्या काळें ।
आली भोगवेळें । तया कारणें तेथें ॥ ५ ॥
पांडवें बापुडीं । वाज केलीं फिरती वेडीं ।
धावोनियां काढी । अंगसंगें त्राहाविलीं ॥ ६ ॥
नामाचें चिंतन । तेथें धांवते आपण ।
न विचारितां हीण । भाव देखे जयाचा ॥ ७ ॥
कुळीची कुळदेवता । तुका म्हणे आम्हां माता
काय भय भूतां । काळ यमदूताचें ॥ ८ ॥

शब्दार्थ व टीपा :– खेचर–आकाशात संचार करणारी भूतसृष्टी, पाटणीं–शहरात, झडपणी–बाधा, वासुगीच्या–अशोकाच्या, झोटि–लांब केस, कावरें–त्रास, जाच, म्हैसासुरें–हिरण्यकशिपु या नावाच्या महिषासुराने, वाज–नस्त, त्राहविली–रक्षण केली, हीण–कमीपणा

[1] टोले साहाती.

अर्थ – ही आमची प्रमुख देवी पंढरपूर शहरात भीमेच्या काठावर नांदत असल्याने खेचरादी इतर दुष्ट दैवते हिच्यापुढे थरथर कापत असतात १ आता या देवीच्या नावाने हजार नावांनी एकदम हाक मारा मग ती तुमचा अंगसंग करून या इतर क्षुद्र दैवतांना दूर करेल २ इतर दैवतांची अशीच बाधा सीतामाईस झालेली असल्यामुळे तिला अशोकवनात बंदिस्त व्हावे लागले पण या वेळीही जगन्माता केस मोकळे सोडून तिच्या साह्याव धावली व तिला हिनेच मुक्त केले त्या हिरण्यकशिपू नावाच्या महिपासुराने थोर भक्त प्रल्हादाला त्रास देण्यास सुरुवात केली मग हीच माता एकदम दात ओठ खात नृसिंहाच्या रूपाने आली व या दैत्याच्या तिने नाश केला ४ ज्या कंसाने वसुदेवाची सात मुले निर्दयपणे मारिली होती त्याचा नाश करण्यासाठी हीच कृष्णरूपाने वसुदेवाचे दुःख दूर करण्यास सिद्ध झाली ५ सर्व सामर्थ्यांनी सिद्ध असलेले पांडववीर या क्षुद्र दैवतांच्या कोपांनी त्रस्त झाले व वनवासात भटकू लागले, पण या श्रेष्ठ देवीनेच त्यांचे रक्षण करून अंगसंग देऊन त्यांची लाज राखली ६ जेथे जेथे हिच्या नामाचे चिंतन सुरु असते तेथे तेथे ही जाऊन मदत करते रक्षण करते अशा वेळी ही देवी कुणाचा कमीपणा न पाहता फक्त भावभक्तीकडे लक्ष देते ७ तुकाराम महाराज म्हणतात, ही कुळीची देवता आम्हास मातेप्रमाणे आहे ही एकदा प्रसन्न झाल्यावर मग प्रत्यक्ष यमाचे किंवा यमदूताचे भय कसले ? ८

४२० देवी देव जाला भोग सरला[1] यावरी ।
साँगाया दुसरी ऐसी[2] नाही उरली ॥ १ ॥
हरिनाम देवनाम तुम्ही गाऊनिया जागा ।
पेंठवणी मागा नका ठेवू लिगाड ॥ २ ॥
शेवटीं सुताळी बरवी वाजवावी डाक ।
ताळा घाली एक सरलियाचे शेवटीं ॥ ३ ॥
गुडाळा देव्हारा मान देती मानकरी ।
तुका म्हणे बरी आजि कोडीं उगविलीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – पेंठवणी–विदागी पाठवणी, लिगाड–कटकट लचाड सुताळी–चांगल्या तालावर

अर्थ –देव झाला देवी झाली सर्व प्रारब्ध कर्मानुसार भोगावयाचे भोगही संपले आता काही दुसरे करायचे आहे असे सांगायलाही काही उरले नाही १ आता तुम्ही या देवाचे हरीचे नाव घेऊन जागे राहा व त्यासाठी आपली नेहमीची कृपेची बिदागी मागा, उगाच मागे कटकट ठेवू नका २ आता या शेवटच्या प्रसंगास चांगल्या तालावर, सुरावर डाक वाजवा, व सरतेशेवटी संपल्यावर एक तालाने शेवटचा मेळ साधा ३ आता सर्व मानकऱ्यांचे मान देऊन झाले आहेत हा देव्हारा आता गुंडाळून ठेवा तुकाराम महाराज म्हणतात, कारण आता सर्व संकटांचा परिहार झालेला आहे सर्व रहस्ये उलगडली गेली आहेत ४

४२१ जाली झडपणी खडतर देवता । संचरली आता[3] निघो नये ॥ १ ॥
मज उपचार झणी आता करा । न साहे दुसरा भार काहीं ॥ २ ॥
नेऊनिया घाला चंद्रभागे तिरीं । जीवा नाहीं उरी काही आता ॥ ३ ॥
तुका म्हणे कळो आले वर्तमान । माझें तो वचन आच्छादले ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – झडपणी–बाधा

अर्थ –अरे मला कसली तरी बाधा झालली आहे कसल्या तरी खडतर देवतेने झपाटले आहे आता ती जी अंगात शिरली आहे ती काही बाहेर निघत नाही १ आता मला लोकर काही तरी उपचार करा आता मला काही हा

१ सरले २ उरी ३ चिंता रिघो नये

भार सहन होत नाही २ मला असे करा ना. चंद्रभागेच्या तीरावर एक देव आहे. त्याच्या पायांवर घाला ना मला. आता माझ्या जीवात काही उरलेले नाही, म्हणून ही विनवणी करीत आहे. ३ तुम्हांस मी हे वर्तमान कळवीत आहे तोवर तुकाराम महाराज म्हणतात, ती माझी वाणीही बंद होण्याची वेळ आली.

४२२ अंगीं देवी खेळे । कां रे तुम्हासी न कळे ।
कोणाचे हे चाळे सुख दुःख न मनितां ॥ १ ॥
मीं तों आतां येथें नाहीं । ओळखी वचनाच्या ठायीं ।
पालटाचा घेईं । भाव खरें लोपे ना ॥ २ ॥
आपुलाले तुम्ही पुसा । सोवा एव्याच सरिसा ।
स्थिरावल्या कैसा काय जाणों विचार ॥ ३ ॥
तुका म्हणे लाभकाळ । तेथें नसावें शीतळ ।
मग तैशी वेळ । कोठें जाते सांपडों ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा– सोवा–मनातील गोष्टी, एव्याच–उगाच

अर्थः– माझ्या अंगात देवी संचारली आहे हे तुम्हांस कुणास समजत नाही काय? माझी सर्व सुखदु खे व त्याचे चाळे कुणी संपविले? १ मी तर आता देहभानावर नाही माझ्या या बोलण्यावरूनच काही ओळख पटल्यास पाहावी. माझ्यात जो पालट झाला आहे त्याचा खरा भाव काही लपणारा नाही २ आपल्या मनातल्या गोष्टी तुम्ही उगाच विचारून तर पाहा. त्या कशा स्थिर झाल्या आहेत याचा नीट विचार करा ३ तुकाराम महाराज म्हणतात, हा लाभ होण्याचा काळ असून थंड राहण्याचे येथे कारण नाही अशी संधी आता पुन. कशी व केव्हा येणार? ४

४२३ पांगुळ जालों देवा नाहीं हात ना पाय ।
बैसलों जयावरी सैराट तें जाय ।
खेटितां कुंप कांटी । खुंट दरडी न पाहे ।
आधार[1] नाहीं मज कोणी । बाप ना माये ॥ १ ॥
दाते हो दान करा । जातें पंढरपुरा ।
न्या मज तेथवरी । अखमाचा सोयरा ॥ २ ॥
हिंडलां गव्हानें गा । शिणलों वारोदारीं[2] ।
न मिळेचि दाता कोणी । जन्मदुःखातें[3] वारी ।
कीर्ति हे संतां मुखीं । तोचि दाखवा हरी ।
पांगळां पाय देतो । नांदे पंढरपुरीं ॥ ३ ॥
·या पोटाकारणें गा । जालों पांगीला जना ।
न सरेचि बापमाय । भीक[4] नाहीं खंडणा ।
पुढारा म्हणती एक । तया नाहीं करुणा ।
श्वान हे लागे पाठीं । आशा बहु दारुणा ॥ ४ ॥
काय मी चुकलों गा । मार्ग नेणवे[5] कांहीं ।
न कळेचि पाप पुण्य । तेथें आठव नाहीं ।

---

१ आधार नाही कोणी । मज बाप ना माय ॥ २ येरझारी, ३ जन्मदु ख निवारी, ४ नाही भीक, ५ नेणवेचि.

मी माजी भुललों गा । दीप पतंगासोयी ।
द्या मज जीवदान । संत महानुभाव कांहीं ॥ ५ ॥
दुरोनि आलों मी गा । दुःख जालें दारुण ।
यावया येथवरी । होतें हेंचि कारण ।
दुर्लभ भेटी तुम्हां । पायीं जालें दरुषन ।
विनवितो तुका संतां । दोन्ही कर जोडून ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा :– सैराट–भलतीकडेच, कुंप–कुपण, खुंट–झाड, दरडी–नदीचे उंच तीर, असमाचा–पांगु-ळाचा, गव्हान–पांगळ्याच्या हातातील काठी, पागोला–अकीत.

अर्थः– देवा, मी पांगळा झालो आहे. मला हातपाय नाहीत व ज्यावर मी बसलो आहे ते भलतीकडेच कुठेही बेदरकारपणे जाते ते फाट्यास, कुंपणास, झाडास, नदीच्या उंच तीरास न पाहता वाटेल तसे धावते. देवा, मला कुणाचाच आधार नाही. ना आईचा, ना बापाचा १ अहो दाते लोकहो, मला दान करा ना. मी पंढरपुरास निघालो आहे. मला तेथवर न्याना तुम्ही. तुम्हीच संतजन आमच्यासारख्या पांगळ्यांचे सोयरे आहात २ या काठीच्या साहृयाने मी सर्वत्र हिंडून हिंडून शिणून गेलो आहे. माझे दुःख निवारण करणारा दाता अजून मला कुणीच भेटला नाही. संतांच्या मुखातून अशी कीर्ती ऐकिली आहे की तो पंढरपूराचा श्रीहरी पांगळ्या माणसास पाय देतो. तो मला दाखवा ना. ३ मी या पोटाच्या निमित्ताने लोकांच्या अंकित झालो आहे; त्यामुळे प्रत्येक आईबापास हे माझे म्हणणे असतेच, ते कधी सरतच नाही. भीक मागणेही संपत नाही. काही लोक मला दारात पाहताच पुढे जा म्हणतात. त्याना काही दया मायाच नाही; पण महादारुण अशी ही आशा कुत्र्याप्रमाणे माझ्या पाठीमागे लागली आहे. ४ मी पूर्वी काय व कसे चुकलो कुणास माहीत, मला पापपुण्यही कळेनासे झाले आहे. दिव्यावर पतंग झेप घालतो त्याप्रमाणे मी माझ्याच वृत्तीवर राहिलो. संतमहानुभाव लोकहो, मला जीवदान द्या. ५ मी फार दूरच्या गावाहून आलो आहे. मला फार मोठे दुःख झाले आहे याच दुःखाच्या पोटी मी येथवर आलो आहे. तुमची भेट दुर्लभ असली तरी आज तुमच्या पायाचे मला दर्शन झाल्यामुळे तुकाराम महाराज म्हणतात, आज तुम्हां संताना दोन्ही हात जोडून नमस्कार असोत. ६

४२४ देश वेष नव्हे माझा । सहज फिरत आलों ।
करूं सत्ता कवणावरी । कोठें स्थिर राहिलों ।
पाय डोळे म्हणतां माझे । तींहीं कैसा मोकलिलों ।
परदेशीं नाहीं कोणी । अंध पांगुळ जालों ॥ १ ॥
आतां माझी करीं चिंता । दान देईं भगवंता ।
पाठीं पोटीं नाहीं कोणी । निरवीं सज्जन संता ॥ २ ॥
चालतां वाट पुढें । भय वाटतें चित्तीं ।
बहुत जन गेलीं । नाहीं आलीं मागुतीं ।
न देखें काय जालें । कान तरी ऐकती ।
बैसलों संधिमार्गी । तुज धरूनि चित्तीं ॥ ३ ॥
भाकितों करुणा गा । जैसा सांडिला ठाव ।
न भरें पोट कधीं । नाहीं निश्चळ पाव ।
हिंडतां भागलों गा । लक्ष चौऱ्यासीं गांव ।
धरूनि राहिलों गा । हाचि वसता ठाव ॥ ४ ॥

भरवसा काय आतां । कोण आणि अवचिता ।
तैसीच जाली कीर्ति । तया मज बहुतां ।
म्हणउनि मारीं हाका । सोयी पावे पुण्यवंता ।
लागली भूक थोरी । तूंचि कृपाळु दाता ॥ ५ ॥
संचित सांडवलें । कांहीं होतें जवळीं ।
वित्त गोत पुत माया । तुटली हे लागावळी ।
निष्काम जालों देवा । होतें माझे कपाळीं ।
तुका म्हणे तूंचि आतां । माझा सर्वस्वें बळी ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा:– सधीमार्गी–ससार व तू यात, ठाव–मूळ ठिकाण, वित्त–सपत्ती, गोत–नातेवाईक, पुत–पुत्र, लागावळी–मायेचा सबध.

अर्थः– हा काही माझा देश या येथ नसूनही मी या ठिकाणी फिरत फिरत आलो आहे. मी आता कुणावर सत्ता करावी ? मी स्थिर कुठे राहिलो आहे ? माझ्या पायानी व डोळयानी तर मला सोडूनच दिले आहे असा मी आधळा, पागळा या परदेशी असून मला कुणीही प्रेमाचे नाही. १ देवा, आता माझी चिंता तूच करावीस तुझ्या कृपेचे दान द्यावेस. मागेपुढे राहून कुणी सांभाळणारे मला नाही; म्हणून तू मला आता या साधुसतांच्या हाती सोपीव २ वाट चालत असताना मला फार भय वाटले. कारण या वाटेने पुष्कळ लोक गेले; पण ते काही परत आले नाहीत. त्यांची काय गती झाली ती काही कानावर आली नाही. काही दिसलेही नाही. त्यामुळे ससार व तू याच्यात चित्त ठेवून, मनात तुला वागवून मी बसलो आहे. ३ देवा, तुझ्या ठायीचे मूळ ठिकाण सोडल्यापासून मी तुझी करुणा भाकीत आहे. कोणत्याही एकाच गावी मी निश्चल होऊन राहिलो नाही. खूप हिंडता हिंडता थकून गेलो. चौऱ्याऐंशी लक्ष गावे हिंडून हिंडून मी फार थकलो आहे देवा, आता तुझ्याकडे पाहात याच जागेवर स्थिर होण्याच्या प्रयत्नात आहे. ४ कुणीतरी अवचित मजसाठी काही घेऊन येईल असा भरवसा मला नाही. कारण माझ्या पूर्वीच्या लोकात तशीच कीर्ती झालेली आहे. म्हणून तर देवा, तुला मी हाका मारीत आहे पुण्यवता, माझ्यावर कृपा कर. मला फार भूक लागली आहे रे, आणि तुझ्याशिवाय कृपाळू व उदार दाता असा कुणी नाही ५ माझ्याजवळ जे काही थोडे पूर्वकर्माचे सचित होते ते सर्व खर्च झाले. सपत्ती, नातेवाईक, पुत्र यांच्या मायेचा सबधही सपून गेला देवा, मी आता खरोखरीच निष्काम बनलो आहे. हेच माझ्या कपाळी होते तुकाराम महाराज म्हणतात, आता तूच माझा सर्वस्वी हित करणारा प्रभू आहेस. ६

विवरण :–वरील दोन अभग पागळयाचे म्हणून तुकारामबुवानी लिहिले आहेत धडधाकट, श्रीमत, कलाचतुर, श्रेष्ठ वर्णाची, देखणी माणसे कुणालाही प्रिय होतील पण आंधळे, लुळे, पागळे याचा कणव कुणाला येणार ? पाय नसल्यामुळे, डोळे नसल्यामुळे अधिकच दयनीय अवस्था झाल्यावर एका पाडुरगाखेरीज दुसरा कोणी त्राता नाही अशीच या पागळयाची खात्री झालेली दिसते अशा पागळयाला कुणी सांभाळणारा नसतो, कुणी जवळ करणारा नसतो, भारी दुःखे याला भोगावी लागतात, सर्वांनी त्याची उपेक्षा केलेली असते तेव्हा सताच्या सहवासात, साधूच्या सगतीत त्याच्या जीवास तेवढेच सुख होते ईश्वराकडे चित्त लागल्यामुळे तेवढीच दुःखाची जाणीव कमी होते या पागळयाआंधळयाची जीवितातील करुणा भक्तीस मोठी पोषक झाली. देवासही अशा माणसाचा फार लोभ कारण याना सांभाळणारा हाच एक पाडुरग असल्याची जाणीव त्यालाही आहे या पुढचेही आंधळयावरील रूपकात्मक अभग याच भूमिकेवरचे आहेत

४२५ देखत होतो आधीं मागें पुढें सकळ । मग हे दृष्टी गेली वरी आले पडळ ।
तिमिर कोंदलेसें वाढे वाढतां प्रबळ । भीत मी जालों देवा । काय ज्यालयाचें फळ ॥१॥

आता मज दृष्टी देईं । पांडुरंगा मायबापा ।
शरण आलों आतां । निवारूनिया पापा ।
अंजन लेववुनी । करीं मारग सोपा ।
जाईन सिद्धपथें । अवघ्या चुकती खेपा ॥ २ ॥
होतसे खेद चित्ता । काहीं नाठवे विचार ।
जात होतो जना मागें । तोही सांडिला आधार ।
हा ना तोसा ठाव जाला । अवघा पडिला अंधार ।
फिरलीं माझीं मज । कोणी न देती आधार ॥ ३ ॥
जोवरि चळण गा । तोवरि म्हणती माझा ।
मानिती लहान थोर । देहसुखाच्या काजा ।
इंद्रियें मावळलीं । आला बागुल आजा ।
कैसा विपरीत जाला । तोचि देह नव्हे दुजा ॥ ४ ॥
गुंतलो या संसारे । कैसा झालोसें अंध ।
मी माझें वाढवुनी । मायातृष्णेचा बाध ।
स्वहित न दिसेचि । केला आपुला वध ।
लागले काळ पाठीं । सवें काम हे क्रोध ॥ ५ ॥
लागती चालता गा । गुणदोषाच्या ठेंसा ।
सांडिली वाट मग । जालो निराळा कैसा ।
पाहातो वास तुझी । थोरी करूनी आशा ।
तुका म्हणे वैद्यराजा । पंढरीच्या निवासा ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – पडळ–पडदा, चळण–चलती, सिद्धपथें–तयार मार्गाने, साधुसंताच्या मार्गाने

अर्थ – देवा, यापूर्वी मी सर्व काही पाहात होतो. मागेपुढे पाहून सर्वत्र तू भरून राहिला आहेस हे दिसत होते पुढे माझी दृष्टी गेली माझ्या डोळ्यावर पडदा येऊन अंधाराने सारे भरून आले. सर्वत्र अंधार दाटला पुढे तो अधिकच वाढला मी मग भयभीत झालो मी हा असा आंधळा झाल्यामुळे जन्मास येऊन काय उपयोग देवा ? १ पांडुरंगा, मायबापा, आता मला दृष्टी दे ना मी तुला मनोभावे शरण आलो आहे माझी काही पापे असतील ती दूर कर माझ्या डोळ्यात चांगली दृष्टी येईल असे अंजन घालून पुढचा मार्ग चांगला सोपा असा दाखव मग मी त्या सिद्ध झालेल्या मार्गाने जाईन व जन्ममरणाच्या फेऱ्या चुकवीन २ देवा, माझ्या चित्तास फार खेद होत आहे रे कोणताही विचार सुचत नाही मी लोकांच्या मागे मागे जात होतो, तोही आधार माझा संपला मी आंधळा झाल्यामुळे त्यांनीही माझा संग सोडून दिला सर्वत्रच अंधार झाला माझी माझी म्हणून जी माणसे होती तीही फिरली, त्यांनीही मला सोडून दिले आता मला कुणीच आधार देत नाही ३ जोपर्यंत माझी सर्व इंद्रिये चलनवलन करीत होती, जोवर चलती होती, तोवर सर्व आप्तवर्ग मला आपला म्हणत होता लहानथोर लोक मला मान देत होते देहसुखासाठी लोक मला जवळ करीत होते पण आता माझ्या इंद्रियांचे सामर्थ्य संपले तेव्हा तीच माणसे मला पाहून 'हा पाहा आजोबा बागुल बुवा आला' असे म्हणू लागली आहेत असे विपरीत घडत आहे माझा देह पहिलाच आहे दुसरा नवीन नाही पण लोकांची दृष्टी फिरली ना ४ या लौकिक संसारात गुंतल्यामुळे मी हा असा आंधळा झाली मायेची व नाना तृष्णांची बाधा मला झाल्यामुळे स्वहित नेमके कशात आहे हे मला समजेनासे झाले असा मीच आपला वध करून घेतला आहे. माझ्या पाठीमागे हे काम क्रोधाचे काळ लागले आहेत ५ मी आंधळा

झालो असल्याने रस्त्याने चालताना मला गुणदोषाच्या अनेक ठेचा लागतात. म्हणून मी तो रस्ता सोडला व या रानात येऊन पडलो. आता या निराळ्याच मार्गावर राहून देवा, तुझी वाट पाहत आहे. मला तू कृपा करशील अशी फार मोठी आशा आहे. तुकाराम महाराज म्हणतात, देवा, विठ्ठला, पंढरपूर येथे राहणाऱ्या पांडुरंगा, तूच खरा वैद्यराज आहेस, तूच माझे दुखणे बरे कर. ६

४२६ सहज मी आंधळा गा निजनिराकार पंथें ।
वृत्ति हे निवृत्ति जाली जन न दिसे तेथें ।
मी माजी हारपलें ठायीं जेथींचा तेथें ।
अदृश्य तेंचि जालें कांहीं दृश्य जें होतें ॥ १ ॥
सुखी मी निजलों गा शून्य सारूनि तेथें ।
त्रिकूटशिखरीं गा दान मिळे आइतें ॥ २ ॥
टाकिली पात्र झोळी धर्मअधर्म आशा ।
कोल्हाळ चुकविला त्रिगुणाचा वोळसा ।
न मागे मी भीक आतां हाचि जाला भरवसा ।
वोळली सत्रावी गा तिणें पुरविली इच्छा ॥ ३ ॥
उर्ध्वमुखें आळविला सोहं शब्दाचा नाद ।
अरूप जागविला दाता घेऊनि छंद ।
घेऊनि आला दान निजतत्त्व निजबोध ।
स्वरूपीं मेळविलें नांव ठेविला भेद ॥ ४ ॥
शब्द हा बहुसार उपकाराची राशी ।
म्हणोनि चालविला मार्ग येतील त्यांसीं ।
मागोनि आली वाट सिद्धओळीचि तैसी ।
तरले तरले गा आणीक ही विश्वासी ॥ ५ ॥
वर्म ते एक आहे दृढ धरावा भाव ।
जाणिवनागवण नेदी लागो ठाव ।
म्हणोनि संग टाकी सेवीं अद्वैत भाव ।
तुका म्हणे हाचि संतीं मार्ग केला उपाव ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा :–त्रिकूटशिखरीं–त्रिपुटीच्या शिखरावर, त्रिपुटी–ज्ञाता, ज्ञान, ज्ञेय, अथवा कर्म, कर्ता, क्रिया इत्यादी तिघांचा समुदाय कोल्हाळ–कटकट, वोळसा–त्रास, वोळली–प्रसन्न झाली, सत्रावी–जीवनकला, ज्ञानकला, अमृतवाहिनी ज्ञानशक्ती, उपाव–उपाय.

अर्थ :– देवा, मी तर सहजच आंधळा आहे. निजस्वरूपाच्या, निराकाराच्या ठिकाणी मला दृष्टी नाही. बाह्य रूप पाहणे संपल्यामुळे माझी वृत्तीच निवृत्ती झाली. मला हे बाह्य जग दिसेनासे झाले. मी व माझे शरीर या माझ्या वृत्ती हा भाव पण संपला. जे होते ते आपल्याच ठायी अदृश्य झाले १ सर्व शून्याचा त्याग करून, त्रिपुटीच्या शिखरावर जाऊन मी सुखाने झोप घेतली तेथे मला आयतेच दान मिळाले २ धर्म व अधर्म अशा वृत्तींची झोळी मी फेकून दिली. पात्रही टाकून दिले. सर्व प्रकारची कटकट चुकविली सत्त्व, रज, तम या त्रिगुणांचा त्रास वाचविला. आता भीक मागण्याचेही कारण उरले नाही कारण सत्रावीची जीवनकला आता प्रसन्न झाली असल्याने तिने माझी इच्छा पूर्ण केली. तिचाच मोठा भरंवसा मला वाटतो ३ वर मुख करून सोहम् शब्दाने त्याची आळवणी केली; त्या

रूपविहीनाची स्तुती केली मग त्या छंदाने तो दाता जागा झाला व त्याने मला हे दान दिले त्याने मला निज बोधाचे, निजतत्त्वाचे ज्ञान दिले आपल्या स्वरूपात मिळवून घेतले ईश्वर व भक्त हा भेद केवळ तात्पुरता ठेवला ४ सर्वांत शब्द हे एकच सार आहे तोच एक परोपकाराची रास आहे म्हणूनच माझ्या मागून येणाऱ्यासाठी हा मार्गच दान दिलेला आहे खरे म्हणजे ही वाट पूर्वीपासूनच चालत आलेली आहे अनेक सिद्ध लोक या मार्गाने गेले व भव सागर तरले त्यामुळे इतरानाही या वाटेसबंधी विश्वास निर्माण झाला आहे ५ या वाटेवरचे धर्म एकच आहे आणि ते म्हणजे ईश्वरावर दृढ विश्वास ठेवावा त्याखेरीज जाणतेपणीही नागवण होण्याचा संभव आहे मग देवाचा ठावठिकाणाही सापडेनासा होतो म्हणून हा बाह्य संग सोडून त्या प्रभूशी एकत्वाचा भाव तेवढा कायम करावा तुकाराम महाराज म्हणतात, मागील संतानी हाच उपाय केलेला होता ६

४२७ आंधळ्यापांगळ्याचा एक विठोबा दाता ।
प्रसवला विश्व तोचि सर्व होय जाणता ।
घडी मोडी हेळामात्रें पापपुण्यसंचिता ।
भवदु:ख कोण वारी तुजवांचुनि चिंता ॥ १ ॥
धर्म गा जागो तुझा तूचि कृपाळू राजा ।
जाणसी जीवींचें गा न सांगता सहजा ॥ २ ॥
घातली लोळणी गा पुंडलिकें वाळवंटीं ।
पंढरी पुण्य ठाव नीरे भीवरे तटीं ।
न देखें दुसरें गा । जाली अदृश्यदृष्टी ।
बोळला प्रेमदाता केली अमृतवृष्टी ॥ ३ ॥
आणीक उपमन्यु एक बाळ धाकुटें ।
न देखे न चलवे जना चालतें वाटे ।
घातली लोळणी गा हरिनाम बोभाटें ।
पावला त्याकारणें धाव घातली नेटें ॥ ४ ॥
बैसोनि खोळीं शुक राहे गर्भ आंधळा ।
शीणला येरझारी दु:ख आठवी वेळा ।
मागील सोसिलें तें ना भीं म्हणे गोपाळा ।
पावला त्याकारणें । लाज राखिली कळा ॥ ५ ॥
न देखे जो या जना तया दावी आपणा ।
वेगळा सुखदु:खा मोहो साडवी[1] धना ।
आपपर तेही नाहीं बंधुवर्ग सज्जना ।
तुकया तेचि परी जाली पावे नारायणा ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा — हेळामात्रें–एक क्षणात, बोळला–प्रसन्न झाला उपमन्यू–व्याघ्रपादचा मुलगा खोळीं–आईच्या पोटात, शुक–शुकाचार्य

अर्थ — या आंधळ्याना, पांगळ्याना दान देऊन संतुष्ट करणारा फक्त विठोबाच आहे सर्व विश्व त्याच्या पासूनच निर्माण झाले असल्यामुळे तो मोठा सर्व काही जाणणारा आहे एक क्षणात तो या विश्वाची घडामोड करतो पापपुण्य, संचित कर्म, भवदु:ख यांचे निवारण त्याच्यावाचून दुसरे कुणीही करीत नाही देवा, तुझ्यावाचून माझी

[1] नाठवी

चिंता कोण दूर करील? कोण माझे दुःख कमी करील? १ देवा, तू कृपाळू राजा आहेस. कृपा करण्याचा धर्म तुझा तूच राख. आमच्यासारख्या जीवाच्या मनात काय आहे हे नेमके तूच जाणतोस तुला न सांगता आमचे दुःख समजते. २ त्या पुंडलीकाने या वाळवंटात लोळण घातली. असे हे पंढरपूर निरेभिवरेच्या तीरावर मोठ्या पुण्याचे स्थान निर्माण झाले आहे. त्या पुंडलीकास दुसरे काहीच दिसत नव्हते त्याची दृष्टी दुसरे पाहावयास तयार नव्हती. मग हा प्रेमदाता पांडुरंग त्याच्यावर प्रसन्न झाला त्याने त्यांच्यावर कृपामृताचा वर्षाव केला. ३ एक उपमन्यू नावाचे लहान मूल होते. त्याला लोकांच्याबरोबर नीट चालवत नसे त्याला त्यामुळे नीट जग दिसतही नसे. मग त्याने हरिनामास सुरुवात केली. हरिनामाचा गजर झाल्यावर मात्र हा देव सावध झाला व त्याने धावत जाऊन त्याचे तत्परतेने रक्षण केले. ४ जग न पाहावे म्हणून शुकाचार्य आईच्याच गर्भामध्ये आंधळा होऊन राहिला होता. कारण त्याला जन्ममृत्यूच्या खेपांनी फार दुःख झालेले होते त्याने यापूर्वी फारच सोसले होते. याच्यासाठीं देवाने धावत जाऊन भिऊ नकोस, भिऊ नकोस असे म्हटले व त्याचे रक्षण करून लाज राखली. ५ जो सुखदुःखापासून वेगळा आहे, ज्याला धनाचा मोह नाही, ज्याला आपपर भाव नाही, जो भोवतीच्या आप्त स्वकीयात रमत नाही अशा लोकानाच देव दर्शन देतो, स्वतःचे मानतो. तुकाराम महाराज म्हणतात, माझ्यातही तोच भाव निर्माण झाल्यामुळे नारायणा, माझ्यावर कृपा करा. ६

विवरण :- दुःखाचे आघात झाल्यावर कष्टी झालेल्यांना देव कशी मदत करतो, एकचित्ताने ईश्वरावर विश्वास ठेवणाराना तो कशी मदत करतो हे सांगण्यासाठी तुकारामबुवानी येथे उपमन्यू व शुकाचार्य यांची उदाहरणे दिली आहेत पैकी उपमन्यू हा धौम्य ऋषींचा शिष्य होय हा आंधळा झाला होता याची निर्वाहाची सर्व साधने बंद झाल्यामुळे याने रुईची पाने भक्षण केली. त्यामुळे याची दृष्टी जाऊन याम अंधत्व आले. तो एकदा चालताना विहिरीत पडला. पुढे याने गुरूच्या सांगण्यावरून अश्विनीकुमाराची प्रार्थना करून स्वतःस दृष्टी प्राप्त करून घेतली. हा दरिद्री असल्यामुळे इतरत्र गोड दुधाची चव त्याने पाहिली होती, पण याला घरी दूध मिळत नव्हते. आईने पाण्यात पीठ कालवून त्याला दिले. मग दूध मिळविण्यासाठी याने शंकराची प्रार्थना करून अवघा क्षीरसमुद्रच मिळविला. ईश्वराने असे याचे अंधत्व दूर केले याची दुधाची इच्छा तृप्त केली.

४२८ भगवंता तुजकारणें मेलों जीताचि कैसी ।
निष्काम बुद्धी ठेली चळण नाहीं तयासी ।
न चलती हात पाय दृष्टि फिरली कैसी ।
जाणतां न देखों गा क्षर आणि अक्षरासी ॥ १ ॥
विठोबा दान दे गा तुझ्या सारिखें नामा ।
कीर्ति हे वाखाणिली थोर वाढली सीमा ॥ २ ॥
भुक्ति मुक्ति तूंचि एक होसि सिद्धीचा दाता ।
म्हणोनि सांडवली शोक भय लज्जा चिंता ।
सर्वस्वें त्याग केला धांव घातली आतां ।
कृपादान देईं देवा येउनि सामोरा आतां ॥ ३ ॥
संसारसागरु गा भवदुःखाचें मूळ ।
जनवाद अंथरुण माजी केलें इंगळ ।
इंद्रियें वज्रघातें तपे उष्ण वरी जाळ ।
सोसिलें काय करूं दुर्भर हे चांडाळ ॥ ४ ॥
तिहीं लोकीं तुझें नाम वृक्ष पल्लव शाखा ।
घेंघलों वरि खोडा भाव धरूनि टेंका ।

जाणवी नरनारी जागो धरम लोकां ।
पावती पुण्यवंत सोई आमुचिये हाका ॥ ५ ॥
नाठवे आपपर आतां काय वा करूं ।
सारिखा सोइसवा[1] हारपला विचार ।
घातला योगक्षेम तुज आपुला भार ।
तुकया शरणागता देईं अभयकर ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा :– क्षर–नाशवत, अक्षर–अविनाशी, इगळ–अग्नी, दुर्भर–भरण्यास कठिण वेंघलों–चढलो टेंका–आधार

अर्थ :– ईश्वरा, तुझी प्राप्ती जर होणार नसेल तर आम्ही जिवंत कसले आहोत ? मेल्यासारखेच समजावे आम्हास. आमची बुद्धी निष्काम व्हावयास हवी तिचे चलनवलन थाबले पाहिजे हातापायांचेही व्यापार थांबायला हवेत. आमची दृष्टीही आंधळी झाली आहे फिरली आहे. तू क्षर-नाशवत व अक्षरही-अविनाशी आहेस हेही आमच्या ध्यानात येत नाहीसे झाले आहे. १ विठ्ठला, तुझ्या कृपेचे दान मला दे ना देवा, तुझी कीर्ती व तुझे नाम याची कीर्ती अमर्यादपणे वाढली आहे २ या लोकीचे भोग व परलोकीची मुक्ती सर्व काही तूच आहेस सर्व सिद्धींचा दाता ही आहेस म्हणूनच आमची भीती, लज्जा शोकादी वृत्ती दूर झालेली आहे. आम्ही सर्वस्वाचा त्याग करून तुझ्याकडेच धाव घेतली आहे आता देवा, तू कृपेचे दान द्यावेस. तू आता माझ्या दृष्टीसमोर असावेस. ३ हा संसारसागर हेच दु:खाचे मूळ आहे. लौकिक अर्थाचे शब्द हे अग्नीच्या निखाऱ्याप्रमाणे आहेत इंद्रियांचे आघात हे वज्रासारखे अमूर्त उष्ण ज्वालांचा एकसारखा भडका त्यामुळे उठत आहे. देवा, हे सर्व मी सोसले आहे. न सोसून काय करू ? हे सर्व विकार दुष्ट, चांडाळ, व भरण्यास कठीण असे आहेत ४ तुझे नाम मात्र तीनही लोकांत वृक्षाच्या फांद्याप्रमाणे पानाप्रमाणे वाढत राहिले आहे याच संसाररूपी झाडाच्या मूळ खोडावर मी चढलो. भावभक्तीचा मला आधार मिळाला. तेथून मी लोकांसाठी हा तुझा धर्म सांगत आहे. पुण्यवंत असतील ते आमच्या उपदेशाप्रमाणे वागतील ५ मला आपले व दुसऱ्याचे असा भेद करता येत नाही. त्याला मी काय करावे ? मला सर्व सारखेच दिसते. संसार-परमार्थ याचा विचारही संपला मी माझ्या योगक्षेमाचे ओझे देवा तुझ्यावर सोपविले आहे. हा तुकाराम तुला शरण आहे. त्याला अभय दे. ६

४२९ मनुराजा एक देहपुरी । असे नांदतु त्यासि दोघी नारी ।
पुत्र पौत्र संपन्न भारी । तेणें कृपा केली आम्हांवरी गा ॥ १ ॥
म्हणउनि आलों या देशा । होतों नाहीं तरी भुललों दिशा ।
दाता तो मज भेटला इच्छा । येउनि मारग दाविला सरिसा गा ॥ २ ॥
सवे घेउनि चौघेजण । आला कुमर सुलक्षण ।
कडे चुकवुनि कांटवण । ऐका आणिलीं तीं कोण कोण गा ॥ ३ ॥
पुढें भक्तीनें धरिलें हातीं । मागें ज्ञान वैराग्य धर्म येती ।
स्थिर केलीं जीं आचपळें होतीं । सिद्ध आणुनि लाविलीं पंथीं गा ॥ ४ ॥
केले उपकार सांगों काय । बाप न करी ऐसी माय ।
धर्में त्याच्या देखियेले पाय । दिले अक्षय भय वारुनि दान गा ॥ ५ ॥
होतो पीडत हिंडता गांव । पोट भरेना राहावया ठाव ।
तो येणें अवघा संदेह । म्हणे फेडियेला तुकयाचा बंधव गा ॥ ६ ॥

---

१ आमुचिया.

शब्दार्थ व टीपा – मनु–मन, देहपुरी–देहरूपी शहरात, आचपळें–अति चपळ

अर्थ – देहरूपी एका गावात मन नावाचा राजा राज्य करीत आहे प्रवृत्ती व निवृत्ती या त्याला दोन नायका असून तो पुत्रपौत्रादिकानी अतिशय संपन्न असा आहे त्याने आमच्यावर फार मोठी कृपा केली हो १ म्हणून तर आम्ही या देशात येऊन पोचलो नाही तर दिशा चुकून भलतीकडेच मी गेलो असतो येथे आल्यावर इच्छेप्रमाणे दान देणारा दाता भेटला त्याने आम्हाला फार चांगला मार्ग दाखविला २ मनोरूपी राजा आपले चार सुलक्षणी कुमार घेऊन आमच्याबरोबर आला कडे व काटे चुकवून त्यानेच आम्हास आणले त्याच्याबरोबर कोण कोण मुले होती त्याची नावे ऐका ३ त्याच्यापुढे भक्ती स्वत चालत होती व तिच्याबरोबर ज्ञान, वैराग्य व धर्म हे येत होते जे अति चपळ होते ते स्थिर झाले सिद्धही याच पथात त्यानी आणून लावले ४ त्यानी आमच्यावर जे उपकार केले त्याचे महत्त्व काय सागू ? आईबापसुद्धा असे उपकार करणार नाहीत त्याच्याच धर्मामुळे मला देवाचे हे पाय दिसले व मला अभयदान कायमचे मिळाले ५ पूर्वी अनेक जन्मी अनेक गावी दु खीकष्टी होऊन हिंडत होतो त्यावेळी धड नीट पोट भरले नाही की राहायला नीट जागा कधी मिळाली नाही पण या मनरूपी राजाने सर्व संशय फेडले व हा तुकोबाना बाधवासारखा त्यामुळे वाटतो ६

४३० गातो वासुदेव मीं ऐका । चित्त ठेवुनि ठायीं भावे एका ।
डोळे झाकुनि रात्र करूं नका । काळ करीत बैसला लेखा गा ॥ १ ॥
राम राम स्मरा आधीं । लाहो करा गांठ घाला मूळबदीं ।
सांडावा उगिया उपाधी । लक्ष लावुनि राहा गोविंदीं गा ॥ २ ॥
ऐसा अल्प मानवी देह । शत गणिले अर्ध रात्र खाय ।
पुढें बालत्व पीडा रोग क्षय । काय भजनासि उरले ते पाहे गा ॥ ३ ॥
क्षणभंगुर नाहीं भरवसा । व्हा रे सावध सोडा[1] माया आशा ।
न चले बळ पडेल मग फासा । पुढें हुशार थोर आहे वोळसा गा ॥ ४ ॥
काहीं थोडें बहुत लागपाठ । करा भक्ति भाव धरा बळकट ।
तन मन ध्यान लावुनिया नीट । जर असेल करणे गोड शेवट गा ॥ ५ ॥
विनवितो सकळा जना । कर जोडुनि थोरा लाहना ।
दान इतुले द्या मज दीना । म्हणे तुकयाबंधु राम म्हणा गा ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – लेखा–हिशेब, शत–शभर, लाहो–लाभ, वोळसा–फेरे, लागपाठ–त्वरा

अर्थ – मी वासुदेव गात आहे त्याचा अर्थ नीट लक्ष देऊन ऐका डोळे मिटून व्यर्थ आयुष्य घालवू नका कारण त्याचा काटेकोर हिशेब यम किंवा काळ करीत बसला आहे १ आधी रामराम असे स्मरण करा व त्याचा लाभ करून घेऊन त्याला मूळ स्वरूपात गाठा इतर बाकीच्या ससाराच्या सर्व उपाधी सोडून द्या या एका गोविंदावर सर्व चित्त ठेवून राहा तुम्ही २ या मानवी देहास फार थोडे आयुष्य आहे शभर वर्षे आहे असे मानले तरी त्यातील अर्धे रात्रीच्या झोपेतच जाते मग बालपण, दु ख, रोग, क्षयासारख्या व्याधी यात काही वर्षे जाणारच मग ईश्वराच्या भजनासाठी किती उरले पाहा बरे ३ जे काही हाताशी असलेले आयुष्य आहे तेही क्षणभगुरच यासाठी तुम्ही सर्व सावध होऊन वाह्य आशा किंवा माया सोडून द्या एकदा यमाचा फास गळ्याशी पडला म्हणजे मग मात्र कुणाचे काही चालत नाही पुढे फार मोठ्या फेऱ्याच्या सकटात पडावे लागणार आहे हे ओळखून असा ४ काही थोडी त्वरा करून भक्तीचा भाव नीट बळकट करून ठेवा नीट तन, मन, ध्यान लावून या देवास सर्व अर्पण करून शेवट गोड करण्याचे कार्य साधा ५ सर्व लहानथोराना मी वासुदेव हात जोडून सागत आहे की, एवढेच दान मला द्या तुकयाबधू सुद्धा म्हणत आहेत की, तुम्ही मुखाने नेहमी रामराम म्हणावे ६

[1] तोडा

विवरण :– वरील दोन व पुढील चार अभंगांतून वासुदेवाच्या भूमिकेवरून तुकोबांनी सर्वसामान्य जनतेस रूपकाच्या भाषेत बोध केला आहे. तुकारामांसारख्या अनेक मराठी संतांनी सांस्कृतिक उद्‌बोधनाचे, धर्मप्रसाराचे व रक्षणाचे, जनतेस सन्मार्ग दाखविण्याचे फार मोठे कार्य केले आहे. पारमार्थिक तत्त्वज्ञान, वेदान्तविचार, आध्यात्मिक अनुभूती यांचा त्यांनी स्वतः अनुभव घेतला व तो इतरांसाठी अतिशय सुलभ भाषेत काव्याच्या आधारे शब्दबद्ध केला. रामकृष्णाच्या, कौरवपांडवांच्या कथा सांगून आबालवृद्धांना थोर परंपरेची ओळख त्यांनी वारंवार करून दिली. मराठी संतांचे हे पारमार्थिक विचारधन प्रत्येकाच्या घरी नेऊन पोचते करण्याचे महान कार्य मनोरंजनाच्या द्वारे करणारा एक मोठा वर्ग त्यावेळी समाजात होता. त्यावेळी मुद्रणकलेचा शोध आपल्या देशात आलेला नसल्याने, पुस्तके मुद्रित स्वरूपात नव्हती, शिक्षणाचा प्रसार नव्हता, विद्यालये नव्हती. अशा काळात बहुजनास परमार्थप्रवण करून बहुश्रुत करण्याचे कार्य साधुसंतांनी केलेच, पण त्यांच्या कार्याचा फार मोठा विस्तार मनोरंजनाच्या द्वारे खेड्यापाड्यांतही घरोघरी जाऊन करणारा एक मोठा समिश्र वर्ग होता. हा वर्ग म्हणजे गोंधळी, भुत्ये, वासुदेव, वाघ्या-मुरळी, नंदीबैलवाले इत्यादींचा होय. अजूनही यांच्यापैकी काहीजण रस्त्यांतून दिसतात. आज नाही उद्या या मंडळींचे भवितव्य काय होणार आहे ? कुणास माहीत ? पण आज भिकाऱ्याप्रमाणे वाटणारे लोक एके काळी सांस्कृतिक उद्‌बोधनाचे व प्रसाराचे कार्य फार चांगल्या प्रकारे करीत असत. महाराष्ट्राच्या समाजशिक्षणाचे हे एक प्रधान अंग होते. निरक्षर असणाऱ्या, अज्ञानामध्ये जीवन कंठणाऱ्या, व आपली शेती आणि खेडे सोडून न जाणाऱ्या शेतकरीवर्गास त्यांच्या घरी जाऊन त्यास त्यांच्या दैवदैवताची आठवण करून देणे, रोजची तिथी, रोजचे नक्षत्र, रोजचा सण यांची आठवण करून देणे हे महत्त्वाचे कार्य लोकरंजनाच्या साह्याने गोंधळी, भुत्या, वासुदेव, कानफाटे योगी, वाघ्या मुरळी, बाळसंतोष, सरोदा ( पिंगळा ), कुडमुड्या जोशी, कोल्हाटी, डावरी, फकीर, जागले, भोपी, बहुरूपी, कडकलक्ष्मी, वैंदू इत्यादी अनेक प्रकारांच्या लोकांनी केले आहे. यांच्या परमार्थनिरूपणास विनोदाची, अतिशयोक्तीची, उपरोधाची किनार असल्यामुळे यांची मोबत समाजास उपकारक वाटली.

या काही व पुढल्या तीनचार अभंगांत तुकारामबुवांनी वासुदेवाच्या भूमिकेवरून परमार्थनिरूपण केलेले आहे. वासुदेवाची जमात द्वारकेपासून आली असावी. हे मोठे कृष्णभक्त असून आजही त्यांच्या चिपळ्या, त्यांचा टाळ, त्यांचा पावा सकाळच्या वेळी श्रीकृष्णगीतातून साथ देणाऱ्या या गोष्टी आहेत. श्रीकृष्ण किंवा विठ्ठल यांची उपासना हे लोक करतात. यांचा वेष बालकृष्णाचा असतो. डोक्यावर मयूरपिसांची टोपी असते, पायात घुंगुर असतात, ताडाशी अलगुज असते. जुन्या पद्धतीचा पायघोळ अंगरखा असतो. त्यावर तांबडे अलवण असते. कृष्णभक्तीची गाणी गाऊन हे सकाळच्या प्रहरी लोकांना सुखवीत असत. या वासुदेवावर ज्ञानेश्वरएकनाथादी संतांनीही अभंग रचना केलेली आहे. 'घुळघुळा वाजवी टाळ । झणझणा नाद रसाळ ' या चरणाचा ज्ञानदेवांचा एक नादमधुर अभंग वासुदेवावर आहे. ' वासुदेव स्मरणे तुटती जन्ममरण व्याधी । अहं सोहं कोहं मूळ या सांडी उपाधी ' अशा भाषेत एकनाथांनी वासुदेवाचे माहात्म्य सांगितले आहे.

४३१ गेले टळले पाहार तीन । काय निदसुरा अजून ।
जागे होउनि करा काहीं दान । नका ऐकोनि[1] झाकों लोचन गा ॥ १ ॥
हरी राम कृष्ण वासुदेवा । जाणवितसे जना ।
चिपळ्या टाळ हातीं मुखीं घोष । नारायणा[2] गा ॥ २ ॥
जें टाकेल कोणा काहीं । फळ पुष्प अथवा तोय ।
द्या परी मीस घेऊ नका भाई । पुढें विन्मुख होता बरें नाहीं गा ॥ ३ ॥
देवाकारणें भाव तस्मात । द्यावें न लगे फारसें वित्त ।
जालें एक चित्त तरी बहुत । तेवढ्यासाठीं नका करूं घाताघात गा ॥ ४ ॥

१ ऐको झाकोनि, २ नामनारायणा गा

आलो येथवरी बहु सायासे। करिता दान हेंचि मागावयास।
नका भार घेऊं करूं निरास। धर्म सारफळ संसारास गा॥ ५॥
आता मागुता येईल फेरा। हें तो न घडे या नगरा।
म्हणे तुकयाबंधु धरा। ओळखी नाहीं तरी जाल अघोरा गा॥ ६॥

शब्दार्थ व टीपा – पाहार–प्रहर, निदसुरा–अर्धवट झोपेत असलेल्यास, अज्ञानीस तोय–पाणी भीस–माग

अर्थ – तीन प्रहर टळून गेले पहिला प्रहर गर्भवासाचा, दुसरा बाळपणाचा, तिसरा तरुणपणाचा, अशा तीन प्रहराचा काळ अज्ञानरात्रीचाच संपत आला अजून झोपेत असलेल्यानो जागे व्हा ना म्हातारपणाचा चौथा प्रहर येत आहे सावध व्हा ना जागे होऊन काही दान करा हा सर्व उपदेश ऐकून डोळे मिटून घेऊन झोपेत काळ घालवू नका १ रामकृष्ण हरी म्हणून भजन करा असा उपदेश हा वासुदेव करीत आहे हातात टाळ चिपळ्या, वीणा व मुखात श्रीकृष्णाचा अथवा विठ्ठलाचा किंवा रामकृष्णहरी असा घोष असू द्या २ फळ, फूल, पान जे काय शक्य असेल ते देवास अर्पण करा झोपेचे सोंग घेऊन उगाच झोपू नका बघूनो कारण या देहात जर प्रभूशी विन्मुख व्हाल तर मात्र पुढे कल्याण होणार नाही ३ या ईश्वराला नुसता भाव अर्पण केला तरी चालेल त्याला काही धनदौलत अर्पण करावी लागते असे नाही एकचित्ताने त्याचे स्मरण केले तरी पुष्कळ होते हे न करण्याने तुम्ही आपल्या आयुष्याचा नाश उगाच करू नका ४ मोठे कष्ट घेऊन मी येथे हेच दान तुमच्याजवळ मागायला आलो आहे माझी निराशा करू नका संसाराचा भार उगाच डोक्यावर घेऊ नका धर्म करणे हेच संसाराचे एक फळ आहे ५ आता पुन या देहरूप नगराला यावे न लागेल असे काही तुम्ही करावे तुकयाबंधू तुम्हास सांगत आहे की, असे काही न कराल, या ईश्वराची ओळख करून न घ्याल तर तुम्हाला अघोर नरकास जावे लागेल ६

४३२ राम राम दोनी अक्षरे। सुलभ आणि सोपारे।
जागा मागिले पाहारें। सेवटिचे गोड तेंचि खरे गा॥ १॥
राम कृष्ण वासुदेवा। जाणवी जनासि।
वाजवी चिपळिया। टाळ घागऱ्याघोषें गा॥ २॥
गाय वासुदेव वासुदेवा। भिन्न नाहीं आणिका नावा।
दान जाणोनिया करीं आवा। न ठेवीं उरीं काहीं ठेवा गा॥ ३॥
एक वेळा जाणवितो। धरूनिया राहा चित्तीं।
नेघें भार सांडीं कामा हातीं। नीज घेऊनि फिरतो गा॥ ४॥
सुपात्रीं सर्व भाव[1]। मी तो सर्व वासुदेव।
जाणती कृपाळु संत महानुभाव। जया भिन्न भेद नाहीं ठाव गा॥ ५॥
शूर दान जीवें उदार। नाहीं वासुदेवीं विसर।
कीर्ति वाढे चराचर। तुका म्हणे तया नमस्कार गा॥ ६॥

शब्दार्थ व टीपा – सोपारें–सोपी आवा–धैर्य

अर्थ – राम ही दोन अक्षरे अतिशय सुलभ व सोपी आहेत आयुष्याच्या शेवटच्या प्रहरी जागे राहून तुम्ही या नामाचा जप करा, व आयुष्याचा शेवट गोड साधा १ वासुदेव, रामकृष्णाचे स्मरण करून, चिपळ्या वाजवून, टाळ, घागऱ्यांचा घोष करून रामकृष्ण वासुदेव, रामकृष्ण वासुदेव असा पुकारा करीत आहे २ हा वासुदेव वासुदेव असाच शब्दानी गाणे गात आहे या नावाखेरीज काही दुसरे वेगळे नाही असे समजून याचेच दान करा, असा त्याचा उपदेश आहे याच दानाचे धैर्य दाखवा व देहबुद्धीसबंधीचे काहीही मागे ठेवू नका ३ हे दान मागण्यासाठी निज-

[1] वेचावे

विवरण :– वरील दोन व पुढील चार अभगातून वासुदेवाच्या भूमिकेवरून तुकोबानी सर्वसामान्य जनतेस रूपकाच्या भाषेत बोध केला आहे तुकारामासारख्या अनेक मराठी सतानी सास्कृतिक उद्बोधनाचे, धर्मप्रसाराचे व रक्षणाचे, जनतेस सन्मार्ग दाखविण्याचे फार मोठे कार्य केले आहे पारमार्थिक तत्त्वज्ञान, वेदान्तविचार, आध्यात्मिक अनुभूती याचा त्यानी स्वत अनुभव घेतला व तो इतरासाठी अतिशय सुलभ भाषेत काव्याच्या आधारे शब्दबद्ध केला रामकृष्णाच्या, कौरवपाडवाच्या कथा सागून आबालवृद्धाना थोर परपरेची ओळख त्यानी वारवार करून दिली मराठी सताचे हे पारमार्थिक विचारधन प्रत्येकाच्या घरी नेऊन पोचते करण्याचे महान कार्य मनोरजनाच्या द्वारे करणारा एक मोठा वर्ग त्यावेळी समाजात होता त्यावेळी मुद्रणकलेचा शोध आपल्या देशात आलेला नसल्याने, पुस्तके मुद्रित स्वरूपात नव्हती, शिक्षणाचा प्रसार नव्हता, विद्यालये नव्हती अशा काळात बहुजनास परमार्थप्रवण करून बहुश्रुत करण्याचे कार्य साधुसतानी केलेच, पण त्याच्या कार्याचा फार मोठा विस्तार मनोरजनाच्या द्वारे खेड्यापाड्यातही घरोघरी जाऊन करणारा एक मोठा समिश्र वर्ग होता हा वर्ग म्हणजे गोंधळी, भुत्ये, वासुदेव, वाघ्या-मुरळी, नदीबैलवाले इत्यादीचा होय अजूनही याच्यापैकी काहीजण रस्त्यातून दिसतात आज नाही उद्या या मडळीचे भवितव्य काय होणार आहे ? कुणास माहीत ? पण आज भिकाऱ्याप्रमाणे वाटणारे लोक एके काळी सास्कृतिक उद्बोधनाचे व प्रसाराचे कार्य फार चागल्या प्रकारे करीत असत महाराष्ट्राच्या समाजशिक्षणाचे हे एक प्रधान अग होत निरक्षर असणाऱ्या, अज्ञानामध्ये जीवन कठणाऱ्या, व आपली शेती आणि खेडे सोडून न जाणाऱ्या शेतकरीवर्गास त्याच्या घरी जाऊन त्यास त्याच्या दवदैवताची आठवण करून देणे, राजकी तिथी, रोजचे नक्षत्र, रोजचा सण याची आठवण करून देणे हे महत्वाचे कार्य लोकरजनाच्या साह्याने गोधळी, भुत्या, वासुदेव, कानफाट योगी, वाघ्या-मुरळी, वाळमतीप, सरोदा ( पिंगळा ), कुडमुड्या जोशी, कालटोटी, डाकारी, फकीर, जागले, भापी, बहुरूपी, कडकलक्ष्मी, वैदू इत्यादी अनेक प्रकाराच्या लोकानी केले आहे याच्या परमार्थनिरूपणास विनोदाची, अतिशयोक्तीची, उपरोधाची किनार असल्यामुळे याची साथत समाजास उपकारक वाटली

या काही व पुढल्या तीनचार अभगात तुकारामबुवानी वासुदेवाच्या भूमिकेवरून परमार्थनिरूपण केलेले आहे वासुदेवाची जमात द्वारकेपासून आली असावी हे माठे कृष्णभक्त असून आजही त्याच्या चिपळ्या, त्याचा टाळ, त्याचा पावा सकाळच्या वेळी श्रीकृष्णगीतातून साथ देणाऱ्या या गोष्टी आहेत श्रीकृष्ण किंवा विठ्ठल याची उपासना हे लोक करतात याचा वेष बालकृष्णाचा असतो डोक्यावर मयुरपिसाची टोपी असते, पायात घुगुर असतात तोंडाशी अलगुज असते जुन्या पद्धतीचा पायघोळ अगरखा असतो त्यावर ताबडे अलवण असते कृष्णभक्तीची गाणी गाऊन हे सकाळच्या प्रहरी लोकाना सुखवीत असत या वासुदेवावर ज्ञानेश्वरएकनाथादी सतानीही अभग रचना केलेली आहे ' घुळघुळा वाजवी टाळ । झणझणा नाद रसाळ ' या चरणाचा ज्ञानदेवाचा एक नादमधुर अभग वासुदेवावर आहे ' वासुदेव स्मरणे तुटती जन्ममरण व्याधी । अहं सोहं कोहं मूळ या साडी उपाधी ' अशा भाषेत एकनाथानी वासुदेवाचे माहात्म्य सागितले आहे

४३१ गेले टळले पाहार तीन । काय निदसुरा अझून ।
जागे होउनि करा काहीं दान । नका ऐकोनि[1] झाको लोचन गा ॥ १ ॥
हरी राम कृष्ण वासुदेवा । जाणवितसे जना ।
चिपळचा टाळ हातीं मुखीं घोष । नारायणा[2] गा ॥ २ ॥
जें टाकेल कोणी काहीं । फळ पुष्प अथवा तोय ।
द्या परी मीस घेऊं नका भाई । पुढें विन्मुख होता बरें नाहीं गा ॥ ३ ॥
देवाकारणे भाव तस्मात । द्यावे न लगे फारसे वित्त ।
जाले एक चित्त तरी बहुत । तेवढ्यासाठीं नका करूं घाताघात गा ॥ ४ ॥

---

१ ऐको झाकोनि, २ नामनारायणा गा

आलों येथवरी बहु सायासें । करितां दान हेंचि मागावयास ।
नका भार घेऊं करूं निरास । धर्म सारफळ संसारास गा ॥ ५ ॥
आतां मागुता येईल फेरा । हे तो न घडे या नगरा ।
म्हणे तुकयाबंधु धरा । ओळखी नाहीं तरी जाल अघोरा गा ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा :– पाहार–प्रहर, निदसुरा–अर्धवट झोपेंत असलेल्यास, अज्ञानीस, तोय–पाणी,मौस–मांस

अर्थ :– तीन प्रहर टळून गेले. पहिला प्रहर गर्भवासाचा, दुसरा बाळपणाचा, तिसरा तरुणपणाचा, अशा तीन प्रहरांचा काळ अज्ञानरात्रीचाच सपत आला अजून झोपेंत असलेल्यांनो जागे व्हा ना म्हातारपणाचा चौथा प्रहर येत आहे. सावध व्हा ना जागे होऊन काही दान करा हा सर्व उपदेश ऐकून डोळे मिटून घेऊन झोपेत काळ घालवू नका १ रामकृष्ण हरी म्हणून भजन करा, असा उपदेश हा वासुदेव करीत आहे. हातात टाळ, चिपळ्या, वीणा व मुखात श्रीकृष्णाचा अथवा विठ्ठलाचा किंवा रामकृष्णहरी असा घोष असू द्या. २ फळ, फूल, पान जे काय शक्य असेल ते देवास अर्पण करा. झोपेचे सोंग घेऊन उगाच झोपू नका वधूनो. कारण या देहात जर प्रभूशी विन्मुख व्हाल तर मात्र पुढे कल्याण होणार नाही ३ या ईश्वराला नुसता भाव अर्पण केला तरी चालेल. त्याला काही धनदौलत अर्पण करावी लागते असे नाही एकचित्ताने त्याचे स्मरण केले तरी पुष्कळ होते. हे न करण्याने तुम्ही आपल्या आयुष्याचा नाश उगाच करू नका ४ मोठे कष्ट घेऊन मी येथे हेच दान तुमच्याजवळ मागायला आलो आहे माझी निराशा करू नका. संसाराचा भार उगाच डोक्यावर घेऊ नका धर्म करणे हेच संसाराचे एक फळ आहे. ५ आता पुनः या देहरूप नगराला यावे न लागेल असे काही तुम्ही करावे तुकयाबंधू तुम्हांस सांगत आहे की, असे काही न कराल, या ईश्वराची ओळख करून न घ्याल तर तुम्हाला अघोर नरकास जावे लागेल. ६

४३२ राम राम दोनी अक्षरें । सुलभ आणि सोपारें ।
जागा मागिले पाहारें । सेवटिचें गोड तेंचि खरें गा ॥ १ ॥
राम कृष्ण वासुदेवा । जाणवी जनासि ।
वाजवी चिपळिया । टाळ घागऱ्याघोषें गा ॥ २ ॥
गाय वासुदेव वासुदेवा । भिन्न नाहीं आणिका नांवा ।
दान जाणोनियां करीं आवा । न ठेवीं उरीं काहीं ठेवा गा ॥ ३ ॥
एक वेळा जाणवितों । धरूनिया राहा चित्तीं ।
नेघें भार सांडीं कामा हातीं । नीज घेऊनि फिरतो गा ॥ ४ ॥
सुपात्रीं सर्व भाव[1] । मी तो सर्व वासुदेव ।
जाणतो कृपाळु संत महानुभाव । जया भिन्न भेद नाहीं ठाव गा ॥ ५ ॥
शूर दान जीवें उदार । नाहीं वासुदेवीं विसर ।
कीर्ति वाढे चराचर । तुका म्हणे तया नमस्कार गा ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – सोपारे–सोपी, आवा–धैर्य

अर्थ – राम ही दोन अक्षरे अतिशय सुलभ व सोपी आहेत आयुष्याच्या शेवटच्या प्रहरी जागे राहून तुम्ही या नामाचा जप करा; व आयुष्याचा शेवट गोड साधा. १ वासुदेव, रामकृष्णांचे स्मरण करून, चिपळ्या वाजवून, टाळ, घागऱ्यांचा घोष करून रामकृष्ण वासुदेव, रामकृष्ण वासुदेव असा पुकारा करीत आहे. २ हा वासुदेव वासुदेव अशाच शब्दांनी गाणे गात आहे. या नावाशेजारीज काही दुसरे वेगळे नाही असे समजून मानेच दान करा, असा त्याचा उपदेश आहे. याच दानाचे धैर्य दाखवा व देहबुद्धीसबंधीचे काहीही मागे ठेवू नका. ३ हे दान मागण्यासाठी निज-

१ देवावे

वस्तूचे दान मिळविण्यासाठी वासुदेव सर्वांना एकदा जाणीव देत आहे नीट ईश्वरविषयक भाव चित्तात धरून राहा ससाराचे ओझे शिरावर घेऊ नका हातची सर्व कामे सोडून याचा भाव मनात धारण करा ४ मी वासुदेव सर्वत्र भरून राहिलेलो आहे असा सर्व चागल्या भक्ताच्या मनात भाव असतो जे महानुभाव असे कृपाळू सत आहेत तेही असेच जाणतात त्याच्या ठिकाणी वेगळेपणाची जाणीव कधीच नसते ५ ज्याना वासुदेवाचा विसर पडत नाही त्यावेच दान शूरत्वाचे व उदारतेचे मानावे त्याची कीर्ती सर्वत्र वाढीस लागेल, चराचरात पसरून राहील अशा या दानशूर साधुसताना तुकाराम महाराज म्हणतात, माझा नमस्कार असो ६

४३३ बोल बोले अबोलणे । जागे बाहेर आत निजेले ।
कैसे घरात घरकुल केले । नेणो आधार ना उजेडले गा ॥ १ ॥
वासुदेव करितो फेरा । वाडियात बाहेर द्वारा ।
कोणी काहीं तरी दान[1] करा । जाब नेदा तरी जातो सामोरा[2] गा ॥ २ ॥
हातीं टाळ दिंडी मुखीं[3] गाणे । गजर होतो बहु मोठ्याने ।
नाहीं निवडिली थोरलाहाने । नका निजो भिकेच्या भेणे गा ॥ ३ ॥
मी वासुदेव तत्त्वता । कळो येईल विचारिता ।
आहे ठाउका सभाग्या संता । नाहीं दुजा आणीक मागता गा ॥ ४ ॥
काय जागाचि निजलासी । सुने जागोन दारापासी ।
तुझ्या हितापाठीं करी व्यास व्यासी । भेटी न घेसी वासुदेवासी गा ॥ ५ ॥
ऐसे जागविले अवघे जन । होतें संचित तींही केले दान ।
तुका म्हणे दुबळीं कोणकोण । गेलीं वासुदेवा विसरून गा ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – जाब–उत्तर, नेदा–दिला नाही भणे–भयाने, सुने–कुत्र

अर्थ – जे मुखाने बोलू नये अशा ज्ञानाच्या गोष्टी जे मुखाने एकसारख्या करतात ते बाहेरून जागे असले तरी आत झोपलेलेच आहत त्यानी आपल्या घरातच छोटसे घरकुल केले आह, त्यात अधार आहे की उजेड आहे हे काही नीट समजत नाही १ हा वासुदेव रोजच्या फेऱ्या या देहरूपी वाड्याच्या आत, दारात बाहेर सवत्र करीत असतो त्याला कुणी काही तरी दान करून थोडे पुण्य सपादन करा ना तुम्ही काही उत्तर न द्याल तर मी आपला माघारा जाईन २ मी हातात टाळ व वीणा घेऊन, मुखाने ईश्वराचे नाम गात आह नामाचा हा गजर मी मोठ्याने करीत आहे तो ऐकण्यासाठी लहानथोर अशी निवड केलेली नाही दान देण्याच्या भयाने कुणी झोपून जाऊ नका ३ मी तर निश्चयाने वासुदवच आहे तुम्ही थोडा विचार केलात तर तुम्हासही हे सहज समजून येईल भाग्यवान सताना हा प्रकार माहीत आहे हे असे दान मागणारा माझ्याशिवाय दुसरा आणखी कोणी नाही ४ उगाच काय भ्रमात निजून राहिलात ? दाराशी मात्र राखणेसाठी कुत्रे जागवीत ठेविले आहे ते तुमच्या हितासाठी वसवस करून भुकत आहे आणि तुम्ही वासुदेवाला भटत नाही ५ अशा प्रकारे या वासुदेवाने सर्व लोकाना जागे केले आहे पण ज्याचे पूवकम चागले होते त्यानीच दान केले आहे आणि वासुदेवाला विसरून जाणारे मात्र दुबळच आहेत ६

४३४ रामकृष्ण गीती गात । टाळ चिपळ्या वाजवीत ।
छंदें आपुलिया नाचत । नीज घेऊनि फिरत गा ॥ १ ॥
जनीं वनीं हा अवघा देव । वासनेचा हा पुसावा ठाव ।
मग बोळगती वासुदेव । ऐसा मनीं वसू द्यावा भाव गा ॥ २ ॥

१ दान पुण्य करा २ माघारा, ३ मुखी नाम गाण

निज दासाची थोर आवडी । वासुदेवासि लागली गोडी ।
मुखीं नाम उच्चारी घडोघडीं । ऐसी करा हे वासुदेवजोडी गा ॥ ३ ॥
अवघा सारूनि सेवट जाला । प्रयत्न न चले कांहीं केला ।
जागा होईं सांडुनि झोपेला । दान देईं वासुदेवाला गा ॥ ४ ॥
तुका म्हणे रे धन्य त्याचें जीणें । जींहीं[1] घातलें वासुदेवा दान ।
त्याला न लगे येणें जाणें । जालें वासुदेवीं राहणें गा ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– नीज–निजस्वरूपाचे दान, वोगळतो–प्रसन्न होतो.

अर्थ :– आपल्या गीतांतून रामकृष्णांचे गुणवर्णन गात गात, टाळ व चिपळ्या वाजवीत, आपल्याच नादात नाचत नाचत हा वासुदेव निजस्वरूपाचे दान घेत घेत फिरत आहे. १ सर्व जनांत व वनांत सर्वत्र एकच परमेश्वर पसरून राहिलेला आहे. तो अनुभवण्यासाठी वासनेचा त्याग करावयास हवा. मगच वासुदेवाची संगत त्याला सुखाची होते, तो प्रसन्न होतो, असा भाव मनात निश्चयाने असू द्यावा. २ निजस्वरुपाच्या दानाची गोडी या वासुदेवास फार मोठी असून प्रत्येक क्षणी त्याच्या मुखात हरिनामाचा उच्चार असतो. अशा या वासुदेवाची प्राप्ती तुम्ही करून घ्या. ३ तुम्हांस जागे करण्याचे प्रयत्न फार झाले. त्याचा शेवटही झाला. पण काही प्रयत्न यशस्वी झाला नाही, तुम्ही झोप टाकून आधी जागे व्हा पाहू; व या वासुदेवाला दान द्या. ४ ज्याने या वासुदेवास दान दिले त्याचेच जिणे धन्य होय असे तुकारामबुवा म्हणतात, असे दान देणारास मग जन्ममृत्यूच्या फेऱ्या पडत नाहीत. कारण त्याचा निवास वासुदेवाच्या ठिकाणीच झालेला असतो. ५

## गांवगुंड-अभंग १

४३५ आम्ही जालों गांवगुंड । अवघ्या पुंड भूतांसी ॥ १ ॥
दुसरें तें खेळों आलें । एका बोलें तो मियां ॥ २ ॥
अवघियांचा येऊं लाग । नेदूं अंग शिवाया ॥ ३ ॥
तुका म्हणे खुंटूं नाद । जितूं वाद सर्तीनें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– पुंड–बंडखोर, जितूं–जिंकू, सर्तीने–शर्थीने.

अर्थ :– आम्ही सर्व देहरूपी गावास दरारा बसविणारे गावगुंडच बनलो आहोत. सर्व बंडखोर प्राणिमात्रांना अथवा पंचमहाभूतांनाही आमचा दरारा वाटतो. १ या एका मियाच्या बोलावण्याने दुसरे अनेक लोक गावगुंडीचा खेळ खेळायला येऊन मिळाले. २ एकमेकांचा अंगसंबंध न येताही सर्वांना लाभ होईल असे करू. ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशांचा नाद संपवू. त्यांच्याशी शर्थीने वाद जिंकू. ४

## जोगी-अभंग १

४३६ जग जोगी जग जोगी । जागजागे[2] बोलती ॥ १ ॥
जागता जगदेव । राखा कांहीं भाव ॥ २ ॥
अवघा क्षेत्रपाळ । पूजा[3] सकळ ॥ ३ ॥
पूजापत्र कांहीं । फल पुष्प तोय ॥ ४ ॥
बहुतां दिसां फेरा । आला या नगरा ॥ ५ ॥
नका घेऊं भार । धर्म तोचि सार ॥ ६ ॥
तुका मागे दान । द्या जी अनन्य ॥ ७ ॥

शब्दार्थ व टीपा :– जोगी–योगी, जगदेव–जगन्नाथ.

---

१ जिहीं वासुदेवा केलें दान, २ जागें जागें ३ पूजावा.

अर्थ :– जगातील सर्व योगी लोकांना स्वतःच्या ठिकाणी जागे असा असे सांगत असतात. १ हा जगन्नाथ ईश्वर स्वतःच जाणणारा असल्याने त्याच्या ठिकाणी काही भाव ठेवावा. २ तोच सर्व क्षेत्राचा पालक असल्याने त्याचीच पूजा करावी. ३ फुले, फळे, पाणी, पान वगैरे घेऊन त्याचीच पूजा करावी ४ मनुष्यदेहाच्या शहरास फार दिवसांनी या योग्याची फेरी आलेली आहे. ५ आपल्या मस्तकावर लौकिक संसाराचा भार कुणीही घेऊ नये. धर्माने वागणे हेच जीविताचे सार आहे. ६ तुकाराम महाराज म्हणतात, मी तुम्हास हे दान मागत आहे. ते अनन्यभावाने मला द्यावे. ७

विवरणः– येथून पुढचे अभंग असेच विरवोळ विषयावर लोकाभिमुख होऊन रूपकाच्या आश्रयाने लिहिलेले आहेत. जोगी, सरवदा, मुंढा, डोईफोडा, मलंग, दरवेस, गोंधळ, सौया, वाघ्या, दसरा इत्यादी नावांनी भारूडाच्या सदरात येतील असे हे अभंग ह्या वेळेच्या समाजात निरनिराळ्या वेषात वावरणाऱ्या व बहुजन समाजास सांस्कृतिक व पारमार्थिक विचारांची जाग देणाऱ्या व लोकरंजनाने काम करणाऱ्या काही लोकांचे हे शब्दचित्र मनोरंजक व उद्बोधक असे आहे या अभंगात योगी अथवा जोगी माणसाचा रूपकात्मक उल्लेख आहे जोगी हे शंकराचे उपासक कानफाटे असेही यांना म्हणतात अंगाला विभूती, हातात भिक्षापात्र, त्रिशूल, काखेत झोळी कोवयावर गोपीचंद-मैनावतीचे गाणे अशा थाटात हे लोक अजूनही हिंडताना दिसतात याची परंपरा धर्मनाथापासून सांगतात. या योगी अथवा जोगी लोकांचा संप्रदाय प्रसिद्ध नाथपंथाशीही संबंधित आहे आदिनाथ, मत्स्येंद्रनाथ, गोरखनाथ, गहिनीनाथ, ज्ञाननाथ ( ज्ञानेश्वरी ) ही परंपरा भागवतधर्मीयांशी निगडित अशीच आहे शिवोपासक नाथपंथाचे पुढे मजेदार रूपान्तर विठ्ठलभक्तीत होऊन ऐक्याचा एक नवा आदर्श निर्माण झालेला दिसतो या अभंगात जागत्या जगदेवाची पूजा पत्र, फल, फूल, पाणी यांनी करावी असे सांगितले आहे याचा संदर्भ भगवद्गीतेमधील ' पत्रं पुष्पं फलं तोयं यो मे भक्त्या प्रयच्छति ' या ओळीशी आहे हे स्पष्ट आहे

## सरवदा-अभंग १

४३७ एका गा ए भाई । सरवदा सांगतो कांई ।
येथें नांडेल माई । दोघां पुत्रांची ।
ते करिती तिची विटंबना । अवघ्या प्रसिद्ध जना ।
एक न मारितां ब्राह्मणा । तो जाणा सुख न पवे ।। १ ।।
आणीक ऐका गा ए । सरवदा सांगतो काय ।
खरेंचि बोले तो जाय । नरकामध्यें अधोगती ।
हें चौघांच्या मुखें । मना आणावें सुखें ।
अवघीं चुकती दुःखें । खोटें बोला नरनारी ।। २ ।।
आणीक नांडेल एक जाण । सरवदा बोलतो वचन
जागें माझें[1] म्हणोन । पडिलें खान तया घरी ।
म्हणोन न म्हणा माझें कांही । निजों निजा सुखें ठायी
यत्न होईल तईं । चोराठायीं विश्वास ।। ३ ।।
आणीक एकी परी । सरवदा सांगतो थोरी ।
दुःख पावेल नारी । पतिव्रता यामधी ।
पांचांनीं दिधली हातीं । म्हणोनि न मनावी निश्चिती ।
परपुरुषीं होय रती । सुखगती ते पावे ।। ४ ।।

---

१ माझे चित्त

आणीक एकी परी । सरवदा सांगतो तें करीं ।
दान देतां जो न वारी । नव्हे भला भला तो ।
तुका म्हणे आई । येथें नांव काई ।
सांगसी तें ठायीं । मरो रांडेचें ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– सरवदा–भविष्य सागणारा,शकुन सागणारा, खान–चोरी, वारी–निवारण करतो.

अर्थ :– येथूंनो, ऐका हा भविष्य अथवा शकुन सागणार काही सांगत आहे. काम व क्रोध या दोन पुत्रांची ही बुद्धीरूप आई लोकांच्याकडून फसली जाईल. ते तिची विटंबना करतील. हे सर्वत्र प्रसिद्धच आहे. कामाला मारल्याशिवाय कुणालाही शहाणपणा येणार नाही, की सुखही मिळणार नाही. १ लोकहो, आणखी काही शकुन या भविष्य ऐका, हा शकुन सागणारा काय सांगतो ते ऐका. देहादी लौकिक दृष्टी व प्रपंचविचार यांना खरे मानतो तो नरकास जाईल. त्याची अधोगती होईल. हे मी तुम्हांला चार वेदांच्या आधयाने सांगितले आहे. तेव्हा स्त्रीपुरुषहो, देहादी प्रपंच खोटा आहे असेच म्हणत राहा, म्हणजे तुमची सर्व दु.खे निवारण होतील. २ शकुन सांगणारा आणखी असे सागत आहे की, आणखी एक मनुष्य फसणार आहे तो हा की जो माझे चित्त जागे आहे, मी सावध आहे असे म्हणणारा. त्याच्या घरी चोरी होऊन त्याचे सर्व लयाला जाईल म्हणून माझे माझे म्हणून सावध राहण्याची जरुरी नाही. निजात्मस्वरूपाच्या ठिकाणी मात्र सावध राहावे. सर्वांचे चित्त चोरणाऱ्या त्या श्रीहरीच्या ठिकाणीच विश्वास प्रयत्नपूर्वक ठेवावा ३ आणखी एक शकुन या सरवद्याचा असा आहे की, देहधर्मास व विकारांनाच सर्वस्व मानून पतीची सेवा करणारी पतिव्रता नारीही मोठेच दु ख पावेल. ही जीवदशारूपी पतिव्रता स्त्री पचकर्मेंद्रिये, पचज्ञानेंद्रिये, पचमहाभूते याच्या तावडीत सापडलेली असल्याने हिच्यापासून सावध असावे. निश्चित राहू नये परम म्हणजे श्रेष्ठ पुरुष जो परमेश्वर त्याच्याशीच रममाण ती जर झाली तरच तिला सुख वाटेल. ४ आणखी शकुनाचा एक प्रकार असा की, कुणी दान देत असताना जो निवारण करतो तोही काही चांगला मनुष्य नव्हे. तुकाराम महाराज म्हणतात, मातांनो, त्या सर्वांची नावेच कशाला सागायला हवीत ? मरेनात रांडेचे. ५

## मुंढा–अभंग ३

४३८ संवाल यारा उपर तलें दोन्हो मारकी चोट ।
नजर करे सो ही राखे पश्वा जावे लुट ॥ १ ॥
प्यार खुदाई रे बाबा जिकिर खुदाई ॥ २ ॥
उडे कुदे ढुंग नचावे आगल भुलन प्यार ।
लडबड खडबड कांहेकां खचलावत भार ॥ ३ ॥
कहे तुका चलो एका हम जिन्होके सात ।
मिलावे तो उसे देना तो ही चढावे हात ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा .– मुंढा–मुसलमानी गुरूचा एक प्रकार, यारा–मित्रा, संवाल–साभाळ, चोट–तडाख, खुदाई–देवावर, कुदे–उडी मारणे

अर्थ :– मित्रा, स्वर्गासारख्या वरच्या गतीचे व पशुपक्ष्यादी खालच्या गतीचे सुखदुःखाच्या भोगाचे तडाखे जो सांभाळील त्याचेच रक्षण होईल व दुसरा मात्र नागविला जाईल १ बाबा, देवावर प्रीती असू दे. देवावरच प्रीती ठेव. देवावरच प्रेम असू दे २ प्रपंचाविषयीचे प्रेम, भुलून, उडया मारून, ढुंगण हालवून तू नाचत राहून देवापुढे लीन व्हावेस. काखेत झोळी, खडावा, कृष्णाजिन यांचे लडबडते, खडबडते ओझे विनाकारण का वागवितोस ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, लोकहो, नीट ऐका, आम्ही ज्याच्याशी तुमची सोबत करून देऊ त्यालाच हात देऊन जवळ करा. ४

काहे भुला एक देखत आखो मार तडागो बाजार ॥ २ ॥
दमरी चमरी जो नर भुला। सोत आघो हि लत खाये ॥ ३ ॥
नहि बुलावत किसे बाबा आप हि मत जाये।
कहे तुका उस असाके संग फिरफिर गोते खायें ॥ ४ ॥

शब्दार्थ – मलग–मुसलमान फकीर, ठकण भेख–फसविण्याम केलेला वेष, तडागो–तडाखे, लत–लाथ, असाके–आशेच्या

अर्थ – बाबा, लक्ष ठेवून राहील तोच जिंकेल हा प्रपंचाचा तमाशा दूर राहून तू पाहा पुढे हातात काठी व फास घेऊन फसविण्यासाठी वेषधारी वाटमारे बसले आहेत हे नीट ओळख तू १ या बाजारात लोभाने आपल्याच डोक्यावर तडाखे देत कित्येक वेषधारी बसले असताना तू त्याना पाहात आहेस मग तू त्याना का फसवतोस ? २ दमडीचमडीसाठी जो मनुष्य भुलून जातो तो पुढे लाथा खात राहतो ३ तुकाराम महाराज म्हणतात, बाबा, तू कुणालाही बोलावू नकोस, तूही कुठे जाऊ नकोस कारण पुन आशेच्या संगतीने तू गोता खाशील रे बाबा ४

## दरवेस – अभंग १

४४३ अल्ला करे सो होय बाबा करतारका सिरताज।
गाउ बछरे तिस चलावे यारी बाघो न सात ॥ १ ॥
ख्याल मेरा साहेबका। बाबा हुवा करतार।
व्हाटे आघे चढे पीठ। आपे हुवा असवार ॥ २ ॥
जिकिर करो अल्लाकी बाबा सबल्या अदर भेस।
कहे तुका जो नर बुझे सो हि भया दरवेस ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा – दरवेस–अस्वलाचे खेळ करून हिंडणारा फकीर अथवा भिक्षेकरी, सिरताज–मुकुट, यारी–प्रेम, मैत्री, बाघो–वाघ

अर्थ – देवाने मनात आणले तर सामान्य मनुष्यही बाबा, देवाच्या डोक्यावरील मुकुट होऊन राहील, आणि गाईवासरासहित वाघावरोबरही ते मैत्री करतील १ बाबा, त्या एका ईश्वराची मात्र आठवण ठेव कारण तोच एक कर्ता आहे तरच तुम्ही त्याच्या पदावर आरूढ व्हाल २ बाबा, सर्व भूताचा अतरात्मा जो अल्ला, देव त्याची आठवण ठेवा तुकाराम महाराज म्हणतात, जो मनुष्य हे सर्व समजून घेतो तोच खरा दरवेशी झाला ३

## वैद्यगोळी–अभंग १

४४४ अल्ला देवे अल्ला दिलावे अल्ला दारु अल्ला खिलावे।
अल्ला बगर नहीं कोये अल्ला करे सो हि होये ॥ १ ॥
मर्द होये वो खडा फोर नामर्दकु नहीं धीर।
आपने दिलकु करना खुसी तीन दामकी क्या खुमासी ॥ २ ॥
सब रसोंका किया मार। भजनगोली एक हि सार।
इमान[1] तो सब ही सस्ता। थोडी तो भी लेकर ज्या ॥ ३ ॥
जिन्हो पास नीत सोये। वो हि बसकर तिरोवे।
सातो पाचो मार चलावे। उतार सो पीछे खावे ॥ ४ ॥

---
१ इनाम

सब ज्वानी निकल जावे। पीछे गधडा मटी खावे।
गांवढाळ सो क्या लेवे। हगवनि भरी नहि धोवे॥ ५॥
मेरी दारु जिन्हें खाया। दिदार दरगां सो हि पाया।
तल्हे मुंढी घाल जावे। बिगारी सोवे क्या लेवे॥ ६॥
बजारका बुझे भाव। वो हि पुसता आवे ठाव।
फुकट बाटु कहे तुका। लेवे सोहि लें हिसखा॥ ७॥

शब्दार्थ व टीपा :- दारु-औषध, खुमासी-विवाद, रस-औषध, मटी-माती, दिदार-दर्शन

अर्थ :- देवच देणारा अगर दुसऱ्यांकडून देवविणारा आहे. तो देवच औषध आहे. तोच औषध देणारा आहे. अल्लाशिवाय, देवाशिवाय दुसरे कोण आहे? तो करील तेच होईल. १ जो कोणी मर्द आहे तोच हे औषध नामरूपाचे घ्यायला तयार होईल. नामर्द हे काम करण्याचे धैर्य कसा दाखवील ? तुम्ही आपल्या मनाला प्रसन्न करून घ्यावे. तीन दमड्यांची काय बिशाद आहे ? २ सर्व औषधी सोडून द्याव्यात व एक भगवद्भजनाची गोळी मात्र घ्यावी. तीच सारभूत अशी आहे. विश्वास ठेवून या गोळीचे सेवन थोडे का होईना पण करावे. ३ ज्यांच्या-पाशी नीती झोपलेली आहे तेच पुरे पुरे म्हणून रडतात, त्याच्या सप्तधातूत्मक व पंचभूतात्मक शरीरावर मार करून जिंकणारी अशी ही भजनगोळी असल्यामुळे तिचा भवरोगावर उतार पडतो. ती पुन पुन. ते घेतात. ४ हे माढवी, सर्व तारुण्य संपल्यावर मग मातीच खावी लागेल तुला जे मूर्ख व येडवळ आहेत ते काय माझी ही भजनगोळी घेऊ शकतील ? कारण त्यांच्या हागवणीचे कपडे त्यांच्याकडून धुतले जाईनात. ५ पण माझी भजनगोळी ज्याने घेतली आहे त्याने आत्मरूपाचे दर्शन घेतले; पण खाली मुंडी घालणारा तो बिगार-कामकरी काय तिचे महत्त्व जाणणार ? ६ तुकाराम महाराज म्हणतात, बाजारभाव विचारूनच तुम्ही माझी ही भजनगोळी घ्यावी. मी त्यांना फुकट वाटून टाकीन. जे कुणी सज्जन असतील ते ही भजनगोळी घेऊन सुखी होतील ७

विवरण - तुकोबाच्या या किरकोळ लोकरंजनात्मक अभंगाची भाषा फारसी-उर्दूमिश्रित अशी आहे मलंग, दरवेशी, मुंढा, भजनगोळी देणारा वैदू यांची भाषा अशी चमत्कारिक आहे. याचा अर्थ हा की त्यावेळी मुसलमानी राज्याच्या सबधाने एकदर हिंदूसमाजातही स्थित्यतर होत होते देवधर्म, चालीरीती, समजुती यातील सघर्ष हा एक अभ्यासाचा विषय आहे मुसलमानी फकीर व मलग याचा सबध हिंदूसस्कृतीशी अनेक प्रसगी येत राहिला लोक-जीवनात स्थिर होऊन राहिलेल्या या लोकाची ही तुकोबाकृत शब्दचित्रे होत

## गोंधळ - अभंग ३

४४५ राजस सुंदर वाळा। पाहों आलिया सकळा वो।
बिबीं बिंबोनि ठेली। माझी परब्रह्म वेल्हाळा वो।
कोटि रविशशि माझी। परब्रह्म वेल्हाळा वो॥ १॥
राजस विठाबाई। माझें ध्यान तुझे पायीं वो।
त्यजुनियां चौर्‍यांसी। लावी आपुलिये सोई वो॥ २॥
सकुमार साजिरी। कैसीं पाउलें गोजिरीं वो।
कंठीं तुळसीमाळा। उभी भीवरेच्या तिरीं वो।
दंत हिरया ज्योति। शंखचक्र मिरवे करीं वो॥ ३॥
निर्गुण निराकार। वेदां न कळेचि आकार वो।
शेषादिक श्रमले। श्रुती न कळे तुझा पार वो।
उभारोनि बाहे। भक्तां देत अभयकर वो॥ ४॥

ब्रह्मादिकासही समजत नाही २ ही सावळी विठाई अतिशय सुकुमार आहे. हिचे चार हात फारच शोभून दिसतात. हिच्या छातीचा भाग सखोल असून त्यावर तेजस्वी असे पदक चमकत आहे. हिच्या कबरेस लहान लहान घुंगरे असून ती अतिशय मधुर आवाज करतात हिच्या पायातील घागऱ्या मधुर ध्वनी करून गाणे गात असतात हिच्या पुढे नित्य संगीत, नृत्य सुरू असते. ३ हिचा अष्टांग असा सुशोभित बांधा किती वर्णन करावा ! शुद्ध केलेल्या तेजस्वी रसाचीच ही सुगंधी व सौंदर्यवान अशी मूर्तीच जणु ओतली आहे ही सर्व कलांत निपुण असून हिचे मुख हसरे आहे हिचे भाषण मधुर शब्दांनी भरलेले असते. ही नारायणी, आदिशक्ती देवी विठाबाई बहुरूपांनी नटलेली आहे ४ पंढरपूरसारख्या महानगरामध्ये हिची घटस्थापना केलेली आहे. आकाशाचा मंडप त्रैलोक्यावर घातलेला असून चंद्रभागेच्या तीरावर हिने गोंधळ सुरू केला आहे ही कृष्णाबाई, योगेश्वरी आपल्या भक्तजनांच्या कार्यासाठी अवतीर्ण झाली आहे ५ तेहतीस कोटी देव, चामुंडादी देवी, अष्ट भैरव या सर्वांचा समुदाय हिच्या आरतीसाठी आलेला आहे आरती ओवाळून झाल्यावर हे तिच्यावर फुलांचा वर्षाव करितात नारदतुंबर व गंधर्व गाणे गाऊन हिची स्तुती करतात. या गायनाने सर्वांना ब्रह्मानंद होत असतो अशा या देवी विठाईचे चरणरज, पायीचे धूलिकण तुकयाबंधू मस्तकी धारण करीत आहे. ६

विवरण– वरील तीन अभंगात तुकोबांनी गोंधळाच्या रूपकाने विठाईमाउलीचे अति रेखीव, लोभस व सौंदर्यपूर्ण असे वर्णन मोठ्या तन्मयतेने केले आहे गोंधळाचा सर्व थाट त्यांनी येथे उभा केलेला आहे 'गोंधळाची प्रथा आपल्याकडे फार पूर्वीपासून आहे इष्टकार्य सफल व्हावे म्हणून सर्व देवदेवतांना आवाहन केले जाते व त्यांची स्तुती किंवा प्रार्थना गोंधळाच्या वेळी म्हटली जाते. लग्नासारखे मंगल कार्य झाल्यावरही गोंधळ घालण्याची प्रथा अजूनही महाराष्ट्रात आहे गोंधळ हा मुख्यत देवीचा असतो गोंधळी लोकांकडून देवीप्रीत्यर्थ गाणे, नृत्य भजन, स्तुती, प्रार्थना, पवाडे इत्यादी प्रकार गोंधळात म्हटले जातात गोंधळाची प्रथा प्राचीन काळीही असावी स्कंदपुराणात गोंडली नृत्याचा उल्लेख असून दीपिका, माळ, टाळ, शंख, मृदंग, दिवट्या, कवड्यांची माळ इत्यादी वस्तूंचाही उल्लेख तेथे आहे या गोंधळाच्या वेळी माहूरची रेणुका, कोल्हापूरची अंबाबाई, औंधची यमाई पालीचा खंडोबा, जेजुरीचा खंडोबा, शिंगणापूरचा महादेव, पंढरपूरचा विठोबा इत्यादी प्रमुख देवांपासून जोखाई, उगाई, तुकाई यांसारख्या लहान दैवतांनाही पाचारण करण्यात येते 'मातापूरची रेणुबाई गोंधळा येई, कोल्हापूरची आंबाबाई गोंधळा येई, जेजुरीचा खंडोबा गोंधळा येई ' अशी गोंधळाची सुरुवात सर्वांना परिचयाची आहे गोंधळ ऐकणाऱ्या प्रत्येक श्रोत्याला आपले दैवत आल्याचे समाधान वाटत असल्यामुळे एकत्वाचे एक नमुनेदार साधन म्हणूनही गोंधळाकडे सामाजिक दृष्टीने पाहण्यासारखे आहे मराठी संतांनी 'गोंधळा'चा उपयोग रूपकाच्या आधाराने फार चांगल्या रीतीने करून घेतला आहे

ज्ञानेश्वरांनीही गोंधळावर सुरेख रचना केलेली आहे ' तुझा देव्हारा मांडिला हो करी कृपा। चौक आसनीं कळस ठेविला हो करी कृपा। प्रेम चादवा वर दिधला हो करी कृपा। ज्ञानगादी दिली बैसावया हो करी कृपा। वरी बैसविली आदी माता हो करी कृपा। शुकसनकादिक गोंधळी हो करी कृपा। नाचताती प्रेमकल्लोळीं हो करी कृपा। पुढें पुंडलिक दिवटा हो करी कृपा' अशा थाटाने ज्ञानेश्वरांनी या विठाई माउलीचा गोंधळ वर्णन केलेला आहे एकनाथांनी ' स्वर्ग मृत्यु पाताळ त्याचा मंडप घातला हो । चार वेदांचा फुलवरा बांधिला हो जीवशिव सकळ घेऊनि आनंदे नाचती हो। अठ्यायशी सहस्र ऋषि दिवटे तिष्ठती हो . । अशा शब्दात गोंधळाचे रूप उभे करून विठोबामाऊलीचे स्तवन केले आहे

४४८ शंख करिशी ज्याच्या नावे । त्याचें तुज नाहीं ठावे ।
एक सांगतो एका भावें। सांपडे घरीं ते जीवउनि खावें। रे विठ्ठल ॥ १ ॥
टिळे माळा करंडी सोंग। धरुनि चाळविले जग।
पसरी हात नाहीं त्याग। दावी दगड पुजी भग। रे विठ्ठल ॥ २॥

राख लावुनि अंग मळी। वाये ठोके मी एक बळी।
वासने हातीं बांधवी नळी। त्यासि येउनि गिळी। रे विठल॥ ३ ॥
कोण तें राहडीचें सुख। वरते पाय हारतें मुख।
करवी पीडा भोगवी दुःख। पडे नरकीं परी न पळेचि मूर्ख। रे विठ्ठल ॥४॥
सिकला फार मारी हाका। रांडा पोरें मेळवी लोकां।
विटंबी शरीर मागे रुका। केलें तें गेलें अवघेंचि फुका। रे विठ्ठल ॥५॥
कळावें जनां मी एक बळी। उभा राहोनि मांडी फळी।
फोडोनि गुडघे कोपर चोळी। आपला घात करोनि आपणचि तळमळे। रे विठ्ठल॥ ६॥
फुकट खेळें ठकलीं बांयां। धरुनि सोंग बोडवया डोया।
शिवों नये ती अंतरीं माया। संपादणीविण विटंबिली काया। रे विठ्ठल॥ ७॥
धुळी माती कांहीं खेळोंच नका। जवादी चंदन घ्यावा बुका।
आपणा परिमळ आणिकां लोकां। मोलाची महिमा फजिती फुका। रे विठ्ठल ॥८॥
बहुत दुःखी जालियां खेळें। अंगीं बुद्धि नाहींत बळें।
पाठीवरी तोबा तोंड काळें। रसना द्रवे उपस्थाच्या मुळें। रे विठ्ठल॥ ९॥
काय सांगतो तें ऐका तुका। मोडा खेळ कांहीं अवगोंच नका।
चला जेवूं आधीं पोटीं लागल्या भुका। धाल्यावरी वरा टाकमटिका। रे विठ्ठल ॥१०॥

*शब्दार्थ व टीपा*— करंडी–परडी, उगळी–ओवतो, राहडीचे–चिखलात, फाका–शिव्या, रुका–पैसा, जवादी–सुवासिक पदार्थ, उपस्थ–इंद्रिय, धाल्यावरी–संतुष्ट झाल्यावर, टाकमटिका–थाटमाट

अर्थ :– देव देव म्हणून ज्याच्या नावाने तू शख करून ओरडत आहेस, त्यासंबधी तुला काहीही ज्ञान नाही. तर तू नीट ऐक. मी एका भावाने सर्व काही तुला सागतो तुझ्या देहरूपी घरामध्येच जे विठ्ठलरूप वसती करून आहे त्याचीच तू उपासना कर १ उगाच कपाळावर गधाचे टिळे, गळयात माळा, हातात फुलाची परडी, असे ढोंग करून जगाला कशाला फसवितोस ? तू नेहमीच हात पसरून आहेस, खरा त्याग तू कधीच करीत नाहीस दगडाची पूजा करून लोकाना मात्र आपल्या साधुत्वाचे ढोंग दाखवितोस. २ तू साऱ्या अगाला राख फासून बसतोस आणि वृथा आपल्या मोठेपणाची ऐट मिरवतोस. तू वासनेकडून आपला गळाच बाधवून घेत आहेस यामुळे अशा लोकाना काळ गिळतो व पुन ओकून टाकतो ३ चिखलात डोके टेकून पाय वर करून उभा राहतोस तू काय त्यात सुख ? उलट यामुळे तुला स्वत.ला दु ख व पीडाच होईल नरकात जाशील ना. पण तुला मूर्खाला समजतच नाही ४ नाना-प्रकारचे अपशब्द व शिव्या शिकलास तू राडापोराना हाका मारून तू भोवती जमवतोस. आपले शरीर विटबून, नाना प्रकारची सोंगे करून त्याच्याजवळ पैसा मागतोस ५ सर्व लोकांना मीच एक बलवान असे समजावे म्हणून तू एखाद्या दुकानापुढे उभा राहून मोठ्याने ओरडा करतोस व लोक जमवितोस, आपले गुडघे व कोपर फोडून ते चोळत बसतोस अशा प्रकारे तू आपला घात आपणच करीत आहेस ६ अशा या फुकटच्या खेळाने पुष्कळ लोक फसले ना डोकी बोडून सन्याशाची सोंगे घेणारे फार आहेत पण त्याच्या मनात जिला शिवू नये अशी माया भरपूर असते अशामुळे वेषासारखी वागणूक नसल्यामुळे देहाची नुसती विटंबनाच झाली रे. ७ म्हणून अशा प्रकारे धुळीत, मातीत खेळ खेळण्याचे काही कारण नाही कस्तुरी, चदन किंवा बुक्का याचे सेवन करून तुम्ही स्वत ही सुवास घ्या व दुसऱ्यानाही द्यावा. यामुळे मोठी किंमत होईल नाही तर फुकट फजिती मात्र आहे. ८ वर सागितलेल्या खेळा-मुळे पुष्कळाना फार दु.खे झाली आहेत त्याच्या अगची बुद्धी नष्ट झाली, बळ सपले त्याच्या पाठीवर एकसारखे आघात बसून त्याचे तोड काळे झाले आहे. इद्रिय पाहून त्याच्या तोंडास पाणी सुटते. ९ तेव्हा तुकाराम महाराज

काय सांगतात ते नीट ऐका. हा फजितीचा खेळ मोडून टाका. उगाच फसला तरी आचरटपणा करू नका कधी. तरी चला, आधी ईश्वरप्रेमाचे भोजन करू. भूक फार लागली आहे ईश्वरप्राप्तीने संतुष्ट झाल्यावर मग थाटमाट करणे शोभून दिसेल. १०

४४९ एक बाई तुज यो कांहीं सांगत शकुन । निजलिया भुर होसी जागे म्हणउन ॥ १॥
मान्य माझें केलें सांगतें एका बोलें । न येतां हे भलें कळों कोणा लोकांसि॥ २॥
सांगतें गुण जीवींची खुण ऐक माझी मात। वैस एका भावें माझे हातीं दे यो हात ॥ ३ ॥
बरवा घरचार तुज सांपडला ठाव। फळ नाहीं पोटीं येथें दिसे खोटा भाव ॥ ४ ॥
आहे तुझे हातीं एका नवसाचें फळ। भावा करीं साह्य चहूं अठरांच्या बळें ॥ ५ ॥
करीं लागपाठ चित्त वित्त नको पाहों। अखई तो चुडा तुज भोगईल ना हो ॥ ६ ॥
कुळींची हे मुळीं तुझे लागलीसे देवी। पडिला विसर नेदी फळ नाहीं ठावो॥ ७ ॥
तुका म्हणे नांद सुखें धरीं आठवण। माझ्या येती[1] कोणी त्यांचा राख वरा मान ॥ ८॥

शब्दार्थ व टीपा :- भुर-फजीत, चहू आठरांच्या-चार वेदाच्या, अठरा पुराणाच्या, अखई-अखंड

अर्थ :- एक शकुन सांगणारी बाई म्हणते, ' बाई, तू ऐक, मी तुला एक शकुन सांगते भक्तीच्या वेळी तू जर झोपी जाशील तर तुझी मोठीच फजिती होईल म्हणून तू विठ्ठलस्वरूपात जागी राहा. १ माझे हे बोलणे त्याने एका शब्दाने मान्य केले आहे. पण माझे हे बोलणे पुष्कळ चांगल्या चांगल्या माणसांनाही समजत नाही. २ मी तुला माझ्या जीवाची एक खूण सांगते ती नीट ऐक. तू त्या श्रीहरीवर भावना ठेवून ऐक व माझ्या हातात हात दे पाहू. ३ तुला घरसंसार व व्यवसाय चांगलाच मिळालेला दिसतो. पण येथें काहीही खरी फलप्राप्ती नसून सर्वत्र खोटा भावच व्यक्त झालेला दिसतो. ४ तुझ्या नशिबात मात्र एक नवसाचे फळ तुला मिळणार आहे. चार वेद व अठरा पुराणे यांच्या साह्याने मात्र तू विठ्ठलाची भक्ती वाढीव. ५ वर सांगितलेले काही लागपाठ कर. द्रव्याकडे चित्त देऊ नकोस यामुळे तुला अखंड सौभाग्याचा चुडा मिळेल व तुला ईश्वररूपाचा पती प्राप्त होईल. ६ तुझ्या कुळाची ही असणारी ही देवी तुझ्या मागे लागली आहे. तिचा तुला विसर पडलेला असल्यामुळे तुला काही फळ मिळत नाही. ७ तुकाराम महाराज म्हणतात, तू सुखाने आपल्या घरी नांद, असा या देवीचा आदेश आहे. पण तिची आठवण मात्र धर व तुझ्या घरी माझे जे भक्त येतील त्यांचा आदरसत्कार मात्र नीट कर त्याचा मान ठेव ८

## कावडे – अभंग ५

४५० आहा रे भाई। प्रथम नमूं तो विनायक । ठेवुनि गुरुचरणीं मस्तक।
वदेल प्रासादिक वाणी । हरिहरांचे पवाडे ॥ १ ॥
माझी ऐसी ब्रीदावळी । दासें दासत्वें आगळी ।
पान्हेरीनें मार्ग मळी । जीवन घ्या रे कापडि हो ॥ २ ॥
जें या सीतळाहुनी सीतळ । पातळाहुनि जें पातळ ।
प्रेमामृत रसाळ। तें हें सेवा अहो भाग्याचे ॥ ३ ॥
जिंकाल तरी जिंका रे अभिमान । दवडाल तरी दवडा लज्जा आणि मान ।
धराल ते धरा शंभूचे चरण। दावाल पण ऐसा दावा तो ॥ ४॥
काळा घेऊं नेदीं वाव । आला तो राखें धावडाव ।
शुद्ध सत्वीं राखोनि भाव । म्हणा महादेव हरिहर वाणी गर्जो द्या ॥ ५ ॥

[1] येथील.

परावियां नारी माउली समान । परधनीं बाटो नेदीं मन ।
जीवित्व तें तृणासमान । स्वामिकाजी जाण शूर म्हणो तया ॥ ६ ॥
शक्ति वेचावियां परउपकारा । खोटें खोटयाचा पसारा ।
सत्य ते भवनदीचा तारा । आळस तो न करा येथें अहो सागतो ॥ ७ ॥
व्रत करा एकादशी सोमवार । कथा पूजन हरिजागर ।
पुण्य ते असे गाता नाचता बहु फार । पुन्हा योलिला ससार नाहीं नाहीं सत्यत्वें ॥ ८ ॥
सग सताचा करिता बरवा । उत्तमोत्तम कीर्तीचा ठेवा ।
पथ तो सुपथें चालावा । उगवा वासना लिगाड ॥ ९ ॥
तुका चालवितो कावडी । प्रवृत्ति निवृत्ति चोखडी ।
पुढती पुढती अधिक गोडी । भरुनि कळस भजन आवडी केशवदास नटतसे ॥ १० ॥

शब्दार्थ व टीपा – कावडे–पाण्याची कावड घालणारे पाव्हेरी–पाणपाई, कापडि–यात्रेकरू पण–पैंज, घाडघाव–अधिकार, सधी, लिगाड–लचाड, वटवट

अर्थ –अहो वधूनो, प्रथम गुरुचरणांना वदन करुन गणपतीस नमस्कार करू त्याच्या कृपेने प्रासादिक वाणीत हरिहराचे गुणसकीर्तन करू १ असे दास्यत्व करण्याची माझी योदावळी विशेष प्रकारची आहे पाणपोई घालून मी मार्ग आक्रमत आहे, सेवा करुन जीवन जगत आहे यात्रेकरू बधूनो, तुम्ही हे पाणी खुशाल घ्यावे २ हे प्रेमामृताचे जीवन शीतलाहून शीतल, पातळाहून पातळ असे रसाळ व गोड आहे याचे सेवन मोठ्या भाग्याने घडते ३ अगोदर तुम्ही अभिमान जिंका, लज्जा आणि मानसन्मानाची हौस सोडून द्या आणि घरणच धरावयाचे असतील तर महादेवाचे धरावेत काही पंज दाखवयाची असेल तर ती अशी असू द्यात ४ तुमच्या जीवनात काळाला शिरकाव करू देऊ नका त्याचा अधिकार नीट राखून मनात शुद्ध, सात्त्विक भाव धारण करुन हरिहर महादेव अशी गर्जना वाणीने करा ५ दुसऱ्याची स्त्री मातेसमान माना दुसऱ्याच्या धनसपत्तीवर मन ठेवू नका आणि स्वामीच्या कामासाठी आपले जीवन तुम्ही गवताएवढे क्षुद्र समजा तरच मी तुम्हांस शूर म्हणेन ६ तुमची सर्व शक्ती दुसऱ्यावर उपकार करण्यासाठी खर्च व्हावी, प्रपच हा सर्व खोटयाचा पसारा आहे असे तुम्ही माना भवनदी तरून जाणे हेच एक सत्याचे रुप आहे असे समजा याबाबतीत आळस मुळीच करू नका असे मी तळमळीने सागत आहे हो ७ एकादशी व सोमवार ही दोन व्रते नियमाने करा कथा, पूजा, हरिजागर करुन नामसकीर्तनाचा लाभ घ्या या नृत्यगीतात फार मोठे पुण्य आहे असा विश्वास धरा याच्यायोगे पुन ससार करण्यासाठी जन्म घेण्याचा प्रसग येणार नाही हे सत्य आहे ८ सताची सगत धरणे हेच फार चागले आहे यामुळे थोर कीर्तीचा लाभ होतो व वासनेचे लचाड दूर होऊन चागल्या मार्गाचे आचरण ठेवावे ९ तुकाराम महाराज म्हणतात, मी प्रवृत्ती व निवृत्ती अशी कावड चालवीत आहे पुढे आणखी भजनातील गोडीने कळश भरलेले दिसतील केशवदासाच्या प्रीतीने मीही कावड्याच्या निमित्ताने सेवा करीत आहे १०

४५१ आहा आहा रे भाई । हे अन्नदानाचे सत्र । पव्हे घातली सर्वत्र ।
पर्थी अवघे पथ मात्र । इच्छाभोजनाचे आर्त पुरवावया ॥ १ ॥
यावे तेणे घ्यावे । न सरेसे केले सदाशिवे ।
पात्र शुद्ध पाहिजे बरवें । मगळभावे सकळ हरि म्हणा रे ॥ २ ॥
नव्हे हे काहीं मोकळें । साक्षी चौघांचिया वेगळें । नेदी नाचो मताचिया बळें ।
अणु अणोरणीया आगळें । महदि महदा साक्षित्वे हरि म्हणा रे ॥ ३ ॥

हे हरि नामाची आंबिली । जगा पोटभरी केली । विश्रांति कल्पतरूची साउली ।
सकळां वर्णा सेवितां भली । म्हणा हर हर महादेव ॥ ४ ॥
तुका हरिदास तराळ । अवघे हाकारी सकळ ।
या रे वंदूं शिखरातळ । चैत्रमास पर्वकाळ महादेवदर्शनें ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा:– सत्र–अन्नछत्राचे स्थान, पव्हे–पाणपोई, आर्त–इच्छा, न सरेसे–न संपणारे, आंबिली–अंबील, नाचणीचे पीठ आळवून केलेला पातळ पदार्थ, तराळ–सेवक, महार

अर्थ – बंधूंनो, मी हे अन्नाचे सत्र चांगल्या मार्गाने जाणाऱ्या यात्रेकरूसाठी घातले आहे. ही पाणपोई तान्ह्यासाठीच आहे. इच्छाभोजनाची इच्छा पुरविण्यासाठी हे माझे अन्नसत्र आहे. १ ज्याने येथे यावे त्याने त्याचा लाभ घ्यावा. सदाशिवाच्या, महादेवाच्या कृपेने हे कधी न संपेल असे आहे. पण तुमचे पात्र मात्र चांगले व शुद्ध हवे. मंगल भावाने सर्वजणांनी श्रीहरीच्या नावाचा उच्चार करावा. २ हे नाम काही एकटेच मुक्त असे नाही. चार वेदाच्या साक्षीहून हे निराळे आहे एवढेच. निरनिराळ्या मताच्या बळावर हे कुणास नाचू देत नाही. हे अणुरेणूपेक्षाही सूक्ष्म व महान तत्त्वापेक्षाही महान असे आहे. यासाठी श्रीहरीच्या साक्षीने याचा जयजयकार करा. ३ ही हरिनामाची अंबील असून सर्व जगास पोटभर पुरेल एवढी केलेली आहे. ही कल्पतरूची सावली विश्रांती देणारीच समजा ना. सर्व वर्णांनी हिचे सेवन केल्यास उत्तमच आहे. चला यासाठी सर्वजण हरहर महादेव म्हणू या. ४ तुकाराम महाराज म्हणतात, मी या श्रीहरीचा दवंडी देणारा सेवक महार आहे. सर्वजणांना हाका मारून सांगत आहे, या सर्वजण. या महादेवाच्या शिखराच्या तळाचे दर्शन घेऊ. चैत्राच्या पर्वकाळात या महादेवाचे दर्शन घेऊ या. ५

*विवरण – या अभंगातील महादेवाचा संकेत शिखर शिंगणापूरचा आहे. तेथे चैत्रात मोठी यात्रा भरते.* महादेवास पाणी घालून अभिषेक करण्यात येतो. सर्व वर्णांना ही उपासना सुलभ असल्याची घोषणा वारकरी पंथाच्या धोरणास अनुसरूनच आहे. 'अणु अणोरणीया आगळें । महदि महदा' हे शब्द कठोपनिषदातील 'अणोरणीयान्महतो महीयान्' या सूत्राशी जुळणारे आहेत. 'अणुरेणिया थोकडा । तुका आकाशाएवढा' असे त्यांनी दुसऱ्या एका अभंगात म्हटले आहेच. वरील दोन व पुढील एक असे तीन अभंग कावडीचे अभंग म्हणून प्रसिद्ध आहेत. या संबंधीची थोडक्यात हकीकत अशी की तुकाराम महाराज एकदा कोथळेश्वराच्या यात्रेस निघाले होते. गंगाधरपंत मवाळ व संताजी तेली असे दोघेजण बरोबर होते. सातव्या दिवशी त्यांना कोथळेश्वरचे शिखर दिसले. पायथ्याशी शिंगणापूर क्षेत्र लागले. तेथील सरोवरात त्या सर्वांनी स्नाने केली. स्वयंपाक करून भोजनास बसणार, इतक्यात एक अतिथी भिक्षेकऱ्याच्या वेषाने तेथे आला व भोजन करून तृप्त होऊन अदृश्य झाला. बुवांना वाटले, अतिथीच्या रूपाने प्रत्यक्ष कैलासपतीच भोजन करून गेला. जेवण करून मग डोंगरावर जाऊन सर्वांनी शंभूचे दर्शन घेतले. तुकाराम महाराजांनी महाद्वारात कीर्तन केले व त्यावेळी वरील कावडीचे अभंग प्रेमाने म्हटले. पाच रात्र तेथे राहून मग ते परत देहूस आले.

४५२ आहा रे भाई । नमो उदासीन जाले देहभावा । आळविती देवा तया नमो ॥ १ ॥
नमो तीर्थपंथें चालती तयांसी । येती त्यांसी बोळविती त्यां नमो ॥ २ ॥
नमो तया संतवचनीं विश्वास । नमो भावें दास्य गुरुचें त्यां ॥ ३ ॥
नमो तया मातापित्यांचे पाळण । नमो त्या वचन सत्य वदे ॥ ४ ॥
नमो तया जाणे आणिकाचें सुखदुःख । राखे तान भूक तया नमो ॥ ५ ॥
परोपकारी नमो पुण्यवंता । नमो त्या दमित्या इंद्रियांसि ॥ ६ ॥
तुका म्हणे नमो हरिचिया दासा । तेथें सर्व इच्छा पुरलीसे ॥ ७ ॥

शब्दार्थ व टीपा :– बोळविती–बोलावितात, आणिकांचे–दुसऱ्यांचे, तान–तहान, राखी–दूर करतो.

अर्थ :– बंधूंनो, जे देहभावाविषयी उदासीन झाले आहेत व जे त्या देवास सदैव आळवीत असतात त्यांना नमस्कार असो. १ जे तीर्थयात्रा करण्यासाठी त्या मार्गाने चालतात व जे त्या मार्गास येतात त्यांना बोलावितात त्यांना नमस्कार असो. २ ज्यांचा विश्वास संतवचनांवर नेहमी असतो व भक्तिभावाने जे सद्गुरूचे दास्य करितात त्यांना नमस्कार असो. ३ जो आपल्या मातापित्याचे नीट पालनपोषण करतो व जो नेहमी सत्यवचन बोलत असतो त्यास नमस्कार असो. ४ जो दुसऱ्यांचे दुःख जाणून त्यांची तहान भूक दूर करतो त्यासही नमस्कार असो. ५ जो परोपकारी पुण्यवंत आहे व जो इंद्रियांचे दमन करतो त्यास नमस्कार असो. ६ तुकाराम महाराज म्हणतात, हरीच्या दासास नमस्कार असो. कारण माझी सर्व इच्छा त्यांच्याजवळच पूर्ण होत असते. ७

४५३ आहा रे भाई । तयावरी माझी ब्रीदावळी । भ्रष्ट ये कळीं क्रियाहीन ॥ १ ॥
थुंका थुंका रे त्याच्या तोंडावरी । आणिली ते थोरी दवडा वांयां बाहेरी ॥ २ ॥
बाइलेचा दास पित्रांस उदास । भीक भिकाऱ्यास नये द्वारा ॥ ३ ॥
विद्याबळें वाद सांगोनियां छळी । आणिकांसि फळी मांडोनियां ॥ ४ ॥
गांविचिया देवा नाहीं दंडवत । ब्राह्मण अतीत घडेचि ना ॥ ५ ॥
सदा[१] सर्वकाळ करितोचि निंदा । स्वप्नीं ही गोविंदा आठवीना ॥ ६ ॥
खासेमध्यें धन पोटासि बंधन । नेणें ऐसा दानधर्म कांही ॥ ७ ॥
तुका म्हणे नटे दावुनियां सोंग । लवों नेदी अंग भक्तिभावें ॥ ८ ॥

शब्दार्थ व टीपा :– कळीं–कलियुगात, पित्रांस–वडील माणसास, अतीत–अतिथी, खासेमध्यें–स्वत:चे.

अर्थ :– बंधूंनो, या कलियुगात जे कोणी क्रियाभ्रष्ट झाले आहेत त्यांचा उद्धार करण्यासाठी मी ब्रीद घेतले आहे. १ असे जे कुणी असतील त्यांच्या तोंडावर थुंकावे. त्यांची थोरवी कुणी वर्णन केली तरी ती अगदी व्यर्थ आहे असे समजून सोडून द्या. २ हा अधम मनुष्य बायकोचा दास झालेला असून वडील माणसांविषयी मात्र पूर्ण उदास असतो याच्या दारात भिकाऱ्यांना कधीही भिक्षा मिळत नाही. ३ काही थोडीफार विद्या शिकून निरनिराळे वाद खेळतो व दुसऱ्याना हा छळीत असतो. ४ गावातील देवाला हा चुकूनही नमस्कार करीत नाही. ब्राह्मण, अतिथी यांचा हा कधीच सत्कार करीत नाही ५ सदासर्वकाळ हा साधुसंतांची निंदा करीत असतो व गोविंदाचे स्मरण स्वप्नातही हा कधी करीत नाही ६ याचे स्वतःचे असे पुष्कळ धन असते ; पोट बांधून त्याचे हा जतन करतो, पण कधी दानधर्म करावा असे याच्या मनात येत नाही ७ तुकाराम महाराज म्हणतात, हा नानाप्रकारची सोंगे दाखवून नटत असतो पण भक्तिभावाने कधी याचे अंग लवले आहे असे दिसत नाही ८

४५४ आहा रे भाई । गंगा नव्हे जळ । वृक्ष नव्हे वड पिंपळ ।
तुळसी रुद्राक्ष नव्हे माळ । श्रेष्ठ तनु देवाचिया ॥ १ ॥
समुद्र नदी नव्हे पें गा । पाषाण म्हणों नये लिंगा ।
संत नव्हती जगा । मानसा त्या सारिखे ॥ २ ॥
काठी म्हणों नये वेतु । अन्न म्हणों नये सांतु ।
राम राम हे मातु । नये म्हणों शब्द हे ॥ ३ ॥
चंद्र सूर्य नव्हती तारांगणें । मेरु तो नव्हे पर्वता समान ।
शेष वासुकी नव्हे सर्प जाण । विखाराच्या सारिखे ॥ ४ ॥

[१] सर्व काळ करी संतांचिया निंदा.

गरुड नव्हे पाखरू । ढोर नव्हे नंदिकेश्वरू ।
झाड नव्हे कल्पतरू । कामधेनु गाय न म्हणावी ॥ ५ ॥
कूर्म नव्हे कासव । डुकर नव्हे वराह ।
ब्रह्मा नव्हे जीव । स्त्री नव्हे लक्ष्मी ॥ ६ ॥
गवाक्ष नव्हे हाड । पाटाव नव्हे कापड ।
परीस नव्हे दगड । सगुण ते ईश्वरीचे ॥ ७ ॥
सोने नव्हे धातु । मीठ नव्हे रेतु ।
नाहीं नाहीं चर्मांतु । कृष्णाजिन व्याघ्राबर ॥ ८ ॥
मुक्ताफळें नव्हेति गारा । खड्याऐसा नव्हे हिरा ।
जीव नव्हे सोइरा । बोळवीजे स्वइच्छेनें ॥ ९ ॥
गाव नव्हे द्वारावती । रणसोड नव्हे मूर्ति ।
तीर्थ नव्हे गोमती । मोक्ष घडे दर्शने ॥ १० ॥
कृष्ण नव्हे भोगी । शकर नव्हे जोगी ।
तुका पाडुरगीं । हा प्रसाद लाधला ॥ ११ ॥

शब्दार्थ व टीपा – तनु–शरीर, मातु–गोष्ट, शेष–सर्पांचा राजा, वासुकी–सर्पाचा राजा नंदिकेश्वरू–शंकराचा नंदी, गवाक्ष–गाईचा डोळा पाटावा–रेशमी वस्त्र कृष्णाजिन–हरणाचे कातडे व्याघ्राबर–वाघाचे कातडे, गोमती–डाकूर येथील तीर्थ

अर्थ – अहो बधूनो, गंगेचे पाणी हे काही इतर नद्याच्या पाण्यासारखे नाही त्याचे पावित्र्य विशेष प्रकारचे आहे तसेच वड व पिंपळ याची झाडे इतर झाडासारखी नव्हेत तुळशीची व रुद्राक्षाची माळ इतर माळा-सारखी नव्हे ५, सर्व गोष्टी त्या श्रेष्ठ परमेश्वराच्या शरीराप्रमाणेच होत १ समुद्र हा इतर नद्याप्रमाणे नव्हे. शिवलिंग पाषाणाचे असले तरी तो काही पाषाण नव्हे, त्याचप्रमाणे सत हे जगातील इतर लोकासारखे नव्हेत २ वेताची काठी ही इतर काठीसारखी म्हणू नये सातू इतर धान्याप्रमाणे समजू नयेत राम राम हा जप इतर शब्दासारखा नाही ३ इतर ताऱ्याप्रमाणे चद्र व सूर्य याना समजू नये मेरू पर्वत इतर पर्वताप्रमाणे साधा नाही, शेष व वासुकी हे इतर सामान्य विषारी सर्पाप्रमाणे नाहीत ४ गरूड हा काही सामान्य पक्षी नव्हे शंकराचा नदी हा काही इतर बैलासारखा नाही, इतर झाडाप्रमाणे कल्पतरूही नव्हे, इतर गाईसारखीच कामधेनू समजू नये ५ भगवताचा अवतार कूर्मकासव हे इतर कासवाप्रमाणे नाही, वराह म्हणजे डुक्कर खरा, पण तो इतर डुक्करा-प्रमाणे नाही सर्व जीवाप्रमाणे ब्रह्मदेव नव्हे ही लक्ष्मी साधी स्त्री म्हणू नये ६ इतर सामान्य हाडात गवाक्ष–गाईच्या डोळ्याची गणना करू नये रेशमी वस्त्र हे इतर कापडाप्रमाणे कसे असेल ? परीस इतर दगडासारखा नाही जे जे सगुण म्हणजे विशेष गुणानी युक्त आहे ते ते ईश्वराचे अश मानावेत ७ सोने हा धातू इतर धातू-पासून वेगळाच मानायला हवा साध्या रेतीवाळूपेक्षा मीठ वेगळेच असते कृष्णाजिन व व्याघ्राबर हे इतर प्राण्याच्या कातड्याप्रमाणे नाही ८ मुक्ताफळाची, मोत्याची किंमत गारगोटीशी कशी होईल ? हिऱ्याची सर खड्यास कशी येईल ? जीव हा त्या शिवाचा अश असल्याने तो आपलाच समजून सोयऱ्याप्रमाणे त्यास वाटेल तसे वागविणे युक्त होणार नाही ९ द्वारका हे गाव इतर गावाप्रमाणे नव्हे रणछोडाची मूर्ती ही इतर मूर्तीसारखी नाही गोमती हे तीर्थ इतर तीर्थाहून फारच वेगळे आहे तिच्या दर्शनानेच मोक्ष घडतो १० श्रीकृष्ण हा काही वरवर दिसतो तसा भोगी नाही, शंकरही त्याने अंगाला राख फासली असली तरी इतर जोग्याप्रमाणे तो नव्हे तुकाराम महाराज म्हणतात, पाडुरगाच्या प्रसादाने हा फरक मला समजला आहे ११

विवरण – या सुदर अभगात एक तरव तुकारामबुवानी फार चागल्या प्रकारे अनेक उदाहरणे देऊन स्पष्ट केले आहे श्रीकृष्ण व शिवशकर याची एकरूपता वर्णन करणे व तसे ऐक्य प्रस्थापित करणे हे तर भागवत सप्रदायाचे धोरण होते. पण कृष्ण व शिव याच्या वरवरच्या आचरणावरून त्याना इतर सामान्य माणसाप्रमाणे समजू नये हे पटविण्यासाठी तुकारामबुवानी अनेक उदाहरणे या अभगात दिलेली आहेत. ज्या वस्तूस ईश्वराचा स्पर्श झाला आहे, अथवा जीत ईश्वरी तत्त्वाचा खास अश आहे ती स्वजातीयापासून वेगळीच मानावयास हवी तुकोबाचा हा सामर्थ्याने शोभणारा अभग वाचून भगवद्गीतेमधील विभूतीविस्ताराच्या निरूपणाचा प्रसग आठवतो सर्व जगत, स्थिरचर वस्तू याची अभिव्यक्ती एकाच ईश्वरी तत्त्वापासून असली तरी ज्या वस्तूत परमेश्वराचा दिव्याश विशेष रूपाने असतो त्या वस्तू आपल्या वैशिष्ट्याने वेगळ्याच दिसतात व असतात, जी जी वस्तू वैभव, लक्ष्मी, प्रभाव, ईश्वरसान्निध्य, किंवा ईश्वरस्पर्शित आहे ती वेगळीच म्हटली पाहिजे

## सोंग्या – अभंग ११

४५५ वेसन गेले निष्काम जाले नर नव्हे नारी।
आपल्या तुटी पारख्या भेटी सोरियांचे फेरी ॥ १ ॥
त्याचा वेध लागला छंद हरि गोविंद वेळोवेळां ।
आपुलेमागें हासत रागें सावले घालिती गळां ॥ २ ॥
जन वेषा भीते तोंडा आमुच्या भांडपणा ।
कर कटीं भीमा तटीं पंढरीचा राणा ॥ ३ ॥
वेगळ्या याति पडिलो खंतीं अवघ्या एका भावे ।
टाकियेली चाड देहभाव जीवें शिवे ॥ ४ ॥
सकळांमधीं आगळी बुद्धि तिची करूं सेवा ।
वाय तुंबामूढासवे भक्ती नाचो भावा ॥ ५ ॥
म्हणे तुका टाक रुका नाचो निर्लज्जा ।
बहु जाले सुख काम चुकलो या काजा ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा :– सोरी–निर्लज्ज स्त्री, चोचाल स्त्री, भावीण, मुरळी, देवदासी, वेसन–व्यसन, सावलें–वस्त्र, वाय–व्यर्थ

अर्थ :– सकामतेचे माझे व्यसन आता सपले. मी आता निष्काम झाले आहे त्यामुळे मी नारीही नव्हे व पुरुषही नव्हे, अशा स्थितीत आहे आपल्या स्वरूपाची सगत कमी होऊन परपुरुषाची म्हणजे परमेश्वराची जडू लागली की सोऱ्याच्या सगतीने असा प्रकार घडून येतो १ त्या श्रेष्ठ पुरुषाचा मला छद एकसारखा लागल्यामुळे मी हरी, गोविंदा असे पुनः पुन: म्हणत आहे मग माझ्या पाठीमागे माझे सगेसोयरे मला हसत असतात व रागाने गळयात वस्त्र घालतात २ लोक आमच्या वेषाला भितात, आमच्या भाडखोर स्वभावामुळे कुणी आमच्या तोंडास लागत नाहीत. पण कमरेवर हात ठेवून भीमा नदीच्या तीरावर जो पढरीराया उभा आहे, त्याच्याशी मी रमले आहे ३ त्याचीच एकाची भाव धरून भक्ती केल्यामुळे आमची जात वेगळी झाली. आम्ही देहभावाची व ससाराची लाज जीवाशिवाच्या ऐक्यासाठी सर्व सोडून दिली आहे. ४ सर्वांहून जी श्रेष्ठ बुद्धीची आहे तिची सेवा आम्ही मनोभावे करू, मोठ्या भक्तिभावाने नाचू व्यर्थ मूर्खाबरोबर न राहू ५ तुकाराम महाराज म्हणतात, पैशासाठी निर्लज्जपणे नाचण्याचे सोडून दे या कामातील तुझे लक्ष कमी झाले म्हणजे कायमचे सुख होईल ६

४५६ आणिकां उपदेशूं तेणें नाचों आपण ।
मुंढा[1] वांयां मारगेली वांयां हांसे जन ॥ १ ॥
तैसा नव्हे घाळा आवरीं मन डोळा ।
पुढिलांच्या कळा कवतुक जाणोनी ॥ २ ॥
बाहिरल्या वेषें आंत जसें तसें ।
झाकलें तों बरें पोट भरे तेणें मिसें ॥ ३ ॥
तुका म्हणे केला तरी करीं शुद्ध भाव ।
नाहीं तरी जासी वांयां हा ना तोसा ठाव ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– मुंढा–हिजड्याचा सोबती, हा ना तोसा–ना स्वार्थाचा, ना परमार्थाचा.

अर्थ :– दुसऱ्यांना उपदेश देऊ नये. आपणच काय नाचायचे ते नाचावे. या मार्गास लागलेला सोबती मुढा हाही वायाच गेलेला असतो. त्याला लोक हसतात १ तेव्हा त्याच्याप्रमाणे खोटाच घाळा न करता मन आवरून धरावे. दृष्टी सावरावी. पुढे गेले आहेत त्यांचे गुण कौतुकाने घ्यावेत. २ बाहेरचा चांगला वेष काय उपयोगाचा ? आतील विकार जसेच्या तसेच असले तर ते झाकलेले बरे. बाह्य वेषाने पोट तरी भरेल. ३ तुकाराम महाराज म्हणतात, तुम्ही आपला भाव शुद्ध कराल तर बरे. नाही तर वाया जाल. ना स्वार्थ, ना परमार्थ अशी अवस्था तुमची होईल ४

४५७ टाक रुका चाल रांडे कां गे केली गोवी ।
पुसोनियां आलें ठाव म्हणोनि देतें सिवी ॥ १ ॥
आतां येणें छंदें नाचों विनोदें ।
नाही या गोविंदें माझें मजसी केलें ॥ २ ॥
कोरडे ते बोल कांगे वेचितेसी वांयां ।
वर्तें करूनि दावीं तुझ्या मुळींचिया ठाया ॥ ३ ॥
याजसाठीं म्या डौर धरियेला हातीं ।
तुका म्हणे तुम्हा गांठी सोडायाची खंती ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– रुका–अभिमान, गोवी–गुंतवणूक, डौर–एक वाद्य, डमरू

अर्थ :– अग रांडे, तू देहाचा अभिमान सोडून दे ना त्या गुंतवणुकीत का राहतेस ? चल मजबरोबर मी हि अभिमानाचे स्थान सोडून दिले आहे म्हणून तर तुला शिवी देत आहे १ या गोविंदाने माझा मीपणा नाहीसा केला; म्हणून आता याच्याच नादाने मोठ्या भक्तीने व गमतीने याच्या संगतीत नाचू या. २ तू तुझ्या अंतःकरणांतील हे कोरडे बोल व्यर्थ का खर्च करतेस ? तुझ्या मूळच्या ठिकाणी ते प्रकट करून दाखीव ना. ३ यासाठीच मी हातात हा डौर धरला आहे. तुकाराम महाराज म्हणतात, देहाच्या अभिमानाची ही गाठ मला आता सोडवायची आहे. ४

४५८ मोकळी गुंते रितो कुंथे नाहीं भार दावें ।
घेडवाडा बैसली खोडा घेतली आपुल्या भावें ॥ १ ॥
ऐका बाई लाज नाहीं[2] आणिकां त्या गरतीची ।
समाधानीं उंच स्थानीं जाणे सेवा पतीची ॥ २ ॥

१ मुढा, २ काही

न बोलतां करी चिंता न मारितां पळे ।
वादला सेज नावडे निजे जगझोडीचे चाळे ॥ ३ ॥
देखत आंध बहिर कानीं बोल बोलतां मुकें ।
तुका म्हणे पतन सोयरीं ऐसीं जालीं एकें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– रिती–रिकामी, धेडवाडा–महारवाडा, गरतीची–कुलीन स्त्रीची

अर्थ :– ही मोकळी असून गुंतली आहे. वर डोक्यावर काही ओझे नसूनही भाराने कुथत आहे आणि आपल्याच देहभावाच्या खोड्यामध्ये, देहरूपाच्या महारवाड्यात अडकून बसली आहे. १ आणि एक बाई, त्या कुलीन स्त्रीची लाज तुला वाटत नाही का ? ती पतीची सेवा करून कशी समाधानात उंच ठिकाणी असते. २ कुणी काही रागाने बोलत नसताही चिंता करणे व कुणी मारीत नसताना पळून जाणे, शेजेवर आपला नवरा न आवडणें हे जगझोडीचे, चवचाल स्त्रीचे चाळे असतात. ३ देव पाहात नसल्यामुळे याचे डोळे आंधळेच असतात. त्यांची कीर्ती कानावर येत नसल्याने ते बहिरेच असतात,त्याची स्तुती तोंडात नसल्याने ते मुके असतात. तुकाराम महाराज म्हणतात, अशा प्रकारची माणसे नरकलोकाचेच पाहुणे झाले आहेत ४

४५९ सातें चला काजळ घाला तेल फणी करा ।
दिवाणदारीं बैसले पारीं नाचों फेर धरा ॥ १ ॥
या साहेबाचें जालें देणें वेळोवेळां न लगे येणें ।
आतां हाटीं काशासाठीं हिंडों पाटी वुकानें ॥ २ ॥
अवघ्या जणी मुंढा धणी नाचों एकें घाईं ।
सरसावलें सुख कैसा चाळा एके ठायीं ॥ ३ ॥
तुका म्हणे योळगों एका तोड चिंता माया ।
देऊं उद्‌गार आतां जाऊं मुळींचिया ठाया ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा –: सातें–बाजारात, वोळगो–शरण जाऊं

अर्थ :– बायांनो, चला बाजारात जाऊ डोळ्यात काजळ घाला, तेलफणी नीट करा. समोर पारावर दारात दिवाणजी बसले आहेत त्याच्या भोवती फेर धरून नाचू या. १ या साहेबाचे आपणांस वरचेवर कर्ज झाले आहे, देणे आहे. ते एकदा देऊन टाकले म्हणजे मग पुन: वरचेवर यायला नको. आता बाजारात त्याच्यासाठी मग दुकानांतून हिंडावे लागणार नाही. २ या निर्विकार धन्याभोवती आपण सर्वजण फेर धरून नाच करू या या एका ठिकाणी जर सुख मिळाले तर मग निरनिराळ्या ठिकाणी जाण्याचा चाळा उगाच कशासाठी ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, चिंता व मायाममता सोडून यासच शरण जाऊ. याच्यापाशी सर्व काही सांगून याच्या मूळ गावी जाऊ या. ४

४६० सौरी सुर जालें दुर डौर घेतला हातीं ।
माया मोह सांडवलें तीही लोकीं जालें सरती ॥ १ ॥
चाल विठाबाई अवघी पांज[1] देई ।
न धरीं गुज कांहीं वाळवंटीं सांपडतां ॥ २ ॥
हिंडोनि चौऱ्याशी घरें आलें तुझ्या दारा ।
एक्या सुखयासाठीं आंचवलें संसारा ॥ ३ ॥

---
[1] पाच.

लाज मेली शंका गेली नाचों महाद्वारीं।
भ्रांति सावलें फिटोनि गेलें आतां कैंची उरी ॥ ४ ॥
जालें भांडी जगा सांडी नाहीं भीड चाड।
घालीन चरणीं मिठी पुरविन जीविचें तें कोड ॥ ५ ॥
तुका म्हणे रुका फरी संसारतुटी।
आतां तुम्हां आम्हां कैसी जाली जीवे साटीं ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा :– सुर–शूर, दुर–दुरावले, पांज–पंचभूतात्मक देह, सावले–वस्त्र, भांडी–भांडण

अर्थ :–हातामध्ये डोर घेऊन मी शूर सौरी झाले आहे. सर्व प्रकारचे मायामोह सोडून मी तीनही लोकांना श्रेष्ठ ठरले आहे. १ विठाबाई, हा देह पंचभूतात्मक आहे. पण वाळवंटात या पंढरपुरास आले असता काही गुप्त गोष्ट मनात ठेवू नकोस. २ चौऱ्याऐंशी लक्ष योनींचे जन्म हिंडून मी आज शेवटी तुझ्या घरी आले आहे; तुझ्या नामाच्या एका रुक्यासाठी मी माझा संसारही सोडून दिलेला आहे. ३ माझी सर्व लाज संपली; शंकाही दूर झाली, मी आता या महाद्वारात नाचत आहे. भ्रांतीचे वस्त्रही मी आता टाकून दिले आहे. आता देहभावाचे काय तसे उरले आहे ? ४ सर्वांशी माझे भांडण झाल्यामुळे मी सर्व जगाचा संबंध सोडून दिलेला आहे. मला आता कुणाचीच भीडभाड नाही. आता मी तुझ्याच चरणांवर मिठी घालून माझ्या जीवाची इच्छा पूर्ण करीन. ५ तुकाराम महाराज म्हणतात, तुझ्या नामाचा रुका मला प्राप्त झाला म्हणजे संसार संपून जाईल व जीवावर उदार होऊन तुमची-आमची कशीतरी भेट होईल. ६

४६१ सम सपाट वेसनकाट निःसंग जालें सौरी।
कुडपीयेला देश आतां येऊं नेदीं दुसरी ॥ १ ॥
गाऊं रघुरामा हेंचि उरलें आम्हां।
नाहीं जीवतमा वित्तगोतासहीत ॥ २ ॥
ठाव जाला रिता झाकुनि काय आतां।
कोणासवें लाज कोण दुजा पाहता ॥ ३ ॥
सौरीयांचा संग आम्हां दुरावलें जग।
भिन्न जालें सुख भाव पालटला रंग ॥ ४ ॥
लाज भय झणी नाहीं तजियेली दोन्ही।
फिराविला वेष नव्हों कोणाचींच कोणी ॥ ५ ॥
तुका म्हणे हा आम्हां वेष दिला जेणें।
जनाप्रचित सवें असों एकपणें ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – कुडपीयेला–व्यापून टाकला, सवें–बरोबर.

अर्थ :– सर्व सग सोडून, सर्व व्यसने संपवून मी निःसंगपणाने सौरी झाले आहे. आता हा देश मीच एकटीने व्यापला असल्याने दुसऱ्या कुणास येऊ देणार नाही इथे. १ आता त्या रघुरायाचे नामस्मरण गाऊ हेच एक काम आम्हांस उरले आहे. आता आम्हास आमच्या जिवाचीही काळजी नाही, की धनदौलत व नातेवाईक लोक यांची चिंता नाही. २ हा सर्वच देहभाव संपलेला असल्यामुळे आता त्यास झाकून काय उपयोग ? आता कुणासाठी लाज धारण करायची ? त्याच्यावाचून आता पाहणारे तरी दुसरे कोण आहे ? ३ सौऱ्यांच्या संगतीने आम्हांला हे जग दुरावले आहे; पण त्यामुळे फार वेगळ्या प्रकारचे सुख आम्हांस मिळून त्यायोगे आमच्या मनाचा भाव पालटला आहे. ४ आता लोकांची भीती व लाज दोन्ही आम्ही सोडून दिली आहे. आता आम्ही पूर्वीचा वेषही टाकून देऊ.

दुसरा वेष धारण केल्यामुळे आम्ही आता कुणाचेही नव्हे ५ तुकाराम महाराज म्हणतात की, ही सौरी म्हणते, हा वेष ज्याने आम्हांस दिला त्याच्या भावाने आम्ही या जनाबरोबर एकत्वाने राहू. ६

४६२ नव्हे नरनारी संवसारीं अंतरलो ।
निर्लज्ज निष्काम जना वेगळेचि ठेलों ॥ १ ॥
चाल रघुरामा ने आपुल्या गांवा ।
तुजविण आम्हां कोण सोयरा सांगाती ॥ २ ॥
जनवाद लोकनिंद्य पिशुनाचे चेरे ।
साहूं तुजसाठीं अंतरलीं सहोदरें ॥ ३ ॥
बहुता पाठीं निरोप हाटीं पाठविला तुज ।
तुका म्हणे आतां सांडुनि लौकिक लाज ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीप :– पिशुनाचे–चहाडखोराचे, सहोदरें–सख्खी भावंडे

अर्थ – आम्ही पुरुषही नाही व स्त्रीही नाही. आम्ही संसारासही आचवलो आहोत. लाज टाकून देऊन, निष्काम होऊन, आम्ही या लोकापेक्षा निराळेच झालो आहोत. १ रघुनाथा, तू आम्हास तुझ्या गावी घेऊन जा. तुझ्याशिवाय आम्हास कोण रे आता सोबतीचे सोयरे आहेत ? २ या लोकांचे प्रवाद, लोकाची निंदा, चहाडखोर लोकांचे फजितीचे बोलणे, देवा, तुझ्यासाठीच सहन करू रे. आमची भावंडेही तुजसाठीच अंतरली आहेत. ३ आज पुष्कळ मोठ्याच्या बरोबर तुला मला घेऊन जाण्यासाठी निरोप पाठविला तुकाराम महाराज म्हणतात, ही सौरी लौकिक लाज सोडून तुझ्यासाठीच भक्तिभावाने उत्सुक आहे. ४

४६३ नीट पाट करूनि थाट । दावीतसे तोरा ।
आपणाकडे पाहो कोणी । निघाली बाजारा ॥ १ ॥
ते सौरी नव्हे निकी । भक्तीविण फिकी ॥२॥
चांग मांग करूनि सोंग । दावी माळा मुद्री ।
रुवयाची आस धरूनि । हालवी ती फुदी ॥ ३ ॥
थोरे घरीं करी फेरी । तेथें नाचे बरी ।
जेथें निघे रुका । तेथें हालवी टिरी ॥ ४ ॥
आंत मांग बाहेर चांग । सौरी ती नव्हे तेग ।
तुका दास नटतसे । न करी त्याचा संग ॥ ५ ॥

४६४ चाल माझ्या राघो । डोंगरीं दिवा लागो ॥ १ ॥
घर केलें दार केलें । घरीं नाहीं वरो ।
सेजारणी पापिणीचीं पांच पोरें मरो ॥ २ ॥
घरीं पांच पोरें । तीं मजहूनि आहेत थोरें ।
पांचांच्या बळें । खादलीं बावन केळें ॥ ३ ॥
घर केलें दार केलें । दुकान केला मोटा ।
पाटाची राणी धांगडधिंगा तिचा मोटा ॥ ४ ॥
दुकान केला मोटा । तर पदरीं रुका खोटा ।
हिजडा म्हणसी जोगी । तर सोळा सहस्र भोगी ।
तुका म्हणे वेगीं । तर हरि म्हणा जगीं ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – वरो–पुत्रफळ

अर्थ :– माझ्या राघो, तू माझ्याबरोबर चल. डोंगरात दिवा लागू द्यात. १ मी घर केले, दार केले; म्हणजे लग्न केले. पण घरात मूलबाळ नाही झाले. परंतु शेजारणीस मात्र पाच पोरे आहेत. ती मरून जाऊ द्या. २ माझ्याही घरी पाच पोरे माझ्यापेक्षा थोर आहेत या पाचांच्या बळावर मी बावन्न केळी खाली आहेत. या पंच कर्मेंद्रियांनी उत्तम भोग घेतले. ३ मी घरदार केले, प्रपंच उभारला, मोठे दुकान घालून व्यापार केला. पाट लावून पट्टराणी एक आणली. पण तिचा धांगडधिंगाच फार आहे. ४ मी मोठे दुकान घातले खरे, पण माझ्या पदरात मात्र खोटा रुपयाच पडला. मला हिजडा, योगी म्हणू लागले. तुकाराम महाराज म्हणतात, मग अशा वेळी सोळासहस्र नारी भोगूनही जो खराच जोगी राहिला, त्या श्रीहरीचे नामस्मरण पटकन करा. ५

४६५ जन्मा आलिया गेलिया परी । भक्ति नाहीं केली ।
माझें माझें म्हणोनियां । गुंतगुंतों मेलीं ॥ १ ॥
येथें कांहीं नाहीं । लव गुरुच्या पायीं ।
चाल राडे टाकीं रुका । नको करूं बोल ।
गुरुविण मार्ग नाहीं । करिसी तें फोल ॥ २ ॥
खाउनी जेउनि लेउनि नेसुनि । म्हणती आम्ही बऱ्या ।
साधु संत घरा आल्या । होती पाठमोऱ्या ॥ ३ ॥
वाचोनि पढोनि जाले शाहणे । म्हणती आम्ही संत ।
परनारी देखोनि त्यांचें । चंचळ जालें चित्त ॥ ४ ॥
टिळा टोपी घालुनि माळा । म्हणती आम्ही साधु ।
दयाधर्म चित्तीं नाहीं । ते जाणावे भोंदु ॥ ५ ॥
कलियुगीं घरोघरीं । संत जाले फार ।
वीतिभरी पोटासाठीं । हिंडती दारोदार ॥ ६ ॥
संत म्हणतो केली निंदा । निंदा नव्हे माई ।
तुका असे अनन्यें भावें शरण संतां पायीं ॥ ७ ॥

पैसा सर्व टाकून दे. उगाच व्यर्थ बडबड करू नकोस श्रीगुरूच्या प्राप्तीशिवाय दुसरा मार्ग नाही. इतर सर्व करशील ते फोल आहे. २ चांगले खातेस, नेसतेस आणि वर म्हणतेस, आम्ही देवाच्या दासी आहोत. पण साधुसंत घरी येताच पाठमोऱ्या होऊन पळून जाता, नाही का? ३ असेच संत वरवरचे झाले आहेत वाचून, पढून शहाणे झाले व आम्ही संत झालो असे म्हणतात, पण दुसऱ्याची स्त्री पाहताच यांचे चित्त विचलित होते. ४ यांच्या कपाळावर टिळा असतो, टोपी डोक्यावर साधूसारखी असते, गळ्यात माळा असतात. आम्ही साधू असेही हे म्हणतात, पण यांच्या चित्तात दयाधर्म नसल्यामुळे हे भोंदू समजायला हवेत ५ या कलियुगात संत घरोघरी फारच झाले आहेत पण वीतभर पोट भरण्यासाठी ते दारोदार हिंडत राहिले आहेत. ६ संत म्हणतील याने आमची निंदा केली, पण तुकाराम महाराज म्हणतात, बंधूनो, ही निंदा नव्हे खऱ्या संतांच्या पायी हा मी नेहमी अनन्य भावाने शरण आहे ७

विवरण -- मराठी संतांच्या भारूड वाङ्मयात निरनिराळे धंदे करणाऱ्या लोकांच्या बरोबर सौरी ही एक असते सौरी म्हणजे वाईट चालीची, पण देवाशी नाते जोडणारी बाजारबसवी स्त्री असाच वरवरचा अर्थ आहे संगतीने वा कुणाच्या फसवणुकीने ही स्त्री वाईट नादी लागते व मग मनात विकार असून देवाच्या नावावर देवदासीचा व साधुत्वाचा आविर्भाव आणते हिच्याभोवती अनेक माणसे टपून असतात देवाच्या नावाखाली चाललेल्या या विक्षिप्त प्रकाराची तुकारामबुवांनी कडाडून हजेरी घेतली आहे काजळकुंकू लावून, नट्टापट्टा करून जाणाऱ्या व चंचळ पैशावर नजर ठेवणाऱ्या सौरीचा बुवांनी निषेधच केलेला आहे या सौरीच्या भोवती जमणारा गोतावळा मोठा चमत्कारिकच असतो ना पुरुष, ना स्त्री अशापैकी हिजडे गळ्यात कवड्यांची माळ घालून देवीचे, खंडोबाचे भक्त म्हणून स्वतःस म्हणवितात त्यांच्या मनातील दुःखाचा, त्यांच्या संसाराचा निर्देश तुकोबांनी मोठ्या मार्मिकतेने वरील काही अभंगातून केलेला आहे

खरोखरच चुकून फसली गेली आहे मनातूनच लौकिकाला विटून देवाच्या दारी आलेली आहे मनात ईश्वरप्रेम दाटून आले आहे अशा सौरीबद्दल तुकोबांच्या मनात नक्की आस्था आहे, किंवा एखाद्या वेळेस वाकडे पाऊल पडले असेल, पण आता पश्चात्तापाने दग्ध झाल्यावर जर ईश्वरभक्तीची जोड मिळाली तर सौरी सौरी राहू नये असाही या अभंगाच्या मागचा हेतू असावा 'सौरी'सुद्धा शुद्ध भाव धरून ईश्वरकृपेस पात्र होऊ शकते अशी उदाहरणे पिंगला, कान्होपात्रा इत्यादी पतित समजल्या जाणाऱ्या स्त्रियांच्या बाबतीतीलच नाहीत काय?

'सौरी'वर एकनाथ, ज्ञानेश्वर यांसारख्या संतांनीही पद्यरचना केलेली आहे ज्ञानेश्वरांच्या 'सौरीने' 'होय सौरी आता उघडा घाली माथा। परपुरषीं रमल्या बाई त्याची पतिव्रता' असे म्हटले आहे दुसरी एक सौरी म्हणते, 'कर्मास्तव झालों सौरा। गेलों पंढरपुरा। संत सनकादिका मेळीं डौर वाईला पुरा--।' या शब्दातून सौरीचे पश्चात्तापयुक्त अंतःकरण स्पष्ट दिसते परंतु एकनाथतुकारामांनी सौरीचे घातक व फसवे चाळेही वर्णन केले आहेत मुसलमानी सत्तेत नाना आपत्ती स्त्री जातीवर आल्या 'मी सुखाची कन्यका झाले वाढविली घरीं। देखतां देखतां उचलून नेली चोरीं॥ सौरी झाले बाई आता करूं तरी काई?' असे अगतिक होऊन एक सौरी म्हणत आहे, तर दुसरीचे वर्णन पाहा कसे आहे ते' 'वेणी फणी काजळ कुंकू केला टाकमटिक्का। बांधुनि बुचडा उघडा माथा विभूतीचा पट्टा। आला गेला म्हटला नाहीं धरल्या चारी वाटा। जाती भ्रष्ट झाली सौरी हिंडे दारोदारीं॥' असाच सौरीचे तुकोबांनीही वरील काही अभंगात वर्णन केलेले दिसून येईल सारांश, वरवरच्या सोंगापेक्षा, देखाव्यापेक्षा, अंतरंगातील भावभक्तीला महत्त्व आहे ती जर असेल तर 'सौरी'ला सुद्धा आयुष्याचे सार्थक करता येण्यासारखे आहे

## वाघा-अभंग १

४६६ अनंत जुगाचा देव्हारा। निजबोधांचा घुमारा।
अवचिता भरला वारा। या मल्लारी देवाचा॥ १॥
शुद्धसत्त्वाचा कवडा मोठा। बोधबिरडें बांधला गांठा।
गळां वैराग्याचा पट्टा। वाटा दावूं या भक्तीच्या॥ २॥

४६८ तुम्ही तरी सांगा कांहीं । आम्हांविशीं रखुमाबाई ॥ १ ॥
कांहीं उरले तें ठायीं । वेगीं पाठवुनी देई ॥ २ ॥
टोकत बैसलो देखा । इच्छीतसे ग्रासा एका ॥ ३ ॥
प्रेम देउनि बहुडा जाला । तुका म्हणे विठ्ठल बोला ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– टोकत–टुकुटुकू बघत, बहुडा–बदली

अर्थ – रुक्मिणी आई, रखुमाई, तुम्ही तरी या विठ्ठलास आमच्याबद्दल काही सांगा ना १ काही उरले असेल तर सत्वर पाठवून द्या ना आमच्यासाठी २ पाहा ना मी कसा तुमच्याकडे टुकुटुकू पाहात बसलो आहे. एकाच घासाची इच्छा धरून मी आहे. ३ प्रेमभक्ती देऊन मी या पांडुरंगास बदली म्हणून घेतले आहे. तुकाराम महाराज म्हणतात, या विठ्ठलाचा जयजयकार करा ना ४

४६९ वाट पाहें बाहे निडळीं ठेवुनियां हात । पंढरीचे वाटे दृष्टि लागले चित्त ॥ १ ॥
कई येतां देखें माझा मायबाप । घटिका बोटें दिवस लेखीं धरूनियां माप ॥ २ ॥
डावा डोळा लवे उजवी स्फुरते बाहे । मन उतावीळ भाव सांडुनियां देहे ॥ ३ ॥
सुखसेजे गोडचित्तीं न लगे आणीक । नाठवे घर दार तान पळाली भूक ॥ ४ ॥
तुका म्हणे धन्य दिवस ऐसा तो कोण । पंढरीचे वाटे येतां मूळ देखेन ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – बाहे–बोलावतो, निडळीं–कपाळावर, बाहे–बाहू, मूळ–आमंत्रण

अर्थ :– मी कपाळावर हात ठेवून या विठ्ठलाची वाट पाहात आहे माझी दृष्टी पंढरीच्या वाटेस लागली असून माझ्या चित्तात तोच एक विषय आहे १ हा माझा विठ्ठल मायबाप आलेला मी कधी बरे पाहीन ? घटिका, बोटे वगैरेंच्या साह्याने मी दिवस मोजून, लिहून ठेवीत आहे. २ मला शकुनही फार चांगले होत आहेत डावा डोळा लवत आहे आणि उजवा हात स्फुरण पावत आहे माझे मन उतावीळ बनून देह सोडून जणु भावभक्तीने त्याला भेटायला निघाले आहे. ३ सुखाच्या शय्येवर मला काहीही गोड लागत नाही. मला घरदारसुद्धा आठवत नाही माझी तहानभूक पळून गेली आहे ४ तुकाराम महाराज म्हणतात, असा धन्यतेचा दिवस कधी उगवेल ? पंढरपूरच्या वाटेचे आमंत्रण मला केव्हा येईल ? तो पंढरीराणा मला केव्हा बोलावील ? ५

४७० तुझें दास्य करूं आणिका मागों खावया ।
धिग्[1] जाले जिणें माझें पंढरीराया ॥ १ ॥
काय गा विठोबा तुज म्हणावें ।
थोराच्या दैवें गोड शुभअशुभ ॥ २ ॥
संसाराचा धाक निरंतर आम्हांसी ।
मरण भलें परि काय अवकळा तैसी ॥ ३ ॥
तुझे शरणागत शरण जाऊं आणिकांसी ।
तुका म्हणे कवणा लाज हे कां नेणसी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– आणिका–दुसऱ्याना

अर्थ – देवा, तुझी भक्ती आम्ही करावी, तुझे दास्य करावे व खायला मात्र दुसऱ्याना मागावे असे माझे जगणे पंढरीनाथा, धिक्कारयुक्त बनले आहे. १ विठोबा, तुला म्हणावे तरी काय ? तुझ्यासारख्या थोराच्या सहवासात सर्व शुभ अथवा अशुभ आम्हाला गोडच आहे. २ देवा, या संसाराची धास्ती आम्हास निरंतर असते. आणि या संसारास अशी दशा प्राप्त झाली आहे की ती अवस्था पाहून मरण बरे असे वाटावे. ३ तुकाराम

---

१ धन्य जिणें जाले

हृदय कोटबा सांगातें । घोळ वाजवू अनुहातें ।
ज्ञानभंडाराचे पोते । रिते नव्हे कल्पांतीं ॥ ३ ॥
लक्ष चौऱ्यांशीं घरें चारी । या जन्माची केली वारी ।
प्रसन्न जाला देव मल्लारी । सोहंभावीं राहिलो ॥ ४ ॥
या देवाचे भरता वारे । अगीं प्रेमाचे फेंपरे ।
गुरुगुरु करी वेडे चारे । पाहा तुके भुंकविले ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – जुगाचा–युगाचा, घुमारा–सचार बिरडें–माळ कोटबा–लाकडी भिक्षापात्र, घोळ–वाद्य

अर्थ – अनत युगाचा देव्हारा मी माडला आहे यात निजबोधाचा सचार झालेला आहे या मल्हारी देवाचा भाव अवचितपणे यात भरून राहिला आहे १ शुद्ध सत्त्वाची मोठी कवडी येथे असून बोधाच्या माळेची गाठ पक्की आहे गळ्यात वैराग्याचा पट्टा आहे आणि हा वाघ्या भक्तीच्या वाटा दाखवीत उभा आहे २ याने आपल्याबरोबर हृदयरुपी लाकडी भिक्षापात्र घेतले आहे घटाच्या घोषाने हा जणु अनुहाताचा नादच करीत आहे याच्या ज्ञानभांडाराचे पोते कल्पान्तीही कधी रिकामे होणारे नाही ३ चौऱ्याशी लक्ष योनीत जन्म घेऊन या माणसाच्या जन्मी याने चार घराची वारी केली आहे व त्यामुळे याला मल्हारी देव प्रसन्न झाला आहे , म्हणून तो सोहम्भाव धारण करून आहे ४ या मल्हारी देवाचे वारे अगात भरताच अगात प्रेमाचे फेफरे येते गुरुगुरू करून वेडे चाळे केले तेव्हा त्याची गुरुभक्ती पाहून तुकारामाने त्यास बोलते केले आहे ५

विवरण – वाघ्या हा खडोबाचा भक्त मुरळीबरोबर असतो देवीचे जसे गाधळी, भुत्ये तसेच खडोबाचे, मल्हारीचे हे वाघे खाद्यावर घोगडी, गळ्यात वाघाच्या कातड्याची भडाराने भरलेली पिशवी असा हा वाघ्या मल्हारीची गाणी गात हिंडत असतो वाघ्या व मुरळी ही खडोबास अर्पण केलेली असतात मुलगा वाघ्या होतो मुलगी मुरळी होते नवसास खडोबा पावल्यास ही मुले देवास अर्पण करण्याची चाल असे वाघ्या स्वत स खडोबाच कुत्रे समजून गुरगुर आवाज काढतात याही अभगात 'गुरुगुरु करी वेडे चारें' म्हणून तुकोबानी उल्लेख केलेला आहेच या वाघ्याच्या रूपावर एकनाथानी काही भारुडे रचिली आहेत 'अहं वाघ्या सोहं वाघ्या प्रेमनगरा वारी । सावध होऊनि भजनी लागा । देव करा कैवारी' असं एकनाथाचा वाघ्या म्हणत आहे या वाघ्यानी व मुरळ्यानी खडोबाच्या भक्तीचा प्रसार महाराष्ट्रात केला असला तरी त्याच्या वागणुकीविषयी लोकाच्या मनात सदैव शका असं तुकोबानी सौरी च्या निमित्ताने देवदासीचे अतरग स्पष्ट केलेले आहेच

## ललित – अभंग ११

(४६७) आजी दिवस जाला । धन्य सोनियाचा भला ॥ १ ॥
जालें संताचें पंगती । बरवें भोजन निगुती ॥ २ ॥
रामकृष्णनामें । बरवीं मोहियेली प्रेमें ॥ ३ ॥
तुका म्हणे आला । चवी रसाळ हा काला ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – ललित–देवाच्या उत्सवप्रसगा शेवटी सोगे वगैरे आणून कीर्तन करतात ते, निगुती–सावधतेने

अर्थ – आज मोठ्या धन्यतेचा दिवस उगवला आहे हा सोन्याचाच दिवस आहे १ आज सताच्या पगतीचे भोजन सावकाशपणे झाले २ रामकृष्ण या नामस्मरणाने सर्व वातावरण मोठ्या प्रेमाने मोहित होऊन गेले ३ तुकाराम महाराज म्हणतात, हा भोजनसमयीचा कालाही ईश्वरी प्रसादाच्या चवीने मोठा रसाळ झाला आहे ४

४६८ तुम्ही तरी सांगा कांहीं । आम्हांविशीं रखुमाबाई ॥ १ ॥
कांहीं उरलें तें ठायीं । वेगीं पाठवुनी देईं ॥ २ ॥
टोकत वैसलों देखा । इच्छीतसें ग्रासा एका ॥ ३ ॥
प्रेम देउनि वहुडा जाला । तुका म्हणे विठ्ठल,बोला ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– टोकत–टुकुटुकू बघत, वहुडा–वदली.

अर्थ :– रुक्मिणी आई, रखुमाई, तुम्ही तरी या विठ्ठलास आमच्याबद्दल काही सांगा ना. १ काही उरले असेल तर त्वरित पाठवून द्या ना आमच्यासाठी. २ पाहा ना मी कसा तुमच्याकडे टुकुटुकू पाहात बसलो आहे. एकाच घासाची इच्छा धरून मी आहे. ३ प्रेमभक्ती देऊन मी या पांडुरंगास वदली म्हणून घेतले आहे. तुकाराम महाराज म्हणतात, या विठ्ठलाचा जयजयकार करा ना. ४

४६९ वाट पाहें बाहे निडळीं ठेवुनियां हात । पंढरीचे वाटे दृष्टि लागलें चित्त ॥ १ ॥
कई येतां देखें माझा मायबाप । घटिका बोटें दिवस लेखीं धरुनियां माप ॥ २ ॥
डावा डोळा लवे उजवी स्फुरते बाहे । मन उतावीळ भाव सांडुनियां वेहे ॥ ३ ॥
सुखसेजे गोडचित्तीं न लगे आणीक । नाठवे घर दार तान पळाली भूक ॥ ४ ॥
तुका म्हणे धन्य दिवस ऐसा तो कोण । पंढरीचे वाटे येतां मूळ देखेन ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– वाहे–बोलावतो, निडळीं–कपाळावर, बाहे–बाहू, मूळ–आमंत्रण.

अर्थ :– मी कपाळावर हात ठेवून या विठ्ठलाची वाट पाहात आहे. माझी दृष्टी पंढरीच्या वाटेस लागली असून माझ्या चित्तात तोच एक विषय आहे १ हा माझा विठ्ठल मायबाप आलेला मी कधी बरे पाहीन? घटिका, बोटे वगैरेंच्या साह्याने मी दिवस मोजून, लिहून ठेवीत आहे. २ मला शकुनही फार चांगले होत आहेत. डावा डोळा लवत आहे आणि उजवा हात स्फुरण पावत आहे. माझे मन उतावीळ बनून देह सोडून जणु भावभक्तीने त्याला भेटायला निघाले आहे. ३ सुखाच्या शय्येवर मला काहीही गोड लागत नाही. मला घरदारसुद्धा आठवत नाही. माझी तहानभूक पळून गेली आहे. ४ तुकाराम महाराज म्हणतात, असा धन्यतेचा दिवस कधी उगवेल? पंढरपूरच्या वाटेचे आमंत्रण मला केव्हा येईल? तो पंढरीराणा मला केव्हा बोलावील? ५

४७० तुझें दास्य करूं आणिका मागों खावया ।
धिग्[1] जालें जिणें माझें पंढरीराया ॥ १ ॥
काय गा विठोबा तुज म्हणावें ।
थोराच्या दैवें गोड शुभअशुभ ॥ २ ॥
संसाराचा धाक निरंतर आम्हांसी ।
मरण भलें परि काय अवकळा तैसी ॥ ३ ॥
तुझे शरणागत शरण जाऊं आणिकांसी ।
तुका म्हणे कवणा लाज हें कां नेणसी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– आणिकां–दुसऱ्याना.

अर्थ :– देवा, तुझी भक्ती आम्ही करायी, तुझे दास्य करावे व खायला मात्र दुसऱ्यांना मागावे. असे माझे जगणे पंढरीनाथा, धिक्कारयुक्त बनले आहे. १ विठोबा, तुला म्हणावे तरी काय? तुझ्यासारख्या थोराच्या सहवासात सर्व शुभ अथवा अशुभ आम्हांला गोडच आहे. २ देवा, या संसाराची धास्ती आम्हांस निरंतर असते. आणि या संसारास अशी दशा प्राप्त झाली आहे की ती अवस्था पाहून मरण बरे असे वाटावे. ३ तुकाराम

[1] धन्य जिणे जाले

महाराज म्हणतात, देवा, आता दुसऱ्या देवांना मी शरण जाऊ काय ? देवा, ही लज्जेची गोष्ट आहे हे तुम्ही जाणीत नाही काय ? ४

४७१ पुरविली आळी । जे जे केली ते ते काळीं ॥ १ ॥
माय तरी ऐसी सांगा । कृपाळुवा पांडुरंगा ॥ २ ॥
घेतलें नुतरी उचलोनि कडियेवरी ॥ ३ ॥
तुका म्हणे घांस । मुखीं घाली ब्रह्मरस ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– आळी–हट्ट, कृपाळुवा–अत्यंत कृपाळू, नुतरी–न उतरी

अर्थ :– देवा, ज्या ज्या वेळी जो जो हट्ट केला तो तो तू पुरविलास. १ विठ्ठला, जन्म देणारी प्रत्यक्ष आई तरी एवढी कृपाळू असते का कधी ? २ देवा, तू आता मला उचलून कडेवर घेतले आहेस आता मी काही खाली उतरणार नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, या विठ्ठलाने माझ्या मुखात ब्रह्मरसाचा घास घातला आहे. ४

४७२ कथेची सामग्री । देह अवसानावरी ॥ १ ॥
नको जाऊं देऊं भंगा । गात्रें माझीं पांडुरंगा ॥ २ ॥
आयुष्य करीं उणें । परी मज आवडो कीर्तन ॥ ३ ॥
तुका म्हणे हाणी । या वेगळी मना नाणीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– अवसानावरी–संपल्यावर, गात्रें–अवयव, नाणीं–न आणी

अर्थ :– देवाचे कथाकीर्तन ऐकल्याचा उपयोग देह संपल्यावर लाभदायक आहे. १ देवा, तुमची कथा ऐकता यावी म्हणून माझे सर्व अवयव शेवटपर्यंत शाबूत ठेवा. त्यांचा भग करू नकोस. २ देवा, माझे आयुष्य वाटले तर कमी कर, पण माझी कीर्तनाची आवड मात्र वाढीस लागू दे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, जर कीर्तनाची आवड माझी कमी झाली तर त्यावेगळी दुसरी मोठी हानी नाही असेच माझ्या मनात येईल ४

४७३ गळित जाली काया । हेचि लळित पंढरिराया ॥ १ ॥
आलें अवसानापासीं । रूप राहिलें मानसीं ॥ २ ॥
वाइला कळस । तेथें स्थिरावला रस ॥ ३ ॥
तुका म्हणे गोड जालें । नारायणीं पोट धालें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– गळित–थकलेली, वाइला–पहिला

अर्थ – देवा, माझे शरीर आता थकले आहे रे. आता हेच लळित समजायचे काय ? १ माझा आता देह-पतनाचा शेवट जवळ आला असून माझे चित्त मात्र तुझ्याच रूपावर जडून राहिले आहे. २ आता दुरूनच मी तुझ्या मंदिराचा कळस पाहिला. त्याच स्थानावर माझा भक्तिभाव स्थिरावून राहिला आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, या नारायणात सर्व वृत्ती स्थिरावल्यामुळे सारेच गोड गोड होऊन गेले पोट भरून राहिले. ४

४७४ रत्नजडित सिंहासन । वरी बैसले आपण ॥ १ ॥
कुंचे ढळती दोहीं बाहीं । जवळी रखुमाई राही ॥ २ ॥
नाना उपचारीं । सिद्धि वोळगती कामारी ॥ ३ ॥
हातीं घेऊनि पादुका । उभा बंदिजन तुका ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :–कुंचे–चवऱ्या, वोळगती–तत्पर आहेत, कामारी–काम करणारी

अर्थ :– या रत्नजडित सिंहासनावर स्वतः पंढरीनाथ बसला आहे. १ दोनही बाजूनी चवऱ्या ढळत आहेत. जवळच राहीरखुमाई उभ्या आहेत २ नाना प्रकारचे उपचार करीत अनेक सिद्धी काम करण्यास तत्पर झाल्या आहेत. ३ अशा वेळी स्वामीच्या पादुका घेऊन तुकोबा सेवकासारखा उभा आहे. ४

४७५ हिरा शोभला कोंदणीं । जडित माणिकांची खाणी ॥ १ ॥
तैसा दिसे नारायण । मुख सुखाचें मंडण ॥ २ ॥
कोटि चंद्रलीळा[1] । पूर्णिमेच्या पूर्णकळा ॥ ३ ॥
तुका म्हणे दृष्टि धाये । परतोनि माघारी ते न ये ॥ ४ ॥

उब्दार्थ वटीपा :– धायें–सतुष्ट होते.

अर्थ :– रत्नजडित कोंदणात एखादा हिरा शोभून दिसावा, किंवा खाणीत माणीक शोभून दिसावे, १ तसा हा नारायण शोभून दिसतो आहे सर्व सुखाने हे श्रीमुख तेजस्वी व शोभिवंत दिसत आहे. २ पौर्णिमेच्या कोटी चंद्रांच्या कळा याच्यापुढे फिक्याच वाटतील. ३ तुकाराम महाराज म्हणतात, या सुंदर मूर्तीकडे पाहताच दृष्टी सुखावून गेली आहे. ती तेथून परत माघारी फिरतच नाही. ४

४७६ पतित पतित । परी मी त्रिवाचा पतित ॥ १ ॥
परी तूं आपुलिया सत्ता । मज करावे सरता ॥ २ ॥
नाहीं चित्तशुद्धि । स्थिर पायांपाशीं बुद्धि ॥ ३ ॥
अपराधाचा केलों । तुका म्हणे किती बोलों ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा '– सरता–परिपूर्ण, त्रिवाचा–तीन वेळा.

अर्थ.– देवा, मी पतित आहे असे त्रिवार, तीन वेळा मी म्हणत आहे. १ पण तू तुझी सत्ता गाजवून मला परिपूर्ण करावे माझे पाप दूर करावे २ माझे चित्त शुद्ध नाही. तुझ्या पायांशी बुद्धिही स्थिर होत नाही. ३ देवा, मी अपराधाचाच जणु बनलो आहे आणखी तुला सांगू तरी किती? ४

४७७ उभारिला हात । जगीं जाणविली मात ॥ १ ॥
देव बैसले सिंहासनीं । आल्या याचका होय[2] धनी ॥ २ ॥
एकाच्या कैवाडें । उगवे बहुतांचें कोडें ॥ ३ ॥
दोहीं ठायीं तुका । नाहीं पडों देत चुका ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – कैवाडें–कैवारे, अंगीकार

अर्थः– या देवाने अभयासाठी हा वर केला आहे. सर्व जगास ही गोष्ट समजून आली आहे, १ हा देव आज सिंहासनावर बसून शोभत आहे. जो याचक भक्त येईल त्याचा तो धनी बनत आहे. २ एकाच्या अंगीकारामुळे सारे दुष्काळांना निवारा दिला आहे दुष्काळांच्या आयुष्याची कोडी सोडविली आहेत. ३ तुकाराम महाराज म्हणतात, या देवाच्या व त्याच्या भक्ताच्या ठिकाणी मी कधी चुका करीत नाही. किंवा हा चुका करू देत नाही ४

## आशीर्वाद-अभंग

४७८ जीवेंसाटीं यत्नभाव । त्याची नाव बळकट ॥ १ ॥
पैल तीरा जातां कांहीं । संदेह नाहीं भवनदी ॥ २ ॥
विश्वासाची धन्य जाती । तेथें वस्ती देवाची ॥ ३ ॥
तुका म्हणे भोळियांचा । देव साचा अंकित ॥ ४ ॥

ब्दार्थ व टीपा – सदेह–शका.

अर्थ :– कोणताही प्रयत्न जीव समर्पण करण्याच्या भावनेने करावा. तरच बळकट नावेचे स्वरूप त्या प्रयत्नास येते. १ या नावेतून तो पैलतरीला जाईल यात काहीच शका नाही २ श्रीहरीवर विश्वास ठेवणाराची जात धन्य

१ चद्रकला, २ पुरे

होय त्याच्या ठिकाणी प्रत्यक्ष देवाचीच वस्ती असते ३ तुकाराम महाराज म्हणतात खरोखर भोळ्या भावाने भक्ती करणाऱ्याच्या स्वाधीन देव असतो ४

४७९ आशीर्वाद तया जाती । आवडी चित्तीं देवाची ॥ १ ॥
कल्याण तें असे क्षेम । वाढे प्रेम आगळें ॥ २ ॥
भक्तिभाग्यगाठी धन । त्या नमन जीवासी ॥ ३ ॥
तुका म्हणे हरिचे दास । तेथें आस सकळ ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – क्षेम–सुखदायक स्थिती आस–आशा

अर्थ – ज्याच्या चित्तात देवाची अखंड आवड असते त्यास पुढीलप्रमाणे आशीर्वाद असोत १ त्याचे कल्याण असावे त्याना सुखदायक स्थिती प्राप्त व्हावी देवाविषयीचे त्याचे प्रेम असेच विशेष रूपाने वाढावे २ ज्याच्या जवळ भक्तिभावाचे धन असेल त्या जीवाना माझा नमस्कार असो ३ तुकाराम महाराज म्हणतात जेथे हे हरीचे दास असतात त्याच्या ठिकाणी माझी सर्व आशा आहे ४

४८० तया सार्टी वेचू वाणी । अइको कानी वारता ॥ १ ॥
क्षेम माझे हरिजन । समाधान पुसता त्या ॥ २ ॥
परत्रींचे जे सागाती । त्याची याती न विचारीं ॥ ३ ॥
तुका म्हणे धैर्यवंतें । निर्मळचित्तें सरवीं तीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – वेचू–खर्च करून, परत्रीचे–परलोकाचे, याती–जात

अर्थ – पुढे दिलेल्या कार्यासाठी आम्ही आमची वाणी खर्च करू व कानानी त्याचीच हकीगत आम्ही ऐकू १ माझे सर्व कुशल ते हरीचे दासच आहेत त्याना विचारण्यातच मला पूर्ण समाधान आहे २ परलोकीचे जे माझे सागाती, सोबती आहेत त्याची जात मी विचारणार नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, हे सर्व हरीचे सेवक मोठे धैर्यवत व निर्मळ असे आहेत ४

४८१ अभय उत्तर सती केले दान । जाले समाधान चित्त तेणे ॥ १ ॥
आता प्रेमरसे न घडे खंडण । द्यावे कृपादान नारायणा ॥ २ ॥
आले जें उचित देहविभागासी । तेणे पायापासीं उभी असो ॥ ३ ॥
तुका म्हणे करी पूजन वैखरी । बोबडा उत्तरीं गातो गीत ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – वैखरी–वाणीने

अर्थ – तू काही भिऊ नकोस अशा शब्दानी या सतानी मला अभयदान दिले आहे त्यामुळे माझ्या मनास फार समाधान झाले आहे १ आता या भक्तिप्रेमाच्या रसास खड पडणार नाही नारायणा, हीच कृपा आपण मला द्यावी २ या देहाचे म्हणून जे जे उपचार असतील ते सव कर्तव्य म्हणून आम्ही करू याचसाठी आम्ही आपल्या पायाशी उभे आहोत ३ तुकाराम महाराज म्हणतात मी देवाची पूजा माझ्या वाणीने करीत असतो व माझ्या बोबडच्या वाणीने त्याचे गीत गात असतो ४

४८२ असो मन्त्रहीन क्रिया । नका चर्या विचारू ॥ १ ॥
सेवेमधीं जमा धरा । कृपा करा शेवटीं ॥ २ ॥
विचारूनि ठाया ठाव । येथें भाव राहिला ॥ ३ ॥
आता तुकयापाशीं हेवा । नाहीं देवा तातडी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – चर्या–रोजचे आचार, दिनचर्या

अर्थ :- देवा, आम्ही मंत्रतंत्र जाणीत नाही, आम्हांस विधियुक्त क्रियाकर्म माहीत नाही. त्यासंबंधी आम्हांस काही विचारू नकोस. तरीसुद्धा तुला विनंती अशी की आमच्या दिनचर्येचा तू फार विचार करू नकोस २ आमचे जे काही कमी पडेल ते आमची जो सेवा तुमचेकडे रुजू आहे त्यात जमा करून घ्यावे; व शेवटी आमच्यावर कृपाच करावी. ३ देवा, आता या तुकारामापाशी कमलाही हेवादावा नाही, कसलीही हाव नाही किंवा कशाच्याही विषयी घाई नाही. ४

४८३ ऐकें वचन कमळापती । मज रंकाची विनंती ॥ १ ॥
कर जोडितों कथाकाळीं । आपण असावें जवळी ॥ २ ॥
*घेईं ऐसी भाक । मागेन जरि कांहीं आणिक ॥ ३ ॥*
तुकयाबंधु म्हणे देवा । शब्द इतुका[1] राखावा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – कमळापती–श्रीविष्णू, रंकाची–गरीबाची, भाक–वचन.

अर्थ :- कमलापती विष्णू, माझे एवढे वचन ऐका ना. माझी गरिबाची एक विनंती ऐका १ कथेच्या वेळी हात जोडून मी विनवितो की आपण मजजवळ असावे. २ याशिवाय मी आणखी काही दुसरे मागणार नाही असे वचन देतो देवा ३ तुकयाबधू म्हणत आहे, देवा एवढे वचन पूर्णपणे राखावे. ४

४८४ आली लळिताची वेळ । असा सावध सकळ ॥ १ ॥
लाहो करा वेगीं स्मरा । टाळी वाउनि[2] विश्वंभरा ॥ २ ॥
जालिया अवसान । न संपडती चरण ॥ ३ ॥
तुकयाबंधु म्हणे थोडे । अवधि उरली आहे पुढें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – लळिताची–फजितीची, लाहो–लाभ, अवसान–शेवट

अर्थ:- एकदा का फजितीची वेळ आली की मग काही उरत नाही. म्हणून सावध असा. १ चटकन त्या ईश्वराचे स्मरण करून त्याचा लाभ करून घ्या. त्या विश्वंभरास टाळी वाजवून संतुष्ट करा. २ एकदा का देहाचे पतन झाल्यावर मग काही या ईश्वराची पावले दिसणार नाहीत. ३ तुकयाबंधू म्हणत आहे, या गोष्टीस दिवस काही फार उरले नाहीत थोडाच अवधी आहे. ४

४८५ नेणें गाऊं कांहीं धड बोलतां वचन ।
कायावाचामनेंसहित आलों शरण ॥ १ ॥
करीं अंगीकार नको मोकलूं हरी ।
पतितपावन ब्रिदें करावीं खरीं ॥ २ ॥
नेणे भक्तिभाव तुझा म्हणवितों दास ।
जरि देसी अंतर तरि लज्जा कोणास ॥ ३ ॥
*म्हणे तुकयाबंधु तुझे धरियेले पाये ।*
आतां कोण दुजा ऐसा आम्हांसी आहे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:- अंगीकार–स्वीकार, मोकलूं–दूर करू, ब्रीदें–प्रतिज्ञा.

अर्थ – देवा, मला कांही सुस्वर गळ्याने गाता येत नाही. धड चार शब्द बोलता येत नाहीत. कायावाचा-मनासहित मी तुम्हांस शरण आलो आहे. १ तेव्हा माझा तुम्ही स्वीकार करावा. श्रीहरी, मला तुम्ही दूर करू नये पतिताला पावन करण्याची तुमची प्रतिज्ञा आहे. हा तुमचा लौकिक तुम्ही खरा करून दाखवावा. २ देवा, मी

१ इतुकाचि, २ वाहोनि

भक्तिभावही नीटसा जाणीत नाही, फक्त तुझा सेवक मात्र मी आहे पण आता मला जर अंतर देशील तर मा याची लाज कुणाला वाटणार आहे ? ३ तुकयाबंधू म्हणत आहे, म्हणून देवा, तुझे पाय धरून ठेविले आहेत आता तुझ्याखेरीज आमचे रक्षण करणारा दुसरा कोण आहे ? ४

४८६ तूच मायबाप बंधु सखा आमचा । वित्त गोत जीवलग जीवाचा ॥ १ ॥
आणीक प्रमाण नाही दुसरे आता । योगक्षेमभार तुझे घातला माथा ॥ २ ॥
तूच क्रियाकर्म धर्म देव तू कुळ । तूच तप तीर्थ व्रत गुरु सकळ ॥ ३ ॥
म्हणे तुकयाबंधु करिता कार्यता देवा । तूच भाव भक्ति पूजा पुनस्कार[1] आघवा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – वित्त–संपत्ती, गोत–नातेवाईक

अर्थ – देवा, तूच माझी आई आहेस बाप, बंधू, मित्र सारी नाती तुझ्यातच माझी आहेत संपत्ती, नातेवाईक जीवाचा जीवलग सर्व काही तूच आहेस १ तुझ्याशिवाय मला दुसरे कसलेही प्रमाण नाही माझा सर्व चरितार्थाचाही तुझ्याचवर भार टाकून मी आहे २ माझे क्रियाकर्म धर्म, देव, कुळधर्म सर्व काही देवा, तूच आहेस तूच तपश्चर्या, व्रते, गुरुनाथा, सर्व काही तूच आहेस ३ तुकयाबंधू म्हणत आहे, देवा तूच सर्व कार्य करविता व कार्य करणारा असून माझी सर्व पूजा व भावभक्तीही तूच आहेस ४

विवरण – भक्तांनी ईश्वराशी, सगुण परमेश्वराशी जी अनेक नाती जोडिली आहेत त्यात आईबापाच विशेषत आईचे नाते विशेष प्रकारचे आहे ईश्वर आपली आई आहे असे मानल्यावर मग त्यात सर्व आले लडिवाळपणा आला, हट्ट आला, आग्रह आला, रुसणफुगण आले, करुणा भाकणे आले आईचे हृदय किती कोमल व विशाल ! म्हणून मराठी संतांनी विठ्ठलाला आई, माउली म्हणून हाक मारिली आहे दुसऱ्या एका अभंगात 'कृष्ण माझी माता, कृष्ण माझा पिता' असे तुकोबांनीच म्हटले आहे तू मायबाप आहेस, तू सखा आहेस, तू गुरू आहेस असा आर्ततेचा भाव तुकोबांच्या अनेक अभंगातून प्रकट झालेला दिसतो ज्या ब्रह्मतत्त्वापासून हे सर्व चराचर जगत् आकारास आले त्याच्या सगुण रूपास जनकत्वाचा मान आपोआपच येतो भगवद्‌गीतेतही 'पिताहमस्य जगतो माता धाता पितामह ' या जगाचा मी पिता, माता, धाता ( आधारा ) पितामह ( आजा ) आहे असे भगवंतानेच आपल्या मुखाने सांगितले आहे आणि पुढे अकराव्या अध्यायात विश्वरूपदर्शनाच्या नंतर अर्जुनाने श्रीकृष्णाची जी स्तुती केली आहे त्यातही 'पितासि लोकस्य चराचरस्य त्वमस्य पूज्यश्च गुरुर्गरीयान्' तूच या चराचराचा पिता असून पूज्य व गुरूचा गुरू तूच आहेस असे म्हटले आहे

मराठी संतांनी याच भावनेचा अनुवाद आपल्या भक्तितत्त्वविवेचनात व पारमार्थिक अनुभवात केलेला दिसून येतो याच वृत्तीने ज्ञानदेवांनी अनुभवामृताच्या प्रारंभीच *'ऐसीं इयें निरुपाधिकें । जगाचीं जियें जनकें'* म्हणून सृष्टीच्या आदिकारणांना आईबाप म्हणून वंदन केले आहे हा ईश्वरच सर्व चराचराचे जन्मस्थान असल्याने मातृभावाने त्याच्याकडे पाहण्यास संतांना संकोच वाटला नाही मीच सर्व व्यक्त जगताचा पिता व मीच माता या नात्याचे स्पष्टीकरण ज्ञानेश्वरांनी देताना म्हटले आहे 'मं जयाचेनि अंगसंगें । इये प्रकृतीस्तव अप्दागें । जन्म पाविजत असे जगें । तो पिता मी गा ॥ अर्धनारी नटेश्वरीं । जो पुरुष तोचि नारी । तैंवि मी चराचरीं माताही होय' हे मातृत्वाचे पितृत्वाचे नाते ध्यानात ठेवूनच मराठी संतांनी या ईश्वरास मनोभावे आळविले आहे

४८७ करुनि उचित । प्रेम घालीं हृदयात ॥ १ ॥
आलो दान मागायास । थोरी करूनिया आस ॥ २ ॥
चिंतन समयीं । सेवा आपुलीच देईं ॥ ३ ॥
तुकयाबंधु म्हणे भावा । मज निरवावे देवा ॥ ४ ॥

---

१ पुरस्कार अवघा

शब्दार्थ व टीपा :– थोरी–मोठी, आस–इच्छा, आशा, निरवावें–सोपवावे.

अर्थ :– देवा, तुझ्याविषयीचे उचित असे प्रेम माझ्या हृदयात निर्माण होऊ दे. १ हेच दान देवा, मी तुला मागायला आलो आहे. मला तुझी फार मोठी आशा आहे. २ देवा, मी तुझे चिंतन जेव्हा करीन तेव्हा तुझीच सेवा माझ्या हातून व्हावी. ३ तुकयाबंधू म्हणत आहे, देवा, तुझ्याविषयीच्या भावाजवळच मला सोपवावे. तो भाव सतत माझ्या चित्तात असावा. ४

४८८ गाऊं वाऊं टाळी रंगीं नाचों उदास ।
*सांडोनि भय लज्जा शंका आस निरास ॥ १ ॥*
बळियाचा बळी तो कैवारी आमुचा ।
भुक्तिमुक्तिदाता सकळां ही सिद्धींचा ॥ २ ॥
मारूं शब्दशस्त्रबाण निःशंक अनिवार ।
कंटकांचा चुर शिर फोडूं काळाचें ॥ ३ ॥
म्हणे तुकयाबंधु नाहीं जीवाची चाड ।
आपुलिया तेथें काय आणिकांची भीड ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– कंटकांचा–दुष्टाचा, चुर–चुरा, शिर–डोके

अर्थ :– श्रीहरीच्या भक्तिप्रेमाच्या रंगात येऊन, टाळी वाजवून त्याचे नाम गाऊ. त्याच्या नादात उदास वृत्तीचे होऊन नृत्य करू. यावेळी लौकिकाची आशा, भीती, लाज, शंका, इच्छा, निराशा इत्यादी वृत्तींचा त्याग करू. १ सर्व बलवंतांचा बलवंत असणारा हा श्रीहरी आता आमचा कैवारी झाला आहे. तोच आम्हांस भक्ती, मुक्ती देणार असून सर्व सिद्धी त्याच्याच कृपेने आम्हांस प्राप्त होणार आहेत. २ आता कुणाचीही शंका व भीती न धरता शब्दशस्त्रांच्या व तीक्ष्ण बाणांच्या साह्याने दुष्टांचे चूर्ण करून टाकू. प्रत्यक्ष काळाचेही डोके आम्ही फोडू. ३ तुकयाबंधू म्हणत आहे, या बाबतीत आम्हाला आमच्या जीवाची काही पर्वा नाही. येथे इतरांची भीड धरण्याचे कारण तरी काय आहे ? ४

४८९ सांडूनि वैकुंठ । उभा विटेवरी नीट॥ १ ॥
आला आला रे जगजेठी । भक्ता पुंडलिकाचे भेटी ॥ २ ॥
पैल चंद्रभागे तिरीं । कट धरुनियां करीं ॥ ३ ॥
तुकयाबंधु म्हणे अंबर । गजर होतो जयजयकार ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– सांडूनि–सोडून, अंबर–आकाश

अर्थ :– प्रत्यक्ष वैकुंठ सोडून हा श्रीहरी या पृथ्वीलोकात येऊन एका साध्या विटेवर उभा राहिला आहे. १ हा जगन्नायक या भक्त पुंडलिकासाठी या भूमीवर आला आहे २ चंद्रभागेच्या पलीकडच्या तीरावर कमरेवर हात ठेवून हा उभा आहे. ३ तुकयाबंधू म्हणत आहे की, याच्या जयजयकाराने सारे आकाश भरून गेले आहे. ४

४९० कृपाळु भक्तांचा । ऐसा पति गोपिकांचा ॥ १ ॥
उभा न पाचारितां दारीं । न सांगतां काम करी ॥ २ ॥
भाव देखोनि निर्मळ । रजां वोडवी कपाळ ॥ ३ ॥
तुकयाबंधु म्हणे न भजा । कां रे ऐसा भोळा राजा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – पाचारितां–बोलाविता, रजां–धूलिकणासाठी, वोडवी–पुढे करितो

अर्थ – हा गोपिकांचा पती श्रीहरी आपल्या भक्तावर मोठा कृपाळू आहे १ न बोलवितांही हा भक्ताच्या दारात त्याच्या साहाय्यार्थ उभा असतो न सांगता तो त्याचे काम करीत असतो २ आपल्या भक्ताच्या मनातील निर्मळ भाव पाहून हा देव त्याच्या चरणांच्या धूलिकणासाठी आपले कपाळ पुढे करीत असतो ३ तुकयाबधू असे म्हणत आहे की, अशा या भोळ्या देवाच्या राजास तुम्ही का नाही भजत ? ४

४९१ केला अंगीकार पंढरीच्या देवे ।
आता काय करिती काळ मशक मानवे ॥ १ ॥
घातलीं बाहेर तीं भय होते ज्याने ।
बैसला आपण तेथें घालुनिया ठाणे ॥ २ ॥
लागो नेदी वारा दुजियाचा अगासी ।
हा पुरता निर्धार कळो आला आम्हासी ॥ ३ ॥
म्हणे तुकयाबधु न लगे करावी चिंता ।
कोणेविशीं आता बैसलो हस्तीवरी माथा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – अंगीकार–स्वीकार, मशक–चिलट, निर्धार–निश्चय

अर्थ – आता या पंढरीच्या देवाने एकदा माझा स्वीकार आपला म्हणून केल्यावर आता कसली भीती ? आता तो प्रत्यक्ष काळसुद्धा क्षुद्र चिलटासारखा मानावा १ शरीरात कामक्रोधादिक वृत्ती ज्या भीती निर्माण करणाऱ्या होत्या त्याना बाहेर घालवून तो स्वतःच हृदयामध्ये ठाण मांडून बसला आहे २ दुसऱ्या कोठल्याही वायाचा स्पर्श अंगास होऊ नये म्हणून हा काळजी घेत असतो हा त्याचा निश्चय आम्हास पूर्णपणे समजला आहे ३ तुकयाबधू म्हणत आहे की, आता आम्हास कसलीही चिंता करावी लागत नाही याच्या कृपेने आम्ही आता जणु हत्तीच्याच मस्तकावर बसलो आहोत एवढे श्रेष्ठ झालो आहोत ४

विवरण – एकदा ईश्वराने आपला स्वीकार केल्यावर मग आपणास कसलीही चिंता उरत नाही हा भाव संताच्या अभंगात वारंवार प्रकट झालेला आहे मज का लागणे करावा विचार । ज्याचा भार त्याच्या माथा ' असा निर्वाळा तुकोबानी इतरत्र दिला आहे आपल्या भक्ताचे सर्व काही कोडकौतुक परमेश्वर करतो त्याची टाच हृदयावर धारण करण्यात परमेश्वरास धन्यता वाटते त्याला आपल्या माथ्यावरील मुकुट करून नाचण्यात तो तृप्त होतो ' तैसा मी वाचूनि कांहीं । आणिक गोमटेंचि नाहीं । मजचि नाम पाहीं । जिहीं या ठेविलें ॥ ऐसे अनन्य गतिके चित्तें । चिंतितसाते मातें । जे उपासिती तयातें । मीचि सेवी ॥ आपुली तहानभूक नेणे । तान्हया निकें तें माउलीसीचि करणें । तैसे अनुसरले जे मज प्राणें । तयाचें न काइसेनिहि न लजे मी ?' इतकी चिंता ईश्वर आपल्या भक्ताची करीत असता आपल्या हृदयाचा पिंजरा करूनच जणु तो त्यास जपत असतो एखादा भक्त शरीराने विकल असेल तर त्याची काळजी भगवंत अधिकच घेतात अशी साक्ष आहे ' देहवैकल्याचा वारा । झणें लागेल या सुकुमारा । म्हणोनि आत्मबोधाचे पांजिरा । सुयें तयातें ' असे श्रीज्ञानेश्वरानी भगवंताच्या मुखातील वक्तव्य प्रकट केले आहे एकदा या परमेश्वराने हृदयामध्ये स्थान केले, तथे निवास केला म्हणजे मग तुकारामबुवा म्हणतात त्याप्रमाणे कामक्रोधादी वृत्ती निघून जातात त्याच वास्तव्यच तिथे उरणार नाही याविषयीही ज्ञानदेवानी निर्णय दिला आहे ' तैसा हृदयामध्यें मी रामु । असता सर्वसुखाचा आरामु । का भ्रांतासि कामु विषयावरी ' मी एकदा हृदयात असता तेथे कामादिक वृत्तीच उमटणार नाहीत असा भावार्थ एकनाथानीही भागवतात म्हटले आहे, ' जेथें मी क्रीडे आत्मारामु । तेथ केवी रिघे बापुडा कामु ? जेथ मी रमें पुरुषोत्तमु । तेथें कामकर्म रिघेना ।'

४९२ अगोचरी बोलिलों आज्ञेविण आगळें ।
परी तें आतां न[1] संडावें राउळें ॥ १ ॥
जाईल रोकडा बोल न पुसती आम्हां ।
तुझा तुझें म्हणविले पाहा पुरुषोत्तमा ॥ २ ॥
न व्हावा न वजावा न कळतां अन्याय ।
न धरावें तें मनीं भलता करा उपाय ॥ ३ ॥
म्हणे तुकयाबंधु हीन मी म्हणोनि लाजसी ।
वारा लागों पाहातोहे उंच्या झाडासी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा –अगोचरी–जास्त वायफळ, मर्यादा सोडून, राउळें–देवाने, वजावा–जावा

अर्थ :– देवा, मी काही मर्यादा सोडून बोललो असेन तर, आज्ञेशिवाय काही जास्त न बोलावे ते बोललो असेन तरी त्यासाठी तुम्ही माझा आता त्याग करू नये. मला सोडू नये. १ हे पुरुषोत्तमा, तू मला आपले म्हटले आहेस. आता मला जर न विचारशील तर तुझा हा लौकिक व्यर्थ होईल ना? २ होऊ नये तो अन्याय, होऊन जाऊ नये तो माझ्याकडून जरी झाला असेल तरी मनात न धरता कोणत्याही उपायाने माझे रक्षणच करावे ३ तुकयाबंधू म्हणतो की देवा, मी फार हीन आहे म्हणून का तू लाजतोस ? पण उंच असलेल्या झाडासच जसा वारा लागतो तसा जो अवगुणांनी उंच व श्रेष्ठ आहे त्यावरच तुझे लक्ष अधिक हवे ४

४९३ जाली पाकसिद्धि वाट पाहे रखुमाई । उदक तापलें डेरां चौकसा मर्दुनि पाईं ॥ १ ॥
उठा पांडुरंगा उशीर जाला भोजनीं । उभ्या आंचवणा गोपी कळस घेउनी ॥ २ ॥
अवघ्या सावचित्त सेवेलागीं सकळा । उद्धव अक्रूर आले पाचारूं मुळा ॥ ३ ॥
सावरिली सेज सुमनयाति सुगंधा । रत्नदीप ताटीं वाळा विडिया विनोदा ॥ ४ ॥
तुका विनंती करी पाहे पंढरीराणा । असा सावचित्त सांगे सकळा जना ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– चौकसा–उटणे, सुगंधी पदार्थ, कळस–कलश, तांब्या

अर्थ :– पंढरीराया, स्वयंपाक आता तयार असून रखुमाई आता तुमचीच वाट पाहात आहे. हंडा भरून पाणी तापले आहे. तुमच्या पायास सुगंधी पदार्थ व उटणे वगैरे लावू द्या ना. १ पांडुरंगा, आता उठा ना! भोजनास फार उशीर झाला आहे तुमच्या हातावर पाणी घालण्यासाठी या गोपी हातात पाण्याचे तांबे घेऊन उभ्या आहेत २ या सर्वजणी सावधान चित्ताने तुमच्या सेवेसाठी तत्पर आहेत. उद्धव, अक्रूर हेही तुम्हास आमंत्रण देण्यास आले आहेत. ३ नाना प्रकारच्या सुगंधित फुलांनी तुमची शेज तयार करून ठेविली आहे ताटात रत्नांचे दिवे लावून तुम्हा ओवाळण्याची तयारी आहे, तबकात वाळा वगैरे सुगंधी द्रव्ये व तुमच्या संतोषासाठी विडे वाट पाहात आहेत. ४ तुकारामबुवा विनंती करीत आहेत की, हा पंढरीचा राणा सांगत आहे की सर्वांनी सावध चित्ताने असावे. ५

४९४ उठा सकळ जन उठिले नारायण । आनंदले मुनिजन तिन्ही लोक ॥ १ ॥
करा जयजयकार वाद्यांचा गजर । मृदंग विणे अपार टाळ घोळ ॥ २ ॥
जोडोनि दोन्ही कर मुख पाहा सादर । पायावरी शिर ठेवूनियां ॥ ३ ॥
तुका म्हणे काय पढियेतें ते मागा । आपुलाले सांगा सुख दुःख ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा .– पढियते–आवडते

[1] न संडावें कृपाळु राउळें.

अर्थ :–लोकहो तुम्ही सर्वजण आता उठून उभे राहा. कारण नारायण उठून उभे राहिले आहेत. त्यांना पाहून सर्व मुनिलोक आनंदून गेले आहेत. तीनही लोकात आनंद पसरला आहे. १ चला, या पंढरीनाथाचा जयजयकार करा. वाद्यांचा गजर होऊ द्या. मृदंग, वीणा, टाळ, घोळ यांचा एकच ध्वनी होऊ द्या २ याच्यापुढे दोनही हात जोडून याचे श्रीमुख मोठ्या आदराने, कौतुकाने पाहा ना. याच्या पायावर डोके ठेवा. ३ तुकाराम महाराज म्हणतात, तुम्हांस जे काय आवडते ते यास मागा. आपले जे काय सुखदु:ख असेल ते या पांडुरंगास सांगा. ४

४९५ करूनी विनवणी पायीं[1] ठेवीं माथा । परिसावी विनवणी[2] माझी पंढरीनाथा ॥ १ ॥
अखंडित असावेंसें वाटतें पायीं । साहोनि संकोच ठाव थोडासा देईं ॥ २ ॥
असो नसो भाव आलों तुझिया ठाया । पाहें कृपादृष्टी मज पंढरीराया ॥ ३ ॥
तुका म्हणे आम्हीं तुझीं वेडीं वांकुडीं । नामें भवपाश हातें आपुल्या तोडीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– परिसावी–ऐकावी, ठाव–स्थान

अर्थ :– देवा, माझ्या उद्धाराची विनवणी करून मी तुझ्या पायी माझा माथा ठेविला आहे. माझी विनंती आता पंढरीनाथा, तुम्ही ऐकावी. १ तुझ्या पायांशी अखंडपणे असावे अशी माझी इच्छा आहे देवा. थोडा संकोच सहन करून मला तुझ्या पायांशी स्थान दे ना. २ माझ्या मनात विठ्ठला, भाव असो, नसो, मी तुला शरण आलो आहे; पंढरीनाथा, तू कृपादृष्टीने माझ्याकडे पाहा ना. ३ तुकाराम महाराज म्हणतात, आम्ही वेडीवाकुडी असलो तरी तुझीच आहोत. तू आमचे भवपाश तुझ्या नामाच्या सामर्थ्याने तोडून टाक. ४

४९६ घडिया घालुनि तळीं चालती वनमाळी । उमटती[3] कोमळीं कुंकुमाचीं ॥ १ ॥
वंदा चरणरज अवघे सकळ जन । तारियेले पाषाण उदकीं जेणें ॥ २ ॥
पैस धरुनी चला ठाकत ठायीं ठायीं । मौन्य धरुनी कांहीं नो बोलावें ॥ ३ ॥
तुका अवसरु जाणवितो पुढें । उघडलीं महाल मंदिरें कवाडें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:– पैस–मोठी ऐसपैस जागा, कवाडे–दारे

अर्थ:– खाली वाटेवर पायघड्या घालून हा वनमाळी त्यांवरून चालत आहे. त्यावेळी त्याची कुंकुमाची पावले कशी स्पष्ट उमटतात १ सर्व लोकहो, या श्रीहरीच्या पावलावरील धूलिकणाना वंदन करा. या पायांच्या योगाने पाण्यावर दगडसुद्धा तरलेले आहेत २ देवास उभे राहण्यासाठी चांगली ऐसपैस जागा ठेवून चला; ठिकठिकाणी उभे राहा. मौन धारण करा काही उगाच बोलू नका. ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी हळूहळू वेळ साधून पुढे जात आहे. देवाच्या शेजघराची दारे उघडलेली आहेत ४

४९७ भीतरी गेले हरी राहा क्षणभरी । होईल फळ धीर करावा ॥ १ ॥
न करीं त्वरा ऐकें मात । क्षण एक निवांत बैसावें ॥ २ ॥
करूनी मर्दन सारिलें पाणी । न्हाले देव अंग पुसी भवानी ॥ ३ ॥
नेसला सोनसळा विनवी रखुमाई । वाढिलें आतां ठायीं चलावें जी ॥ ४ ॥
करुनियां भोजन घेतलें आंचवण । आनंदें नारायण पहुडले ॥ ५ ॥
तुका मात जाणवी आतां । सकळां बहुतां होतीची[4] ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा :– भीतरी–आत, भवानी–लक्ष्मी, सोनसळा–जरतारी पितांबर, मात–गोष्ट

अर्थ:– श्रीहरी शेजघरात गेले आहेत, क्षणभर बाहेर उभे राहा तुम्ही जरा धीर धरून वागलात तर तुमची इच्छा पूर्ण होईल. १ उगाच घाई करू नका. माझी गोष्ट तर नीट ऐका क्षणभर निवांतपणे स्वस्थ बसून राहा. २ या देवाच्या अंगास सुगंधी तेलाने व द्रव्यांनी, उटण्यांनी चांगले मर्दन करून अभ्यंगस्नान उष्ण पाण्याने घातले

१ चरणी, २ विनंती, ३ उठती, ४ होनी चित्ती

आहे. देवाचे स्नान झाले असून त्यांचे अंग लक्ष्मी मोठ्या प्रेमाने पुशीत आहे. ३ स्नान झाल्यावर या श्रीहरीने जरतारी पीतांबर नेसला. नंतर 'ताट वाढले आहे भोजनास लौकर चलावे' अशी विनंती रखुमाईने विठ्ठलास केली. ४ मग नारायणांनी यथेच्छ भोजन केले व हात धुतले. नंतर नारायण स्वस्थ चित्ताने पलंगावर पहुडले. ५ सर्वांच्या चित्तात जी गोष्ट होती तीच तुकाराम महाराज म्हणतात, मी आज जाणली. एक अलौकिक सुख अनुभविले. ६

४९८ द्या जी आम्हां कांहीं सांगा जी रखुमाई । शेष उरलें ठायीं सनकादिकांचें ॥ १ ॥
टोकत बाहेरी बैसलो आशा । पुराया ग्रासा एकमेकां ॥ २ ॥
येथवरी आलों तुझिया नांवें । आस करुनी आम्हीं दातारा ॥ ३ ॥
प्रेम देउनियां वहुडा आतां दिला[1] । तुका म्हणे आतां विठ्ठल बोला ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:– शेष–उरलेले, वहुडा–निरोप.

अर्थ:– रखुमाई, आता आम्हास नारायणाबरोबर सनकादिक जेवून काही उरले असेल ते घ्यापला सांगा ना. १ आम्ही मोठी आशा धरुन, टक लावून बसलो आहोत. आम्हा सर्वांना, एकमेकांना पुरेल एवढा उरलेला घास आम्हांस द्यावा. २ देवा, दातारा, तुझी मोठी आशा धरुन, तुझे नाम घेत आम्ही येथे आलो आहोत. ३ तुकाराम महाराज म्हणतात, या देवाने प्रेमाने मला आतां निरोप दिला आहे. चला आता त्या विठ्ठलाचा गजर करा ना. ४

४९९ वहुडविले जन मन जालें निश्चळ । चुकवूनी कोल्हाळ आला तुका ॥ १ ॥
पर्यंकी निद्रा करावें शयन । रखुमाई आपण समवेत ॥ २ ॥
घेउनियां आलों हातीं टाळ वीणा । सेवेसि चरणा स्वामीचिया ॥ ३ ॥
तुका म्हणे आतां परिसावीं सादरें । बोबडीं उत्तरें पांडुरंगा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:– वहुडविले–निरोप देऊन पाठविले, कोल्हाळ–गोंगाट.

अर्थ:– आता या लोकांना प्रेमाने निरोप देऊन पाठविले असल्यामुळे मन निश्चित व शांत झाले आहे. या सर्व लोकांचा गोंगाट संपल्यामुळे तुकारामबुवा सावकाशपणे नारायणाजवळ येऊन म्हणू लागले, 'नारायणा, आता रखुमाईसमवेत आपण या पलंगावर सुखाने निद्रा करावी. २ मी हातात टाळ, वीणा घेऊन आपली चरणसेवा करण्यासाठी आलो आहे' ३ तुकाराम महाराज म्हणतात, आता देवा, माझी बोबडी वाणी कौतुकाने ऐकावी ४

५०० नाच गाणें माझा जवळील ठाव । निरोपीन भाव होईल तो ॥ १ ॥
तुम्हां निद्रा मज आज्ञा ते स्वभावें । उतरूनि जीवें जाईन[2] लोण ॥ २ ॥
एकाएकीं बहु करीन सुस्वरें । मधुर उत्तरें आवडीनें ॥ ३ ॥
तुका म्हणे तूं जगदानी उदार । फेडशील भार एका वेळा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:– जगदानी–जगाला दान देणारा

अर्थ – तुमच्यासाठी देवा, नृत्यगायन करावे हेच माझे मुख्य काम आहे. हाच भक्तिभाव मी तुम्हास समर्पित करीन. १ तुमची निद्रा होच मला माझ्या स्वभावानुसार आज्ञा आहे. म्हणून मी माझा जीव तुमच्यावर ओवाळून टाकीन. २ देवा, मी या एकाच स्थानी राहून सुस्वर सुरांनी व मधुर स्वरानी मी माझे गायन तुम्हांस ऐकवीन ३ तुकाराम महाराज म्हणतात, 'देवा, तू जगास दान देणारा अति उदार असा देव आहेस. माझ्या प्रपंचाचे ओझे तू दूर करशील. ४.'

५०१ सिणलेती सेवकां देउनि इच्छादान । केला अभिमान अंगीकारा ॥ १ ॥
अहो दीनानाथा आनंदमुरती । तुम्हांसि शोभती ब्रीदें ऐसीं ॥ २ ॥

१ जाला, २ निवलोण.

बहुतांनीं विनविलें[1] बहुतां प्रकारीं । सकळां ठायीं हरी पुरलेती ॥ ३ ॥
तुका म्हणे अगा कुटुंबवत्सळा । कोण तुझी लीळा जाणे ऐसी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपाः– आनंदमुरती–आनंदाची मूर्ती

अर्थ– आपल्या भक्तांना इच्छेनुसार दान देऊन देवा, तुम्ही फारच दमलेले दिसता. भक्तांचा स्वीकार मोठ्या अभिमानाने करून तुम्हांस फारच श्रम झालेले दिसतात. १ अहो दीनानाथा, आनंदमूर्ती पांडुरंगा, भक्तांचा उद्धार करण्याची ब्रीदे तुम्हांसच शोभून दिसतात. २ श्रीहरी, तुम्हांला पुष्कळ भक्तांनी पुष्कळ प्रकारानी विनविले, आणि तुम्हीही सर्वांच्यावर कृपा करून पुरलात ३ तुकाराम महाराज म्हणतात, अरे, कुटुंबवत्सला देवा, तुझा महिमा कोण जाणणार आहे ? ४.

५०२ उठा भागलेती उजगरा । जाला स्वामी निद्रा करा ॥ १ ॥
वाट पाहाते रुक्मिणी । उभी मंचक संवारुणी ॥ २ ॥
केली करा क्षमा । वडवड पुरुषोत्तमा ॥ ३ ॥
लागतो चरणा । तुक्याबंधु नारायणा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपाः– उजगरा–जागरण

अर्थः– स्वामी नारायणा, तुम्हांस जागरणाचे फार श्रम झाले आहेत. उठा आता विठ्ठला, स्वस्थपणे झोप घ्या. १ तुमच्या पलंगावर शेज करून ही रुक्मिणीदेवी तुमची वाट पाहात आहे २ पुरुषोत्तमा, मी फार वडवड केली आहे आतापर्यंत; त्याबद्दल मला क्षमा करावी आपण ३ हा तुकयाबंधू नारायणा, तुमच्या चरणांना वंदन करीत आहे. ४.

५०३ पावला प्रसाद आतां उठोनि जावें । आपला तो श्रम कळों येतसे जीवें ॥ १ ॥
आतां स्वामी सुखें निद्रा करा गोपाळा । पुरले मनोरथ जातों आपुलिया स्थळा ॥ २ ॥
तुम्हांसि जागवूं आम्ही आपुलिया चाडा । शुभाशुभ कर्मे दोष वाराया[2] पीडा ॥ ३ ॥
तुका म्हणे दिलें उच्छिष्टाचें भोजन । आम्हां आपुलिया नाहीं निवडिलें भिन्न ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपाः– वाराया–दूर करण्यासाठी, पीडा–दुःख.

अर्थ– देवा, आता आम्हांस तुमचा प्रसाद मिळालेला आहे आता तुम्ही सुखाने निद्रा करावी. आपण आम्हासाठी जे कष्ट घेतले आहेत ते आम्हांस समजून आले आहेत. १ स्वामी, गोपाळा, आता सुखरूपपणे झोप घ्यावी. माझे सर्व मनोरथ पूर्ण झाल्यामुळे मी आता माझ्या ठिकाणी परत जातो. २ आमची शुभाशुभ कर्मे नीट व्हावीत व दोष दूर व्हावेत म्हणून आमच्याच हीतेसाठी आम्ही तुम्हास जागविले देवा. ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तुम्ही तुमच्या भोजनातील उच्छिष्टाचा प्रसाद दिला. तुम्ही आपणांपेक्षा वेगळे असे मला मानले नाही हे माझे केवढे भाग्य! ४

५०४ शब्दांचीं रत्नें करूनी अळंकार । तेणें विश्वंभर पूजियेला ॥ १ ॥
भावाचे उपचार करूनि भोजन । तेणें नारायण जेवविला ॥ २ ॥
संसारा हातीं दिलें आंचवण । मुखशुद्धी मन समर्पिलें ॥ ३ ॥
रंगलीं इंद्रियें सुरंग तांबूल । माथां तुळसीदळ समर्पिलें ॥ ४ ॥
एकभावदीप करूनि निरांजन । देऊनि आसन देहाचें या ॥ ५ ॥
न बोलोनि तुका करी चरणसेवा । निजविलें देवा माजघरीं ॥ ६ ॥

---
१ निरविले, २ हाराया

शब्दार्थ व टीपा– आंचवण देणे–पाणी सोडणे, सुरग–रंगीत

अर्थ – शब्दाचीच रत्ने व त्याचे अलंकार करून मी या विश्वंभराचे पूजन केले १ भक्तिभावाने अंतःकरणपूर्वक उपचार करून मी भगवंतास, नारायणास भोजन घातले आहे २ मी या प्रभूसाठीच माझ्या संसारावर हाताने पाणी सोडले आहे. हेच प्रभूसाठी आचवण आहे माझे मन हीच मुखशुद्धी म्हणून मी त्यास अर्पण केले आहे. ३ श्रीहरीच्या भक्तीने रंगलेली इंद्रिये हाच कुणी एक विडा मी प्रभूस दिला आहे त्याच्या मस्तकावर तुळसीदल अर्पण केले आहे ४ तुझ्याविषयीचा एकाग्रभाव हाच मी दीप लावून निरांजन सिद्ध केले आहे मी आपल्या देहाचे आसन देवा, तुला समर्पण केले आहे ५ या माझ्या देवास माझ्या हृदयरूपी माजघरात झोपवून न बोलता त्याची चरणसेवा मी करीत आहे ६

५०५ उठोनिया तुका गेला निजस्छळा । उरले राउळा माजी देव ॥ १ ॥
निउल जाले सेवका स्वामीचें । आज्ञे करुनी चित्त समाधान ॥ २ ॥
पहुडलिया हरी अनंतशेजेवरी । तेथें नाहीं उरी काहीं काम ॥ ३ ॥
अवघी बाहेर घालूनि गेला तुका । सांगितले लोका निजले देव ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – राउळा माजी–देवळामध्ये, निउल–नवल

अर्थ – शेजारतीचा सर्व प्रकार झाल्यावर तुकारामबुवा हे आपल्या राहण्याच्या ठिकाणी गेले आणि देवळात एकटा देवच उरला १ या स्वामीचे व तुकोबासेवकाचे जे रहस्य या वेळी जमले होते ते एक नवलच होय. त्याच्या आज्ञेवरून या भक्ताच्या चित्ताचे समाधान झाले २ श्रीहरी अनंतशय्येवर पहुडले आहेत; आता येथे काही काम उरले नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, सर्वांना मी मंदिराबाहेर घालविले व त्यांना देव आता झोपले आहेत असे सांगितले ४

विवरण – अभंग क्र ४६७ पासूनचे बहुतेक सर्व अभंग शेजारतीच्या प्रसंगी म्हटले जातात आवडत्या दैवताच्या उपासनेचे, पूजेचे, स्तवनाचे जे अनेक प्रकार आहेत त्यात आरती हा प्रकार महत्त्वाचा आहे आरती म्हणजे देवास धूपदीपानी मनोभाव ओवाळून गीतात त्याची स्तुती करणे, त्याचे गुणवर्णन करणे या आरतीचेही काकड आरती, दुपारती, शेजारती असे काही प्रकार असून मराठीत याचे विषयीही भरपूर वाङ्मय विविध प्रकाराचे आहे आराध्य दैवताचे एकदा सगुणरूप मान्य झाले म्हणजे त्याच्या पूजनाचे, उपासनेचे, गुणस्तवनाचे विविध प्रकार आपोआपच आले षोडषोपचारे पूजन आले देवास नाना अलंकारानी नटवावे, सजवावे त्याच्या सर्व क्रीडाचे मानवीकरण करून त्या भावात दंग व्हावे हे भक्ताच्या दृष्टीने ओघानेच आले तुकोबाच्या या शेजारतीच्या अभंगातून त्यानी अत्यंत भक्तियुक्त अंतःकरणाने सध्याकाळी देव झोपी जात आहेत अशी कल्पना करून मोठ्या कळवळ्याने, विनयाने, प्रासादिक वृत्तीने या अभंगाची निर्मिती केलेली आहे तुकोबाच्या मनाची सारी कोवळीक व हळुवार वृत्ती या अभंगातून प्रकट झालेली आहे

अभंग शेजारतीचे असले तरी एकदा भक्तीच्या रंगात भक्त रंगून गेला की मग देवाची सारी दिनचर्याच त्या थाटात रंगवीत असतो रत्नजडित सिंहासनावर देव बसला आहे आणि तुकाराम सेवकाप्रमाणे पादुका घेऊन उभा आहे स्वयपाकाची तयारी झाली असून रखुमाई देवाची वाट पाहात आहे गोपिका पाण्याचे कलश घेऊन उभ्या आहेत, नाना रंगाच्या फुलानी शेज सजून तयार आहे, ताटात रत्नदीप उजळले आहेत, पायघड्या घालून वनमाळी चालत असून त्याच्या कुंकुमाच्या पावलाचे ठसे भूमीवर उमटले आहेत, देवानी उष्णोदकानी स्नान केले असून रुक्मिणी त्याचे अंग पुसून कोरडे करीत आहे, देवानी रेशमी अथवा जरीकाठी पीतांबर नेसला आहे जेवण करून देव पलंगावर आनंदाने पहुडले आहेत, तुकारामादी संत मग उरलेल्या घासासाठी आसुसलेले आहेत, रखुमाईसहित विठ्ठल पलंगी असून तुकयास्वामी हातात टाळवीणा घेऊन 'बाबडी उत्तरे' गात आहे देवा, आता उठा पाहू, निद्रा करा रुक्मिणी पलंगाशी वाट पाहात आहे, स्वामी, आता तुम्ही सुखाने निद्रा करा इत्यादी वचने तुकोबानी म्हणणे, शब्दाच्या रत्नानी या विश्वंभराची पूजा करणे, मुखशुद्धीस मन समर्पित करणे, रंगलेल्या इंद्रियाचा

सावूल देणे, माथ्यावर तुळसीदल समर्पिणे, देहाचे आसन देणे, हृदयाच्या माजघरात देवास झोपविणे आणि न बोलोनि देवाची चरणसेवा करणे इत्यादी विविध भावछटातील कोमल वृत्ती तुकोबाच्या भक्तिप्रेमाची साक्ष पटविणाऱ्या आहेत

# दसरा – अभंग १

५०६ पवित्र सुदिन उत्तम दिवस दसरा। सापडला तो साधा आजि मुहूर्त बरा।
गर्जा जयजयकार हरि हृदयीं धरा। आळस नका करूं लाहाना सागतो थोरां ॥ १ ॥
या हो या हो बाइयानो निघाले हरी। सिलगणा वेगीं घेउनि आरत्या करीं।
ओवाळू श्रीमुख वदू पाउले शिरीं। आम्हा दैव आले येथें घरिच्या घरीं ॥ २ ॥
अक्षय मुहूर्त औटामध्यें साधे ते। मग येरी गर्जे जैसे तैसे होत जाते।
म्हणोनि मागें पुढें कोणी न पाहावें येथें। साडा परते काम जाऊ हरी सागाते ॥ ३ ॥
बहुता बहुता रीती चित्तीं धरा हे मनीं। नका गे करू आइकाल ज्या कानीं।
मग हे सुख कधीं न देखाल स्वप्नीं। उरेल हायहाय मागें होईल काहाणी ॥ ४ ॥
ऐसियास वचती त्याच्या अभाग्या पार। नाहीं नाहीं नाहीं सत्य जाणा निर्धार।
मग हे वेळ घटिका न ये अजरामर। कळले असो द्या मग पडतील विचार ॥ ५ ॥
जयासाटीं ब्रह्मादिक जालेति पिसे। उच्छिष्टा कारणे देव जळीं जाले मासे।
अर्द्धांगी विश्वमाता लक्ष्मी वसे। तो हा तुकयाबंधु म्हणे आले अनायासे ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – सिलगणा–सीमोल्लंघनास, औटामध्यें–साडेतीन मुहूर्तांपैकी एक, पिसे–वेडे, अर्धांगी–पत्नी हे पतीचे अर्धांग मानले जाते या अर्थाने लक्ष्मी

अर्थ – आमचा हा दसऱ्याचा दिवस फार चागला व उत्तम असा आहे हा मुहूर्त बरा सापडला असे समजून श्रीहरीचे नाम हृदयात धारण करा त्याची गर्जना जयजयकाराच्या स्वरूपात करा आळस करू नका मी हे सर्व लहान थोर लोकाना सागत आहे १ या बायानो या तुम्ही श्रीहरी आज दसऱ्याच्या निमित्ताने सिलगणास निघाले आहेत लौकर आरती घेऊन या तुम्ही या श्रीहरीचे मुख आपण भक्तिभावाने ओवाळू, याची पाऊले वदन करू आपल्या घरच्या घरीच हा थोर देव आपणास प्राप्त झालेला आहे २ साडेतीन क्षणातील दसरा हा एक महत्त्वाचा व अक्षय असा मुहूर्त आहे त्यावर जे काही साधायचे असेल ते साधून घ्या तुम्ही बाकीचे मुहूर्त असे तसेच असतात म्हणून मागेपुढे न पाहता दुसरी कामे सोडून या हरीच्या सगतीत या ३ पुष्कळ रीतीनीं याच श्रीहरीचे नाव मनात धरा ज्यानी कोणी याचे नाव कानानी ऐकले असेल त्यानी याविषयी हयगय करू नये कारण मग हे सुख स्वप्नातसुद्धा कोणास दिसणार नाही उगाच हायहाय करण्याची परिस्थिती मात्र मागाहून निर्माण होईल ४ अशा या हरीस जे वचतील त्याच्या दुर्दैवास सीमा उरणार नाही असे मी त्रिवार गर्जून सागत आहे मग अशी ही अजरामर घटना पुन काही येणार नाही हे सर्व तुम्ही नीट ध्यानात घ्या नाही तर मग पुन विचारात पडाल ५ या देवासाठी ब्रह्मादिक देवही वेडे झाले असून याचे उष्टे मिळावे म्हणून स्वर्गाचे देवही पृथ्वीवरील पाण्यात माशाच्या जन्मास येतात विश्वमाता लक्ष्मी ज्याची पत्नी आहे असा हा योग तुकयाबधू म्हणत आहे की अनायसे लाभला आहे ६

विवरण – तुकोबा किंवा तुकयाबधू कान्होबा याचा हा दसऱ्यावरील अभग असून याचा अर्थ रूपकात्मकही लावण्यात येतो दशेन्द्रियाचा हा दसरा मुहूर्त अशा अर्थाने नवी याचा अर्थ लावण्यात येतो परतु दसरा हा साडेतीन मुहूर्तांपैकी एक उत्तम असल्याने या सुप्रसगी ईश्वरास मनात साठवून [त्याची भक्ती करा हा साधा अर्थ अधिक समर्पक व उद्बोधक वाटण्यासारखा आहे हिंदू परपरेत आश्विनातील नवरात्रानतर येणाऱ्या दसऱ्याचा मुहूर्त अनेक

कारणासाठीं प्रसिद्ध आहे याच दिवशी शस्त्रास्त्राचे पूजन करून शत्रूचा नाश करण्यासाठी सीमाचे उल्लघन होत असे विद्येच्या उपासनेसही याच दिवशी प्रारभ होत असे कौत्स्य नावाचा ब्राह्मणपुत्र रघुराजाकडे दान मागण्यासाठी आला होता नुकताच विश्वजित् यज्ञ करून रघुराजान आपला खजिना रिकामा केला होता परतु आलेल्या ब्राह्मणास विन्मुख करून पाठवावयाचे नाही असे ठरवून रघूने कुबेरावर स्वारी केली. कुबेरान भयभीत होऊन नगराबाहेर शमीच्या वृक्षावर सुवर्णाची वृष्टी केली- चौदा कोटी सुवर्णमुद्रा कौत्स्यास मिळाल्या हा दिवस दसऱ्याचाच होता या वेळेपासून दसऱ्यास सोने लुटण्याची प्रथा रूढ झाली असावी- असेही सागतात की, प्रभू रामचद्रानी लकेवर स्वारी करण्यासाठी याच दिवशी प्रयाण केले अशा रीतीने हा दिवस पराक्रमाचा, विद्यार्जनाचा, धनार्जनाचा म्हणून पवित्र व महत्त्वाचा मानला जातो वर्षप्रतिपदा, अक्षय्यतृतीया, विजयादशमी किंवा दसरा हे तीन पूर्ण व बलिप्रतिपदा हा अर्धा असे साडेतीन मुहूर्त प्रसिद्ध आहेत या महत्त्वाच्या दिवशी श्रीहरीच्या पाउलाना वदन करून हा मुहूर्त साधा असा भावार्थ या अभगाचा आहे

५०७ ओवाळू आरती[1] पंढरीराया । सर्वभावे शरण आलों तुझिया पाया ॥ १ ॥
सर्व व्यापून कैसे रूप आकळ । तो हा गौळ्या घरीं जाला कृष्ण बाळ ॥ २ ॥
स्वरूप गुणातीत जाला अवतारधारी । तो हा पाडुरंग उभा विटेवरी ॥ ३ ॥
भक्तीचिया काजा कैसा रुपासि आला । ब्रिदाचा तोडर[2] चरणीं मिरविला ॥ ४ ॥
आरते आरती ओवाळिली । वाखाणिता कीर्ति वाचा परतली ॥ ५ ॥
भावभक्तिबळें होसी कृपाळु देवा । तुका म्हणे पाडुरगा तुझ्या न कळती मावा ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – काजा–कारणासाठी, आकळ–न समजण्यासारखा, बिदाचा–कड्यासारख्या दागिन्याचा, तोडर–तोडा, आरतें–मनोभाव, मावा–माया

*अर्थ – पडरीराया, तुझी आरती मी मनोभावे ओवाळीत आहे मी सर्वभावाने तुला, तुझ्या पायाना शरण* आलो आहे १ तू सर्वत्र व्यापून असलास तरी तुझे रूप कळून येत नाही परतु हा अनाकलनीय ईश्वर गोकुळात गवळ्याच्या घरी कृष्णरूपाने बाळ होऊन आला आहे २ रूपातीत व गुणापलीकडचा असणारा हा अवतारधारी पाडुरग भक्तासाठी विटेवर उभा राहिलेला आहे ३ भक्तीच्या कारणासाठी हा या सगुणरूपास आला याने पायात कड्यासारखा दागिना घातलेला आहे ४ याला मोठ्या भक्तिभावाने मी आरती ओवाळीत आहे याची कीर्ती वर्णन करताना वाणीही परत फिरते ५ भावभक्तीच्या मुळे देवा, तू फार कृपाळू होतोस तुकाराम महाराज म्हणतात, पाडुरगा, तुझी माया कधी ध्यानात येत नाही ६

५०८ करूनि आरती आता ओवाळूं श्रीपती ॥ १ ॥
आजि पुरले नवस । धन्य जाला हा दिवस ॥ २ ॥
पाहा वो सकळा । पुण्यवता तुम्ही बाळा ॥ ३ ॥
तुका वाहे टाळी । होता सन्निध जवळी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – बाळा–या बालरूप देवास, वाहे–वाजविता

अर्थ – आता आरती करून या श्रीपतीला ओवाळू या १ आज माझे सर्व नवस पूर्ण झाले असून आजचा हा दिवस मला धन्यतेचा वाटतो आहे २ तुम्ही सर्व पुण्यवत आहात, या बालरूप देवास आज नीट पाहा ना ३ तुकाराम आनदाने आज टाळी वाजवीत आहे हा देवाच्या अगदी जवळ होता ४

५०९ घाल माळ जरी[3] पडेन मी पाया । दडवत वाया कोण वेचो ॥ १ ॥
आले ते हिशोबें[4] अवघिया प्रमाण । द्यावे तरी दान मान होतो ॥ २ ॥

---

१ माझ्या, २ तारड्, ३ तरी, ४ ही शोभे

मोकळिया मनें घ्याल जरी सेवा । प्रसाद पाठवा लवकरी ॥ ३ ॥
तुका म्हणे तुम्ही जालिया कृपण । नामाची जतन मग कैंची ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– वायां–फुकट, कृपण–कंजूप.

*अर्थ :– देवा, तुम्ही कृपेची माळ मला घाल तरच मी तुमच्या पायां पडत आहे. उगाच फुकट दंडवत* कुणास करावा ? १ जे हिशेबाने घाल ते प्रमाण मी मानून राहीन. जे दान घाल तो मान म्हणून मी स्वीकारीन २ मोकळ्या मनाने माझी सेवा घ्यावी व आपला कृपाप्रसाद लौकर पाठवावा. ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तुम्हीच कृपण झाल्यावर मग पतितपावन या तुमच्या नामाची जपणूक कोण करणार ? त्यासाठी तरी तुम्ही माझ्यावर कृपा करावी. ४

५१० तुम्हीं जावें निजमंदिरा । आम्ही जातों आपुल्या घरा ॥ १ ॥
विठोबा लोभ असों देईं । आम्ही असों तुमचे पाईं ॥ २ ॥
चित्त करी सेवा । आम्ही जातों आपुल्या गांवा ॥ ३ ॥
तुका म्हणे दिशा भुलों । फिरोन पायापाशीं आलों ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – पाईं–पायावर

अर्थ :– देवा, तुम्ही आता आपल्या मंदिरात जावे. आम्हीही आमच्या घरी जाण्यासाठी निघतो. १ देवा, विठोबा, आमच्यावर लोभ असू द्यावा तुमच्या पायावर आमचे जीवन सर्वस्वी आहे. २ आम्ही आमच्या गावास *निघालो असलो तरी आमचे चित्त आपल्याच सेवेत आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, आम्ही आमच्या गावास* निघालो असलो तरी दिशा चुकून तुमच्याच पायाशी परत आलो असे होईल. ४

५११ पाहे प्रसादाची वाट । द्यावें धोवोनियां ताट ॥ १ ॥
शेष घेऊनि जाईन । तुमचें जालिया भोजन ॥ २ ॥
जालो एकसवा । तुम्हां आडुनियां देवा ॥ ३ ॥
तुका म्हणे चित्त । करुनि राहिलों निश्चित ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – शेष–उरलेसुरले, एकसवा– एकरूप

अर्थ :– देवा, मी तुमच्या प्रसादाची वाट पाहात आहे तुमचे भोजनाचे ताट मला धुऊन द्यावे. १ तुमच्या भोजनानंतर जे उरलेसुरले असेल ते मी घेऊन जाईन. २ देवा, तुमच्या आडून मी असलो तरी तुमच्या रूपाशी मी एकत्व पावलो आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, मी आपले चित्त चिंताविरहित करून मी निवांत राहिलो आहे ४

५१२ केली कटकट गाऊं नाचों नेणता । लाज नाहीं भय आम्हां पोटाची चिंता ॥ १ ॥
बैसा सिणलेती पाय रगडूं दातारा । जाणवूं द्या वारा उब जाली शरीरा ॥ २ ॥
उशिरा उशीर किती काय म्हणावा । जननिये बाळका कोप कांहीं न धरावा ॥ ३ ॥
तुझिये संगतीं [१]आम्ही करूं कोल्हाळ । तुका म्हणे बाळें अवघीं मिळोन गोपाळ ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा .– सिणलेती–दमलात, कोप–राग, कोल्हाळ–गोंगाट, गडबड, गर्जना

अर्थ :– देवा, मी अज्ञानाने तुमच्याबद्दल काही न समजता नाचून, गाऊन कटकट केली. देवा, आम्हास कसलीच लाज किंवा पोटाची चिंता राहिलेली नाही १ देवा, दातारा, तुम्ही फार दमलेले आहात. खाली बसा ना मी तुमचे पाय रगडून देऊ का ? तुमच्या शरीराला उकाड्याचा त्रास होत असेल तर देवा, मी वारा घाल

१ येऊ

वा? २ उशीर झाला, उशीर झाला, असे म्हणावे का? आईनें बालकाविषयी कधी राग धरू नये. ३ देवा, तुझ्या संगतीत तुकाराम महाराज म्हणतात, आम्ही सर्व गोपाळ मिळून तुझ्या नामाची गर्जना करून आनंद लुटू. ४

५१३ कळस वाहियेला शिरीं । सहस्रनामें पूजा करीं ॥ १ ॥
पीक पिकलें पिकलें । घन दाटोनियां[1] आलें ॥ २ ॥
शेवटीचें दान । भागा आला नारायण ॥ ३ ॥
तुका म्हणे पोट । भरलें वारलें बोभाट ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– कळस–मुकुट, बोभाट–नकार, वारले–निवारण झाले

अर्थ :– या देवाने आपल्या मस्तकावर मुकुट धारण केलेला आहे. या देवाची मी सहस्र नामांनी पूजा करीत आहे. १ याच्या नामभक्तीचे पीक अफाटपणे पिकले असून त्याची छाया सर्वत्र घनदाटपणे पसरली आहे. २ शेवटचे दान म्हणून हा नारायणच आमच्या वाट्यास आलेला आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, याच्या प्राप्तीमुळे आमचे पोट भरले आहे आणि इतर सर्व तक्रारी निवारण झालेल्या आहेत. ४

*विवरणः– हा व याच्या आधीचे पाचसात अभंग हे तुकोबाच्या मनाच्या तृप्तीची भावना दर्शविणारे आहेत.* पंढरीनाथाची आरती वगैरे झाल्यानंतर संतुष्ट चित्ताने देवाची करुणा भाकावी, त्याचे ऋण मान्य करावे, त्याचा प्रेमाने निरोप घ्यावा, पुन्हा त्याला एकचित्ताने आठवावे, त्याच्या प्रसादाची वाट पाहावी, त्याच्या उच्छिष्टाची आशा करावी इत्यादी भाववृत्तींनी हे सर्व अभंग आर्द्र झालेले आहेत. अर्थात तुकोबाचे अभंग जितके सोपे, सरळ तितकी त्यात भक्तिभावाची आर्द्रता अधिक असते असे दिसून येईल या अभंगात 'सहस्रनामें पूजा करीं' असा एक उल्लेख आला आहे तो महत्त्वाचा आहे भागवत संप्रदायात विष्णुसहस्रनामास पूर्वीपासून मोठेच महत्त्व आहे महाभारतातील अनुशासनपर्वाचा ४९ वा अध्याय म्हणजे महत्त्वाचा मानला जातो विष्णूचे सहस्रनामांनी ध्यान करण्यास याचा उपयोग मोठाच असतो. 'नामाचेया सहस्रवरी । नावा या अवधारीं । सजूनया संसारीं तारू जाहलों' असा ज्ञानेश्वरांनी या सहस्रनामाचा उल्लेख केलेला आहे. 'सहस्रनामाचे वाटेगें । खांदीं घेतलें भेटगें' असा याचा उल्लेख नामदेवांनी केला आहे. तुकोबाच्याही पाठात हे सहस्रनाम 'नाव धड करा सहस्रनामाची', 'नाममंत्रमाळा । विष्णुसहस्र', 'सहस्रनामाची आरोळी', 'केली सहस्राची माळ' इत्यादी उल्लेख तुकोबाच्या अभंगात इतरत्रही सापडतात.

५१४ आरुष शब्द बोलों मनीं न धरावें कांहीं । लडिवाळ बाळकें तूंचि आमुची आई ॥ १ ॥
देईं गे विठाबाई प्रेमभातुकें । अवघियां कवतुकें लहाना थोरां सकळां ॥ २ ॥
असो नसो भाव आलों तुझिया ठाया । पाहे कृपादृष्टी आतां पंढरीराया ॥ ३ ॥
तुका म्हणे आम्ही तुझीं वेडीं वाकुडीं । नामें भवपाश आतां आपुलिया तोडीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– आरुष–अडाणी, बोबडे, भातुकें–खाऊ

अर्थ :– हे विठाई, तूच आमची आई आहेस. आम्ही अडाणीपणाने काही वेडेवाकडे व बोबडे शब्द बोलली असलो तरी तू ते मनात काही धरू नकोस आम्ही तुझीच लडिवाळ बाळे आहोत ना? १ विठाबाई, आई, तू आम्हाला प्रेमाने, कौतुकाने खाऊ दे. सर्व लहानथोर भक्तांना कौतुकाने तू प्रेमाचा खाऊ दे ना २ आमच्या मनात भाव असो वा नसो, पण आम्ही तुलाच शरण आलो आहोत. पंढरीनाथा, तू कृपादृष्टीने आमच्याकडे पाहा ना ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, आम्ही वेडीवाकुडी असलो तरी तुझीच आहोत. पण तू नामस्मरणाने संतुष्ट होऊन आमचे भवपाश तोडून टाक. ४

५१५ आडकलें देवद्वार । व्यर्थ काय करकर ॥ १ ॥
आतां चला जाऊं घरा । नका करूं उजगरा ॥ २ ॥

[1] मोडोनिया.

देवा लागलीसे निज । येथें उम्या काय काज ॥ ३ ॥
राग येतो देवा । तुका म्हणे नेघे सेवा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– करकर–कटकट, उजगरा–जागरण.

अर्थ :– चला. आता देवाचे दार बंद झाले आहे. येथे उगाच कटकट करू नका. १ चला, आता आपण आपापल्या घरी जाऊ. इथे उगीच जागरण करून गडबड नका करू. २ देवाला झोप लागली आहे. येथे उभे राहून काय साधणार ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, असे करण्याने देवास राग येईल. मग तो आपली सेवा घेणार नाही. तेव्हा चला सर्वजण घरी. ४

५१६ कृष्ण माझी माता कृष्ण माझा पिता । बहिणी बंधु चुलता कृष्ण माझा ॥ १ ॥
कृष्ण माझा गुरु कृष्ण माझें तारूं । उतरी पैल पारु भवनदीची ॥ २ ॥
कृष्ण माझें मन कृष्ण माझें जन । सोइरा सज्जन कृष्ण माझा ॥ ३ ॥
तुका म्हणे माझा श्रीकृष्ण विसावा । वाटे न करावा परता जीवा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– तारू–नाव, परता–वेगळा, निराळा

अर्थ :– हा श्रीकृष्ण माझी माता आहे. श्रीकृष्ण माझा पिता आहे. बहिण, भाऊ, चुलता, सर्व काही हा श्रीकृष्णच आहे माझा. १ हा श्रीकृष्ण माझा गुरु असून संसारसागर तरून नेणारी नावही हाच आहे. २ कृष्णच माझे मन व हाच माझे इष्टजन होय. माझे सोयरे वगैरे आप्तजन हाच श्रीकृष्ण आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, हा श्रीकृष्ण माझा एक विसावा आहे याच्यापासून जीव निराळा असे वाटत नाही. ४

विवरण:– श्रीकृष्णावर, विठ्ठलावर तुकोबाचा किती जीव होता याचा उत्कृष्ट पुरावा म्हणून या अभंगाचा देता येईल. तुकाचे सर्व जीवनच विष्णुमय, कृष्णमय होऊन गेले होते माता, पिता, बंधू, मित्र, सोयरा, गुरु, चुलता, बहीण इत्यादी सर्व नात्यांनी खरा असा एक श्रीकृष्णच होय या भावाचे अनेक अभंग मराठी संतांचे सापडतील. 'तूं आम्हां सोयरा सज्जन सांगाती । गण गोत मित्र तूं माझें जीवन', 'तूं माझी माउली तूं माझी साउली । तू मज एकुला वडील धाकुला । तूं मज आपुला सोयरा जीव', 'मायबापबंधु सोयरा सांगती । तूचि माझी प्रीति गणगोत' या शब्दांनी तुकोबानी श्रीकृष्णाचे व आपले नाते स्पष्ट केले आहे नामदेव-एकनाथ यानीही परमेश्वरात आपली सर्व नाती पाहिली आहेत. 'मातापिता बंधुभगिनी इष्टमित्र विठ्ठला तूं रे' या शब्दात नामदेवानी या देवाची स्तुती केली आहे. ज्ञानेश्वरानीही श्रीकृष्णास उद्देशून 'तू गुरु बंधु पिता । तू आमची इष्ट देवता । तूंचि सदा रक्षिता । आपदीं आमुतें' असे त्याचे स्तवन केले आहे. श्रीकृष्ण सर्व नात्यानी आपला आहे हा भाव सर्वत्र उमटलेला दिसेल या भावाचे तात्त्विक अधिष्ठान अभंग क्र ४८६ च्या विवरणात पाहावे

५१७ कृपा करावी भगवंते । ऐसा शिष्य द्यावा मातें ॥ १ ॥
माझें व्रत जो चालवी । त्यासि द्यावें त्वां पालवी ॥ २ ॥
व्हावा ब्रह्मज्ञानी गुंडा । तिहीं लोकीं ज्याचा झेंडा ॥ ३ ॥
तुका तुका हाका मारी । माझ्या विठोबाच्या द्वारीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– पालवी–प्रेम, कृपा, गुंडा–प्रमुख

अर्थ :–भगवताने कृपा करावी व मला असा एक शिष्य द्यावा, १ की जो माझे हे हरिनामाचे व भक्तिप्रेमाचे व्रत पुढे चालवील असा हा शिष्य असावा त्यावरच तू प्रेमपूर्वक कृपा करावीस. २ माझा शिष्य ब्रह्मज्ञानाच्या बाबतीत प्रमुख असावा. तीनही लोकात त्याची कीर्ती पसरून राहावी ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा रीतीने मी माझ्या विठोबाच्या दारात उभा राहून हाका मारीत आहे. ४

५१८ जातो वाराणसी । निरवी गाई घोडे म्हैसी ॥ १ ॥
गेलो येतो नाहीं ऐसा । सत्य मानावा[1] भरवसा ॥ २ ॥
नका काढू माझीं पेवे । तुम्हीं वरळा भूस खावे ॥ ३ ॥
भिकारियाचे पाठीं । तुम्ही घेउनि लागा काठी ॥ ४ ॥
सागाल जेवाया ब्राह्मण । तरी कापाल माझी मान ॥ ५ ॥
बोकलिया वोका । म्या खर्चिला नाहीं रुका ॥ ६ ॥
तुम्हीं खावे ताकपाणी । जतन करा तूपलोणी ॥ ७ ॥
नाहीं माझें मनीं । पोरे राडा नागवणी ॥ ८ ॥
तुका म्हणे नीट[2] । होते तैसे बोले स्पष्ट ॥ ९ ॥

शब्दार्थ व टीपा – निरवी–सोपवी, स्वाधीन करी, वरळा–फोलकटे व धान्य याचे मिश्रण

अर्थ – कुणी एक संसारात आसक्त झालेला मनुष्य काशीयात्रेला निघताना म्हणत आहे, ' मी निघालो काशीयात्रेला गाई, घोडे, म्हशी याचा सांभाळ नीट करा तुम्ही मी ही जनावरे तुमच्यावर सोपवीत आहे १ मी गेलो की लगेच येतो गेलो असेही वाटणार नाही तुम्हास माझ्यावर विश्वास असू द्या तुमचा २ मात्र ध्यानात ठेवा, मी गेल्यावर माझी धान्याची पेवे तुम्ही फोडू नका तुम्ही भुसा व फोलकटे याचेच अन्न खावे ३ दारात भिकारी आला तर हातात काठी घेऊन त्याच्यामागे लागा व त्याला हाकलून द्या ४ मी इथे नाही असे पाहून तुम्ही एखादा ब्राह्मण जेवायला सांगाल तर मग माझी मान कापल्याइतके दुःख मला होईल. ५ ओकारी किंवा वांती होऊन दुखणे आले तरी मी त्याच्यासाठी, औषधासाठी एक पैसाही खर्च केलेला नाही असा पैसा मी जतन केला आहे ६ तुम्ही सर्वांनी नुसते ताकपाणी खाऊन राहावे , आणि तूपलोणी माझ्यासाठी ठेवून द्यावे ७ तुम्ही कुणी काही खर्च करू नका माझ्या राडापोराची नागवण व्हावी असे माझ्या मनात नाही ८ तुकाराम महाराज म्हणतात, हा त्याच्या मनात जसे आहे तसेच स्पष्ट बोलत आहे ९

विवरण – आत्मसाक्षात्कार झाल्यानतर, भगवद्भक्तीचा आनंद लुटल्यावर तुकोबा दुसऱ्याच्या मुखार्थ समाजातील दांभिक वाट ठेवून कडक टीका करीत असत लोकांना फसविणारे भोंदू गुरु पाहून त्याना राग येई पण या भोंदू गुरूच्या नादी लागणाऱ्या बिचाऱ्या लोकानाही कसे समजत नाही याचे त्याना नवल वाटे नामसंकीर्तन, भक्तिप्रेम याचा सीधा सोपा मार्ग सोडून लोकही व्यर्थ कर्मकांडाच्या कटकटीत सापडले होते विवेकाच्या मार्गातून संसाराची आसक्ती एवढी मोठी होती की, तिचे दर्शन त्याच्या बरबरच्या पाठात व तीर्थयात्रातही स्पष्टपणे होत असे आंधळेपणाने लोकही संसारात, केवळ बायकामुलात कसे गुरफटून राहिले होते याची उपरोधक उदाहरणे तुकोबानी अनेकदा आपल्या बोचक व मर्मग्राही शब्दात दिलेली आहेत या ठिकाणी एक वयोवृद्ध झालेला मनुष्य काशीयात्रेस निघालेला असून त्याचे चित्त संसारातील क्षुद्र वस्तूत कसे गुंतून राहिले आहे याचे मोठे विनोदी व उपहासगर्भ चित्र तुकोबानी काढलेले आहे एका संसारपाशात आसक्त झालेल्या एका पुरुषाचे हे चित्र पुढील एका अभगातील एका स्त्रीच्या शब्दचित्राशी ताडून पाहण्यासारखे आहे एक आवा पंढरपुरास चाललेली असते, तिचेही चित्त संसारात कसे अनाठायी रमलेले असते, याचे मोठे हृद्य व विनोदी पण विचारप्रवर्तक शब्दचित्र बुवानी रंगविले पुढे अभंग क्र ४२१९ मध्ये आहे.

५१९ कास घालोनी बळकट । झालो कळिकाळासी नीट ।
केली पायवाट । भवसिंधूवरूनि ॥ १ ॥
या रे या रे लहान थोर । याति भलते नारीनर ।
करावा विचार । न लगे चिंता कोणासी ॥ २ ॥

---

१ माना हा, २ नष्ट

कामीं गुतले रिकामे । जपी तपी येथें जमे ।
लाविले दमामे । मुक्त आणि मुमुक्षा ॥ ३ ॥
एकदर शिका । पाठविला इहलोक ।
आलों म्हणे तुका । मी नामाचा धारक ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – नीट–धीटपणे लढण्यास सिद्ध मुमुक्षु–मोक्षाची इच्छा करणारे, दमामे–नगारे, शिका–शिक्का

अर्थ – धळवटपणे काचा घालून मी प्रत्यक्ष यमाशीही लढण्यास धीटपणे सिद्ध झालो आहे ससाररूपी सागर तरून जाण्यास मी या नामस्मरणाची नावच तयार केली आहे १ या हो जे कोणी लहान, थोर, नर, नारी, कुठल्याही जातीचे, तुम्ही असा कुणासही इकडे येण्यास विचार करण्याची जरुरी नाही निश्चित मनाने यावे २ कुणी कामात आपापल्या व्यवहारात गुतलेले असतील, कुणी रिकामे असतील, कुणी जप करण्यात गुतले असतील, कुणी तपश्चर्येत व्यग्र असतील, कुणी मुक्त असतील, कुणी मोक्षाची इच्छा करणारे असतील सर्वांसाठी मी येथे विठ्ठलाच्या नामस्मरणाचे नगारे सुरू केले आहेत ३ या सर्व लोकाना एकच नामाचा शिक्का या लोकात उपयोगी असल्याने ईश्वराने पाठविला आहे तुकाराम महाराज म्हणतात, मी या नामाचा धारकच येथे आलो आहे ४

५२० आम्ही वैकुंठवासी । आलो याचि कारणासी ।
बोलिले जे ऋषी । साच भावे वर्ताविया ॥ १ ॥
साडू सताचे मारग । आडरानें भरले जग ।
उच्छिष्टाचा भाग । शेष उरले ते सेवू ॥ २ ॥
अर्थे लोपलीं पुराणे । नाश केला शब्दज्ञाने ।
विषयलोभी मन । साधने बुडविलीं ॥ ३ ॥
पिटू भक्तीचा डांगोरा । कळिकाळासी दरारा ।
तुका म्हणे करा । जयजयकार आनंदे । ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – वैकुंठवासी–श्रीविष्णूच्या वैकुंठात राहणारे साच–खरोखर, लोपलीं–लपली, शब्दज्ञाने–शाब्दिक ज्ञानाने

अर्थ – खरे म्हणजे आम्ही वैकुंठात श्रीविष्णुबरोबर राहणारे असून एका विशिष्ट कारणासाठी आम्ही या भूमीवर आलो आहोत पूर्वी ऋषिमुनींनी जे सागितले तेच सत्यार्थाने सागण्यास व त्याप्रमाणे वर्तन करण्यासाठी आम्ही या पृथ्वीवर अवतरलो आहोत १ पूर्वीच्या सव साधुसताचे, ऋषिमुनींचे मार्ग आम्ही झाडून स्वच्छ करु जग आडरानाच्या विकट मार्गाने चालले आहे पण त्यास आम्ही साधुसताच्या व प्राचीन ऋषिमुनींच्या उच्छिष्टाच्या भागाचे सेवन घडवून नीट सरळ मार्गावर आणू व आम्हीही तो भाग सेवन करू २ आज पुराणातील खऱ्या अर्थाचा लोप झाला असून केवळ शाब्दिक ज्ञानाने सव आयुष्याचा नाश आरमिला आहे सर्वांच्या मनात विषयाचाच लोभ असल्याने सर्व महत्त्वाची साधन बुडाली आहेत ३ परतु तुकाराम महाराज म्हणतात, आम्ही मात्र या भक्तीचाच डांगोरा पिटू या भक्तीचाच प्रचार करू यामुळे प्रत्यक्ष यमासही दरारा वाटेल चला त्या हरीच्या नामाचा जयजयकार मोठ्या आनंदाने करा ४

विवरण – तुकोबाचे आत्मप्रचीतीचे, आत्मसामर्थ्याचे, आत्मविश्वासाचे व आपण कोणत्या कार्यासाठी जन्मलो आहोत यासबधीच्या निश्चित जाणिवेचे जे काही अभग आहेत, त्यात वरील दोन अभगाना फारच महत्त्व आहे सर्व जातीच्या, सव पथाच्या, सव वयाच्या स्त्रीपुरुषाना त्यांनी या भक्तिमार्गात पाचारण केले आहे या नामस्मरणाच्या मार्गावर ते काचा घालून प्रत्यक्ष यमासीही लढण्यास सिद्ध झाले आहेत त्याच्या या सामर्थ्यामुळे

यमासही दरारा वाटू लागला आहे. साधक, मुमुक्षु, प्रापंचिक कोणीही कोणत्याही पंथातील असोत, नामस्मरणाचा शिक्का त्यांच्यावर या कलियुगात बसावयास हवा, अशी त्यांची इच्छा आहे. यासाठीच भक्तीचा डांगोरा पिटण्यासाठी ते सिद्ध झाले आहेत.

यापूर्वी आम्ही ईश्वराच्या सान्निध्यात, वैकुंठीच होतो हे बुवांचे वचन त्यांच्या एकंदर चरित्रक्रमास व तत्त्वज्ञानास धरून आहे. आपण प्राचीन ऋषिमुनी व साधुसंत यांच्याच मार्गाने जात असून तीच परंपरा चालवीत आहोत असा स्पष्ट निर्देश त्यांनी अनेक ठिकाणी केलेला आहे. **'अंबरीष प्रल्हाद अंगद । उद्धव नामया नामाचा बोध ॥ हाच भक्तीचा कळस । पिका आला ब्रह्मरस ॥ संकल्प शतकोटी केलासे । तुका म्हणे लाभले शेष ॥ झाला अवताराचा कळस । पिका आला ब्रह्मरस '** या ओळीतून आपण अंबरीष, प्रल्हाद, अंगद, उद्धव, नामदेव इत्यादींचेच वारसदार व अवतार आहोत असाच भाव प्रकट झाला आहे. दुसऱ्या एका अभंगात त्यांनी आम्ही परमेश्वराचे जुनेच मित्र आहोत असे सांगितले आहे. **'आम्ही हरीचे सवंगडे । जुने ठायींचि वेडे बागडे ।'** आणखी एका अभंगात शुकाने समाधी लावली तेव्हा आम्ही तेथें होतो असे तुकोबांनी म्हटले आहे ( अभंग क्र. २८७८ ) आपण देवाचा निरोप घेऊनच आलो आहोत असे एका अभंगात ( अभंग क्र. ३४४ ) सांगितल्याचे आपण पाहिलेच आहे. सत्याखोट्याचा निवाडा करून मार्ग स्वच्छ करण्यासाठीच आपण आलो आहोत, असेही त्यांनी एका अभंगात म्हटले आहे ( अभंग क्र. ३१८ ) जन्मोजन्मी आपणास हेच काम करावे लागते असेही त्यांनी एकदा स्पष्ट केले आहे. **'मागों बहुता जन्मीं । हेंचि करीत आम्ही '** असे त्यांनी निःसंदिग्धपणे सांगितले आहे ( अभंग क्र. २३०२ ) **'धर्माचें पाळण । करणे पाखांड खंडण । हेंचि आम्हां करणे काम '** असा आपल्या आयुष्याचा हेतु त्यांनी एका अभंगात ( क्र. २१३६ ) स्पष्ट केला आहे. **'धर्म रक्षावयासाठीं । करणे आटी आम्हांसी । '** असा आत्मविश्वास त्यांनी व्यक्त केला आहे ( अभंग क्र. २६० )

या सर्व आत्मप्रचीतीच्या व निश्चयात्मक भावाच्या अभंगावरून तुकोबांचे कार्य हे एक लोकोत्तर असे ईश्वरी कार्य होते असे मानावयास हरकत नाही. आपली वाणी **'नारायणीं मिश्रीत '** आहे असेही त्यांनी एका अभंगात सांगितले आहे ( अभंग क्र. १३०९ ) **'मज विश्वंभर बोलवितो '** हा त्यांचा आत्मविश्वास प्रसिद्ध आहे ( अभंग क्र. १००७ ) याच अभंगात, **'वदवी गोविंद तेंचि वदें'** म्हणून त्यांनी स्वतःच्या वाणीचे दिव्यत्व सूचित केले आहे. **' संतांचीं उच्छिष्टें बोलतों उत्तरें'** असा त्यांचा नम्र भाव आत्मविश्वासासहित प्रकट झाला आहे (अभंग क्र. ११९) **'बोलविती देव मज, परि त्या विश्वंभरें बोलाविलें'** अशा ओळींतून तुकोबांच्या अभंगवाणीचा प्रासादिक गुण सहज ध्यानात येणारा आहे आणि याच प्रासादिक वाणीमुळे व ईश्वरी अंशामुळे तुकोबांना **'पिटूं भक्तीचा डांगोरा । कळिकाळासी दरारा । '** असा आत्मसामर्थ्याचा घोष करता आला. जे आपण दुसऱ्यांना सांगणार, साधकांना वा प्रापंचिकांना मार्गदर्शनासाठी सांगणार, त्याची प्रचीती स्वतःस आल्यावेगीज त्याचे तेज पडत नाही, लोकांच्या मनावरही त्याचा परिणाम होत नाही. परंतु तुकोबांना ही सर्व अनुकूलता प्राप्त झाली. सद्गुरुनाथाची कृपा झाली. नामदेवांनी कवित्वाची जागृती दिली, ईश्वरसाक्षात्कार झाला, आणि मग तुकोबांच्या वाणीस आत्मप्रचीतीचे, ईश्वरी कृपेचे तेज चढले. **'तीक्ष्ण उत्तरें । हातीं घेऊनि बाण फिरे '** असे सामर्थ्य मग त्यांच्या अंगी प्रकट झाले. **'गर्जू हरिचे पवाडे । मेळवू वैष्णव बागडे । घालू पायतळीं । कळिकाळ त्या बळें । '** यासारख्या शब्दांना धार आली ती तुकोबांच्या सामर्थ्यसंपन्न व आत्मविश्वासात्मक दैवी बळामुळे, **' सूर्याचिया परी । तुका लोकीं क्रीडा करी '** हे सामर्थ्यवान बोल साध्या माणसाचे कसे असतील ? खालील अभंगही असाच त्यांच्या सामर्थ्यवान वाणीचा निदर्शक असा आहे.

**५२१ बळियाचे अंकित । आम्ही जालों बळिवंत ॥ १ ॥**
**लाता हाणोनि संसारा । केला षड्‌र्मीचा मारा ॥ २ ॥**
**जन धन तन । केलें तृणाही समान ॥ ३ ॥**
**तुका म्हणे आता । आम्ही मुक्तीचिया माथा ॥ ४ ॥**

**शब्दार्थ व टीपा** – षड्‌र्मीचा–काम, क्रोध, मोह, लोभ, मद, आणि मत्सर या सहा मानसिक वृत्तींचा, अथवा शोक, मोह, जरा, मृत्यू, क्षुधा, व पिपासा या सहा ऊर्मी संसारसागराच्या लहरींप्रमाणे मानल्या आहेत.

तु. गाथा ३४

अर्थ – आम्ही त्या बलवान प्रभूचे अंकित झालो असल्याने आम्ही पण त्याच्याइतकेच बलवान झालो आहोत १ आम्ही संसारास लाथ हाणून षड्रिपूचा अथवा षड्‌उर्मीचा नाश केला आहे. २ लोक, आप्तस्वकीय, धन, शरीर यांना आम्ही गवताप्रमाणे क्षुद्र मानले आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, आणि आता तर आम्ही मुक्तीच्याही माथ्यावर उभे आहोत आम्हास मुक्तीची काही किंमत नाही ४

*विवरण –याही अभंगात तुकोबाच्या मनाचे सामर्थ्य प्रकट झाले आहे ईश्वराच्या संगतीने आपण एवढे* बळवंत झाला आहोत की मुक्तीचीही किंमत यापुढे त्यांना वाटेनाशी झाली आहे साधुसंतांना मोक्षाची अथवा मुक्तीची महती भक्तीपुढे कधीच वाटत नाही 'सांडुनि सुखाचा वाटा । मुक्ति मागे तो करंटा' असे तुकोबांनीच एके ठिकाणी म्हटले आहे जे बद्धताच मानायला तयार नाहीत त्यांनी मुक्तीची वाटाघाट न करावी हेच युक्त होय.

५२२ मृत्युलोकीं आम्हा आवडती परी । नाहीं एका हरिनामें विण ॥ १ ॥
विटलें हें चित्त प्रपंचापासूनि । वमन¹ हें मनीं बैसलेंसे ॥ २ ॥
सोनें रुपें आम्हा मृत्तिके समान । माणिकें पाषाण खडे तैसे² ॥ ३ ॥
तुका म्हणे तैशा दिसतील नारी । रिसाचियापरी आम्हांपुढें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – परी–प्रकार, वमन–वांती, ओक रिसाचिया परी–अस्वलीप्रमाणे

अर्थ – या मृत्युलोकात आम्हास एका हरिनामाशिवाय दुसरे कोणतेही प्रकार आवडत नाहीत १ या प्रपंचापासून आमचे चित्त पूर्णपणे विटून गेले असून एखाद्या वांतीप्रमाणे घृणा त्याच्याविषयी आमच्या मनात बसली आहे २ सोने, रुपे, आम्हा हरिदासांना मातीप्रमाणेच वाटते आणि रत्ने, माणके दगडाच्या खड्याप्रमाणे वाटतात ३ तुकाराम महाराज म्हणतात, त्याचप्रमाणे या बायका आमच्यापुढे येणाऱ्या एखाद्या भयानक अस्वली-प्रमाणेच वाटतील ४

५२३ स्त्रियांचा तो संग नको नारायणा । काष्ठा या पाषाणामृत्तिकेच्या ॥ १ ॥
नाठवे³ हा देव न घडे भजन । लांचावलें मन आवरे ना ॥ २ ॥
दृष्टिमुखें मरण इंद्रियांच्या द्वारें । लावण्य तें खरें दुःखमूळ ॥ ३ ॥
तुका म्हणे जरी अग्नि जाला साधु । परी⁴ पावे बाधु संघट्टणें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – संग–सहवास काष्ठा–लाकडाच्या, नाठवे–आठवत नाही

अर्थ – नारायणा, या स्त्रियांची संगत मला नको त्यांचे रूपलावण्य कितीही असले तरी मी त्यांना लाकडाच्या, दगडाच्या किंवा मातीच्या समानच मानीन १ कारण यांच्या संगतीत देव कधी आठवत नाही, कधी भजन होत नाही , व लालचावलेले मन कधी आवरले जात नाही २ यांच्या नुसत्या दृष्टीच्या सहवासानेही मरणच येते खरोखर अशा स्त्रियांचे सौंदर्य हे दुःखाचे मूळच समजावे ३ तुकाराम महाराज म्हणतात, अग्नी हा साधू झाला तरी त्याच्याशी विशेष संघटन केल्यास त्यास आलिंगन दिल्यास अंग पोळणारच. ४

५२४ पराविया नारी ⁵रखुमाईसमान । हें गेलें नेमून ठायींचेंचि ॥ १ ॥
जाईं वो तूं माते न करीं सायास । आम्ही विष्णुदास नव्हों तैसे ॥ २ ॥
न साहावे मज तुझें हें पतन । नको हें वचन दुष्ट वदों ॥ ३ ॥
तुका म्हणे तुज पाहिजे भ्रतार । तरी काय नर थोडे जाले ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – पराविया–परक्याच्या, ठायींचेंची–प्रथमपासूनच

अर्थ –बाई, परक्याच्या स्त्रिया आम्हास रखुमाईमातेसमान आहेत. हा नियम आमचा प्रथमपासूनच ठरलेला आहे १ माते, तू परत जा आम्हाला गुंतविण्याचे प्रयत्न तू करू नकोस, आम्ही हरिभक्त त्या वश होणाऱ्याच्या

१ बैसलेंसे मनीं रामनाम, २ जैसे, ३ अंतरे, ४ तरी, ५ माउली

जातीचे नाहीत, २ तुझे हे पापकृत्य मला सहन होत नाही. तुझ्या तोंडून येणारी ही दुष्ट वचनाची वाणी मला ऐकवत नाही तू असे बोलू नकोस ३ तुकाराम महाराज म्हणतात, तुला जर पती हवाच असेल तर गावात इतर लोक का थोडे आहेत? त्यांच्यातील एखादा निवड ना ४

विवरण – वरील दोन अभंगांना तुकोबाच्या आयुष्यातील एका विशिष्ट प्रसंगाचा आधार सांगितला जातो कुणी एक स्त्री त्यांच्याकडे विषयसुखाच्या प्राप्तीसाठी आली होती. तिला उद्देशून या अभंगाची निर्मिती झाली असावी तुकोबांचा लौकिक जसजसा वाढू लागला तसतसा त्यांच्या भोवती अनेक स्त्रीपुरुषांचा जमाव जमत असावा. तुकारामबुवांच्या मुखावरील तेज पाहून, त्यांच्यापैकी एका रूपवान स्त्रीच्या मनात भलतीच वासना निर्माण झाली तिला उद्देशून तुकारामांनी आपल्या हरिभक्तीचे जे मर्म सांगितले आहे, ते सर्वत्र प्रापंचिकांना व साधकांना उपयुक्त आहे मोह, काम, लोभ या वृत्ती नैसर्गिक असल्या, पण त्यांचा आविष्कार यथोचित मार्गाने होणेच युक्त आहे त्यांचा स्वैर संचार व्यक्तीला व समाजाला अहितकारकच होय दुसऱ्याची स्त्री मातेसमान हे एक ब्रीदवाक्य मराठी साधु-संतांचे व श्रीशिवरायांचे होते यातील मर्म फार मोठे होते समाजाचे स्थैर्य व नैतिक आदर्श यांच्यावर राष्ट्राची उभारणी होत असते. या दोनही अभंगाकडे अगदी साध्या प्रापंचिकाच्या दृष्टीने पाहिल्यासही त्यातील मथितार्थ पटण्याजोगा आहे असे दिसेल ईश्वरचिंतनात व आत्मसुखात तल्लीन झालेल्या महात्म्यांना या शुचितेची केवढी गरज आहे हे सांगावयास पाहिजे असे नाही. त्यांची दृष्टीच निवळून गेलेली असावयास हवी सर्व सौंदर्य हरिरूप आहे, माऊलीरूप आहे, हा अधिकार प्राप्त होणे अवघड असले तरी या आदर्शाप्रत सर्वांना जावयाचे असते

'स्त्रियांचा तो संग नको नारायणा' असे तुकोबा म्हणतात त्यावरून संदर्भ न जाणता व त्या अभंगातील रहस्य न ओळखता तुकारामबुवांचा किंवा एकूण संतांचाच स्त्रीविषयक दृष्टिकोण किती तोकडा व चुकीचा आहे याचे विवेचन करण्याकडे प्रवृत्ती काही आधुनिक टीकाकारांची असते, ती किती व्यर्थ आहे हे संतांच्या वचनांचा बारकाईने अर्थ पाहिल्याशिवाय ध्यानात येणार नाही स्त्रीसहवासाचा, स्त्रीसौंदर्याचा एक प्रकारचा तिरस्कारच संतांच्या मनात असतो हे वरवर दिसते हे खरे आहे 'नको नको स्त्रियांचा सांगात । नको स्त्रियांचा एकान्त । नको नको स्त्रियांचा परमार्थ । करिती आघात पुरुषासी' असे थोर प्रापंचिक संत एकनाथ यांनी तरी का म्हटले आहे? 'स्त्रीसंगा तडफडूनि जाण । वैराग्यासी ये मरण', 'तेथ वासना उपदेश जाण । आली नागवण परमार्था', 'अग्नी पोळी धरितां हातीं । तैशी स्त्रियांशी संगति ।' इत्यादी अनेक ओवींतून एकनाथांनीसुद्धा स्त्रीसहवासाची निंदा केलेली दिसते खरी तुकाराम व रामदास यांनीही स्त्रीदेहाची यथेच्छ टवाळी वरवर केलेली दिसते मुक्ताबाई, जनाबाई, बहिणाबाई या थोर स्त्रिया भक्तिमार्गात फार मोठ्या पदावर आरूढ झालेल्या असताना संत स्त्रीबद्दल असे उद्गार काढतात, याचा स्पष्ट अर्थ असा की अतिरिक्त स्त्रीसहवास प्रापंचिकालाही बाधक आहे. केवळ स्त्री, केवळ विषयभोग, केवळ कामसुखाची चटक यापासून साध्या प्रापंचिकासही बाधा होणारी आहे आणि साधकास, मग तो फार मोठे ऐहिक ध्येय मिळविणाराही असो, स्त्रीलोभ अतिरिक्तपणे किती बाधक होईल हे काय सांगावयास हवे?

नटूनथटून तुकोबारायांसारख्या सत्पुरुषाकडे येणाऱ्या स्त्रीस तुकोबांनी या स्त्रिया काष्ठाच्या, पाषाणाच्या, मृत्तिकेच्या सी मानीन असेच म्हणणे यथायोग्य नव्हे काय? 'परस्त्रीया सदा मायबहिणी', 'परद्रव्य परनारीचा अभिलाष । तेथोनिया न्हास सर्व भाग्या', 'विटाळ तो परद्रव्य परनारी' असा वचनांचा एकसारखा वर्षाव करून समाजास मार्गदर्शन करणाऱ्या तुकोबांनी पुढे येणाऱ्या नटव्या स्त्रीस कुणीतरी पती निवडून संसार कर, असा उपदेश केला हे यथायोग्यच झाले असे मानावे लागते तुकोबांच्या किंवा संतांच्या स्त्रीविषयक मनाचा निर्णय याही अभंगावरून आता घेता येण्यासारखा आहे 'कोमल झार्ली विखी विघ्न' असे श्रीचक्रधरांचेही एक सूत्र होते. कोणत्याही ध्येयाच्या साध्यासाठी विषयाचे विघ्नच असते अगदी रोजचा प्रपंच करणाऱ्यासही त्याचा अतिरेक बाधक आहे. माझी बायको, माझी मुले यांचाच ध्यास घेणाऱ्या गाढव प्रापंचिकाची चित्रेही तुकोबांनी उत्तम रीतीने रेखाटली आहेत तर मग विषयसुखार्थ बुवांच्याकडे येणाऱ्या या स्त्रीसंबंधी बुवांनी त्यांचा कडक स्वभाव ध्यानात घेता सौम्यच भाषा वापरली आहे असे म्हणावे लागते

५२५ भक्तिप्रतिपाळे दीन वो वत्सळे । विठ्ठले कृपाळे होसी माये ॥ १ ॥
पडिला विसर माझा काय गुणें । कपाळ हें उणें काय करूं ॥ २ ॥
तुका म्हणे माझें जाळूनि संचित । करीं वो उचित भेट देई ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा :– भक्तिप्रतिपाळे–भक्ति करणाऱ्याचा साभाळ करणारा, गुणें–कारणाने, कपाळ–नशीब

अर्थ :– विठ्ठल माऊली, तू दीनवत्सल व भक्तांवर कृपा करणारी कृपाळू माताच आहेस. १ कोणत्या कारणाने माझा तुला विसर पडला गे माय ? माझेच नशीब खोटे त्याला काय करू ? मीच अवगुणी आहे असे मला वाटते. २ तुकाराम महाराज म्हणतात, देवा माझे सर्व संचित कर्म जाळून, नाहीसे करून मला भेट देणे हेच तुम्हास उचित नाही काय ? ३

५२६ तुजविण मज कोण वो सोयरें । आणीक दुसरें पांडुरंगे ॥ १ ॥
लागलीसे आस पाहा तुझें वास । रात्री वो दिवस लेखीं बोटीं ॥ २ ॥
काम गोड मज न लगे हा धंदा । तुका म्हणे सदा हेंचि ध्यान ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा :– वास–वाट, लेखीं–मोजीत आहे

अर्थ :– पांडुरंगा, तुझ्याशिवाय मला कोण सोयरे आहेत रे ? दुसरे कुणीही मला आणखी तुझ्याशिवाय आप्त नाहीत विठ्ठला १ मला तुझीच एक आशा लागली असून मी एकसारखी तुझी वाट पाहात आहे रात्र व दिवस मी हाताच्या बोटावर मोजीत आहे. २ मला काही काम गोड लागत नाही, की धंदा सुचत नाही. तुकाराम महाराज म्हणतात, मला देवा, एकसारखे तुझेच ध्यान लागलेले असते. ३

५२७ पढियंते आम्ही [1]तुजपाशीं मागावें । जीवींचें सांगावे हितगुज ॥ १ ॥
पाळसील लळे दीन वो वत्सले । विठ्ठले कृपाळे [2]जननिये ॥ २ ॥
जीव भाव तुझ्या ठेवियेला पायीं । तूंचि सर्वा ठायीं एक आम्हां ॥ ३ ॥
दुजियाचा संग लागों नेदीं वारा । नाहीं जात घरा आणिकांच्या ॥ ४ ॥
सर्वसत्ता एकी आहे तुजपाशी । ठावें आहे देसी मागेन तें ॥ ५ ॥
म्हणउनि पुढें मांडियेली आळी । थिंकोनियां चोळी डोळे तुका ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा :– पढियंते–आवडते, लळे–लाड, आळी–हट्ट, थिंकोनिया–रडून

अर्थ :– देवा, आम्हास जे आवडते ते आम्ही तुझ्यापाशी मागू व आमच्या जीवात असणारी हितगुजाची गोष्ट आम्ही तुला सांगू १ दीनावर दया करणाऱ्या वत्सल देवा, विठ्ठला, तू माझे हट्ट पुरविणार आहेस. तू वत्सल अशी माऊलीच आहेस २ आम्ही आमचा सर्व जीवभाव देवा, तुझ्या पायांवर वाहिलेला आहे. तूच सर्व ठिकाणी आम्हांस एकरूपाने दिसतोस. ३ आम्हांला विठ्ठला, दुसऱ्याच्या संगतीचा वाराही लागू देऊ नकोस. मी आता दुसऱ्याच्या घरी जाणारसुद्धा नाही, ४ तुझ्या प्रीतीची सर्वसत्ता एकवटलेली असून मी जे मागेन ते तू देशील असा विश्वास मला आहे ५ म्हणून तर देवा, मी तुझ्यापुढे हा हट्ट धरलेला आहे. मी रडूनरडून डोळे चोळीत आहे. ६

५२८ कोण पर्वकाळ पहासील तीथ । होतें माझें चित्त कासावीस ॥ १ ॥
पाठवी भातुकें प्रेरीं [3]झडकरी । नको राखों उरी पांडुरंगा ॥ २ ॥
न धरावा कोप मजवरी कांहीं । अवगुणी अन्यायी म्हणोनियां ॥ ३ ॥
काय रडवीसी नेणतियां पोरां । जाणतियां थोरां यांचिपरी ॥ ४ ॥
काय उभी कर ठेवुनियां कटीं । वुझावीं धाकुटीं लडिवाळें ॥ ५ ॥
तुका म्हणे आतां पदरासी पिळा । घालीन निराळा नव्हे मग ॥ ६ ॥

१ जयापें, २ होसी माये, ३ प्रेमें.

शब्दार्थ व टीपा :– तीथ–मुहूर्त, तिथी, भातुके–खाऊ

अर्थ :– देवा, माझे चित्त आता फार कासावीस होत राहिले आहे रे. तू ये ना. येण्यासाठी तू काय एखादी चागली तिथी किंवा मुहूर्त पाहात आहेस काय ? १ देवा, तू आपल्या प्रेमाचा खाऊ मला लौकर पाठवून दे स्वत च्याजवळ काही राखून ठेवू नकोस. २ विठ्ठला, मजवर कुठलाच राग धरू नकोस. मी अवगुणी व अन्यायी असलो तरी तुझा राग नसावा. ३ थोर झालेल्या व जाणत्या असलेल्या पोराप्रमाणे तू मजसारख्या नेणत्या मुलास का रडवितोस ? ४ तू नुसते कमरेवर हात ठेवून काय उभा आहेस ? आपली धाकटी व लडिवाळ बाळे आहेत ; त्याची समजूत काढ ना. ५ तुकाराम महाराज म्हणतात, आता देवा, मी तुमच्या पदरास धरून पिठा घालीन व पकडून ठेवीन तुम्हाला. मग मात्र मी काही निराळा होणार नाही. ६

५२९ कां हो देवा कांहीं न बोलाचि गोष्टी । कां मज हिंपुटी करीतसा ॥ १ ॥
कठों प्राण पाहे वचनाची आस । तों दिसे उदास धरिलें ऐसें[1] ॥ २ ॥
येणें काळें बुंथी घेतलीसे खोल[2] । कां नये विटाळ होऊं माझा ॥ ३ ॥
लाज वाटे मज म्हणवितां देवाचा । न पुससी फुकाचा तुका म्हणे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – हिंपुटी–कष्टी, बुंथी–खोळ, घुंगट, खोल–मोठी

अर्थ :– देवा, तुम्ही माझ्याशी कसलीच गोष्ट का बोलत नाही ? मला असे तुम्ही दुःखी कष्टी का करीत आहात ? १ माझा प्राण कठाशी आला असून मी आपली वाट एकसारखी पाहात आहे. पण तुम्ही तर उदास झाल्यासारखे दिसता आहात. २ या वेळी फार मोठी खोळ तुम्ही माझा विटाळसुद्धा होऊ नये म्हणून घेतली आहे असे दिसते. ३ देवा, मी तुमचा असे म्हणविताना मला लाज वाटू लागली आहे. कारण, तुम्ही नुसती फुकाची चौकशीही माझी कधी करीत नाही. ४

५३० उचित ते काय जाणावें दुर्बळें । थोरिवेचें काळें तोंड देवा ॥ १ ॥
देतों हाका कोणी नाइकती द्वारीं । ओस कोणी घरीं नाहीं ऐसें ॥ २ ॥
आलिया अतीता शब्द समाधान । करितां वचन काय वेचे ॥ ३ ॥
तुका म्हणे तुम्हां साजे हे श्रीहरी । आम्ही निलाजिरीं नव्हों ऐसीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– उचित–इष्ट, योग्य, थोरिवेचे–जाणतेपणाचे, अतीता–अतिथीस.

अर्थ – देवा, इष्ट काय आहे, उचित काय आहे ते मजसारख्या दुर्बळाने कसे जाणावे ? आणि जाणतेपणाचे तोंड तर या भक्तिमार्गात काळेच आहे, जाणिवेचा उपयोग नसतो. १ एखाद्या रिकाम्या घरी दारात उभे राहून अनेक हाका माराव्यात, पण त्या कुणी ऐकूच नयेत अशी स्थिती देवा माझी झाली आहे. २ दारी आलेल्या अतिथीस शब्द, नुसता आदराचा शब्दही पुरा पडतो, तो फुकटचा बोलायला काय खर्च होते तुमचे ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, श्रीहरी, तुम्हास हे शोभून दिसते, पण आम्ही मात्र इतके निलाजरे नाहीत. ४.

५३१ आम्ही मागों ऐसें नाहीं तुजपाशीं । जरी तूं भीतोसि पांडुरंगा ॥ १ ॥
पाहे विचारूनि आहे तुज ठावें । आम्ही धालों नावें तुझ्या एका ॥ २ ॥
ऋद्धिसिद्धि तुझें मुख्य[3] भांडवल । हे तों आम्हां फोल भक्तीपुढें ॥ ३ ॥
तुका म्हणे जाऊं वैकुंठा चालत । बैसोनि निश्चित[4] सुख भोगूं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– विचारूनि–विचार करून, धालों–संतुष्ट झालो.

---

१ तुम्हीं, २ खोळ, ३ मोक्ष, ४ निवान्त.

५३५ देखोनियां तुझ्या रूपाचा आकार । उभा कटीं कर ठेवूनियां ॥ १ ॥
तेणें माझ्या चित्ता होतें समाधान । वाटतें चरण न सोडावे ॥ २ ॥
मुखें गातों गीत वाजवितों टाळी । नाचतों राउळीं प्रेमसुखें ॥ ३ ॥
तुका म्हणे मज तुझ्या नामापुढें । तुच्छ हे बापुडें सकळी काळ ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– राउळीं–देवळात.

अर्थ :– कमरेवर हात ठेऊन तू उभा आहेस, असा तुझ्या रूपाचा आकार मी संतुष्ट मनानें पाहात आहे. १ त्यामुळे माझ्या चित्तास केवढे समाधान होत आहे ! तुमचे चरण सोडावेत असे कधी वाटतच नाही. २ सुखाने मी तुमच्या स्तुतीचे गीत गाऊन आनंदाने टाळी वाजवीत आहे; व तुमच्या देवळात मोठ्या भक्तिसुखात तल्लीन होऊन मी नाचत आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तुमच्या एका नामापुढे मला बाकी सर्व तुच्छ वाटते. ४

५३६ आतां येणेंविण नाहीं आम्हां चाड । कोण वडवड करी वांयां ॥ १ ॥
सुख तेंचि दुःख पुण्यपाप खरें । हें तों आम्हां बरें कळों आलें ॥ २ ॥
तुका म्हणे वाचा वाहिली अनंता । बोलायाचें आतां काम नाहीं ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा :– येणेंविण–या तुझ्या नामाशिवाय, वांयां–विनाकारण.

अर्थः – या देवाच्या एका नामाशिवाय आम्हांला कशाचीही जरूरी नाही आता व्यर्थ इतर बडबड तरी कशाला हवी ? १ आता जे मुक्तीचे सुख आहे ते खरे म्हणजे दुःख आहे, पुण्यकारक वाटते ते पाप आहे हे आम्हास चांगलेच समजून आले आहे. २ तुकाराम महाराज म्हणतात, आम्ही ही आमची वाणी त्या अनंतस्वरूप देवाला वाहिली आहे. आता बोलायचे काही कामच उरलेले दिसत नाही. ३

५३७ बोलो अबोलणे मरोनियां जिणें । असोनि नसणें जनि आम्हां ॥ १ ॥
भोगीं त्याग जाला संगींच असंग । तोडियेले लाग माग दोन्ही ॥ २ ॥
तुका म्हणे नव्हें दिसतों मी तैसा । पुसणें तें पुसा पांडुरंगा[1] ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा :– लाग–संबंध, तैसा–विचारा.

अर्थ :–जे न बोलण्यासारखे आहे, त्याच्याविषयीच आम्ही बोलू. आम्ही देहबुद्धीने मरून जगलेलो आहोत. १ सर्व प्रकारच्या उपभोगाविषयी आमच्या मनात त्यागबुद्धीचा उदय झालेला असून सर्व संगांविषयी असंग निर्माण झाला आहे. किंवा आमच्या दृष्टीने सर्व भोग व सर्व संग नारायणस्वरूपच झाल्यामुळे आपोआपच त्याग या असंग घडत आहे. २ तुकाराम महाराज म्हणतात, मी बरवर दिसतो तसा खरे म्हणजे नाही. माझ्या खऱ्या रूपाविषयी तुम्हांस काही विचारायचे असेल, तर ते या पांडुरंगास विचारा ना. ३

५३८ अधिकार तैसा दावियेले मार्ग । चालतां हें मग कळों येतें ॥ १ ॥
जाळूं नये नाव पावलेनि पार । मागील आधार बहुतांचा ॥ २ ॥
तुका म्हणे रोग वैद्याचे अंगीं । नाहीं करी जगीं उपकार ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा :– पार–पलीकडे.

अर्थ :– ज्याचा जसा अधिकार तसा त्यास मार्ग दाखविलेला आहे. असे त्या मार्गाने वागले असता त्यास समजून येईल. १ एकदा नदीपार झाल्यानंतर नाव जाळून टाकू नये. कारण मागाहून येणाऱ्यांना तिचा आधार म्हणून खूप उपयोग होण्यासारखा असतो. २ तुकाराम महाराज म्हणतात, वैद्याचे अंगी रोग नसले, तरी जगातील अनेकांवर उपकार करण्यासाठी तो स्वतःजवळ पुष्कळ औषधे बाळगीत असतो. ३

---

१ विठोबासी.

अर्थ :- पांडुरंगा, आम्ही जे मागणार आहोत ते तुझ्यापाशी नाही. म्हणूनच तू भीत आहेस असे वाटते. १ देवा, तू विचार करून पाहा की, आम्ही तुझ्या नामामृताने संतुष्ट आहोत हे तुलाही माहीत आहे. २ तुझ्याजवळ रिद्धी व सिद्धी यांचेच भाडवल आहे; पण ते आमच्या दृष्टीने तुझ्या भक्तीपुढे फुकट आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, आम्ही तुझ्या वैकुंठाला घालत जाऊ व तिथे निवांतपणे तुझ्या सहवासाचे सुख भोगत राहू. ४

५३२ न लगे हें मज तुझें ब्रह्मज्ञान । गोजिरें सगुण रूप पुरे ॥ १ ॥
लागला उशीर पतितपावना । विसरोनि वचना गेलासि या ॥ २ ॥
जाळोनि संसार बैसलों अंगणीं । तुझे नाहीं मनीं मानसीं ही ॥ ३ ॥
तुका म्हणे नको रागेजों विठ्ठला । उठीं देईं मला भेटी आतां ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- न लगे-नको, रागेजों-रागावू

अर्थ :- देवा, तुझे ते ब्रह्मज्ञान व निर्गुणाचे ज्ञान आम्हास नको, तुझे साजिरे, गोजिरे रुपच मला आता पुरे आहे. १ देवा, मला भेटायला तू उशीर लावला आहेस. मी पतितांना पावन करणारा आहे, या वचनास तू विसरून गेलास वाटते ? २ देवा, मी तर सर्व संसार जाळून टाकून तुझ्या अंगणात येऊन बसलो आहे; पण याचे भान तुझ्या मनातही दिसत नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, रागावू नका माझ्यावर. उठा, मला आता लौकर भेट द्या ना ४

५३३ कमोदिनी काय जाणे तो परिमळ । भ्रमर सकळ भोगीतसे ॥ १ ॥
तैसें तुज ठावें नाहीं तुझें नाम । आम्हीच तें प्रेमसुख जाणों ॥ २ ॥
माते तृण बाळा दुधाची ते गोडी । ज्याची नये जोडी त्यासी कामा ॥ ३ ॥
तुका म्हणे मुक्ताफळ शिंपीपोटीं । नाहीं त्याची भेटी भोग तिये ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- कुमोदिनी-कमळ, परिमळ-सुवास, भ्रमर-भुंगे, तृण-गवत

अर्थ :-देवा, स्वतःमधील सुवास कमळास काही येत नाही, जाणवत नाही. त्याचा भोग इतर भुंगेच घेतात. १ त्याप्रमाणे तुझ्या नामाची गोडी तुला कशी ठाऊक असणार ? त्याचे प्रेमसुख केवळ आमच्यासारख्या भक्तानाच माहीत असते. २ गोमाता गवत खाते; पण त्यापासून निर्माण झालेले दूध मात्र तिच्या वासरासाठीच असते. त्याची गोडी तिच्या बाळान्वाच समजणार ज्याची त्यास गोडी उपयोगी पडत नाही हेच खरे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, शिपल्याच्या पोटात मोती निघतात, पण ते त्यांच्या पोटांत आहेत तोपर्यंत त्याचे सुख उपभोगता येते. त्याप्रमाणे देवा, तुझ्या नामाचे सुख आम्हीच भोगणार. ४

५३४ काय सांगो तुझ्या चरणांच्या सुखा । अनुभव ठाउका नाहीं तुज ॥ १ ॥
बोलतां हे कैसें वाटे खरेपण । अमृताचे गुण अमृतासी ॥ २ ॥
आम्ही एकएका ग्वाही मायपुतें । जाणों तें निरुतें सुख दोघें ॥ ३ ॥
तुका म्हणे आम्हां मोक्षाचा कांटाळा । कां तुम्ही गोपाळा नेणां ऐसें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- ग्वाही-साक्ष, मायपुतें-मायलेकराम, निरुतें-खरे.

अर्थ -देवा, तुमच्या चरणाच्या सुखासंबधी काय सांगावे आम्ही ? तो सुखाचा अनुभव तुम्हांस येणे शक्य नाही. १ तुमच्या चरणसुखाचे वर्णन तुम्हास खरेही वाटणार नाही. अमृताचे गुण अमृतास कसे समजणार ? २ तुझ्या चरणामृताचे सुख किती अवर्णनीय आहे, याची साक्ष केवळ आमची आई श्रीलक्ष्मी किंवा रखुमाई व आम्ही तिची लेकरे यानाच देता येण्यासारखी आहे. ते सुख आम्ही दोघेच जाणू शकतो. ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, आम्हांला तुमच्या त्या मोक्षाचा फार कंटाळा आहे आणि हे तुम्ही जाणीत का नाही ? ४

५३५ देखोनियां तुझ्या रूपाचा आकार । उभा कटीं कर ठेवूनियां ॥ १ ॥
तेणें माझ्या चित्ता होतें समाधान । वाटतें चरण न सोडावे ॥ २ ॥
मुखें गातों गीत वाजवितों टाळी । नाचतों राउळीं प्रेमसुखें ॥ ३ ॥
तुका म्हणे मज तुझ्या नामापुढें । तुच्छ हें बापुडें सकळी काळ ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा .– राउळीं–देवळात.

अर्थ :– कमरेवर हात ठेऊन तू उभा आहेस, असा तुझ्या रुपाचा आकार मी सतुष्ट मनाने पाहात आहे. १ त्यामुळे माझ्या चित्तास केवढे समाधान होत आहे ! तुमचे चरण सोडावेत असे कधी वाटतच नाही. २ मुखाने मी तुमच्या स्तुतीचे गीत गाऊन आनंदाने टाळी वाजवीत आहे; व तुमच्या देवळात मोठ्या भक्तिसुखात तल्लीन होऊन मी नाचत आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तुमच्या एका नामापुढे मला बाकी सर्व तुच्छ वाटते. ४

५३६ आतां येणेंविण नाहीं आम्हां चाड । कोण वडवड करी वांयां ॥ १ ॥
सुख तेंचि दुःख पुण्यपाप खरें । हें तों आम्हां बरें कळों आलें ॥ २ ॥
तुका म्हणे वाचा वाहिली अनंता । बोलायाचें आतां काम नाहीं ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा :– येणेंविण–या तुझ्या नामाशिवाय, वांयां–विनाकारण

अर्थः – या देवाच्या एका नामाशिवाय आम्हांला कशाचीही जरुरी नाही आता व्यर्थ इतर बडबड तरी कशाला हवी ? १ आता जे मुक्तीचे सुख आहे ते खरे म्हणजे दुःख आहे, पुण्यकारक वाटते ते पाप आहे हे आम्हास चागलेच समजून आले आहे. २ तुकाराम महाराज म्हणतात, आम्ही ही आमची वाणी त्या अनंतस्वरुप देवाला वाहिली आहे. आता बोलायचे काही कामच उरलेले दिसत नाही. ३

५३७ बोलों अबोलणे मरोनियां जिणें । असोनि नसणें जनि आम्हां ॥ १ ॥
भोगीं त्याग जाला संगींच असंग । तोडियेले लाग माग दोन्ही ॥ २ ॥
तुका म्हणे नव्हें दिसतों मी तैसा । पुसणें तें पुसा पांडुरंगा[1] ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा :– लाग–संबंध, तैसा–विचारा

अर्थ :–जे न बोलण्यासारखे आहे, त्याच्याविषयीच आम्ही बोलू. आम्ही देहबुद्धीने मरुन जगलेलो आहोत. १ सर्व प्रकारच्या उपभोगाविषयी आमच्या मनात त्यागबुद्धीचा उदय झालेला असून सर्व संगाविषयी असंग निर्माण झाला आहे. किंवा आमच्या दृष्टीने सर्व भोग व सर्व संग नारायणस्वरुपच झाल्यामुळे आपोआपच त्याग वा असंग घडत आहे. २ तुकाराम महाराज म्हणतात, मी वरवर दिसतो तसा खरे म्हणजे नाही. माझ्या खऱ्या रूपाविषयी तुम्हांस काही विचारायचे असेल, तर ते या पांडुरंगास विचारा ना. ३

५३८ अधिकार तैसा दावियेले मार्ग । चालतां हें मग कळों येतें ॥ १ ॥
जाळूं नये नाव पावलेनि पार । मागील आधार बहुतांचा ॥ २ ॥
तुका म्हणे रोग वैद्याचे अंगीं । नाहीं करी जगीं उपकार ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा :– पार–पलीकडे.

अर्थ :– ज्याचा जसा अधिकार तसा त्यास मार्ग दाखविलेला आहे. असे त्या मार्गाने वागले असता त्यास समजून येईल. १ एकदा नदीपार झाल्यानंतर नाव जाळून टाकू नये. कारण मागाहून येणाऱ्यांना तिचा आधार म्हणून खूप उपयोग होण्यासारखा असतो. २ तुकाराम महाराज म्हणतात, वैद्याचे अंगी रोग नसले, तरी जगातील अनेकांवर उपकार करण्यासाठी तो स्वतःजवळ पुष्कळ औषधे बाळगीत असतो. ३

---

१ विठोबासी.

५३९ सवसार तीहीं केला पाठमोरा । नाहीं द्रव्य दारा जया चित्तीं ॥ १ ॥
शुभाशुभ नाहीं हर्षामर्ष अगीं । जनार्दन जगीं होउनि ठेला ॥ २ ॥
तुका म्हणे देहें दिला एकसरें । जयासि दुसरें नाहीं मग ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा – तीहीं–त्यानी, दारा–स्त्री, हर्षामर्ष–सुखदु ख

अर्थ – ज्याच्या चित्तात स्त्री व द्रव्य याच्याबद्दल आसक्ती नाही त्यानी ससारास पाठमोरे केले आहे ससार सोडला आहे असे मानावयास हरकत नाही १ ज्याला शुभ व अशुभ याच्याबद्दल सुख वा दु ख वाटत नाही, तो या जगात प्रत्यक्ष जनार्दनच होऊन राहिला आहे असे समजावे २ तुकाराम महाराज म्हणतात, ज्याने आपला देह नेहमीच देवास अर्पण केला आहे, त्यास या जगात दुसरे काही उरले आहे असे नाही ३

५४० देहबुद्धि वसे लोभ जया चित्तीं । आपुलें जाणती परावें जे ॥ १ ॥
तयासि चालता पाहिजे सिदोरी । दु ख पावे करी असत्य तो ॥ २ ॥
तुका म्हणे धर्म रक्षाया कारणें । छाया इच्छी उन्हे तापला तो ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा –परावे–दुसऱ्याचे

अर्थ – ज्याची देहबुद्धी अजून दूर झालेली नाही व ज्याच्या चित्तात लोभ वस्ती करून आहे, तो हे आपले, हे दुसऱ्याचे असे समजून असतो १ त्याला मात्र या जन्माची वाटचाल करीत असताना पुण्याची शिदोरी हवीच असत्य कर्म केल्यास त्यास दु खच होणार २ जो उन्हाने तापलेला आहे, त्यासच शीतल छायेची जरुरी वाटणार धर्म रक्षण करण्यासाठी असा प्रयत्न केलाच पाहिजे ३

५४१ काळें खादला हा अवघा आकार । उत्पत्तिसहारघडमोडी ॥ १ ॥
बीज तो अकुर आच्छादिला पोटीं । अनता सेवटीं एकाचिया ॥ २ ॥
तुका म्हणे शब्दें व्यापिलें आकाश । गुह्यार हे तैसें कळो[1] नये ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा -उत्पत्ति–निर्मिती, सहार–शेवट, अनता–कल्पान्ताच्या गुह्यार–गुह्य

अर्थ – जगाची निर्मिती आणि सहार याच्या घडामोडीत जगास आलेला हा आकार काळ एकसारखा खात असतो १ ज्याप्रमाणे निर्माण होणारा अकुर त्या बीजाच्या पोटीच सामावलेला असतो, त्याप्रमाणे कल्पान्ताच्या शेवटी सर्व चराचर विश्व त्या एकाच्याच पोटी विलीन होणार आहे २ तुकाराम महाराज म्हणतात, हे सर्व आकाश शब्दाचेच आहे, हे गुह्य कसे कळून येत नाही ? ३

५४२ आणीक काळें न चले उपाय । धरावे या[2] पाय विठोबाचे ॥ १ ॥
अवघेंचि पुण्य असे तया पोटीं । अवघिया तुटी होय पापा ॥ २ ॥
अवघें मोकळें अवघिया काळें । उद्धरती कुळें नरनारी ॥ ३ ॥
काळ वेळ नाहीं गर्भवासदु खें । उच्चारिता मुखें नाम एक ॥ ४ ॥
तुका म्हणे काहीं न लगे साडावें । सागतसे भावें घेती तया ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – या काळें–या काळात कलियुगात, तुटी–नाश

अर्थ – या कलियुगात दुसरा काही उपाय करायलाच नको एका त्या विठोबाचे पाय धरले म्हणजे पुरे १ मग सर्व पुण्ये त्याच्या पोटात आली आहेत असे समजा त्यामुळे सर्व पापाचाही नाश खात्रीने होईल २ त्या विठ्ठलाचे चिंतन केल्यानतर सर्वजणाना सर्व काळ मोकळाच वाटेल त्यामुळें साऱ्या स्त्रीपुरुषाची कुळे उद्धरली जातात ३ श्रीहरीचे नाव मुखाने उच्चारण्यास काही काळवेळ पाहण्याची जरुरी नाही त्या नामाने गर्भवासाची दु खे दूर होतात ४ तुकाराम महाराज म्हणतात, यासाठी काही सोडून देण्याची गरज नाही जो कोणी भक्तिभावाने हे नाम घेत असेल त्यासच मी हे सागत आहे ५

१ कैंस, २ ते

५४३ कां रे माझा तुज न ये कळवळा । असोनि जवळा हृदयस्था ॥ १ ॥
अगा नारायणा निष्ठुरा निर्गुणा । केला शोक नेणां कंठस्फोट ॥ २ ॥
कां हे चित्त नाहीं पावलें विश्रांती । इंद्रियांची गति [1]कुंटेचि ना ॥ ३ ॥
तुका म्हणे कां रे धरियेला कोप । पाप सरलें नेणो पांडुरंगा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा– कंठस्फोट–घसाफोड, कोप–राग

अर्थ –देवा, तू माझ्या अगदी हृदयात वास करून असतानाही तुला माझा कळवळा कसा येत नाही रे ? १ देवा, नारायणा, तू निष्ठुर व निर्गुण आहेस असे वाटते, कारण मी घसाफोड करून शोक केला तरी तुला त्याबद्दल काहीच समजत नाही. २ माझे हे चित्त का विश्रांतीस पावत नाही ? विषयाकडे असणारी इंद्रियांची गती कुंठीत का होत नाही ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तुम्ही असा राग मजवर का धरला आहे हो ? पांडुरंगा, अजून माझे पाप संपले नाही की काय ? ४

५४४ दीनानाथा तुझीं ब्रिदें चराचर । घेसील कैवार शरणागता ॥ १ ॥
पुराणी जे तुझे गर्जती पवाडे । ते आम्हां रोकडे कळों आले ॥ २ ॥
आपुल्या दासांचे न साहासी उणें । उभा त्याकारणें राहिलासी ॥ ३ ॥
चक्र गदा हातीं आयुधें अपारे । न्यून तेथें[2] पुरें करूं धावें ॥ ४ ॥
तुका म्हणे तुज भक्तीचे कारण । करावया पूर्ण अवतार ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– ब्रिदें–वचने, प्रतिज्ञा, आयुधें–शस्त्रे, न्यून–कमी

अर्थ :– आपले जे शरणागत असतील त्यांचा सांभाळ करणे, त्यांची बाजू सावरणे हीच दीनानाथा, तुझी प्रतिज्ञा आहे ना ? १ पुराणातून तुझ्या कीर्तीचे जे पवाडे गर्जून आहेत त्यावरून उघड उघड असे हेच आम्हास कळून आले. २ तू आपल्या भक्तांना काही कमी पडते, हे मुळीच सहन करीत नाहीस. त्यांच्या मदतीसाठीच तू अखंडपणे उभा आहेस ३ यासाठीच तुझ्या हातात अपार अशी चक्र, गदा इत्यादी हत्यारे असतात. जिथे जे कमी पडेल ते पूर्ण करण्यासाठी तू धावत जातोस. ४ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, भक्तीचे कार्य पूर्ण करण्यासाठीच तुझा अवतार आहे. ५

५४५ वर्णूं महिमा ऐसी नाहीं मज वाचा । न बोलवे साचा पार तुझा ॥ १ ॥
ठायींची हे काया ठेविली चरणीं । आतां ओंवाळुनि काय सांडूं ॥ २ ॥
नाहीं भाव ऐसा करूं तुझी सेवा । जीव वाहूं देवा तो ही तुझा ॥ ३ ॥
मज माझें कांहीं न दिसे पाहातां । जें तुज अनंता समर्पावें ॥ ४ ॥
तुका म्हणे आतां नाहीं मज थार । तुझे उपकार फेडावया ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– साचा–बरोबर, पार–अंत, शेवट, थार–आधार.

अर्थ :– देवा, तुझा महिमा पूर्णपणे वर्णन करावा अशी वाचा मजजवळ नाही तुमच्या महिम्याचा अंत वर्णन करता येणार नाही, असाच तो आहे १ हे माझे मूळचे शरीरच देवा, मी तुमच्या पायांवर अर्पण केले आहे, आता आणखी ओवाळून काय टाकू तुजवरून ? २ देवा, तुमची सेवा करावी असा भावच नाही. जीव तुम्हांस अर्पण करावा तर तोही तुमचाच आहे ना देवा? ३ मला आता माझे असे जे तुला समर्पण करावे असे काहीच दिसत नाही. ४ तुकाराम महाराज म्हणतात, तुझे अनंत उपकार फेडावेत यासाठी मजजवळ काही आधारच उरलेला नाही ५

५४६ नाहीं सुख मज न लगे हा मान । न राहे हें जन काय करूं ॥ १ ॥
देहउपचारें पोळतसे अंग । विषतुल्य चांग मिष्टान्न तें ॥ २ ॥

---

१ सुटे, २ तेथि.

नाइकवे स्तुति वाणितां थोरीव । होतो माझा जीव कासावीस ॥ ३ ॥
तुज पावें ऐसी सांग कांहीं कळा । नको मृगजळा गोवूं मज ॥ ४ ॥
तुका म्हणे आतां करीं माझें हित । काढावें जळत आगींतूनि ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपाः– विषतुल्य–विषाप्रमाणे, चांग–चागले, वाणितां–वर्णन करीत असताना, कळा–कला, गोवूं–गुतवू

*अर्थ*.– *देवा, मला हा मान नको. हा मान हे काही माझे खरे सुख नाही. पण हे लोक ऐकत नाहीत, त्याला मी* काय करू? १ त्यांच्या सुखोपचारांनी माझे हे अंग देवा, पोळून निघते चांगले गोड मिष्टान्न मला विषाप्रमाणे कडू लागते. २ कुणी माझी स्तुती केली, कुणी थोरवी वर्णन केली की ती ऐकावी असे मला वाटत नाही, त्यामुळे माझा जीव फार कासावीस होतो ३ विठ्ठला, मी तुला येऊन मिळेन अशी एखादी कला माझ्या अंगात येऊ दे ना. आता या भ्रान्त मृगजळात मला ओढून घेऊ नकोस. ४ तुकाराम महाराज म्हणतात, आता माझे काही हित करा ना. मला या अग्नीतून जळताना काढा ना. या संसाराच्या अग्नीतून मला मुक्त करा ना. ५

५४७ न मिळो खावया न वाढो संतान । परि हा नारायण कृपा करो ॥ १ ॥
ऐसी माझी वाचा मज उपदेशी । आणीक लोकांसी हेंचि सांगे ॥ २ ॥
विटंबो शरीर होत कां विपत्ति । परि राहो चित्तीं नारायण ॥ ३ ॥
तुका म्हणे नासिवंत हें सकळ । आठवे गोपाळ तेंचि हित ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – संतान–सतती

अर्थ.– देवा, मला खायला न मिळो, माझी सतती न वाढो, परतु या नारायणाने मात्र माझ्यावर कृपा करावी. १ अशा प्रकारचा उपदेश माझी वाचा माझ्या मनास वारवार करीत असते आणखी इत्तर लोकांनाही असेच सांगत असते. २ माझ्या शरीराची विटबना होऊ दे. मला आणखी संकटे प्राप्त होऊ दे. पण माझ्या चित्तात त्या नारायणाने राहावे. ३ कारण तुकाराम महाराज म्हणतात, या माझ्या नारायणाशिवाय सर्व नाशवंत असून गोपाळाची आठवण येणे यातच खरे हित आहे. ४

५४८ पिंड पोसावे हें अधमाचें ज्ञान । विलास मिष्टान्न करूनियां ॥ १ ॥
शरीर रक्षावें हा धर्म बोलती । काय असे हातीं तयाचिया ॥ २ ॥
क्षणभंगुर हें जाय न कळतां । ग्रास गिळी सत्ता नाहीं हातीं ॥ ३ ॥
कर्वतिलीं देहें कापियेले मांस । गेले वनवासा शुकादिक ॥ ४ ॥
तुका म्हणे राज्य करितां जनक । अग्नीमाजी एक पाय जळे ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – पिंड–शरीर, क्षणभगुर–क्षणात नाहीसा होणारा

अर्थ.– केवळ शरीराचे पोषण करावे हे अधमाचे ज्ञान होय. विलास करून, मिष्टान्न सेवन करून आपलाच देह पुष्ट करावा असे त्याना वाटते. १ शरीराचे रक्षण करणे हाच एक धर्म असे ते बोलतात; पण खरे पाहिले असता, शरीराचे रक्षण करणे काय त्याच्या हातांत आहे ? २ तो तर एका क्षणात नाहीसा होणार आहे. न समजताच तो नाहीसा होईल. हातातील घास मी गिळीन इतके म्हणण्याचीही सत्ता त्यास नाही. ३ कित्येक साधकानी देवाच्या प्राप्तीसाठी आपले देह कर्वतीने कापवून घेतले आहेत; मास कापून काढले आहे, देहाचे हालहाल केले आहेत. शुकादिकासारखे तर वनवासाला सुद्धा गेले. ४ तुकाराम महाराज म्हणतात, पण जनक राजा राज्य करीत असता अग्नीमध्ये एक पाय जळत असतानासुद्धा त्याला भान राहिले नाही. साराश, शरीर कष्टविणे किंवा त्याचे लाड करणे यात काही नसून तुमच्या मनातील भावात सर्व काही आहे. ५

५४९ जरी माझी कोणी कापितील मान । तरी नको आन वदो जिव्हे ॥ १ ॥
सकळां इंद्रियां हे माझी विनंती । नका होऊं परतीं पांडुरंगा ॥ २ ॥
आणिकांची मात नाइकावी कानीं । आणीक नयनीं न पाहावें ॥ ३ ॥
चित्ता तुवां पायीं रहावें अखंडित । होउनी निश्चित एकविध ॥ ४ ॥
चला पाय हात हेंचि काम करा । माझ्या नमस्कारा विठोबाच्या ॥ ५ ॥
तुका म्हणे तुम्हा भय काय करी । आमुचा कैवारी नारायण ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – आन–दुसरं परती–दूर मात–गोष्ट

अर्थ – जिभे, जरी माझी कुणी मान कापायला निघाले तरी, तू पांडुरंगाच्या नामाखेरीज दुसरे काही बोलू नकोस १ माझ्या सर्व इंद्रियांना हीच विनंती आहे की, त्यांनी विठ्ठलापासून दूर होऊ नये २ दुसऱ्या कुणाचीही गोष्ट त्यांनी ऐकू नये त्या विठ्ठलाखेरीज दुसऱ्या कुणाचे या डोळ्यांनी रूप पाहू नये ३ चित्ता, तू या विठ्ठलाच्याच पायी अखंड वसती करून असावेस तू निश्चित होऊन तेथे स्तब्ध होऊन असावेस ४ चला हातापायांनो तुम्ही हेच एक काम करा माझ्या विठ्ठलास नमस्कार करणे हेच एक काम तुमचे आहे ५ तुकाराम महाराज म्हणतात, मग तुम्हास कसली भीती आली आहे ? आमचा कैवार घेणारा तो एक नारायणच आहे ना ? ६

५५० करिसी ते देवा करीं माझें सुखें । परी मी त्यासी मुखें न म्हणे संत ॥ १ ॥
जया राज्य द्रव्य करणें उपार्जना । वश दंभमाना इच्छे जाले ॥ २ ॥
जगदेव परी निवडीन निराळे । ज्ञानाचे आंधळे भारवाही ॥ ३ ॥
तुका म्हणे भय न धरीं मानसीं । ऐसियाचे विशीं करितां दंड ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – उपार्जना–मिळविणे

अर्थ – देवा, माझे जे काय तू करशील ते तू सुखाने कर पण त्यांना माझ्या मुखाने मी काही संत म्हणणार नाही, कुणाला ? १ तर ज्यांना राज्य, द्रव्य मिळविणे हेच नेहमी करायचे असते, व जे नेहमी दंभ मान यांच्या इच्छेला वश झालेले असतात, त्यांना मी संत मानणार नाही २ सर्व जग ईश्वरस्वरूप आहे, असे असले तरी मी त्यांना निवडून वेगळे काढीन हे ज्ञानाने आंधळे असून निव्वळ भारवाही आहेत ३ तुकाराम महाराज म्हणतात, यांना दंड करण्याविषयी मी माझ्या मनात थोडेही भय धारण करणार नाही ४

५५१ म्हणविती ऐसे आइकतो संत । न देखीजे होत डोळां कोणी ॥ १ ॥
ऐसियाचा कोण मानितें विश्वास । निवडे तो रस घाईंडाईं ॥ २ ॥
पर्जन्याचे काळीं वाहाळाचे नद । ओसरतां बुंद न थारेचि ॥ ३ ॥
हिऱ्या ऐशा गारा दिसती दूरोन । तुका म्हणे घन[1] न भेटे तों ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – घाईंडाईं–संकटात बुंद–थेंब घन–आघात

अर्थ – पुष्कळ लोक ज्यांना संत संत म्हणून म्हणतात, त्यांची नावे मी ऐकतो आहे, पण अजून डोळ्यास तर कुणी दिसलेले नाही १ अशाचा विश्वास कोण धरणार ? अनेक संकटप्रसंगात ज्यांची शांती ढळत नाही तेच खरे संत २ खूप पाऊस पडत असताना साध्या साध्या ओहोळाच्या मोठ्या नद्या झालेल्या दिसतात, पण पाण्याचा पूर ओसरून गेल्यावर त्याच्यात थेंबही उरलेला नसतो ३ गारा दुरून हिऱ्याप्रमाणेच दिसतात, पण घणाच्या आघाताची व त्यांची गांठ पडताच त्यांचे स्वरूप स्पष्ट होते आघातात टिकतील तेच संत ४

५५२ अतिवाद लावी । एक बोट सोंग दावी ॥ १ ॥
त्याचा बहुरूपी नट । नव्हे वैष्णव तो चाट ॥ २ ॥

[1] घण

प्रतिपादी वाळी । एक पुजी एका छळी ॥ ३ ॥
तुका म्हणे नाहीं । भूतदया ज्याचे ठायीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – नट–रेघ, नटणे, चाट–चावट

अर्थ – जो अतिवाद करणारा आहे व जो कपाळावर एका बोटाची रेघ ओढून गंध लावणारा आहे, अथवा जो एक बोट करून ब्रह्म एक असल्याचे सागणारा आहे त्याचे ते सर्व ढोंग असते १ त्याचा तो वेष फसवा असून तो त्यामुळे वैष्णव झालेला नसून तो चावटच असतो २ तो एकाचे प्रतिपादन करतो, दुसऱ्यास दूर करतो, एकाची पूजा करतो, दुसऱ्याची छळणूक करतो ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशाच्या ठिकाणी भूतदयाही असत नाही ४

५५३ पोटाचे ते नट पाहों नये छंद । विषयाचे भेद विषयरूप ॥ १ ॥
अर्थी परमार्थ कैसा घडों सके । चित्त लोभी भीके सोंग वाया ॥ २ ॥
देवाची चरित्रें दाखविती लीळा । लाघवाच्या कळा मोहावया ॥ ३ ॥
तुका म्हणे चित्तीं राहे अभिळास । दोघा नरकवास सारिखाचि ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – अर्थी–द्रव्याच्या उद्देशात

अर्थ .– जे पोटाकरिता नाटकात कामे करून नाना सोंगे घेतात, नाना छंद करतात, त्यांचे दर्शन घेऊ नये कारण त्याच्या रूपानी नाना विषयाची नाना रूपेच व्यक्त झालेली असतात १ ज्या ठिकाणी द्रव्य मिळविण्याचाच एक उद्देश असतो, त्यात परमार्थ कसा साधावा? चित्तात लोभ असताना देवाचे जरी सोंग घेतले तरी ते व्यर्थच असते, नाही का ? २ नाना प्रकारची सोंगे घेऊन देवाची चरित्रे व त्याच्या लीला हे लोक दाखवितात लोकाना मोहित करण्यासाठी चतुराईने सोंगे घेतात ३ तुकाराम महाराज म्हणतात पण त्याच्या चित्तात अभिलाषा, द्रव्याविषयी इच्छा असल्याने त्याचा काय उपयोग ? अशी सोंगें दाखविणारा व पाहणारा दोघानाही सारखाच नरकवास घडतो ४

५५४ भुकती तीं द्यावीं भुको । आपण त्याचे नये शिको ॥ १ ॥
भाविकानीं दुर्जनाचे । मानूं नये काहीं साचे ॥ २ ॥
होइल तैसें बळ । फजीत करावे ते खळ ॥ ३ ॥
तुका म्हणे त्याचे । पाप नाहीं ताडणाचे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा ‘– साचे–खरे, खळ–दुष्ट, ताडणाचे–मारल्याचे

अर्थ – जी दुष्ट माणसे भुकत असतील त्याना भुकू द्यावे आपण त्यांच्यासारखे कधी शिकू नये १ जे ईश्वरावर विश्वास ठेवून आहेत त्यानी दुर्जनाचे काही खरे मानू नये २ ज्या उपायानी दुष्टांना फजित करता येईल त्यांनी ते करावेत ३ तुकाराम महाराज म्हणतात, त्याना मारल्याचे काही पापही कुणाला लागण्यासारखे नाही ४

५५५ जप करिता राग । आला जवळी तो मांग ॥ १ ॥
नको भोवताले जगीं । पाहों जवळी राग अंगीं ॥ २ ॥
कुड्याची संगती । सदा भोजन पंगती ॥ ३ ॥
तुका म्हणे ब्रह्म । साधी विरहित कर्म ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – कुड्याची–वाईटाची, विरहित–भग्नच

अर्थ – जप करीत असताना जर तुला राग आला, तर तो मांगाच्या विटाळाप्रमाणेच समजावा १ तू भोवतालच्या जगात पाहूच नकोस भोवती कोण महार आहे, की मांग आहे हे न पाहता तुझ्या अंत करणात क्रोध-रूपी मांग शिरत नाही ना, एवढेच तू पहा मात्र २ वाईटाची संगत व नेहमी त्याच्याच पंगतीने भोजन होत आहे

की काय याविषयी तू सावध हो. ३ तुकाराम महाराज म्हणतात, असे कर्मकांडाविरहित अथवा नैष्कर्म्य असणारे जे ब्रह्म आहे ते साधून घे. ४

५५६ कांहींच मी नव्हें कोणिये गांवींचा । एकट ठायींचा ठायीं एक ॥ १ ॥
नाहीं जात कोठें येत फिरोनियां । अवघेंचि वांयांविण बोलें ॥ २ ॥
नाहीं मज कोणी आपुलें दुसरें । कोणाचा मी खरें कांहीं नव्हे ॥ ३ ॥
नाहीं आम्हां ज्यावें मरावें लागत । आहों अखंडित जैसे तैसे ॥ ४ ॥
तुका म्हणे नांवरूप नाहीं आम्हां । वेगळा ह्या कर्मा अकर्मासीं ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा: – ठायींचा–मूळचा, ज्यावें–जगावे, कर्मअकर्म–विधिनिषेध

अर्थ :–मी तसे पाहिले तर काहीच नाही. मी कोण्या एका गावचा आहे असेही नाही. एकाच जागी असणारे जे काही आहे ते मी आहे १ मी कुठे जात नाही, आणि कुठून फिरूनही येत नाही. माझे सर्व हे बोलणेही व्यर्थच आहे. २ मला कुणी आपले नाही, मी तसा खरा कुणाचाच नाही ३ आम्हांला जगावे लागत नाही, मरावे लागत नाही. आम्ही जसे अखंडित आहोत तसेच आहोत. ४ तुकाराम महाराज म्हणतात, आम्हांस नाव, रूप, काही नाही. व कर्मअकर्म किंवा विधिनिषेध त्यांहूनही आम्ही वेगळेच आहोत. ५

## लोहगांवास परचक्रवेढा पडला—अभंग ३.

५५७ न देखवे डोळां ऐसा हा आकांत । परपीडे चित्त दुःखी होतें ॥ १ ॥
काय तुम्ही येथें नसालसें जालें । आम्हीं न देखिलें पाहिजे हें ॥ २ ॥
परचक्र कोठें हरिदासांच्या वासें । न देखिजेत देशें राहातिया ॥ ३ ॥
तुका म्हणे माझी लाजविली सेवा । हीनपणें देवा जिणें जालें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :–आकांत–दुःखद प्रसंग, परपीडे–दुसऱ्याच्या दुःखाने, परचक्र–शत्रूचे राजकीय संकट

अर्थ :– देवा, मला हा दुःखद प्रसंग आता पाहवत नाही. दुसऱ्याना पीडा झाल्याने देवा, मला भारी दुःख होते १ तुम्ही काय येथे नाहीत असे झाले? पण हे संकट यापुढे आम्हांस दिसता कामा नये. २ हरिदासांचा निवास ज्या ठिकाणी आहे, त्या स्थानी असे परचक्र कुठून असणार ? जेथे हरिभक्त राहतात, तेथे संकटांना वाव कुठला ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, आजपर्यंत माझी सेवा लाजविलीत. देवा, या संकटाने माझे जिणे हीनपणाचे झाले आहे. ४

५५८ काय म्यां मानावें हरिकथेचें फळ । तरिजे सकळ जनीं[1] ऐसें ॥ १ ॥
उच्छेद तो असे हा गे आरंभला । रोकडें विठ्ठला परचक्र ॥ २ ॥
पापाविण नाहीं पाप येत पुढें । साक्षीसी रोकडें साक्ष आलें ॥ ३ ॥
तुका म्हणे जेथें वसतील दास । तेथें तुझा वास कैसा आतां ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – तरिजे–रक्षण होते, उच्छेद–नाश, रोकडें–स्पष्ट

अर्थ :– देवा, हरिकथेमुळे काय साधते असे मानावे ? असे हे परचक्र येते, की सर्व जनांचे रक्षण होते ? हरिकथेचे फळ कोणते मानावे ? १ आज तर विठ्ठला, सर्वांचा नाश तुम्ही आरंभीला आहे. या परचक्रावरून हे स्पष्टच दिसत आहे. २ पापावाचून पाप पुढे येत नाही, याचाच प्रत्यय या अनुभवाने येत आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, जेथे तुमचे दास राहतात तेथे तुमचे वास्तव्य असते असे आता मानावे तरी कसे ? ४

५५९ भीत नाहीं आतां आपुल्या मरणा । दुःखी होतां जना न देखवे ॥ १ ॥
आमची तो जाती ऐसी परंपरा । कां तुम्ही दातारा नेणां ऐसें ॥ २ ॥

[1] १ जन.

भजनीं विक्षेप तेचि पैं मरण । न वजावा क्षण एक वाया ॥ ३ ॥
तुका म्हणे नाहीं आघाताचा वारा । ते स्थळीं दातारा ठाव[1] मागें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – नेणा–जाणीत नाही, विक्षेप–अडचण, आघाताचा–संकटाचा, ठाव–ठिकाण

अर्थ – देवा, मी आता आपल्या स्वत च्या मरणास भीत नाही, पण इतर लोक दु खी कष्टी होतात ते मात्र पाहवत नाही १ आमची भक्ताची व हरिदासाची ही अशीच परपरा आहे दातारा, देवा, तुम्हास का हे माहीत नाही ? २ आमच्या हरिभजनात अडचण आली की आम्हास मरणाप्रमाणे वेदना होतात भजनाशिवाय एक क्षणही वाया जाऊ नये असे वाटते ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, कसल्याही सकटाचा वाराही लागू नये असे ठिकाण दातारा, मला आता दाखीव ४

विवरण –पुण्याच्या शेजारी येरवड्याच्या पलीकडे ईशान्येस नऊ मैलावर असणाऱ्या लोहगावी तुकारामबुवाच कीर्तन ऐन रगात आल असताना, त्या गावास परचक्राचा वेढा पडला त्या प्रसगी तुकोबाच्या मुखातून ह अभग प्रकट झाले आहेत तुकारामबुवाचा सबध लोहगावी प्रथमपासूनच होता या गावच्या मोझे घराण्यात तुकोबाचे आजोळ असून त्याची पहिली बायको रखुमाबाई ही याच गावची होती तुकोबाचे अनुयायी या गावी विशेष असल्याने त्याचे कथाकीर्तनाच्या निमित्ताने तथे विशेष जाणे येणे असल्यास नवल नाही या गावात तुकारामबुवाचे एक दऊळही आहे पढरपूरहून आळदीस येणाऱ्या वारकऱ्याना लोहगाव आजही तुकारामतीर्थ म्हणून महत्त्वाच वाटते '**मथुरेसि कृष्ण जन्मला पाहीं । परी गोकुळींच्या सुखास पार नाहीं । तैसा तुकयाचा प्रेमा सर्वही । लोहगावीं लुटिला ॥**' अशा शब्दात महीपतीबुवानी तुकोबाचा लोहगावसबध वर्णन केला आहे बहुधा श्रावण महिन्यात तुकोबाची अनेक कीर्तने लोहगावात होत असत सन १६३६ च्या सुमारास मोगलाचे परचक्र पुणे भागात एकसारखे येत राहिले शहाजीविरुद्ध महाजान, खानजमान, रणदुल्लाखान इत्यादीचे भय वारवार निर्माण होई सन १६३६ च्या जून महिन्यात खानजमान याने पुण्याकडे सैन्यासह आपला मोहरा वळविला लोहगावी परचक्र झाले ते हेच असावे असा आधुनिक सशोधकाचा तर्क आहे या प्रसगी महीपतीबुवानी जे चमत्कारिक आख्यान जुळविले आहे त्यात स्वल्पकालाची विसगती तर आहेच, शिवाय या प्रसगी अभग तीन की चार यासबधीही मतभेदाची चर्चा अभ्यासकानी केलेली आहे या गाथेतील पुढील १६०४ या क्रमाकाचा '*बोल्लिों तें आता पाळावें वचन । ऐसें पुण्य कोण माझे गाठीं ॥*' या अभगाचा समावेश वरील तीन अभगाबरोबरच कधी कधी करण्यात येतो

५६० फिरंगी वाखर लोखंडाचे विळे । परि ते निराळे गुणमोल ॥ १ ॥
पायरी प्रतिमा एकचि पाषाण । परि ते महिमान वेगळाले ॥ २ ॥
तुका म्हणे तैशा नव्हतील परी । संतजना सरी सारिखिया ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा –फिरंगी–तरवार, वाखर–वस्तरा, सरी–योग्यता

अर्थ –तरवार, वस्तरा व विळे हे सर्व पदार्थ एका लोखडाचेच असले तरी ते आपापल्या गुणामुळे वेगळेच ठरलेले असतात १ पाय देऊन चढायची पायरी व पूजेची प्रतिमा ही एका पाषाणाची खरी, पण प्रत्येकाचे महत्त्व किती वेगळे आहे २ तुकाराम महाराज म्हणतात, परतु येथे मात्र तसा प्रकार नाही सर्व सतजन एकसारख्याच योग्यतेचे आहेत ३

५६१ कोण जाणे कोणा घडे उपासना । कोण या वचनाप्रति पावे ॥ १ ॥
आता माझा श्रोता वक्ता तूंचि देवा । करावी ते सेवा तुझीच म्या ॥ २ ॥
कुशळ चतुर येथें न सरते । करितील रिते तर्क मतें ॥ ३ ॥
तुका म्हणे जाले पेणें एके घरीं । मज आणि हरी तुम्हा गाठी ॥ ४ ॥

---

[1] ठेवी मज

शब्दार्थ व टीपा :– न सरते–पुरत नाही, पेणें–मुक्काम.

अर्थ :– देवा, तुझी उपासना कोणास घडेल ती घडो; या निर्णयाच्या वचनाप्रत कोण येईल ते येवो. १ पण आता माझा श्रोता व वक्ता तू होऊन अभेदत्वाची अनुभूती मला यावी. या जाणिवेने मी तुझी सेवा करावी. २ जे कुशल आहेत, चतुर आहेत, त्यांची चतुराई काही पुरत नाही. ते तुला भजत नाहीत. नुसते आपल्या बुद्धीने वृथा तर्कच करीत असतात. ३ देवा, तुमचा व माझा मुक्काम एकाच घरी झालेला असल्यामुळे तुमची व माझी गाठ आता नित्याची आहे. ४

५६२ आमचा विनोद तें जगा मरण । करिती भावहीण दखोवेखीं ॥ १ ॥
न कळे सतंत हिताचा विचार । तों हे दारोदार खाती फेरे ॥ २ ॥
वंदिलें वंदावें निंदिलें निंदावें । एक गेलें जावें त्याचि वाटा ॥ ३ ॥
तुका म्हणे कोणी नाइके सांगतां । होती यमदूता वरपडे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – देखोवेखी–दुसऱ्याचे पाहून, वरपडे–साधन.

अर्थ:– आम्ही परमेश्वराची जी भक्ती धारभिली आहे, जे थट्टेने बोलणे त्याच्याशी आम्ही करितो, ते जगाचे दृष्टीने त्याचे मरणच आहे. कारण आमचे वरवर पाहून ते अंगी भाव नसता परमार्थाचे आचरण करतात १ सतत हिताचा विचार कोणता आहे, हे जोपर्यंत त्याना समजत नाही, तोपर्यंत ते जन्ममृत्यूच्या दारात सारखे हेलपाटेच खात राहतील. २ जे कुणी दुसऱ्याने वंदिले असेल त्यास वंदन करावे, निंदिले असेल, त्यास निंदावे. दुसरे ज्या वाटेने गेले, त्याच वाटेने जावे हाच त्याचा उद्योग आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, आम्ही कितीही सांगितले तरी कुणी ऐकत नाहीत, तरी ते यमदूतांच्या स्वाधीन होतील. ४

५६३ दीप घेउनियां धुंडिती अंधार । भेटे हा[1] विचार अघटित ॥ १ ॥
विष्णुदास आम्ही न भ्यो कळिकाळा । भुलों मृगजळा न घडे तें ॥ २ ॥
उधळितां माती रविकळा मळे । हें कैसें न कळे भाग्यहीना ॥ ३ ॥
तुका म्हणे तृणें झांके हुताशन । हे तंव वचन वाउगेंचि ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– अघटित–नवलाचे, न भ्यों–भिणार नाही, हुताशन–अग्नी.

अर्थ – हातात दिवा घेऊन अंधार धुंडायला जाणे किती शहाणपणाचे आहे ? तो कधी भेटेल हा अविचारच नव्हे का? नवलाचेच नव्हे काय? १ आम्ही विष्णुदास प्रत्यक्ष काळासही भिणारे नव्हेत. मृगजळाच्या जाळ्यात सापडून फसणारे आम्ही नव्हेत २ मातीची धूळ वर उधळली तर सूर्याचे तेज मलीन होईल कसे? पण हे भाग्यहीन माणसास कसे समजणार ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, गवताने अग्नी झाकला जातो, हे बोलणे वृथाच आहे. नाही काय? ४

५६४ नटनाट्यें अवघें संपादिलें सोंग । भेद दाऊं रंग न पालटे ॥ १ ॥
मांडियेला खेळ कौतुक बहुरूप । आपुलें स्वरूप जाणतसों ॥ २ ॥
स्फटिकाची शिळा उपाधि न मिळे । भाव दावी पिवळे लाल संगें ॥ ३ ॥
तुका म्हणे आम्ही या जनाविरहित । होउनि निश्चित[2] क्रीडा करूं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:– स्फटिक–कांतियुक्त पारदर्शक दगड, उपाधि–अडचण

अर्थ – नाना प्रकारची नृत्ये व नाटके करणाऱ्यांप्रमाणे आम्ही नाना वेष धारण करून विविध सोंगे धारण करू; नाना भेदांचे प्रकार दाखवू; परंतु त्यामुळे आमचा आत्मरूपाचा बोध व त्याचा रंग काही पालटणार नाही. १ बहुरूपाने कौतुकाने नाना प्रकारचे खेळ केले, तरी तो आपले स्वतःचे रूप जाणून असतोच २ स्फटिकाच्या पारदर्शक स्वरूपात पिवळे, लाल असे नाना रंग जरी दिसत असले, तरी त्यांची अडचण स्वतः स्फटिकास काही वाटत

* १ तो, २ निश्चिंत.

नसते. तो स्वत. कोणत्याही एका रंगाचा नसतो. ३ त्याप्रमाणे तुकाराम महाराज म्हणतात, आम्ही या लोकांच्यांत मिसळत असलो तरी, त्यांच्या विरहितच असून शांतपणे आमची क्रीडा भजनसुखाची व ईश्वरचिंतनाची चालू असते.४

५६५ तुजविण वाणीं आणिकांची थोरी । तरी माझी हरी जिव्हा झडो ॥ १ ॥
तुजविण चित्ता आवडे आणीक । तरी हा मस्तक भंगो माझा ॥ २ ॥
नेत्रीं आणिकांसि पाहीन आवडी । जातु तेचि घडी चांडाळ हे ॥ ३ ॥
कथामृतपान न करिती श्रवण । काय प्रयोजन मग यांचें ॥ ४॥
तुका म्हणे काय वांचून कारण । तुज एक क्षण विसंबतां ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपाः– आणीक–दुसरे, घडी–वेळेस, श्रवण–कान, विसंबता–विसरून.

अर्थ '–देवा, तुझ्याशिवाय इतर कुणाची थोरवी माझी वाणी करील तर मग माझी ही जीभ झडून जावो १ तुझ्यावाचून इतर काही माझ्या चित्तास आवडेल तर, माझे मस्तक फुटून जावो. २ मोठ्या आवडीने मी आपल्या डोळ्यांनी इतरांना पाहीन तर, त्याच वेळी माझे हे चांडाळ डोळे नष्ट होवोत. ३ माझे हे कान जर तुझे कथामृत श्रवण न करतील तर, मग त्यांचा काय उपयोग ? ४ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, एक क्षणभर जरी तुला विसरलो मी, तरी मग माझे हे जगणे निष्कारणच नाही का झाले ? ५

## स्वामींचे स्त्रीनें स्वामींस कठिण उत्तरें केलीं–अभंग ७.

५६६ मजचि भोंवता केला[१] येणें जोग । काय याचा भोग अंतरला ॥ १ ॥
चालोनियां घरा सर्व सुखें येती । माझी तों फजीती चुकेचि ना ॥ २ ॥
कोणाची बाईल होऊनियां वोढूं । संवसारीं काढूं आपदा किती ॥ ३ ॥
काय तरी देऊं तोडितील पोरें । मरतीं तरी बरें होतें आतां ॥ ४ ॥
कांहीं नेदी वांचों धोवियेलें घर । सारवावया ढोर शेण नाहीं ॥ ५ ॥
तुका म्हणे रांड न करितां विचार । वाहुनियां भार कुंभे माथां ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपाः– जोग–त्याग, आपदा–दुःखे, मरटे, ढोर–जनावर.

अर्थ– या माझ्या नवऱ्याचा सर्व त्याग माझ्याभोवती तेवढा झालेला दिसतो. त्याच्या उपभोगात मात्र काही कमी पडले आहे ? १ सर्व सुखोपचार घरात चालून येत आहेत. परंतु माझी फजिती मात्र चुकत नाही २ या संसारात कुणाची बायको म्हणून या सर्व आपत्ती सहन करू ? किती कष्ट सहन करू ? ३ ही पोरे मला खाण्यासाठी तोडत आहेत; त्यांना काय देऊ ? मरतील तर बरे एकदाची. ४ हा माझा पती घरात काही शिल्लकच ठेवीत नाही; सारे घर धुऊन काढले आहे याने. घर सारवायचे म्हटले तर गुरांचे शेणसुद्धा आता घरात उरलेले नाही. ५ तुकाराम महाराज म्हणतात, ही रांड काहीच विचार करीत नाही. या संसाराचा भार स्वत.वर घेऊन उगाचच कुंथत बसते. ६

५६७ काय नेणों होता दावेदार मेला । वैर तो साधिला होउनि गोहो ॥ १ ॥
किती सर्वकाळ सोसावें हें दुःख । किती लोकां मुख वासूं तरी ॥ २ ॥
झवे आपुली आई काय माझें केलें । धड या विठ्ठलें संसाराचें ॥ ३ ॥
तुका म्हणे येती बाईले असडे । फुंदोनिया रडे हांसे कांहीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– गोहो–पती, असडे–द्वंदे

अर्थ :–हा मेला नवरा माझा पूर्वजन्मीचा दावेदार होता की काय कुणास माहीत ? या जन्मी पती होऊन माझे वैर साधतो आहे. १ मी आता सतत असे हे दुःख किती काळ सोसावे ? आणि प्रत्येक वस्तुसाठी किती

१ भोंवतामें जोग.

लोकांपुढे तोंड वेंगाडावे २ या माझ्या संसाराचे या विठ्ठलाने काय बरे म्हणून केले आहे ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशी ही माझी बायको हुंदके देऊन देऊन रडत आहे. रडता रडता हसत आहे. ४

५६८ गोणी आली घरा । दाणे खाऊं नेदी पोरा ॥ १ ॥
भरी लोकांची पांटोरी । मेला चोरटा खाणोरी ॥ २ ॥
खवळली पिसी । हाता झोंबे जैसी लांसी ॥ ३ ॥
तुका म्हणे खोटा । रांडे संचिताचा सांटा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– गोणी–धान्याचे पोते, पांटोरी–पोटे, खाणोरी–खादाड, पिसी–वेडी, लांसी–राक्षसी.

अर्थ :– तुकारामबुवांची बायको म्हणत आहे, घरी धान्याचे पोते आले तर हा नवरा काही नीट मुलाबाळांना खाऊ घालीत नाही. १ लोकांची मात्र पोटे भरीत असतो; असा हा मेला मोठा खादाडही आहे. २ एखाद्या वेड्या स्त्रीप्रमाणे ही खवळून जाते व राक्षसीप्रमाणे ही अंगाला, हातांना झोंबते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, रांडे, तुझ्या संचित कर्माचा भाग नेहमी खोटाच दिसतो. ४

५६९ आतां पोरा काय खासी । गोहो जाला देवलसी ॥ १ ॥
डोचकें तिंबी घातल्या माळा । उदमाचा सांडी चाळा ॥ २ ॥
आपल्या पोटा केली थार । आमचा नाहीं येसपार ॥ ३ ॥
हातीं टाळ तोंड वासी । गाय देउळीं देवापासीं ॥ ४ ॥
आतां आम्ही करूं काय । न बसे घरीं राणा जाय ॥ ५ ॥
तुका म्हणे आतां धीरी । आझुनि नाहीं जालें तरी ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा.– गोहो–पती, देवलसी–देववेडा, तिंबी–भिजवून मऊ करून, उदमाचा–व्यापाराचा, सांडी–सोडी, थार–आधार, येसपार–आठवण, पत्ता, राणा–रानात.

अर्थ :– पोरा, आता खाशील तरी काय ? नवरा देववेडा झाला ना ! १ सदा आंघोळ करून डोके भिजवतो, गळ्यात माळा घालतो. घरच्या व्यापाराचा उद्योग याने सोडून दिला आहे. २ आपल्या पोटाचा आधार मात्र पाहिला आमचा काही ठावठिकाणा त्याला नाही. ३ हातात टाळ घेऊन हा एकसारखा विठोबाच्या नावाने बडबड करीत असतो देवळात जाऊन, देवासमोर बसून सारखा गाणे म्हणत असतो. ४ आता मी करावे तरी काय ? हा कधी घरी बसतच नाही. एकसारखा रानावनात जाऊन बसतो ५ तुकाराम महाराज म्हणतात, तू अजून धीर धर ना. अजून काही सर्वस्व नाहीसे झाले नाही. ६

५७० बरें जालें गेलें । आजी अवघें मिळालें ॥ १ ॥
आतां खाईन पोटभरी । ओल्या कोरड्या भाकरी ॥ २ ॥
किती तरी तोंड । याशीं वाजवूं मी रांड ॥ ३ ॥
तुका वाइले मानवला । चीयू करुनियां बोला ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– चीयू–छीतू, मानवला–सरावला.

अर्थ :– बरे झाले सर्व नाहीसे झाले, त्यातच आज सर्व काही मिळाले. १ आता जवळच्या ओल्याकोरड्या भाकरी पोटभर खाईन. २ मी रांड या नवऱ्याच्या नावाने किती तोंड वाजवू ? किती तक्रार करू ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी बायकोच्या या छीतू करून बोलण्याला सरावलो आहे. ४

५७१ न करवे धंदा । आइता तोंडीं पडे लोंदा ॥ १ ॥
उठितें तें कुटितें टाळ । अवघा मांडिला कोल्हाळ ॥ २ ॥

जिवंतचि मेले । लाजा वाटुनियां प्याले ।। ३ ।।
संसाराकडे । न पाहाती ओस पडे ।। ४ ।।
तळमळती यांच्या रांडा । घालिती जोवा नांवें धोंडा ।। ५ ।।
तुका म्हणे बरें जालें । घे गे वाइलें लीहिलें ।। ६ ।।

शब्दार्थ व टीपा :- लोंदा–गोळा, घास

अर्थ :- काही धंदा न करिता आयता घास तोंडात पडेल तर बरे, असा विचार करणारा हा नवरा मला भेटला आहे १ उठल्या सुटल्या टाळ कुटीतच हा बसतो, याने सर्वत्र एकच गोंगाट करून सोडला आहे. २ हा जिवंत असून मेल्यासारखाच वाटतो सारी लाज याने कोळून प्यालेली दिसते ३ हा संसाराकडे चुकूनही लक्ष देत नाही त्यामुळे सारा संसार ओस पडला आहे ४ याच्या बायका घरी तळमळून रडतात व जीव धोंड्याप्रमाणे घट्ट करून दिवस काढीत आहेत ५ तुकाराम महाराज म्हणतात, हे झाले ते बरे झाले. बाई, तुझ्या कपाळी होते तेच लिहिले असून त्याप्रमाणे घडते आहे. ६

५७२ कोण घरा येतें आमुच्या काशाला । काय ज्याचा त्याला नाहीं धंदा ।। १ ।।
देवासाटीं जाले ब्रह्मांड सोइरे । कोमळचा उत्तरें काय वेचे ।। २ ।।
माने पाचारितां नव्हे आराणुक । ऐसे येती लोक प्रीतीसाटीं ।। ३ ।।
तुका म्हणे रांडे नावडे भूपण । कातेलेसे श्वान लागे पाठीं ।। ४ ।।

शब्दार्थ व टीपा :-सोइरें–नातेवाईक, पाचारिता–बोलाविल्यावर, आराणुक–समाधान, सुख, कातेलेसे–सतापलेल्या

अर्थ :- आपल्या पत्नीस उद्देशून बुवा म्हणतात, 'बाई, उगाच कोण आपल्या घरी येतील बरे? काय ज्याचा त्याला धंदा घरचा नाही की काय? १ या देवासाठी हे सारे जगातील लोक आपले नातेवाईकच बनले आहेत त्यांना कोमल शब्दात उत्तर दिलेस तर तुझे काय खर्च होईल? २ मोठ्या सन्मानाने बोलाविले, तरी त्यात सुखसमाधान नसते; असे असूनही लोक मोठ्या प्रीतीने ईश्वरासाठी आपल्याकडे येतात. ३ तुकाराम महाराज म्हणतात, पण या रांडेला यात काही भूषण वाटत नाही, ज्याच्या त्याच्या अंगावर सतापलेल्या कुत्र्यासारखी धावून जाते ४

विवरण – तुकारामबुवाच्या संसारासंबंधी, पत्नीसंबंधी, निरनिराळी मते प्रचलित आहेत वर जे सात अभंग आहेत, ते मुद्दा तुकोबाचे नसावेत असाही काही अभ्यासकांचा कयास आहे तुकोबाची पत्नी जिजाबाई ही मोठी फटकळ, बालमाड व तुकोबांना सदादित त्रास देणारी अशीही तिची रेखा कुणीकुणी रंगविली आहे ही जिजाबाई तुकोबाची दुसरी बायको हिचे माहेरचे नाव आवली किंवा जिजाई असून ती पुण्याच्या किंवा लोहगावच्या गुळवे घराण्यातील होती दोनही घराणी चांगली श्रीमंत व सावकाराची होती सर्व काही ठीक होते, तोपर्यंत प्रपंचही तुकारामबुवाचा बरोबर चालला असावा पण पुढे एकामागून एक अशी संकटपरंपरा बुवांच्यावर कोसळली आईबाप गेले, पहिली बायको मेली, पोरगे मेले, दावणीची गुरे मेली, द्रव्य गेले, दुष्काळ पडला, व्यापार संपून गावातील पत गेली दुकानाचे दिवाळे निघाले तुकारामबुवाची मनस्विनी उन्मळून गेली घरी शांत वृत्तीने बुवाची पत्नी त्यांना सांभाळणारी, त्यांचे मन समजावून घेणारी असती तर, निदान वैताग कमी दिसला असता. पण ती कडक स्वभावाची होती श्रीमंतीत वाढलेली ही स्त्री बुवाचे मन किनपत समजू शकत होती याबद्दल कित्येकांच्या मनात शंका आहे

तुकोबाचे लक्ष प्रपंचातून निघाले त्यांना साधा व्यवहारही उरला नाही घर सोडून भामनाथाच्या डोंगरावर जावे व विठ्ठलभजनात काळ कंठावा, नामस्मरण करावे, ज्ञानेश्वरीभागवताची पारायणे करावीत, यांत त्यांचे चित्त रमून गेले घरी पोरांचे काय होते, संसाराचे काय होते, घरी धनधान्याची गरज असते ना? यासारख्या प्रश्नांची

चिना बुवाना नव्हती बुवा घरी आले तरी त्यांच्याबरोबर माणसे असत त्यांची भगवद्भक्तीची चर्चा चाले, अभंग-निरुपण चाले, नामस्मरण, भजन चाले या वृत्तीने संसार कसा होणार ? नवऱ्याचे काही लक्ष संसारावर नाही, असे पाहून मग ही जिजाई संतापत असे, रागवत असे बुवा प्रसंगी कडक भाषा किती वापरतात, हे आपल्याला इतर संदर्भात माहीत आहे मग ही बोलून चालून शिक्षणाचा संस्कार नसलेली एक सामान्य अशी स्त्री ती तुकोबावर कडक शब्दाचा वर्षाव करी भारी रागवत असे तिने एकटीने हा प्रपंचाचा गाडा ओढावा तरी कसा ? प्रपंचात काय लागत नाही ? मुलाबाळाना नीटपणे वाढविण्याची सर्व जबाबदारी निमुटपणे तिने पत्करावयास हवी होती पण तेवढी समजूत तिला नव्हती असे दिसते वरील अभंगात वर्णन केलेली परिस्थिती वस्तुस्थितीस धरून असेल तर, जिजाबाई तुकोबाना फारच कठोर उत्तरे देत होती असे दिसते **'कोणाची वाईल होऊनिया ओढू । सवसारीं काढू आपदा किती ?', 'पोरें मरतीं तरी बरें होतें आता'** अशा शब्दात ती आपल्या मनातील संताप व्यक्त करीत आहे **'बरें झालें देवा, बाईल कर्कशा'** म्हणून तुकोबानीही उल्लेख केला आहे

तुकोबा व जिजाबाई यांच्या ताडी वरवर दिसणाऱ्या या अपशब्दातून दोघांच्या मनस्थितीचे व संबंधाचे विशेष निवडून काढणे कठिण काम आहे सर्व लौकिक संसाराकडे तुकोबानी पाठ फिरविली व ते एका विठ्ठलाच्या प्रेमात सापडले मग या प्रारंभीच्या आयुष्यात सुखावलेल्या स्त्रीने कुणाच्या आधारावर प्रपंच ओढायचा ? तिचा तोल सुटला असला, तरी तिचीही बाजू समजावून घेण्यासारखी आहे

बुवा एवढे परमार्थी, भक्तीच्या मार्गाने प्रवास करीत निघालेले, पण त्यांच्याही मुखातून स्वत च्या पत्नी-विषयी अपशब्द निघत असत मग जिजाबाई तर बोलून चालून स्त्री श्रीमंतीत वाढलेली, तीही प्रसंगी त्रास असह्य झाल्यावर संतापून बोलत असे पण दुपारच्या जेवणाची वेळ झाली की, भर उन्हात, डोक्यावर भाकरी घेऊन काट्या-कुट्याच्या मार्गाने, पोराच्या नासान, सुमाराच्या फटफजितीने भारावलेली, गागरलेली, कष्टी झालेली जिजाबाई आपल्या देवपिसे जडलेल्या नवऱ्यासाठी निघालेली दिसत यावेळी तिच्या डोक्यावर भाकरी व मनात या देवभोळ्या 'ध्याना' बद्दल अपार प्रेमच असावे जिजाबाई साध्वी होती, पतिपरायण होती, देवादिकाना मानणारी होती, पण स्वभावाने भारी तापट असावी या स्त्रीच्या मनाचे रहस्य तुकोबाही जाणून होते पायात काटा रुतल्यामुळे लंगडत लंगडत येणाऱ्या स्वस्त्रीची दैना पाहून तेही कळवळले त्यानी जेवणवेळेस घरी येण्याचे कबूल केले तिला वारवार उपदेश करून तिचे मन शात करण्याचा त्यानी प्रयत्न केला **'देवासाठीं जाले ब्रह्मांड सोइरें'** असा बहुमोलाचा उपदेश तेही तिला करण्याचा प्रयत्न करीत असताना दिनतान तिला केलेल्या पूर्णबोधाचा विचार पुढे आपण करणार आहोतच पण अभंग क्र १९८१ ते १९९१ पर्यंत तुकोबानी ज्या श्रेष्ठ भूमिकेवर हा उपदेश केला आहे, त्याच्या चिंतनाने बुवाच्या व जिजाईच्या मनात आलेल्या क्षणिक यावटळी निघून जाव्यात **'भले लोक तुज बहु मानवती। वाढेल या कीर्ती जगामाजी। किंचित हें सुख टाकोनि थुंकोनि। पावसील धनी परमानंद।'** या सारख्या किंवा **'नको चिंता करू वस्त्रा या पोटाची। माऊली आमुची पांडुरंग', 'वैष्णवाची दासी होई सर्वभावें। मुखीं नाम घ्यावें विठोबाचें'** यासारख्या शब्दांच्या वर्षावाने जिजाबाईचे अंत करण पुढे पुढे शीतल झाले असावे व बुवाचा क्षणिक रागही नाहीसा झाला असावा मुलाबाळाचे व भाउबंदकीचे सुख तिने भुजून टाकावे, अशी अपेक्षा तुकोबाची होती

'तू माझ्या विचाराना येऊन मिळशील तर आपल्या मधील विरोध संपेल व देवावाचून तुला व मला दुसरे कुणीच नाही मी त्याचीच कुळवाडी केली आहे तू मला त्यात साह्य करावेस' अशी महाराजांची विनंती प्रेमाच्या पोटी बुवानी जिजाबाईस केली आहे यात सर्व काही आले

**५७३** भाव धरी तया तारील पाषाण । दुर्जना सज्जन काय करी ॥ १ ॥
फरिता नव्हे नीट श्वानाचें हें पुच्छ । खापरा परीस काय करी ॥ २ ॥
काय करिल तया साकरेचें आळें । बीज तैसीं फळें येतीं तया ॥ ३ ॥
तुका म्हणे वज्र भंगे एक वेळ । कठीण हा खळ तयाहूनी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– पाषाण–दगड, श्वानाचें–कुत्र्याचे, खळ–दुष्ट.

अर्थ– जो मनात भाव धरून वागेल त्याच्या सामर्थ्याने दगडाचा देवही त्याला तारील. पण मूळातच जो दुर्जन किंवा दुष्ट वृत्तीचा आहे, त्याला सज्जन तरी काय करणार ? १ कुत्र्याचे वाकडे शेपूट कधी तरी सरळ करता येईल काय ? खापराच्या तुकड्यास परीस काय करणार ? त्याला लोखंडच हवे. २ कडू लिंबाच्या झाडास साखरेचे आळे करून काय उपयोग ? जसे बीज असणार, तशी फळे त्याला येणार हे स्पष्ट आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, एखाद्या वेळेस वज्रासारख्या कठिण शस्त्राचा भंग होईल; पण या दुष्ट माणसाच्या स्वभावात बदल घडून येणार नाही. ४

५७४ इच्छावें तें जवळी आलें । काय बोलें कारण ॥ १ ॥
नामरूपीं पडिली गांठी । अवघ्या गोष्टी सरल्या ॥ २ ॥
मुकियाचे परी जीवीं । साकर जेवीं खादली ॥ ३ ॥
तुका म्हणे काय बोलें । आतां भलें मौन्यची ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – खादली–खाल्ली, मौन्यचि–न बोलणे.

अर्थ :– ज्याची इच्छा करावी ते सर्व प्राप्त झाले आहे. आता बोलायचे काही कारण राहिले नाही. १ हरीच्या नामरूपाची गाठ पडल्यामुळे आता सर्व गोष्टी अथवा विवंचना संपल्याच ना. २ मुक्याने साखर खाल्ली तरी, त्याला जशी तिची गोडी सागता येत नाही तसे माझे झाले आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, आणखी आता काय बोलावे; आता मौन धरावे, काहीच बोलू नये हे चांगले ४

५७५ साधनें तरी हींच दोन्ही । जरी कोणी साधील ॥ १ ॥
परद्रव्य परनारी । याचा धरीं विटाळ ॥ २ ॥
देवभाग्यें घरा येती । संपत्ती त्या सकळा ॥ ३ ॥
तुका म्हणे तें शरीर । गृह भांडार देवाचें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– परद्रव्य–दुसऱ्याची संपत्ती, परनारी–दुसऱ्याची स्त्री.

अर्थ – साधकाने साधने करायची असली तरी हीच दोन करावीत. १ एक परद्रव्याचा विटाळ मानावा व दुसरे म्हणजे परस्त्री मातेप्रमाणे मानावी. २ मग मोठ्या भाग्याने देव त्याच्या घरी येतील. सर्व संपत्तीची अनुकूलता त्यास लाभेल. ३ तुकाराम महाराज म्हणतात, इतकेच नव्हे तर, अशा पुरुषाचे शरीर म्हणजे देवाच्या घरचे भांडारच होय. ४

५७६ आम्हासाठीं अवतार । मत्स्यकूर्मादि सूकर ॥ १ ॥
मोहे धांवे घाली पान्हा । नांव घेतां पंढरीराणा ॥ २ ॥
कोठें न दिसे पाहतां । उडी घाली अवचिता ॥ ३ ॥
सुख ठेवी आम्हासाठीं । दुःख आपणची घोंटी ॥ ४ ॥
आम्हां घाली पाठीकडे । पुढें[१] कळिकाळाशीं भिडे ॥ ५ ॥
तुका म्हणे कृपानीधी । आम्हां उतरीं नांवेमधीं ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा :– सूकर–वराह, कृपानिधी–कृपेचा सागर.

अर्थ :– या देवाने आमच्यासाठी मत्स्य, कूर्म, वराह यांच्या रूपांनी अवतार घेतले आहेत. १ या देवाचे पंढरीनाथा, असे नाव घेताच हा देव आपल्या कृपेचा पान्हा देण्यासाठी मोठ्या प्रेमाने धाऊन येतो. २ तसे पाहिले तर कुठे तो दिसत नसला तरी अवचितपणे येऊन आमचे संरक्षण करीत असतो. ३ हा देव एवढा दयाळू आहे की,

१ आपण.

तो सुखाचा वाटा आम्हास देतो आणि दु:ख स्वत साठी ठेवितो दु:खाचा घोट स्वत च तो गिळीत असतो ४ आमचे सरक्षण करण्यासाठी हा आम्हास पाठीशी घालतो व स्वत प्रत्यक्ष काळाशी झगडण्यासाठी पुढे होतो ५ तुकाराम महाराज म्हणतात, हा कृपेचा सागर आमच्या रक्षणासाठी भवसागरातील नावेत उतरलेला असतो ६

५७७ रवि रश्मिकळा । नये काढिता निराळा ॥ १ ॥
तैसा आम्हा जाला भाव । अगीं जडोनि ठेला देव ॥ २ ॥
गोडी साकरेपासुनी । कैसी निवडती दोन्ही ॥ ३ ॥
तुका म्हणे नाद उठी । विरोनि जाय नभा पोटीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – रश्मिकळा–किरणाचे तेज, ठेला–स्थिर झाला

अर्थ – सूर्याची किरणे व त्याचे तेज याना सूर्यापासून वेगळे काढता येत नाही १ त्याप्रमाणेच देवाचे व आमचे नाते असून तो आमच्या सर्वांगातच स्थिर झालेला आहे २ साखरेपासून तिची गोडी निराळी काढता येईल काय ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, जो जो शब्द उमटेल, तो आकाशाच्या पोटातच विरून जाणार जो जो भाव उमटेल, तो तो ईश्वराच्या रूपातच सामावलेला असणार ४

५७८ थोडें परी निरें । अविट तें घ्यावे खरे ॥ १ ॥
घ्यावें जेणे नये तुटी । बीज वाढे बीजा पोटीं ॥ २ ॥
चित्त ठेवी ग्वाही । आणिकाशीं चाड नाहीं ॥ ३ ॥
आपले तें हित फार । तुका म्हणे खरें सार ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – निरें–स्वच्छ

अर्थ – अगदी थोडे, पण स्वच्छ असलेले व वीट न येणारे, यथार्थ असेल तेच घ्यावे १ असे घ्यावे की, ज्याची वस्तरता कधी पडूच नये एका बीजातून अनेक नवी बीजे तयार होतात तसे व्हावे २ आपले चित्त आपणास साक्षी ठेवावे, इतराच्या उपचाराची पर्वा ठेवू नये ३ आपले हित नेमके कशात आहे ते पाहावे यातच सव सार आहे ४

५७९ अवघे देव साध । परी या अवगुणाचा बाध ॥ १ ॥
म्हणउनी नव्हे सरी । राहे एका एक दुरी ॥ २ ॥
ऊस कादा एक आळा । स्वाद गोडीचा[1] निराळा ॥ ३ ॥
तुका म्हणे नव्हे सरी । विष अमृताची परी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – साध–साध्य

अर्थ – सर्वत्र व्यापून राहिलेला देव हे एकच असून तो साध्य करून घेणे हे कर्तव्य असले तरी या अवघ्या अवगुणामुळे बाध येऊन तो साधत नाही १ हे तत्त्व एकासारखे दुसरे दिसत असूनही हे त्यासारखे नसते २ ऊस व कादा एकाच आळ्यात लाविले तरी त्याचा स्वाद व त्याची गोडी या गोष्टी वेगळ्याच असतात ३ तुकाराम महाराज म्हणतात विषाची व अमृताची बरोबरी होणार नाहीच ४

५८० शातीपरतें नाहीं सुख । येर अवघेंची दु:ख ॥ १ ॥
म्हणउनी शाति धरा । उतराल पैल तीरा ॥ २ ॥
खवळलिया कामक्रोधीं । अगीं भरती आधिव्याधी ॥ ३ ॥
तुका म्हणे त्रिविध ताप । जाती मग आपेआप ॥ ४ ॥

---

१ पाहता

शब्दार्थ व टीपा:– येर–दुसरे, आधी–मानसिक त्रास, व्याधी–शारीरिक दु:ख, त्रिविधताप–आधिदैविक, आध्यात्मिक व आधिभौतिक ताप.

अर्थ:– या जगात शांतीप्राप्तीसारखे दुसरे कुठलेही सुख नाही. बाकी दुसरे सर्व दु:खच आहे. १ म्हणून सर्वांनी आपल्या चित्तात शांतता धारण करावी; त्यामुळेच तुम्ही या भवसागरातून पैलतीराला जाता. २ जर अंत:करणात कामक्रोधादी विचार सबळून गेले, तर मानसिक व शारीरिक दु:खांनी जीवित भरून जाते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, या शांतीच्या प्राप्तीमुळे त्रिविध ताप आपोआप नाहीसे होतात. ४

५८१ गोडीपणें जैसा गुळ । तैसा देव जाला सकळ ॥ १ ॥
आतां भजों कवणे परी । देव सबाह्य अंतरीं ॥ २ ॥
उदका वेगळा । नव्हे तरंग निराळा ॥ ३ ॥
हेम अळंकारा नामीं । तुका म्हणे तैसे आम्ही ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:– परी–रीतीने, हेम–सोने.

अर्थ :– गूळ हा गोडीनें सर्वत्र एकसारखाच असतो. त्याप्रमाणे हा देवच सर्वत्र भरून राहिलेला आहे. १ आता मी या सर्वज्ञ व सर्वव्यापी देवाचे कोणत्या रीतीने भजन, पूजन करू ? कारण देव सर्वत्र अंतर्बाह्य स्वरूपात भरून राहिला आहे. २ पाण्याहून वेगळा असा त्यावरचा तरंग कधी असतो काय ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, सोन्याच्या अलंकारांची नावे निरनिराळी असली तरी, सुवर्ण एकच असते. तसे देव व आम्ही भक्त एकच आहोत. ४

५८२ परमेष्ठिपदा । तुच्छ करिती सर्वदा ॥ १ ॥
हेंचि ज्यांचें धन । सदा हरीचें स्मरण ॥ २ ॥
इंद्रपदादिक भोग । भोग नव्हे तो भवरोग ॥ ३ ॥
सार्वभौमराज्य । त्यांसि कांहीं नाहीं काज ॥ ४ ॥
पाताळींचें आधिपत्य । ते तों मानिती विपत्य ॥ ५ ॥
योगसिद्धिसार । ज्यासि वाटे तें असार ॥ ६ ॥
मोक्षायेवढें सुख । सुख नव्हेचि तें दुःख ॥ ७ ॥
तुका म्हणे हरीविण । त्यासि अवघा वाटे सिण ॥ ८ ॥

शब्दार्थ व टीपा – परमेष्ठिपदा–ब्रह्मदेवाचे पद, विपत्य–संकट

अर्थ – जे खरे भक्त आहेत ते ब्रह्मदेवाचे पदही नेहमीच तुच्छ मानतात १ नेहमी श्रीहरीचे चिंतन हेच त्यांचे धन असते. २ इंद्रपदादी जे सुखाचे भोग ते त्यांना भवरोगासारखे वाटतात ३ सर्व जगताचे राज्य जरी त्यांना मिळाले, तरी त्याच्याशी त्यांना कर्तव्य नसते ४ पाताळाचे अधिराज्य जरी त्यांना कुणी दिले, तरी ते त्यांना संकटच वाटते. ५ योगसिद्धींच्या पूर्णतेने जे लाभ होतील ते त्यांना दु:खाचेच वाटतात. ६ मोक्षप्राप्तीसारखे मोठे सुख त्यांना दु:खदायकच वाटते. ७ तुकाराम महाराज म्हणतात, एक श्रीहरीशिवाय त्यांना अवघा शीणच वाटतो. ८

५८३ मोहोन्याच्या संगें । सुत नव्हे आगीजोगें ॥ १ ॥
नाहीं तरी त्याचें भक्ष । काय सांगणें ते साक्ष ॥ २ ॥
स्वामीचिया[1] अंगें । रूप नव्हे कोणाजोगें ॥ ३ ॥
तुका म्हणे खोडी । देवमनी न वेती दडी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – मोहोर–एक प्रकारचा दगड, याच्या मण्यांत सूत असले तर ते अग्नीतही जळत नाही. देवमनी–घोड्याच्या गळ्याशी शुभलक्षणदर्शक केसांचा भोवरा असतो त्याच्यामुळे

१ स्वप्नीचिया.

अर्थ – मोहोर जातीच्या दगडाबरोबर सूत असेल तर ते अग्नीत टाकल्यावरही जळून जात नाही १ नाही तर एरवी हे सूत त्या अग्नीचेच भक्ष्य असते, हे काय सांगायला हवे ? २ एकदा स्वामीच्या अंगासारखे, देवाच्या अंगासारखे भक्ताचे रूप झाल्यावर मग ते इतरासारखे राहात नाही त्याला कुणाचेही भय उरत नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, एकदा घोड्याच्या गळ्यास शुभत्वदर्शक अशा चिन्हाचे दर्शन झाले की मग त्याच्या इतर खोडी दृष्टिआडच होतात नाही का ? ४

५८४ मजसवे नको चेष्टा । नव्हे साळी काहीं कोष्टा ॥ १ ॥
वैस साडोनि दिमाख । जाय काळें करीं मुख ॥ २ ॥
येथें न सरे चार । हीण आणीक वेव्हार ॥ ३ ॥
तुका विष्णुदास । रस जाणतो नीरस ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – दिमाख–श्रेष्ठपण, चार–वेडेचार

अर्थ – देवा, माझ्याशी विनाकारण चेष्टामस्करी करू नकोस मी काही साळी, कोष्टी यांच्या सारखा सामान्य नाही १ तू आपला श्रेष्ठपणा सोडून मजकडे ये मजवर कृपा कर आणि हे जर होत नसेल तर तू निघून जा कुठेही तोंड काळे कर २ येथे काही तुझे वेडेचार चालणार नाहीत वेडावाकडा व्यवहारही चालणार नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, आम्ही विष्णुदास सरस काय आहे निरस काय आहे, हे जाणीत असतो ४

५८५ भाव देवाचे उचित । भाव तोचि भगवत ॥ १ ॥
धन्यधन्य शुद्ध जाती । संदेश कंचा तेथें चित्तीं ॥ २ ॥
बहुत वराडी । देवजवळी[1] आवडी ॥ ३ ॥
तुका म्हणे हें रोकडें । लाभ अधिक रिघो खडें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – संदेश–संदेह शंका, वराडी–आशा ठेवून असणे रोकडे–स्पष्ट

अर्थ – भक्तिभावाने देवास शरण जाणे हेच योग्य आहे कारण भक्तिभाव हाच एक देव आहे १ ज्या जाती शुद्ध आहेत त्या धन्य होत कारण त्यांच्या चित्तात संदेह कधीही नसतो २ ते देवाविषयी फारच आशा ठेवून असतात, त्यांची देवावर प्रीतीही मोठीच असते ३ तुकाराम महाराज म्हणतात हे स्पष्ट आहे की, देवाचा लाभ अधिक प्रमाणात करून घेण्यास हेच भक्त समर्थ असतात ४

५८६ गौरव गौरवापुरतें । फळ सत्याचे संकल्प ॥ १ ॥
कठिण योगाहुनि क्षेम । ओकलिया होतो श्रम ॥ २ ॥
पावले मरे सिवेपाशीं । क्लेश उरत ते क्लेशीं ॥ ३ ॥
तुका म्हणे बहु आणी । कठिण निघालिया रणीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – योगाहून–प्राप्तीपेक्षा, क्षेम–सांभाळ, आणी–बोलणे

अर्थ –गौरवाचा प्रसंग हा गौरवापुरता ठीक आहे, पण सत्य संकल्पाचे फळ पांडुरंगाची कृपा हेच आहे १ कोणत्याही गोष्टीच्या प्राप्तीपेक्षा तिचा सांभाळ करणे कठिण काम आहे ती गोष्ट परत करण्याचा प्रसंग येतो तेव्हाही फार श्रम होतात २ घरातील त्रासास कंटाळून एखादा मनुष्य शिवेपाशी जातो व तेथे त्याला मरण येते म्हणजे घर सोडून शिवेपाशी येणे व तेथे मरणे, यातील श्रमच त्याच्या वाट्यास प्रामुख्याने दिसतात ३ तुकाराम महाराज म्हणतात, एखादे बोलणे खूप शूरत्वाचे असले तरी, प्रत्यक्ष रणांगणावर मात्र त्यास फार कठीण वाटते ४

५८७ न सांडी अवगुण । वर्मे मानीतसे सिण ॥ १ ॥
भोग देता करिती काई । फुटता यमदंडे डोई ॥ २ ॥

---

१ देवापरी

पापपुण्यझाडा । देतां तेथें मोटी पीडा ।। ३ ।।
तुका म्हणे बोला । माझ्या सिणती विठ्ठला ।। ४ ।।

शब्दार्थ व टीपाः– संडी–सोडीत, झाडा–हिशेब.

अर्थ :– हा दुष्ट मनुष्य आपल्या अंगचे अवगुण सोडीत नाही. कुणी त्याच्या स्वभावातील व वर्तणुकीतील वर्म काढल्यास यास फार त्रास झाल्यासारखे वाटते. १ पण भोगलेल्या कर्माची फळे पाहण्याचा प्रसंग आल्यावर काय करणार ? यमाच्या दंडाकडून डोके फुटेल, तेव्हा काय होणार ? २ यमासमोर पापपुण्याचा झाडा द्यावा लागेल तेव्हा मात्र मोठेच दु:ख होईल. ३ तुकाराम महाराज म्हणतात, असे मी काही बोललो की, या लोकांना त्याचा त्रास वाटतो ४

५८८ पावे ऐसा नाश । अवघियां दिला त्रास ।। १ ।।
अविटाचा केला संग । सर्व भोगी पांडुरंग ।। २ ।।
आइताच पाक । संयोगाचा सकळिक ।। ३ ।।
तुका म्हणे धणी । सीमा राहिली होउनी ।। ४ ।।

शब्दार्थ व टीपा :– पाक–भोजन, धणी–तृप्ती.

अर्थः– आजवर जो त्रास मी सर्वांना दिला त्याचा आता नाश होईल. १ याचे कारण असे की ज्याचा वीट कधीही येत नाही, अशा पांडुरंगाची संगत मी केली आहे. २ ईश्वर संगतीचे हे आयतेच भोजन मला मिळाले आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, आम्हांला त्याच्यामुळे तृप्तता अमर्याद अशी झाली आहे ४

५८९ दुर्बळ हें अवघें जन । नारायणीं विमुख[1] ।। १ ।।
झाडोनियां हात जाती । पात्र होतीं दंडासी ।। २ ।।
सिदोरी तें पापपुण्य । सर्वेसिण भिकेचा ।। ३ ।।
तुका म्हणे पडिला वाहो । कैसा पाहा हो लटिक्याचा ।। ४ ।।

शब्दार्थ व टीपा :– वाहो–ओघ, प्रवाह, मार्ग.

अर्थः– नारायणास विन्मुख झाल्यामुळे हे सर्व लोक पाहा कसे दुर्बल बनलेले आहेत. १ आपले स्वत:चे हित कशात आहे, हे पाहण्याचे यांनी सोडून दिल्यामुळे हे यमाच्या शिक्षेस मात्र प्राप्त होतात २ बरोबर जशी पाप-पुण्याची शिदोरी असेल, त्याप्रमाणे त्यांना अनेक जन्माचा शीण सोसावा लागेल. ३ तुकाराम महाराज म्हणतात, हे असे असताना खोट्याचाच प्रवाह किंवा मार्ग कसा निर्माण झाला आहे पाहा. ४

५९० वाजतील तुरें । येणें आनंदें गजरें ।। १ ।।
जिंकोनियां अहंकार । पावटणी केलें शिर ।। २ ।।
काळा नाहीं वाव । परा श्रमा कोठें ठाव ।। ३ ।।
तुका म्हणे आतां । सोपें वैकुंठासी जातां ।। ४ ।।

शब्दार्थ व टीपा :– तुरें–डंके, वाद्ये, तुतारी.

अर्थ :– आम्ही देवाच्या भेटीला निघालो, या आनंदाच्या वार्तेने जिकडे तिकडे तुतारी निनादू लागेल. १ आम्ही अहंकार जिंकून शिखर चढून जाण्याची त्याची पायरी केलेली आहे. २ या आमच्या मार्गात आता यमास कसला वावच नाही. आणि दुसऱ्याच्या श्रमालाही येथे अवसर नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, आता वैकुंठाला जाताना त्या श्रीहरीला भेटणे फारच सोपे झाले आहे आम्हांस. ४

१ विन्मुख

५९१ झाड कल्पतरु । न करी याचकीं आव्हेरु ॥ १ ॥
तुम्ही सर्वी सर्वोत्तम । ऐसे विसरता धर्म[1] ॥ २ ॥
परिसा तुमचे देणे । तो त्या जागे अभिमानें ॥ ३ ॥
गा हाण्याने तुका । गर्जे मारूनिया हाका ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – आव्हेरु–तिरस्कार

अर्थ – कल्पतरू तर बोलून चालून झाडच आहे पण तो आलेल्या याचकाचा तिरस्कार न करिता, त्यास आश्रयच देतो १ आणि देवा, तुम्ही तर सर्वांविषयी सर्वोत्तम असे प्रभू असताना जवळ करण्याचा धर्म कसे विसरून जाता ? २ लोखडाला स्पर्श केल्याबरोबर त्याचे सुवर्ण बनविणे, हा धर्म त्या परिसाच्या अगी तुम्हीच दिला असून, तो आपल्या कर्तव्याविषयी अभिमानाने जागृत आहे ३ तुकाराम महाराज गर्जना करून अशी गाऱ्हाणी मोठ्याने लोकाना सागत आहेत ४

५९२ वसवावे घर । देवे वरें निरतर ॥ १ ॥
सग आसनीं शयनीं । घडे भोजनीं गमनी ॥ २ ॥
सकल्प विकल्प । मावळोनि पुण्यपाप ॥ ३ ॥
तुका म्हणे काळ । अवघा गोविंदें सुकाळ ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – वसवावें–निर्माण कराव

अर्थ – या देहात देवाने आपले घर निर्माण करून त्यात निरतर वसती करावी हे उत्तम १ या देवाचीच सगत आसनावर, शयनावर, भोजनप्रसगी घडावी हे चागले २ याच्या सहवासाने मन, अत करणातील सकल्प व विकल्प, पापपुण्य याच्या भावनाच नष्ट होतील ३ तुकाराम महाराज म्हणतात मग सर्व काळ त्या गोविंदाच्याच नामाचा सुकाळ करता येईल ४

५९३ येथील हा ठसा । गेला पडोनिया ऐसा ॥ १ ॥
धरीं देवाचे अबोला । त्यासि तेचि सवे त्याला ॥ २ ॥
नाहीं पाहावे लागत । एकाएकींच ते रितें ॥ ३ ॥
तुका म्हणे जन । तयामध्यें येवढें भिन्न ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – ठसा–रीत सवे–सवय रितें–कमी

अर्थ – देव आणि जन याच्यातील सबधाची अशी ही रीतच पडून गेली आहे १ लोक या देवाशी अबोला धरतात व तसाच अबोला धरण्याची सवय त्या देवालाही आहेच २ एकमेकाचे काही कमी पडते आहे, हे मुळी कुणाला पाहावेच लागत नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, लोक व देव याच्यात एवढी भिन्नता आहे ४

५९४ करिता देवार्चन । घरा आले सतजन ॥ १ ॥
देव[2] सारावे परते । सत पूजावे आरते ॥ २ ॥
शाळिग्राम विष्णुमूर्ती । सत हो का भलते याती ॥ ३ ॥
तुका म्हणे सधी । अधिक वैष्णवाची मादी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – देवार्चन–देवाची पूजा, परते–बाजूला, आरते–प्रीतीने, शाळिग्राम–गडकी नदातील काळा देवरूप दगड मादी–समुदाय, सधी–अशा समयास

---

१ नाम, २ तरी ते

अर्थ – देवाची पूजा करीत असताना जर संत लोक घरी आले तर काय करावे ? १ त्यावेळी देव थोडा वेळ बाजूस सारून संतांचीच पूजा मोठ्या प्रेमाने करावी २ शाळिग्राम ही तेवढी विष्णूची मूर्ती, व दाराशी आलेल्या संतांचीच जात का त्याच्याहून वेगळी मानावी ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा समयास वैष्णवाच्या समुदायाचे पूजा करणे हे अधिक महत्त्वाचे आहे ४

५९५ ज्याची खरी सेवा । त्याच्या भय काय जीवा ॥ १ ॥
करिता स्वामीसवे वाद[1] । अधिक अधिक आनंद ॥ २ ॥
असावा तो धर्म । मग साहो जातें वर्म ॥ ३ ॥
वदे वाग्देवी । तुका विठ्ठलीं गौरवी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – वाद–मुखसंवाद, वाग्देवी–वाणीरूप देवी

अर्थ – जो ईश्वराची खरी सेवा अंतःकरणपूर्वक करितो त्याच्या जीवास कसले भय आहे ? १ ईश्वराशी सुखसंवाद करता करताच त्याच्या मनास पराकोटीचा आनंद होतो २ हाच एकनिष्ठेचा धर्म असल्यास मग त्या स्वामीचे रहस्य समजले जाते ३ तुकाराम महाराज म्हणतात, माझ्या वाणीरूपी देवीचा गौरव प्रत्यक्ष विठ्ठलाकडून केला जातो ४

५९६ देवे जीव धाला । संसार तो कडू झाला ॥ १ ॥
तेचि येतील ढेंकर । आनंदाचे हरिहर ॥ २ ॥
वेधी आणिकास । ऐसा जया अंगीं कस ॥ ३ ॥
तुका म्हणे भुक । येणे न लगे आणीक ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – धाला–संतुष्ट झाला कस–सामर्थ्य

अर्थ – या देवाच्या प्राप्तीने माझा जीव संतुष्ट झाला आहे आणि मला हा लौकिक संसार कडू वाटू लागला आहे १ आता मला हरिहराच्या चिंतनाचे व भक्तीच्या तृप्तीचे ढेकर येतील २ आणखी दुसऱ्या वेळी अंतःकरण वेधून घेण्याचे सामर्थ्य याच्या अंगी आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, याच्या संगतीच्या तृप्तीने आणखी भूक मला लागणार नाही ४

५९७ नाम साराचे हीं सार । शरणागत यमकिंकर ॥ १ ॥
उत्तमाउत्तम[2] । वाचे बोला पुरुषोत्तम ॥ २ ॥
नाम जपता चंद्रमौळी । नामें तरला वाल्हाकोळी ॥ ३ ॥
तुका म्हणे वर्णूं काय । तारक विठोबाचे पाय ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – यमकिंकर–यमाचे दास, तारक–तारणारे, चंद्रमौळी–शिव

अर्थ – या विठ्ठलाचे नाम हे सर्व साराचे सार होय म्हणून यमाचे सेवकही शरण आलेले असतात १ उत्तमात उत्तम असलेल्या या पुरुषोत्तमाचे नाम तुम्ही वाणीने वारंवार उच्चारावे २ याच्याच नामाच्या जपाने शिवशंकर तरून गेले व वाल्या कोळ्याचा उद्धार झाला ३ तुकाराम महाराज म्हणतात, आणखी काय वर्णन करू ? या विठोबाचे पायच फक्त तारणारे आहेत ४

५९८ गातो भाव नाहीं अंगीं । भूषण करावया जगीं ॥ १ ॥
परि तू पतितपावन । करीं साच हें वचन ॥ २ ॥
मुखें म्हणवितो दास । चित्तीं माया लोभ आस ॥ ३ ॥
तुका म्हणे दावीं वेश । तैसा अंतरीं नाहीं लेश ॥ ४ ॥

१ पाद, २ नाम उत्तम उत्तम

शब्दार्थ व टीपा :– भूषण–लौकिक, समाधान, साच–खरोखर, आस–इच्छा

अर्थ :– देवा, तुझें नाम गातो, पण माझ्या अंगात म्हणावासा भक्तिभाव नाही. केवळ समाधानाचा लौकिक जगात वाढावा म्हणून मी हे सारे करतो १ पण देवा, तू पतितपावन आहेस ना ? तुझे हे नाव व वचन तू खरे करून दाखीव ना. २ मी तोंडाने तुझा दास, तुझा दास असे म्हणतो; पण मनात मात्र माझ्या माया, लोभ, इच्छा या असतात. ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी हा वरवरचा साधुत्वाचा वेष दाखविला तरी, अंतरंगात मात्र तसा भाव नाही. ४

५९९ द्रव्य असतां धर्म न करी । नागविला राजद्वारीं ॥ १ ॥
माय त्यासि व्याली जेव्हां । रांड[1] सटवी नव्हती तेव्हां ॥ २ ॥
कथाकाळीं निद्रा लागे । कामीं श्वानापरी जागे ॥ ३ ॥
भोग स्त्रियेसि देतां लाजे । वस्त्र दासीचें घेउनि निजे ॥ ४ ॥
तुका म्हणे जाण । नर गाढवाहुनी हीन ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– नागवला–लुटला गेला

अर्थ :– या माणसाजवळ भरपूर द्रव्य असून हा दानधर्म करीत नाही पण तो राजदरबारातील कटकटी-मुळे मात्र सतत लुटला जातो. १ याच्या आईने जेव्हा यास जन्म दिला, तेव्हा ती सटवी रांड जागी नव्हती असे वाटते; म्हणूनच हा दुष्ट जगून राहिला. २ देवाची कथा सुरू झाली की, यास झोप येऊ लागते; पण धन्याच्या सेवेत मात्र कुत्र्याप्रमाणे सावध राहून जागत असतो. ३ स्वतःच्या स्त्रीस भोग देताना हा अधम मनुष्य संकोच करतो; पण दासीचे लाड एवढे करितो की, तिचे वस्त्रही उशाला घेऊन निजतो हा. ४ तुकाराम महाराज म्हणतात, हा मनुष्य गाढवापेक्षाही हीन अवस्थेला गेलेला असतो. ५

६०० मुखें बोले ब्रह्मज्ञान । मनीं धनअभिमान ॥ १ ॥
ऐशियाची करी सेवा । काय सुख होय जीवा ॥ २ ॥
पोटासाठीं संत । झाले कलींत बहुत ॥ ३ ॥
विरळा ऐसा कोणी । तुका त्यासि लोटांगणी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– विरळा–क्वचित

अर्थ –मुखाने मोठ्या ऐटीत ब्रह्मज्ञान बोलतो हा; पण याच्या मनात मात्र धन व मान यांची इच्छा आहे. १ अशा माणसाची सेवा करिताना जीवाला काय कधी सुख होईल का ? २ या कलियुगात पोट भरण्यासाठी पुष्कळ संत झालेले दिसतात ३ पण खरा संत जर एखादा क्वचित कुठे असेल तर मला दाखवा, मी तुकाराम त्याला साष्टांग लोटांगण घालून त्याचा आदरसत्कार करीन. ४

६०१ एक वेळ प्रायश्चित्त । केलें चित्त मुंडण ॥ १ ॥
अहंकारा नांवें दोष । त्याचें ओस पाडिलें ॥ २ ॥
अनुतापें स्नानविधि । यज्ञसिद्धि देहहोम ॥ ३ ॥
जीवशिवा होतां चुका । तेथें तुका विनटला ॥ ४ ॥

देवाचा होम वगैरे करून शुद्ध झालो. ३ जीव व शिव यांची अज्ञानामुळे ताटातूट झाली होती. पण त्यांचे ऐक्य जाणून हा तुकाराम एकरूप झाला. ४

६०२ त्रैलोक्य पाळितां उबगला नाहीं । आमचें त्या काई असे ओझें ॥ १ ॥
पाषाणाचे पोटीं बैसला दर्दुर । तया मुखीं चार कोण घाली ॥ २ ॥
पक्षी अजगर न करी संचित । तयासि अनंत प्रतिपाळी ॥ ३ ॥
तुका म्हणे तया भार घातलिया । उपेक्षीना दयासिंधु माझा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- उबगला–त्रासला, दर्दुर–बेडूक, संचित–संचय, साठा.

अर्थ – हा माझा देव त्रैलोक्याचा सांभाळ करतो; तरी तो कधी त्रासला नाही. त्याला आमच्या सारख्याचे ओझे असे मोठेसे काय आहे ? १ पाषाणाच्या पोटात बेडुक वस्ती करून असतो. त्याच्या मुखात अन्न नेऊन या नारायणाशिवाय कोण घालतो ? २ पक्षी किंवा आळशी असणारे अजगर यांनी कशाचा साठा केलेला असतो ? तरी तो प्रभू त्याचा सामाळ करतोच ना ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, त्या ईश्वरावर भार घालावा सर्व. मग तो दयेचा सिंधू कधी आपल्या भक्ताची उपेक्षा करणार नाही. ४

६०३ बोली मैंदाची बरवी असे । वाटे अंतरीं घालावे फांसे ॥ १ ॥
कैसा वरिवरि दिसताहे चांग । नव्हे भाविक केवळ मांग ॥ २ ॥
टिळा टोपी माळा कंठीं । अंधारीं नेउनि चेंपी घांटी ॥ ३ ॥
तुका म्हणे तो केवळ पुंड । त्यावरि वाजती यमदंड ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- मैंद–कपटी, ढोंगी, घाटी–गळा

अर्थ – ढोंगी किंवा कपटी माणसाचे बोलणे वरवर मोठे गोड वाटते. पण फासे टाकून पकडण्याचेच साधन त्याने मनात धरले असावे असे वाटते. १ वरवर तो कसा चांगला दिसतो; पण तो त्यामुळे काही भाविक नसतो, केवळ मांगाचेच गुण त्याच्यात असतात. २ कपाळावर गंधाचा टिळा, डोक्यावर टोपी, गळ्यात माळा, असा वरवरचा वेष असला तरी, मनातून अंधारात नेऊन एखाद्याचा गळा दाबावा अशी त्याची वासना असते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, असा मनुष्य केवळ पुंडाई करणारा गुंडच समजावा. त्याच्यावर यमाचा दंड सारखा फिरत असतो. ४

६०४ दोष पळती कीर्तनें । तुझ्या नामसंकीर्तनें ॥ १ ॥
हें कां करूं आदरिलें । खोटें वचन आपुलें ॥ २ ॥
तुम्ही पापा भीतां । आम्हां उपजावया चिंता ॥ ३ ॥
तुका म्हणे सेवा । कळिकाळा जिंकी देवा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- उपजावयाची–जन्म घेण्याची

अर्थ – देवा, तुमच्या नामसंकीर्तनामुळे सर्व दोष नाहीसे होतात. १ अशा अर्थाचे आपलेच वचन पुराणातून आहे. तरी देवा, तुम्ही आपल्याच वचनाला खोटें का ठरविता ? २ आमच्या पापाला देवा, तुम्ही भिता की काय ? आम्हाला पुनः पुनः जन्म घेण्याची भीती असते ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तुमची सेवा प्रत्यक्ष यमासही जिंकणारी आहे. ४

६०५ करा नारायणा । माझ्या दुःखाची खंडणा ॥ १ ॥
वृत्ति राखा पायांपाशीं । वस्ती धरूनी मानसीं ॥ २ ॥
पाळोनियां लळा । आतां पाववावें फळा ॥ ३ ॥
तुका म्हणे दीनें । त्यांचा हरतिया सीण ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा– खंडणा–नाश, मानसीं–मनात.

अर्थ – देवा नारायणा, माझ्या सर्व दु खाचा नाश करा ना. १ माझ्या मनात तुम्ही वसती करुन माझी वृत्ती आपल्या पायाशी स्थिर राहील असे करा ना २ देवा, माझे सर्व हट्ट पूर्ण करावेत व हे फळ मला तुम्ही द्यावेच. ३ तुकाराम महाराज म्हणतात, जे परमेश्वराच्या चरणाशी दीन होतात, त्याचा ईश्वर सर्व शीण दूर करीत असतो. ४

६०६ मी तो दीनाहूनि दीन । माझा तुज अभिमान ॥ १ ॥
मी तो आलो शरणागत । माझें करावे स्वहित ॥ २ ॥
दिनानाथा कृपाळुवा । सांभाळावें आपुल्या नांवा ॥ ३ ॥
तुका म्हणे आतां । भले नव्हे मोकलितां ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – मोकलिता–टाकून दिल्यास

अर्थ – देवा, मी तर आता दीनाहून दीन झालो आहे तुझ्या पायाशी तू आता मजविषयी अभिमान धरावास १ मी तर देवा, तुला आता शरण आलो आहे. माझें सर्व प्रकारचे हित तुम्ही करुन दाखवा. २ दीनानाथा, कृपाळू स्वामी, आपले नाव व कीर्ती याचा आपण नीट सांभाळ करावा ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, आता मला तुम्ही टाकून दिल्यास ते बरे दिसणार नाही ४

६०७ सुख वाटे तुझे वर्णितां पवाडे । प्रेम मिठी पडे वदनासी ॥ १ ॥
व्याले दोन्ही पक्षी एका वृक्षावरी । आला दुराचारी पारधी तो ॥ २ ॥
वृक्षाचिया माथा सोडिला ससाना[1] । धनुष्यासि बाणा लावियेले ॥ ३ ॥
तये काळीं तुज पक्षी आठविती । धावें गा श्रीपती मायबापा ॥ ४ ॥
उडोनियां जातां ससाना मारील । बैसता विंधील पारधी तो ॥ ५ ॥
एकोनियां धांवा तया पक्षियाचा । धरिला सर्पाचा वेश वेगीं ॥ ६ ॥
डंखोनि पारधी भुमीसि पाडिला । बाण तो[2] लागला ससान्यासी ॥ ७ ॥
ऐसा तूं कृपाळु आपुलिया दासा । होसील कोंवसा संकटींचा ॥ ८ ॥
तुका म्हणे तुझी कीर्ति त्रिभुवना । वेदाचिये वाणी वर्णवेना ॥ ९ ॥

शब्दार्थ व टीपा – ससाना–बहिरी ससाणा, शिकारी पक्षी, विंधील–ठार करील, कोवसा–आश्रय, आधार.

अर्थ – देवा, तू किती दयाळू आहेस ? तुझे पवाडे गाताना मोठे सुख वाटते. मोठ्या प्रेमाने तुझे वर्णन करताना त्या गोष्टीची मिठीच तोंडास बसते १ एका वृक्षावर एका पक्ष्याच्या जोडप्यास पिले झाली थोड्याच वेळात एक दुराचारी व निर्दय पारधी त्या वृक्षापाशी आला २ त्याने या पक्ष्याची व पिलाची शिकार करण्याच्या हेतूने जवळचा बहिरी ससाणा वर पक्ष्याच्या घरट्याच्यावर सोडून दिला, आणि आपण स्वत खाली राहून त्याने पक्ष्याच्यावर बाण धरिला ३ या कठिण अशा संकटप्रसंगी देवा, त्या पक्ष्यानी तुझे स्मरण कळवळून केले 'श्रीपती, मायबापा, धाव रे, या संकटातून मुक्तता कर' अशी त्यानी प्रार्थना केली. ४ या पक्ष्याच्या मनात मोठीच चिंता होती वरच्या वर उड्न जावे तर बहिरी ससाणा खाऊन टाकील न उडावे तर खालच्या पारध्याच्या बाणाने प्राण जाणार; असा प्राणसंकटाचा पेच त्या पक्ष्याच्या समोर होता. ५ पण देवा, तू त्या पक्ष्याचा धावा ऐकलास, आणि चटकन एका महाभयंकर अशा विषारी सर्पाचा वेष धारण केलास. ६ सर्परूप घेऊन त्या पारध्याच्या पायास तू डसलास व त्याला भूमीवर पाडलेस; तेव्हा त्या पारध्याच्या हातून जो बाण निसटला, तो त्या ससाण्यास लागला व तोही मरण पावला ७ देवा, तुझे स्तवन करणाऱ्या दासावर तू अशी कृपा करतोस संकटकाळी असा तू आधार

१ ससाणा, २ तो.

होतोस ८ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, अशी तुझी कीर्ती साऱ्या त्रिभुवनात पसरली असून तुझा महिमा वेदवाणीसही वर्णन करता येत नाही ९

विवरण – देव आपल्या भक्ताचा सांभाळ किती चतुराईने व तत्परतेने करतो याविषयी तुकारामबुवानी या ठिकाणी एक लहानशी कथा सांगितली आहे एखाद्या कलात्मक कथेचे सारे गुण या कथेत एकवटलेले दिसतात दोन पक्षी, त्यांची लहान पिले, त्यांच्यावर एकाच वेळी आलेले दुहेरी संकट खालून पारध्याचा बाण, वरून बहिरी ससाणा, मग त्यांनी परमेश्वराचे केलेले स्मरण, आता हे पक्षी व त्यांची पिले यांचे प्राण वाचणार तरी कसे ही आपली अभंग वाचतानाची चिंता – या सर्व पार्श्वभूमीवर सर्पाचे रूप धारण करून आपल्या भक्तांना वाचविले हे आपणास समजून मनास एक प्रकारचा संतोष वाटतो देवाची प्रार्थना करणारे लहान पक्ष्याप्रमाणे का जीव असेनात, पण त्यांना न्याय मिळतो हा केवढा दिलासा बुवानी या अभंगात माणसास दिलेला आहे !

६०८ नाहीं दुकळलों अन्ना । परि या मान जनार्दना ॥ १ ॥
देव केला सकळसाक्षी । काळीं आणि शुद्धपक्षीं ॥ २ ॥
भोगी भोगविता । बाळासवे तोचि पिता ॥ ३ ॥
कर्म अकर्म जळाले । प्रौढें तुका ते उरले ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – दुकळलो–महागला काळीं–कृष्णपक्षात

अर्थ – देवा, मी काही मागायला तुझ्याकडे आलो आहे याचा अर्थ असा नव्हे, की मी अन्नाला महागलो आहे तुला जनार्दनास मान द्यावयाचा, याच हेतूने मी तुजकडे आलो आहे १ देवा मी तुला सर्व काळी साक्षी केला आहे शुक्लपक्षातच नव्हे, तर कृष्णपक्षातही मी तुला साक्षी केले आहे २ आपल्या मुलांना जो भोग घेण्यास शिकवितो, व जो स्वत ही भोगतो, तोच खरा पिता समजावा ३ त्याप्रमाणे देवा, आमचे कर्म, अकर्म या विषयीचा विचार नष्ट करून जे प्रौढ व टिकण्यासारखे आहे तेवढ्याचा आपण विचार करू, असे तुकाराम महाराज म्हणतात ४

# नाटाचे—अभंग ६३.

६०९ प्रथम नमन तुज एकदंता । रंगीं रसाळ वोडवीं कथा ।
मति सौरस करीं प्रबळता । जेणें फिटे आतां अंधकार ॥ १ ॥
तुझिये कृपेचे भरितें । आणीक काय राहिलें तेथें ।
मारग सिद्धाच्यानि पंथें । पावविसी तेथें तूंचि एक ॥ २ ॥
आरंभा आदि तुझें वंदन । सकळ करिता कारण ।
देव ऋषि मुनि आदिकरून । ग्रंथ पुराण निर्माणी ॥ ३ ॥
काय वर्णूं तुझी गती । एवढी कैंची मज मती ।
दिनानाथ तुज म्हणती । करीं सत्य वचन हेंचि आपुलें ॥ ४ ॥
मज वाहावतां मायेच्या पुरीं । बुडतां डोहीं भवसागरीं ।
तुज वांचूनि कोण तारी । पाय झडकरी तुका म्हणे ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – एकदंत–एक दात असलेला गणपती वोडवीं–निर्माण कर

अर्थ – एकदंता, गणपते तुला प्रथम नमस्कार करतो तुझ्या कृपेने तू रसाळ अशा कथा निर्माण कर माझी बुद्धी प्रसादयुक्त व प्रबळ करून तिच्यामुळे अज्ञानाचा अंधार दूर होईल असे कर १ एकदा तुझी कृपा पूर्णपणे भरून आली की, मग मला काय कमी आहे ? मोठ्या सिद्धांच्या पंथांनीही तूच प्राप्त आहेस २ सर्व कार्यांच्या

आरंभी तुलाच वंदन असते. सर्वजण असेच सांगतात. देव, ऋषी, मुनी इत्यादींनी पुराणग्रंथांतून हेच निवेदन केले आहे. ३ तुझ्या बुद्धीचे व गतीचे मी वर्णन काय करावे ? माझ्या अल्प मतीस एवढे सामर्थ्य कुठे आहे ? तुला दीनानाथ म्हणतात ना ? मग मी दीन आहे. तू तुझे हे नाव खरे करून दाखीव ना. ४ मी या वृथा मायेच्या पुरात वाहात असताना, या भवसागराच्या डोहात बुडत असताना, तुझ्याशिवाय माझे रक्षण कोण करणार ? तुकाराम महाराज म्हणतात, गणपते, तू माझ्यावर लौकर कृपा कर. ५

६१० प्रथमारंभीं लंबोदर । सकळ सिद्धींचा दातार ।
चतुर्भुज फरशधर । न कळे पार वर्णितां ॥ १ ॥
तो देव नटला गौरीबाळ । पांयीं बांधोनि घागऱ्या घोळ ।
नारदतुंबरसहित मेळ । सुटला पळ विघ्नांसी ॥ २ ॥
नटारंभीं थाटियला रंग । भुजा नाचवी हालवी अंग ।
सेंदुरविलेपनें चांग । मुगुटीं नाग मिरविला ॥ ३ ॥
जया मानवती देव ऋषि मुनी । पाहातां न पुरे डोळियां धनी ।
असुर जयाच्या चरणीं । आदीं अवसानीं तोचि एक ॥ ४ ॥
सकळां सिद्धींचा दातार । जयाच्या रूपा नाहीं पार ।
तुका म्हणे आमुचा दातार । भवसागर तारील हा ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – दातार–दाता, फरशधर–परशू धारण करणारा, पार–सीमा, अंत, गौरीबाळ–पार्वतीचा मुलगा गणपती, मेळे–समुदाय, नटारंभीं–नृत्यनाटयाच्या आरंभी, चांग–चांगला, धनी–तृप्ती, आदीं–जन्माच्या वेळेस, अवसानीं–मरणाच्या वेळेस.

अर्थ .– सर्व कार्यांच्या आरंभी प्रथम या गणपतीला नमन असो. सर्व सिद्धींचा दाता हा गणपती आहे. हा चार हाताचा असून याच्या एका हातात परशू म्हणजे कुऱ्हाड आहे. याच्या सामर्थ्याचा अंत लागत नाही. १ गौरीचा हा मुलगा आता चांगला नटलेला आहे. त्याच्या पायात घागऱ्याचे चाळ बांधलेले आहेत. नारद तुंबरांचा समुदाय जमला आहे. याच्या सामर्थ्यामुळे इतर संकटांना पळता भुई थोडी झाली आहे. २ नृत्यनाटकाच्या आरंभी याचे रंगरूप नटलेले आहे. हा गणपती नृत्यात अंग विविध प्रकारांनी हालवत असून आपले हातही नाचवीत आहे. शेंदराच्या विलेपनाने याचे अंग चांगलेच माखले गेले असल्याने मोठे चांगले दिसत आहे. याच्या मुकुटावर नाग शोभून दिसतो ३ देव, ऋषी, मुनी याला मनापासून मान देतात, याचे रूप कितीही पाहिले तरी डोळ्यांची तृप्ती होत नाही. सारे असुर याच्या चरणी लीन होऊन असतात आपल्या जन्माच्या वेळेपासून अखेरपर्यंत याचेच एक रक्षण असते. ४ सर्व सिद्धींचा हा दाता असल्याने तो आमचा दाता आहे. याच्या रूपास अंत नाही. याच्या कृपेने मनुष्य भवसागर तरून जाईल. ५

विवरण – वरील दोन अभंगात तुकोबानी गणपतीस नमन केले आहे. गणपती हा सुखकर्ता, दुखहर्ता असल्यामुळे प्रत्येक कार्यांच्या आरंभी त्यास नमन करण्याची चाल आहे. तो बुद्धीचा व सर्व सिद्धीचा दाता असल्याचेही वर्णन अनेकानी केले आहे तुकारामबुवाचे आराध्य दैवत श्रीकृष्ण वा विठ्ठल असले तरी त्यानी गणपती या देवतेवरही अभंग केलेले दिसतात ज्ञानेश्वररामदासादी संतानीही गणपतीचे अति सुरेख व भक्तिभावपूर्वक असे वर्णन केलेले आढळेल. या पुढचे व वरील दोन असे ६३ अभंग नाटाचे म्हणून प्रसिद्ध आहेत. नाट म्हणजे एकप्रकारचे नृत्य, नाटय वगैरे तुकोबाच्या वेळीही अशा प्रकारचे खेळ होत असावेत. त्याच्या निमित्ताने हे अभंग झालेले दिसतात. ' देव नटला गौरीबाळ .. भुजा नाचवी हालवी अंग ' इत्यादी वर्णनावरून या नृत्यनाटयाच्या प्रसंगी गणपतीचे रूप घेऊन कार्यक्रमास प्रारंभ करण्याची रीत त्याही काळी असावी असे दिसते.

६११ विठ्ठल आमचें जीवन । आगमनिगमाचें स्थान ।
विठ्ठल सिद्धीचें साधन । विठ्ठल ध्यानविसावा ॥ १ ॥
विठ्ठल कुळींचें दैवत । विठ्ठल वित्त गोत चित्त ।
विठ्ठल पुण्य पुरुषार्थ । आवडे मात विठ्ठलाची ॥ २ ॥
विठ्ठल विस्तारला जनीं । सप्त ही पाताळें भरूनी ।
विठ्ठल व्यापक त्रिभुवनीं । विठ्ठल मुनिमानसीं ॥ ३ ॥
विठ्ठल जीवाचा जिव्हाळा । विठ्ठल कृपेचा कोवळा ।
विठ्ठल प्रेमाचा पुतळा । लावियेलें चाळा विश्व विठ्ठलें ॥ ४ ॥
विठ्ठल बाप माय चुलता । विठ्ठल भगिनी आणि भ्राता ।
विठ्ठलेंविण चाड नाहीं गोता । तुका म्हणे आता नाहीं दुसरें ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – आगमनिगम–वेद व शास्त्र वित्त–संपत्ती, मात–गोष्ट, सप्त पाताळ–अतल, वितल, सुतल, रसातल, महातल, तलातल व पाताल असे सात पाताळ अधोलोक मानले आहेत अहितळ महितळ इत्यादी आणखी सात पाताळही सांगतात

अर्थ – सर्व वेदाचे व शास्त्राचे निवासस्थान असणारा हा विठ्ठल आमचे एकमेव जीवन आहे सर्व सिद्धींचे साधन हा विठ्ठलच असून तो आमचा विसावा आहे आम्ही त्याचेच ध्यान निरंतर करीत असतो १ आमच्या कुळाचे दैवत हा विठ्ठलच असून आमची सारी संपत्ती आमचे सर्व गोत आमच्या सर्व चित्तवृत्ती या एका विठ्ठलात सामावलेल्या आहेत आमचे पुण्य व आमचा पुरुषार्थ या विठ्ठलरूपात आहे याचीच कथा आम्हास नेहमी प्रिय वाटते २ या सर्व लोकात विठ्ठलच भरून राहिलेला असून सप्त पाताळात त्याचीच वसती आहे सर्व त्रिभुवनात विठ्ठल भरून राहिला आहे ऋषिमुनींच्या मनात हाच विठ्ठल स्थिर झालेला आहे ३ हा विठ्ठल माझ्या जीवाचा जिव्हाळा आहे हा विठ्ठल मनाने कोवळा असून कृपाळू आहे हा प्रेमाचा एकमेव पुतळा असून या विठ्ठलाने सर्व विश्वास चाळविले आहे याच्याचमुळे सर्व विश्वाचे चलनवलन होत असते ४ हा विठ्ठल मायबाप, चुलता, बहीण, भाऊ अशा सर्व नात्यानी आमच्याशी संबंधित आहे याच्याशिवाय मला दुसरे कुठलेही गोत नाही तुकाराम महाराज म्हणतात आता याच्याखेरीज दुसरे कुणीच मला नाही ५

६१२ बरवा झाला वेवसाव । पावलों चिंतिलाचि ठाव ।
दृढ पायीं राहिला भाव । पावला जीव विश्रांती ॥ १ ॥
बरवा फळला शकुन । अवघा निवारिला सिण ।
तुमचें जालिया दरुषण । जन्ममरण नाहीं आता ॥ २ ॥
बरवें जालें आलों या ठाया । होतें संचित ठायींचा पाया ।
देहभाव पालटली काया । पडली छाया ब्रह्मींची ॥ ३ ॥
जोडिलें न सरे हें धन । अविनाश आनंदघन ।
अमूर्तमूर्ति मधुसूदन । सम चरण देखियेले ॥ ४ ॥
जुनाट जुगादिचें नाणें । बहुता काळाचें ठेवणें ।
लोपलें होतें पारिखेपणें । ठायचळण चुकविला ॥ ५ ॥
आता या जीवाचियासाटीं । न सुटे पडलिया मिठी ।
तुका म्हणे सिणलों जगजेठी । न लवीं दिठी दुसऱ्याची ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – वेवसाव–व्यवसाय उद्योग दरुषण–दर्शन, काया–शरीर, जुगादिचे–अनेक युगाचे, न सुटे–सोडणार नाही, न रुवीं–लावू नकाम, दिठी–दृष्ट

अर्थ – देवा, आजपर्यंत जो व्यवसाय किंवा उद्योग मी केला तो खरा झाला, फळास आला कारण ज्याचे मी जन्मभर चिंतन केले, त्याचेच स्थान मला प्राप्त झाले आता तुमच्या पायी माझा भाव दृढ राहिला आहे तेथेच मला विश्रांती मिळाली आहे १ मला हा लाभ आज दारून आज झालेला दिसतो तुमच्या प्राप्तीने सारा त्रास दूर झाला असून, तुमच्या दर्शनामुळे मला आता जन्ममरणाची भीती उरलेली नाही २ बरे झाले देवा, या ठिकाणी येऊन पोचलो याच पायाशी माझे सर्व पूर्वकर्माचे पुण्य साठविलेले होते कारण या स्थानाच्या प्राप्तीमुळे माझा देह-भाव पूर्णपणे पालटून गेला त्यावर प्रत्यक्ष परब्रह्माची छाया पडून ते ब्रह्मरूपच होऊन गेले ३ हे धन मी जे एकदा मिळविले आहे, ते कधी न दिसणारे असून ते आनंदस्वरूपाचे आहे अमूर्त असणारा हा मधुसूदन मूर्तरूपास येऊन येथे उभा आहे त्याची एकसारखी पावले पाहून मी संतुष्ट झालो आहे ४ अनेक युगाचे हे नाणे जुने असून पुष्कळ दिवसाचे हे ठेवण आहे. पण याची पारख करणाराच कुणी नव्हता म्हणून याचा ठावठिकाणा कुणास सापडला नाही तो सर्वत्र असल्याने नीट पारखल्यावाचून तो कुणाला मिळण्यासारखा नव्हता ५ पण आता हा मला माझ्या जीवासाठी प्राप्त झाला आहे याच्या पायास पडलेली मिठी मी आता कधी सोडणार नाही तुकाराम महाराज म्हणतात, हे जगजेठी, मी फार दमलो आहे रे मला दुसऱ्या कुणाची दृष्ट होईल असे तू करू नकोस ६

६१३ मी तव अनाथ अपराधी । कर्महीन मतिमंदबुद्धी ।
तुज म्या पाठविलें नाहीं कधीं । वाचे कृपानीधी मायबापा ॥ १ ॥
नाहीं ऐकिलें गाइलें गीत । धरिली लाज सांडिलें हित ।
नावडे पुराण बैसले संत । केली बहुत परनिंदा ॥ २ ॥
केला करविला नाहीं उपकार । नाहीं दया आली पीडिता पर ।
करू नये तो केला व्यापार । वाहिला भार कुटुंबाचा ॥ ३ ॥
नाहीं केले तीर्थाचें भ्रमण । पाळिला पिंड करचरण ।
नाहीं संतसेवा घडलें दान । पूजावलोकन मूर्तीचें ॥ ४ ॥
असंगसंग घडले अन्याय । बहुत अधर्म उपाय ।
न कळे हित करावें तें काय । नये बोल आठवू तें ॥ ५ ॥
आप आपण्या घातकर । शत्रु जालों मी दावेदार ।
तूं तव कृपेचा सागर । उतरीं पार तुका म्हणे ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – नावडे–आवडत नाही पिंड–शरीर

अर्थ – देवा मी अनाथ असून तुझे अनेक अपराध करणारा आहे मी कर्महीन असून माझी बुद्धी अगदी मंद आहे माझ्या वाणीने हे कृपेच्या सागरा, मायबापा मी कधीही तुझी आठवण केली नाही १ कधी तुझे नाम ऐकिले नाही, कधी गाइले नाही या बाबतीत मी लाज धरून आपले स्वतःचे हित सोडून दिले मला पुराण ऐकत बसणारे संत कधी आवडले नाहीत मी आजवर पुष्कळ वेळा दुसऱ्याची निंदा केलेली आहे २ मी स्वतः कधी दुसऱ्यावर उपकार केला नाही कधी कुणास करू दिला नाही दुसऱ्यास दुःख देताना माझ्या चित्तात कधी दया आली नाही जो उद्योग वा व्यवहार करू नये तो मी करीत आलो आहे मी केवळ कुटुंबाचा भार व्यर्थ धारण केला ३ मी कधी तीर्थयात्रेस गेलो नाही, हातापायासकट या देहाचेच केवळ पोषण मी केले मला कधी संतसेवा घडली नाही, की कधी दान मी केले नाही कधी देवा तुमच्या मूर्तीस डोळे भरून पाहून तिची पूजा केली नाही ४

मला आजपर्यंत दुष्ट माणसाचीच सगत जडली होती. माझ्या हातून अनेक अन्यायकारक गोष्टी व अधर्माचे उपाय मी आजपर्यंत अनेक केले. आता माझे हित कशात आहे हेच मला समजेनासे झाले आहे. माझे अपराध मला आता आठवतही नाहीत, की ते वाचेने बोलूनही दाखविता येत नाहीत ५ असा मी आपला आपल्यासच घात करणारा झालो असून मी स्वत चाच शत्रू व दावेदार बनलो आहे पण तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तू कृपेचा सागर आहेस ना ? मला या ससारसागरातून पार कर ना ६

विवरण :—या अभगात व इतरही कित्येक ठिकाणी तुकारामबुवानी मी पापी, मी दुराचारी असा उल्लेख केलेला आहे माझी बुद्धी मद आहे, मी कधी तुझे ध्यान केले नाही, पुराणकीर्तन ऐकले नाही, सताची सेवा केली नाही, काही तीर्थयात्रा केल्या नाहीत, असताचे सग घडले, हातून अधर्म फार झाले इत्यादी अनेक अपराधाची मालिका बुवानी वरीलसारख्या अभगातून गुफिली आहे पुढील क्र ६७० च्या अभगात तर देवा, मी चाडाळ आहे, मी अमगल आहे, अवगुणाची खाण आहे, मला '**अखड विषयाची व्यथा**' असून मी '**अधम पुरता अधमाहूनी**' आहे असे त्यानी म्हटले आहे निंदा, द्वेष, विश्वासघात, काम, क्रोध, दभ, अहकार माझ्यामध्ये भरपूर असून माझे '**सदा परद्वारीं परधनीं ध्यान**' असून मला '**दासीगमन**' ही घडले आहे असे बुवा म्हणतात

या सर्व वचनाचा काय अर्थ ? बुवाचे पूर्वायुष्य या दृष्टीने तपासून पाहाण्यात काही अभ्यासक तत्पर झालेले दिसतात तुकारामबुवा वारवार म्हणतात त्याप्रमाणे खरोखरच त्याच्या आधीच्या आयुष्यात काही भलेबुरे आचार-विचार होते की काय ? या प्रश्नाचा विचार करताना असेच म्हणावेसे वाटते की, हे सर्व उद्गार भक्तीस अनुकूल होत जाणाऱ्या पवित्र वृत्तीच्या पार्श्वभूमीवरचे आहेत असतील नसतील तसल्या पापाचा उच्चार करून कावुळतीस यायचे, दीनता प्रकट करायची, करुणा भाकावयाची व ईश्वरास जवळ करायचे, ही एक पद्धती भक्तिमार्गातील ठरून गेल्यासारखी आहे तुकोबाच्या अभगातील सर्व पापे त्याना शाब्दिक अर्थाने चिकटविता येणार नाहीत '**मी तों अपराधाची राशी । शिखा अगुष्ट लोंपाशीं**' यासारख्या उद्गारातील अतिशयोक्ती व अनुतापाची भूमिका याचा मेळ घालूनच याचा विचार व्हावयास हवा

ऐन तारुण्यात, वयात असताना तुकोबाच्या हातून दुराचार वा पापकर्म या गोष्टी घडल्या असल्याचा उल्लेख त्याच्या चरित्रात नाही अभगातून अनेक प्रसगी जो उच्चार होतो, तो केवळ भक्तीस अनुकूल होत राहणाऱ्या दीन व अनुतापयुक्त वृत्तीचाच निदर्शक मानणे युक्त होणार आहे नाही तर पुढे गाथेत क्र २८३५ चा अभग '**माझीया मीपणावरी पडो पाषाण**' या ओळीने सुरुवात होणारा वादग्रस्त अभग आहे त्यातील सर्व दोष वाच्यार्थाने बुवाच्या अगी लावण्याचे धैर्य कुणी करण्याचा प्रयत्न केलेले दिसत नाही कुणी तसा प्रयत्न केला तर तो टिकण्यासारखा नाही तुकोबा वृत्तीने सात्त्विक, पण धदा वाण्याचा, सावकारकीचा या निमित्ताने काही निराळी व्यापारी नीती खरेखोटेपणाविषयी वापरावी लागली तरी, व्याकूळ होऊन जाणारे तुकोबा असल्या अभगातील पातकाचे धनी स्वत असतील हे सभवत नाही

ऐन तारुण्यात माझ्या हातून पापे घडली, मी दुराचारी होतो, दुसऱ्यावर उपकार कधी केला नाही, सताची निंदाच सतत केली, यासारख्या आत्मनिवेदनात अनुतापाची, न केलेल्या पातकाविषयी अनुतापाची वृत्तीच असणे शक्य आहे अत करणातील प्रभू लौकर व्यक्त व्हावा, प्रकट व्हावा, प्रचीतीत यावा, यासाठी तुकोबानी आपणा-पाठीमागे अनत पातकाची नामावळी लावून घेतली तो ग्रथदरा सत्य मानून त्याच्या चरित्रातील घटनाचे धागेदोरे हुडकणे व त्याचा अर्थ लावणे इष्ट व उचित नाही '**स्त्रियाचा तो सग नको नारायणा**' यासारख्या वचनाने मोह झिडकारून टाकणाऱ्या तुकोबाच्या या अनुतापयुक्त उद्गाराचा अर्थ सावधपणे लावावयास हवा

६१४ आतां पावेन सकळ सुखें । खादलें फदा तें न देखें ।
अवघें सरलें पारिखें । सकळ देखें माहियेरे ॥ १ ॥
जवळी विठ्ठल रखुमाई । बहिणी बंधु बाप आई ।
सकळ गोताचीच साई । पारिखें काई ऐसे नेणिजे ॥ २ ॥

जगदाकारीं जाली सत्ता । वारोनी गेली पराधीनता ।
अवघें आपुलेंचि आतां । लाज आणि चिंता दुऱ्हावली ।। ३ ।।
वावरे इच्छा वसे घरीं । आपुले सत्तेचे माहेरीं ।
करवी तैसें आपण करीं । भीड न धरी चुकल्याची ।। ४ ।।
सोसिला होता सासुरवास । बहुतांचा बहुत दिवस ।
बहु कामें पुरविला सोस । आतां उदास आपुल्यातें ।। ५ ।।
करिती कवतुक लाडें । मज बोलविती कोडें ।
मायबाप उत्तरें गोडें । बोले बोबडें पुढें तुका ।। ६ ।।

शब्दार्थ व टीपाः– साई–आधार, आश्रय, वारोनी गेली–निघून गेली.

अर्थ :– आता मी सर्व सुखाना मिळवीन याच्या प्राप्तीने जे सुख प्राप्त झाले, ते इतरत्र कधी मी पाहिलेच नाही. आता परकेपणाचा भावच कुठे उरलेला नसून, सर्वत्र माहेरच्याच नात्याचा संबंध मला दिसत आहे. १ ही विठ्ठलरखुमाई अगदी माझ्या जवळ आहेत. बहीण, भाऊ, बाप, आई या सर्व नात्यांना या विठ्ठलाचाच एक आधार आहे. आता दुसरे काही नाते मी जाणतच नाही २ सर्व जगतात एकाच सत्तेचा आविष्कार आहे, हे ध्यानात येऊन माझी परतंत्रता नाहीशी झाली. आता सर्वत्र एक आपलेच रूप आहे, असे समजल्याने माझी लाज व चिंता दूर झाली ३ आता माझी इच्छा याच सत्तेच्या घरी वसत असल्याने आपल्याच स्थानी आहे असे वाटते तो करील तसे घडत आहे. आता कुणाची वा चुकल्याची भीडही धरीत नाही मी. ४ आजपर्यंत मी अनेक विकाराचा सासुरवास सोसला पुष्कळाचा त्रास पुष्कळ दिवस सहन केला अनेक इच्छांचा सोस पूर्ण झाला आता मात्र मी या सर्व लौकिक वासनाविषयी उदास आहे. ५ माझे मायबाप कौतुकाने व लाडाने मला बोलवितात. गोडगोड उत्तरानी माझी समजूत काढतात आणि तुकाराम महाराज म्हणतात, मीही त्यांच्याशी बोबडया बोलाने बोलत असतो ६

६१५ सर्वसुखाचिया आशा जन्म गेला । क्षण मुक्ती यत्न नाहीं केला ।
हिंडता दिशा सीण पावला । मायावेष्टिला जीव माझा ।। १ ।।
माझें स्वहित नेणती कोणी । कांहीं न करितां मजवांचुनी ।
सज्जन तंव सुखमांडणी । नेणती कोणी आदि अंत ।। २ ।।
काय सांगो गर्भीची यातना । मज भोगितां नारायणा ।
मांस मळ मूत्र जाणा । तुज क्षणक्षणा ध्यात असें ।। ३ ।।
मज चालतां प्रयाणकाळीं । असता न दिसती जवळी ।
मृत्तिके मृत्तिका कवळी । एकले मेळीं संचिताचे ।। ४ ।।
आतां मज ऐसे करीं गा देवा । कांहीं घडे तुझी चरणसेवा ।
तुका विनवीतसे केशवा । चालवीं दावा संसारें ।। ५ ।।

शब्दार्थ व टीपा :– प्रयाणकाळीं–मरणाच्या वेळेस, दावा–विरोध.

अर्थ :– सर्व प्रकारची सांसारिक दु खे मिळावीत म्हणून माझा आजवरचा जन्म गेला. एक क्षणभरही मुक्तीचा विचार मी कधी केला नाही. उगाच वणवण फिरताना मला त्रास मात्र झाला. सर्व प्रकारच्या सांसारिक मायेने माझे आयुष्य भरून गेले होते १ माझे हित कशात आहे, हे कुणीच मला सांगितले नाही. त्याचा विचार माझ्याशिवाय इतर कुणी करीत नाहीत सज्जन सोयरे जे भोवती आहेत ते सारे सुखाचेच सोबती आहेत कुणीही जन्ममरणासंबंधी विचार करीत नाहीत. २ देवा, मातेच्या गर्भातील यातनाचे काय वर्णन करू ? मला त्या भोगाव्या

लागल्या आहेत. मांस, मलमूत्र यांनीच सर्वत्र वेष्टण असते. त्यावेळी मी तुलाच क्षणोक्षणी स्मरत असतो. ३ माझा मरणकाळ जवळ आला असताना, मला जवळच्या नात्याची माणसे कुणी दिसतच नाहीत. देहपतन म्हणजे माती मातीस जाऊन मिळणे; पूर्वसंचिताप्रमाणे होणे एवढेच माझ्या ध्यानात येते. ४ देवा, आता माझ्यासाठी तू एवढे कर. तुझी काही चरणसेवा मला घडावी. तुकाराम महाराज या केशवास विनवीत आहेत की, या संसाराशी माझा काही विरोध निर्माण होईल असे तू कर. ५

६१६ अगा ए सावळचा सगुणा । गुणनिधिनाम नारायणा ।
आमची परिसा विज्ञापना । सांभाळी दीना आपुलिया ॥ १ ॥
बहु या उदराचे कष्ट । आम्हांसि केलें कर्मभ्रष्ट ।
तुमची चुकविली वाट । करीं वटवट या निमित्यें ॥ २ ॥
जालों पांगिला जनासी । संसाराची आंदणी दासी ।
न कळे कधीं सोडविसी । दृढपाशीं बहु बांधलों ॥ ३ ॥
येथें तों नये आठव कांहीं । विसावा तो क्षण एक नाहीं ।
पडिलों आणिके प्रवाहीं । हित तों कांहीं दिसेचि ना ॥ ४ ॥
जीवित्व वेचिलें वियोगें । हिंडतां प्रवास वाउगें ।
कांही व्याधि पीडा रोगें । केलिया भोगें तडातोडी ॥ ५ ॥
माझा मींच जालों शत्रु । कैंचा पुत्र दारा कैंचा मित्रु ।
कासया घातला पसरु । अहो जगद्गुरु तुका म्हणे ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – गुणनिधी–गुणाचा साठा, परिसा–ऐका, विज्ञापना–विनंती, पांगिळा–पंगू, दारा–पत्नी.

अर्थ :– अरे श्यामसुंदरा, सगुणरूपा विठ्ठला, गुणाचा साठा असलेल्या नारायणा, आमची एक विनंती तू ऐक ना. या आपल्या दीन सेवकाचा सांभाळ तू कर ना. १ मी पोट भरण्यासाठीच फार कष्ट केले. त्यामुळे आम्ही देवा, कर्मभ्रष्ट झालो. तुमच्याकडे येण्याची वाट चुकली त्यामुळे म्हणून तर मी तुमच्या दाराशी कटकट करीत उभा आहे. २ देवा, या भोवतीच्या लोकांसाठी मी पंगू बनून राहिलो आहे. आंदण दिलेल्या दासीप्रमाणे मी या संसारात वागत आहे. देवा, तू मला या दृढ अशा बंधनातून कधी सोडवशील? मी फार बांधलो गेलो आहे रे. ३ या संसारात मला तुझी आठवण काहीच येत नाही. येथे क्षणभर देखील विसावा मिळत नाही. मी आणखी काही वासनांच्या प्रवाही पडलो तर मग मला माझ्या हिताचे काहीच दिसत नाही. ४ माझे आयुष्य तुझ्या वियोगातच खर्च झाले ना? अनेक जन्मांचा वृथा प्रवास करावा लागला. काही व्याधी जडल्या. रोग निर्माण झाले त्यामुळे देहाची काही तोडमोडही झाली. ५ अशा प्रकारे मीच माझा शत्रू बनलो. अशा वेळी मुलगा, पत्नी, मित्र यांचा कसलाही उपयोग होत नाही. कशासाठी मग हा एवढा पसारा मी मांडला? तुकाराम महाराज म्हणतात, अहो, जगद्गुरु, तुम्ही याचा विचार करा एकदा. ६

६१७ आतां मज धरवावी शुद्धि । येथुनी परतवावी बुद्धि ।
घ्यावें सोडवुनि कृपानिधि । सांपडलों संधीं काळचक्रीं ॥ १ ॥
करिसील तरि नव्हे काई । राईचा डोंगर पर्वत राई ।
आपुले करुणेची खाई । करीं वो आई मजवरी ॥ २ ॥
मागील काळ अज्ञानपणें । सरला स्वभावें त्या गुणें ।
नेणें आयुष्य [1]जालें उणें । पुढील पेणें अंतरलें ॥ ३ ॥

---

१ होतें.

आतां मज वाटतसे भय । दिवसेंदिवस चालत जाय ।
येथें म्या येउनि केलें काय । नाहीं तुझे पाय आठविले ॥ ४॥
करूनि अपराध क्षमा । होतील केले पुरुषोत्तमा ।
आपुले नामीं घ्यावा प्रेमा । सोडवीं भ्रमापासुनिया ॥ ५ ॥
हृदय वसो तुमच्या गुणीं । ठाव हा पायांपें चरणीं ।
करूं हा रस सेवन वाणी । फिटे तों धणी तुका म्हणे ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा :– संधीं–संकटात, साई–छाया, पेणें–मुक्काम, धणी–तृप्ती.

अर्थ :– देवा, आता माझ्या विचारांनी काही शुद्धी धारण करावी व माझ्या बुद्धीने प्रपंचापासून परतावे, सोडवून घ्यावे, असे कृपेच्या सागरा, काही तरी करा. या काळचक्राच्या संकटात सापडून मी ग्रासलो आहे. १ तू मनात आणलेस तर काय करणार नाहीस ? राईचा डोंगर करशील, डोंगराची राई करून दाखविशील. देवा, तुमच्या कृपेची छाया मजवर करा ना. हे आई, एवढी कृपा तू करावीस. २ या पूर्वीचा काळ अज्ञानपणात निघून गेला. माझ्या स्वभावातील गुणामुळे तो व्यर्थ झाला. यामुळे आयुष्य कमी होत राहिले, हेही ध्यानात आले नाही व पुढला शाश्वत सुखाचा मुक्काम दुरावला हेही समजले नाही. ३ आता मात्र माझ्या मनात भय निर्माण झाले असून दिवस एकामागून एक असे निघून जात आहेत. मी या जन्मास येऊन काय केले ? तुझ्या पायाचे स्मरण काही मनोभावे मी कधी केले नाही. ४ परंतु पुरुषोत्तमा, माझे पूर्वीचे अपराध क्षमा करावेत. तुमच्या नामाविषयी मला प्रेम द्यावे आणि या संसारभ्रमापासून मुक्त करावे. ५ तुमच्या गुणकीर्तनात माझे हृदय स्थिर व्हावे. तुमच्या पायांच्या ठिकाणीच मला स्थान मिळावे. तुमच्या नामसंकीर्तनाची गोडी वाणीने सेवन करू. तुकाराम महाराज म्हणतात, तृप्ती होईपर्यंत यात मी आता रंगून जाईन. ६

६१८ जेणें हा जीव दिला दान । तयाचें करीन चिंतन ।
जगजीवन नारायण । गाईन गुण तयाचे ॥ १ ॥
जो या उभा भीवरेच्या तिरीं । कट धरूनियां करीं ।
पाउलें समचि साजिरीं । अंतरीं धरोनि राहेन ॥ २ ॥
जो या असुरांचा काळ । भक्तजनप्रतिपाळ ।
खेळे हीं लाघवें सकळ । तयाच्या भाळ पायांवरी ॥ ३ ॥
जो या गोपाळांच्या मेळीं । खेळु खेळे वनमाळी ।
रसातळा नेला बळी । राहे पाताळीं स्वामी माझा ॥ ४ ॥
जो हा लावण्यपुतळा । जयाचे अंगीं सकळ कळा ।
जयाचे गळां वैजयंतीमाळा । तया वेळोवेळां दंडवत ॥ ५ ॥
जयाचे नाम पाप नासी । लक्ष्मी ऐसी जयाची दासी ।
तो हा तेजःपुंज रासी । सर्वभावें त्यासि तुका शरण ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा :– साजिरीं–शोभिवंत, भाळ–मस्तक, कपाळ.

अर्थ :– ज्या ईश्वराने मला हा शुद्ध व सात्त्विक असा जीव दान दिला आहे, त्याचेच चिंतन मी रोज करीत राहीन. या जगताचे जीवनच असणारा जो नारायण त्याचेच गुण मी गात राहीन. १ तोच देव या भिवरा नदीच्या काठावर कमरेवर हात ठेवून उभा आहे. त्याची एकसारखी पावले अतिशय शोभिवंत अशी असून तीच मी माझ्या चित्तात धारण केली आहेत. २ हा विठ्ठल असुरांचा, दुष्ट लोकांचा काळ असून आपल्या भक्तांचा सांभाळ मोठ्या

प्रेमाने करीत असतो मोठ्या कौतुकाने हा नाना प्रकारचे खेळ करीत असतो याच्या पायावर माझे मस्तक नम्र झाले आहे ३ हा या गोपाळाच्या समुदायात खेळ खेळण्यात रंगून गेला आहे यानेच बळीच्या मस्तकावर पाय ठेवून त्याला पाताळात पाठविले व तो त्याचे दार रक्षण करीत राहिला ४ हा श्रीहरी लावण्याचा पुतळा असून याच्या अंगी सर्व प्रकारच्या कला आहेत. याच्या गळ्यात वैजयंती माळ शोभून दिसत आहे या माझ्या स्वामीस अनेकवार नमस्कार असोत ५ याच्या नामाच्या उच्चाराने पाप नष्ट होते प्रत्यक्ष लक्ष्मीच याची दासी असते हा तेजाची प्रत्यक्ष रासच जणु असून तुकाराम महाराज म्हणतात, मी त्याला सर्व भावाने शरण आलो आहे ६

६१९ काय मी उद्धार पावेन । काय कृपा करील नारायण ।
ऐसे तुम्ही सांगा संतजन । करा समाधान चित्त माझें ॥ १ ॥
काय हे खंडईल कर्म । पारुषतील धर्माधर्म ।
कासयाने ते कळे वर्म । म्हणउनी श्रम वाटतसे ॥ २ ॥
काय हो स्थिर राहेल बुद्धी । काहीं अरिष्ट न येल मधीं ।
धरिली जाईल ते शुद्धी । शेवट कधीं तो मज न कळे ॥ ३ ॥
काय ऐसे पुण्य होईल गाठीं । घालीन पायीं देवाचे मिठी ।
मज तो कुरवाळील जगजेठी । दाटइन कंठी सद्गदित ॥ ४ ॥
काय हे[1] निवतील डोळे । सुख ते देखोनी सोहळे ।
संचित कैसे ते न कळे । होतील डोहळे वासनेसी ॥ ५ ॥
ऐसी चिंता करी सदा सर्वकाळ । रात्रिदिवस हेचि तळमळ ।
तुका म्हणे नाही आपुले बळ । जेणे फळ पावे निश्चयेंसी ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – खंडईल–नष्ट होईल, पारुषतील–कमी होतील

अर्थ - संत लोकहो, सांगा ना, माझा उद्धार खरेच होईल ना ? तो नारायण माझ्यावर कृपा करील ना ? माझ्या चित्ताचे समाधान करा ना एकदा तुम्ही १ माझे प्रारब्धकर्म नष्ट होईल ना ? माझे धर्माधर्म कमी होतील ना ? काय केले म्हणजे मला या नारायणाचे रहस्य समजेल ? या चिंतेन माझ्या मनास भारी श्रम होतात हो २ माझी बुद्धी या ईश्वराशी स्थिर राहील ना ? मध्येच काही एखादे संकट तर नाही ना येणार ? मनात ज्याची इच्छा धरून मी आहे ती सफल होईल ना ? गोड शेवट झालेला मला दिसेल ना ? ३ ज्याच्या योगाने माझी मिठी देवाच्या पायांशी पडेल असे पुण्य कधी तरी माझ्याजवळ साठून राहील काय ? तो जगजेठी मला हळुवारपणे प्रेमाने कुरवाळील ना ? माझा कंठ त्याच्या विषयीच्या प्रेमाने कधी भरून येईल ? ४ त्याच्या भेटीच्या सोहळ्याचे सुख पाहून माझे डोळे कधी बरे निवतील ? काय संचित आहे ते नीट कळत नाही पण अशा प्रकारच्या इच्छेचे डोहाळे मला लागले आहेत हे खरे ५ अशी चिंता मी सदा सर्वकाळ करीत आहे रात्रंदिवस माझे चित्त तळमळत असून तुकाराम महाराज म्हणतात, अशा तळमळीतून मला निश्चयाने फळ मिळेल असे बळ केवळ माझ्याच अंगी आहे असे नाही ६

६२० तूंचि अनाथाचा दाता । दु:ख मोह नासावया चिंता ।
शरण आलो तुज आतां । तारीं कृपावंता मायबापा ॥ १ ॥
संतसंगति देईं चरणसेवा । जेणें तुझा विसर न पडावा ।
हाच भाव माझिया जीवा । पुरवीं देवा मनोरथ ॥ २ ॥

---
[1] ते

मज भाव प्रेम देईं कीर्ती । गुण नाम वर्णावया स्तुती ।
विघ्ना सोडवूनि हातीं । विनंती माझी परिसावी हे ॥ ३ ॥
आणीक कांहीं नाहीं मागणें । सुखसपत्तिराज्यचाड धन ।
साकडें न पडे तुज जेणें । दुजें भवतीविण मायबापा ॥ ४ ॥
जोडोनिया कर पायीं ठेवीं माथा । तुका विनवी पढरिनाथा ।
रगीं वोडवावो रंगकथा । पुरवी व्यथा[1] मायबापा ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– परिसावी–ऐकावी, साकडें–सकट

अर्थ – देवा, तूच आमच्यासारख्या अनाथाचा नाथ आहेस आमचे दु ख, मोह, आमची चिंता, याचा नाश तूच करतोस म्हणून देवा, तुला मी शरण आलो आहे. तेव्हा मायबापा, कृपावत होऊन मला तार; माझे रक्षण कर. १ सताची सगती व तुझ्या चरणाची सेवा एवढयाच गोष्टी दे तू. जेणेकरून तुझा विसर होणार नाही, हाच भाव माझ्या अत.करणात दृढ व्हावा माझे एवढे मनोरथ देवा, तू पुरवावेस २ मला तुजविषयी भावभक्ती वाटावी, प्रेम वाटावे, तुझे नाम व तुझी कीर्ती वर्णन करून तुझी स्तुती करण्याची हौस मला आहे तेव्हा तू ती पुरवावीस व माझी सर्व सकटे दूर करून ही विनती तू ऐक ३ याशिवाय देवा, आणखी दुसरे मागणे काही नाही सुख, सपत्ती, राज्य, धन इत्यादींची काहीही किंमत मला नाही. हे मला देण्याविषयी तुला कधीच सकट पडणार नाही मायबापा, एक भक्ती मात्र तू द्यावीस ४ मी हात जोडून तुझ्या पायावर मस्तक ठेवीत आहे. तुकाराम तुला पढरीनाथा, विनवीत आहे की, माझ्या अत करणाच्या भावभक्तीच्या रगावर तुझ्या प्रीतीचा रग चढवा. एवढीच देवा, माझी तीव्र इच्छा आहे ५

६२१ सेदरीं[1] हें देवी दैवतें । कोण तीं पुजी भुतेंकेतें ।
आपुल्या पोटा जीं रडतें । मागती शितें अवदान ॥ १ ॥
आपुले इच्छे आणिकां पीडी । काय तें देईल बराडी ।
कळी ही आली तयाची जोडी । अल्प रोकडी बुद्धि अधरा[3] ॥ २ ॥
दासीचा [4]पाहुनरउखतें । धणी देईल आपुल्या हातें ।
करुणाभापणउचितें । हें तो रितें सतत शक्तिहीन ॥ ३ ॥
काय तें थिल्लरीचे पाणी । ओठ न भिजे न फिटे धणी ।
सीण तरीं आदी आवसानीं । क्षोभे पुरश्चरणीं दिले फळ ॥ ४ ॥
थिलेपनें बुजविती तोंड । मार खोल[5] वाहातो उदड ।
करविती आपणया दड । ऐसियास मांड म्हणे देव तो ॥ ५ ॥
तैसा नव्हे नारायण । जगव्यापक जनार्दन ।
तुका म्हणे त्याचें करा चिंतन । वदू चरण येती सकळें ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – सेदरीं–शेंदूर फासून केलेली, हेंदरी–आगळ, धाणेरडी, अवदान–बळी, बराडी–भागाळ-भूत, जोडी–प्राप्ती, अधरा–धैर्य नसलेली, पाहुणेर–पाहुणचार, उखीतें–दासीचे वेतन, थिल्लरीचे–डबक्यातील, धणी–तृप्ती, भाड–भाडखोर

अर्थ :– दगडादिकाना भाव न धरिता शेंदूर फासून वेडीवाकडी व घाणेरडी देवदैवते व भुतेखेते याची पूजा कशासाठी करावी ? आपल्याच पोटासाठी एखाद्याच्या शिताची भिक्षा मागणारी, बळी मागणारी ही दैवतें

१ देवा मनोरथा, २ सदरी हेंदरी, दैवत ३ अधीरा, ४ पाहुणेर उखीत, ५ खोळ

दुसऱ्याला काय देणार ? १ आपल्या इच्छेसाठी, तृप्तीसाठी दुसऱ्याना छळतात त्या आशाळभूत दैवतापासून आपणास काय मिळणार आहे ? त्याच्या प्राप्तीचा उपयोग तरी काय ? त्याची बुद्धी थोडी असून त्याच्या अगी धैर्य तर थोडेच असते २ दासीच्या पासूनच जर पाहुणचाराची इच्छा केली, तर स्वत स वेतन देणाऱ्या आपल्या धन्यास तिला प्रथम विनती करावी लागते मग ती उचित अशा कडण भाषणानी काही स्वागत करील अशा प्रकारची ही रिकामी दैवते शक्तिहीन अशी असतात ३ एखाद्या डबक्यातील पाण्याचा काय उपयोग ? त्या पाण्यात ओठही भिजत नाही, तहान भागल्याची तृप्ती कधी होत नाही जन्मापासून मृत्यूपर्यंत सर्व त्रास मात्र सदोदित होतो एखाद्या पुरश्चरणात काही कमी पडल्यास जसा क्षोभ होतो व फळ नष्ट होते, तसे या क्षुद्र दैवताचे आहे ४ या दगडी दैवताचे तोड शेंदराने झाकून टाकलेले असल्याने त्या भाराची खोळ ती नेहमी वागवीत असतात कधी हिंसाचाराने आपली आपणासच दड अथवा शासन करून घेतात अशाना देव कुणी म्हणेल तर तो मनुष्य भाडखोर व बलदडच म्हणावा लागेल ५ तशा प्रकारचा हा माझा नारायण नाही हा सर्व जगाला व्यापून राहणारा जनार्दन आहे तुकाराम महाराज म्हणतात, त्याचे चिंतन मनापासून करा, म्हणजे ही क्षुद्र दैवते तुमच्या पायाशी नम्र होतील ६

विवरण – तुकारामबुवा सगुण मूर्तीचे उपासक असले तरी, भावभक्तीशिवाय जर कोणी दगडास शेंदूर फासून देवदेवताचा पसारा माडू लागला तर मात्र त्याना खपत नसे एका विठ्ठलावाचून दुसरी दैवत नमावीत असे त्याच्या मनास वाटते दुसरी क्षुद्र देवदैवते व्यर्थ कष्ट देणारी, फसविणारी एकसारखी कशाची तरी मागणी करणारी असतात त्यान्यात आपण समजतो तवढेही सामर्थ्य नसते आसुरी वृत्तीनी ती नेहमी भारावलेली असून भक्ताना त्रास देणारी व पुन पुन नव्या देणगीची इच्छा करणारी असतात याच्या नादी कशास लागावे ? सर्व देव सारखेच , सर्व वस्तूत एक परमेश्वर तत्त्व भरून राहिले आहे हे खरे पण हे कुणासाठी ? जो मनात एकनिष्ठ भाव धरून भक्ती करावयास उत्सुक आहे त्यासाठी मनात भावभक्ती नसताना उगाच आपले लौकिक सुखासाठी रोज नवीन दैवते निर्माण करून त्याच्या वेडयावाकडया व तामसी भावना पुऱ्या करणाऱ्याना तुकोबानी या अभगात चागलाच धडा दिलेला आहे

दगडास शेंदूर फासून राज नव देव निर्माण करून गरीव बायाबापडयाना फसविण्याचाही धदा तुकाराम-बुवाच्या वेळेस जोरात चालू असावा भक्तवत्सल असणारा पढरीनाथ सोडून या क्षुद्र व अघोरी देवदैवताची उपासना करणाराचा निषेध सर्वच साधुसतानी केलेला आहे ज्ञानेश्वरानी तर ज्ञानेश्वरीच्या तेराव्या अध्यायात माणसाच्या अज्ञानाचे वर्णन करिताना, त्याच्या या रोज नवा देव शोधण्याच्या वृत्तीचा निषेधच केलेला आहे केवळ लौकिक सुखासाठी देव आठविणे व मनकामना पूर्ण न झाल्यास त्याच देवास नाव ठेवून दुसरा शोधणे ही काय खरी भक्ती म्हणायची ? अशी भक्ती करणारी माणसे कशी असतात ? ज्ञानेश्वरानी तीव्र शब्दात सागितले आहे– ' नातरी कांताच्या मानसीं । रिगोनि स्वैरिणी जैसी । राहाटे जारेंसी । जावया लागीं ।। ' नवऱ्याच्या अत करणात शिरण्याचा प्रयत्न करणारी, पण मनातून दुसऱ्याच प्रियकराचे ध्यान करणाऱ्या जारिणीप्रमाणे या माणसाचे असे वर्तन असते एका दैवताने समाधान झाले नाही, मग दुसरे शोधायचे व पहिल्यास नावे ठेवायची– ' कुणबट कुळवाडी । तैसा आन आन देव माडी । आदिलाची परवडी । धरी तया ' अशी त्याची स्थिती असते या नव्यानव्या देवाच्या शोधात असणाऱ्या माणसास कधी समाधानच होत नाही तो सारखा भटकत असतो बाजारबसवीप्रमाणे त्याचे भ्रमण चालू असते 'ऐसा अखड भ्रमण करी । उगा नोहे क्षणभरी । अवघे न गावद्वारीं । अहेव जैसी ' असे म्हणून ज्ञानदेवानी या दैवताचा व त्याना भजणाऱ्याचा निषेधच केला आहे

तुकारामबुवाच्या वेळी तर या क्षुद्र व हिंसाचारी देवाचा सुळसुळाट झाला होता नवे नवे धर्मपथ, शेंदराचे देव, रक्ताचा, मासाचा नैवद्य, अघोरी उपाय याच्यासारख्या हीन मार्गानीच या दैवताचा बुवानी धिक्कार केलेला दिसून येतो ' नव्हे जाखाई जोखाई मायराणी मेसाबाई । बळिया माझा पढरिराव जो या देवाचाही देव ' असा स्पष्ट खुलासा बुवानी आणखी एका अभगात ( क्र २३८४ ) करून ' वेताळें फेताळें । जळो त्याचे तोंड काळें ' म्हणून आपल्या नेहमीच्या शब्दात त्यानी कडकपणे निषेध केला आहे

६२२ विषयओढीं भुलले जीव । आता याची कोण करील कींव ।
नुपजे नारायणीं भाव । पावोनि ठाव नरदेह ॥ १ ॥
कोण सुख धरोनि संसारीं । पडोनि काळाचे आहारीं ।
माप या लागले शरीरीं । जालियावरी सळे ओढिती ॥ २ ॥
बापुडीं होतील सेवटीं । आयुष्यासवे जालिया तुटी ।
भोगिले मागें पुढें ही कोटी । होईल भेटी जन्मासी ॥ ३ ॥
जतिलो[1] घाणा बांधोनि डोळे । मागें जोडी आर तेणेंही पोळे ।
चालिलो किती तें न कळे । दु खें हारबळे[2] भुकतान ॥ ४ ॥
एवढें जयाचें निमित्त । प्रारब्ध क्रियमाण संचित ।
तें हें देह मानुनि अनित्य । न करिती नित्य नामस्मरण ॥ ५ ॥
तुका म्हणे न वेचता मोल । तो हा यासि महाग विठ्ठल ।
वेचिता फुकाचेचि बोल । केवढें खोल अभागिया ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – नुपजे–निर्माण होत नाही, सळे–वळाने, आर–टोचणी, आरबळे–दु खाने ओरडतील

अर्थ – या जीवनाविषयीच्या वृथा लोभाने हे जीव कसे भुलून गेले आहेत पाहा आता याची कोण कीव करणार ? कारण याच्या मनात नारायणाबद्दल भक्तिभाव कधीच निर्माण होत नाही चांगला नरदेह मिळालेला असतो त्याचा काय उपयोग ? १ काळाच्या मुखात सापडलो असताना या संसारात कसले सुख आहे ? या शरीरास आयुष्याचे माप लागले आहे ते बळाने एकदा कधी तरी पूर्ण भरेल व मग यमदूत येतील २ बळाने ओढायला लागतील व पुढल्या जन्माचीही अशीच अवस्था होऊन जाईल ३ एखाद्या डोळे बांधून घाण्यास जुंपलेल्या बैलाप्रमाणे याची अवस्था होईल त्याला मागेपुढे आरेची टोचणी एकसारखी असते त्यामुळे तो दु खातच नेहमी राहतो किती भ्रमण केले, हेही त्याला समजत नाही त्याच्या प्रमाणेच ही माणसे दु खाने एकसारखी ओरडत असतात तहानेने व भुकेने व्याकुळलेली असतात ४ आपल्या प्रारब्धामुळेच, क्रियमाण व संचितामुळेच, हा असा त्रास आपणास होत असतो तर मग हा देह अनित्य मानून नित्य नामस्मरण त्या एका परमेश्वराचे हे लोक का करीत नाहीत ? ५ तुकाराम महाराज म्हणतात, द्रव्य खर्च न होता या विठ्ठलाचे रूप हृदयात साठविता येत असूनही त्या विठ्ठलाचे चिंतन यांना किती दुर्लभ झाले आहे पाहा ना फुकटचे विठ्ठलाचे नामही या अभाग्यांना दुर्लभ किती झाले आहे पाहा ६

६२३ आले हो संसारा तुम्ही एक करा । मुक्तिमारग हळूचि धरा ।
काळदंड कुंभयातना थोरा । का रे अघोरा दचकसी ना ॥ १ ॥
नाहीं त्या यमासि करुणा । बाहेर काढिता कुडी प्राणा ।
ओढाळ सापडे जें धान्या । चोर यातना धरिजेता ॥ २ ॥
नाहीं दिलें पावेल कैसा । चालता पंथ तेणें वळसा ।
नसेल ठाउकें ऐकतो कैसा । नेती वद जैसा धरोनिया ॥ ३ ॥
क्षण एक नागीवा पायीं । न चलवे तया करिता काहीं ।
ओढिती कांटवणा सोईं । अग्निस्तंभीं बाही कवटाळविती ॥ ४ ॥
देखोनि अंगें कांपती । तये नदीमाजी चालविती ।
लागे ठाव न लगे बुडविती । वरि मारिती यमदंड ॥ ५ ॥

१ जुतिले, २ आरबळ

तानभूक न साहावे वेळ । तो राखिती कितीएक काळ ।
पिंड पाळूनि कैसा सीतळ । तो तप्तभूमीं ज्वाळ लोळविती ॥ ६ ॥
म्हणउनी करा कांही सायास । व्हावेल तर व्हा रे उदास ।
करवेल तर करा नामघोष । सेवा भक्तिरस तुका म्हणे ॥ ७ ॥

शब्दार्थ व टीपा :– कुंभयातना–नरकाचे दुःख, कुडी–शरीर, वळसा–संकट, बंद–चोर, पिंड–शरीर, सायास–उपाय, प्रयत्न

अर्थ – या संसारास तुम्ही लागलेले आहात, तर एक उपाय करा ना. आपल्या मुक्तीचा मार्ग हळूच साधा. नाहीतर पुढे यमाच्या दंडाची शिक्षा फार भयानक असते. दुराचारी माणसा, हे सर्व ऐकून असा दचकतोस का ? १ शरीरातून प्राण बाहेर नेताना या यमास काही सुद्धा दया येणार नाही. ओढाळ जनावरास धान्य खाताना बरे वाटते; पण पाठीवर दणका बसताच त्याची काय अवस्था होते ? चोरास पकडल्यावर मग त्याची काय गती होते ? २ *त्याचप्रमाणे तुमचीही अवस्था होईल काही दान दिल्याशिवाय हे स्थान मिळेल कसे ? या संसार पथा*-वरील संकट जर माहीत नसेल मी सांगतो ते नीट ऐका. एखाद्या चोरास धरून नेतात तसे यमदूत तुम्हांस धरून नेतील. ३ पायात काही न घालता एक क्षणभरही तुम्हास चालवत नसे. त्याना मग हे यमदूत काटेरी वाटेने फरफटत ओढीत घेऊन जातील. लोखंडाच्या खांबास तापवून, लाल करून, त्यास तुम्हाला भेटवितील. ४ ज्याकडे नुसते पाहिले तरी अंगास कापरे सुटते, अशा बेफाम नदीतून तुम्हांस चालवितील. जिचा काहीच ठाव लागला नाही तिच्यात तुम्हांला ते बुडवतील व वर काढीने मारतील हे यमदूत. ५ एखाद्या वेळेस अन्नपाणी न मिळाले तर तुमचा जीव कासावीस होतो, पण हे यमदूत तुम्हास कित्येक दिवस उपाशी ठेवतील. शरीराचे पोषण करून तो कसा सुखरूप ठेविला होता तुम्ही; पण हे यमदूत त्यास तापलेल्या अग्नीच्या ज्वालात लोळवितील. ६ म्हणून लोकहो, काही तरी उपाय करा. या संसाराविषयी उदास व्हा. तुकाराम महाराज म्हणतात, मुख्य म्हणजे या देवाच्या नामाचा घोष करा. या भक्तिरसाचे सेवन करा. ७

६२४ न बोलसी तें ही कळलें देवा । लाजसी आपुलिया नांवा ।
तुज मी नाहीं घालीत गोवा । भीड केशवा कासयाची ॥ १ ॥
उतरीं आपुला हा पार । मजशीं बोलोनि उत्तर ।
माझा तुज नव्हे अंगीकार । मग विचार करीन मी ॥ २ ॥
दात्या आणि मागत्यासी । धर्मनीति तरी बोलिली ऐसी ।
यथानशक्ति टाकेल तैसी । बाधी दोघांसी विन्मुखता ॥ ३ ॥
म्हणोनि करितों मी आस । तुझिया वचनाची वास ।
धीर हा करूनि सायास । न टळें नेमास आपुलिया ॥ ४ ॥
तुझें म्यां घेतल्या वांचून । न वजें एथूनि वचन ।
हाचि माझा नेम सत्य जाण । आहे नाही म्हण तुका म्हणे ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– गोवा–भीड, संकट, वास–वाट.

अर्थ :– देवा, तू माझ्याशी का बोलत नाहीस, हे मला आता समजले आहे. तुझे नाव पतितपावन, जगन्नाथ असे असून तू मला पावन करीत नाहीस याची लाज तुझ्या मनात असल्याने तू गप्प राहिला आहेस आणि मीही काही तुला संकटात टाकीत नाही. कशाचीही भीड घालीत नाही. १ तुझ्या मनावर याचा भार असेल तो उतरवून

टाक. माझ्याशी एक दोन शब्दांनी बोल ना. माझा स्वीकार तुजकडून होत नाही, असे दिसताच मी त्याचाही विचार करीन. २ कुणी याचक यजमानाजवळ काही मागावयास गेला तर यजमानाने दान देऊन त्याचा मान राखला पाहिजे व याचकानेही जे मिळेल ते घेतले पाहिजे. दोघांनीही एकमेकांचा मान राखला पाहिजे. अशी ही धर्मनीती आहे. जर दान मिळाले नाही तर दोघांनाही दोष प्राप्त होतो. ३ म्हणून तर देवा, मी तुझी इच्छा करून आहे. तुझ्या वचनाची वाट पाहात आहे. मोठ्या सायासाने मी तुझ्याबद्दल धीर धरून उभा आहे. वाट पाहण्याच्या नेमास मी काही कधी चुकणार नाही. ४ तुझे वचन घेतल्याशिवाय मी येथून हलणारच नाही. हाच माझा खराखुरा नेम आहे असे तू जाण. ५

६२५ आतां मी न पडें सायासीं । संसारदुःखाचिये पाशीं ।
शरण रिघेन संतांसी । ठाव पायांपाशीं मागेन त्यां ॥ १ ॥
न कळे संचित होतें काय । कोण्या पुण्यें तुझे लाधले पाय ।
आतां मज न विसंबे माय । मोकलूनि धाय विनवीतसें ॥ २ ॥
बहुत जाचलों संसारें । मोहमायाजाळाच्या विखारें ।
त्रिगुण येतील लहरें । तेणें दुःखें थोरे आकंदलों ॥ ३ ॥
आणीक दुःखें सांगों मी किती । सकळ संसारस्थिती ।
न साहे पाषाण फुटती । भय चित्तीं कांप भरलासे ॥ ४ ॥
आतां मज न साहवे सर्वथा । संसारगंधीची हे वार्ता ।
जालों वेडा असोनि जाणता । पावें अनंता तुका म्हणे ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :–सायासीं–खटपटीत, लाधती–मिळतात.

अर्थ :– देवा, आता मी इतर कुठल्या साधनमार्गांच्या खटपटीत पडणार नाही संसारदुःखांच्या पाशालही अडकणार नाही. मी आता संतांना शरण जाऊन तुझ्या पायाशी स्थान मिळवीन. ते त्यांना मागेन. १ माझे काय संचित कर्म होते, हे काही कळत नाही. कोणत्या पुण्याईने तुझे पाय लाभतील ? आई, आता तू मला विसरू नकोस म. मी तुला अतिशय शोकाकुल होऊन विनवीत आहे. २ या संसारात मला फारच त्रास झाला. मोहमाया यांच्या ज्वालानी व विषारी गंधाने माझी फार विटंबना केली. सत्त्व, रज, तम या गुणाच्या तीव्र लहरी मनात निर्माण होऊन मी दुःखाने फारच गांजून गेलो आहे देवा. ३ आणखी मी माझे किती दुःख सांगावे तुला? या संसारदुःखांची मर्मकहाणी ऐकताना पाषाणसुद्धा दुभंगतील. माझ्या तर चित्तात भयाने कापरेच भरलेले आहे ४ आता हे दुःख मला मुळीच सहन होत नाही. या संसाराची दुर्गंधी आता मला व्यथित करीत आहे. या दुःखभाराने मी चांगला जाणता असून वेडाच बनून गेलो आहे. तुकाराम महाराज म्हणतात, देवा तू मला पाव व माझे रक्षण कर. ५

६२६ आतां तुज कळेल तें करीं । तारिसी तरि तारीं मारीं ।
जवळीं अथवा दुरी धरीं । घाली संसारीं अथवा नको ॥ १ ॥
शरण आलों नेणतपणें । भाव आणि भक्ति कांहीच नेणें ।
मतिमंद सर्वज्ञानें । बहु रंक उणें रंकाहुनी ॥ २ ॥
मन स्थिर नाहीं माझिये हातीं । इंद्रियें धावतां नावरती ।
सकळ खुंटलिया युक्ती । शांति निवृत्ति जवळी नाहीं ॥ ३ ॥
सकळ निवेदिला भाव । तुझिये पायीं ठेविला जीव ।
आतां करीं फळे तो उपाव । तूंचि सर्व ठाव माझा देवा ॥ ४ ॥

राहिलो धरुनि विश्वास । आधार नेटीं तुझी कास ।
आणीक नेणें मी सायास । तुका म्हणे यास तुझें उचित ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – रक–गरीब, उपाव–उपाय, ठाव–आश्रय, नेटीं–नेटाने, दृढ

अर्थ – देवा, आता तुला जे कळेल ते, जे बरे दिसेल ते तू कर तारणार असशील तर तार, मारणार असशील तर मारही जवळ धर पाहिजे असल्यास, अथवा दूरही कर मला या संसारात घाल अथवा घालू नकोस १ मी नेणतेपणाने तुला शरण आलो आहे मला भाव व भक्ती यांच्याविषयी काहीच समजत नाही मी सर्व ज्ञानाच्या बाबतीत मंद बुद्धीचा असून मी गरिबाहून गरीब आहे २ माझे मन माझ्या हातात स्थिर नाही माझी इंद्रिये बाह्य विषयाकडे धावतात, कितीही त्याना आवरले तरी ती आवरली जात नाहीत माझी सर्व युक्ती संपून गेली आहे शांततेची व निवृत्तीची वृत्ती माझ्याजवळ उरलेली नाही ३ देवा, मी माझ्या मनातील हा सर्व भाव तुला सांगितला आहे तुझ्या पायावर मी हा जीव ठेविला आहे असे समज आता तुला जो कळेल तो उपाय तू कर तूच माझे सर्व आश्रयस्थान आहेस ४ मी तुझाच विश्वास धरून राहिलो आहे मोठ्या दृढ वृत्तीने मी तुझीच कास धरून उभा आहे, आधार घेतला आहे तुकाराम महाराज म्हणतात, देवा, मी आता आणखी काही प्रयत्न करण्याचे जाणीत नाही तुला काय योग्य वाटेल ते तू माझे करावेस ५

६२७ देवा तू कृपाकरुणासिंधु । होसी मायबाप आमचा बंधु ।
जीवनसिद्धि साधनसिंधु । तोडिसी भवबंधु काळपाश ॥ १ ॥
शरणागता वज्रपंजर । अभयदाता तू उदार ।
सकळा देवा तू अगोचर । होसी अविकार अविनाश ॥ २ ॥
भागली स्तुति करिता फार । तेथें मी काय तें गव्हार ।
जाणावया तुझा हा विचार । नको अंतर देऊ आता ॥ ३ ॥
नेणें भाव परि म्हणवीं तुझा । नेणें भक्ति परि करितो पूजा ।
आपुल्या नामाचिया काजा । तुज केशीराजा लागे धावणें ॥ ४ ॥
तुझिया बळें पंढरीनाथा । जालो निर्भर तुटली व्यथा ।
घातला भार तुझिया माथा । न भीं सर्वथा तुका म्हणे ॥ ५ ॥

*शब्दार्थ व टीपा – कृपाकरुणासिंधु–कृपेचा, करुणेचा सागर, वज्रपंजर–वज्राचा पिंजरा, अगोचर–* इंद्रियांना न समजणारा, गव्हार–मूर्ख, निर्भर–भाररहित

अर्थ – देवा, तू कृपेचा, करुणेचा सागरच आहेस तूच आमचा मायबाप झाला आहेस आमचा बंधूही तूच आहेस आमच्या जीवनाची सिद्धी व साधनाचा सिंधू तूच एक आहेस हा संसारपाश तू तोडून टाक माझा १ शरणागतांना अभय देण्यासाठी तू म्हणजे वज्राचा एक पिंजराच आहेस तू उदार असून अभय देणारा आहेस सर्व देवाना तू न समजून यणारा आहेस तू विकाररहित व अविनाशी आहेस २ सर्व देव तुझी स्तुती करता करता थकून गेले तेथ मी मूर्ख किती टिकणार ? पण मला तुझ्या स्वरूपाचा विचार समजावून घ्यायचा आहे तू आता मला अंतर देऊ नकोस ३ तुझ्याविषयी मनात भाव नसला तरी मी तुझा दास म्हणवितो, तुझी भक्ती कशी करावी हे मी जाणीत नसलो तरी हे देवा मी तुझीच पूजा करतो तेव्हा केशवा, तुझ्या पतितपावन नामासाठी तरी तुला माझ्या रक्षणासाठी धावून यावे लागेल ४ पंढरीनाथा, तुझ्या बळामुळे मी भाररहित झालो असून माझ्या मनातील सर्व दु खे संपली आहेत मी आता माझा सर्व भार तुझ्याच माथ्यावर ठेविला आहे तुकाराम महाराज म्हणतात, मी आता कुणालाही व्यर्थ भिणार नाही ५

६२८ कोण सुख धरोनि संसारीं । राहों सांग मज वा हरी ।
अवघ्या नाशिवंता परी । थिता दुरी अंतरसी ॥ १ ॥
प्रथम केला गर्भी वास । काय ते सांगावे सायास ।
दुःख भोगिले नव ही मास । आलों जन्मास येथवरी ॥ २ ॥
बाळपण गेलें नेणतां । तारुण्यदशे विषयव्यथा ।
वृद्धपणी प्रवर्तली चिंता । मरें मागुता जन्म धरीं ॥ ३ ॥
क्षण एक तो ही नाहीं विसावा । लक्ष चौऱ्याशीं घेतल्या धांवा ।
जोवेंडिती पाठीं लागल्या हांवा । लागो आगी नांवा माझ्या मीपणा ॥ ४ ॥
आतां पुरे ऐसी भरोवरी । रंक होऊनि राहेन द्वारीं ।
तुझा दास मी दीन कामारी । तुका म्हणे करीं कृपा आतां ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– थिता–जवळ स्थिर असलेला, भरोवरी–श्रम

अर्थ :– श्रीहरी, या संसारामध्ये मी कोणते सुख मानून राहू रे ? तू सांग एकदा ना. येथील सर्व सुखे नाशवंत आहेत. तू एक जवळ स्थिरपणे उभा होतास तोही दूर होतोस अंतरतोस. १ प्रथम मी आईच्या गर्भात निवास केला. तेथील कष्ट काय सांगावेत ? नऊ महिने परिपूर्ण असे मी दुःख भोगले आणि मग कसा तरी या जन्मास आलो. २ सर्व बालपण काही न कळताच गेले. तरुणपणी विषयचिंतनाच आयुष्य गेले. म्हातारपणी आता कसे होणार या चिंतेने मी ग्रासून गेलो. बरे मरून मोकळे व्हावे तर पुनः जन्म आहेच. ३ या संसारात एका क्षणाचाही विसावा नाही. चौऱ्याशी लक्ष जन्माच्या खेपा केल्या तरी, जी हाव पाठीशी लागली आहे ती काही केल्या संपत नाही. माझ्या या देहपणाच्या जाणिवेस आग लागो व ती नष्ट होवो. ४ पण देवा, आता हे श्रम पुरेत. दरिद्री होऊन मी तुझ्या दारात उभा राहीन. वाटेल ती कामे करणारा मी तुझा दास होईन. तुकाराम महाराज म्हणतात, देवा, आता मजवर कृपा करा ना एकदा. ५

६२९ सुख या संतसमागमें । नित्य दुणावे तुझिया नामें ।
दहन होती सकळ कर्मे । सर्वकाळ प्रेमें डुलतसों ॥ १ ॥
म्हणोनि नाहीं कांहीं चिंता । तूंचि आमुचा मातापिता ।
बहिणी बंधु आणि चुलता । आणिकां गोतां सर्वांठायीं ॥ २ ॥
ऐसा हा कळला निर्धार । माझा तुज न पडे विसर ।
अससी देऊनियां धीर । बाह्य अभ्यंतर मजजवळा ॥ ३ ॥
दुःख तें कैसें नये स्वप्नासी । भुक्तिमुक्ति जाल्या कामारी दासी ।
त्याचें वर्म तूं आम्हापाशीं । सुखें राहिलासी प्रेमाचिया ॥ ४ ॥
जेथें तुझ्या कीर्तनाचा घोष । जळती पापें पळती दोष ।
काय तें उणें आम्हां आनंदास । सेवूं ब्रह्मरस तुका म्हणे ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– संतसमागमें–संतांच्या सहवासाने, दहन–नष्ट, कामारी–काम करणाऱ्या.

अर्थ :– देवा, या संतांच्या सहवासात काय सुख आहे म्हणून सांगू ? तुझ्या नामाने तर ते नित्य दुपटीने वाढीस लागते. सर्व कर्मे त्यामुळे नष्ट होऊन जातात. जळून जातात. त्यामुळे मी मोठ्या प्रेमात व तुझ्या नामस्मरणात डुलत असतो. १ म्हणून देवा, आता मला कसलीही चिंता उरलेली नाही तूच आता आमची माता, आमचा पिता, बंधू, चुलता, आमची बहीण सर्व काही तूच आहेस देवा. सर्व नातेवाईकही तूच आहेस. २ आता

हा विचार निर्धाराने मला समजला आहे. देवा, तुला माझा विसर कधीच पडणार नाही, हेही मला पक्के माहीत आहे. तू मला धीर देऊन सदैव जवळच असतोस. अंतर्बाह्य स्वरूपात तूच माझ्याजवळ असतोस. ३ दुःख कसे असते ते स्वप्नातही मला दिसत नाही. मुक्ती व भोगवृत्ती या काम करणाऱ्या दासी होऊन राहिल्या आहेत. त्या सर्वांचे रहस्य तुझ्यात असून तू तर प्रेमाच्या सुखासाठी आमच्याजवळ राहिला आहेस. ४ ज्या ठिकाणी तुझ्या कीर्तनाचा नित्य घोष असतो, तेथे सर्व पापे जळून नष्ट होतात. मग आमच्या आनंदास कमतरता कसली ? तुकाराम महाराज म्हणतात, आम्ही मोठ्या प्रीतीने या ब्रह्मरसाचे, ईश्वराच्या ऐक्याचे सेवन करू. ५

६३० देवा तूं आमचा कृपाळ । भक्तिप्रतिपाळ दीनवत्सळ ।
माय तूं माउली स्नेहाळ । भार सकळ चालविसी ॥ १ ॥
तुज लागली सकळ चिंता । राखणें लागे वांकडें जातां ।
पुढती निरविसी संतां । नव्हे विसंबतां धीर तुज ॥ २ ॥
आम्हां भय चिंता नाहीं धाक । जन्म मरण कांही एक ।
जाला इहलोकीं परलोक । आलें सकळैकवैकुंठ ॥ ३ ॥
न कळे दिवस कीं राती । अखंड लागलीसे ज्योती ।
आनंदलहरीची गती । वर्णूं कीती तया सुखा ॥ ४ ॥
तुझियां नामाचीं भूषणें । तीं ये मज लेवविलीं लेणें ।
तुका म्हणे तुझियान गुणें । काय तें उणें एक आम्हां ॥ ५ ॥

*शब्दार्थ व टीपा :– कृपाळ–कृपाळू, प्रतिपाळ–सांभाळ.*

*अर्थ :–* देवा, तू आमच्याविषयी फार कृपाळू आहेस रे भक्ताचा सांभाळ करणारा तू दीनवत्सल आहेस तू मोठी स्नेहाळ अशी माउली आहेस. आमचा सर्व भार तू घेतला आहेस १ आमची सर्व चिंता देवा, तुलाच लागली आहे. आमचे पाऊल वाकडे पडले तर तूच आमचे त्यावेळी रक्षण करितोस. मग पुढे तू आम्हास संतांच्या स्वाधीन करतोस आम्हाला दूर लोटण्यास तुला धीर कसा होणार ? २ त्यामुळे आता आम्हाला भय नाही की कसली चिंता नाही कसलाही धाक नाही जन्ममरणाविषयी काळजी नाही इहलोक व परलोकही आम्हास एकसारखाच झाला. सर्व ठिकाणे आम्हास वैकुंठाप्रमाणेच झाली. ३ दिवस आहे की रात्र आहे, हेही आम्हास समजेनासे झाले आहे. तुझ्या नामस्वरूपाची अखंड ज्योत अंतःकरणात लागली आहे या आनंदलहरींचे वर्णन देवा, मी करू तरी किती ? या सुखाचे वर्णन किती करावे ? ४ देवा, तुझ्या नामाच्या भूषणाचे अलंकार तू मला घातले आहेस. तुकाराम महाराज म्हणतात, तुझ्यामुळे आम्हास काहीही कमी पडणार नाही. ५

६३१ न पवे सन्निध वाटते चिंता । वरि या बहुतांची सत्ता ।
नुगवे पडत जातो गुंता । कर्मा बळिवंता सांपडलो ॥ १ ॥
बहु भार पडियेला शिरीं । मी हें माझें मजवरी ।
उघड्या नागविलो चोरीं । घरिच्याघरीं जाणजाणतां ॥ २ ॥
तुज मागणें इतुलें आतां । मज या निरवावें संतां ।
जाला कंठस्फोट आळवितां । उदास आतां न करावें ॥ ३ ॥
अति हा निकट समय । मग म्यां करावें तें काय ।
दिवस गेलिया ठाकईल छाय । उरईल हाय रातिकाळीं ॥ ४ ॥

होईल संचिताची सत्ता । अंगा येईल पराधीनता ।
ठाव तो न दिसे लपतां । बहुत चिंता प्रवर्तली ॥ ५ ॥
ऐसी या संकटाची संधी । धांव घालावी कृपानिधी ।
तुका म्हणे माझी बळबुद्धी । सकळ सिद्धी पाय तुझे ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा :- पवे–पावत नाही, टाकईल–येईल, छाय–अंधार, संधी–काळी.

अर्थ :- देवा, तुझी जवळीक प्राप्त होत नाही म्हणून मला फारच चिंता वाटत आहे रे. या माझ्या देहावर व प्रपंचाच्या वृत्तींवर पुष्कळांची सत्ता आहे. या बंधनांतून सुटका करवून घेण्याचा मी फार प्रयत्न करतो, पण मी त्यांत जास्त जास्तच गुंतत जातो. बलाढ्य अशा कर्मसत्तेच्या तावडीत मी सापडतो. १ माझ्या मस्तकावर पुष्कळच ओझे आहे. मी हा, हा देह माझा या भावनेमुळे या चोरामुळे मी नागवून उघडा झालो आहे. घरच्या घरीच जाणूनही माझी अशी अवस्था झाली आहे. २ देवा, तुला मागणे फक्त आता इतकेच आहे. मला तू या संतांच्या स्वाधीन करावेस. तुला विनविता विनविता माझा घसा फुटण्याची वेळ आली. मला आता निराश करू नकोस. ३ आता ही वेळही फार बिकट व कठिण आहे. यावेळी मी आता काय बरे करावे? आयुष्याचे दिवस संपतील व संध्याकाळचा अंधार दाटून येईल आणि मग भयाण अंधाराचेच राज्य सुरू होईल. ४ मग संचित कर्माचीच सत्ता सुरू होईल. मग मी पराधीन होऊन बसेन. कुठे लपून बसावे तरी मला जागा सापडणार नाही. फारच चिंता त्यावेळी निर्माण होईल. ५ अशा या संकटाच्या वेळी हे कृपेच्या सागरा, तू धावून ये. तुकाराम महाराज म्हणतात, माझे सर्व बळ, सर्व बुद्धी, सर्व सिद्धी यांना मी तुझ्याच पायांवर समर्पित केले आहे. ६

६३२ आतां धर्माधर्मीं कांहीं उचित । माझें विचारावें हित ।
तुज मी ठाउका पतित । शरणागत परि जालों ॥ १ ॥
येथें राया रंका एकी सरी । नाहीं भिन्नाभिन्न तुमच्या घरीं ।
पावलों पाय मलत्या परी । मग बाहेरी न घालावें ॥ २ ॥
ऐसें हें चालत आलें मार्गें । नाहीं मी बोलत वाउगें ।
आपुलिया पडिल्या प्रसंगें । कीर्ति हे जगें वाणिजेते ॥ ३ ॥
घालोनियां माथां वैसलों भार । सांडिला लौकिक वेव्हार ।
आधीं हे विचारिली थार । अविनाश पर पद ऐसें ॥ ४ ॥
येथें एक वर्म पाहिजे धीर । परि म्यां लेखिलें असार ।
देह हें नाशिवंत जाणार । धरिलें सार नाम तुझें ॥ ५ ॥
केली आराणुक सकळां हातीं । धरावें धरिलें तें चित्तीं ।
तुका म्हणे सांगितलें संतीं । देईं अंतीं ठाव मज देवा ॥ ६ ॥

राहिलो आहे. सर्व लौकिक व्यवहारही सोडून दिला आहे. आपल्या अविनाशी स्वरूपाचा विचार आधी करूनच मी तुमचा आश्रय घेतला आहे. ४ या ठिकाणी धर्म हे एकच धर्म जाणावयाचा हवे. या धर्माच्या बळावर मी हा माझा देह नाशवंत व न टिकणारा आहे असाच मानला. तुझे नाम हेच एक जीविताचे सार मी मानले. ५ सर्व लौकिक वृत्तींच्याकडून सुटका करून घेऊन मी विश्रांतीस पावलो आहे. चित्तात जे धरावयास हवे ते धरले आहे. तुकाराम महाराज म्हणतात, जे संतांनी सांगितले तेंच मी केले. आता मला अखेरीस देवा, तू आश्रय द्यावास. ६

६३३ बरवें झालें आलों जन्मासी । जोड जोडिली मनुष्य देहा ऐसी ।
महा लाभाची उत्तम रासी । जेणें सुखासी पात्र होइजे ॥ १ ॥
दिलीं इंद्रियें हात पाय कान । डोळे मुख बोलावया वचन ।
जेणें तूं जोडसी नारायण । नासे जीवपण भवरोग ॥ २ ॥
तिळेंतीळ पुण्य सांचा पडे । तरि हें बहुतां जन्मीं जोडे ।
नाम तुझें वाचेसी आतुडे । समागम घडे संतांचा ॥ ३ ॥
ऐसिये पावविलों ठायीं । आतां मी काई होऊं उतराई ।
येवढा जीव ठेवीन पायीं । तूं माझे आई पांडुरंगे ॥ ४ ॥
फेडियेला डोळियांचा कवळ । धुतला गुणदोषांचा मळ ।
लावूनि स्तनीं केलों सीतळ । निजविलों बाळ निजस्थानीं ॥ ५ ॥
नाहीं या आनंदासी जोडा । सांगतां गोष्टी लागती गोडा ।
आला आकारा आमुच्या चाडा । तुका म्हणे भिडा भक्तीचिया ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा :– आतुडे–प्राप्त होते, येते, कवळ–दोष, चाडा–लोभासाठी

अर्थ :– बरे झाले; मी या नरजन्मास आलो. हा एक फार मोठा लाभच मला झालेला आहे. यायोगे ईश्वरसान्निध्याच्या सर्व सुखांचा लाभ मला घेता येईल. १ ईश्वराने मला हात, पाय, कान, डोळे, मुख इत्यादी इंद्रिये दिली आहेत यांच्या उपयोगाने नारायणा, मला तुझी प्राप्ती होईल व मला जीवपणाचा व भवरोगाचा जो रोग लागला आहे तो नाहीसा होईल. २ यामुळे तिळतिळ असा पुण्याचा साठा हातून होईल व बहुत जन्मांच्या संगतीने तुझ्या नामाची जोड माझ्या वाचेस प्राप्त होईल. ३ अशा या महत्त्वाच्या ठिकाणी देवा, तुम्ही मला आणले आहे. आता याचा उतराई मी होऊ तरी कसा ? पण पांडुरंगा, तू माझी माउली असल्याने मी माझा एवढा जीव जरी तुझ्या पायी अर्पण केला तरी तो थोडाच होईल. ४ देवा, तू माझ्या डोळ्यांचा दोष नाहीसा केलास, अंतःकरणातील गुण–दोषांचा मळ तू धुऊन काढलास आणि तू प्रेमाने मला स्तनपान देऊन तृप्त केलेस, व या बालकाला आपल्या हृदयाशी झोपविलेस. ५ या अलौकिक आनंदास दुसरी जोडच नाही. याची नुसती हकीगत सांगताना सुद्धा गोड लागते. तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तुम्ही आमच्या लोभासाठी व आमच्या भक्तीच्या कौतुकासाठी तू या सगुण आकारास आला आहेस. ६

६३४ अल्प भाव अल्प मती । अल्प आयुष्य नाहीं हातीं ।
अपराधाची वोळिलों मूर्ती । अहो वेदमूर्ती परियेसा ॥ १ ॥
किती दोषा देऊं परिहार । गुणदोषें मळिलें अंतर ।
आदि वर्तमान भविष्याकार । गेला अंतपार ऐसें नाहीं ॥ २ ॥
विविध कर्म चौऱ्यांशी फेरा । त्रिविध भोग या शरीरा ।
कर्मकोठार पांजरा । जन्मजरामरणसांटवण ॥ ३ ॥

जीवा नाहीं कुडीचें लाहातें । ये भिन्न पंच भूतें ।
रचलें खचतें संचितें । असार रितें फलकट ॥ ४ ॥
पुत्र पत्नी सहोदर । मायबाप गोताचा पसर ।
मिळतां काष्ठें लोटतां पूर । आदळीं दूर होती खळाळीं ॥ ५ ॥
म्हणोनि [1]नासावें अज्ञान । इतुलें करीं कृपादान ।
कृपाळु तूं जनार्दन । धरूनि चरण तुका विनवी ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा :- वोळिलों–बनलो, अंतर–अंतःकरण, लाहातें–संबंध, पसर–पसारा, खळाळीं–लाटा

अर्थ :- अहो वेदमूर्ती देवा, माझी बुद्धी फार अल्प असून तुमच्या विषयी भावही थोडा आहे. माझे आयुष्य थोडे असून जे आहे तेही माझ्या स्वाधीन नाही. मी तर अनंत अपराधाची मूर्तीच बनलो आहे. तरी माझी एक विनती तुम्ही ऐका ना. १ माझ्या दोषांचा परिहार किती करू ? किती दोष घालवायचे म्हटले तरी ते जात नाहीत, इतके माझे अंतःकरण दोषांनी मलीन झाले आहे. प्रारंभीचे, वर्तमानकाळचे, पुढील काळचे कर्म किती आहे याचा नीट सुगावा काही लागत नाही. २ हे कर्म विविध प्रकारचे असून त्याच्यामुळे चौऱ्याशी लक्ष योनींच्या फेऱ्यात सापडावे लागते. या शरीरालाही आध्यात्मिक, आधिदैविक व आधिभौतिक अशा स्वरूपाचे तीन भोगही वारंवार भोगावे लागतात. हे शरीर म्हणजे नानाविध कर्मांचे भांडारच आहे असे वाटते व त्यातच जन्म, म्हातारपण व मरण यांची साठवण आहे. ३ तसे पाहिले तर जीव व शरीर यांचा काही संबंध नाही. भिन्न भिन्न पंचमहाभूतांचा हा देह बनलेला आहे. तो कर्माप्रमाणे, संचिताप्रमाणे कधी रचला जातो, कधी खचला जातो. याप्रमाणे हा देह असार असून फोलकटाप्रमाणे व्यर्थ आहे. ४ पुत्र, पत्नी, बंधू, मायबाप, इतर नातेवाईक यांच्या नात्याचा पसारा कसा आहे ? तर एखाद्या मोठ्या नदीस महापूर यावा, त्यात काही लाकडे योगायोगाने जवळ यावीत व मग लाटांची खळबळ झाली की ती दूर वाहून जावीत, तसा हा नात्यातील माणसांचा परस्परांशी क्षणिक संबंध आहे. ५ म्हणून यासाठी अज्ञान नाहीसे करावे. इतकी तरी देवा, तू माझ्यावर कृपा करावीस. तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तू कृपाळू आहेस ना ? जनार्दना, मी तुझे चरण धरून तुला अशी विनंती करीत आहे. ६

६३५ ऐसी हे गर्जवूं वैखरी । केशव मुकुंद मुरारी ।
राम कृष्ण नामें बरीं । हरी हरी दोष सकळ ॥ १ ॥
जनार्दना जगजीवना । विराटस्वरूपा वामना ।
महदादि मधुसूदना । भवबंधना तोडितिया ॥ २ ॥
चक्रपाणी गदाधरा । असुरमर्दना वीर्यवीरा ।
सकळमुगुटमणि शूरा । अहो दातारा जगदानिया ॥ ३ ॥
मदनमूर्ती मनमोहना । गोपाळगोपिकारमणा ।
नटनाट्यकौशल्य कान्हा । अहो संपन्ना सर्वगुणें ॥ ४ ॥
गुणवंता आणि निर्गुणा । सर्वसाक्षी आणि सर्वजाणा ।
करोनि अकर्ता आपणा । नेदी अभिमाना आतळों ॥ ५ ॥
फासयानें घडे याची सेवा । काय एक समर्पियें या देवा ।
वश्य तो नव्हे वांचुनि भावा । पाय जीवावेगळे न करी तुका ॥ ६ ॥

---

१ नसावें.

शब्दार्थ व टीपा :– वैखरी–वाणी, महदादि–महत् तत्त्वाचा आरंभ ज्याच्यापासून आहे असा, जगदानिया–सर्व जगाला दान देणारा, आतळों–स्पर्श होणे.

अर्थ :– देवा, केशव, मुकुंद, मुरारी, राम, कृष्ण या चांगल्या नावानी सर्व दोषांचे हरण होत असल्याने माझ्या वाणीने नेहमी त्याचाच उच्चार करावा. १ जनार्दना, सर्व जगाचे जीवन असणाऱ्या, तू विराट स्वरूपाचा असून बटू वामन मूर्तीचाही तू होतोस. मधुसूदना, महदादी तत्त्व तुझ्यापासूनच निर्माण होते तू माझी सर्व भवबंधने तोडून टाक. २ हे चक्रपाणी, गदाधरा, असुरांचा नाश करणाऱ्या देवा, शूरामधील शूर देवा, तू अतिशय शौर्यवान आहेस. सर्व जगास दान देणारा तू दाता आहेस ३ देवा, तुझी मूर्ती मदनासारखी सुंदर आहे. सर्व गोपाळ व गोपिका यांचे मन हरण करणारा तू आहेस नटनाट्यात व नृत्यात तू कान्हा कुशल आहेस तू सर्वगुणसंपन्न असा आहेस. ४ तू जसा गुणवत आहेस तसा निर्गुणही आहेस. जसा सर्व काही पाहणारा आहेस, तसेच सर्व जाणणाराही तूच आहेस सर्व काही करून तू अकर्ता असतोस तू कुणाला अभिमानाचा स्पर्श करू देत नाहीस. ५ या देवाची सेवा मला कोणत्या प्रकाराने घडणार आहे ? या देवाला मी समर्पण तरी काय करू ? हा देव भक्तिभावावाचून मात्र वश होणारा नाही. या देवाच्या पायांमधून हा तुकाराम आपला जीव काही वेगळा करणार नाही. ६

६३६ होतों तें चिंतीत मानसीं । नवस फळले नवसी ।
जोडिले नारायणा ऐसी । अविट ज्यासी नाश नाहीं ॥ १ ॥
धरिले जीवीं न सोडीं पाय । आलें या जीवित्वाचें काय ।
कै हे पाविजेती ठाय । लाविली सोय संचितानें ॥ २ ॥
मज तों पडियेली होती भुली । चित्ताची अपसव्य चाली ।
होती मृगजळें गोवी केली । दृष्टि उघडली बरें जालें ॥ ३ ॥
आता हा सिद्धि पावो भाव । मध्यें चांचल्यें न व्हावा जीव ।
ऐसी तुम्हां भाकीतसे कीव । कृपाळुवा जगदानिया ॥ ४ ॥
कळों येते आपुले बुद्धी । ऐसें तों न घडतें कधीं ।
केवढे[१] आघात ते मधीं । लज्जा रिद्धी उभी आड ठाके ॥ ५ ॥
कृपा या केली संतजनीं । माझी अळंकारिली वाणी ।
प्रीति हे लाविली कीर्तनीं । तुका चरणीं लोळतसे ॥ ६ ॥

नामाने अलंकृत केली, कीर्तनाच्या प्रसंगी मला चांगली प्रीती जडवून दिली. त्या संताच्या चरणावर हा तुकाराम लोळण घेत आहे. ६

६३७ तुझिया पार नाहीं गुणां । माझी अल्प मति नारायणा ।
भवतारका जी सुजाणा । एक विज्ञापना पायांपाशीं ॥ १ ॥
काय जाणावें त्यां दीनें । तुझिये भक्तीचीं लक्षणें ।
धड तें तोंड धोऊं[1] नेणें । परि चिंतनें काळ सारीं ॥ २ ॥
न लवीं आणीक कांहीं पिसें । माझिया मना वांयां जाय ऐसें ।
चालवीं आपुल्या प्रकाशें । हातीं सरिसे धरोनियां ॥ ३ ॥
तुज समर्पिली काया । जीवें भावें पंढरीराया ।
सांभाळीं रामविषम डाया । करीं छाया कृपेची ॥ ४ ॥
चतुर तरीं चतुरां राव । जाणता तरीं जीवांचा जीव ।
न्यून तो कोण एक ठाव । आरुष भाव परि माझा । ५ ॥
होतें तें माझें भांडवल । पायापें निवेदिले बोल ।
आदरा ऐसें पाविजे मोल । तुका म्हणे साच फोल तूं जाणसी ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा :– पार–अंत, विज्ञापना–विनंती, डाया–प्रसंग, आरुष–बोबडे, वेडेवाकडे, साच–खरे, फोल–खोटे

अर्थ – नारायणा, तुमच्या गुणाना अंत नाही माझी बुद्धी अतिशय अल्प असल्यामुळे मी त्याचे वर्णनही करू शकत नाही तुम्ही संसारसागर तारून नेणारे असून सुजाण आहात. तुमच्या पायाशी माझी एक विनंति आहे. १ देवा, तुमच्या भक्तीची लक्षणे माझ्यासारख्या दीनाने काय जाणावीत? मला खरे म्हणजे माझे तोंडसुद्धा धुता येत नाही, इतका मी अज्ञानी आहे पण देवा, तुमच्या चिंतनात कसा तरी वेळ काढीत आहे. २ देवा, जे परिश्रम वाया जातील व जे व्यर्थ होईल असे दुसरे कसलेही वेड मला लावू नका मला नीट हाताशी धरा व आपल्या कृपेच्या प्रकाशात मला चालवा ३ पंढरीराया, मी ही माझी काया तुलाच जीवेभावे समर्पण केली आहे जे काही चांगले वाईट प्रसंग येतील त्यातून देवा, तू माझा सांभाळ कर. तुमच्या कृपेच्या छायेत मला पूर्ण विश्रांती मिळावी ४ देवा, तू इतका चतुर आहेस की सर्व चतुराचा राजा तू आणि ज्ञानी तर इतका आहेस की सर्व ज्ञानी जीवाचा जीवच तू आहेस कुठली म्हणून तुझ्यात कमतरता नाही पण देवा, माझा हा वेडावाकडा भाव तू पाहा. ५ देवा, माझ्यापाशी भक्तिभावाचे जे काही भांडवल होते, ते सर्व मी आपल्या पायाशी अर्पण केले आहे सर्व हकीगत आपल्या चरणाशी निवेदन केली आहे माझा जो जसा आदर असेल तसे मोल मला मिळेल तुकाराम महाराज म्हणतात, यातील खरे खोटे तू जाणशीलच ६

६३८ का हो माझा मानियेला भार । ऐसा दिसतसे फार ।
अनंत पावविलीं उद्धार । नव्हेचि थार मज शेवटीं ॥ १ ॥
पाप बळिवंत गाढें । तुज ही राहो सकते पुढें ।
मागील कांहीं राहिलें ओढें । नवल कोडें[2] देखियेलें ॥ २ ॥
काय मानिती संतजन । तुमचें हीनत्ववचन ।
कीं वृध्द जाला नारायण । न चले पण आधील तो ॥ ३ ॥

---

१ धुऊं, २ कैवडें

आतां न करावी चोरी । बहुत न धरावें दुरी ।
पडदा काय घरच्याघरीं । धरिलें दुरी तेव्हां धरिलें ॥ ४ ॥
नको चाळवूं अनंता । कासया होतोसि नेणता ।
काय तूं नाहीं धरीत सत्ता । तुका म्हणे आतां होईं प्रगट ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :- भार–ओझें, धार–आश्रय.

अर्थ :- देवा, तुम्ही माझे फार मोठे ओझे मागले असे मला फार दिसते. पण तुम्ही आजपर्यंत अनेक लोकांचा उद्धार केलात. असे असूनही मला तुमच्यापाशी काही आश्रय मिळणार नाही हे कसे? १ माझे पापच एवढे बलवान दिसते की, ते तुझ्यासारख्यापुढेही टिकू शकते! तुझ्यासमोरही माझ्या मागील जन्मांची कर्मकटकट शिल्लक राहिली, असे मोठे नवलच मी आज पाहिले! २ देवा, हा नारायण आता वृद्ध झाला असून पूर्वीचे त्याचे सामर्थ्य काही आता उरलेले दिसत नाही, असे तुमच्या कमीपणाचे वर्णन मी केले तर ते संत लोकांना कधी मान्य होईल काय? ३ देवा, आता असे चोरटेपणाचे वर्तन करून मला दूर करू नकोस. स्वतःच्याच घरी असा पडदा धारण करणे काय बरोबर आहे काय? आतापर्यंत तुम्ही मला दूर धरलेत ते धरले. ४ अनंता, आता मला विनाकारण नका फसवू. जाणूनबुजून तू नेणता का होतोस? तुकाराम महाराज म्हणतात, माझे रक्षण करण्याची सत्ता काय तुझ्याजवळ नाही? देवा, तू आता माझ्यासाठी प्रकट हो ना. ५

६३९ मज ते हांसतील संत । जींहीं देखिलेती मूर्तिमंत ।
म्हणोनि उद्वेगलें चित्त । आहाच भक्त ऐसा दिसें ॥ १ ॥
ध्यानीं म्या वर्णिवेति कैसे । पुढें एकीं स्तुति केली असे ।
तेथूनि जीव निघत नसे । ऐसिये आसे लागलोंसें ॥ २ ॥
कासया पाडिला जी धडा । उगाचि वेडा आणि वांकडा ।
आम्हां लेंकरांसि पीडा । एक मागें जोडा दुसऱ्याचा ॥ ३ ॥
सांगा कोणाचा अन्याय । ऐसें मी धरीतसें पाय ।
तूं तंव सभचि सकळां माय । काय अन्याय एक माझा ॥ ४ ॥
नये हा जरी कारणा । तरी कां व्यालेति नारायणा ।
वचन द्यावें जी वचना । मज अज्ञाना समजावीं ॥ ५ ॥
बहुत दिवस केला बोभाट । पाहातां श्रमलो ते वाट ।
तुका म्हणे विस्तारलें ताट । काय वीट आला नेणों स्वामी ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा :- आहाच–उगाच, धडा–रीत, कारणा–उपयोगी

अर्थ – देवा, ज्या साधुसंतानी तुला मूर्तिमंत असे पाहिले आहे ते मला हसतील, या विचाराने माझे चित्त उद्विग्न होऊन गेले आहे. मी भक्त उगाच आहे की काय असे मला वाटते. १ तुझ्या ध्यानाचे वर्णन तरी कसे करावे? मागच्या कित्येक संतानी तुझी स्तुती केलेली आहेच. देवा, या विचारातून माझा आता जीव निघतच नाही. या एकाच आशेत मी गुंतलो आहे. २ अशी ही वेडीवाकडी रीत महाराज, कशासाठी निर्माण केली आहे? आम्हा मुलांना त्याचा त्रास होतो ना यासाठी का एकामागून दुसरे दु:ख असे तू निर्माण केले आहेस? ३ सांगा देवा, हा अन्याय तरी कुणाचा आहे? मी तुमचे पाय धरून विचारतो आहे. कारण तू सर्वांची सारखीच आई आहेस; तर सांग, माझा तरी काय अन्याय आहे? ४ नारायणा, जर माझ्या या देहाचा काही उपयोग नव्हता, तर मला तुम्ही निर्माण तरी का केलेत? का प्रसवलात मला? माझ्या प्रश्नास आता नीट उत्तर द्या तुम्ही. माझ्यासारख्या अज्ञानी

मुलाची नीट समजूत काढा. ५ देवा, अशा प्रकारचा बोभाटा पुष्कळ दिवस करून मी तुमची वाट पाहून थकून थकून गेलो आहे. तुकाराम महाराज म्हणतात, ताट वाढून ठेवलेले असावे व त्याचा घोट आलेला असावा, तसा माझा कंटाळा स्वामी करतात की काय ? ६

६४० बरें जालें आजिवरी । नाहीं पडिलो मृत्याचे आहारीं ।
वांचोन आलों एथवरी । उरलें तें हरी तुम्हां समर्पण ॥ १ ॥
दिला या काळें अवकाश । नाहीं पावलें आयुष्य नाश ।
कार्या कारण उरलें शेष । गेलें तें भूस जावो परतें ॥ २ ॥
बुडणें खोटें पावतां थडी । स्वप्नीं जाली ओढाओढी ।
नासली जागृतीची घडी । साच जोडी शेवटीं गोड घास ॥ ३ ॥
तुम्हांसि पाचारिली हाक । तेणें निरसला धाक ।
तुमचें भातें हें कवतुक । जे शरणागत लोक रक्षावे ॥ ४ ॥
रवीच्या नावें निशीचा नाश । उदय होतांचि प्रकाश ।
अतां कैंचा आम्हां दोष । तूं जगदीश कैवारी ॥ ५ ॥
आतां जळो देह सुख दंभ मान । न करीं याचें साधन ।
तूं जगदादि[1] नारायण । आलों शरण तुका म्हणे ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा:- भूस–फोलकटाप्रमाणे व्यर्थ, थडी–पैल तीरास, भातें–कौतुकाचे भाडवल, खाऊ, निशीच्या–रात्रीच्या

अर्थ.– देवा, आजपर्यंत मी मृत्यूच्या दाढेत सापडून नाश पावलो नाही हे बरेच झाले. येथपर्यंत वाचून राहिले हे ठीक झाले. आता माझे उरलेले सर्व आयुष्य देवा, मी तुम्हास समर्पण करीत आहे. १ आजपर्यंत या काळानेच संधी दिली म्हणूनच माझा नाश झाला नाही. काही कार्य करणे उरले आहे म्हणूनच हे आयुष्य उरले आहे. मागचे आयुष्य फोलकटाप्रमाणे व्यर्थ गेले ते जाऊ द्या २ एकदा पैल तीरावर पोचल्यावर मग नदीत बुडलो हे सर्व खोटेच ठरते. किंवा स्वप्नात वाटेल तेवढी ओढाओढी झाली तरी जागृत अवस्था आल्यानंतर मग ते सर्व खोटेच ठरते. तसाच खरा आनंद मला शेवटी तुमच्या भेटीचा गोड घास मिळणार आहे यातच वाटतो. ३ मी तुम्हास प्रेमानें हाक मारली त्यामुळेच देवा, माझी भीती नाहीशी झाली आहे. शरण आलेल्यांचे रक्षण करावे हे जे *तुम्ही कौतुकाने करून शरणागतास प्रेमाचा खाऊ देता तोच मोठा आहे. ४ सूर्य उगवल्याबरोबर रात्रीचा जसा* नाश होतो, प्रकाशाचा उदय होतो, त्याप्रमाणे तू जगाचा स्वामी आमचा कैवारी असताना आम्हांस दोष कसा लागणार ? ५ आता माझ्या अंगी असणारा देहसुखाचा, दंभाचा, मानाचा अभिमान जळून जावो. मी आता त्याच्याकडे ढुंकूनही पाहणार नाही. तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तू जगाचा स्वामी आहेस, नारायणा, मी तुला शरण आलो आहे. ६

६४१ आतां माझा नेणो परतों भाव । विसावोनि पायीं ठेविला जीव ।
सकळां लाभांचा हा ठाव । ऐसा वाव जाला चित्ताठायीं ॥ १ ॥
भांडवल गांठी तरि विश्वास । जालों तों जालों निश्चय दास ।
न पाहें मागील ते वास । पुढती सोस सेवेचाची ॥ २ ॥
आहे तें निवेदिलें सर्व । मी हें मासें मोडियला गर्व ।
अकाळीं काळ अवघें पर्व । जाला भरवसा कृपेलाभाचा ॥ ३ ॥

---

[1] जगदीश.

वेव्हारीं वेव्हारा अनंत । नाहीं यावांचुनी जाणत ।
तरी हें समाधान चित्त । लाभहानी नाहीं येत अंतरा ।। ४ ।।
करूनि नातळों संसारा । अंग भिन्न राखिला पसारा ।
कळवळा तो जीवनीं खरा । बीजाचा थारा दुरी आघात ।। ५ ।।
बहु मतापासूनि निराळा । होऊनि राहिलों सोंवळा ।
बैसल्या रूपाचा कळवळा । तुका म्हणे डोळां लेइलों तें ।। ६ ।।

शब्दार्थ व टीपा :– वाव–निश्चय, वास–वाट, सोस–हौस.

अर्थ :– देवा, तुझ्या पायाशी येऊन मी विसावलो आहे. आता काही माझा भक्तिभाव तुझ्यापासून दूर होऊ नये. तुझ्या प्राप्तीमुळे मला सर्व लाभाचा लाभ मिळाला, असाच निश्चय माझ्या मनाशी झालेला आहे. १ तुझ्या-वरचा विश्वास हेच माझे आता मुख्य भांडवल असून मी तुझ्या निश्चयाने सेवक झालो आहे. मी मागच्या प्रपंचाची मग वाटच पाहणे सोडून दिले आहे मला सर्व हौस आता यापुढे तुमच्या सेवेचीच आहे. २ देवा, माझ्या मनात जे आहे, ते सर्व मी तुमच्यापुढे सांगितले आहे. मी माझा सर्व गर्व सोडून दिला आहे. वाईट काळ, चांगला काळ हे सर्वच आम्हांस आता पर्वकाळाप्रमाणे वाटत आहेत. हा मोठा विश्वास देवा, तुमच्या कृपेने मला प्राप्त झाला आहे. ३ आता माझ्या या सर्व व्यवहारांतही या ईश्वराशिवाय दुसरे काही मी जाणीतच नाही म्हणूनच माझ्या मनात पूर्ण समाधान असून लाभहानीविषयी मुळीच विचार येत नाही. ४ असा मी संसार करूनही त्यामधून वेगळा आहे. सर्व बाह्य पसारा मी माझ्या अंगापासून दूरच ठेविला आहे तुझ्याविषयी प्रेम हेच जीवनात खरे सुख प्राप्त झाले. यामुळे नामरूप बीजाचा आश्रय मिळून इतर आघात होते ते संपले, दूर झाले ५ मी अनेक मतांपासून निराळाच राहिलो. सोवळा होऊनच मी आहे तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तुझ्या रूपाचे जे ध्यान माझ्या हृदयात वसले आहे, तेच मी माझ्या डोळ्यांनी पाहात आहे. ६

६४२ तुळसीमाळा घालुनी कंठीं । उभा विटेवरी जगजेठी ।
अवलोकोनि पुंडलीका दृष्टी । असे भीमातटीं पंढरीराय ।। १ ।।
भुक्तिमुक्ति जयाच्या कामारी । रिध्दिसिध्दि वोळगती द्वारीं ।
सुदर्शन घरटी करी । काळ कांपे दुरी धाकें तया ।। २ ।।
जगज्जननी असे वाम भागीं । भीमकी शोभली अर्धांगीं ।
जैसी विद्युल्लता झमके मेघीं । दरुषणें भंगी महा दोष ।। ३ ।।
सुखसागर परमानंदु । गोपीगोपाळां गोधनां छंदु ।
पक्षिश्वापदां जयाचा वेधु । वाहे गोविंदु पांवा छंदें ।। ४ ।।
मुखमंडित चतुर्भुजा । मनमोहन गरुडध्वजा ।
तुका म्हणे स्वामी माझा । पावे भक्तिकाजा लवलाहीं ।। ५ ।।

शब्दार्थ व टीपा :– कामारी–दासी, वोळगतो–प्राप्त होतात, घरटी करी–रक्षणासाठी फिरत असते, वाम भागीं–डाव्या अंगास, भीमकी–रुक्मिणी, भंगी–नाहीसा होतो, लवलाहीं–लगबगीने

अर्थ :– गळ्यामध्ये तुळशीच्या माळा घालून हा जगजेठी पांडुरंग आपल्या दृष्टीने पुंडलिकाकडे पाहून भीमा नदीच्या तीरावर विटेवर उभा राहिला आहे. १ अष्टमहासिद्धी व रिद्धी व नाना भोग आणि चारी मुक्ती या याच्याच दासी असून सुदर्शन चक्र जयाच्या रक्षणासाठी फिरत असते याच्या भीतीने यम देखील दूर पळून जातो. २ सर्व विश्वाची माता असणारी याच्या डाव्या अंगास अर्धांगी म्हणून ही रुक्मिणी शोभत आहे. मेघामध्ये जशी चमक-णारी वीज शोभावी तशी ही वाटते. हिच्या दर्शनानेच महापातकांचे दोष नष्ट होतात. ३ हा माझा विठ्ठल सुखाचा

सागर व परमानंदाचे प्रत्यक्ष रूपच आहे. गोपी, गोपाळ, गाई यांना याचाच एक नाद असून पशू आणि पक्षी यांनाही याचा छंद नेहमी असतो. हाही यांच्याच छंदाने पावा वाजवीत असतो. ४ याचे मुख सुशोभित असून हा चतुर्भुज आहे. हा भक्तांचे मन हरण करणारा असून याच्या ध्वजावर गरुडाचे स्थान आहे. तुकाराम महाराज म्हणतात, हा माझा स्वामी लगबगीने भक्तांच्या कामासाठी धावत येत असतो. ५

६४३ हातींचें न संडावें देवें । शरण आलों जीवें भावें ।
आपुलें ऐसें म्हणावें । करितों जीवें निंबलोण ॥ १ ॥
बैसतां संतांचे पंगती[1] । कळों आलें कमळापती ।
आपुलीं कोणीच नव्हती । निश्चय चित्तीं दृढ जाला ॥ २ ॥
येती तुझिया भजना आड । दाविती प्रपंचाचें कोड ।
कनिष्ठीं रुचि ठेऊनि गोड । देखत नाड कळतसे ॥ ३ ॥
मरती मेलीं नेणों किती । तोचि लाभ तयाचे संगतीं ।
म्हणोनि येतों काकुलती । धीर तो चित्तीं दृढ द्यावा ॥ ४ ॥
सुखें निंदोत हे जन । न करीं तयांशीं वचन ।
आदिपिता तूं नारायण । जोडी चरण तुमचे तें ॥ ५ ॥
आपलें आपण न करूं हित । करूं हें प्रमाण संचित ।
तरी मी नष्टचि पतित । तुका म्हणे मज संत हांसती ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा :– कोड–हौस, नाड–फजिती.

अर्थ :– देवा, मला आता हाताशी धरले आहे ते सोडू नये. मी तुम्हांस जीवेभावे शरण आलेलो आहे. मला तुम्ही आपला आहे असे म्हणावे. मी माझे जीव तुमच्यावरून ओवाळून टाकीन. १ हे कमळापती, मला या संतांच्या पंगतीस बसल्यावर समजून आले की, माझे हे सर्व आप्त लोक मला कधीही उपयोगी पडणारे नाहीत. ते आपले नव्हेतच. हाच माझ्या मनात निश्चयाचा दृढ भाव झाला. २ ही सर्व नातेवाईक माणसे तुझ्या भजनाच्या आड येतात. देवा, मला प्रपंचाची हौस वाटावी असे करतात, प्रपंचादी सुखासारख्या कमी प्रतीच्या गोष्टींत त्यांना रुची वाटते. पण त्याची पुढे होणारी फजिती मला समजते. ३ त्यांतील कित्येकजण मरून गेले. मलाही त्यांच्या संगतीत एवढा एकच लाभ झाला असता; म्हणून तर देवा, मी फार काकुळतीस येऊन विनवणी करीत आहे की, माझे चित्त त्याच्यात जडू नये, एवढा धीर मला तुम्ही द्यावा. ४ मग माझी निंदा हे माझे आप्त लोक सुखाने करू द्या ना. मी त्यांच्याशी भाषणही करणार नाही. देवा, तूच आदिपिता आहेस माझा. नारायणा, मी तुमचे पाय काही मग सोडणार नाही. ५ मी आपले हित आपणच साधून घेणार आहे. पूर्वसंचितप्रमाणेच मी हे करीन. तुकाराम महाराज म्हणतात, मी जर हे न करीन तर मी नष्टच होईन, पतितच राहीन. मग सारे संतजन मला हसतील ना. ६

६४४ बरवें जालें लागलों कारणीं । तुमचे राहिलों चरणीं ।
फेडीन संतसंगती धणी । गर्जइल गुणीं वैखरी ॥ १ ॥
न वंचे शरीर सेवेसी । काया वाचा आणि मनेंसीं ।
जालों संताची अंदणी दासी । केला याविशीं निर्धार ॥ २ ॥
जीवनीं राखिला जिव्हाळा । जालों मी मजसीं निराळा ।
पंचभूतांचा पुतळा । सहज लीळा वर्ततसे ॥ ३ ॥

१ संगती.

जयाचें जया होईल ठावें । लाहो या साधियेला भावें ।
ऐसें होतें राखियलें जीवें । येथूनि देवें मोवहुनी ॥ ४ ॥
आस निरसली ये खेपे । अवघे पंथ जाले सोपे ।
तुमचे दीनबंधु कृपें । दुसरें कांपे सत्ताधाकें । ॥ ५ ॥
अंकिले पणें आनंदरूप । आतळों नये पुण्यपाप ।
सारूनि ठेविले संकल्प । तुका म्हणे आपें आप एकाएकीं ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा .– धणी–तृप्त होईपर्यंत, वैखरी–वाणी, न वंचे–कुचराई करणार नाही, मोवहुनी–दूर काढून, आतळों न ये–स्पर्श करीत नाही.

अर्थ :– देवा, मी तुमच्या चरणांपाशी आलो, यात माझे जीवित कारणी लागल्यासारखे झाले हे फार चांगले झाले. मी आता तृप्त होईपर्यंत या संतसंगाचा लाभ घेईन व वाणीने तुझे गुण गर्जून सांगेन. १ तुझ्या सेवेत माझे शरीर कधी कुचराई करणार नाही. काया, वाचा व मन यासहित मी तुझी सेवा करीन. आंदण दिलेल्या दासीप्रमाणेच मी या संताचा सेवक झालो आहे. माझा आता याविषयी पक्का निर्धार झालेला आहे २ माझ्या जीवनात आता तुझ्याबद्दल जिव्हाळा निर्माण झाला असून मी देह व देहसंबंध याच्यापासून निराळाच झालो आहे त्यामुळे पंचमहाभूतांचा हा देह सहज लीलेने आता वर्तणूक करीत आहे. ३ ज्याचे चिंतन आम्ही करीत आहोत त्याला हे सर्व नीट समजेल, असा विश्वास आमच्या मनात आहे. माझ्या जीवासही असेच वाटत होते या प्रपंचरूप स्थितीतून देवाने मला दूर काढून मार्ग दाखविला आहे. ४ या खेपेस मात्र माझी सर्व आशा पूर्ण झालेली आहे. सर्व मार्ग आता सोपे झाले असून देवा, दीनबंधू, तुमच्या कृपेने दुसरा विचारच माझ्या मनात येण्यास थरथरा कापत आहे ५ देवा, तुमचा अंकित होऊन, सेवक होऊन मी आनंद स्वरूपास प्राप्त झालो आहे. आता मला पापपुण्याचा स्पर्श होत नाही. तुकाराम महाराज म्हणतात, मी सर्व संकल्पाचा नाश करून मी आपोआप एकटेपणाने राहिलो आहे ६

६४५ अवघ्या दशा येणें साधती । मुख्य उपासना सगुणभक्ती ।
प्रगटे हृदयींची मूर्ती । भावशुध्दि जाणोनियां ॥ १ ॥
बीज आणि फळ हरीचें नाम । सकळ पुण्य सकळ धर्म ।
सकळां कळांचे हें वर्म । निवारी श्रम सकळ ही ॥ २ ॥
जेथें कीर्तन हें नामघोष । करिती निर्लज्ज हरीचे दास ।
सकळ वोथंवले रस । तुटती पाश भवबंधाचे ॥ ३ ॥
येती अंगा वसती लक्षणें । अंतरीं देवें धरिलें ठाणें ।
आपणचि येती तयाचे गुण । जाणें येणें खुंटे वस्तीचें ॥ ४ ॥
न लगे सांडावा आश्रम । उपजले कुळीचे धर्म ।
आणीक न करावे श्रम । एक पुरे नाम विठोबाचें ॥ ५ ॥
वेदपुरुष नारायण । योगियांचें ब्रह्म शून्य ।
मुक्ता आत्मा परिपूर्ण । तुका म्हणे सगुण भोळचा आम्हां ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा :– वोथंवले–निर्माण झाले.

अर्थ :– सगुण रूपाची भक्ती हीच मुख्य उपासना असून सर्व सुखांच्या अवस्था याच भक्तीमुळे साध्य होतात. मनात एक शुद्ध भाव असला की, हृदयातील प्रभूची मूर्ती समोर प्रकट होते १ श्रीहरीचे नाम हेच बीज व हेच फळ होय. सर्व पुण्ये, सर्व धर्म, सर्व कला यांचे रहस्य म्हणजे श्रीहरीचे नाम हेच होय. याच्यामुळे सर्व श्रमाचे निवारण

होते २ ज्या ठिकाणी कीर्तनात श्रीहरीच्या नावाचा घोष होतो, श्रीहरीचे दास मुक्त मनाने नामघोष करीत असतात, तेथे सर्व रसाची प्राप्ती होत असते संसारबंधनाचे पाश तेथे सुटलेले असतात ३ एकदा मनात देवाने स्थान धारण केले आहे असे झाले की, मग ज्ञानाची सर्व लक्षणे प्रकट होतात सर्व गुण आपण होऊन प्रकट होतात मग त्याचे जाणेपणेही थांबते ४ या प्राप्तीसाठी मग स्वतःचा आश्रमधर्म सोडण्याची जरूरी नाही दुसरे काही श्रम करण्याची आवश्यकता नाही एक विठोबाचे नामस्मरण पुरे आहे ५ हा नारायण साक्षात वेदपुरुषच आहे हेच योगी लोकांचे शून्य ब्रह्म हाच मुक्त व परिपूर्ण असा आत्मा आहे तुकाराम महाराज म्हणतात, परंतु आमच्यासारख्या भोळ्याभावड्या लोकांना हे सगुण रूपच पुरे आहे ६

विवरण – बुवांचा हा अभंग अनेक दृष्टींनी महत्त्वाचा आहे सर्वसामान्य लोकांना योगादी साधनापेक्षा सगुणभक्तीचा व नामसंकीर्तनाचा मार्ग हाच सहजसुलभ व निर्धोक असल्याचा निर्देश अनेक ठिकाणी आहे ईश्वरप्राप्तीसाठी संसार सोडायला हवा, रानावनात जायला हवे, आश्रमधर्माचे रीतीरिवाज सोडायला हवेत, कुळधर्म सोडायला हवेत, असे नाही हा सर्व प्रापंचिक कार्यभाग करीत असताना अखंड नाम प्रभूचे चित्तात असावे व सगुणाचे ध्यान मनात ठसावे मग इतर खडतर साधनाची तुकारामबुवांच्या मते जरूरी नाही 'नलगे सायास जाणें वनान्तरा। सुखें येतो घरा नारायण' अशीच ग्वाही तुकाराम महाराजांनी दिलेली आहे 'आता गृहादिक आघवें। ते काहीं न लगे त्यजावें। जें घेतें झालें स्वभावें। नि:संग म्हणऊनि' असे ज्ञानेश्वरानीही म्हटले आहे याचे मुख्य मर्म असे की, घरी प्रपंचात राहून सुख भोगणारे जे मन ते स्वभावतःच नि:संग होऊन केवळ हरिरूप झालेले असते नामसंकीर्तन व सगुणभक्ती यांनी ते केवळ ईश्वराशीच निगडित झालेले असल्यामुळे या भक्तास अव्यक्ताची उपासना करण्यासाठी निर्गुणाकडे, योगयागाकडे जाण्याची जरूरी नाही

६४६ श्रीअनंता मधुसूदना। पद्मनाभा नारायणा।
जगव्यापका जनार्दना। आनंदघना अविनाशा॥ १॥
सकळदेवा[1] आदिदेवा। कृपाळुवा जी केशवा।
महा महानुभवा। सदाशिवा सहजरूपा॥ २॥
चक्रधरा विश्वंभरा। गरुडध्वजा करुणाकरा।
सहस्रपादा सहस्रकरा। क्षीरसागरा शेषशयना॥ ३॥
कमलनयना कमलापती। कामिनीमोहना मदनमूर्ती।
भवतारका धरित्या क्षिती। वामनमूर्ती त्रिविक्रमा॥ ४॥
अगा ये सगुणा निर्गुणा। जगज्जनित्या जगज्जीवना।
वसुदेवदेवकीनंदना। बाळरंगणा बाळकृष्णा॥ ५॥
तुका आला लोटांगणी। मज ठाव द्यावा जी चरणीं।
हेचि करीतसे विनवणी। भवबंधनीं सोडवावें॥ ६॥

शब्दार्थ व टीपा – जगव्यापका–जग व्यापून राहिलेल्या, करुणाकरा–करुणेच्या सागरा, क्षिती–पृथ्वी, ठाव–आश्रय

अर्थ – श्रीअनंत स्वरूपाच्या देवा, मधू नावाच्या दैत्याचा नाश करणाऱ्या देवा, ज्याच्या नाभीतून कमळ उगवले आहे असा पद्मनाभा, नारायणा, जगात व्यापून राहिलेल्या जनार्दना, तू अविनाशी आहेस, तू आनंदाचा व कृपेचा मेघ आहेस १ सगळ्या देवांचा देव तू आहेस तू कृपाळू असा केशव आहेस महान आनंद देणारा तू असून तुझ्या संगतीचा श्रेष्ठ अनुभव देणारा तू आहेस सदाशिवा, तू नेहमीच कल्याण करणारा असून तुझे हे रूप सहज

[1] सकळ देवाधिदेवा

तु गाथा ४१

असे आहे. २ सर्व विश्वास भरून राहणाऱ्या विश्वंभरा, तुझ्या हातात दुष्टाचा नाश करणारे सुदर्शनचक्र असल्यामुळे तू चक्रधर आहेस. हे करुणेच्या सागरा, तुझ्या ध्वजावर गरुडाचे स्थान असून तुला हजारो पाय व हजारो हात आहेत देवा, तू क्षीरसागरात शेषावर शयन करणारा आहेस ३ देवा, तुझे डोळे कमळाच्या पानांप्रमाणे असून तू कमलापती म्हणून शोभतोस प्रत्यक्ष लक्ष्मीच तुझी पत्नी आहे. सर्व स्त्रियांना तुझी मोहिनी पडते. तू केवळ मदनाचा पुतळा आहेस. तू मस्तकावर अवतारप्रसंगी पृथ्वी धारण करून आपल्या भक्ताचे रक्षण केले आहेस तीन पावलांचा विक्रम वामनावतारात तू करून भक्ताचा उद्धार केला आहेस. ४ अरे परमेश्वरा, तूच सगुण व तूच निर्गुण आहेस. या जगाची आई व बाप देवा, तूच आहेस सर्व जगाचे जीवन तू आहेस. तूच वसुदेवदेवकी याचा लाडका मुलगा आहेस या रूपाने त्याच्या अंगणात तू सगुण होऊन रांगत आहेस ५ देवा, हा तुकाराम तुला अनंत लोटांगणे घालीत आहे मला तुमच्या चरणावर विश्रांती द्यावी हीच माझी विनवणी आहे या भवबंधनातून देवा, मला सोडवावे. ६

विवरण :- या एका गोड अभंगात तुकारामबुवांनी देवाच्या सगुण रूपाचे अतिशय मनोहर असे वर्णन केले आहे यातील देवाच्या गुणाचे व कर्तृत्वाचे वर्णन करणारे प्रत्येक विशेषण व संबोधन मार्थ व अभिप्राययुक्त आहे या आधीच्या अभंगात ज्या सगुणरूपाची महती बुवांनी वर्णन केली, त्याचे फार बहारीचे वर्णन त्यांनी या अभंगात परमेश्वराच्या गुणविशेषाचे दर्शन घडवून केले आहे नुसता अभंग मोठ्याने म्हणत राहावा, मग प्रत्यक्ष विठ्ठलाचे सगुण रूप डोळ्यापुढे उभे राहते की नाही ते पाहावे या देवास भगवद्गीतेत सांगितल्याप्रमाणे अनेक बाहू, अनेक पाय असले तरी ( गीता ११, १६ ) तो वसुदेव-देवकीच्या घरी अंगणात ल्हान होऊन खेळत आहे, हेही ध्यानात ठेवावयास हवे श्रीअनंता ! अशी पहिल्यानेच हाक मारून बुवांनी या देवाचे अंत नसणारे रूप प्रथम वर्णन केले व अभंगाच्या शेवटी तुकाराम महाराज त्याच्या बाळरूपावर येऊन विसावले आहेत हाच त्यांच्या सगुणप्रीतीचा आदर्श होय याच्या पायावर तुकारामबुवा सहस्र लोटांगणे घालतात.

६४७ आतां येणें बळें पंढरीनाथ । जवळी राहिला तिष्ठत ।
पाहातां न कळे जयाचा अंत । तोचि हृदयात घालूं आतां ॥ १ ॥
विसरोनि आपुला देहपणभाव । नामेंचि भुलविला पंढरीराव ।
न विचारी याती[1] कुळ नांव । लागावया पाय संतांचे ॥ २ ॥
बरे वर्म आले आमुचिया हातां । हिंडावे धुंडावे न लगतां ।
होय अविनाश सहाकारी दाता । चतुर्भुज सत्ता परि धाके ॥ ३ ॥
होय आवडी साने थोर । रूप सुंदर मनोहर ।
भक्तिप्रिय लोभापर । करी आदर याचकपणें ॥ ४ ॥
ते वर्म आले आमुच्या हाता । म्हणोनि शरण निघालों संतां ।
तुका म्हणे पंढरीनाथा । न सोडीं आतां जीवे भावे ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – पाव–पाय

अर्थ – आता या माझ्या भक्तीच्या बळामुळे हा पंढरीनाथ माझ्याजवळच तिष्ठत उभा राहिला आहे. याचा वरवर पाहून नीट अंतच लागत नाही तो आता हृदयात घालून त्याची जपणूक करू १ आपण देव आहोत, हा भावच तो विसरून गेला आहे किंवा आपला देहपणाचा भाव विसरून याची आळवणी करा, म्हणजे केवळ नामस्मरणानेच हा पंढरीराव भुलविला जातो हा मग आपल्या भक्ताची जात व त्याचे कुळ याची चौकशी करीत नाही संतांच्या पायाशी लागले की याची भेट होते २ हे एक चांगले रहस्य आमच्या हातात सापडले आहे. याच्यासाठी फार हिंडावे, धुंडावे लागणार नाही आता. हा अविनाशी असणारा दाता पांडुरंग सहकारी झाला आहे.

१ यातु कुळ ठाव.

हा चतुर्भुज असला तरी संतांचा धाक याला फार मोठाच असतो. ३ भक्तांच्या आवडीप्रमाणे हा लहान, थोर होतो. हा त्यांच्यासाठी सुंदर व सगुण रूप धारण करतो. याला भक्ती अतिशय प्रिय असून भक्ताचा लोभ यास अपार असतो. आपण स्वतः याचक होऊन हा आपल्या भक्तांचा आदरसत्कार करीत असतो. ४ या श्रीहरीचे हे रहस्य आता आमच्या हातात आले आहे. म्हणून तर मी संतांना शरण जाण्यास निघालो आहे. तुकाराम महाराज म्हणतात, पंढरीनाथा, आता या संतांना मी सोडणार नाही. जीवाभावाने त्यांना संतुष्ट करीन ५

६४८ माझा तंव खुंटला उपाव । जेणें तुझे आतुडती पाव ।
करूं भक्ति तरि नाहीं भाव । नाहीं हातीं जीव कवणेविशीं ॥ १ ॥
धर्म करूं तरि नाहीं चित्त । दान देऊं तरि नाहीं वित्त ।
नेणें पुजों ब्राह्मण अतीत । नाहीं भूतदया पोटा हातीं ॥ २ ॥
नेणें गुरुदास्य संतसेवन । जप तप अनुष्ठान ।
नव्हे वैराग्य वनसेवन । नव्हे दमन इंद्रियांसी ॥ ३ ॥
तीर्थ करूं तरि मन नये सवें । व्रत करूं तरि विधि नेणें स्वभावें ।
देव जरि आहे म्हणों मजसवें । तरि आपपरावें न वंचे ॥ ४ ॥
म्हणोनि जालों शरणागत । तुझा दास मी अंकित ।
यास कांहीं न लगे संचित । जालों निश्चित[1] तुका म्हणे ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – उपाव–उपाय, आतुडती–प्राप्त होतात, दमन–स्वामित्व, सवें–सवय, न वंचे–जात नाही.

अर्थ.– देवा, जेणेकरून तुझ्या पायांची प्राप्ती होईल, याविषयीचा माझा तर उपाय सारा संपून गेला आहे. तुझी भक्ती नीट करावी, तर एवढा मोठा भावही मजजवळ नाही. कुठल्याही बाबतीत हा माझा जीव माझ्या स्वाधीन नाही. १ धर्माचे आचरण करावे, तर त्यात माझे चित्त नाही. कुठे दान द्यावे तर, त्यासाठी माझ्याजवळ पैसा नाही. त्यामुळे ब्राह्मण अथवा अतिथी यांचे पूजन मी काही करू शकत नाही. आणि पोटात भूतमात्राविषयी अपार अशी दयाही नाही. २ श्रीगुरूची सेवा कशी करावी हेही मला समजत नाही. संतांची सेवा मला समजत नाही. जप, तप, अनुष्ठान, वैराग्य, वनवासातील चिंतन, इंद्रियावर स्वामित्व ठेवणे यांपैकी काहीही मला नीट जमत नाही. ३ तीर्थयात्रा करावी तर, मनास तशी सवय नाही व्रते वगैरे करावीत तर, मला त्यांचा विधी माहीत नाही. देव माझ्याबरोबरच असतो असे मानले तरी माझ्यातील आपपर भाव जात नाही. ४ म्हणून देवा, मी तुला शरण आलो आहे. तुझा मी दास तुझ्याच स्वाधीन असल्यासारखा आहे तुकाराम महाराज म्हणतात, असल्या या स्थितीसाठी काही संचित कर्माची जरूरी लागत नाही; म्हणूनच तर मी निश्चित झालो आहे. ५

६४९ तरि म्यां आळवावें कोणा । कोण हे पुरवील वासना ।
तुजवांचूनि नारायणा । लावीं स्तना कृपावंते ॥ १ ॥
आपुला न विचारीं सिण । न धरीं अंगसंगें भिन्न ।
अंगीकारिलें राखें दीन । देई जीवदान आवडीचें ॥ २ ॥
माझिया मनासिहे आस । नित्य सेवावा ब्रह्मरस ।
अखंड चरणींचा वास । पुरवीं आस याचकाची ॥ ३ ॥
माझिया संचिताचा ठेवा । तेणें हे वाट दाविली देवा ।
एवढ्या आदराचा हेवा । मागें सेवादान आवडीनें[2] ॥ ४ ॥

---

१ निश्चित, २ आवडीचें

आळवीन करुणावचनीं । आणीक गोड न लगे मनीं ।
निद्रा जागृती आणि स्वप्नीं । धरिलें ध्यानीं मनीं रूप ॥ ५ ॥
आतां भेट न भेटतां आहे । किंवा नाहीं ऐसें विचारूनि पाहे ।
लागला झरा अखंड आहे । तुका म्हणे साहे[1] केलें अतरीं ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा :– सिण–त्रास, आस–इच्छा, साहे–साह्य

अर्थ – नारायणा, तू जर मला दूर सारलेस, तर मग मी आळवावे तरी कुणास? माझी इच्छा कोण पुरवील हो? देवा, तुझ्यावाचून मला स्तनपान कोण देईल? १ माझ्यासाठी देवा, तुला जर काही त्रास झाला तर, तू त्याचा विचार करू नकोस. तू मला तुझ्या अगसंगापासून दूर नको करूस माझ्यासारख्या दीनाचा तू अगीकार केला आहेस, तर माझे रक्षण करून मोठ्या आवडीचे असे जीवदान मला दे ना. २ माझ्या मनाची ही एकच इच्छा आहे की, ब्रह्मरसाचे सेवन नित्य करीत असावे तुझ्या चरणाजवळ माझा निवास अखड असावा या याचकाची एवढी एक इच्छा तू पुरवावीस. ३ माझ्या पूर्वकर्मांचा जो ठेवा होता, त्यानेच मला हा मार्ग दाखविला आहे हेवा वाटण्याजोगा हा आदर त्यामुळेच निर्माण झालेला आहे मी तुझ्याजवळ मोठ्या प्रीतीने सेवेचे दान मागीत आहे ४ मी तुझी करुण वाणीने स्तुती करीत जाईन देवा याशिवाय माझ्या मनास दुसरे काहीही गोड लागत नाही झोपेत, जागेपणी आणि स्वप्नामध्ये, ध्यानात, मनात देवा, तुझेच रूपश्री धारण केले आहे ५ देवा, आता अशी अवस्था झाली आहे की, भेट न होताही भेटल्याचे सुख आहे हे आहे की नाही याचा तूच विचार करून पाहा तुकाराम महाराज म्हणतात, देवा, अशा प्रकारच्या अनुसधानाचा झरा अखडपणे मनात आहे हे साह्य माझ्या मनास तू केले आहेस ६

६५० हेचि भवरोगाचें औषध । जन्म जरा तुटे व्याध ।
आणीक काहीं नव्हे बाध । करील वध षड्वर्गा ॥ १ ॥
सावळें रूप त्यावें डोळा । सा चौ अठराचा गोळा ।
पदर लागो नेदी खळा । नाममंत्रमाळा विष्णुसहस्र ॥ २ ॥
भोजना न द्यावें अन्न । जेणें चुके अनुपान ।
तरीच घेतल्याचा गुण । होईल जाण सत्य भाव ॥ ३ ॥
नये निघों आपुलिया घरा । बाहेर लागों नये वारा ।
बहु बोलणें तें सारा । संग दुसरा वर्जावा ॥ ४ ॥
पास तें एक द्यावें वरी । नवनीताची होईल परी ।
होईल गुंसळिलें तें निवारी । सार भीतरीं नाहीं तया ॥ ५ ॥
न्हायें अनुतापीं पाधरे दिशा । स्वेद निघों दे अवघी आशा ।

वेद, अठरा पुराणे यांचे सारच होय. या रूपाच्या प्राप्तीमुळे दुष्टाचा स्पर्शसुद्धा आपणांस कधी होत नाही. विष्णुसहस्रनाम व रामकृष्ण हरी हा मंत्र वारंवार जपत जा तू. २ अनुपानात दिल्याने जर चूक होत असेल, तरी मग त्यास भोजनही देऊ नये. असे केले तरच औषध घेतल्याचा गुण येईल हे सत्यच मानावे. ३ आत्मस्वरूपाच्या आपल्या घरातून कधीही बाहेर पडूच नये. बाहेरच्या विचारांचा जरा वारा लागेल असे कधी करू नये. वायफळ बडबड करण्याचेही दूर सारावे. भलत्याची संगत करू नये. ४ आपल्यापाशी जे एक शुद्ध चित्त आहे तेच श्रीहरीस द्यावे. ते दिल्याने नवनीतच दिल्याचे श्रेय लाभेल व घुसळल्यानंतर असार असे ताक राहील. ते तू दूर सारून टाक. कारण त्याच्या आत काहीच तथ्य नसते. ५ पश्चात्तापाच्या किंवा वैराग्याच्या पाण्याने तू न्हाऊन नीघ. डोक्यावरून सर्व दिशा तू पांघरून घे. तुझ्या अंगातील आशारूपी घाम सारा निघू दे. मग तुकाराम महाराज म्हणतात, यामुळे तू पापूर्वी जसा ब्रह्मस्थिती भावात होतास, तसाच परत होशील. त्यामुळे तुला वैराग्य चांगले प्राप्त होईल. ६

६५१ मागुता हाचि जन्म पावसी । भोगिलें सुखदुःख जाणसी ।  
हें तों न घडे रे सायासीं । कां रे अंध होसी जाणोनियां ॥ १ ॥  
लक्ष चौऱ्याशी न चुके फेरा । गर्भवासीं यातना थोरा ।  
येउनि पडसी संदेहपुरा । वोळसा थोरा मायाजाळीं ॥ २ ॥  
पशु काय पापपुण्य जाणती । उत्तम मध्यम भोग भोगिती ।  
कांहीं एक उपजतां मरती । बहिरीं अंध होती पांगुळ मुकीं ॥ ३ ॥  
नरदेह निधान लागलें हातीं । उत्तम सार उत्तम गती ।  
होइन देवचि म्हणती ते होती । तरि कां चित्तीं न धरावें ॥ ४ ॥  
क्षण एक मन स्थिर करूनी । सावध होईं डोळे उघडोनी ।  
पाहें वेद बोलिले पुराणीं । तुका विनवणी करीतसे ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– मागुता–यानंतर, निधान–चांगले साधन

अर्थ :– या जन्मात जी सुखदुःखे तू भोगली आहेस ती ध्यानात घेता, यानंतरही तुला माणसाचा जन्म येईल असे काही निश्चयाने घडेल असे नाही हे सर्व समजत असूनही तू याविषयी आंधळा का होतोस रे? १ चौऱ्याऐंशी लक्ष योनींच्या फेऱ्या काही तुझ्या चुकायच्या नाहीत त्यावेळी गर्भवासातील घोर यातना तुला भोगावयास लागतील आणि चुकून माणसाच्या जन्मास आलास तर संदेहाच्या अवस्थेत सापडशील. या प्रपंचात देहादी वृत्तींचे संकट फार घोर आहे. २ तुझी अवस्था पशूंसारखी होऊ देऊ नकोस पशू कधी पापपुण्याचा विचार तरी करतात का? भोग भोगताना ते कधी उत्तम, मध्यम असा तरी विचार करतात का? काही जन्म होताच मरतात, काही आंधळे होतात, काही पांगळे होतात, काही मुके होतात ३ तेव्हा नीट विचार कर. चांगले नरदेहासारखे साधन हाताशी आले आहे. हेच सर्व उत्तमाचे सार आहे उत्तमातील गती हीच आहे. याच मानवी देहाने मी देवच होणार असे म्हटले तर होण्यासारखे आहे तर मग या श्रीहरीस तू चित्तामध्ये का धारण करीत नाहीस? ४ क्षणभर मन स्थिर करून मग सावध हो व डोळे उघडून पाहा. तुकाराम महाराज म्हणतात, वेद, पुराणे काय काय बोलतात, हे तू नीट पाहा, अशी माझी तुला विनंती आहे. ५

६५२ दास्य करी दासांचें । उणें न साहे तयांचें ।  
वाढिलें ठायींचें । भाणें[1] टाकोनियां धांवे ॥ १ ॥  
ऐसा कृपेचा सागर । विटे उभा कटीं कर ।  
सर्वस्वें उदार । भक्तांलागीं प्रगटे ॥ २ ॥

---

१ भाने.

हृदयीं श्रीवत्सलांछन । मिरवी भक्ताचें भूषण ।
नाहीं तयाचा सीण । सुख धरिलें लातेचें ॥ ३ ॥
सत्यभामा दान करी । उजुर नाहीं अंगीकारी ।
सेवकाच्या शिरीं । धरूनि चाले पादुका ॥ ४ ॥
राखे दारवटा बळीचा । सारथी[1] जाला अर्जुनाचा ।
दास सेवकाचा । होय साचा अंकित ॥ ५ ॥
भिडा नो बोलवे पुंडलिकाशीं । उभा मर्यादा पाठीशीं ।
तुका म्हणे ऐसी । का रे न भजा माउली ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – भाणे–वाढलेले ताट उजुर–सबब, दारवटा–दरवाजा

अर्थ – हा विठ्ठल किती कनवाळू आहे आपल्या भक्ताची व सेवकाचीही सेवा हा नेहमी करीत असतो त्याचे काही कमी पडलेले त्याला सहन होत नाही त्याना मदत करण्यासाठी हा देव वाढलेले ताटही बाजूस सारून धावत असतो १ असा हा कृपेचा मोठा सागर आहे हा विटेवर उभा असून याचे हात याच्या कमरेवर आहेत *हा अतिशय उदार असून आपल्या भक्तांसाठी प्रकट झालेला आहे* २ भृगूने दिलेली लाथ हा प्रेमाने आपल्या हृदयावर श्रीवत्सलांछन म्हणून मिरवीत असतो त्याचा काही त्याला त्रास वाटत नाही त्या लत्ताप्रहाराचेही त्याने सुखच धारण केले आहे ३ एकदा सत्यभामेने श्रीकृष्णाचे दान नारदास दिले, तरी कुठलीही सबब न सागता नारदाच्याच पादुका डोक्यावर धारण करून या देवाने त्याचा सत्कार केला ४ हा बळीचा दरवाजा रक्षण करणारा झाला अर्जुनाचा सारथी हाच होता हा देव खरोखर आपल्या सेवकाचा सेवकच होऊन राहतो ५ मोठ्या सकोचाने हा देव पुंडलीकापाशी बोलला नाही त्याने सुचविल्याप्रमाणे तो पाठीमागे निमूटपणे उभा राहिला तुकाराम महाराज म्हणतात, अशी ही प्रेमळ माउली का रे भजत नाहीस ? ६

विवरण —ईश्वर हा *आपला मायबाप असून त्यालाच सर्व चिंता असते तो किती कनवाळू आहे व आपल्या* भक्तावर तो कसा प्रसन्न असतो, त्याना सकटात कशी मदत करतो, त्याच दास्य तो स्वत कसे करतो, याची अनेक उदाहरणे साधुसत आपल्या वाङमयात देत असतात या अभगात दिलेला नारदाची भृगूची अर्जुनाची, बळीची उदाहरणे सर्वप्रसिद्ध अशीच आहेत ब्रह्मा, विष्णू व महेश यात श्रेष्ठ कोण याचा निवाडा करण्याचे काम भृगू ऋषीवर आले असताना तो श्रीविष्णूकडे आला त्यावेळी विष्णू झोपलेले होते भृगुने एकदम आत जाऊन श्रीविष्णूच्या छातीवर *लाथ मारली तरी विष्णू काही रागावले नाहीत उलट त्यानी भृगूस वदन करून त्याचा लत्ताप्रहार भूषण* म्हणून मिरविला नतर भृगूने प्रसन्न होऊन सर्व देवात विष्णूच श्रेष्ठ असे म्हटले भृगूची ही लाथच श्रीविष्णूस श्रीवत्सचिन्ह म्हणून गौरवाची वाटते, अशी कथा पद्मपुराण भागवतपुराण यात आहे

६५३ हरि तैसे हरीचे दास । नाहीं तयां भय मोह चिंता आस ।
होउनि राहाली उदास । बळकट कास भक्तीची ॥ १ ॥
धरूनि पाय त्यजिले जन । न लगे मान धन ।
कंठीं नाम अमृताचें पान । न लगे आन ऐसें जाले ॥ २ ॥
वाव तरी उदंडच पोटीं । धीर सिंधु ऐसे जगजेठी ।
कामक्रोधा न सुटे मिठी । गिंहे तरी वेठीं राबविती ॥ ३ ॥
बळें तरि नागवती काळा । लीन तरि सकळांच्या तळा ।
उदार देहासी सकळा । जाणोनि कळा सर्व नेणते ॥ ४ ॥

१ रथी

संसार तो तयांचा दास । मोक्ष तें[1] पाहातसे वास ।
रिद्धिसिद्धि देशवटा त्रास । न शिवति यास वैष्णवजन ॥ ५ ॥
जन्ममृत्युस्वप्नांसारिखें । आप त्यां न दिसे पारखें ।
तुका म्हणे अखंडित सुखें । वाणी वदे मुखें प्रेमामृताची ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा :– वाव–अवकाश, जागा, वेठीं–बिगारीने, गिन्हे–ग्रह, देशवटा–देशाच्या हद्दीबाहेर

अर्थ :– हा श्रीहरी जसा आहे, तसेच त्याचे दासही भय, मोह, चिंता व आशा यांच्या विरहित आहेत. ते सर्वस्वी उदास झाले आहेत. त्यांनी भक्तीची कास बळकटपणे घातली आहे. १ या श्रीहरीचे पाय ज्यांनी लोकांचा त्याग करून धरिले आहेत, त्यांना कुठल्याही मानसन्मानाची जरूरी नसते. त्यांना धनही मातीच्या किमतीचे वाटते. त्यांच्या मुखांत नेहमी नामामृताचेच पान असते. त्यांना दुसऱ्या कशाचीच जरूरी नसते. २ त्यांच्या पोटात दयेस फार मोठी जागा असते. समुद्राप्रमाणे ते धीरगंभीर असतात. त्यांची ईश्वराच्या पायांवरील मिठी कामक्रोधादि-कांनाही सुटत नाही. हे ग्रहांसारखे तापदायक असले तरी ते त्यांना बिगारीनें वेठीला धरतात. ३ हे श्रीहरीचे भक्त इतके बलवान आहेत की, ते प्रत्यक्ष काळासही पराजित करतात आणि नम्र तर इतके आहेत की, सर्वांच्या खाली क्रमाने उभे राहतील. देहाविषयी हे सर्वस्वी उदार आहेत सर्व कला यांनी जाणलेल्या असूनही न जाणल्या-सारखे ते वागतात ४ इतरांना कष्टदायक वाटणारा संसार हा त्यांचा दास बनतो. मोक्ष तर यांचीच वाट पाहात असतो. रिद्धीसिद्धींना यांनी आपल्या देहरूपी देशाच्या सीमेपलीकडे हद्दपार केले असल्याने त्याचाही त्रास यांना कधी होत नाही. अशा रिद्धीसिद्धींना वैष्णव लोक चुकूनही स्पर्श करीत नाहीत. ५ हे हरीचे दास जन्ममृत्यूंनाही स्वप्नासारखेच मानतात. त्यांना आपले अथवा परक्याचे असा भेद मुळीच दिसत नाही. तुकाराम महाराज म्हणतात. ते निरंतरपणें सुखी असतात. त्यांच्या वाणीतून अखंडपणे प्रेमामृतच बाहेर स्रवत असते. ६

६५४ बहुत जाचलों संसारीं । वसे गर्भी मातेच्या उदरीं ।
लक्ष चौऱ्याशी योनिद्वारीं । जालों भिकारी याचक ॥ १ ॥
जिणें पराधीन आणिकां हातीं । दृढ पाशीं बांधलों संचितीं ।
प्रारब्ध क्रियमाण सांगाती । भोवंडिती सत्ता आपुलिया ॥ २ ॥
न भरे पोट नाहीं विसांवा । नाहीं नेम एक ठाव गांवा ।
नाहीं सत्ता न फिरे ऐसी देवा । लाही[2] जीवा खापरीं तडफडी ॥ ३ ॥
काळ बहुत गेले ऐसिया रीती । आणीक पुढें नेणों किती ।
खंडणा नाहीं पुनरावृत्ती । मज कल्पांतीं तरी वेगळें ॥ ४ ॥
ऐसें दुःख कोण हरील माझें । कोणा भार घालूं आपुलें ओझें ।
भवसिंधुतारक नाम तुझें । धांवसि काजें आडलिया ॥ ५ ॥
आतां धांव घालीं नारायणा । मजकारणें रंका दीना ।
गुण न विचारीं अवगुणा । तुका करुणा भाकीतसे ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपाः– भोवंडिती–गरगर फिरवितात.

अर्थ :– देवा, मी या संसारात फार गांजून गेलो आहे. चौऱ्याऐंशी लक्ष योनी फिरून मी मातेच्या उदरात वास केला असून मी सुखासाठी दीन याचक व भिकारी बनलेलो आहे. १ माझे हे जगणेही दुसऱ्याच्या स्वाधीन आहे. कर्मबंधनाच्या फासात मी बांधून पडलो आहे. माझ्याबरोबर माझे प्रारब्ध व क्रियमाण असून त्याच्या सत्तेनें ते मला गरगर निरनिराळ्या जन्मांतून फिरवीत आहेत. २ इतके भ्रमण करूनही माझे पोट भरत नाही; की

१ तो, २ लाहे.

विसावा मला मिळत नाही कुठल्याही एका गावात राहण्याचा माझा नेम नाही कुठे न फिरता एका जागी खिळून असावे हे माझ्या सत्तेत नाही देवा, खापरीत जशी लाही भाजत असताना तडफडते, तशी अवस्था माझ्या जीवाची झाली आहे ३ अशाच प्रकारचा काळ पुष्कळ गेला आणखी असा किती जाणार आहे, कुणास माहीत? कल्पान्ताची वेळ आली तरी, पुन पुन जन्मास मरण्यास खंड पडत नाही ४ असे माझे हे दुःख देवा, कोण दूर करील? कुणावर मी या ओझ्याचा भार घालू? भवसिंधू तरून नेणारी नौका म्हणजे तुझे नाम आहे कुणाचे काही काम अडून राहिले की तू धावून येतोस ५ नारायणा मग आता माझ्यासाठी एकदा धावून ये ना मी दीन आहे गरीब आहे तुकाराम महाराज म्हणतात, माझ्यासारख्या अवगुणी माणसास गुणही विचारू नका अशी करुणा मी देवा तुमच्याजवळ भाकीत आहे ६

६५५ जव हे सकळ सिद्ध आहे । हात चालावया पाये ।
तव तू आपुले स्वहित पाहें । तीर्थयात्रे जायें चुको नको ॥ १ ॥
जव काळ असे दुरी ठेला । तव तू हरिगुण गायें आइक वहिला ।
मनीं भाव धरूनि भला । न वचे त्याला चुको नको ॥ २ ॥
जोडोनि धन न घलीं[1] माती । ब्रह्मवृंदें पूजन यती ।
सत्य आचरण दया भूतीं । करीं सांगातीं चुको नको ॥ ३ ॥
दशा यौवन वाणली अंगीं । पांगिला नव्हे विषयसंगीं ।
काम क्रोध लोभ मोह त्यागीं । राहें संतसंगीं चुको नको ॥ ४ ॥
मग तेथें न चले कांहीं । सत्ता संपदा राहेल ठायींच्या ठायीं ।
पुढें संचित जाईल ग्वाही । तुका म्हणे तें ही यमआज्ञा ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – पांगिला–पंगू

अर्थ – जोपर्यंत हातपाय नीट धडधाकटपणे चालत आहेत, तोपर्यंत तू आपले स्वहित नीट पाहून राहा तीर्थयात्राना जाण्यास चुकू नकोस १ जोपर्यंत यमाची पावले दूरच आहेत तोपर्यंत तू आपले स्वहित नीट साधून ठेव, नेहमी श्रीहरीचे गुण तू ऐकत जा मनात शुद्ध भाव धारण करून श्रीहरीच्या सेवेत कधी चुकू नकोस २ सारखा पैसाच पैसा जमवून मातीस घालवू नकोस ब्राह्मण यती संन्यासी यांची पूजा करण्यात त्या द्रव्याचा खर्च करावा नेहमी सत्याचे आचरण करावे सर्व भूतावर दयेची दृष्टी असावी या सर्वांचा ठेवा जवळ असावा यात तू कधी चुकू नकोस ३ जोपर्यंत अंगात तारुण्य आहे व विषयभोगानी पंगुत्व आलेले नाही तोपर्यंतच काम, क्रोध, लोभ, मोह यांचा त्याग करावा संतांच्या संगतीत राहण्यास कधी चुकू नका ४ आयुष्याची अखेर एकदा आली की, मग काही उपाय चालणार नाही सत्ता, संपत्ती या गोष्टी जागच्या जागी राहतील व जे कर्म तुम्ही साठविले असेल ते साक्ष देत पुढे जाईल तुकाराम महाराज म्हणतात मग त्यावरून तुम्हास यमाची आज्ञा होईल ५

६५६ ऐक पांडुरंगा एक मात । कांहीं बोलणें आहे एकांत ।
आम्हा जरी तारील संचित । तरी उचित काय तुझें ॥ १ ॥
उसनें फेडिता धर्म तो कोण । काय तया मानवेल जन ।
काय गा मिरवूनि भूषण । वाया थोरपण जनामध्यें ॥ २ ॥
अन्न जरी न मिळे तयासी देणें । आगांतुक पात्र उचित दान ।
उपकार तरी धनमंत्रीपणें । जरी देणेंघेणें नाहीं आशा ॥ ३ ॥

[1] घाली

शूर तों तयासी बोलिजे जाणा । पाठीशीं घालूनि राखे दीना ।
पार पुण्य नाहीं त्या भूषणा । ऐक नारायणा वचन हें ॥ ४ ॥
आतां पुढें बोलणें तें काई । मज तारीसी तरीच सही ।
वचन आपुलें सिद्धी नेईं । तुका म्हणे तईं मज कळसी ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– मात–गोष्ट, मंत्रीपणें–चांगल्या वैद्याने, तई–तेव्हाच.

अर्थ :– देवा, पांडुरंगा, तुमच्याशी काही एक गोष्ट एकान्तात करायची आहे. ती अशी की, आमचे कर्म जर आम्हांस तारणारे आहे, तर मग तू उचित असे काय करणार आहेस ? १ उसने घ्यायचे व मग ते फेडायचे, हा कुठला धर्म ? आम्ही चांगले कर्म करायचे व मग तुम्ही ते परतफेडीसाठी कृपा करून मोजायचे, हा कसा धर्म होईल? लोकांना तरी हे पटेल का ? याचे भूषण मिरविण्यात काय अर्थ ? उगाच जगात मोठेपण फशासाठी मिरविता ? २ ज्यास खायला मिळत नाही त्यास ते द्यावे. न बोलाविता जो येईल त्यास दान दिल्यास तेच उचित होईल जरी काही देणेघेणे नसले तरी, धनाची आशा नसली तरी, चांगल्या वैद्याने औषधोपचार करून उपकार करावेत. ३ जो दीन लोकांना पाठीशी घालून रक्षितो, तोच शूर मानावा. नारायणा, याच माणसाच्या पुण्याईस काही सीमा नाही, त्याच्या भूषणाला अंत नाही. हे माझे बोलणे देवा, सत्यच माना तुम्ही. ४ आता यापुढे बोलायचे तरी काय ? तू मला योग्य प्रकाराने तारशील तरच खरे. तुकाराम महाराज म्हणतात, आता तू आपले पतितपावन हे नाव सिद्धीस ने. त्याच वेळेस तू पतितपावन आहेस असे मी जाणीन. ५

६५७ चांगलें नाम गोमटें रूप । निवती डोळे हरती ताप ।
विठ्ठल विठ्ठल हा जप । प्रगट स्वल्प अति सार ॥ १ ॥
शस्त्र हे निर्वाणीचा बाण । निकट समय अवसान ।
कोठें योजेल दश दान । खंडी नारायण दुःख चिंतनें ॥ २ ॥
सकळ श्रेष्ठांचें मत । पावे सिद्धी पाववी अनंत ।
म्हणोनि व्हावें शरणागत । आहे उचित एवढेंचि ॥ ३ ॥
म्हणोनि रुसलों संसारा । सर्प विखार हा पांढरा ।
तुजशीं अंतर रे दातारा । याचि दावेदारानिमित्त ॥ ४ ॥
येणें मज भोगविल्या[1] खाणी । नसतां छंद लाविला मनीं ।
माजलों मी माझे भ्रमणीं । जाली बोडणी विटंबना ॥ ५ ॥
पावलों केलियाचा दंड । खाणी भोगिथिल्या उदंड ।
आतां केला पाहिजे खंड । तुका दंडवत घाली देवा ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा :– गोमटें–गोरे, सुरेख, निर्वाणीचा–शेवटच्या प्रसंगाचा, अवसान–देहाचा शेवट, दशदानें–गाय, भूमी, तीळ, सुवर्ण, तूप, वस्त्र, गूळ, लवण व गृह ही दहा दाने आपल्या धर्मग्रंथात सांगितली आहेत, खंडी–दूर करितो, बोडणी–नालस्ती.

अर्थ :– या श्रीहरीचे नाम व रूप चांगले देखणे व सुरेख आहे. हे पाहताच डोळे निवून जातात. पाप संपते. विठ्ठल विठ्ठल हा जप उघड असून अतिशय लहान व सारभूत असा आहे. १ आयुष्याच्या अखेरी अखेरीस तर हे नाम म्हणजे शरीराचा अंत जवळ आला असताना योजायचे शस्त्रच होय या श्रीहरीच्या नामापुढे दशदानांचीही

---

[1] भोगिल्या.

किमत फारशी नाही या नारायणाच्या चिंतनाने संसाराचे दुःख दूर होते २ सर्व श्रेष्ठ साधुसंताचे हे असेच मत आहे या नामामुळे सर्व सिद्धी व अनंतरूप हरी याची प्राप्ती होते म्हणून या श्रीहरीस त्याच्या नामरूपाच्या साह्याने शरण जावे एवढेच उचित असे वरण्यासारखे आहे ३ हा ससार म्हणजे एक पाढरा विषारी सर्प असून देवा दातारा, याच्यामुळे तुजमध्ये व आमच्यात फार अंतर पडते असा हा तापरूपी ससार मोठा दावेदार असल्याने मी त्याच्यावरच रुसलो आहे ४ याच ससाराच्या मोहामुळे मला नाना जन्म भोगावे लागले नाना नसत्या छंदांस याने मला लाविले, आणि याच्याच भ्रमात मी भ्रमण करीत राहिलो या कामी माझी फार नालस्ती व विटंबना झाली देवा ५ मी या ससाराच्या नादाने जे जे केले त्याचा पुरेपूर दंड मला मिळाला यामुळे पुष्कळ जन्माच्या खाणी मला भोगाव्या लागल्या तुकाराम महाराज म्हणतात, देवा, आता मात्र याचा शेवट व्हावयास हवा देवा तुमच्या पायावर माझे अनेक दंडवत आहेत ६

६५८ चांगला तरी पूर्णकाम । गोड तरी याचेचि नाम ।
दयाळु तरी अवघा धर्म । भला तरी दासा श्रम होऊं नेदी ॥ १ ॥
उदार तरी लक्ष्मीयेसी । जुंझार तरी कळिकाळासी ।
चतुर तरी गुणाचीच रासी । जाणता तयासी तो एक ॥ २ ॥
जुनाट तरी बहु काळा । न कळे जयाची लीळा ।
नेणता गोवळीं गोवळा । लाघवी अबळाभुलवणा ॥ ३ ॥
गाढया तरी भावाचा अंकित । बराडी तरी उच्छिष्टाची प्रीत ।
ओंगळ तरी कुब्जेशीं रत । भ्याड अनंत बहु पापा ॥ ४ ॥
खेळतो येणेंचि खेळावा । नट तो येणेंचि अवगावा ।
लपोनि जीवीं न कळे जीवा । धरिला देवा नातुडेसी ॥ ५ ॥
उंच तरी बहुतचि उंच । नीच तरी बहुतचि नीच ।
तुका म्हणे बोलिलो साच । नाहीं अहाच पूजा केली ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – गाढया–गावढळ बराडी–आशाळभूत आवगावा–अगी आणावा, नातुडसी–सापडत नाहीस आहाच–उगीच व्यर्थ

अर्थ – हा देव फार चागला म्हणून याचे वर्णन करावे, तर तो प्रत्यक्ष पूर्णकामच आहे याचे नावही गोड असल्याने त्या गोडीचे वर्णन काय करावे ? हा दयाळू आहे म्हणावे तर, सर्व धर्माचे सार जे दयालुत्व हे तोच आहे यास भला तरी किती म्हणावे ? हा आपल्या दासाना काहीही श्रम होऊ देत नाही १ हा मोठा उदार आहे याचे वर्णन करावे तर प्रत्यक्ष लक्ष्मीच याची दासी आहे याच्या शौर्याचे वर्णन करावे तर, हा कळिकाळास म्हणजे प्रत्यक्ष यमासही अजिंक्य आहे याला चतुर म्हणावे तर, हा एक गुणाचीच रास आहे त्याला जाणणारा तो एक स्वतःच आहे २ हा देव जुनाट म्हणून याचे वर्णन करावे तर त्याच्या लीलाचे वर्णन पुष्कळ काळासही करता येण्यासारखे नाही हा नेणता असून गवळ्याच्यात गवळी होऊन राहिला आहे आणि लाघवीपणात तो एवढा चतुर आहे की, त्याने सर्व गोपींना भुलविले आहे ३ हा देव गावढळ म्हणावा तर तो भक्तिभावामुळे वश होणारा असला हा अतिशय आशाळभूत असून भक्त लोकाच्या उच्छिष्टाचे यास मोठेच प्रेम असते हा देव इतका ओंगळ की आठ ठिकाणी वक्र असणाऱ्या कुब्जेशी हा रममाण झाला असून, अनंत पापे करणाराना हा अतिशय भयदायक आहे ४ नाना प्रकारचे खेळ ते याच देवाने खेळावेत नाना प्रकारची अभिनयाची सोंग याने अंगी आणावीत हा जीवाच्या मध्ये लपून राहिलेला असल्याने कुणास कळून येत नाही याला धरायला जावे तर, हा कुणाच्याच हातात सापडत

नाही ५ हा देव उच म्हणावा तर फार उच आकाशाएवढा आहे लहान म्हणावा तर अणुरेणुपेक्षाही लहान आहे तुकाराम महाराज म्हणतात, हे जे मी सांगितले आहे, ते सर्व खरेपणाचे असून उगीच व्यर्थ स्तुती केली असे नाही ६

६५९ काय आम्ही भक्ति करणे कैसी । काय एक वाहावे तुम्हासी ।
अवघा भरोनि उरलासी । वाणीं खाणीं रसीं रूपीं गधीं ॥ १ ॥
कसे करु इद्रिया बधन । पुण्यपापाचे खडण ।
काय व्रत करु आचरण । काय तुजविण उरले तें ॥ २ ॥
काय डोळे झाकुनिया पाहू । मत्रजप काय ध्याऊ ।
कवणे ठायी धरुनि भाव । काय ते वाव तुजविण ॥ ३ ॥
काय हिंडो कवण दिशा । कवणे ठायीं पाय ठेवू कैसा ।
काय तू नव्हेसि न कळे तैसा । काय मी कैसा पाहो आता ॥ ४ ॥
तुझिया नामाची सकळ । पूजा अर्चन मन माळ ।
धूप दीप नैवेद्य फळ ताबूल । घेऊ पुष्पाजुळ तुका म्हणे ॥ ५ ॥

शरीर उत्तम चांगले । शरीर सुखाचें घोसुलें ।
शरीरें साध्य होय केलें । शरीरें साधलें परब्रह्म ॥ २ ॥
शरीर विटाळाचें आळें । मायामोहपाशजाळें ।
पतन शरीराच्या मुळें । शरीर काळें व्यापिलें ॥ ३ ॥
शरीर सकळ हे शुद्ध । शरीर निधींचा ही निध ।
शरीरें तुटे भवबंध । वसे मध्यें भोगी देव शरीरा ॥ ४ ॥
शरीर अविद्येचा बाधा । शरीर अवगुणाचा राधा ।
शरीरीं वसे बहुत बाधा । नाहीं गुण सुदा[1] एक शरीरीं ॥ ५ ॥
शरीरा सुख नेदावा भोग । न द्यावें दुःख[2] न करीं त्याग ।
नव्हे वोखटें ना चांग । तुका म्हणे वेग करीं हरिभजनीं ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – थार–ठिकाण, स्थान, घोसुलें–घड, सुदा–चांगला, वेग–जलदीने

अर्थ – हे शरीर म्हणजे दुःखाचे कोठारच होय. शरीर हे अनेक रोगाच्या निवासाचे भांडारच होय. शरीर हे अनेक पापांचे आधारस्थानच होय. या शरीराएवढे अपवित्र काय आहे? १. पण शरीर हे अतिशय उत्तमही आहे. शरीर म्हणजे अनेक सुखाचा घडच्या घड मानावा. याच शरीरामुळे जे मनात धरावे ते साध्य होते. परब्रह्माची साधनाही याच शरीराच्या साह्याने करायची असते. २. हे शरीर म्हणजे विटाळाचे गोठलेले आळेच समजावे. माया, मोह, पाश यांचे जाळे म्हणजे हे शरीर समजावे. या शरीराच्याचमुळे पतनाचा, स्खलनाचा प्रसंग येतो. या शरीरावर काळाची नजर एकसारखी असते. ३. हे मानवी शरीर अतिशय शुद्ध आहे. शरीर हे सर्व धनाच्या साठ्याचा साठा आहे. याच शरीरामुळे संसाराची बंधने तुटतात. याच शरीराच्या मध्यभागी देवाची वसती असते. ४. हे अविद्येचा बाधा म्हणजे साठाच होय. साऱ्या दोषांचे रसायन या शरीरात असते. या शरीरात फारच बाधा निर्माण झालेल्या असतात. या शरीरात एकसुद्धा चांगला गुण नाही. ५. म्हणून या शरीराला नाना प्रकारचे भोग देऊन सुख देऊ नये. त्याचा त्याग करून दुःखही देऊ नये. तर तुकाराम म्हणतात, स्वतः शरीर आपण होऊन चांगलेही नाही व वाईटही नाही. त्यास त्वरेने हरिभजनाकडे लावावे, म्हणजेच त्याचे रूप चांगले निर्माण होईल. ६.

विवरण —पंचमहाभूतांनी बनलेला हा गोळा म्हणजे शरीर. मातेच्या उदरात नऊ मास अत्यंत हाल काढून याचा जन्म झाला. याच्यात बाह्य रूपाचा मग थाट सुरू झाला. याच चोचले सुरू झाले. याचीच हिंमत वाढली. देहात्मभावच वाढून बसला. या देहामध्ये निवास करणारा दुसरा कुणी धनी आहे, हे विसरून हा देहधारी मनुष्य पंचविषयांतच रममाण झाला. म्हणून साधुसंतांनी या देहाची भरपूर निंदा केलेली दिसते. हा देह म्हणजे मलमूत्राचे कोठार, दुर्गंधीचा साठा, असे वर्णन वाचून संत हे शरीरसौंदर्याचे, देहाच्या लावण्याचे द्वेष्टे होते, असा गैरसमज होण्याचा संभव असतो. संतांना देहाचे माहात्म्य मान्य होते, ते देह हा एक परमार्थसाधनाचा, ईश्वरप्राप्तीचा सर्वोत्तम उपाय म्हणून. याच मानवी देहाच्या साह्याने आपणास आपण चिंतू ती वस्तू साध्य करून घेता येते. ईश्वरप्राप्तीचे एक फार महत्त्वाचे असे साधन. म्हणून या शरीराकडे पाहिल्यास या शरीराइतके उत्तम दुसरे काय आहे? असाच प्रकल सर्व संत विचारीत असताना दिसतील. निवृत्तीनाथांनी 'देहीं देव आहे हें बोलती वेद', 'निवृत्ती पहातु देहामाजी प्रातु देखोंचि विसतु सर्वांघटीं' असा शब्दांत देहाचे महत्त्व वर्णन केले आहे. या देहामध्ये देव पाहण्याचा निवृत्ती हे फारे भार आहे. 'नरदेह परमपावन । तरी साधी ब्रह्मज्ञान', 'देह सांडावा ना मांडावा । येणें परमार्थचि साधावा' असाच निर्वाळा एकनाथांनी दिलेला आहे. 'दोंहि देखिली पंढरी' हे नामदेवांना लाभलेले सुख देहामुळेच ना? 'धन्य धन्य तें शरीर । जेथ कथा निरंतर,' 'नरदेह उत्तम चांग । धरा संग कीर्तनासी' या शब्दांनी एकनाथांनी या नरदेहाचे माहात्म्य वर्णन केले आहे.

1 सुधा, 2 सुख

समर्थ रामदासांनी संसारदुःखाचे व नरदेहाचे अत्यंत किळसवाणे असे वर्णन केले असले तरी, सिद्धान्त मांगताना त्यांनी देहाची प्रतिष्ठा मान्य करून या दुर्लभ देहाचा यथायोग्य उपयोग कसा करावा तेच सांगितले आहे. 'धन्य धन्य हा नरदेहो। येथील अपूर्वता पाहो। जो जो कीजे परमार्थ लाहो। तो तो पावे सिद्धीतें' या भाषेत नरदेहाचे महत्त्व वर्णन करून समर्थांनी म्हटले आहे, 'नरदेह पांगुळ असतां। तरी तो कार्यास न येतां। अथवा थोटा जरी असतां। तरी परोपकारास न ये' या शब्दावरून शरीराचे ध्येय काय असावे हेही ध्यानात येणारे आहे. हे शरीर अस्थिमांसाचा पुतळा असले तरी, याच्याच साह्याने आपण सर्व कलात निपुण होऊन ईश्वरनिष्ठ व्हायचे असते. 'अस्थिमासांचा पुतळा। जेणे ज्ञानें सकळा कळा। शरीर भेद वेगळा ठाईं ठाईं।' असा समर्थांचा या शरीराविषयी विवेक आहे. तुकाराम महाराज म्हणतात त्याप्रमाणे, हे शरीर स्वतः होऊन काही चांगले अथवा वाईट नाही. ते ईश्वराच्या भजनास लावावे, परमार्थप्रवण करावे, म्हणजे ते 'सुखाचे घोमुले' कसे आहे याची प्रचीती येईल

६६१ इतुलें करीं भलत्या परी। परद्रव्य परनारी।
सांडुनि अभिलाष अंतरीं। वर्ते वेव्हारीं सुखरूप ॥ १ ॥
न करीं दंभाचा सायास। शांती राहें बहुवस।
जिव्हे सेवीं सुगंधरस। न करीं आळस रामनामीं ॥ २ ॥
जनमित्र होईं सकळांचा। अशुभ न बोलावी वाचा।
संग न धरावा दुर्जनाचा। करीं संतांचा सायास ॥ ३ ॥
करिसी देवाविण आस। अवघी होईल निरास।
तृष्णा वाढविसी बहुवस। कधीं सुखास न पवसी ॥ ४ ॥
धरूनि विश्वास करीं धीर। करितां देव हाचि निर्धार।
तयाचा वाहे योगक्षेमभार। नाहीं अंतर[1] तुका म्हणे ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– भलत्या परी–कोणत्याही प्रकाराने, बहुवस–पुष्कळ.

अर्थ :– कोणत्याही प्रकाराने का होईना, पण तू इतके तरी कर. दुसऱ्याचे द्रव्य व दुसऱ्याची स्त्री यांची इच्छा सोडून दे आणि मग खुशाल सांसारिक व्यवहार कर. १ दांभिकपणे कुठलेही प्रयत्न करू नकोस. पुष्कळ शांतता धारण कर. जिभेने हरिनामाच्या सुगंधाचे सेवन कर. रामनामाच्या उच्चारात आळस करू नकोस २ सगळ्यांचा जिवलग मित्र हो. वाणीने अशुभ उच्चार कधी करू नकोस. वाईट लोकांची संगत कधी धरू नये. संतानी सांगितलेल्या भक्तिमार्गाने जाण्याचा तू प्रयत्न कर. ३ देवावाचून जर काही इतर इच्छा करशील, तर मात्र मग तुझी निराशा होईल फार. फार तृष्णा वाढविलीस तर मग कधीच सुख तुला होणार नाही ४ श्रीहरीवर विश्वास ठेवून मोठ्या धीराने वर्तन कर. सर्व काही करणारा हा देवच आहे, असा विश्वास मनात धारण कर. तुकाराम महाराज म्हणतात, हा देव आपल्या योगक्षेमाचा भार वाहतो, काही कमी पडू देत नाही. ५

६६२ संसारसिंधु हा दुस्तर। नुलंघवे उलंघितां पार।
वहुत वाहाविलें दूर। न लगेचि तीर पैल थडी ॥ १ ॥
किती जन्म जाला फेरा। गणित नाहीं जी दातारा।
पडिलों आवर्तीं भोंवरा। बहुता योरा योळसिया[2] ॥ २ ॥
वाढलों परी नेणती बुद्धी। नाहीं परतली धरिली शुद्धि।
मग म्यां विचारावें कधीं। ऐसी संधी सांडूनियां ॥ ३ ॥

१ अतपार, २ घोळसिया.

अनेक खाणीं आहार निद्रा । भयमैथुनाचाचि थारा ।
बाळत्व तारुण्य जरा । प्रधान पुरा भोग तेथें ॥ ४ ॥
ऐसीं उलंघूनि आलो स्थळें । बहु भोवंडिलो काळें ।
आतां हे उगवावें जाळें । उजेडा बळें दिवसाच्या ॥ ५ ॥
सांडीन या संसाराची वाट । बहु येणे भोगविले कष्ट ।
दावी सत्या ऐसे नष्ट । तुका म्हणे भ्रष्ट जालो देवद्रोही ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा:– दुस्तर–तरून जाण्यास कठिण, गणित–हिशेब, आवर्ती–चक्रात, खाणी–योनी, जन्म, भोवडिले–दमविले, उगवावे–मुक्त व्हाव

अर्थ – हा ससाररूपी सागर तरून जाण्यास फार कठिण असा आहे हा ओलाडून जाण्याचा प्रयत्न केला तरी तो ओलाडिता येत नाही आजवर पुष्कळच या ससारसागराच्या पुरातून वाहून गेले त्याना पैलतीर हाती लागलाच नाही १ देवा, कित्येक जन्माचा फेरा चालू आहे दातारा, याचा काही हिशेबच नाही मजजवळ, या जन्माच्या चक्रात मी अवचितपणे सापडलो आहे फार मोठ्या सकटातून फिरतो आहे २ माझे वय वाढले, पण त्या मानाने बुद्धी काही वाढली नाही. मी अज्ञानीच राहिलो माझ्या बुद्धीने परमार्थाविषयी काही आस्था धारण केली नाही अशा अवस्थेत मी परमार्थाविषयी विचार तरी कधी करावा? ३ अनेक जन्मातून आहार, झोप, भय, मैथुन याचीच वस्ती झाली बाल्य, तारुण्य, वृद्धत्व, यातून भोगानाच प्राधान्य मुख्यत मिळाले ४ अशा प्रकारच्या अनेक जन्माची स्थळे उल्लघून मी आलो पण या काळाने मला फार दमविले आता या प्रपचाच्या जाळ्यातून मुक्त व्हावे व दिवसाच्या साह्याने सुटका करून घ्यावी असे वाटते ५ आता या ससाराचा मार्ग मी सोडूनच देणार आहे या प्रपचमोहाने फार कष्ट झाले मला तुकाराम महाराज म्हणतात, हा नष्ट, दुष्ट ससार खोटा असून खऱ्यासारखा भासतो, आणि त्यामुळेच देवाचा द्रोह करून आपण भ्रष्ट झाल्यासारखे होतो ६

६६३ विठ्ठल भीमातीरवासी । विठ्ठल पंढरीनिवासी ।
विठ्ठल पुंडलिकापासी । कृपादानाविसीं उदार ॥ १ ॥
विठ्ठल स्मरणा कोंवळा । विठ्ठल गौरवीं आगळा ।
आधार ब्रह्मांडा सकळा । विठ्ठल लीळाविग्रही ॥ २ ॥
उभाचि परी न मनी सीण । नाही उद्धरिता भिन्न ।
समर्थाचे घरीं एक अन्न । आर्तभूता क्षणोक्षणा सांभाळी ॥ ३ ॥
रुचीचे प्रकार । आणिताती आदरें ।
कोठें ही न पडे अंतर । थोरा थोर धाकुट्या धाकुटा ॥ ४ ॥
करिता बळ धरिता नये । झोंबता डोळे मनेंच होय ।
आपुल्या उद्देशाची सोय । जाणे हृदयनिवासी ॥ ५ ॥
पान्हा तरी आल्या अंतर तेथें । तो नाहीं भरिलें रितें ।
करितो सेवन आइतें । तुका म्हणे चित्तें चित्त मेळवूनी ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा .– दानाविसीं–दानाविषयी, आर्तभूता–दुःखी झालेल्या प्राण्याना

अर्थ :–हा आमचा विठ्ठल देव भीमातीरावर निवास करून पढरपुरात उभा आहे पुडलीकापाशी हा तिष्ठत उभा आहे. भक्ताच्यावर कृपा करण्यासाठी हा फार उदार आहे १ हा विठ्ठल स्मरण करणाराना अतिशय कोवळा असून, त्याचा आणखी गौरव करणे कठिण आहे या गौरवाच्या पलीकडे तो आहे साऱ्या ब्रह्माडास त्याचा आधार

असतो त्याच्या लीला सर्वत्र असतात. २ हा देव उभा असला तरी, त्याबद्दलचे दु:ख कधी मानीत नाही. भक्तांचा उद्धार करिताना हा भेदभाव मानीत नाही. समर्थांच्या घरी, श्रीमंताच्या घरी जसे सर्वांना एकाच प्रकारचे अन्न मिळते, त्याप्रमाणे भुकेने दु:खीकष्टी झालेल्यांना हा देव क्षणोक्षणी सांभाळीत असतो. ३ मोठ्याच्या घरी नाना रुचींचे, नाना प्रकार अन्नाचे केलेले असतात, मोठ्या आदराने वाढायला आणतात. त्यावेळी थोरांना थोर पदार्थ, लहानांना किरकोळ पदार्थ, असा भेदभाव कुणी करीत नसतात. ४ हा देव नुसत्या बळाने कधी हातात सापडत नाही. डोळ्यांनी त्याच्याकडे निरखून पाहताच सारे मनच तदाकार होऊन जाते. आपल्या भक्ताच्या मनातील उद्देश हा हृदयनिवासी विठ्ठल जाणून असतो ५ कुणी प्रेमी भक्त आल्यास प्रेमपान्ह्यास कधी अंतर पडत नाही. तो पान्हा कधी संपतो असे घडतच नाही. तुकाराम महाराज म्हणतात, अशा या आयत्या प्रेमपान्ह्याचे सेवन मी त्याच्या चित्तात माझे चित्त मिळवून करीत आहे. ६

६६४ ताप हें हरण श्रीमुख । हरी भवरोगा ऐसें दुःख ।
अवलोकितां उपजे सुख । उभें सन्मुख दृष्टीपुढें ॥ १ ॥
न पुरे डोळियांची धणी । सखोल कृपेचीच खाणी ।
स्तवितां न पुरे वेदवाणी । तो हा समचरणी कृपानिधी ॥ २ ॥
रामकृष्णध्यान वामननारसिंहीं । उग्र आणि सौम्य कांहींच नाहीं ।
सांपडे भरलीये वाही । भाव शुद्ध पाहीं याचें भातुकें ॥ ३ ॥
गुणगंभीर चतुर सुजाण । शूर धीर उदार नारायण ।
व्यापक तरी त्रिभुवन । मनमोहन लावण्य हें ॥ ४ ॥
ठाण हें साजिरें सुंदर । अविनाश अविकार ।
अनंत आणि अपार । तो हा कटीं कर धरिताहे ॥ ५ ॥
जयाची वाणी सुमनमाळा । परमामृतजिव्हाळा ।
अनंता अंगीं अनंत कळा । तुका जवळा चरणसेवक[1] ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा :– उपजे–निर्माण होते, धणी–तृप्ती.

अर्थ :–या श्रीहरीचे मुख इतके सुंदर आहे की, याकडे पाहताच सर्व ताप दूर होतात. भवरोगासारखे कठिण दुःखही दूर होते. याला पाहताच मोठे सुख निर्माण होते. माझ्या दृष्टीपुढेच हे सुख उभे आहे १ याला कितीही पाहिले तरी, डोळ्याची तृप्ती होत नाही. याच्या कृपेची खाण मोठी आहे याचे स्तवन करिताना वेदवाणीही पुरी पडत नाही. असा हा सारख्या पावलाचा श्रीहरी, कृपेचा साठा श्रीविठ्ठल उभा आहे. २ रामकृष्ण हे रूप वामनासारखे या नरसिंहासारखे प्रथम उग्र, मग सौम्य, अथवा प्रथम सौम्य मग उग्र असे काहीच नाही. याच्याकडे भक्तीच्या प्रवाहाने येणाऱ्या व भक्तिभावाने पाहणाऱ्या सेवकांनाच हा प्राप्त होतो. शुद्ध भाव हाच याचा प्रेमाचा खाऊ आहे ३ हा श्रीहरी गुणांनी गंभीर, चतुर, सुजाण, शूर, धीर, उदार असून त्रिभुवनांत भरून राहिलेला आहे. याचे सौंदर्य मन मोहून टाकणारे आहे. ४ या नारायणाचे हे स्थान अतिशय सुंदर व शोभिवंत असे असून ते अविनाशी व अविकारी आहे. त्याचे स्वरूप अनंत व अपार असूनही हा देव कमरेवर हात धरून उभा आहे. ५ याची वाणी म्हणजे फुलांची माळच आहे. याची कृपा म्हणजे जिव्हाळ्याचे व प्रेमाचे अमृतच होय. तुकाराम महाराज म्हणतात, या अनंताच्या अंगी अनंत कला असून याच्याजवळ हा सेवक उभा आहे. ६

---

[1] चरण सेवे.

# कान्होबा० नाट अभंग ८

६६५ अगा ये वैकुंठनायका । अगा ये त्रैलोक्यतारका ।
अगा जनार्दना जगव्यापका । अगा पाळका भक्ताचिया ॥ १ ॥
अगा ये वसुदेवदेवकीनंदना । अगा ये गोपिकारमणा ।
अगा बळिबंध वामना । अगा निधाना गुणनिधी ॥ २ ॥
अगा ये द्रौपदीबांधवा । अगा ये सखया पांडवा ।
अगा जीवाचिये जीवा । अगा माधवा मधुसूदना ॥ ३ ॥
अगा महेश्वरा महाराजा । अगा श्रीहरी गरुडध्वजा ।
अगा सुंदरा सहस्रभुजा । पार मी तुझा काय वर्णू ॥ ४ ॥
अगा अबन्ध्यपिपरंपरा । निरालंबा[1] निर्विकारा ।
अगा गोवर्धन धरणीधरा । अगा माहेरा दीनाचिया ॥ ५ ॥
अगा धर्मराया धर्मशीळा । कृपासिंधु कृपाळा ।
अगा प्रेमाचिया कल्लोळा । सकळकळाप्रवीणा ॥ ६ ॥
अगा चतुरा सुजाणा । मधुरागिरा सुलक्षणा ।
अगा उदारा असुरमर्दना । राखें शरणा तुकयाबंधु ॥ ७ ॥

शब्दार्थ व टीपा – निधाना–साठा, पार–अंत मधुरागिरा–मधुरवाणी असलला असुरमर्दना–असुराचा नाश करणारा

अर्थ – अरे वैकुंठनायका, माझे रक्षण करण्यास तू ये अरे त्रैलोक्याचे रक्षण करणाऱ्या देवा, अरे जनार्दना, सर्व जगास व्यापून राहणाऱ्या देवा भक्ताचे पालन करणाऱ्या देवा, मी तुला शरण आहे १ अरे वसुदेवदेवकीच्या मुला, अरे गोपिकाच्या रमणा अरे बळिराजास बांधून नेणाऱ्या वामना, अरे अनेक गुणाच्या साठ्या, मी तुला शरण आलो आहे २ अरे द्रौपदीच्या सख्या अरे मित्रा पांडवा, अरे माझ्या जीवाच्या जीवा अरे माधवा, अरे मधु नावाच्या दैत्याचा नाश करणाऱ्या मधुसूदना, मी तुला शरण आलो आहे ३ अरे महेश्वरा, अरे महाराजा, अरे श्रीहरी, ज्याच्या ध्वजावर गरुडाचा निवास आहे, अशा गरुडध्वजा, अरे सुंदरा, अरे हजार हाताच्या सहस्रभुजा, तुझ्या स्वरूपवर्णनास अंत नाही त्याचे मी काय वर्णन करू ? ४ अरे देवा, अवतारांची परंपरा तुझ्यापासूनच आहे तुला कुठलाही आधार नसल्याकारणाने तू निरालंब आहेस, तू निर्विकार आहेस अरे हातावर गोवर्धन धारण करणाऱ्या धरणीधरा अरे दीनाच्या माहेरा मी तुला शरण आलो आहे ५ अरे धर्मराजा अरे धर्मशीला, तू कृपेचा सागर आहेस अरे प्रेमाच्या कल्लोळा तू सर्व कलांत प्रवीण आहेस ६ अरे चतुरा, सुजाणा, अत्यंत गोड वाणी असणाऱ्या मधुरागिरा, सुलक्षणा, अरे उदारा, अरे असुराचा नाश करणाऱ्या असुरमर्दना, हा तुकयाबंधू तुला शरण आला आहे त्याचे रक्षण तू कर ७

विवरण – नाटाच्या या प्रसिद्ध अभंगातील या पुढचे सहामात अभंग तुकयाबंधू या मुद्रेने अंकित झालेले आहेत तुकयाबंधू याचे दोन अर्थ होऊ शकतात एक तुकारामबुवांचे धाकटे बंधू कान्होबा याच खरी हे अभंग असावेत, किंवा तुकयाबंधू म्हणजे भक्तजनाचा बंधू तुकाबा असाही अर्थ असणे संभवनीय आहे तुकारामाच्याच विचाराची छाप याही अभंगावर दिसते मागे अभंग क्र० ६४६ मध्ये ज्याप्रमाणे तुकारामबुवांनी अतिशय अर्थगर्भ, मनोहर आणि साभिप्राय विशेषणे वा संबोधन वापरून भाव व्यक्त केला आहे, त्याचप्रमाणे याही अभंगात तुकयाबंधू कान्होबा यांनी ईश्वराशी आपले नाते वर्णन केले आहे

---

१ निळारंभ

६६६ उभा देखिला भीमातीरीं । कर मिरवले कटावरी ।
पाउलें तरी समचि साजिरीं । नाम तरी अनंत अतिगोड ॥ १ ॥
शंखचक्रांकित भूषणें । जडितमेखळा चिद्रत्नें ।
पीतांबर उटी शोभे गोरेपणें । लोपली तेणें रवितेजें ॥ २ ॥
श्रवणीं कुंडलें देती ढाळ। दशांगुळी मुद्रिका माळ ।
दंतओळी हिरे झळाळ । मुख निर्मळ सुखरासी ॥ ३ ॥
कडीं कडदोरा वांकी वेळा । बाहीं बाहुवटे पदक गळां[1] ।
मृगनाभी रेखिला टिळा । लवती डोळां विद्युल्लता ॥ ४ ॥
सुंदरपणाची साम्यता । काय वर्णूं ते पावे आतां ।
तुकयाबंधु म्हणे रे अच्युता । धन्य ते मातापिता प्रसवली ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा .– जडितमेखळा–रत्नजडित कमरपट्टा, चिद्रत्नें–चैतन्यरूपी रत्ने, ढाळ–तेज, दशांगुळी–दहा बोटांत, मुद्रिका–मुद्रांकित अंगठ्या, कडीं–कमरेला, बाहीं–दंडावर, बाहुवटे–बाहुभूषणे, मृगनाभी–कस्तुरी

अर्थ :– हा श्रीविठ्ठल मी आज भीमेच्या तीरावर उभा राहिलेला पाहिला. याने आपले हात कमरेवर ठेवून मिरविले आहेत. याची पावले समान असून अत्यंत शोभिवंत अशी आहेत. याचे नाव अनंत रूपांत असून अतिशय गोड असे आहे. १ शंख, चक्र इत्यादींनी अंकित झालेली भूषणे याने घातली आहेत. चैतन्याच्या रत्नांनी याचा कमरपट्टा जडविलेला आहे. याच्या गोरेपणामुळे याचा पीतांबर व याच्या अंगची उटी या गोष्टी शोभून दिसतात. याच्या तेजाने सूर्याचेही तेज लोपून गेलेले दिसते २ याच्या कानांत कुंडले शोभत असून त्यांचा प्रकाश पडत आहे. याच्या दहाही बोटांत रत्नजडित अंगठ्या असून याच्या गळ्यात माळ आहे. याच्या मुखातील दातांची ओळ हिऱ्याप्रमाणे चमकत आहे. याचे मुख निर्मळ असून ते एक अवीट अशा सुखाच्या राशीप्रमाणे आहे. ३ याच्या कमरेस करगोटा आहे. याच्या दंडांवर वाक्या व इतर बाहुभूषणे शोभून दिसतात. याच्या गळ्यात पदक लोंबत असते. मृगाच्या नाभीतून मिळालेल्या कस्तुरीचा टिळा याच्या कपाळावर आहे. याचे डोळे विद्युल्लतेप्रमाणे चमकणारे आहेत. ४ या श्रीहरीच्या सुंदरपणाची साम्यता काय वर्णन करावी ? तुकयाबंधू म्हणत आहे की, अरे अच्युता, जी माता तुला प्रसविली ती धन्य होय. ५

६६७ एक मागणें हृषीकेशी । चित्त द्यावें सांगतों वचनासी ।
मज अंतर तुझ्या चरणासी । न पडे ऐसी कृपा करीं ॥ १ ॥
नको दुजी बुद्धि आणीक । रिद्धिसिद्धी परलोक ।
तूं स्वामी मी सेवक । खंडणा नको करूं ऐसी ॥ २ ॥
मना येईल तो जन्म देईं । भलते कुळीं भलते ठायीं ।
तें मी सांकडें घालीत नाहीं । हृदयींहूनि तूं न वजें ॥ ३ ॥
इतुले करीं भलत्या परी । भलत्या भावें तुझे द्वारीं ।
राहेन दास होऊनि कामारी । वदो वैखरी नित्य नाम ॥ ४ ॥
नको विचारूं दुसरें आतां । शरण आलों जी पंढरीनाथा ।
तुकयाबंधु म्हणे रे अच्युता । आहेसि तूं दाता दानशूर ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :–खंडणा–विरोध, सांकडें–संकट, न वजें–दूर होत नाहीस, कामारी–सेवक, वैखरी–वाणी.

[1] माळा.

अर्थ – अरे हृषीकेशी, तुझ्याजवळ एकच मागणे आहे मी नीट सागतो, ते तू चित्त लाऊन ऐक तुझ्या चरणांशी माझे अतर पडू देऊ नकोस, येवढी कृपा कर १ याशिवाय मजविषयी दुसरी बुद्धी तू धरू नकोस मला रिद्धीसिद्धी नकोत, मला परलोक नको केवळ तू स्वामी व मी सेवक असे एकच नाते राहू दे यामध्ये मात्र विरोध होऊ नये २ तुझ्या मनास येईल तो जन्म मला तू दे कोणत्याही कुळात, कोणत्याही ठिकाणी तू मला जन्मास घाल हे सकट काही मी तुझ्यावर घालत नाही पण माझ्या हृदयातून तू दूर होत नाहीस हे मात्र पाहा ३ तू एवढेच करावेस, मग मी कोणत्याही प्रकारे, कोणत्याही भावाने तुझ्या दारात येईन व तुझे काम करणारा सेवक होऊन राहीन माझी वाणी तुमचेच नाम नेहमी गात राहील ४ आता या खेरीज दुसरे काही विचारू नकोस पढरीनाथा, मी तुला आता शरण आलो आहे तुकयाबधू म्हणत आहे की, अरे अच्युता, तू दाता व दानशूर असा आहेस ५

६६८ कई देखता होईन डोळीं । सकळा भूतीं मूर्ति सावळी ।
जीवा नाव भूमडळीं । जळीं स्थळीं काष्ठीं पाषाणीं ॥ १ ॥
ऐसा कृपा करील नारायण । जीव जगाचा होईन ।
प्रेमसागरीं बुडईन । होईल स्नान अनुतापीं ॥ २ ॥
ऐसा कईं येईन दैवास । दृश्य नासोनि जाईल आस ।
सदा सतचरणीं देहाचा वास । सेवीन शेष धणीवरी ॥ ३ ॥
कई नवसा येतील अकुर । सुखा नाहींसा होईल पार ।
अमृत ते पृथ्वीजळ सागर । वाहातो पूर आनदाचे ॥ ४ ॥
प्रसन्न दया क्षमा शांति । कईं नवविधा होईल भक्ति ।
भोगीन वैराग्यसपत्ति । मनोरथ कळती तई पुरले ॥ ५ ॥
तुकयाबधु म्हणे साग । नव्हे तुजविण निरसेना पाग ।
म्हणोनि घातले साष्टाग । पाडुरगा वरी चरणा ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – अनुतापीं–वैराग्यात, पश्चात्तापाने धणीवरी–आनदाने, पाग–इच्छा

अर्थ – देवा, या माझ्या डोळ्यानी सर्वभूतमात्रामध्ये तुझी सावळी मूर्ती कधी, बरे पाहीन ? या भूमडळात, जळात, स्थळात, काष्ठात, पाषाणात जीवाना तुझेच नाव आहे १ नारायणा, माझ्यावर अशी कृपा कर की, या जगाचाच मी जीव होईन प्रेमसागरात बुडी देईन वैराग्याच्या किंवा पश्चात्तापाच्या पाण्यात स्नान करीन २ असे माझे दैव कधी होईल की, दृश्य असणारे जग नाहीसे होऊन माझी आशाही नष्ट होईल नेहमी सतचरणी वास करीन व त्यांचे उच्छिष्ट मोठ्या आनदाने सेवन करीन ३ या माझ्या नवसाला कधी अकुर फुटतील ? अपार असे सुख मला कधी प्राप्त होईल ? या पृथ्वीवर आनदामृताच्या सागराचे पूर कधी वाहू लागतील ? ४ प्रसन्नता, दया, क्षमा, शाती इत्यादींची व नवविधा भक्तीची प्राप्ती मला कधी होईल ? वैराग्यसपत्ती मी कधी भोगीन ? माझे सर्व मनोरथ पूर्ण कधी होतील ? ५ तुकयाबधू म्हणत आहे की देवा, तुझ्याशिवाय माझी ही इच्छा कुणीही पूर्ण करणार नाही म्हणूनच देवा, पांडुरगा तुमच्या चरणावर साष्टाग नमस्कार मी घातले आहेत ६

६६९ तू बळिया शिरोमणी । आहेसि माजी ये त्रिभुवनीं ।
रिघालो पाठी तुझी म्हणउनी । आता करीन मी असेल ते ॥ १ ॥
तूं देवा प्रतापदिनकर । सुरा असुराचा सुर ।
महावीरा वीर धनुर्धर । मी तो पामर काय तेथें ॥ २ ॥

कृपासिंधु दीनवत्सल । फोडिली देवाची बंदशाळ ।
संहारूनि राक्षसदळ । शरणागत राज्यीं स्थापिला ॥ ३ ॥
उपक्रम करावा बहुत । तरी तूं जाणसी धर्मनीत ।
उचित काय तें अनुचित । राखें शरणागत आलों आतां ॥ ४ ॥
किती म्यां काय विनवावें । शरण आलों जीवें भावें ।
तुकयाबंधु म्हणे करावे । क्षेम अवघें येणें काळें ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– प्रतापदिनकर–पराक्रमरूपी सूर्य, बंदशाळ–वंदिशाळा, तुरुंग.

अर्थ :– देवा, या त्रिभुवनांत तू सर्व बलवानांचा बलवान आहेस, म्हणूनच मी तुझ्या पाठीमागे निघालो आहे. आता माझ्या मनात जे असेल ते मी करीन. १ देवा, तू पराक्रमरूपी सूर्य आहेस, देवासुरांचा देव आहेस, महावीरांचा धनुर्धर वीर आहेस. अशा तुझ्यापुढे मी पामर काय? २ तू कृपासिंधू आहेस, दीनवत्सल आहेस, तू देवांची वंदीशाळा फोडलीस, राक्षसांचा संहार केलास आणि जे शरण आले त्यांना राज्यावर बसविलेस. ३ मला खूप नवे नवे उपक्रम करावेसे वाटतात. परंतु तू धर्मनीती जाणणारा आहेस, उचित काय, अनुचित काय, हेही तू जाणतोस. मी तुला शरण आलो आहे. तू आता माझे रक्षण कर. ४ मी आता तुला किती विनंती करावी? मी जीवाभावाने तुला शरण आलो आहे. तुकयाबंधू म्हणत आहे की, या वेळेस माझे सर्व कल्याणाचे असेल ते करावे ५.

६७० देवा मी चांडाळ चांडाळ । म्हणतां लागताहे वेळ ।
नसे पाहातां भूमंडळ । ऐसा अमंगळ खळ दुसरा ॥ १ ॥
जन्मा उपजलियापासुनी । असत्य कर्म तें अझुनी ।
सत्य आचरण नेणें स्वप्नीं । निखळ खाणी अवगुणांची ॥ २ ॥
भक्ति दया अथवा कथा । कानीं न साहवे वार्ता ।
अखंड विषयांची वेथा । अधम पुरता अधमाहुनी ॥ ३ ॥
काम क्रोध दंभ अहंकार । गर्व ताठा मद मत्सर ।
यांचे तरी माहेरघर । परउपकार वैरी तैसा ॥ ४ ॥
निंदा द्वेष घात विश्वास । करितां नाहीं केला आळस ।
करूं नये ते केले संतउपहास । अभक्ष तें ही भक्षिलें ॥ ५ ॥
पाळिलें नाहीं पितृवचन । सदा परद्वारीं परधनीं ध्यान ।
बोलों नये घडलें ऐसें अन्योन्यविण । दासीगमन आदिकरूनी ॥ ६ ॥
कायामनें वाचाइंद्रियांशीं । सकळ पापांचीच राशी ।
तुकयाबंधु म्हणे ऐसियासी । आलों हृषीकेशी तुज शरण ॥ ७ ॥

उपकार करणे, हा गुण तर मला वंध्यासारखा वाटतो. ४ दुसऱ्याची निंदा, द्वेष, विश्वासघात वगैरे करताना मी आळस केलेला नाही. जे करू नयेत ते दोष मी केलेले आहेत. संतांची थट्टा केली आहे. जे भक्षण करू नये ते भक्षण केले आहे. ५ मी आईवडिलांची आज्ञा कधी मानलेली नाही, माझे चित्त नेहमी दुसऱ्याच्या द्रव्यावर व दुसऱ्याच्या स्त्रीवर जडून राहिलेले होते. ज्या दोहोंच्या बाबतीत जे बोलू नये ते माझ्या हातून घडले आहेत. दासीगमनासारखे दोषही माझेकडून झाले आहेत. ६ काया, वाचा, मन, इंद्रिये या सर्वांची मिळून मी पापांचीच राशी आहे. तुकयाबंधू म्हणत आहे की, असे असतानाही, देवा, हृषीकेशी, मी तुम्हांस शरण आलो आहे. ७

६७१ काय काय करितों या मना । परी नाइके नारायणा ।
करूं नये त्याची करी विवंचना । पतना नेऊं आदरिलें ।। १ ।।
भलतिया सवे धांवे सैराट । वाट आडवाट दरे दरकुट ।
न विचारी कुडें कांहीं कपट । घात बळकट मांडियेला ।। २ ।।
न पुरती भ्रमणा दाही दिशा । सप्त ही पाताळ आकाशा ।
घाली उडी बळेंचि देखोनि फांसा । केलों या देशा पाहुणा ।। ३ ।।
चेतवूनि इंद्रियें सकळ । आशा तृष्णा कल्पना काम क्रोध काळ ।
दुराविली शुद्ध बुद्धि केली राळ । ऐसें चांडाळ अनिवार हें ।। ४ ।।
आतां काय ऐसें करावें यासी । बहु जाचिलों केलों कासाविसी ।
तुकयाबंधु म्हणे हृषीकेशी । धांव मज ऐसी परी जाली ।। ५ ।।

शब्दार्थ व टीपा :– सैराट–बेफाटपणे, दरकट–दरी, कुडें–खोटे, राळ–नाहीशी.

अर्थ –देवा, मी या मनाला वळण लावण्यासाठी काय काय उपाय करून पाहतो? पण नारायणा, ते काही ऐकत नाही करू नये त्याची चिंता करीत असते व मला पतनाकडे जलदीने नेते. १ भलत्याच्याच संगतीने ते बेफाटपणे धावत असते ते वाट, आडवाट, दऱ्या, दरकुटे काही पाहात नाही. खोटे किंवा कपटी आहे, कुणी मोठा घात आरंभिला आहे, याचाही ते विचार करत नाही. २ याच्या भ्रमणाला दाही दिशा पुरत नाहीत. सात पाताळे व आकाश यांत बळेच उडी घालून फासात अडकत असते. यामुळे मी या दोषाचा स्वामी झालो आहे. ३ या मनानेच माझी सर्व इंद्रिये चाळविली आहेत आशा, तृष्णा, काम, क्रोध हे सर्व काळ असून यांच्यामुळे माझी सर्व शुद्धी नाहीशी झाली आहे माझी बुद्धीही नाहीशी झाली आहे. असे हे माझे मन मोठे अनिवार व चांडाळ आहे. ४ आता याला करावे तरी काय ? याच्यामुळे मला फार त्रास झाला. मी फार कासावीस झालो आहे. तुकयाबंधू म्हणत आहे, देवा हृषीकेशी, तू धाऊन ये. माझी कशी अवस्था झाली आहे ते नीट पाहा. ५

६७२ अखंडक्षीराब्धी भरितें आलें । अध्यात्मविद्येचें भांडार उघडिलें ।
सूर्यकोटीस तेज फांकलें । ध्यानीं प्रगटलें भक्तांचिया ।। १ ।।
अनादि ब्रह्मज्ञानाचें गुज । श्रवणीं अवचित पडिलें सहज ।
परमनिर्वाणाचें बीज । गुंडाळिलें निजसर्वभाग्यें ।। २ ।।
मंत्र महामंत्र मंगळनिधी । सत्संगदर्शन प्रगटलें आधीं ।
वैराग्यविवेकाची बुद्धी । नामामृतसिद्धी साधिली ते ।। ३ ।।
क्षमादयाशांतीचें निजसुख । सच्चित्सुखें बोलला पुंडलीक ।
अनंतसुखाचा हारिख । उगवला देख पंढरीये ।। ४ ।।

नेणे भवभक्तीची निरपेक्षता । नेणे भूतदयेची ममता ।
तुका म्हणे पंढरीनाथा । संग साधुसंता देईं आता ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – हारिख–आनंद, हर्ष

अर्थ – अखंडपणे पसरलेल्या या क्षीरसागराला प्रेमाचे भरते आले व त्यामुळे प्रभुकृपेचे, अध्यात्मविद्येचे भांडार उघडले गेले या योगाने जणु कोटी सूर्यांचे तेज फाकून राहिले व ते भक्ताच्या अंतःकरणातून प्रकट झाले १ ज्या ब्रह्मज्ञानास प्रारंभ नाही, अशाचे रहस्य आमच्या कानी यामुळे सहजच पडून परमनिर्वाणाचे बीजच हाती आल्या-सारखे झाले स्वतःच्यासाठी सर्व भाग्याचा ठेवाच हस्तगत झाला २ सर्व मांगल्याचा साठा असा हा मंत्र अथवा महामंत्र सत्संगाच्या दर्शनाने प्रकट झाला विवेकवैराग्याची वृद्धी विकसित झाली एका नामामृताच्या सिद्धीने हे सर्व साधले ३ दया, क्षमा, शांती यांनी साधलेले हे निजसुख किंवा चित्सुख पुंडलीकाच्या मुखातून प्रकट झाले यामुळे अनंत सुखाचा हर्ष या पंढरी क्षेत्रात निर्माण झाला आहे ४ भक्तीमध्ये निरपेक्ष कसे असावे, हे मला समजत नाही भूतमात्राविषयी ममता कशी वाढवावी, हेही समजत नाही, तुकाराम महाराज म्हणतात, पंढरीनाथा, यासाठी तू साधुसंताची संगत मात्र अखंडपणे दे मला ५

६७३ क्षीराब्धिवासा शेषशयना । लीळाविग्रहा गोपिकारमणा ।
सगुणस्वरूप भक्तभूषणा । गुणनिधाना गुप्तरूपा ॥ १ ॥
अनंत अवतार धरितिया । अखंडस्वरूपा करुणालया ।
अमरपाळका देवराया । हरी भवभया भक्ताचिया ॥ २ ॥
सर्वव्यापका सर्वातीता । गजेंद्ररक्षका वैकुंठनाथा ।
भोळ्या भक्तांसि सौख्यदाता । तुजविण सर्वथा असेचि ना ॥ ३ ॥
चित्तचाळका चैतन्यघना । भक्तकैवारी असुरमर्दना ।
भक्तअभिमानी नारायणा । जगज्जीवना पांडुरंगा ॥ ४ ॥
ब्रह्मादिकांचा निजजनिता । सकळकारण अकर्ता ।
अणुरेणुव्याप्यभरिता । पावन पतिता तुका म्हणे ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – अनंत–अनेक, भवभय–संसाराची भीती

अर्थ – क्षीरसागरात निवास करणाऱ्या देवा, शेषावर शयन करणाऱ्या नारायणा, अनेक लीला करून गोपिकांचे मन हरण करणाऱ्या श्रीकृष्णा तू सगुण स्वरूपाचा असून भक्तांचे भूषण आहेस गुप्त रूपाने असलेल्या अनेक गुणांचा साठा तुझ्याजवळ आहे १ तू अनेक अवतार धारण करतोस तुझे स्वरूप अखंड असून तू करुणेचा सागरच आहेस देवराया, तू प्रत्यक्ष देवांचाही सांभाळ करतोस तू आता आम्हा भक्तांचे संसारभय दूर करावेस २ तू सर्वव्यापक असून सर्वांतीत आहेस गजेन्द्राचे रक्षण तूच केलेस वैकुंठनाथा, भोळ्या भक्तांना तू सुख देणारा आहेस तुझ्याशिवाय दुसरे काही नाहीच ३ चैतन्याच्या मेघा, सर्वांच्या चित्ताचा चालकही तूच आहेस तू भक्तांचा कैवार घेतोस, असुरांचा नाश करतोस नारायणा, तू भक्तांचा अभिमानी असून सर्व जगाचे जीवन तूच आहेस ४ पांडुरंगा, तू ब्रह्मादिकानाही जन्म देणारा असून, सर्व कर्मे करणारा असूनही तू अकर्ता आहेस तू अणु रेणूपासून सर्व त्रिभुवनात भरून राहिला आहेस तुकाराम महाराज म्हणतात, तू पतितांना पावन करणारा आहेस ५

६७४ अखंडकर्मा कर्मप्रकाशका । मजसाटीं कां रे जालासि मुका ।
धर्मा धर्मप्रतिपाळका । सर्वचाळका सर्वातीता ॥ १ ॥
न देखसी वर्णाश्रममर्यादा । त्यांचा सर्वस्वें करिसी कामधंदा ।
कधीं न लाजसी तू गोविंदा । कां रे मुकुंदा बोल आता ॥ २ ॥

मत्स्यकूर्मादि अवतारांसाठीं । श्रमले असतील जगजेठी ।
करितां घडमोड सृष्टी । जालासि कष्टी काय जाणें ॥ ३ ॥
किती म्यां विनवावें श्रीपती । पुन्हा पुन्हा यावें काकुलती ।
पुरे आतां तुझी संगती । करुणामूर्ती काय जालें ॥ ४ ॥
काय म्यां तुजसी करावें आतां । कां रे कोपलासी पंढरीनाथा ।
सकळ दुःख निवारिता । पावन पतिता तुका म्हणे ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– कामधंदा–कर्तव्य, घडमोड–घडामोड.

अर्थ :– अखंड कर्मात रममाण झालेल्या देवा, कर्माच्या प्रकाशा, सर्व कर्मात प्रकाशमान असणाऱ्या देवा, माझ्या बाबतीतच तू मूक का झाला आहेस ? धर्माअधर्माचे प्रतिपालन करणाऱ्या देवा, सर्व जगताचे चालकत्व पत्करले असूनही तू सर्वातीत आहेस. १ तू वर्णाश्रम धर्माची मर्यादा पाहात नाहीस. या संबंधीचे सर्व कर्तव्यकर्म तूच स्वतः करतोस. कोणतेही काम करायला तू कधी लाजत नाहीस. मुकुंदा, आताच का रे तू बोलत नाहीस ? २ मत्स्य, कूर्म, इत्यादी अवतार धारण करून तू दुष्ट शक्तींचा संहार केलास; त्यामुळे हे जगजेठी, तू फारच श्रमला असशील या सर्व सृष्टीची अखंड घडामोड करीत असताना, तुला फार कष्ट झाले असतील. ३ श्रीपती, तुला मी किती विनवावे रे ? तुझ्यापाशी पुनः पुन. किती काकुळतीस यावे ? तू प्रसन्न होत नाहीस असे पाहून वाटते की, तुझी संगती आता पुरे झाली तू करुणेची मूर्ती असून मजबद्दलच तुला काय झाले रे ? ४ तुझ्यासाठी मी आता करावे तरी काय ? पंढरीनाथा, तू एवढा रागावलास तरी का रे ? तुकाराम महाराज म्हणतात, तू सर्व दु.खे निवारण करणारा आहेस ना ? तू पतितांना पावन करणारा आहेस ना ? ५

६७५ वासुदेवा दिनानाथा । कमललोचना श्रीअच्युता ।
निजभक्तांसि सौख्यदाता । तुजविण सर्वथा असेचि ना ॥ १ ॥
विठ्ठला अनंता विश्वपती । विराट्स्वरूपा वामनमूर्ती ।
ब्रह्मादिकर्ता वैकुंठपती । अगम्यस्थिती वेदशास्त्रा ॥ २ ॥
अद्वैतअखंडभरिता । विश्वबाहु अपरिमिता ।
विश्वचक्षु विश्वदेवता । आदिपिता ब्रह्मयाचा ॥ ३ ॥
भक्ताधीना भवभयभंगा । परमपुरुषा पांडुरंगा ।
अनादि अखिलअंतरंगा । संगा असंगा वेगळाची ॥ ४ ॥
हें विराट्स्वरूप भोळिया भक्तांसी । सर्वथा न कळे हृषीकेशी ।
सगुण रूप धरूनि त्यांसी । लावीं भजनासी तुका म्हणे ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा .– भवभयभंगा–संसारसागराचे दु.ख दूर करणाऱ्या देवा.

अर्थ :– वासुदेवा, दीनांच्या नाथा, कमलाप्रमाणे डोळे असणाऱ्या देवा, अच्युता, तू स्वत.च्या भक्तांना सौख्य देणारा आहेस. तुझ्याशिवाय असे सुख देणारा दुसरा कुणीही नाही. १ विठ्ठला, अनंता, तू विश्वाचा धनी आहेस. तू विराट रूपाचा असूनही वामनमूर्ती आहेस. ब्रह्मादिकांनाही तूच निर्माण केले असून तूच वैकुंठाचा मालक आहेस. वेदशास्त्रानाही तुझी स्थिती कळून येण्यासारखी नाही. २ तू अद्वैत स्वरूपाचा असून सर्व विश्वात अखंड रूपाने भरून राहिला आहेस. तू अपरिमित असल्याने तुझे मोजमापही करता येत नाही तुझे बाहू सर्व विश्वाला कवटाळून आहेत. तू विश्वदेवता असल्याने व तू या विश्वाचा नेत्रच असल्याने तुला सर्व काही समजते. देवा, तूच आदिपिता असून ब्रह्मदेवाचाही जनक तूच आहेस. ३ तू भक्तांच्या आधीन होतोस व त्यांच्या संसाराचे भय दूर

करतोस. पांडुरंगा, तू परम पुरुष असून अनादी आहेस अखिल प्राणिमात्रांचे अंतरंग ओळखणारा तू असून संग व असंग यांच्याहून तू वेगळाच आहेस. ४ म्हणून तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तू सगुण रूप धारण करून त्यांना भजनमार्गास लावतोस. ५

विवरण :–अभंग क्र ६०९ पासून सुरू झालेले नाटाचे ६३ अभंग; क्र. ६७१ च्या अभंगानंतर खरे म्हणजे पूर्ण झाले. परंतु पुढील वरील अभंगापर्यंतचे चार अभंगही नाटाचे अभंग म्हणूनच समजले गेले आहेत वरच्या तीन अभंगातील नारायणास उद्देशून वापरण्यात आलेली विशेषणे व संबोधने लक्षपूर्वक समजावून घेण्यासारखी आहेत. प्रत्येक विशेषणात व संबोधनात परमेश्वराचा एखादा विशेष गुण व त्याच्या कर्तृत्वाचे स्पष्ट दर्शन याचे महत्त्व समजेल परमेश्वर निर्गुण, निराकार, सर्व विश्वात भरून राहिलेला असला तरी, आपल्या भोळ्या व भाविक भक्तासाठी तो सगुण झाला, अवतार धारण करणारा झाला, अकर्ता असून सर्व काही करणारा झाला; हा नेहमीचा विचार येथे आहेच.

६७६ काय खावें आतां कोणीकडे जावें। गांवांत राहावें कोण्या बळें ॥ १ ॥
कोपला पाटील गांवचे हे लोक। आतां घाली भीक कोण मज ॥ २ ॥
आतां येणें चवी सांडिली म्हणती। निवाडा करिती दिवाणांत ॥ ३ ॥
भल्या लोकीं यास सांगितली मात। केला माझा घात दुर्बळाचा ॥ ४ ॥
तुका म्हणे याचा संग नव्हे भला। शोधीत विठ्ठला जाऊं आतां ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– चवी–रीत, सांडिली–सोडली.

अर्थ :– देवा, आता मी काय खावे ? मी कुणाच्या आश्रयास आता जावे ? कुणाच्या आधाराने या गावात तरी राहावे ? १ या गावचा पाटील व इतर लोक आता मजवर रागावलेले आहेत. मला आता येथे भीक तरी कोण घालणार ? २ सर्वजण मला उद्देशून म्हणतात की, याने आता रीतभात सोडून दिली आहे. याने सर्वांना बुडविले आहे. सरकारात जाऊनच याचा निवाडा आता होण्यासारखा आहे. ३ मी चांगल्या लोकांना माझी ही गोष्ट सांगून पाहिली. माझ्यासारख्या दुर्बळाचा घात या लोकांनी केला. ४ तुकाराम महाराज म्हणतात, याची संगत काही चांगली दिसत नाही. आता विठ्ठलालाच शोधीत जावयास हवे. ५

विवरण :–तुकोबाच्या ऐन तारुण्यात जी संकटपरंपरा कोसळली, त्या सुमाराच्या आपत्तीचे व मानसिक चिंतेचे दर्शन घडविणारा हा अभंग आहे. सर्व लौकिक व्यवहाराची चव तुकोबानी सोडून दिली म्हणून आप्तवर्ग व गावचे लोक आपणावर कसा गहजब करीत असत व त्यामुळे आपल्यासारख्या दुर्बलाचा घात कसा होतो याचे हृदयभेदक चित्र बुवानी येथे काढले आहे. याच्या संगतीपेक्षा सरळ घर सोडून जावे व विठ्ठलाच्या संगतीचे सुख भोगावे असे बुवाना वाटत राहिले हाच एक अभंग पुनः गाथेत क्र. ३८८१ म्हणून 'आतां काय खावें कोणीकडे जावें' या थोड्या शाब्दिक फरकाच्या ओळीने सुरू होणारा आलेला आहे.

६७७ संत मागे पाणी नेदी एक चूळ। दासीस आंघोळ ठेवी पाणी ॥ १ ॥
संतासी देखोनी होय पाठमोरा। दासीचिया पोरा चुंबन देतो ॥ २ ॥
संतासी देखोनि करितो टवाळचा। भावें धुतो चोळचा दासीचिया ॥ ३ ॥
तुका म्हणे त्याच्या तोंडावरी थुंका। जातो यमलोका भोगावया ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– टवाळचा–थट्टा, उपहास.

अर्थ :– हा मनुष्य कसा भ्रष्ट व मत्त झाला आहे पाहा. संतांनी एक चूळभर पाणी मागितले तर कधी देणार नाही; हा पण दासीच्या अंघोळीसाठी मात्र पाणी भरून स्वतः ठेवितो. १ साधुसंत दाराशी दिसताच हा

पाठमोरा होतो. परंतु, दासीच्या मुलास मात्र प्रेमभराने चुंबन देतो. २ साधुसंत पाहताच हा त्यांची थट्टा करतो. त्यांना हसतो; पण दासीच्या चोळधा मात्र प्रीतीने धूत बसतो. ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा या अधम माणसाच्या तोंडावर थुंकावे, हा मनुष्य यमलोकीचे दुर्भाग्य भोगायलाच जातो. ४

६७८ एक प्रेमगुज ऐकें जगजेठी । आठवली गोष्टी सांगतसें ॥ १ ॥
एक मृग दोन्ही पाडसांसहित । आनंदें चरत होती वनीं ॥ २ ॥
अवचिता तेथें पारधी पावला । घेऊनियां आला श्वानें दोन्ही ॥ ३ ॥
एकीकडे त्याणें चिरिल्या वाघुरा । ठेविलें श्वानपुत्रा एकीकडे ॥ ४ ॥
एकीकडे तेणें वोणवा लाविला । आपण राहिला एकीकडे ॥ ५ ॥
चहूंकडोनियां मृगें वेढियेलीं । स्मरों तें लागलीं नाम तुझें ॥ ६ ॥
रामा कृष्णा हरी गोविंदा केशवा । देवाचिया देवा पावें आतां ॥ ७ ॥
कोण रक्षी आतां[१] ऐसिये संकटीं । बापा जगजेठी तुजविण ॥ ८ ॥
आइकोनि तुम्ही तयांचीं वचनें । कृपाअंतःकरणें कळवळिलां ॥ ९ ॥
आज्ञा तये काळीं केली पर्जन्यासी । वेगीं पावकासी विझवावें ॥ १० ॥
ससें एक तेथें [२]उठवुनी पळविलें । तया पाठीं गेलीं श्वानें दोन्ही ॥ ११ ॥
मृगें चमकोनी सत्वर चाललीं । गोविंदें रक्षिलीं म्हणोनियां ॥ १२ ॥
ऐसा तूं कृपाळु दयाळु आहेसी । आपुल्या भक्तांसी जीवलग ॥ १३ ॥
ऐसी तुझी कीर्ती जीवीं आवडती । रखुमाईच्या पती तुका म्हणे ॥ १४ ॥

शब्दार्थ व टीपा – चिरिल्या–लावल्या, वाघुऱ्या–जाळी, वोणवा–अग्नी

अर्थ :– देवा, जगजेठी विठ्ठला, प्रेमाच्या हितगुजाची एक गोष्ट सांगतो ऐकतोस का ? सहज आठवली म्हणून सांगतो. १ एक गरीब हरीण आपल्या दोन पाडसांसहित एका वनात मोठ्या आनंदाने चरत होते. २ तो अवचितपणे एक पारधी तेथे आला. त्याच्याजवळ शिकार करणारे भले मोठे दोन कुत्रे होते. ३ त्या पारध्याने एका बाजूस त्या मृगांना पकडण्यासाठी जाळी लावली व दुसऱ्या बाजूस शिकारी कुत्र्यांना ठेविले ४ तिसऱ्या बाजूस त्याने भला मोठा वणवा पेटवून तोही मार्ग बंद करून टाकला आणि उरलेल्या चौथ्या दिशेस तो पारधी स्वतः शिकार टिपण्याच्या उद्देशाने उभा राहिला. ५ देवा, असे ते हरीण आपल्या लहान पाडसांबरोबर चारी बाजूंनी संकटांनी वेढले गेले. त्यावेळी त्यांनी मनोभावे तुझे स्मरण केले ६ त्यांनी मोठ्या कळवळ्याने म्हटले, "रामा, कृष्णा, श्रीहरी, गोविंदा, केशवा, देवाच्या देवा, आता तुम्हीच आमचे रक्षण करावे. ७ बापा जगजेठी, विठ्ठला, आता या संकटप्रसंगी तुझ्यावाचून दुसरे कोण आमचे रक्षण करणार ?" ८ या हरिणाचे हे आर्त शब्द ऐकून देवा तुमचे अंतःकरण कळवळून गेले ९ मग तुम्ही त्या वेळी पर्जन्यास आज्ञा करून पाऊस पाडला व एका दिशेचा अग्नी विझवून टाकला १० दुसऱ्या एका दिशेकडून एक ससा निर्माण करून त्याच्या पाठीमागे ते दोन कुत्रे धावडून दिले. ११ तुझ्या या अघटित लीलेने चमकून ती मृगे आनंदित होऊन या गोविंदाने आपले रक्षण केले, असे म्हणून ती सुखरूपपणे तेथून निसटली. १२ असा देवा, तू अतिशय कृपाळू आहेस. आपल्या जिवलग भक्तांवर अशीच कृपा तू करीत असतोस ! १३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, अशी ही तुझी कीर्ती माझ्या जीवास फार आवडते, रखुमाईच्या पती, माझेही रक्षण करा. १४

विवरण :– भक्तीचे माहात्म्य वाढविण्यासाठी, ईश्वर लहान, गरीब, दीन प्राण्याचे रक्षण संकटकाळी कसे करतो, हे दाखविण्यासाठी अनेक प्रसंगी तुकाराम महाराजांनी पुराणातील दाखले दिले आहेत. त्याचप्रमाणे प्राण्याच्या, पक्ष्याच्याही कल्पित कथा, कधी पुराणाचा आधार घेऊनही दिलेल्या आहेत. मागे अभंग ६०७ मध्ये वृक्षावर

१ आम्हा, २ उठोनि चालिले.

असणाऱ्या पक्ष्याची करुणरम्य कथा बुवांनी सांगितलेली आपण पाहिली आहे. आता येथे पारध्याच्या तावडीत चहू बाजूंनी सापडलेल्या एका हरिणाची व त्याच्या गोजिरवाण्या शावकाची तितकीच करुण कहाणी अत्यंत संक्षेपाने बुवांनी येथे निवेदन केली आहे. शिकारी कुत्रे, स्वतः पारधी, जाळी व वणवा या चहूबाजूंच्या संकटातूनही ईश्वर कसे रक्षण करितो, याचा एक समर्थ दिलासा भाविकांना तुकारामबुवांनी दिलेला आहे.

६७९ आशाबद्ध वक्ता । धाक[1] श्रोतयाच्या चित्ता ॥ १ ॥
वांयां गेलें तें भजन । उभयतां लोभी मन ॥ २ ॥
बहिर्मुख एके ठायीं । तैसें जालें तया दोहीं ॥ ३ ॥
माप तैसी गोणी । तुका म्हणे रितीं दोन्ही ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– धाक–धास्ती, भीती, गोणी–धान्याचे ओझे

अर्थ :– ब्रह्मज्ञान किंवा परमार्थनिरूपण करणारा वक्ता जर आशाबद्ध असेल, त्याला जर लौकिकाची आशा असेल, अथवा श्रोत्यांच्याकडून आपणांस काही मिळावे, असा जर त्याला लोभ असेल, तर त्याचे निरूपण ऐकणाराच्या चित्तास धास्तीच वाटते १ त्याचे भजन व त्याचे निरूपण यामुळे वायाच जाते. कारण या ठिकाणी सर्वांचेच मन लोभात गुंतलेले असते. २ एक वक्ताच बहिर्मुख असल्यामुळे तो व त्याचे श्रोते दोघांचीही गती तशीच होते. ३ धान्याच्या गोणीत, ओझ्यात जे असेल तेच मापात येणार ना? तुकाराम महाराज म्हणतात, दोनही वस्तू रिकाम्याच असल्यावर मग उपयोग काय? ४

६८० विठ्ठला रे तूं उदाराचा राव । विठ्ठला तूं जीव या जगाचा ॥ १ ॥
विठ्ठला रे तूं उदाराची रासी । विठ्ठला तुजपाशीं सकळसिद्धी ॥ २ ॥
विठ्ठला रे तुझें नाम बहु गोड । विठ्ठला रे कोड पुरविसी ॥ ३ ॥
विठ्ठला रे तुझें श्रीमुख चांगलें । विठ्ठला लागलें ध्यान मनीं ॥ ४ ॥
विठ्ठला रे वाचे बोला बहुरस । विठ्ठला रे सोस घेतला जीवें ॥ ५ ॥
विठ्ठला रे शोक करीतसे तुका । विठ्ठला तूं ये[2] कां झडकरी ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा :– कोड–हौस, सोस–ध्यास

अर्थ :– विठ्ठला, तू उदाराचा राजा आहेस रे. या सर्व जगाचा प्राण आहेस. १ सर्व उदारांची तू रास असून तुझ्यापाशी सर्व प्रकारच्या सिद्धी असतात. २ विठ्ठला, तुझे नाव अतिशय गोड असून तू भक्तांची सर्व हौस पूर्ण करतोस. ३ *विठ्ठला, तुझे श्रीमुख फारच शोभिवंत व चांगले असून त्याच्या ध्यानात माझे चित्त गुंतून गेले* आहे. ४ विठ्ठला, या माझ्या वाचेने तुझेच नाम निरनिराळ्या रसांत घेतले आहे. विठ्ठला, तुमचाच ध्यास या माझ्या जीवाने एकसारखा घेतला आहे. ५ विठ्ठला, हा तुका तुझ्यासाठी शोक करीत असल्याने तू लौकर येऊन माझे रक्षण का करीत नाहीस? ६

६८१ बाहिर पडिलों आपुल्या कर्तव्यें । संसारासि जीवें वेटाळिलों ॥ १ ॥
एकामध्यें एक नाहीं मिळों येत । ताक नवनीत निवडीलें ॥ २ ॥
जाल्हीं दोनी नामें एकाचि मथनीं । दुसरिया गुणीं वेगळालीं ॥ ३ ॥
तुका म्हणे दाखविल्या मुक्ताफळीं । शिपलेचि स्वस्थळीं खुंटलिया ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– वेटाळिलों–गुतलो होतो

अर्थ :– या बाह्य संसारात मी गुंतून गेलो होतो. पण मी आपल्या कर्तव्याच्या जोरावर सुखरूपपणे बाहेर पडलो. १ आता पुन्हा संसारात गुंतणार नाही. ताकातून एकदा लोणी बाहेर काढले की, ते परत काही

१ भय, २ येगा.

त्याच्यात मिसळत नाही. तशी माझी अवस्था झाली आहे. २ ताक व लोणी ही दोनही नावे एकाच मंथनातून झाली, किंवा सार व असार असा भेदही एकाच्याचमुळे झाला असला, तरी वरवरच्या गुणांमुळे दोन वेगळी दिसतात. ३ तुकाराम महाराज म्हणतात, शिंपल्यातून एकदा मोती वेगळे काढून दाखविल्यावर मग शिंपला जरी जन्मठिकाण असला तरी तो मोती काही त्याच्याशी पहिल्यासारखा जडला जात नाही. तसे संसाराशी माझे नाते पुनः काही जडणार नाही. ४

६८२ बरवा बरवा बरवा रे देवा तूं । जीवाहूनि आवडसी जीवा रे देवा तूं ॥ १ ॥
पाहातां वदन संतुष्ट लोचन । जालें आइकतां गुण श्रवण रे देवा ॥ २ ॥
अष्ट अंगें तनु त्रिविध ताप गेला सीण । वर्णितां लक्षण रे देवा ॥ ३ ॥
मन जालें उन्मन अनुपम ग्रहण[1] । तुकयाबंधु म्हणे महिमा नेणें रे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा.– बरवा–चागला, तनु–शरीर, अनुपम–दुसरी तुलना नसलेले.

अर्थ :– देवा, तू फारच चागला आहेस रे. म्हणूनच तू आम्हांस आमच्या जीवापेक्षाही आवडतोस. १ तुझे शोभिवंत मुख पाहताच आमचे डोळे तृप्त होतात. तुझे गुण ऐकून कान सतुष्ट होतात. २ तुला पाहताच, तुझी सर्व लक्षणे वर्णन करू लागताच देवा, माझ्या अष्टांगातील ताप व मनाचा शीण नाहीसा होतो ३ तुझ्या या अतुलनीय रूपलावण्याची शोभा पाहून माझे मन उन्मन होऊन गेले आहे. तुकयाबंधू म्हणत आहे, देवा, तुझा महिमा काही ध्यानात येण्यासारखा नाही. ४

६८३ सोइरियासि करी पाहुणेरु बरा । काढितो ठोंबरा संतांलागीं ॥ १ ॥
गाईसि देखोनि बदबदा मारी । घोड्याची चाकरी गोड लागे ॥ २ ॥
पानफुल वेश्येसी नेतसे उदंड । देखों[2] नेदी खांड ब्राह्मणासी ॥ ३ ॥
बाइलेच्या गोता आवडिनें पोसी । माता पितियासी दवडितो ॥ ४ ॥
तुका म्हणे थुंका त्याच्या तोंडावरी । जातो यमपुरी भोगावया ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– पाहुणेरु–पाहुणचार, ठोंबरा–बडगा.

अर्थ :– हा अधम मनुष्य पाहा कसा आहे चागले श्रीमान नातेवाईक आले की, त्याना मनापासून पाहुणचार करितो, व दारात साधुसंत पाहताच त्याच्या पाठीमागे बडगा घेऊन लागतो. १ गरीब बिचारी पवित्र गाय पाहताच तिला एकसारखा मारीत बसतो, पण धन्याच्या घोड्याची मात्र मनापासून सेवा करीत असतो. २ वेश्येला मात्र कौतुकाने व प्रीतीने पानफूल देऊन तिचे गुणगान हा करतो; पण ब्राह्मणाला मात्र फुटके सुपारीचे खांडही कधी याच्या हातून मिळणार नाही. ३ प्रिय असणाऱ्या बायकोच्या नातेवाईकांना हा मोठ्या आवडीने पोशीत असतो; पण स्वतःच्या आईबापाचा मात्र याने त्याग केलेला असतो. ४ तुकाराम महाराज म्हणतात, अशा लोकांच्या तोंडावर थुंकून त्याचा धिक्कार करावा. यमलोकीचे भोग भोगावयलाच तो गेलेला असतो ५

विवरण :–केवळ ससारावर आसक्त होऊन बेताल बनलेल्या माणसाची अशी चित्रे बुवानी अनेक काढली आहेत त्याचा कडक शब्दात निषेधही केलेला आहे त्यानी हाच अभग पुढे क्र ३८२९ व ४२९६ म्हणून थोड्याफार ओळीच्या फरकानी पुन आलेला आहे

६८४ सोलीव जें सुख अतिसुखाहूनि । उभें हें[3] अंगणीं वैष्णवांच्या ॥ १ ॥
वृंदावन सडे चौक रंग माळा । नाचे तो सोहोळा देखोनियां ॥ २ ॥
भूषणमंडित सदा सर्वकाळ । मुद्रा आणि माळ तुळसी कंठीं ॥ ३ ॥

१ अनुपम्य गहन , २ देवो, ३ तें.

नामओघ मुखीं अमृताचें सार । मस्तक पवित्र सहित रजें ॥ ४ ॥
तुका म्हणे मोक्ष भक्तांचिया मना । नये ह्मा वासना त्याची करी ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– सोलीव–अस्सल, गाभ्यातील.

अर्थ :– गाभ्यामधील असल्याप्रमाणे अस्सल सुखाचा जो भाग अति सुखाहूनही मोठा असून तो वैष्णवाच्या अंगणांत उभा आहे. १ या वैष्णवांच्या अंगणांत तुळशीवृंदावन असून सडासंमार्जन केले आहे. नाना प्रकारांच्या सुंदर रांगोळ्या काढून चौक भरले आहेत. हा सर्व थाट पाहून देव मोठ्या आनंदाने येथे नाचतो. २ हा विष्णु-भक्त नेहमीच मुद्रा व गळ्यात तुळशीची माळ या अलंकारांनी सुशोभित झालेला असतो. ३ अमृताचे सार असे असणारा नामाचा ओघ त्याच्या मुखात असतो व देवाच्या पायांवरील धूलिकणांनी याचे मस्तक सहजच पवित्र झालेले असते. ४ तुकाराम महाराज म्हणतात, भक्तांच्या मनांत मोक्षाची चुकून देखील इच्छा नसते उलट मोक्षच यांची इच्छा करीत असतो. ५

६८५ तीर्थें केलीं कोटीवरी । नाहीं देखिली पंढरी ॥ १ ॥
जळो त्याचें ज्यालेंपण । न देखेचि समचरण ॥ २ ॥
योग याग अनंत केले । नाहीं समचरण देखिले ॥ ३ ॥
तुका म्हणे विठ्ठलपायीं । अनंत तीर्थें घडिलीं पाहीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– ज्यालेंपण–जन्म, जगण्याची स्थिती.

अर्थ :–कुणी कोटयवधी तीर्थयात्रा केल्या, पण पंढरपूर मात्र पाहिले नाही, १ तर त्याच्या जगण्याला आग लागो. काय त्याचा उपयोग ? कारण त्याने विटेवर उभ्या असलेल्या श्रीविठ्ठलाचे समचरण पाहिलेले नसतात. २ पुष्कळ यज्ञयाग केले आणि पांडुरंगाचे समचरण पाहिले नाहीत, तर काय त्यांचा उपयोग ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, एका विठ्ठलाच्या चरणांच्या दर्शनाने अनंत तीर्थयात्रा केल्याचे सार्थक आहे ४

६८६ कोणतें कारण राहिलें यामुळें । जें म्यां तुज बळें कष्टवावें ॥ १ ॥
नाहीं जात जीव नाहीं होत हानी । सहज तें मनीं आठवलें ॥ २ ॥
नाहीं कांहीं चिंता मरतों उपवासी । अथवा त्या म्हैसी गाई व्हाव्या ॥ ३ ॥
हें तों तुज कळों येतसे अंतरीं । लाखणीक[1] वरी साच भाव ॥ ४ ॥
तुका म्हणे देवा नासिवंतासाटीं । पायांसवें तुटी करितो तुझ्या ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– लाखणीक–लबाडी.

अर्थ :– देवा, असे कोणते कारण उरले आहे की, ज्यामुळे मी तुला मुद्दाम बळेच कष्ट द्यावेत ? १ माझा काही जीव जात नव्हता, की कसली हानीही होत नव्हती हे सहज मनात आठवले इतकेच. २ मला कसलीही चिंता नव्हती, की मी काही उपाशी मरत नव्हतो; किंवा गाई म्हशी याची प्राप्ती व्हावी असेही मला वाटत नव्हते. ३ देवा, हे तर सर्व तुला तुझ्या मनात ठाऊक आहेच. माझ्या मनात खरा भाव आहे, की सर्व लबाडीच आहे हे तुला समजते. ४ तुकाराम महाराज म्हणतात, या सर्व गोष्टी नाशवंत असून त्यांच्या पायी तुझ्या पायाची ताटातूट व्हावी हे ठीक नव्हे. ५

६९४ माप म्हणे मी मवितें । भरी धणी ठेवी रितें ॥ १ ॥
देवा अभिमान नको । माझे ठायीं देऊं सको ॥ २ ॥
देशी चाले सिका । रितें कोण लेखी रका ॥ ३ ॥
हातीं सूत्रदोरी । तुका म्हणे त्याची थोरी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– मवितें–मोजते, धणी–मालक.

अर्थ – धान्याचे माप उगाचच म्हणत असते की, मी धान्य मोजते, पण खरी गोष्ट अशी आहे की, मोजणारा जो मालक आहे तोच ते माप भरीत असतो व रिकामे करीत असतो १ देवा, माझ्या ठिकाणी असला अभिमान नको २ ज्या नाण्यावर राजाचा शिक्का आहे, तेच त्या देशात चालते शिक्क्याशिवाय असणाऱ्या गरिबाच्या नाण्याला कोण विचारणार ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, ज्याच्या हातात सत्तेचे सूत्र आहे, त्याचीच थोरवी जिकडे तिकडे असते. ४

६९५ कोण सांगायास । गेलें होतें देशोदेश ॥ १ ॥
नेलें वाऱ्या हातीं माप । समर्थ तो माझा बाप ॥ २ ॥
कोणाची हे सत्ता । जाली वाचा वदविता ॥ ३ ॥
तुका म्हणे या निश्चयें । माझें निरसलें भय ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– निरसले–संपले.

अर्थ :– माझ्या या विठ्ठलाचे वैभव देशोदेशी सांगण्यासाठी कोण उपदेश करायला गेले होते ? १ माझा मायबाप जो विठ्ठल, त्याच्याच कृपेने वाऱ्याबरोबरच त्याचे नाम सर्व देशभर पसरून राहिले २ माझी वाणी हा उपदेश करीत आहे, तो तरी कुणाच्या सत्तेवर ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, याच निश्चयामुळे माझे भय दूर झाले आहे. ४

६९६ सकळिकांच्या पाया माझी विनवणी । मस्तक चरणीं ठेवीतसे ॥ १ ॥
अहो श्रोते वक्ते सकळ ही जन । बरे पारखुन बांधा गांठी ॥ २ ॥
फोडिलें भांडार धन्याचा हा माल । मी तव हमाल भारवाही ॥ ३ ॥
तुका म्हणे चाली जाली चहूं देशीं । उतरला कसीं खरा माल ॥ ४ ॥

आपुलेंचि मन । करवी आपणां बंधन ॥ ३ ॥
तुका म्हणे देवा । तुम्ही कोडीं हीं उगवा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– झाकुळिलें–झाकून टाकले, उगवा–सोडवा.

अर्थ :– सर्व विश्वास भरून टाकणारी जी माया, तिने छायेप्रमाणे सर्व जगाला झाकून टाकले आहे. १ त्यामुळे जगातील सत्य वस्तूचे दर्शन दुर्मिळ झाले आहे. अविद्येचे अथवा मिथ्या वस्तूचे महत्त्व मात्र एकसारखे वाढत आहे २ आपलेच मन आपल्याला या संसारबंधनात जखडून टाकीत असते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, या मिथ्या मायेची कोडी तुम्हीच सोडवा. ४

६९१ पोटीं जन्मती रोग । तरि कां म्हणावे आप्तवर्ग ॥ १ ॥
रानीं वसती औषधी । तरि कां म्हणाव्या निपराधी ॥ २ ॥
तैसें शरीराचें नातें । तुका म्हणे सर्व आप्तें ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा – आप्तवर्ग–जवळचे नातेवाईक

अर्थ :– आपल्या पोटात अनेक रोगांचा जन्म झाला; म्हणून काय त्यांना आपण आपल्या मुलाप्रमाणे, आप्तवर्गाप्रमाणे मानतो की काय ? १ रानात पुष्कळ वनस्पती औषधाच्या असतात; म्हणून काय त्या निष्फळ झाल्या ? २ आपल्या शरीराचे व आपले नाते तसेच असते. तेवढाच त्याच्या क्रियांचा व आपल्या नात्याचा संबंध असतो. ३

६९२ नव्हे शब्द एक देशी । सांडी गवशी कोणाला ॥ १ ॥
जाली माझी वैखरी । विश्वंभरी व्यापक ॥ २ ॥
मोकलिलें जावें बाणें । भाता जेणें वाईलें ॥ ३ ॥
आतां येथें कैंचा तुका । बोले सिका स्वामीचा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– भिलटीचिया–भिल्लीणीच्या.

अर्थ :– अयोध्येच्या राजा, अरे रामराया, दीनानाथा, सखया, १ तू माझे पाप, ताप व विघ्न दूर कर. दीनानाथा, मला सुखी कर. २ त्या भिल्लीणीची उष्टी बोरे खाऊनही तू भ्रष्ट झाला नाहीस. ३ मग मी तर तुझ्याशी प्रेमाने सलगी करणारे एक मूल आहे. तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तू मोठ्या सखोल अंतःकरणाचा आहेस. ४

६८८ आमिषाचिये आसे गळ गिळी मासा । फुटोनिया घसा मरण पावे ॥ १ ॥
मरणाचे वेळे करी तळमळ । आठवी कृपाळ तये वेळीं ॥ २ ॥
अंतकाळीं ज्याच्या नाम आले मुखा । तुका म्हणे सुखा पार नाही ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा :– आसे–आशेने

अर्थ – मासे पकडणारे लोक आपल्या गळाला काही आमिष लावून गळ पाण्यात सोडतात त्या खाद्य पदार्थाच्या मिषाने मासे तो गळ गिळण्याचा प्रयत्न करतात व घसा फुटून मरण पावतात १ मरणाच्या वेळी तो तळमळ करीत असल्याने त्यास देवाची आठवण होते. २ तुकाराम महाराज म्हणतात, अंतकाळी का होईना, पण ज्याच्या मुखात ईश्वराचे नाव येते, त्याच्या सुखाला अंत असत नाही ३

विवरण – अंतकाळी आपण परमेश्वराचे स्मरण केले तर, आपणास याची प्राप्ती होईल, हा विचार सर्वच साधुसंतानी सांगितला आहे. भगवद्गीतेच्या आठव्या अध्यायातील पाचव्या श्लोकात ' अंतकाले च मामेव स्मरन्मुक्त्वा कलेवरम् । य प्रयाति स मद्भाव याति नास्त्यत्र सशय ' जो अंतकाळी माझेच स्मरण करतो व देह सोडतो तो माझ्या स्वरूपाला येऊन पोचतो, असे आश्वासन माणसास स्वत भगवतानेच दिलेले आहे येथे एक सावधपणाची सूचना अशी की, जन्मभर वाटेल ती कर्मे करून शेवटी मात्र परमेश्वराचे चिंतन केल्याने सर्व साधेल, अशी कल्पना येथे नाही अंतकाळी तरी परमेश्वराचे चिंतन का घडते ? तर जन्मभर त्याच्याच स्वरूपचिंतनात रगून जाण्याची सवय असते म्हणून म्हणूनच गीतेच्या या श्लोकापुढील श्लोकातच नेहमी भगवतास स्मरून वर्तन करण्याची सूचना दिलेली आहे कारण जन्मभर ज्याचे ध्यान तोच अंत काळीही स्मरणात येणार यासाठी परमेश्वराचे स्मरण अखड-पणे नेहमीच हवे ' तेंवि जितेनि अवसरें । जें आवडोनि जीवीं उरे । तेंचि मरणाचिये मेरे । फार हों लागे ॥ आणि मरणीं जया जें आठवे । तो तेचि गतीतें पावे । म्हणोनि सदा स्मरावे । मातेंचि तुवा ' या ज्ञानेश्वराच्या उक्तीमधील ' सदा स्मरावे ' यातील भावार्थ स्पष्ट आहे

६८९ तुजवरी ज्याचे मन । दरुशन दे त्याचें ॥ १ ॥
कैसा जाती शुद्ध भाव । हात पाव ना वृत्ती ॥ २ ॥
अवघियाचा करूनि मेळा । तुज डोळा रोंखिले ॥ ३ ॥
तुका म्हणे तुज आड । रूपोनि कोड दावीं देवा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– दरुशन–दर्शन

अर्थ :– देवा, ज्याच्यावर तुझे प्रेम आहे, त्याचे तरी दर्शन मला दे ना. १ त्याची जात कशी शुद्ध आहे, *त्याचा भावही कसा शुद्ध आहे, त्याच्या हातापायाचे व्यापार स्वतंत्र राहिलेले नाहीत, हे तरी मला पाहू दे ना.* २ सर्व इंद्रियांचा एक मेळ करून ज्यानी आपले डोळे तुमच्यावरच लाविले आहेत, ३ त्याचे कौतुकाने दर्शन मला द्या, देवा, मी तुमच्या आड उभा राहीन व ते सर्व पाहीन ४

६९० विश्वव्यापी माया । तिणे झाकुळिलें छाया ॥ १ ॥
सत्य गेलें भोळ्यावरी अविद्येची चाली थोरी ॥ २ ॥

आपुलेंचि मन । करवी आपणां बंधन ॥ ३ ॥
तुका म्हणे देवा । तुम्ही फोडीं हीं उगवा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– झाकुळिलें–झाकून टाकले, उगवा–सोडवा.

अर्थ :– सर्व विश्वास भरून टाकणारी जी माया, तिने छायेप्रमाणे सर्व जगाला झाकून टाकले आहे. १ त्यामुळे जगातील सत्य वस्तूचे दर्शन दुर्मिळ झाले आहे. अविद्येचे अथवा मिथ्या वस्तूचे महत्त्व मात्र एकसारखे वाढत आहे २ आपलेच मन आपल्याला या संसारबंधनात जखडून टाकीत असते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, या मिथ्या मायेची कोडी तुम्हीच सोडवा. ४

६९१ पोटीं जन्मती रोग । तरि कां म्हणावे आप्तवर्ग ॥ १ ॥
रानीं वसती औषधी । तरि कां म्हणाव्या निपराधी ॥ २ ॥
तैसें शरीराचें नातें । तुका म्हणे सर्व आप्तें ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा :– आप्तवर्ग–जवळचे नातेवाईक.

अर्थ :– आपल्या पोटात अनेक रोगाचा जन्म झाला; म्हणून काय त्यांना आपण आपल्या मुलांप्रमाणे, आप्तवर्गाप्रमाणे मानतो की काय ? १ रानात पुष्कळ वनस्पती औषधाच्या असतात; म्हणून काय त्या निष्फळ झाल्या ? २ आपल्या शरीराचे व आपले नाते तसेच असते. तेवढाच त्याच्या क्रियाचा व आपल्या नात्याचा संबंध असतो. ३

६९२ नव्हे शब्द एकदेशी । सांडी गवशी कोणाला ॥ १ ॥
जाली माझी वैखरी । विश्वंभरी व्यापक ॥ २ ॥
मोकलिलें जावें बाणें । भाता जेणें वाईलें ॥ ३ ॥
आतां येथें कैंचा तुका । बोले सिका स्वामीचा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– गवशी–सापडून देणारा, सिका–शिक्का.

अर्थ :– एकाच अर्थाला सोडून देणारा किंवा सापडून देणारा असा माझा शब्द एकदेशी नाही. १ खरे म्हणजे माझी वाणी सर्वव्यापक असून विश्वंभरासही भरून राहिली आहे. २ ज्याने बाणांचा भाता खांद्यावर वागविला आहे, त्याच्याकडून सुटलेले बाण हवे तिकडे जाऊ शकतात. ३ आता येथे नुसत्या तुकारामाचे बोल तुम्ही समजू नयेत. त्यावर स्वामीचा, पांडुरंगाचा शिक्का असल्यामुळे ते माझे आहेत असे नाही. ४

६९३ गायनाचे रंगीं । शक्ति अद्भुत हे अंगीं ॥ १ ॥
हें तों देणें तुमचें देवा । घ्यावी अखंडित सेवा ॥ २ ॥
अंगीं प्रेमाचें भरतें[1] । नाहीं उतार चढतें ॥ ३ ॥
तुका म्हणे वाणी । नाम अमृताची खाणी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– खाणी–खाण.

अर्थ :– देवा, तुझे गुणगान ज्यात आहे, असे संगीत गायन फार श्रेष्ठ असते. त्याच्या रंगात अद्भुत शक्तीचा निवास असतो. १ आणि देवा, हे तर तुमचेच देणे असल्यामुळे अशी सेवा तुम्ही आमच्याकडून नेहमी घ्यावी. २ ज्या सेवेत प्रभुप्रेमाचे भरते असते, त्यात कधी चढउतार असू शकत नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, श्रीहरीचे चिंतन करणारी ही वाणी, संगीतवाणी अमृताची मोठी खाणच होय. ४

१ भाते.

६९४ माप म्हणे मी मवितें । भरी धणी ठेवी रितें ॥ १ ॥
देवा अभिमान नको । माझे ठायीं देऊं सको ॥ २ ॥
देशीं चाले सिका । रितें कोण लेखी रंका ॥ ३ ॥
हातीं सूत्रदोरी । तुका म्हणे त्याची थोरी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– मवितें–मोजते, धणी–मालक.

अर्थ – धान्याचे माप उगाचच म्हणत असते की, मी धान्य मोजते; पण खरी गोष्ट अशी आहे की, मोजणारा जो मालक आहे तोच ते माप भरीत असतो व रिकामे करीत असतो. १ देवा, माझ्या ठिकाणी असला अभिमान नको २ ज्या नाण्यावर राजाचा शिक्का आहे, तेच त्या देशात चालते शिक्क्याशिवाय असणाऱ्या गरिबाच्या नाण्याला कोण विचारणार ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, ज्याच्या हातात सत्तेचे सूत्र आहे, त्याचीच थोरवी जिकडे तिकडे असते. ४

६९५ कोण सांगायास । गेलें होतें देशोदेश ॥ १ ॥
नेलें वाऱ्या हातीं माप । समर्थ तो माझा बाप ॥ २ ॥
कोणाची हे सत्ता । जाली वाचा वदविता ॥ ३ ॥
तुका म्हणे या निश्चयें । माझें निरसलें भय ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– निरसलें–संपले.

अर्थ :– माझ्या या विठ्ठलाचे वैभव देशोदेशी सांगण्यासाठी कोण उपदेश करायला गेले होते ? १ माझा मायबाप जो विठ्ठल, त्याच्याच कृपेने वाऱ्याबरोबरच त्याचे नाम सर्व देशभर पसरत राहिले २ माझी वाणी हा उपदेश करीत आहे, तो तरी कुणाच्या सत्तेवर ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, याच निश्चयामुळे माझे भय दूर झाले आहे. ४

६९६ सकळिकांच्या पायां माझी विनवणी । मस्तक चरणीं ठेवीतसें ॥ १ ॥
अहो श्रोते वक्ते सकळ ही जन । बरें पारखुन बांधा गांठी ॥ २ ॥
फोडिलें भांडार धन्याचा हा माल । मी तंव हमाल भारवाही ॥ ३ ॥
तुका म्हणे चाली जाली चहूं देशीं । उतरला कसीं खरा माल ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– चाली–चलती

अर्थ – सगळ्याच्या पायाशी माझीही एक विनंती मस्तक चरणावर ठेवून करीत आहे १ अहो श्रोतेहो, व वक्त्यानो, सर्व लोकहो, कोणतीही गोष्ट नीट पारखून घ्या व आपल्या संग्रही ठेवा २ मी परमार्थविचाराचे हे भांडार खुले केले आहे, पण हा सर्व माल त्या परमेश्वराचा असून मी फक्त ओझे वाहणारा हमाल आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, या मालाची चांगली चलती झाल्यामुळे, याची प्रसिद्धी चारी देशांना होऊन हा ईश्वराच्या नामरूपाचा माल चांगला कसास उतरला आहे ४

विवरण :–तुकाराम महाराजांचा हा एक अतिशय प्रसिद्ध अभंग असून, त्यातील मी देवाचा केवळ भारवाही हमाल आहे, हे परमार्थविचाराचे धन त्याचेच असून मी फक्त भांडार चालविणारा सेवक आहे, ही भावना त्यांच्या इतर अभंगातूनही प्रकट झाली आहे तुकोबा स्वतः वाण्याचा व्यवसाय करीत असल्यामुळे भांडार फोडणे, माल वाहून नेणे, तो कसास उतरणे, या शब्दप्रयोगाची त्यांना चांगलीच अनुभूती आहे ईश्वराच्या घरचे, श्रेष्ठ तत्त्वाचे भांडार आपल्या हाती आले, याचा सार्थ अभिमान कधी कधी त्यांनी प्रकट केला आहे ' भांडाराची किल्ली माझे हातीं आहे । पाहिजे तो वाण नेयें ' असे बुवांनी आणखी एका ठिकाणी म्हटले आहे

६९७ कोण त्याचा पार पावला धुंडितां । पुढें विचारितां विश्वंभरा ॥ १ ॥
अणुरेणु सूक्ष्मस्थूळा पार नाहीं । श्रुती नेती त्याही खुंटलिया ॥ २ ॥
फळांत कीटक येवढें आकाश । ऐसीं तरुवरास अनेक किती ॥ ३ ॥
दाविलें अनंतें अर्जुनासि पोटीं । आणीक त्या सृष्टि कृष्णलोक ॥ ४ ॥
तुका म्हणे लागा संतांचिये कासे । ठाव घेतां कैसे वांचा जीवें ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– पार–अंत, सीमा.

अर्थ :– या विश्वास भरून राहिलेल्या विश्वंभराचा अंत कुणासही लागण्यासारखा नाही. कितीही त्याचा शोध घेतला तरी त्याचा ठाव सापडत नाही. १ तो अणुरेणूइतका सूक्ष्म असून त्याच्या विस्तारलेल्या स्थूलपणास तर सीमाच नाही. वेदश्रुतीही त्याचा शोध घेता घेता, 'नेति नेति...असा नाही, असा नाही' म्हणून खुंटल्या आहेत. २ हे विश्व तरी केवढे आहे ? फळातल्या कीटकास वाटते, फळाएवढेच सीमित आकाश. पण अशी फळे त्या झाडास कितीतरी असतात. झाडे कितीतरी असतात आणि किडेही कितीतरी असतात. ३ या विश्वात पसारा केवढा असतो, हे त्या श्रीकृष्णाने अर्जुनास दाखवून आपल्या पोटात अनेक सृष्टी, अनेक कृष्ण, अनेक लोक यांचे स्थान कसे आहे हे स्पष्ट केले. ४ तुकाराम महाराज म्हणतात, तुम्हांस जर या अनंत विश्वाचा अर्थ समजावून घ्यायचा असेल तर संतांची संगत धरा. त्याचा आश्रय घ्याल तरच तुमचा जीव वाचेल. ५

६९८ जें जें कांहीं करितों देवा । तें तें सेवा समर्पे ॥ १ ॥
भेद नाहीं सर्वात्मना । नारायणा तुज मज ॥ २ ॥
आम्ही दुजें नेणों कोणा । हेंचि मना मन साक्ष ॥ ३ ॥
तुका म्हणे जगन्नाथा । हें अन्यथा नव्हे कीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– सर्वात्मना–सर्वांच्या मनांत असणाऱ्या.

अर्थ :– देवा, मी जे जे काही करीत आहे, ते ते सर्व तुमच्या सेवेसाठी समर्पित करीन. १ नारायणा, आता तुमच्या–माझ्यांत भेद नाही. देवा, तुमचाच वास सर्वांच्या मनांत असतो ना ? २ देवा, तुमच्याशिवाय आम्ही दुसऱ्या कुणासच जाणीत नाही. हीच साक्ष आमची आमच्या मनास आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, जगन्नाथा, मी जे हे सर्व म्हणत आहे ते काही व्यर्थ नाही. ४

६९९ स्तुति करूं तरी नव्हेचि या वेदा । तेथें माझा धंदा कोणीकडे ॥ १ ॥
परी हे वैखरी गोडावली सुखें । रसना रस मुखें इच्छीतसे ॥ २ ॥
रूप वर्णावया कोठें पुरे मती । रोमीं होती जाती ब्रह्मांडें हीं ॥ ३ ॥
तुका म्हणे तूं ऐसा एक साचा । ऐसी तंव वाचा जाली नाहीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– वैखरी–वाणी, साचा–खरोखर.

अर्थ :– देवा, तुमची स्तुती करायला जावे तर ती समर्थ अशा वेदाकडूनही होऊ शकत नाही. अशा परिस्थितीत माझे काय विचारावे ? १ पण ही माझी वाणी देवा, तुमच्या सुखासाठी व नामाच्या गोडीने चटावलेली आहे. माझी जिव्हा तुमच्या नामामृताच्या रसाचीच इच्छा करीत आहे. २ देवा, तुमचे रूपवर्णन करण्यास पुरेल एवढी तरी मला बुद्धी आहे कुठे ? कारण आपल्या स्वरूपाच्या एका केसाच्या अग्रावर हजारो ब्रह्मांडांची घडामोड होत असते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, अशा या अचाट स्वरूपाचा तूच एक खरोखर आहेस, असे वर्णन तर आजपर्यंत कुणीही केलेले नाही. ४

७०० तुज वर्णी ऐसा तुज विण नाहीं । दुजा कोणी तींहीं त्रिभुवनीं ॥ १ ॥
सहस्रमुखें शेष सिणला बापुडा । चिरलिया धडा जिव्हा त्याच्या ॥ २ ॥

अव्यक्ता अलक्षा अपारा अनंता । निर्गुणा सच्चिदा नारायणा ॥ ३ ॥
रूप नाम घेसी आपुल्या स्वइच्छा । होसी भाव तैसा त्याकारणें ॥ ४ ॥
तुका म्हणे जरी दाविसी आपणा । तरिच नारायणा कळों येसी ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – धडा–धड असलेल्या, अलक्षा–न दिसणारा

अर्थ – देवा, तुझे यथार्थ वर्णन करील असा समर्थ तुझ्याशिवाय कुणीही त्रैलोक्यात नाही १ हजारो मुखानी तुझे वर्णन करता करता बिचारा नागराज शषही थकून गेला व त्याच्या धड असलेल्या जिभाही दुभगून गेल्या २ सच्चिदानदा, नारायणा, तू निर्गुण असून अव्यक्त, न दिसणारा, अपार व अनत अशा स्वरूपाचा आहेस ३ ज्याचा जसा भाव असेल, तसे रूप व नाम तू आपल्याच इच्छेने त्याच्यासाठी धारण करतोस ४ तुकाराम महाराज म्हणतात, नारायणा, तुझे रूप जसे असेल, किंवा तू जसे दाखविशील तसेच आम्हास कळणार ५

७०१ पूर आला आनंदाचा । लाटा उसळती प्रेमाच्या ॥ १ ॥
बांधूं विठ्ठलसांगडी । पोहुनि जाऊं पैल थडी ।
अवघे जन गडी । घाला उडी भाई नो ॥ २ ॥
हे तो नाहीं सर्वकाळ । अमुप अमृताचें जळ ॥ ३ ॥
तुका म्हणे थोरा पुण्यें । ओघ आला पंथें येणें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – सांगडी–भोपळ्याचा ताफा

अर्थ – या विठ्ठलभक्तीच्या आनंदाचा केवढा पूर आला आहे पाहा प्रेमाच्या लाटावर लाटा उसळत आहेत १ विठ्ठलरूपाची ही सांगडी बाधून आपण हा भवसागर तरून पैलतीरावर जाऊ तुम्ही सर्व गडी मज-बरोबर या व या पुरात उडी घाला २ कारण हरिभक्तीचा हा पूर सतत टिकणारा नाही अमाप आनंदाचे हे पाणी कायम टिकणारे नसल्याने आत्ताच वेळ साधा ३ तुकाराम महाराज म्हणतात, तुमचे पुण्य थोर, म्हणून भक्तिमार्गाचा हा पूर तुमच्या समोरून चालला आहे ४

७०२ आणीक दुसरें मज नाहीं आतां । नेमिलें[1] या चित्तापासुनियां ॥ १ ॥
पांडुरंग मनीं पांडुरंग ध्यानीं । जाग्रतीं स्वप्नीं पांडुरंग ॥ २ ॥
पडिलें वळण इंद्रियां सकळां । भाव तो निराळा नाहीं दुजा ॥ ३ ॥
तुका म्हणे नेत्रीं केलें ओळखण । साजिरें तें ध्यान विटेवरी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – वळण–रिवाज रीत

अर्थ – या माझ्या चित्तात एका पाडुरंगाची स्थापना झाल्यापासून मला आता दुसरे काही करण्यासारखे राहिलेच नाही १ माझ्या ध्यानात, माझ्या मनात तो एक पाडुरंगच वसती करून राहिला आहे माझ्या जागृत अवस्थेत, माझ्या स्वप्नात तो पाडुरंगच भरून राहिला आहे २ माझ्या सर्व इंद्रियाचा रिवाज पाडुरंगाकडे जाऊन काम करण्याचाच आहे याखेरीज दुसरा कुठला भावच माझ्यात उमटू शकत नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात माझ्या डोळ्यानी विटेवरच्या या तटस्थ ध्यानाचीच चागली ओळख करून घेतली आहे ४

७०३ मी तों सर्वभावें अनधिकारी । होइल कैसी परी नेणों देवा ॥ १ ॥
पुराणींचे अर्थ आणितां मनास । होय कासावीस जीव माझा ॥ २ ॥
इंद्रियांचीं आम्ही पांगिलों अंकितें । त्यांचे रंगीं चित्त रंगलेसें ॥ ३ ॥
एकाचें ही मज न घडे दमन । अवघीं नेमून कैसीं राखों ॥ ४ ॥
तुका म्हणे मज तारीं पंढरीराया । नाहीं तरी वायां गेलों दास ॥ ५ ॥

[1] न मिळे

शब्दार्थ व टीपा:– परी–प्रकार, पांगिलों–पगु, अकिते–स्वाधीन

अर्थ:– देवा, तुमची भक्ती करण्यास मी तर सर्वथा अनधिकारी आहे आता माझी स्थिती कोणत्या प्रकारची होईल, हे काही समजत नाही १ पुराणात सांगितलेला अर्थ मनात आला म्हणजे देवा, माझा जीव कासावीस होतो २ इद्रियांच्या स्वाधीन आम्ही झालो असल्याने पगु आहोत त्यांच्याच विषयांच्या रगांनी आमचे चित्त रगून गेले आहे ३ एकाही इद्रियाचे दमन करणे मला जमलेले नाही तर मग या सर्व इद्रियांना व त्यांच्या शक्तींना आवर मी कसा घालू? ४ तुकाराम महाराज म्हणतात, पढरीराया, तू माझे रक्षण कर नाही तर मी आता अगदी वाया चाललो आहे ५ (पुढे थोड्याफार फरकाने हाच अभग क्र ३८६२ म्हणून आलेला आहे )

७०४ लक्षूनिया योगी पाहाती आभास । ते दिसे आम्हास दृष्टीपुढें ॥ १ ॥
कर दोनी कटी राहिलासे उभा । सावळी हे प्रभा अगकांती ॥ २ ॥
व्यापूनि वेगळें राहिलेंसे दुरी । सकळा अतरीं निर्विकार ॥ ३ ॥
रूप नाहीं रेखा नाम ही जयासी । आपुल्या मानसीं शिव ध्याय ॥ ४ ॥
अंत नाहीं पार वर्ण नाहीं थार । कुळ याति शिर हस्त पाव ॥ ५ ॥
अचेत चेतले भक्ताचिया सुखें । आपुल्या कौतुकें तुका म्हणे ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा :– लक्षूनिया–लक्ष देऊन

अर्थ :– काही नाही असा आभास, योगी लोक नीट लक्ष लावून पाहतात; पण तेच रूप सगुण होऊन आम्हास आमच्या दृष्टीपुढे स्पष्टपणे दिसते १ आपले दोन्ही कर कमरेवर ठेवून हा विटेवर उभा राहिला आहे याची प्रभा व अगकांती सावळ्या रगाची आहे २ निर्विकार असणारे हे तत्त्व सर्वत्र व्यापून, सर्वांच्या अत करणात सामावून वेगळे राहिलेले आहे ३ अशा या तत्त्वास रूप नाही, रेखा नाही, आकार नाही, नावसुद्धा नाही. असे हे रूप आपल्या मनात शिव ध्यात आहे ४ यास कसलाही थारा नाही, जाती नाही, कुळ नाही, शिर नाही, हात नाहीत, पाय नाहीत ५ तुकाराम महाराज म्हणतात, असे हे चैतन्यरहित वाटणारे निर्गुणनिराकार रूप आपल्या भक्तांच्या आवडीसाठी कौतुकाने व सुखाने सचेत होऊन सगुण व साकार झाले आहे ६

७०५ कैसें करूं ध्यान कैसा पाहों तुज । वर्म दावीं मज याचकासी ॥ १ ॥
कैसी भक्ति करूं सांग तुझी सेवा । कोण्या भावें देवा आतुडसी ॥ २ ॥
कैसी कीर्ती वाणूं कैसा लक्षा आणूं । जाणूं हा कवणु कैसा तुज ॥ ३ ॥
कैसा गाऊं [१]गीतीं कैसा ध्याऊं चित्तीं । कैसी स्थिती मती दावीं मज ॥ ४ ॥
तुका म्हणे जैसे दास केले देवा । तैसें हे अनुभवा आणीं मज ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – आतुडसी–प्राप्त होतोस.

अर्थ :– देवा, मी तुमचे ध्यान तरी कसे करू हो? तुला पाहू तरी कसे? मला याचकास यासबधीचे वर्म दाखवाल काय? १ देवा, मी तुमची भक्ती कशी करू? सेवा कशी करू? देवा, तू कोणत्या भावामुळें प्राप्त होतोस? २ तुझ्या कीर्तीचे वर्णन कसे करू? तुमचे रूप लक्षात तरी कसे आणू? तुला मी जाणून तरी कसे घेऊ? ३ गीतात देवा, तुला मी कसे गाऊ? चित्तामध्ये ध्यान तरी कसे करू? तुमची स्थिती कशी आहे? हे माझ्या अल्प मतीस दाखवा ना ४ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तुम्ही मला ज्या अर्थी दास केले आहे, त्या अर्थी हा प्रत्यक्ष अनुभव मला आणून द्या ना ५

७०६ निगमाचे वन । नको शोधूं करूं सीण ॥ १ ॥
या रे गौळियाचे घरीं । बाधलें तें दावें वरी ॥ २ ॥

१ किती, कीर्ती
तु गाथा ४५

पीडलेती भ्रमें । वाट न कळतां वर्मे ॥ ३ ॥
तुका म्हणे भार । माया टाका अहंकार ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– निगमाचे–वेदाच्या अर्थाचे.

अर्थ :– या श्रीहरीचा शोध घेण्यासाठी तुम्ही वेदाच्या अर्थांच्या गहन अरण्यात कधी शिरू नका. तो त्रास कधी घेऊ नका. १ ते सुख पाहायचे असेल तर, तुम्ही या गोकुळात गवळ्यांच्या घरी या. येथे या श्रीहरीला दाव्याने बांधलेले तुमच्या दृष्टीस पडेल. २ तुम्हांस नीट वाट सापडली नाही व वर्म समजले नाही; म्हणूनच तुम्ही भ्रमात पडलेले दिसता. ३ तुकाराम महाराज म्हणतात, तुम्ही तुमच्या शिरावर हा जो अहंकाराचा भार घेतला आहे, तो टाकून द्यावा. ४

७०७ मन वोळी मना । बुद्धि बुद्धी क्षण क्षणां ॥ १ ॥
मीच मज राखण जालों । ज्याणें तेथेंचि धरिलों ॥ २ ॥
जें जें जेथें उठी । तें तें तया हातें कुंटी[1] ॥ ३ ॥
भांजिली[2] खांजनी[3] । तुका साक्ष उरला दोन्ही ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– वोळी–वळत आहे, रक्षण करीत आहे, भांजिली–ओहटी, क्षय, खांजनी–भरती, वृद्धी.

अर्थ :– माझे मनच माझ्या मनास वळवीत आहे, रक्षण करीत आहे. क्षणोक्षणी माझी बुद्धीच माझ्या बुद्धीस सावरीत आहे. १ मीच माझा राखण करणारा झालो असून, मी त्यामुळे जेथल्या तेथेच धरलो गेलो आहे. २ जे जे भाव मनात उठतात, ते ते त्याच मनाकडून कुंठित होतात. ३ तुकाराम महाराज म्हणतात, मनाची ही ओहटी व भरती होत असताना मनच साक्षी राहिले आहे ४

७०८ ब्रह्म न लिंपे त्या मेळें । कर्माअकर्मा वेगळें ॥ १ ॥
तोचि एक तया जाणे । पावे अनुभविलें खुणें ॥ २ ॥
शौच अशौचाचे संधी । तन आळा तनाचि मधीं ॥ ३ ॥
पापपुण्यां नाहीं ठाव । तुका म्हणे सहज भाव ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– शौच–शुद्धी, अशौच–अशुद्धी, तन–शरीर.

अर्थ –कर्माकर्माच्या योगाने ब्रह्म कधी लिप्त होत नाही, लिपले जात नाही. १ ज्याला या ब्रह्मस्वरूपाचा अनुभव आला आहे, तोच एक त्याला जाणू शकतो. २ असे हे ब्रह्म शुद्धता व अशुद्धता यांच्या संधीमध्ये असून गवताच्याच आळयात गवत असते तसे हे समजावे. ३ या सहजभावस्वरूप असणाऱ्या ब्रह्मतत्वात पाप वा पुण्य काही असत नाही. ४

७०९ काय दरा करील वन । समाधान नाहीं जंव ॥ १ ॥
तरी काय तेथें असती थोडीं । काय जोडी तयांसी ॥ २ ॥
रिघतां धांवा पेंवामध्यें । जोडे सिद्धि ते ठायीं ॥ ३ ॥
काय भस्म करील राख । अंतर पाक नाहीं तों ॥ ४ ॥
वर्णाआश्रमाचे धर्म । जाती श्रम जालिया ॥ ५ ॥
तुका म्हणे सोंग पाश । निरसे आस तें हित ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा :– दरा–दरी, अंतर–मन, पाक–पवित्र.

अर्थ :– जोपर्यंत अंतःकरण वासनारहित होऊन समाधानाच्या अवस्थेस आले नाही, तोपर्यंत रानावनात अगर दरीमधील गुहेत निवास करून काय लाभ होणार ? १ तेथेच राहणारे प्राणी काय थोडे आहेत का ? त्यांना

१ कुटी, २ भांजिली, ३ खांजनी.

त्या घननिवासाचा काय लाभ झाला आहे ? २ धान्य काढण्यासाठी आपण पेवात शिरलो, तर त्या ठिकाणी काय आपणांस सिद्धीची प्राप्ती कधी होते काय ? ३ अंतःकरण जर पवित्र नसेल तर, भस्माचे लेपन काय करील ? ही केवळ राखच म्हणावी लागेल. ४ वर्णाश्रमधर्माप्रमाणे वागण्याचे मनात भाव नसताना ठरविले, तरी त्यामुळे वृथा श्रमच होतील. ५ तुकाराम महाराज म्हणतात, ही सर्व सोंगे नवीन पाश निर्माण करणारी आहेत. जेणेकरून आशा खुंटेल त्यातच खरे हित आहे. ६

७१० तें ही नव्हे जें करितां कांहीं । ध्यातां ध्यायीं तें ही नव्हे ॥ १ ॥
तें ही नव्हे जें जाणवी जना । वाटे मना तें ही नव्हे ॥ २ ॥
त्रास मानिजे कांटाळा । अशुभ वाचाळा तें ही नव्हे ॥ ३ ॥
तें ही नव्हे जें भोंवतें भोंवे । नागवें धांवे तें ही नव्हे ॥ ४ ॥
तुका म्हणे एकचि आहे । सहजिं पाहें सहज ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– भोंवे–फिरण्यात

अर्थ :– जें काही तुम्ही कराल ती भक्ती नव्हे. ध्यान करणाराने ध्येयाचे ध्यान केले तरी, ती काही भक्ती नव्हे. १ सर्व लोकांना ज्यामुळे परमार्थाची जाणीव होते, तीही भक्ती नव्हे मनास जें काही वाटते, ती सुद्धा भक्ती नाही २ सर्व जगाचा कंटाळा येणे, सर्वांचा त्रास मानणे, अशुभ वाचाळपणा करणे, यांतही भक्ती नाही ३ एखाद्याच्या भोंवती फिरत राहणे, ही भक्ती नव्हे की, नागवे धावत सुटणे यासही भक्ती म्हणता येणार नाही. ४ तुकाराम महाराज म्हणतात, भक्तीची अवस्था एकच आहे, की ती सहजासहजी घडावी. ५

७११ बोल बोलतां वाटे सोपें । करणी करितां टीर कांपे ॥ १ ॥
नव्हे वैराग्य सोपारें । मज बोलतां न वाटे खरें ॥ २ ॥
विष खावें ग्रासोग्रासीं । धन्य तोचि एक सोसी ॥ ३ ॥
तुका म्हणे करूनि दावी । त्याचे पाय माझे जीवीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – करणी–कार्य, सोपारें–सोपे.

अर्थ :– वैराग्याच्या अथवा परमार्थज्ञानाच्या गोष्टी बोलताना सोप्या वाटतात, पण त्याप्रमाणे कार्य करायचे म्हटले, किंवा वागायचे म्हटले की, जीव घाबरा होतो. १ वैराग्याची गोष्ट काही एवढी सोपी नाही. कुणी याविषयी बोलायला लागले तर, मला ते काही खरे वाटत नाही २ प्रत्येक घासाबरोबर विष खाण्यात जे दुःख आहे, तेच वैराग्यधारणेत आहे. जो हे सर्व सहन करतो तो धन्य होय ३ तुकाराम महाराज म्हणतात, जो कुणी वैराग्याप्रमाणे वागणूक करून दाखवील त्याचे पाय मी जीवात धारण करीन. ४

७१२ होईन भिकारी । पंढरीचा वारकरी ॥ १ ॥
हाचि माझा नेम धर्म । अवघें विठोबाचे नाम ॥ २ ॥
हेचि माझी उपासना । लागेन संतांच्या चरणा ॥ ३ ॥
तुका म्हणे देवा । करीन ते भोळी सेवा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– उपासना–ध्यानधारणा

अर्थ – सर्व वैभव सोडून मी भिकारी होईन, पण पंढरपूरचा वारकरी होईन. १ हाच एक माझा नेम-धर्म असून माझ्या मुखात एकसारखे विठोबाचे नाम असते. २ माझी ध्यानधारणा किंवा उपासना हीच असून माझे मस्तक नेहमी संतांच्या चरणावर असते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, हीच माझी आपली भोळी सेवा आहे, असे तुम्ही समजा. ४

७१३ साटविला हरी । जींहीं हृदयमंदिरीं ॥ १ ॥
त्याची सरली येरझार । जाला सफळ[1] व्यापार ॥ २ ॥
हरी आला हाता । मग कैंचीं भय चिंता ॥ ३ ॥
तुका म्हणे हरी । काहीं उरों नेदी उरी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – येरझार–जन्ममृत्यूची कटकट

अर्थ – ज्याने आपल्या हृदयमंदिरात त्या श्रीहरीस साठविले आहे, १ त्याच्या पाठीमागची जन्ममृत्यूची कटकट संपली असेच समजावे त्याच्या जीविताचा व्यापार सफळ झाला असे समजावे २ एकदा श्रीहरीच हाताशी आल्यावर मग कसली चिंता किंवा भीती ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, हा श्रीहरी एकदा भक्ताच्या अंत करणात स्थिर झाला की मग कसलीही चिंता उरत नाही ४

७१४ मोक्ष तुमचा देवा । तुम्ही दुर्लभ तो ठेवा ॥ १ ॥
मज भक्तीची आवडी । नाहीं अंतरीं ते गोडी ॥ २ ॥
आपल्या प्रकारा । करा अंतन दातारा ॥ ३ ॥
तुका म्हणे भेटी । पुरे एकचि शेवटीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – आवडी–प्रेम

अर्थ – देवा, तुमचा जो मोक्षाचा दुर्लभ ठेवा असेल, तो तुमचा तुम्हास ठेवा १ मला केवळ एका भक्तीचीच आवड किंवा प्रीती असून मनात दुसऱ्या कशाविषयीही प्रेम नाही २ देवा, दातारा, मोक्षासारखे जे काही प्रकार तुमच्या जवळ असतील, त्याचा सांभाळ तुमचा तुम्ही करा ३ तुकाराम महाराज म्हणतात, मला तुमची एक भेट झाली म्हणजे पुरे त्यात सर्व काही पावले ४

७१५ नामपाठ मुक्ताफळांच्या ओवणी । हे सुख सगुणी अभिनव ॥ १ ॥
तरी आम्ही जालो उदास निर्गुणा । भक्तांचिया मना मोक्ष नये ॥ २ ॥
द्यावे घ्यावे ऐसा येथें उरे भाव । काय ठाया ठाव पुसोनिया ॥ ३ ॥
तुका म्हणे आता अभयदान करा । म्हणा विश्वंभरा दिले ऐसे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – ओवणी–ओवलेली माळ

अर्थ – हरिनामाचे पाठ हीच एक मोत्याची ओवलेली माळ आहे, व तिचे सर्वांत मोठे सुख श्रीहरीच्या सगुणवर्णनात आहे १ यासाठीच आम्ही निर्गुणाच्या स्वरूपाबद्दल उदास झालो आहोत कारण आम्हा भक्तांच्या मनात मोक्षाची कल्पना कधीही नसते २ या सगुण स्वरूपात दोघे असल्याने प्रेम देणे व घेणे असा प्रकार असतो मग इतर गोष्टींची चौकशी हवीच कशाला ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, आता अभयदान द्यावे अहो विश्वंभरा, असे अभयदान दिले, असे एकदा म्हणा ना ४

७१६ भवसिंधूचे काय कोडें । दावी वाट चाले पुढें ॥ १ ॥
तारू भला पांडुरंग । पाय भिजो नेदी अंग ॥ २ ॥
मागें उतरिले बहुत । पैल तिरीं साधुसंत ॥ ३ ॥
तुका म्हणे लाग वेगें । जाऊं तयाचिया मागें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – कोडें–अवघड, तारू–नाव, लाग वेगें–त्वरेने

अर्थ – या संसाररूपी सागराची भीती एवढी हवी कशास ? स्वत विठ्ठलच वाट दाखवून आपल्या पुढे चालत असतो १ हा पांडुरंगच संसारसमुद्र तरून जाण्याची एक भली मोठी नाव आहे. तो हा सागर तरत

[1] सवळ

असताना आपले अंग किंवा पायही कधी भिजू देत नाही. २ यापूर्वी या नावेच्या साह्याने पुष्कळ थोर साधुसंत संसारसागर तरून गेले, पैलतीरावर कित्येकजण पोचले. ३ तुकाराम महाराज म्हणतात, त्वरेने आपणही त्यांच्या मागे जाऊ या. ४

७१७ नाहीं साजत हा मोठा । मज अळंकार खोटा ॥ १ ॥
असें तुमचा रजरेण । संतां पायींची वाहाण ॥ २ ॥
नाहीं स्वरूपीं ओळखी । भक्तिभाव करीं देखीं ॥ ३ ॥
नाहीं शून्याकारीं । क्षर ओळखी अक्षरीं ॥ ४ ॥
नाहीं विवेक या ठायीं । आत्मा अनात्मा तें काई ॥ ५ ॥
कांहीं नव्हे तुका । पायां पडेन[1] हें ऐका ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा :– साजत–शोभत, रजरेण–धुळीचा कण.

अर्थ :– मला फार मोठा संत समजू नका. मला हा एवढा मोठा दागिना शोभून दिसत नाही हो. कारण हा गौरवाचा अलंकारच खोटा आहे. १ मी तुमच्याच पायांवरील धूळीचा एक कण असून संतांच्या पायींची वाहाण आहे. २ मला त्या स्वस्वरूपाची ओळखही नसून भक्तिभावाविषयी म्हणाल तर, मी तो दुसऱ्यांचा पाहिला आहे फक्त. त्याप्रमाणे मी करतो. ३ शून्याच्या आकाराची किंवा क्षराक्षर स्वरूपाची ओळखसुद्धा माझी नाही. ४ आत्मा म्हणजे काय, अनात्मा म्हणजे काय, यांसंबंधीचा काहीही विवेक मी कधी केलेला नाही. ५ माझ्या ठिकाणी कसलाही अधिकार नसून, संतांच्या पाया पडणे हे मात्र मी जाणतो, ते नीट ऐका. ६

७१८ सत्य साच खरें । नाम विठोबाचें बरें ॥ १ ॥
जेणें तुटती बंधनें । उभयलोकीं कीर्ति जेणें ॥ २ ॥
भाव ज्याचे गांठी । त्यासी लाभ उठाउठी ॥ ३ ॥
तुका म्हणे भोळा । जिंकूं जाणे कळिकाळा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– उठाउठी–त्वरित.

अर्थ :– विठ्ठलाचे नाव हेच एक खरे; हे त्रिवार सत्य आहे. १ या नावाचा आश्रय केल्यानेच सर्व बंधने तुटतात. यामुळे या लोकी व परलोकीही कीर्ती फार मोठी वाढते. २ ज्याच्या ठिकाणी भाव असतो, त्याला याच्या प्राप्तीचा लाभ त्वरित होतो. ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा या भोळ्या भावाने ईश्वरास शरण जाणारा प्रत्यक्ष काळासही जिंकतो. ४

७१९ सत्य तो आवडे । विकल्पानें भाव उडे ॥ १ ॥
आम्ही तुमच्या कृपादानें । जाणों शुद्ध मंद सोनें ॥ २ ॥
आला भोग अंगा । न लवूं उसीर त्या त्यागा ॥ ३ ॥
तुका म्हणे देवा । अंजन ते तुझी सेवा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– विकल्प–संशय.

अर्थ:– जी गोष्ट सत्य आहे तीच आवडते. वृथा संशय धरल्यास भाव मात्र नाहीसा होतो. १ देवा, तुमच्या कृपाप्रसादाने शुद्ध सोने कोणते, अशुद्ध कोणते, हे आम्ही नीट जाणतो. २ जो भोग दैवयोगाने प्राप्त होईल, त्याचा त्याग करण्यासही आम्ही उशीर कधी करणार नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तुमची सेवा हेच खरेखोटे जाणण्याचे एक प्रभावी असे अंजन आहे. ४

[1] पडणे

७२० करावे चिंतन । तेंचि बरे न भेटून ॥ १ ॥
बरवा अंगीं राहे भाव । तग तोचि जाणा देव ॥ २ ॥
दर्शनाची उरी । अवस्थाचि अंग धरी ॥ ३ ॥
तुका म्हणे मन । तेथें सकळ कारण ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – तग किंवा तग–दृढ

अर्थ – देवाला प्रत्यक्ष न भेटता त्याचे चिंतन करीत असावे, हेच फार उत्तम आहे १ यामुळे मनात चांगला भाव राहतो व या दृढ भावाचा मनुष्यच देव आहे असे मानावे २ त्याचे दर्शन जरी झाले नाही, तरी दर्शन होणार हा भावच मनात स्थिर होतो ३ तुकाराम महाराज म्हणतात, या मनात एकदा देवाचे स्थान नक्की झाले की, सर्व आले असे समजावे ४

७२१ जें जें जेथें पावे । तें तें समर्पावें सेवे ॥ १ ॥
सहज पूजा याचि नांवे । गळित अभिमानें व्हावें ॥ २ ॥
अवघें भोगिता गोसावी । आदीं आवसानीं जीवी ॥ ३ ॥
तुका म्हणे सिण । न धरिता नव्हे भिन्न ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा –पावे–प्राप्त होतील

अर्थ – या जन्मी जे जे भोग प्राप्त होतील, ते सर्व देवाच्या सेवेत समर्पण करावेत १ यालाच सहजपूजा असे नाव असून, ही घडण्यासाठी मात्र आपण आपला अभिमान सोडून द्यावा २ सर्व भोग भोगूनही मग आपण वैराग्यशीलच राहतो जन्मापासून मृत्यूपर्यंत अशी व्यवस्था टिकून असते ३ तुकाराम महाराज म्हणतात, त्याग व भोग यात भिन्नता न मानल्यास मग मात्र सारा त्रासच आहे ४

७२२ नसे तरी मनीं नसो । परी वाचे तरी वसो ॥ १ ॥
देह पडो या चिंतने । विठ्ठलनामसंकीर्तनें ॥ २ ॥
दंभस्थिती भलत्या भावें । मज हरिजन म्हणावें ॥ ३ ॥
तुका म्हणे घाळें तरी । मज सांभाळील हरी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – हरिजन–हरिभक्त

अर्थ – मनात देवाविषयी प्रेम नसले तरी, वाणीतून ते प्रकट झाले तरी चालेल १ विठ्ठलनामाच्या संकीर्तनात व चिंतनातच हा देह पडून जावा अशी इच्छा असावी २ मला लोकांनी हरिभक्त म्हणावे, या दंभाच्या भावाने देवनामाचे चिंतन घडले तरी हरकत नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात थोडा काळ का होईना, पण यामुळे मला तो श्रीहरी सांभाळील ४

७२३ नये जरी काहीं । तरी भलतेंचि वाहीं ॥ १ ॥
म्हणविल्या दास । कोणी न धरी वेठीस ॥ २ ॥
समर्थाच्या नावें । भलतेंसें विकावें ॥ ३ ॥
तुका म्हणे सत्ता । वरी असते बहुता ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा –वाही–ओघाने, मार्गाने

अर्थ – तुला जरी काहीही येत नसले तरी, कोणत्याही मार्गाने तू जा १ ईश्वराचा मी दास आहे, असे म्हटल्याने तुला कुणी बळजबरीने कामास जुंपत नाही २ त्या समर्थ अशा ईश्वराच्या नावावर काय वाटेल ते खपले जाते ३ तुकाराम महाराज म्हणतात, या समर्थ अशा ईश्वराची सत्ता सर्वांवर सारखीच असते ४

७२४ न संडवे अन्न । मज न सेववे वन ॥ १ ॥
म्हणउनी नारायणा । कीव भाकितो करुणा ॥ २ ॥
नाहीं अधिकार । काहीं घोकाया अक्षर ॥ ३ ॥
तुका म्हणे थोडें । आयुष्य अवघेंचि कोडें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा –न सडवे–त्याग होत नाही, कोडें–अडचण

अर्थः– मला अन्नाचा त्याग करवत नाही, वनवास पत्करावा असेही वाटत नाही १ म्हणूनच नारायणा, मी तुझी प्रार्थना करीत आहे २ मला वेदाची अक्षरे म्हणण्यासही अधिकार नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, हे आयुष्य थोडे व अडचणी फार अशी स्थिती आहे. ४

विवरण –या एका महत्त्वाच्या अभगात दोन प्रमुख बाबींचा निर्देश आहे पहिली अशी की, ईश्वरप्राप्तीसाठी कुणासही रानावनात जावयास नको, मला काही ते नीट घडत नाही, असे तुकारामबुवानी येथे स्पष्टपणे सागितले आहे ससाराचा मोह सोडून तुकोबा भडाऱ्याच्या किंवा भामनाथावरील वृक्षवल्लीच्या सहवासात वावरले, याचा अर्थ त्यानी सर्व ससार त्यागच केला असा नाही, किंवा देवासाठी या सर्व गोष्टी आग्रहाने सोडाव्यात असेही नाही मनात भाव नसेल तर नुसत्या बाह्य त्यागाने काय होणार ? त्यापेक्षा अखड अनुसधान राखून, आहे हे श्रीहरीचेच रूप समजून वसल्या ठिकाणीच त्या प्रभूची आळवणी केली तर ती अधिक फलदायी ठरते

दुसरी महत्त्वाची बाब या अभगातील अशी की, त्यानी यात ' नाहीं अधिकार । काहीं घोकाया अक्षर ' असा स्पष्ट निर्देश केलेला आहे वेदाचे अध्ययन करण्यास स्त्रीशूद्रादिकाना अधिकार नसे, याचा उल्लेख या अभगात आहे तुकोबानी ग्रथाचे व वेदाचे अध्ययन किती केले होते, याविषयी भरपूर चर्चा अभ्यासकानी केलेली आहे गीता, भागवत व इतर पुराणे, ज्ञानेश्वरी, एकनाथी भागवत, विष्णुसहस्रनाम इत्यादी ग्रथाच्या वाचनाने बुवाचे मन सस्कारित झाले होते, यात सशय नाही. या सर्व ग्रथातून वेदाचेच सार आले असल्याने प्रत्यक्ष वेदाचे अध्ययन करण्याचीही जरुरी नाही तरीसुद्धा असे दिसते की, आपणास वेदाची अक्षरे घोकावयास अधिकार नाही, असे बुवा म्हणत असले, व त्यानी तसे अध्ययन केले नसले तरी गीता, भागवत, ज्ञानेश्वरी याच्या परिशीलनाने बुवाचे मन कितीतरी प्रगल्भ व बहुश्रुत बनले होते पण या अभ्यासापेक्षाही महत्त्वाची बाब अशी की, गुरुकृपेने व विठ्ठलप्रसादाने त्याच्या प्रतिभेस झालेला ' परतत्त्वाचा स्पर्श ' एवढा श्रेष्ठ होता की, ते जे बोलले त्यातूनच वेदाचा अर्थ प्रकट होत राहिला याही स्वानुभवाची यथार्थ जाणीव त्याना होती ' वेद अनत बोलिला । अर्थ इतुकाची साधिला । विठोबासी शरण जावे । निजनिष्ठे नाम गावे ', ' वेद विहित तुम्ही आइका हो कर्मे ', ' वेदाचा तो अर्थ आम्हासीच ठावा । येरानीं वहावा भार माथा ' इत्यादी वचनावरून तुकोबाच्या वाणीतून वेदाचेच सार प्रकट होते, हे स्पष्ट आहे त्यामुळे वेद जेथून स्फुरले, तेथूनच बुवाच्या वाणीला पालवी फुटली, असे मानणे अधिक सयुक्तिक दिसते

७२५ एकाचीं उत्तरें । गोड अमृत मधुरें ॥ १ ॥
ऐशा देवाच्या विभुती । भिन्न प्रारब्धाची गती ॥ २ ॥
एकाचीं वचनें । कडु अत्यंत तीक्षणे ॥ ३ ॥
प्रकाराचे तीन । तुका म्हणे केले जन ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– तीन–सत्त्व, रज व तम अशा गुणाचे.

अर्थ :– काही लोकाचे बोलणे अमृताप्रमाणे गोड व मधुर असते १ अशा या देवाच्याच विभूती असून प्रारब्धाप्रमाणे भिन्न भिन्न गती त्याना प्राप्त होतात. २ काही लोकाचे बोलणे अत्यत कडक व कडवट असते ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा प्रकारे सत्त्व, रज, तम या तीन गुणाना अनुसरून लोकाचे वर्ग बनलेले असतात ४

७२६ वचनें ही नाड । न बोले तें मुकें खोड ॥ १ ॥
दोहीं वेगळें तें हित । बोली अबोलणी नीत ॥ २ ॥

अंधार प्रकाशी । जाय दिवस पावे निशी ॥ ३ ॥
बीज पृथिवीच्या पोटीं । तुका म्हणे दावी दृष्टी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– नाड–अडचण, खोड–न बोलणारा, मूकस्तंभ.

अर्थ :– फार बोलत राहिल्यासही अडचण निर्माण होते. बरे, काहीच न बोलले तर, मग एखाद्या खोडा-सारखे मूकस्तंभ म्हटले जाते. १ या दोहोंपेक्षा वेगळेच वागले तर, ते फायद्याचे होईल. बोलणेच असे असावे की, त्यात अबोलाचे गुण असावेत, अशी नीती आहे. २ दिवस मावळायला लागला की, प्रकाशातच अंधार येऊन रात्र येत असते. तसे अबोलातच बोलणे वा बोलण्यात अबोलत्व असावे. ३ पृथ्वीच्या पोटीच असणारे बीज वरील संपन्न झालेली व फुलांफळांनी बहरलेली सृष्टी दाखविते, त्याप्रमाणे बोलीतच अबोलत्वाचे गुण असावेत. ४

७२७ विचारा वांचून । न पवीजे समाधान ॥ १ ॥
देह त्रिगुणांचा बांधा । माजी नाहीं गुण सुदा ॥ २ ॥
देवाचिया चाडें । देवा द्यावें जें जें घडे ॥ ३ ॥
तुका म्हणे होतें । बहु गोमटें उचितें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– बांधा–बांधलेला समुदाय, गोमटें–चांगले.

अर्थ :– आत्मविचाराशिवाय मनास खरे समाधान व्हायचे नाही. १ हा देह सत्त्व, रज व तम या गुणांचा एकत्र बांधलेला समुदाय असून, त्यात एकही चांगला गुण नाही २ देवाची इच्छा मनात ओळखून जे काही द्यायचे असेल, ते देवाला समर्पण करावे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, असे करणे हेच मोठे उचित व चांगले होते. ४

७२८ तुटे भवरोग । संचितक्रियमाणभोग ॥ १ ॥
ऐसें विठोबाचें नाम । उच्चारितां खंडे जन्म ॥ २ ॥
वसों न सके पाप । पळे त्रिविध तो ताप ॥ ३ ॥
तुका म्हणे माया । होय दासी लागे पायां ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:–खंडे–संपतात, त्रिविधताप–आधिदैविक, आध्यात्मिक, आधिभौतिक असा तीन प्रकारचे ताप.

अर्थ :– विठ्ठलाच्या नामामुळे भवरोगाचा नाश होतो, तो संपतो. संचित, क्रियमाण यांचे भोगही त्यामुळे संपतात. १ विठोबाच्या नामाचा असा हा प्रभाव असून त्याचा उच्चार करिताच जन्ममरणाच्या खेपा संपतात. २ त्याच्या सान्निध्यात पापाचा निवास असू शकत नाही, व मनास होणाऱ्या त्रिविध तापांचा नाश होतो. ३ तुकाराम महाराज म्हणतात, माया ही दासी होऊन मग त्याच्या पायास स्पर्श करू लागते. ४

७२९ मुसावलें अंग । रंगीं मेळविला रंग ॥ १ ॥
एकीं एक दृढ जालें । मुळा आपुलिया आलें ॥ २ ॥
सागरीं येंवुडा । पडिल्या निवडे कोण्या वाटा ॥ ३ ॥
तुका म्हणे नवें । नव्हे जाणवें हें देवें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – मुसावले–भरून गेले, येंवुडा–थेंब

अर्थ :– ब्रह्माच्या रंगात जीवाचा रंग मिळविल्यामुळे सर्व अंगच ब्रह्मभावाने अथवा प्रेमभावाने भरून गेले आहे. १ आत्मा परमात्म्याच्या स्वरूपात, जीव शिवाच्या स्वरूपात दृढ झाल्यामुळे आपल्या मूळच्या स्थानावर आल्याचेच समाधान वाटले. २ मोठ्या सागरातील पाण्याचा थेंब, हा त्या पाण्यापासून वेगळा कधी काढता येईल का? ३ तुकाराम महाराज म्हणतात, हे मी काही नवीन तत्त्वज्ञान सांगत आहे असे नाही. हे पूर्वीपासूनचे, मूळचेच आहे, असे देवाने जाणावे. ४

७३० अनुतापें दोष । जाय न लगता निमिष ॥ १ ॥
परि तो राहे विसावला । आदीं अवसानीं भला ॥ २ ॥
हेचि प्रायश्चित्त । अनुतापी न्हाय चित्त ॥ ३ ॥
तुका म्हणे पापा । शिवो नये अनुतापा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – अनुतापें–पश्चात्तापाने निमिष–क्षण

अर्थ – खरोखरचा पश्चात्ताप झाला तर मग एका क्षणाचाही विलंब न लागता सर्व दोष नाहीसे होतात १ पण जन्माच्या आरंभापासून नीट स्थिर असलेला पश्चात्ताप असेल तर तो चांगला २ पश्चात्तापाच्या जलामध्ये स्नान करणे हेच खरे प्रायश्चित्त ३ तुकाराम महाराज म्हणतात, पश्चात्तापाच्या वृत्तीस पाप शिवत सुद्धा नाही ४

७३१ चहू आश्रमाचे धर्म । न राखता जोडे कर्म ॥ १ ॥
तैसी नव्हे भोळी सेवा । एक भावचि कारण देवा ॥ २ ॥
तपें इंद्रिया आघात । क्षणे एका वाताहात ॥ ३ ॥
मंत्र चळे थोडा । तरि धडचि होय वेडा ॥ ४ ॥
व्रतें करिता सांग । तरी एक चुकता भंग ॥ ५ ॥
धर्म सत्त्वचि कारण । नाहीं तरी केला सिण ॥ ६ ॥
भूतदयेसि आघात । उचनीच वाताहात ॥ ७ ॥
तुका म्हणे दुर्जे । विधिनिषेधाचें ओझें ॥ ८ ॥

शब्दार्थ व टीपा – धड–शहाणा, सांग–पूर्ण

अर्थ – ब्रह्मचारी, गृहस्थ, वानप्रस्थ व सन्यासी या चार आश्रमाचे धर्म न राखताच नुसतेच कर्म करीत राहिल्यास त्यास त्याचा काय उपयोग ? १ तशी या विठ्ठलाची भोळी सेवा नाही एकनिष्ठ भावानेच हा देव प्रसन्न होतो २ उग्र तपश्चर्येने इंद्रियावर आघात होतो, पण एखाद्या क्षणी विपरीत प्रसंग आला की, मग सर्व तपाचा नाश होतो ३ मंत्राने काही फायदा होईल हे खरे, पण त्यात थोडी जरी चूक झाली तरी, शहाणा मनुष्य वेडा होईल ४ व्रते–वैकल्ये पूर्णपणे केली तरच ठीक पण थोडे जरी त्यात चुकले तरी त्याचा भंग होतो ५ सत्त्व गुणाने युक्त असा धर्म केला तरच तो उपयुक्त होतो नाही तर विनाकारण त्रासच होतो ६ भूतदया चांगली खरी, पण तीमध्येही हा उच, हा नीच असा भाव निर्माण झाला तर मग त्याही उपायाची वाताहत होते ७ म्हणून तुकाराम महाराज म्हणतात, एका भक्तीशिवाय इतर मार्गांनी जाण्यात विधिनिषेधाचे ओझे फार मोठे आहे ८

विवरण – यज्ञयाग, जपतपादी साधने, तीर्थयात्रा, कर्मकांड, तपश्चर्या, यागादी क्रिया यासारख्या मार्गापेक्षा भक्ती फार सोपी, अशी ग्वाही भगवद्गीतेने दिली तिचाच पाठपुरावा साधुसंत नेहमी करीत असतात भोळ्या-भाबड्या भाविकांना खडतर साधने व क्लेशकारक उपाय जमण्यासारखे नसल्यामुळे त्यांना हरिभक्ती हाच एक सहज व सोपा असा उपाय असतो 'नामसंकीर्तन साधन पैं सोपें । जळतील पापें जन्मांतरें ' असे तुकारामबुवांनी म्हटले आहे 'जरी तुज व्हावा देव । तरि हा सुलभ उपाव ', 'भावाचि कारण भावाची कारण । मोक्षाचें साधन बोलियेले ' यासारख्या वचनातून भक्तीची सुलभता तुकाराम महाराजांनी वर्णन केली आहे

७३२ सोडिला संसार । माया तयावरि फार ॥ १ ॥
धावत चाले मागें मागें । सुखदुःख साहे अंगें ॥ २ ॥

यानें घ्यावें नाम । तोसीकरणें त्याचें काम ॥ ३ ॥
तुका म्हणे भोळी । विठ्ठलकृपेची कोवळी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – साहे–सहन करतो, अगें–स्वत

अर्थ – ज्याने या श्रीहरीच्या प्राप्तीसाठी ससाराचा लोभ सोडला, त्याच्यावर देवाची फार मोठी माया असते १ अशा भक्ताचे काम देव त्याच्यामागे धावत जाऊन करीत असतो त्याचे सुखदु ख तो स्वत होऊन सहन करीत असतो २ या भक्ताने ईश्वराचे नाव घ्यावे व ईश्वराने त्याची सर्व कामे करावीत असे नाते मग निर्माण होत असते ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशी ही विठ्ठल माउली मोठी कृपाळू असून मनाची मोठी भोळी पण कोवळी आहे ४

७३३ बैसों खेळूं जेवूं । तेथें नाम तुझें गाऊं ॥ १ ॥
रामकृष्णनाममाळा । घालूं ओवुनिया गळा ॥ २ ॥
विश्वास हा धरूं । नाम बळकट करूं ॥ ३ ॥
तुका म्हणे आता । आम्हा जीवन शरणागता ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – शरणागतां–शरण आलेल्याना

अर्थ – बसत असताना, खेळत असताना, जेवण करीत असताना, प्रत्येक हालचालीत देवा, तुझे नाम आम्ही घेत राहू १ रामकृष्ण या नामाची माळ ओवून आम्ही आमच्या गळयात धारण करू २ याच नामाचा विश्वास धरून नामस्मरणाच्या भक्कम मार्गाने आम्ही जाऊ ३ तुकाराम महाराज म्हणतात, आम्हा शरण आलेल्याना या विठ्ठलाचे नाव हेच एक जीवन आहे ४

७३४ पाटीं पोटीं देव । कैंचा हरिदासा भेव ॥ १ ॥
करा आनंदें कीर्तन । नका आशंकितमन ॥ २ ॥
एथें कोठें काळ । करील देवापाशीं बळ ॥ ३ ॥
तुका म्हणे धनी । सपुरता काय वाणी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – भेव–भय, आशंकित–सशयित, सपुरता–पूर्णत्व, वाणी–कमतरता

अर्थ – हा देव मागे, पुढे, आत, बाहेर सर्वत्र वसलेला असल्यामुळे हरिदासाना भय कसले आहे ? १ आनदाने तुम्ही कीतन करून त्या प्रभूचे गुणगान करावे मन कधीच सशयित असे ठेवू नका २ या देवापाशी प्रत्यक्ष काळाचेही बळ काही करु शकणार नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, हा धनी जर प्रसन्न झाला तर मग पूर्णत्वास काय कमतरता आहे ? ४

७३५ मनोमय पूजा । हेचि पढीयें[1] केशीराजा ॥ १ ॥
घेतो कल्पनेचा भोग । न मानेती बाह्य रग ॥ २ ॥
अतरींचें जाणे । आदिवर्तमान खुणे ॥ ३ ॥
तुका म्हणे कुडें । कोठें सरे त्याच्या पुढें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – पढीयें–आवडती, कुडें–खोटा

अर्थ – मनातील शुद्ध भावाने होणारी पूजा त्या श्रीहरीला फारच आवडते १ त्याच्या विषयी मनात ज्या विविध भावाच्या कल्पना असतात, त्याच्या भोगातच तो सुखावतो मग त्याला बाह्य रगाचा थाटमाट नको असतो २ हा देव मागचे, चालू व पुढचे काळात जे जे मनात असेल ते जाणतो ३ तुकाराम महाराज म्हणतात, खोटा भाव त्यापुढे कसा टिकून राहील ? ४

१ पढरीयें

७३६ जाणे भक्तीचा जिव्हाळा । तोचि देवाचा[1] पुतळा ॥ १ ॥
आणीक नये माझ्या मना । हो का पंडित शाहाणा ॥ २ ॥
नामरूपी जडले[2] चित्त । त्याचा दास मी अंकित ॥ ३ ॥
तुका म्हणे नवविध । भक्ति जाणे तोचि शुद्ध ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – नवविध-श्रवण, कीर्तन, स्मरण, पादसेवन, अर्चन, वंदन, दास्य, सख्य व आत्मनिवेदन अशा नऊ प्रकारांनी भक्ती.

अर्थ – जो भक्तीचा जिव्हाळा जाणतो, जिव्हाळ्याने भक्ती करितो, तो प्रत्यक्ष देवाचाच पुतळा आहे, असे समजावे. १ मग तो पंडित आहे की नाही, शहाणा आहे की नाही, हे काही माझ्या मनात येत नाही. २ माझे चित्त त्याच्या नामरूपात जडलेले असते. मी त्याचा अंकित दास बनलेलो असतो ३ तुकाराम महाराज म्हणतात, श्रवण, कीर्तन, स्मरण इत्यादी नऊ प्रकाराची भक्ती जो जाणतो तोच खरा शुद्ध होय ४

७३७ याजसाटीं वनांतरा । जातो साडुनियां घरा ॥ १ ॥
माझें विठावेल प्रेम । बुद्धि होईल निष्काम ॥ २ ॥
अद्वैताची वाणी । नाहीं ऐकत मी कानीं ॥ ३ ॥
तुका म्हणे अहंब्रह्म । आड येऊं नेदीं भ्रम ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – साडुनिया–सोडून, दिठावेल–दृष्ट लागेल

अर्थ – मी घर सोडून वनात यासाठीच जातो की, १ श्रीहरीच्याबद्दल माझ्या मनात जो प्रेमभाव आहे त्यास दृष्ट लागेल, अशी एकसारखी भीती मला असते या वननिवासाने माझी बुद्धीही निष्काम होत राहील. २ अद्वैताचे बोलणे मी माझ्या कानानी कधी ऐकत नाही ३ मीच ब्रह्म आहे, अशा भ्रमास मी माझ्या सगुण प्रेमाच्या आड येऊ देणार नाही ४

विवरण –सगुणभक्तीच्या आवडीचा हा एक लहानसा पण गोड असा अभंग अर्थपूर्ण आहे तत्त्वज्ञानाच्या दृष्टीने अद्वैत हेच खरे, पण त्याची अनुभूती घ्यायची ती द्वैती भूमिकेवरील भक्तीमध्ये अव्यक्त परमात्माच भोगा-साठी व्यक्त झाला याची अनुभूती भक्तीच्या प्रेमसुखात मोठी असते तुकारामबुवा म्हणत आहेत, माझे हे सगुणाचे प्रेम दृष्ट लागून कमी होईल, म्हणून मी रानावनात जातो तेथे मग माझी बुद्धीही इतर विषयातून कमी कमी होऊन केवळ त्याच्या रूपातच जडेल अद्वैताच्या प्राप्तीचा ध्यास लागला की, मग मीच ब्रह्म अशी भावना होईल तत्त्वज्ञानाच्या दृष्टीने ही भावना ठीक असली तरी, भक्तिसुखास तिने उणेपणा येतो मीच ब्रह्म आहे अशी धारणा झाली तर मग भक्ती कुणी कुणाची करायची ? म्हणून तुकोबा म्हणतात की, असल्या अहंब्रह्माची बाधा मला होऊ नये

७३८ बुडतां आवरीं । मज भवाचे सागरीं ॥ १ ॥
नको मानूं भार । पाहो दोषाचे डोंगर ॥ २ ॥
आहे तें सांभाळीं । तुझी कैसी ब्रीदावळी ॥ ३ ॥
तुका म्हणे दोषी । मी तो पातकाची राशी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – आवरीं-सावरून धर, रक्षण कर

अर्थ – देवा, मी या भवसागरात बुडून जात आहे तू त्यातून माझे रक्षण कर १ माझ्या दोषाचे किंवा अपराधाचे डोंगर पाहून त्याचे ओझे तू मानू नकोस २ पतित लोकांना पावन करून घेण्याचे जे तुझे ब्रीद आहे त्याचा तू सांभाळ कर ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, मी तर पातकाची रास असून दोषी आहेच, पण तू पतितपावन आहेस ना ? ४

१ दैवाचा, २ मीनले

७३९ अक्षई तें झाले । आता न मोडे रचिले ॥ १ ॥
पाया पडिला खोले ठायीं । तेथें पुढें चाली नाहीं ॥ २ ॥
होतें विखुरले । ताळा जमे झडती आले ॥ ३ ॥
तुका म्हणे बोली । पुढें कुंटितचि जाली ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – अक्षई–कायम टिकणारी

अर्थ – या भक्तिमार्गाची इमारत आम्ही उभी केली आहे, ती कायम टिकणारी आहे आता जी उभी राहिली आहे, ती काही केल्या मोडणार नाही १ चागला खोल असा तिचा पाया असल्यामुळे तेथे कुणाचे काही चालणार नाही २ आजवर सर्व हिशेब पसरून राहिला होता काही तपास लागत नव्हता, पण आता तपास करता सर्व हिशेब नीट लागला व ताळाही जमून आला ३ तुकाराम महाराज म्हणतात, म्हणून या मार्गाविषयीचे पुढील बोलणेही आमचे संपल्यासारखे झाले ४

७४० तुझे थोर थोर । भक्त करिती विचार ॥ १ ॥
जपतपादि साधने । मज चिंतवेना मनें ॥ २ ॥
करुणावचनें । म्या भाकावीं तुम्हा दीनें ॥ ३ ॥
तुका म्हणे घेई । माझें थोडें फार ठायीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – भाकावीं–बोलावीत

अर्थ – देवा, तुझे मोठे मोठे भक्त तुझ्याविषयी फार मोठा विचार करतात. १ देवा, त्यांच्यासारखी जपतपादी साधनेही मला माझ्या मनात सुद्धा आणता येत नाहीत २ करुण अशा वाणीनें मी दीनाने तुमच्याशी बोलावे, कृपा मागावी, एवढेच मला येते ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, अशी जी काही माझी थोडीफार सेवा असेल ती तू घ्यावीस ४

७४१ लावुनि काहाळा । सुखें करितो सोहळा ॥ १ ॥
सादवीत गेलो जना । भय नाहीं सत्य जाणा ॥ २ ॥
गात नाचत विनोदें । टाळघागऱ्याच्या छंदें ॥ ३ ॥
तुका म्हणे भेव । नाहीं पुढें येतो देव ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – काहाळा–झांजा, सादवीत–सावध करीत, सागत, भेव–भीती

अर्थ – मी झांजा वगैरे वाजवून मोठ्या सुखाने भजनाचा सोहळा करितो १ याच मार्गाने मी लोकाना सावध करीत गेलो आहे सत्यास कधीही भय नाही, असे मी सागत आलो आहे २ मोठ्या तल्लीनतेने मी गातो, नाचतो, टाळघागऱ्याच्या छंदावर माझे कीर्तन सुरू असते ३ तुकाराम महाराज म्हणतात, आता मला कसली भीती आहे ? प्रत्यक्ष देव माझ्या पुढेच आहे ना ४

७४२ मुक्त कासया म्हणावे । बंधन तें नाहीं ठावें ॥ १ ॥
सुखें करितो कीर्तन । भय विसरले मन ॥ २ ॥
देखिजेना नास । घालू कोणावरी कास ॥ ३ ॥
तुका म्हणे साहे । देव आहे तैसा आहे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – कासया–कशास, साहे–साह्य.

अर्थ :– बंधन म्हणजे काय हेच मला माहीत नसल्याने, मुक्तता किंवा मोक्ष कशास म्हणावे, हेच मला समजत नाही १ मी या ठिकाणी आता सुखाने कीर्तन करीत असून मला कसलीही भीती नाही २ आता कुणाचा नाश

करावा अशी वस्तूच समोर दिसत नसल्यामुळे कास घालून आता कुणाचा प्रतिकार करावा? ३ तुकाराम महाराज म्हणतात, हा देव मला सदैव साह्य करीत असून तो आहे तसाच कृपाळू आहे. ४

७४३ ओनाम्याच्या काळें[1] । खडे मांडविले[2] बाळें ॥ १ ॥
तेंचि पुढें पुढें काई । मग लागलिया सोई ॥ २ ॥
रज्जु सर्प होता । तोंवरीचि न कळतां ॥ ३ ॥
तुका म्हणे साचें । भय नाहीं बागुलाचें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा.– ओनाम्याच्या काळें–ओनामा शिकण्याच्या वेळेस, लहानपणी, रज्जु–दोर

अर्थ :–लहानपणी ओनामा किंवा श्रीगणेशा शिकत असताना प्रथम एकेक अक्षरावर खडा ठेवून शिकवले जाते. लहान मुलांसाठी ही रीत असते. १ पण मग पुढे चांगला अभ्यास झाल्यावरही खडे मांडून शिकविण्याची काय जरूरी आहे? २ दोर हा सर्प आहे अशी भावना होती, तोपर्यंतच त्याची भीती होती. ३ तुकाराम महाराज म्हणतात, बागुलाचे भय तो केवळ बागुलबुवा आहे, हे सत्यज्ञान होताच नाहीसे होते. ४

७४४ आतां पुढें धरीं । माझे आठव वैखरी ॥ १ ॥
नको वडवडूं भांडे । कांहीं वाउगें तें रांडे ॥ २ ॥
विठ्ठल विठ्ठल । ऐसे सांडुनियां बोल ॥ ३ ॥
तुका म्हणे आण । तुज स्वामीची हे जाण ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :–आठव–स्मरण, वैखरी–वाणी

*अर्थ :– माझ्या वाणीने आता यापुढे स्मरण म्हणून त्या विठ्ठलाचेच नाम घ्यावे. १* हे वाचे, उगाच बडबड करून भांडणे उकरू नकोस. २ विठ्ठल विठ्ठल असे शब्द सोडून तू दुसरे काहीही बोलू नकोस. ३ तुकाराम महाराज म्हणतात, असे जर न करशील तर तुला देवाची शपथ आहे. ४

७४५ काय नव्हे करितां तुज । आतां राखें माझी लाज ॥ १ ॥
मी तों अपराधाची राशी । शिखा अंगुष्ट तोंपाशीं ॥ २ ॥
त्राहें त्राहें त्राहें । मज कृपादृष्टी पाहें ॥ ३ ॥
तुका म्हणे देवा । सत्य घ्यावी आतां सेवा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– शिखा–शेंडी, अंगुष्ट–पायाचा अंगठा, त्राहे–रक्षण कर

अर्थ :– देवा, तू मनात आणशील तर काय करणार नाहीस? आता माझी लाज तू राख ना. १ देवा, मी तर अपराधांची रास असून शेंडीपासून पायाच्या अंगठ्यापर्यंत पापांनी भरून गेलो आहे. २ देवा, तू माझे रक्षण करावेस, अशी मी त्रिवार प्रार्थना करीत आहे. मजवर कृपा दृष्टीने पाहा ना. ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, माझी ही सत्य स्वरूपाची सेवा घ्या ना तुम्ही ४

७४६ वंदीन मी भूतें । आतां अवघींचि समस्तें ॥ १ ॥
तुमची करीन भावना । पदोपदीं नारायणा ॥ २ ॥
गाळुनियां भेद । प्रमाण तो ऐसा वेद ॥ ३ ॥
तुका म्हणे मग । नव्हे दुजयाचा संग ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:– भूतें–प्राणिमात्र, गाळुनिया–सोडून.

---

१ वेळें, २ मांडवले.

अर्थः– देवा, आता सर्व प्राणिमात्रांना मी नमस्कार करीन. १ नारायणा, पदोपदी मी तुमच्याच भावनेने पाहीन २ लहानमोठा असा भेद सोडून मी वागेन मी याबद्दल वेदास प्रमाण मानीन. ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, एवढे झाल्यावर मला दुसऱ्या कुणाची संगत सहन होणार नाही ४

७४७ पूजा पुज्यमान । कथे उभे हरिजन ॥ १ ॥
ज्याची कीर्ती वाखाणिती । तेथें ओतली ते मुर्ती ॥ २ ॥
देहाचा विसर । केला आनंदें संचार ॥ ३ ॥
गेला अभिमान । लाज बोळविला मान ॥ ४ ॥
शोक मोह चिंता । याची नेणती ते वार्ता ॥ ५ ॥
तुका म्हणे सखे । विठोबाच ते सारिखे ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – पुज्यमान–पूजा करण्यास योग्य असे. ओतली–निर्माण झाली, बोळविला–नाहीसा केला.

अर्थ – पूजा करण्यास योग्य असे जे हे हरिभक्त कथेसाठी उभे आहेत, १ आणि कीर्तनामधून ज्याचे गुणगान ते करीत आहेत, त्याची मूर्तीच त्यांच्यासमोर उभी आहे, निर्माण झाली आहे. २ या हरिभक्तांना स्वतःच्या देहाचा विसर पडला असून त्यांनी केवळ आनंदातच संचार केला आहे. ३ त्यांच्यामधील सर्व अभिमान संपला असून लाज व मान यांचाही प्रभाव नाहीसा झाला आहे. ४ शोक, मोह, चिंता यांचे नाव सुद्धा आता ते जाणीत नाहीत. ५ तुकाराम महाराज म्हणतात, असे हे विठ्ठलभक्त केवळ विठ्ठलच बनून गेले आहेत. ६

७४८ भाव तैसें फळ । न चले देवापाशीं बळ ॥ १ ॥
धांवे जातीपाशीं जाती । खुण येरयेरां चित्तीं ॥ २ ॥
हिरा हिरकणी । काढी आंतुनि अहिरणी ॥ ३ ॥
तुका म्हणे केलें[1] । मन[2] शुद्ध हें चांगलें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – येरयेरां–एकमेकाना, अहिरणी–ऐरण

अर्थ :– जसा भक्तिभाव असेल, तसे फळ आपणांस प्राप्त होईल. इतर बळाचा काही उपयोग देवाच्या प्राप्तीसाठी होणार नाही. १ जो ज्या जातीपाशी असेल, त्या जातीपाशी तो धावून जाईल. कारण परस्पराचे चित्त एकमेकांना समजत असते. २ वरून घाव बसले असताना न फुटता हिरा ऐरणीतच अडकतो; पण हिरकणीने तो बाहेर येतो. ३ त्याप्रमाणे तुकाराम महाराज म्हणतात, आपले मन शुद्ध, चांगले व ईश्वरभक्ताच्या जातीस मिळणारे असावे. ४

७४९ वरि बोला रस । कथी ज्ञान माजी फोस ॥ १ ॥
ऐसे लटिके जे ठक । तयां इह ना पर लोक ॥ २ ॥
परिस एक सांगे । अंगा धुळी हे न लगे ॥ ३ ॥
तुका म्हणे हाडें । कुतऱ्या लाविलें झगडें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – फोस–पोकळ, व्यर्थ, ठक–फसविणारे.

अर्थ :– वरवर परमार्थज्ञान सांगणाऱ्याचे बोल चांगले रसाळ वाटतात; पण खऱ्या व शुद्ध ज्ञानाच्या दृष्टीने पाहिल्यास त्याचे अंतरंग पोकळच असते. १ असे हे लोक फसविणारे असतात. त्यांना धड हाही लोक मिळत नाही व परलोकही उरत नाही. २ तो ऐकतो एक व सांगतो दुसरे मलतेच. ३ अंगाला परमार्थविचाराची धूळ काही लागू देत नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, हाडकाच्या तुकड्यासाठी भांडणाऱ्या कुत्र्यांसारखी त्यांची स्थिती असते ४

---

१ भले, २ मन शुद्ध जीही केले.

७५० हेचि तुझी पूजा । आतां करीन केशीराजा ॥ १ ॥
अवघीं तुझीं पदें । नमस्कारीन अभेदें ॥ २ ॥
न वर्जितदिशा । जाय तेथेंचि सरिसा ॥ ३ ॥
नव्हे एकदेशी । तुका म्हणे गुणदोषीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – अभेदें-अभेद समजून, न वर्जित-न सोडता

अर्थ :– देवा, आता मी तुझी पूजा अशाच प्रकारे करीन. १ मी अभेदत्व समजून, सर्वत्र तुझीच पावले आहेत, असे समजून नमस्कार करीन. २ कोणत्याही दिशेस न वगळता, न सोडता, सर्वत्र समत्वाच्या भावाने जाऊन पाहीन. ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, मी गुणदोषाच्या बाबतीत एकदेशी होणार नाही ४

७५१ आपले तो कांहीं । येथें सांगिजेसें नाहीं ॥ १ ॥
परि हे वाणी वाचाळ । छंद करविते बरळ ॥ २ ॥
पंचभूतांचा हा मेळा । देह सत्यत्वे निराळा ॥ ३ ॥
तुका म्हणे भुली । इच्या उफराटचा चाली ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – वायचळ-वाचाळ, बरळ–बडबड, भुली–चुकीने

अर्थ – या मानवी जन्मात आपले असे काही आहे, हे सांगता यायचे नाही. १ पण ही माझी वाणी वाचाळ असून व्यर्थ बडबड करण्याचा छंद घेते. २ हा देह म्हणजे पंचमहाभूतांचा एक मेळावा असून आत्मतत्त्वापासून तो निराळाच आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, पण या वाणीमुळे देह व आत्मा एकच मानण्याची चूक होत असते. ४

७५२ विठ्ठल नावाडा फुकाचा । आळविल्या सांटीं वाचा ॥ १ ॥
कटीं कर जैसे तैसे । उभा राहिला न बैसे ॥ २ ॥
न पाहे सिदोरी । जाती[1] कुळ न विचारी ॥ ३ ॥
तुका म्हणे भेटी । हाका देतां उठाउठीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – नावाडा–नावाडी, फुकाचा–फुकटचा.

अर्थ – भवसागरातून तरून नेणारा हा विठ्ठल फुकटचा नावाडी आहे. मात्र त्याची आळवणी आपण आपल्या वाणीने सतत केली पाहिजे १ हा देव कमरेवर हात ठेवून जशाचा तसा उभा असून खालीही बसत नाही. २ पापपुण्याची शिदोरी किती आहे किंवा भक्ताची जातकुळी कोणती आहे, याचा विचार न करता हा भक्तावर कृपा करतो ३ तुकाराम महाराज म्हणतात, भक्तानी हाक मारल्याबरोबर हा देव त्वरित त्याना भेट देतो. ४

७५३ कृपावंत किती । दीनें बहु आवडती ॥ १ ॥
त्यांचा भार वाहे माथां । करी योगक्षेमचिंता ॥ २ ॥
भुलो नेदी वाट । करीं धरूनि दावी नीट ॥ ३ ॥
तुका म्हणे जीवें । अनुसरतां एका भावें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – योगक्षेमचिंता–कल्याणाविषयी सर्व प्रकारची काळजी.

अर्थ – हा ईश्वर किती कृपाळू आहे ! याला आपले दीन भक्त नेहमी आवडतात. १ तो स्वत त्याचा सर्व भार शिरावर घेऊन त्याची सर्व कल्याणदायक चिंता तोच वाहतो. २ तो कधी सन्मार्ग चुकवू देत नाही हात धरून नीट वाट दाखवितो. ३ तुकाराम महाराज म्हणतात, याला एकनिष्ठेने आपण शरण जावे. ४

---

१ याती.

७५४ नेणती वेद श्रुति कोणी । आम्हां भाविकां वांचुनी ॥ १ ॥
रूप आवडे आम्हांसी । तैसी जोडी हृषीकेशी ॥ २ ॥
आम्हीं भावें बळिवंत । तुज घालूं हृदयांत ॥ ३ ॥
तुका म्हणे तुज धाक । देतां पावसील हाक ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – जोडी–प्राप्ती, धाक–भीती.

अर्थ :– या ईश्वरास आम्ही भाविक भक्त जितके ओळखतो, तितके कुणीही, वेदश्रुतीसुद्धा याला जाणीत नाहीत. १ याचे रूप आम्हास फार आवडते. त्याप्रमाणे आम्ही याची प्राप्ती करून घेतली आहे २ आम्ही भक्ति-भावामुळे बलवान झालो असून त्यायोगे देवा, तुला आमच्या हृदयात घालून ठेवू. ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, आमची तुला मोठीच भीती असल्याने हाक देताच तू आम्हास पावतोस. ४

७५५ मन गुंतलें लुलयां । जाय धांवोनि त्या ठाया ॥ १ ॥
मागें परतावी[1] तो बळी । शूर एक भूमंडळी ॥ २ ॥
येऊनियां घाली घाला । नेणों काय होई[2] तुला ॥ ३ ॥
तुका म्हणे येणें । बहु नाडिले शाहाणे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – लुलया–विषयात, नाडिले–फसविले.

अर्थ :– मन या विषयाच्या ठिकाणी गुंतून राहिले आहे ते पुन पुन त्याच ठिकाणी जात आहे १ त्या मनास तेथून मागे फिरवील तोच या पृथ्वीवर मोठा शूर समजावा लागेल. २ हे मन जेव्हा घाला घालील तेव्हा काय होईल ते समजणार नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, या अवखळ मनाने पुष्कळ शहाण्यांना फसविले आहे. ४

७५६ घेईं[3] माझे वाचे । गोड नाम विठोबाचें ॥ १ ॥
तुम्ही घ्या रे डोळे सुख । पाहा विठोबाचें मुख ॥ २ ॥
तुम्ही ऐका रे कान । माझ्या विठोबाचे गुण ॥ ३ ॥
मना तेथें धांव घेईं । राहें विठोबाचे पायीं ॥ ४ ॥
तुका म्हणे जीवा । नको सोडूं या केशवा ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – तेथें–विठ्ठलचरणी.

अर्थ:– माझ्या वाचे, तू या विठोबाचे गोड नाम सतत घेत जा १ डोळ्यानो, तुम्ही पोट भरून असे याच विठोबाचे मुख पाहून सुखी व्हा. २ कानानो, या माझ्या विठोबाचेच गुण तुम्ही सदैव ऐका ३ माझ्या मना, त या विठ्ठलाच्या चरणीच धाव घेऊन तेथेच स्थिर राहा. ४ तुकाराम महाराज म्हणतात, जीवा, आता या विठ्ठलास तू कधी सोडू नकोस ५

७५७ धणी न पुरे गुण गातां । रूप दृष्टी न्याहाळितां ॥ १ ॥
बरवा बरवा पांडुरंग । कांति सांवळी सुरंग ॥ २ ॥
सर्वमंगळाचें सार । मुख सिद्धीचें भांडार ॥ ३ ॥
तुका म्हणे सुखा । अंतपार नाहीं लेखा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपाः– धणी–तृप्ती, बरवा–चांगला, सुरंग–सुंदर, अंतपार–सीमा, लेखा–समजा.

---

१ परतवी, २ होईल, ३ घेई घेई

अर्थः—या श्रीहरीचे गुण कितीही गायिले तरी मनाची कधी तृप्ती होत नाही याचे रूप न्याहाळून पाहताना दृष्टीचे सुखही अपार होते. १ हा पांडुरंग फारच चांगला आहे. याची कांती सावळी व सुंदर अशी आहे २ याचे मुख म्हणजे सर्व मंगल पदार्थांचे सार असून सर्व सिद्धींचे ते एक उत्तम भांडार आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, या श्रीहरीच्या सुखाला काही सीमा नाही असेच समजा. ४

७५८ जरी मी नव्हतों पतित । तरि तूं पावन कैंचा येथ ॥ १ ॥
म्हणोनि माझें नाम आधीं । मग तूं पावन कृपानिधी ॥ २ ॥
लोहो महिमान परिसा । नाहीं तरीं दगड[1] जैसा ॥ ३ ॥
तुका म्हणे याचकभावें । कल्पतरु मान[2] पावे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – कैंचा–कसा, कृपानिधी–कृपेचा साठा, लोहो–लोखंडाने.

अर्थः– देवा, मी जर येथे पतित नसतो, तर तुझी पतितपावन म्हणून येथे कीर्ती कशी झाली असती? तू पतितपावन कसा बनला असतास? १ म्हणून माझे पतित हे नाव तुझ्या आधी असून मग तू पतितपावन असा कृपेचा साठा आहेस. २ लोखंडामुळे खरे म्हणजे परिसाला महत्त्व आले आहे. नाहीतर तो दगडाप्रमाणेच झाला असता. ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी याचकभाव धरून उभा आहे म्हणून त्या कल्पतरूला महत्त्व व मान मिळत आहे नाही तर तो इतर वृक्षाप्रमाणेच झाला असता, तसे देवा, माझ्यामुळे तुम्हास महत्त्व आहे. ४

७५९ एक भाव चित्तीं । तरीं न लगे कांहीं युक्ती ॥ १ ॥
कळों आलें जीवें । मज माझियाचि भावें ॥ २ ॥
आठवचि पुरे । सुख अवघें मोहो रे ॥ ३ ॥
तुका म्हणे मन । पूजा इच्छी नारायण ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – मोहोरे–प्राप्त होते.

अर्थ :– या प्रभूविषयी एकनिष्ठेचा भाव चित्तात असावा. मग इतर युक्त्याची काही जरूरी लागत नाही. १ हे सर्व मला माझ्या शुद्ध भावामुळे समजून आले आहे २ नुसती त्याची आठवण झाली तरी ती पुरी आहे. तिच्यामुळे सर्व सुखांची प्राप्ती होत असते ३ तुकाराम महाराज म्हणतात, हा नारायण मनोमय पूजेची इच्छा करीत असतो. ४

७६० मज संतांचा आधार । तूं एकलें निर्विकार ॥ १ ॥
पाहा विचारूनि देवा । नको आम्हांसवें दावा ॥ २ ॥
तुज बोल न बोलवे । आम्हां भांडायाची सवे ॥ ३ ॥
तुका म्हणे तरी । ऐक्यभाव उरे उरी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – सवे–सवय.

अर्थ :– देवा, मला या संताचा तरी केवढा आधार आहे. पण तू मात्र एकटाच असून निर्विकार आहेस १ देवा, तुम्हीच नीट विचार करून पाहा, उगीच आमच्या बरोबर दावा धारण करू नका. २ तुम्हाला एक शब्दही बोलायला नको व आम्हास मात्र भांडण करण्याची सवय आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, यासाठी ऐक्यभाव उरेल असे कर. ४

७६१ तुज मागणें तें देवा । आम्हां तुझी चरणसेवा ॥ १ ॥
आन नेघों देसी तरी । रिद्धि सिद्धि मुक्ति चारी ॥ २ ॥

---

१ दगडा ऐसा, २ नाम.

संतसंगति सर्वकाळ । थोर प्रेमाचा सुकाळ ॥ ३ ॥
तुका म्हणे नाम । तेणें पुरे माझें काम ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – आन–दुसरे, नेघों–घेणार नाही.

अर्थ – देवा, तुझी चरणसेवा मला दे. एवढेच तुझ्यापाशी माझे मागणे आहे १ दुसरे तू काहीही दिलेस तरी ते मी घेणार नाही. रिद्धी, सिद्धी किंवा चारही प्रकारच्या मुक्ती मला नको आहेत. २ नेहमी मला संतांचीच संगत देत जा. त्याच्याच संगतीत प्रेमाचा मोठा सुकाळ असतो. ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तुझे एक नामच मला पुरे आहे. त्यायोगे माझे सर्व काम होईल. ४

७६२ तुझा शरणागत । जन्मोजन्मींचा अंकित ॥ १ ॥
आणीक नेणें कांहीं हेवा । तुजवांचूनि केशवा ॥ २ ॥
हेचि माझें गाणें । तुझें नामसंकीर्तन ॥ ३ ॥
तुझ्या नामाचीं भूषणें । तुका म्हणे ल्यालों लेणें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – हेवा–हाव, ल्यालों–धारण केली.

अर्थ – देवा, मी तुला शरण आलेलो असून मी तुझा जन्मोजन्मींचा सेवक झालो आहे. १ आणखी देवा, तुझ्या प्राप्तीवाचून मला दुसरी कसलीही हाव नाही. २ तुझे मोठ्या आवडीने नामसंकीर्तन करणे हेच माझे गाणे आहे ३ तुझ्या नामाची भूषणे देवा, मी मोठ्या प्रीतीने माझ्या अंगावर धारण केली आहेत ४

७६३ उतरलों पार । सत्य झाला हा निर्धार ॥ १ ॥
तुझें नाम धरिलें कंठीं । केली संसाराची तुटी ॥ २ ॥
आतां नव्हे बाधा । कोणेविशीं कांहीं कदा ॥ ३ ॥
तुका म्हणे कांहीं । आतां उरलें ऐसें नाहीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – पार–पैलतीर.

अर्थ.–देवा, मी या भवसागरातून सुखरूपपणे पैलतीर गाठले आहे. हाच माझा थोर निश्चय आहे. १ तुझे नाम माझ्या मुखात असल्याने आता संसाराचा लोभ संपल्यासारखाच आहे. २ आता यापुढे कधी कसलीही बाधा मला होणार नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, आता काही मिळवावयाचे उरले आहे असे नाही. ४

७६४ क्रियामतिहीन । एक मी गा तुझें दीन ॥ १ ॥
देवा करावा सांभाळ । वारीं माझी तळमळ ॥ २ ॥
नको माझे ठायीं । गुणदोष घालूं कांहीं ॥ ३ ॥
अपराधाच्या कोटी । तुका म्हणे घालीं[1] पोटीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:– क्रियामतिहीन–सत्कृत्य, सुबुद्धी याच्या खेरीज, वारीं–दूर कर.

अर्थ – देवा, नानाप्रकारची सत्कृत्ये व सुबुद्धी याच्या विरहित असे माझे जीवन आहे. मी एक दीन असा तुझा दास मात्र आहे १ देवा, तू माझा प्रेमाने सांभाळ करावास. माझ्या मनातील दुःखाची तळमळ तू दूर कर २ माझ्या ठिकाणी कसलेही गुणदोष तू आता निर्माण करू नकोस ३ माझे कोटयवधी अपराध असतील तरी देवा, तू दयावंत होऊन ते पोटात घालावेस. ४

७६५ नाहीं निर्मळ जीवन । काय करील साबण ॥ १ ॥
तैसी चित्तशुद्धि नाहीं । तेथें बोध करील काई ॥ २ ॥
वृक्ष न धरी पुष्पफळ । काय करील वसंतकाळ ॥ ३ ॥

---

१ घाला.

वांजे न होती लेकरें । काय करावें भ्रतारें ॥ ४ ॥
नपुंसका पुरुषासी । काय करील बाइल त्यासी ॥ ५ ॥
प्राण गेलिया शरीर । काय करील वेव्हार ॥ ६ ॥
तुका म्हणे जीवनेंविण । पीक नव्हे नव्हे जाण ॥ ७ ॥

शब्दार्थ व टीपा – जीवन–पाणी किंवा जीवित, वांजे–वांझोट्या स्त्रीस

अर्थः– पाणी जर स्वच्छ नसेल, तर सावणाचा काय उपयोग? माणसाचे जीवन जर स्वच्छ व पापरहित नसेल तर वरवर सावण लावून काय उपयोग? १ त्याप्रमाणे जर चित्ताची शुद्धता नसेल तर तेथे बोध काय करील मग? २ फूल किंवा फळ धारण करण्याची कुवतच जर वृक्षामध्ये नसेल तर वसंतऋतूच्या आगमनाचा उपयोग तरी ... मुले होत नसली तर तिच्या पतीने तरी काय करावे? ४ पुरुष नपुंसक असे... ५ एकदा शरीरातून प्राण गेल्यावर त्याच्याकडून काय नेहमीसारखे व्यव... म्हणतात, पाणीच जर नसेल तर शेतातील पीक कधीच पिकणार नाही ७



...तुम्हासी वाणीचीं ॥ १ ॥
...त्वा पिंडदान देतें ॥ २ ॥
...जें बोलाया रोकडें ॥ ३ ॥
...कोणा घेतासि वो संगा ॥ ४ ॥

...ळ असलेली.

कोण... म्हणून तर दुर्मिळ असे आम्ही तुला झालो १ नाही तर तुझे नाम तरी स्पष्ट... तरी कुणी दिले असते रे? २ तुझ्या मागेपुढे कोण उभे राहिले असते? तुमच... ोण? ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, आम्ही नसतो तर तुम्ही ...स घेतले असते हो? ४

...मग भोगलें[2] कणीस ॥ १ ॥
...हानथोरांवरी जीव ॥ २ ॥
...। केल्याविण जीवासाटीं ॥ ३ ॥
...देतां लाभ दुणी ॥ ४ ॥

...णी–दुप्पट

भोगाय... ...ाच्या दाण्याचा नाश झाल्यासारखा दिसतो, पण त्यातूनच टपोरे कणीस तेव्हा... ...पर्यंत सर्वांना ही गोष्ट समजते २ जीवावर उदार होऊन काम करावे देशरक्ष... तुकाराम महाराज म्हणतात, रणांगणावर जीव समर्पण झाल्यास ...। होतो. ४

...योर झाली नागवण ॥ १ ॥
...ाय पाहातोसि हरी ॥ २ ॥
...वस गेले तोंडीं माती ॥ ३ ॥
...पाहे भवनदी ॥ ४ ॥
पडिला विपयाचा घाला । तेणें नागविलें मला ॥ ५ ॥
शरण आलो आतां धांवें । तुका म्हणे मज पावें ॥ ६ ॥

१ कोण, २ भोगिल.

शब्दार्थ व टीपा – नागवण–फसवणूक, वाव–विसावा

अर्थ – देवा, आता हे आयुष्य असेच काहीही न साधता वाया जाणार ना! फार मोठी फसवणूक या आयुष्यात झाली १ देवा, आता तू रक्षणासाठी धाव ना आता वाट तरी कसली व कुणाची पाहतोस? २ तुझे व माझे याच गतीने दिवस मात्र वाया चालले आहेत, व अखेर तोडात माती पडण्याचा प्रसग आला आहे ३ हे ओढाळ मन एका क्षणाचाही विसावा घेऊ देत नाही भवसागरात बुडवायला तत्पर झाले आहे ४ नाना विषयाचा घाला आता गजवर पडत असून या सर्वांनी मला चागलेच फसविले आहे ५ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, आता धाव तू मी तुला मनोभावे शरण आलो आहे ६

७६९ सोसोनि विपत्ती । जोडी दिली तुझे हातीं ॥ १ ॥
त्याचा हाचि उपकार । अतीं आम्हाशीं वेव्हार ॥ २ ॥
नामरूपा केला ठाव । तुज कोण म्हणतें देव ॥ ३ ॥
तुका म्हणे हरी । तुज ठाव दिला घरीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – जोडी–प्राप्ती ठाव–स्थान

अर्थ – देवा, आजपर्यंत आम्ही अनेक हालअपेष्टा भोगल्या व तुला तुझ्या स्थानाची प्राप्ती करून दिली १ त्याचा तू असाच उपकार फेडणार वाटते? अतकाळी आम्हास सोडून जाण्याचा व्यवहार तुला शोभतो काय? २ तुला नामरूपाचे स्थान आम्हीच प्राप्त करून दिले ना? नाही तर तुला देव तरी कुणी म्हटले असते रे? ३ तुकाराम महाराज म्हणतात देवा, तुला तुझ्या घरात नीट स्थान प्राप्त करून दिले ते आम्हीच ना? ४

७७० आपुले मागता । काय नाहीं आम्हा सत्ता ॥ १ ॥
परि या लौकिकाकारणें । उरी टेविले बोलणें ॥ २ ॥
येचि आता घडी । करू बैसो तेची फडी ॥ ३ ॥
तुका म्हणे करितो तुला । ठाव नाहींसे विठ्ठला ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – उरीं–शिल्लक, फडी–निकाल

अर्थ – देवा, आमचीच वस्तू मागायला आम्हास अधिकार नाही असे झाले की काय? १ देवा, आम्ही हे बोलणे चागले मोठ्यानेही केले असते पण तुझा नावलौकिक मोठा, म्हणून आम्ही मोठ्याने बोलणे शिल्लक ठेविले आहे २ पण आता याच वेळेस ये पाहू थोडा वेळ बसू व आपल्या व्यवहाराचा निकाल लावून टाकू ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तुमचा या जगात ठावठिकाणा लागणार नाही असे करू का? ४

७७१ असो आता किती । तुज यावे काकुलती ॥ १ ॥
माझें प्रारब्ध हे गाढें । तू बापुडें तयापुढें ॥ २ ॥
सोडवीन आता । ब्रीदें तुझीं पढरीनाथा ॥ ३ ॥
तुका म्हणे वळी । तो गाढ्याचे कान पिळी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – गाढ्याचे–निर्वळाचे, गरिबाचे

अर्थ – असो देवा, आता मी काकुळतीस तरी किती यावे रे? १ माझे हे प्रारब्धकर्म फार मोठे असून तू त्याच्या पुढे अगदीच क्षुल्लक दिसत आहेस २ पढरीनाथा, पतितपावन वगैरे जी ब्रीदे तुझी आहेत, ती मी आता दूर करून टाकतो कारण त्याचा उपयोग दिसत नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, बलवान माणसाने, निर्बळाचा, गरिबाचा कान धरावा असा नियमच आहे की ४

७७२ काय नव्हे केलें । एका चिंतितां विठ्ठलें ॥ १ ॥
सर्वसाधनांचें सार । भवसिंधु उतरी पार ॥ २ ॥
योगयागतपें । केलीं तयानें अमुपें ॥ ३ ॥
तुका म्हणे जपा । मंत्र तीअक्षरी सोपा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– अमुपें–अमाप, कित्येक, तीअक्षरी–तीन अक्षराचा.

अर्थ :– या एका विठ्ठलाचे चिंतन केल्यानंतर काय हस्तगत होत नाही ? १ या विठ्ठलाच्या नामात सर्व साधनाचे सार असून याच्याचमुळे भवसागर तरून जाण्यास मदत होते. २ योगायाग, तपश्चर्या इत्यादी अनेक साधने या नामातच आलेली असतात. ३ तुकाराम महाराज म्हणतात, म्हणून विठ्ठल हा तीन अक्षरांचा सोपा मंत्र जपा ना. ४

७७३ हो कां दुराचारी । वाचे नाम जो उच्चारी ॥ १ ॥
त्याचा दास मी अंकित । कायावाचामनेंसहित ॥ २ ॥
नसो भाव चित्तीं । हरिचे गुण गातां गीतीं ॥ ३ ॥
करी[1] अनाचार । वाचे हरिनामउच्चार ॥ ४ ॥
हो कां भलतें कुळ । शुचि अथवा चांडाळ ॥ ५ ॥
म्हणवी हरिचा दास । तुका म्हणे धन्य त्यास ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा .– अंकित–स्वाधीन झालेला, शुचि–शुद्ध, पवित्र.

अर्थ :– वाणीने जो विठ्ठलाचे नाम उच्चारीत आहे तो दुराचारी असला तरी काय झाले ? १ मी त्याचाही दास, स्वाधीन असलेला होईन. काया, वाचा, मनासहित त्याची मी सेवा करीन. २ त्याच्या चित्तात जरी भाव नसला तरी तो हरीचे गुणगान करीत असला म्हणजे झाले ३ तो अनाचार करीत असला व त्याच्या मुखात श्रीहरीच्या नामाचा उच्चार असला तरी दोष पुष्कळच कमी होतो ४ त्याचे कोणतेही मग कुळ असो. ते पवित्र असो की अपवित्र चांडाळाचे असो. ५ तो जर श्रीहरीचा दास असे स्वत:स म्हणवून घेत असेल, तर तो खरोखरच धन्य होय, असे तुकाराम महाराज म्हणतात. ६

७७४ हाकेसरिसी उडी । घालूनियां स्तंभ फोडी ॥ १ ॥
ऐसी कृपावंत कोण । माझे विठाईवांचून ॥ २ ॥
करितां आठव । धांवोनियां घाली कव ॥ ३ ॥
तुका म्हणे गीती गातां । नामें द्यावी सायुज्यता ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– स्तंभ–खांब, प्रल्हादाच्या रक्षणार्थ धावून येणाऱ्या नृसिंहाचा संदर्भ आहे. कव–मिठी

अर्थ :– हा विठ्ठल किती कनवाळू आहे ? नुसती आर्त भावाने हाक मारताच तो खांब फोडून बाहेर येऊन भक्ताच्या रक्षणार्थ उडी घेतो. १ अशी कृपावंत माउली माझ्या विठाबाईवाचून दुसरी कोण असणार ? २ त्याची नुसती आठवण करताच हा धावून येतो व आपल्या भक्तांना मिठी घालतो. ३ तुकाराम महाराज म्हणतात, याचे गीत गातानाच सायुज्यता भावाची मुक्ती मिळाल्याचे श्रेय प्राप्त होते. ४

७७५ लोह चुंबकाच्या बळें । उभें राहिलें निराळें ॥ १ ॥
तैसा तूंचि आम्हांठायीं । खेळतोसी अंतर्बाहीं ॥ २ ॥
भक्ष अग्नीचा तो दोरा । त्यासि बांचवी मोहरा ॥ ३ ॥
तुका म्हणे अघोलपणे । नेली लांकडें चंदनें ॥ ४ ॥

---
[1] करो.

शब्दार्थ व टीपा :– लोह–लोखंड, चुंबकाच्या–लोखंडास ओढून घेणाऱ्या धातूच्या, मोहरा–दोऱ्यास अग्नीच्या मुखातून वाचविणारा दगड, अधीलपणें–पूर्वीच्या गुणाना.

अर्थ :– लोखंडास वेधून घेणाऱ्या, आकर्षित करणाऱ्या गुणामुळे ते लोखंड निराळेच उभे राहिलेले दिसते. १ तसा देवा, तू आमच्या ठिकाणी निरंतर असून अंतर्बाह्य खेळत राहतोस. २ खरे म्हणजे दोरा हे अग्नीचे भक्ष्य होय. पण तोच मोहरा नावाच्या दगडाबरोबर दोरा अग्नीत टाकला तर मग काही जळून जात नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, आधी असलेल्या लाकडांच्या गुणांना चंदनाच्या सहवासाने नाहीसे व्हावे लागते ४

७७६ डोई वाढवूनि केश । भूतें आणिती अंगास ॥ १ ॥
तरी ते नव्हति संतजन । तेथें नाहीं आत्मखुण ॥ २ ॥
मेळवूनि नरनारी । शकुन सांगती नानापरी ॥ ३ ॥
तुका म्हणे मैंद । नाहीं त्यापासीं गोविंद ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– मैंद–कपटी, ढोंगी.

अर्थ :– डोक्यावर मोठमोठे केस वाढवून अंगात भूत आल्यासारखा संचार करतात. १ पण अशी माणसे काही संत सज्जन नव्हेत. कारण त्यांच्याजवळ स्वसुखाची आत्मखूण नसते. २ भोवती अनेक स्त्रीपुरुष जमवून नाना प्रकारचे शकुन सांगणारेही पुष्कळ असतात. ३ परंतु तुकाराम महाराज म्हणतात, ही सर्व माणसे ढोंगी असतात. त्यांच्याजवळ परमेश्वर कधीही नसतो ४

७७७ गाढवाचे घोडे । आम्ही करूं दृष्टीपुढें ॥ १ ॥
चघळी वाहाणा । माघारिया बांडा सुना ॥ २ ॥
सोंगसंपादणी । तरि करूं शुद्ध वाणी ॥ ३ ॥
तुका म्हणे खळ । करूं समर्थी निर्मळ ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– बांडा–काळ्या-पांढऱ्या रंगाचा, सुना–कुत्रा, खळ–दुष्ट

अर्थ :– मनास मानेल तसे इंद्रियाधीन होणाऱ्या गाढवास आम्ही सुजाण अशा घोड्याप्रमाणे नीट रूप देऊ. त्याला सन्मार्ग दाखवू. १ काळ्या-पांढऱ्या रंगांच्या कुत्र्याप्रमाणे वाहणा चघळणारासही आम्ही नीट वळू. २ कुणी खोटीच सोंगसंपादणी करीत असले तरी त्यांनाही आम्ही शुद्ध करू. ३ तुकाराम महाराज म्हणतात, प्रत्यक्ष दुष्ट स्वभावाचा मनुष्य असला तरी त्याला प्रसंगी आम्ही निर्मळ करू ४.

७७८ बाईल मेली मुक्त जाली । देवें माया सोडविली ॥ १ ॥
विठो तुझें माझें राज्य । नाहीं दुसऱ्याचें काज ॥ २ ॥
पोर मेलें बरें जालें । देवें मायाविरहित केलें ॥ ३ ॥
माता मेली मज देखतां । तुका म्हणे हरली चिंता ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– बाईल–बायको, काज–काम

अर्थ :– देवा, बायको मरण पावली. बरे झाले. मुक्त होऊन गेली. देवाने मला मायेतून सोडविले. १ आता विठ्ठला, तुझे व माझेच असे राज्य असून यात दुसऱ्याचे काही काम नाही. २ पोरगे मरून गेले, तरी ठीक झाले. देवाने याही पाशातून मुक्त केले. ३ माझी आई पाहता पाहता मरून गेली; तुकाराम महाराज म्हणतात, बरे झाले, ही पण चिंता माझी दूर झाली. ४

७७९ योग तप याचि नांवें । गळित व्हावें अभिमानें ॥ १ ॥
करणें तें हेंचि करा । सत्यें वरा व्यापार ॥ २ ॥

तरि खंडे येरझार । निघे भार देहाचा ॥ ३ ॥
तुका म्हणे मानामान । हें बंधन नसावें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– गळित व्हावें–संपावा, व्यापार–व्यवहार.

अर्थ :– आपला सर्व अभिमान संपावा. याच स्थितीचे नाव योग व तप असे आहे. १ जें काही तुम्हांस, करायचे असेल ते हेच करा, की सत्याला धरून सर्व व्यवहार असावा. २ तरच तुमची जन्ममृत्यूची येजा संपेल व देहबुद्धीचा भार कमी होईल. ३ तुकाराम महाराज म्हणतात, मानापमानाचेही ओझे आपणांवर कधी घेऊ नये. ४

७८० करी संध्यास्नान । वारी खाउनियां अन्न ॥ १ ॥
तया नाहीं लाभहानी । आदा वेंचाचिये मानीं[1] ॥ २ ॥
मजुराचें धन । विळा दोरचि जतन ॥ ३ ॥
तुका म्हणे नाहीं । अधीरासी देव कांहीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– वारी–व्यर्थ घालवितो, आदा–जमा, वेंच–खर्च.

अर्थ :– हा स्नानसंध्या वेळच्या वेळी करतो, पण दुसऱ्याचे अन्न खाऊन सारे व्यर्थ घालवितो. १ त्याला मग कसलाच लाभ किंवा तोटा होत नाही. त्याच्या जमेचा व खर्चाचा हिशेब सारखाच राहतो. २ मजुराचे शेवटी धन कोणते? तर त्याने आपल्या विळ्याचे किंवा दोराचे जतन केले असते तेच. ३ तुकाराम महाराज म्हणतात, अधीर होणाऱ्या माणसास देव कसा भेटणार? ४

७८१ खाखर घेउनि आलें । त्यासी तरवारेनें हाले ॥ १ ॥
नव्हे आपुलें उचित । करुनि टाकावें फजित ॥ २ ॥
अंगुळिया मोडी । त्यासी काय सिलें घोडीं ॥ ३ ॥
नपुंसकासाठीं । तुका म्हणे न लगे जेठी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– खाखर–वस्तारा, अंगुळिया–बोटांच्या दाबाने, सिलें–हत्यार, शस्त्र, जेठी–पहिलवान.

अर्थ :– कुणी एक मनुष्य हातातील वस्तारा घेऊनच धावून आला, तर त्यास तरवार घेऊन मारण्यास जाण्याची काय जरूरी आहे? १ 'हे काही ठीक नव्हे' असे म्हणूनही त्याला फजित करता येते. २ नुसत्या बोटांच्या दाबानेच ज्याचा मोड होईल त्याच्यासाठी हत्यारांची किंवा घोडेस्वारांची काय जरूरी आहे? ३ नपुंसकाच्या, नामर्दाच्या पराभवासाठी पहिलवानाची काय जरूरी आहे? ४

७८२ वर्णाश्रम करिसी चोख । तरि तूं पावसी उत्तम लोक ॥ १ ॥
तुजला तें नाहीं ठावें । जेणें अंगेंचि ब्रह्म व्हावें ॥ २ ॥
जरि तूं जालासी पंडित । करिसी शब्दांचें पांडित्य ॥ ३ ॥
गासी तान मान बंध । हाव भाव गीत छंद ॥ ४ ॥
जाणसील तूं स्वतंत्र । आगमोक्त पूजायंत्र ॥ ५ ॥
साधनाच्या ओढी । डोळियांच्या मोडामोडी ॥ ६ ॥
तुका म्हणे देहीं । संत जाहाले विदेही ॥ ७ ॥

शब्दार्थ व टीपा :– वर्णाश्रम–ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र हे चार वर्ण, ब्रह्मचारी, गृहस्थ, वानप्रस्थ व सन्यासी हे चार आश्रम.

अर्थ :– धर्मशास्त्रात सांगितल्याप्रमाणे तू वर्णाश्रमांचे धर्म पाळशील तर तू उत्तम लोकांस पावशील एवढेच. १ पण स्वत:च्या देहानेच ब्रह्मपदाचा अनुभव कसा घ्यावा हे मात्र तुला समजणार नाही. २ तू अगदी मोठा पंडित

[1] मनीं

झालास तरी फार तर तुला शब्दाचे पांडित्य दाखविता येईल ३ चांगल्या ताना घेऊन गायन शिकलास तर हावभावयुक्त असे नाना गीताचे व छंदाचे प्रकार तू गाशील एवढेच ४ तू शास्त्रप्रणीत असे स्वतंत्र पूजायंत्र जाणशील ५ किंवा साधनाच्या नाना प्रकारांनी डोळ्याची उघडझाप करशील; पण याच्या योगे काय साधणार आहे? ६ तुकाराम महाराज म्हणतात, तू संतांच्याकडे पाहाना, ते या देहीच विदेही म्हणजे मुक्त झालेले असतात ७

७८३ प्रेमसूत्र दोरी । नेतो तिकडे जातो हरी ॥ १ ॥
मनेसहित वाचा काया । अवघें दिले पंढरीराया ॥ २ ॥
सत्ता सकळ तया हातीं । माझी कींव काकुलती ॥ ३ ॥
तुका म्हणे ठेवी तैसे । आम्ही राहों त्याचे इच्छे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:– वाचा–वाणी, काया–शरीर

अर्थ – *प्रभूविषयी गाढ प्रेम हाच एक बळकट अशा प्रेमसूत्राचा धागा आहे या धाग्यामुळे भक्ताच्यासाठी* श्रीहरी तो जिकडे नेईल तिकडे जातो १ आम्ही आपल्या मनासहित आमची वाणी व आमचे शरीर भगवताला, पंढरीरायाला अर्पण केल्या आहेत या बाबी २ त्याच्या हातात आता सर्व सत्ता असून मी त्यापुढे काकुळतीस येत असतो ३ तुकाराम महाराज म्हणतात, तो जसे ठेवील तसेच आम्ही त्याच्या इच्छेने राहू ४

७८४ पाववील ठाया । पांडुरंग चिंतिलिया ॥ १ ॥
त्यासी चिंतिलिया मनीं । चित्ता करी गवसणी ॥ २ ॥
पावावया फळ । अंगीं असावें हें बळ ॥ ३ ॥
तुका म्हणे तईं । सिद्धि वोळगती पायीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – ठाया–ठिकाणास, गवसणी–झाकण, वोळगती–प्राप्त होतात

अर्थ :– ज्या स्थानाची आपण इच्छा करीत आहोत, त्या ठिकाणास या पांडुरंगाच्या चिंतनामुळे पोचता येते १ या श्रीहरीस मनात चिंतिल्यावरोबर तो आपल्या चित्ताचे झाकण करून आपल्या भक्ताचे रक्षण करतो २ असे हे इच्छिलेले फळ *मिळविण्यासाठी आपल्या अंगात भक्तीचे मोठेच बळ असावे लागते* ३ तुकाराम महाराज म्हणतात, तेव्हाच सर्व सिद्धी पायाशी प्राप्त होतात ४

७८५ धन्य भावशीळ । ज्याचें हृदय निर्मळ ॥ १ ॥
पूजी[1] प्रतिमेचे देव । संत म्हणती तेथें भाव ॥ २ ॥
विधिनिषेध नेणती । एक निष्ठा धरूनी चित्तीं ॥ ३ ॥
तुका म्हणे तैसें देवा । होणें लागे त्याच्या भावा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – भावशीळ–शुद्ध भावाचे

अर्थ :– जे शुद्ध भावाचे आहेत व ज्याचे हृदय निर्मळ आहे ते धन्य होत १ जे लोक प्रतिमेच्या देवाची पूजा प्रेमाने करतात त्या ठिकाणी भावभक्ती आहे असे सत्पुरुष म्हणतात २ हे लोक कोणत्याही प्रकारचा विधि-निषेध मनात न आणता ईश्वरावर एक निष्ठा ठेवून, चित्तात भाव ठेवून वागत असतात ३ तुकाराम महाराज म्हणतात, मग देवासही आपल्या भक्ताच्या भावाप्रमाणे व्हावे लागते ४

७८६ आधींच आळशी । वरी गुरूचा उपदेशी ॥ १ ॥
मग त्या कैंची आडकाठी । विधिनिषेधाची भेटी ॥ २ ॥
नाचरवे धर्म । न करवे विधिकर्म ॥ ३ ॥
तुका म्हणे तें गाढव । घेती मनासवें धाव ॥ ४ ॥

१ मानी

शब्दार्थ व टीपा :– नाचरवे–आचरीत जाऊ नयेत.

अर्थ :– आधीच आळशी असणाऱ्या शिष्याला गुरुही तसाच आळसाला प्रोत्साहन देणारा भेटावा. १ मग त्याला विधिनिषेधाची कसलीच आडकाठी राहात नाही २ शास्त्राने सांगितलेले धर्म आचरीत जाऊ नये असेच त्यास वाटते. काही विधी अथवा पवित्र कार्ये करावीत असेही त्यास वाटत नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशी माणसे मनाच्या वेगानुसार धाव घेणाऱ्या गाढवाप्रमाणेच असतात. ४

७८७ नाचे टाळी पिटी । प्रेमें अंग धरणीं लोटी ॥ १ ॥
माझे सखे ते सज्जन । भोळे भाविक हरिजन ॥ २ ॥
न धरिती लाज । नाहीं जनासवें काज ॥ ३ ॥
तुका म्हणे दाटे । कंठ नेत्रीं जळ लोटे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– काज–काम.

अर्थ :– जे भक्त भक्तिप्रेमात येऊन नाचतात, टाळी पिटतात, प्रेमाने अंग धरणीवर लोटून देतात १ ते भोळे, भाविक भक्त सज्जन माझे सखे वाटतात मला. २ त्यांना कसलीही लाज धरावीशी वाटत नाही. लोक काय म्हणतील याशीही त्यांना काम नसते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा भक्तांचा कंठ दाटून येतो. त्यांच्या डोळ्यातून पाणी ओघळत असते. ४

७८८ टिळा टोपी माळा देवाचें गवाळें । वागवी वोंगळें पोटासाटीं ॥ १ ॥
तुळसी खोवी कानीं दर्भ खोवी शेंडी । लटिकी धरी बोंडी नासिकाची ॥ २ ॥
कीर्तनाचे वेळे रडे पडे लोळे । प्रेमेंविण डोळे[1] गळताती ॥ ३ ॥
तुका म्हणे ऐसे मावेचे मइंद । त्यांपाशीं गोविंद नाहीं नाहीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– गवाळें–खोटे ओझे, वोंगळें–वाईट, बोंडी–टोक, मावेचे–मायेचे, खोटे, मइंद–ढोंगी.

अर्थ :– काही माणसे नुसतीच कानटोपी घालतात, कपाळावर चंदनाचे टिळे लावतात व देवाचे खोटे ओझे आपण धारण केल्याचे सांगतात. १ कानामध्ये तुळसीपत्र खोवतात, शेंडीला दर्भ बांधतात व नाकाचा शेंडा खोट्याने हातात धरुन जप केल्याचे भासवितात. २ आणि कीर्तन करीत असताना हे रडतात, धरणीवर पडतात, लोळतात, ईश्वरप्रेमाशिवायही यांच्या डोळ्यांतून खळाळा पाणी येत असते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, हे खोट्या आचरणाचे व ढोंगीच समजावेत, त्यांच्यापाशी ईश्वर निश्चित नसतो असे समजून असावे ४

७८९ धन्य देहूं गांव पुण्य भूमि ठाव । तेथें नांदे देव पांडुरंग ॥ १ ॥
धन्य क्षेत्रवासी लोक ते दैवाचे । उच्चारिती वाचे नामघोष ॥ २ ॥
कर कटी उभा विश्वाचा जनिता । वामांगीं ते[2] माता रखुमादेवी ॥ ३ ॥
गरुड पारीं उभा जोडुनियां कर । अश्वत्थ समोर उत्तरामुख ॥ ४ ॥
दक्षिणे शंकर लिंग हरेश्वर । शोभे गंगातीर इंद्रायणी ॥ ५ ॥
लक्ष्मीनारायण बल्लाळाचें वन । तेथें अधिष्ठान सिद्धेश्वर ॥ ६ ॥
विघ्नराज द्वारीं वहिरव बाहेरी । हनुमंत शेजारीं सहित दोघे ॥ ७ ॥
तेथें दास तुका करितो कीर्तन । हृदयीं चरण विठोबाचे ॥ ८ ॥

शब्दार्थ व टीपा :– ठाव–स्थान, विश्वाचा जनिता–विश्वास जन्म देणारा, वामांगीं–डाव्या अंगास, अश्वत्थ–पिंपळ.

---

[1] गळे दाटतानी, [2] हे

अर्थ :– हे माझें देहू गाव धन्य असून मोठ्या पुण्याईचे स्थान आहे. कारण या ठिकाणी प्रत्यक्ष देवाची, पांडुरंगाची वसती कायमची आहे १ या क्षेत्रातील लोकही धन्य व दैववान होत कारण त्यांच्या मुखातून सारखा विठ्ठलाचा नामघोष होत असतो. २ या विश्वात जन्म देणाऱ्या विठ्ठलाचे हात त्याच्या कमरेवर असून तो उभा आहे त्याच्या डाव्या अंगास माता रखुमादेवी उभी आहे. ३ जवळच पारावर गरुड उभा असून त्याने हात जोडले आहेत. समोर उत्तरेस पिंपळाचा वृक्ष उभा आहे. ४ दक्षिण दिशेस हरेश्वर नावाचे शंकराचे लिंग असून या गावास असणारे इंद्रायणी नावाच्या नदीचे तीर शोभून दिसते ५ जवळच लक्ष्मीनारायणाचे व बल्लाळाचे वन असून तेथें सिद्धेश्वराचे स्थान प्रसिद्ध आहे. ६ दारात विघ्न दूर करणाऱ्या गणपतीचे स्थान असून बाहेर ग्रामदेव बहिरोबा आहे हनुमतही रक्षणार्थ शेजारीच आहे. ७ तुकाराम महाराज म्हणतात, याच गावात हा दास कीर्तन करीत असून हृदयाशी विठोबाचे चरण धरीत आहेत. ८

विवरण :– या अतिशय प्रसिद्ध अशा अभंगात तुकारामबुवांनी आपल्या देहू या गावचे तपशीलवार असे वर्णन केले आहे तुकोबाच्या संगतीः पवित्र व प्रसिद्ध झालेले हे गाव पुण्यापासून जवळच वसलेले एक लहान खेडे आहे पुणे मुंबई रस्त्यावरच पंधराव्या मैलावर उत्तरेस जाणारा देहूचा रस्ता लागतो या रस्त्याने तीन मैलावर इंद्रायणी नदीच्या काठी हे देहू क्षेत्र वसले आहे हे क्षेत्र आळंदीपासून पाच कोस, तळेगावपासून चार कोस, चिंचवडपासून तीन-चार कोस दूर असून याच्या सभोवती लहान लहान डोंगर आहेत

ज्ञानेश्वराच्यामुळे आळंदी पंढरपूर याचे नाव पुन्हा एकदा महाराष्ट्रात झाले एकनाथामुळे पैठणचे नाव झाले रामदासामुळे सज्जनगड, चाफळ, जांब ही स्थाने उदयास आली आणि तुकोबाच्यामुळे देहूचे भाग्य उदयास येऊन अवघ्या महाराष्ट्रात त्याची कीर्ती पसरून राहिली या गावात तुकोबाच्या आधीही चारदोन लहानलहान मंदिरे नेहमीप्रमाणे होतीच बुवांचे आठवे पूर्वज विश्वंभरबुवा यांनी या गावी श्रीविठ्ठलरखुमाईचे मंदिर बांधले तेव्हापासून या घराण्याचा विठ्ठलाशी संबंध जडला गेला त्याच्या घरी पंढरीची वारीही प्रथमपासून होतीच

या अभंगातील सर्व वर्णन ऐतिहासिक वस्तुस्थितीस धरून आहे विठ्ठलाच्या देवळाचा भाग व त्याचा विस्तार हा नंतरचा असला तरी विठ्ठलरखुमाईच्या मूर्ती मात्र विश्वंभरबुवांनी स्थापन केलेल्या आहेत याच मंदिराचा तुकोबांनी जीर्णोद्धार केला देहूस श्रीविठ्ठल व रखुमाई शेजारी शेजारी असून त्यांच्या मूर्ती उत्तरेस तोंड करून आहेत समोर गरुडपार आहे गरुडहनुमंत नेहमीप्रमाणे हात जोडून देवासमोर उभे आहेत पूर्वेकडील दरवाज्यावर दक्षिणेस तोंड असलेले विघ्नराज असून बाहेर बहिरोबाचे छोटे मंदिर आहे मंदिराच्या पश्चिमेस हरेश्वर मंदिर असून थोड्या अंतरावर तुकोबाचेही घर आहे पश्चिमेच्या बाजूस बल्लाळाचे वन असून या सिद्धेश्वराच्या मंदिराच्या थोडे पूर्वेस लक्ष्मीनारायणाचे मंदिर आहे ही मंदिरे तुकोबाच्या आधीपासूनची आहेत देहूक्षेत्राला लागूनच इंद्रायणी नदी असून उत्तराभिमुख होऊन वहात आहे

या अभंगात वर्णन केल्याप्रमाणे सर्व स्थानाचे विशेष आजही मिळतात, पण तुकोबाच्या इतर अभंगातून ज्याचा उल्लेख आला आहे त्याची स्थानेही दृष्टीस पडतात अर्थात या स्थानांना तुकारामबुवाच्या नंतर महत्त्व येत राहिले मंबाजीबुवाचे घर, त्याची बाग, प्रदक्षिणेचा रस्ता, पुंडलिकाचे देऊळ, वह्या उदकावर तरल्या तो डोह, गोपाळपूर, जुनाट पिंपरीचा वृक्ष, नरजाईचे स्थान, मुरलीधराचे देऊळ, पहिल्या स्त्रीचे, रखुमाईचे वृंदावन, थोड्या दूर अंतरावर भामनाथचा डोंगर ही सर्व स्थाने नंतरच्या काळात विशेष रूपाने प्रसिद्ध झाली

## शाक्तावर—अभंग १३

७९० टवकाहूनि दृष्टी लावुनिया रंग । दावी झगमग डोळ्यांपुढें ॥ १ ॥
म्हणती शिष्यासी लागली समाधी । लटकीचि उपाधी झकविती ॥ २ ॥
दीपाचिया ज्योती कोंडियेलें तेज । उपदेश साजरात्रीमाजी ॥ ३ ॥

रांगोळिया चौक शृंगारूनी वोजा । आवरण पूजा यंत्र करी ॥ ४ ॥
पडदा लावोनियां दीप चहूं कोनीं । बैसोनि आसनीं मुद्रा दावी ॥ ५ ॥
नैवेद्यासी म्हणे करावें पक्वान्न । पात्रासी दिव्यान्न परवडी ॥ ६ ॥
जाला उपदेश कवळ घ्या रे मुखीं । आपोशन शेखीं बुडविलें ॥ ७ ॥
पाषांड करोनी मांडिली जीविका । बुडवी भाविकां लोकांप्रती ॥ ८ ॥
कायावाचामनें सोडवी संकल्प । गुरु गुरु जप प्रतिपादी ॥ ९ ॥
शुद्ध परमार्थ बुडविला तेणें । गुरुत्वभूषणें भोग भोगी ॥ १० ॥
विधीचा ही लोप बुडविला वेद । शास्त्रांचा ही बोध हरविला ॥ ११ ॥
योगाची धारणा नाहीं प्राणायाम । सांडी यम नेम नित्यादिक ॥ १२ ॥
वैराग्याचा लोप हरिभजनीं विक्षेप । वाढविलें पाप मतिलंडें ॥ १३ ॥
तुका म्हणे गेलें गुरुत्व गुखाडी । पूर्वजांसी धाडी नर्कवासा ॥ १४ ॥

शब्दार्थ व टीपा :– झगमग–चमक, झकविती–फसवितात, सांजरात्रीमाजी–सध्याकाळी, रात्रीच्या वेळेस, वोजा–सहज, परवडी–नाना प्रकारची, पाषांड–नास्तिक, गुखाडी–नरकात जाणारे.

अर्थ :– शाक्त मार्गामधील हे गुरु कसे असतात? तर शिष्यावर डोळे वटारून त्याच्यापुढे नाना रंगांची चमक दिसेल असे करतात. १ आणि डोळ्यांस एक प्रकारची अंधारी आली म्हणजे शिष्याला सांगतात की, तुझी समाधी लागली आहे. अशा प्रकारे लबाडी करून शिष्याला हे लोक फसवितात २ दिव्याच्या ज्योतीने घरामध्ये तेज कोंदले आहे असे मानून हे गुरु संध्याकाळी व रात्री शिष्यांना उपदेश देतात. ३ भोवती रांगोळ्या वगैरे काढून धान्याने चौक भरून सहज असा शृंगार करतात व त्रिकोणी यंत्राची पूजा करतात. ४ सभोवती पडदे लावून आत चहूबाजूंनी दिवे लावतात व आपण स्वत. आसनावर बसून मुद्रा लावतात. ५ शिष्याला नैवेद्यासाठी पक्वान्ने करायला सांगतात व नाना प्रकारची ही पक्वान्ने पात्रांत वाढून देवापुढे ठेवल्याचा देखावा करतात. ६ मग शिष्यांस म्हणतात, झाला आता उपदेश. आता तोंडांत एकेक घास घ्या आपोशन घेण्याची यांना काही जरूरी वाटत नाही ७ अशा प्रकारे हे गुरु नास्तिक्य पसरवून पोट भरण्याचा उद्योग जीवितात आरंभतात व लोकांना फसवितात. ८ काया, वाचा, मन गुरूला अर्पण करण्याचा संकल्प सोडवून गुरूच्या नामाचा जप वारंवार करायला सांगतात. ९ खराखुरा परमार्थ यांनी बुडविलेला असून गुरुपणाच्या भूषणाने हे केवळ ऐश्वर्य भोगत असतात. १० वेदांत असलेला सर्व शास्त्रविधीचा यांनी लोप केलेला असून सर्व शास्त्रांचाही बोध नाहीसा केलेला असतो. ११ यांना योगयाग व ध्यानधारणा यांची नीट माहिती नसते; कारण नित्यकर्मे व यमनियमादी साधने यांचा यांनी त्यागच केलेला असतो. १२ यांच्या वैराग्याचा लोपच झालेला असून यांना श्रीहरीच्या भजनाविषयी त्रासच वाटतो अशा या नास्तिकांनी जगात मुद्दामच पाप वाढविलेले असते. १३ तुकाराम महाराज म्हणतात, असा याचा गुरुपणा नरकात जावो कारण हे त्यांचे कृत्य त्यांच्या पूर्वजासही नरकात धाडणारे आहे. १४

तुकारामबुवांच्या वेळी अशा प्रकारच्या हीन आचारधर्मांचे व विकृत भावनांचे धर्माच्या नावावर बरेच पंथ पसरले होते. शाक्तांचा वामाचारी पंथ हा त्यांतलाच एक असल्याने बुवांनी त्याच्यावर कडाडून हल्ला केलेला आहे. शाक्त हे खरे म्हणजे शक्तीचे उपासक, शक्ती ह शिवाचेच एक अंग, ही आदिमाता. तुकोबाही विठ्ठलाला माउली मानीत. त्यांचेही उपास्य दैवत पांडुरंगाबरोबर शिवही होतेच. वारकरी एकादशीप्रमाणे सोमवारचेही व्रत करतात. म्हणजे शंकराची किंवा शक्तीची अथवा मातृत्वाची उपासना त्यांना मान्य आहे. पण या भक्तीच्या नावावर कुणी भ्रष्ट व अनीतीचे आचारविचार प्रस्थापित करू लागला व सामान्य जनांस याच मार्गाचा त्यातील मुक्त व स्वैर मचारामुळे लाभ वाढत राहिला तर एकदर समाजच भलत्या थराला जाईल हे ओळखून तुकारामबुवा शाक्तांच्या-वर फार कडक शब्दांत टीका करीत आहेत.

७९१ शाक्त गधडा जये देशीं । तेथें राशी पापाच्या ॥ १ ॥
सुकृताचा उदो के ा । गोंधळ घाला इंद्रियें ॥ २ ॥
क्रोधरूपें वसे काम । तीचे नाम जपतसे ॥ ३ ॥
मद्यभक्षण मागिणजाती । विटाळ चित्तीं साटविला ॥ ४ ॥
स्तवुनिया पूजी राड । न लजे भाड दाढीसी ॥ ५ ॥
तुका म्हणे भगवती । नेइल अंतीं आपणापें ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा — सुकृताचा–पुण्याईचा, उदो केला–नाश केला, भगवती–देवी

अर्थ — देवीची वाममार्गाने उपासना करणारा हा शाक्त गधडा ज्याच्या देशात जाईल तेथे तेथे पापाच्या राशी उभ्या राहतील. १. त्याने आपल्या पुण्याईचा नाश केलेला असून केवळ इंद्रियवृत्तींवरच त्याचा भर असतो. विषयांचाच फक्त गोंधळ त्याचा असतो. २. प्रत्यक्ष क्रोधाच्या रूपाने कामवासनाच तेथे असते व तीस देवी कल्पून ते तिची पूजा वगैरे करतात. ३. मागीण जातीच्या मुलीस देवी समजून मद्याचे सेवन तिला करवितात व मग आपण ते घेतात. याचे चित्त अशा प्रकारे विटाळानेच बरबटलेले असते. ४. या रांडेची पूजा करून ते स्तवनही करतात. अशा या भाडखोर व ढोंगी लोकांच्या नादी लागू नये. ५. तुकाराम महाराज म्हणतात, अशा रीतीने ही भगवती देवी शेवटी आपणांस स्वतःजवळ घेईल असे यांना व्यर्थ वाटत असते. ६.

७९२ राजा प्रजा द्वाड देश । शाक्त वास करिती तो ॥ १ ॥
अधर्माचें उघड पीक । धर्म रंक त्या गावीं ॥ २ ॥
न पिके भूमि कांपे भारें । मेघ वारे पीतील ॥ ३ ॥
तुका म्हणे अवघीं दुःखें । येती सुखें वस्तीसी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – द्वाड–वाईट, रंक–दरिद्री

अर्थ :– देवीची अशी अनाचारांनी पूजा करणारे शाक्त ज्या देशात निवास करतात तो देश, तेथील राजा, तेथील प्रजा, या सर्वच गोष्टी वाईट असतात. १. त्या ठिकाणी अधर्माचेच पीक उघड उघड झालेले असते. या गावी प्रत्यक्ष धर्मही दरिद्री होऊन वावरत असतो. २. या देशात पाऊस पडत नसल्यामुळे भूमी पिकत नाही. पापाच्या ओझ्याने पृथ्वी थरथरा कापायला लागलेली असते. ३. तुकाराम महाराज म्हणतात, या शाक्तांच्या वास्तव्यामुळे जगातील सर्व दुःखे मोठ्या सुखाने या गावात वस्ती करण्यासाठी येतील. ४.

७९३ ऐसें[1] कलियुगाच्या मुळें । जाले धर्माचें वाटोळें ॥ १ ॥
सांडुनिया रामराम । ब्राह्मण म्हणती दोमदोम ॥ २ ॥

[1] ऐसा

शिवों नये तीं निळीं । वस्त्रें पांघरती काळीं ॥ ३ ॥
तुका म्हणे वृत्ति । सांडुनि गदा मागत जाती ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– दोम दोम–भिक्षेच्या वेळी फकीर लोक करतात तो उच्चार, गदा–भीक.

अर्थ – अशा रीतीने या कलियुगात सर्व धर्मांचे वाटोळे झालेले असते ते या शाक्ताच्या अनाचारामुळे. १ रामनामासारखा सोपा उपाय सोडून ब्राह्मण लोकसुद्धा फकीराप्रमाणे 'दोम दोम' म्हणत फिरायला लागले आहेत. २ ज्या वस्त्रांना शिवूसुद्धा नये अशी काळी वस्त्रे पांघरून हे शाक्त फिरतात. ३ तुकाराम महाराज म्हणतात, हे सर्व लोक आपापली उच्च रीत सोडून भीक मागायलाच हिंडतात. ४

७९४ अवघ्या पापें घडला एक । उपासक शक्तीचा ॥ १ ॥
त्याचा विटाळ नको अंगा । पांडुरंगा माझिया ॥ २ ॥
काम क्रोध मद्य अंगीं । रंगला रंगीं अवगुणी ॥ ३ ॥
करितां पाप न धरी शंका । म्हणे तुका कोणी ही ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– अवघ्या–सर्व, एक–देवीचा उपासक.

अर्थ :– हा अनाचाराने वागणारा देवीचा उपासक म्हणजे जगातील सर्व पापाचाच घडविलेला आहे असे वाटते १ पांडुरंगा, माझ्या शरीरास त्याचा विटाळसुद्धा नको २ कारण त्याच्या अंगी काम व क्रोध पूर्णपणे भरले असून मद्याच्या किंवा दारूच्या नादात तो रंगून गेलेला असतो. ३ कोणतेही पाप करताना याला कधीही शंका वाटत नाही, असे तुकाराम महाराज म्हणतात. ४

७९५ वारितां बळें धरिता हातीं । जुलुमें जाती नरकामधीं । १ ॥
रंडीदासाप्रति काहीं । उपदेश तो ही चालेना ॥ २ ॥
जन्म केला वाताहात । थोर घात येठायीं ॥ ३ ॥
तुका म्हणे पंढरीनाथा । तुझी कथा दूषीती ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– वारिता–निवारण करीत असताना

अर्थ – या देवीच्या अनाचारी उपासकास बळाने हाती धरून दूर करण्याचा प्रयत्न केला तरी पुन. ते नरकात जाण्याचा प्रयत्न करतातच. १ रांडेच्या या दासास कसलाही उपदेश केला तरी तो रुचत नाही, त्याच्या मनास या एका पापी मार्गाशिवाय दुसरे काही पटतच नाही. २ माणसाच्या जन्मास येऊन याचा घातच झाला. फार मोठा अपाय याच्यामुळे घडत राहतो ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, पंढरीनाथा, तुझ्या कथेलासुद्धा हे नीच लोक दूषणे देतात, नावे ठेवितात. ४

७९६ शाक्तांची शूकरी माय । विष्ठा खाय विदीची ॥ १ ॥
तिची त्या पडली[१] सवे । मागें धांवे म्हणोनि ॥ २ ॥
शाक्तांची गाढवी माय । भुंकत जाय वेसदारा ॥ ३ ॥
तुका म्हणे शिंदळीचे । बोलतां वाचे निंद्य ते ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – शूकरी–डुक्करीण, विदीची–रस्त्यावरील

अर्थ :– वाम मार्गाने देवीची उपासना करणाऱ्या या शाक्तांची आई म्हणजे रस्त्यावरील विष्ठा खाणारी डुकरीणच समजावी १ तिला त्याच घाण वस्तूची सवय असल्यामुळे तिच्याच मागे मागे तो असतो २ गावच्या वेशीपर्यंत भुंकत, ओरडत जाणारी गाढवी म्हणजे या शाक्तांची आई असेच मानावे ३ तुकाराम महाराज म्हणतात, हे लोक फार वाईट चालीचे आहेत त्यांचे वाणीने वर्णन केले तरी वाणी विटाळून जाईल इतके ते नीच आहेत. ४

१ लागली.

तुकारामबुवाच्या वेळी अशा प्रकारच्या हीन आचारधर्मांचे व विकृत भावनांचे धर्माच्या नावावर बरेच पंथ पसरले होते. शाक्तांचा वामाचारी पंथ हा त्यातलाच एक असल्याने बुवांनी त्याच्यावर कडाडून हल्ला केलेला आहे. शाक्त हे खरे म्हणजे शक्तीचे उपासक, शक्ती हे शिवाचेच एक अंग; ही आदिमाता. तुकोबाही विठ्ठलाला माउली संबोधतात. त्यांचेही उपास्य दैवत पांडुरंगाबरोबर शिवही होतेच. वारकरी एकादशीप्रमाणे सोमवारचेही व्रत करतात म्हणजे शंकराची किंवा शक्तीची अथवा मातृत्वाची उपासना त्यांना मान्य आहे. पण या भक्तीच्या नावावर कुणी भ्रष्ट व अनीतीचे आचारविचार प्रस्थापित करू लागला व सामान्य जनांस याच मार्गाचा त्यातील मुक्त व स्वैर प्रचारामुळे लोभ वाढत राहिला तर एकंदर समाजच भलत्या थराला जाईल. हे ओळखून तुकारामबुवा शाक्तांच्यावर फार कडक शब्दात टीका करीत आहेत.

७९१ शाक्त गधडा जये देशीं । तेथें राशी पापाच्या ॥ १ ॥
सुकृताचा उदो केला । गोंधळ घाला इंद्रियें ॥ २ ॥
क्रोधरूपें वसे काम । तीचें नाम जपतसे ॥ ३ ॥
मद्यभक्षण मागिणजाती । विटाळ चित्तीं सांटविला ॥ ४ ॥
स्तवुनियां पूजी रांड । न लजे भांड दाढीसी ॥ ५ ॥
तुका म्हणे भगवती । नेइल अंतीं आपणापें ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा :- सुकृताचा–पुण्याईचा, उदो केला–नाश केला, भगवती–देवी.

अर्थ :- देवीची वाममार्गाने उपासना करणारा हा शाक्त गधडा ज्याच्या देशात जाईल तेथे तेथे पापाच्या राशी उभ्या राहतील. १ त्याने आपल्या पुण्याईचा नाश केलेला असून केवळ इंद्रियवृत्तींवरच त्याचा भर असतो. विषयांचाच फक्त गोंधळ त्याचा असतो. २ प्रत्यक्ष क्रोधाच्या रूपाने कामवासनाच तेथे असते व तीस देवी कल्पून ते तिची पूजा वगैरे करतात. ३ मागीण जातीच्या मुलीस देवी समजून मद्याचे सेवन तिला करवितात व मग आपण ते घेतात. यांचे चित्त अशा प्रकारे विटाळानेच बरबटलेले असते. ४ या रांडेची पूजा करून ते स्तवनही करतात. अशा या भांडखोर व ढोंगी लोकांच्या नादी लागू नये. ५ तुकाराम महाराज म्हणतात, अशा रीतीने ही भगवती देवी शेवटी आपणास स्वत जवळ घेईल असे यांना व्यर्थ वाटत असते. ६

७९२ राजा प्रजा द्वाड देश । शाक्त वास करिती तो ॥ १ ॥
अधर्माचें उबड पीक । धर्म रंक त्या गांवीं ॥ २ ॥
न पिके भूमि कांपे भारें । मेघ वारें पीतील ॥ ३ ॥
तुका म्हणे अवघीं दु:खें । येती सुखें वस्तीसी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- द्वाड–वाईट, रंक–दरिद्री

अर्थ :- देवीची अशी अनाचाराने पूजा करणारे शाक्त ज्या देशात निवास करतात तो देश, तेथील राजा, तेथील प्रजा, या सर्वच गोष्टी वाईट असतात. १ त्या ठिकाणी अधर्माचेच पीक उबड उबड आलेले असते. या गावी प्रत्यक्ष धर्मही दरिद्री होऊन वावरत असतो. २ या देशात पाऊस पडत नसल्यामुळे भूमी पिकत नाही. पापाच्या ओझ्याने पृथ्वी थरथरा कापायला लागलेली असते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, या शाक्तांच्या वास्तव्यामुळे जगातील सर्व दु खे मोठ्या सुखाने या गावात वस्ती करण्यासाठी येतील. ४

७९३ ऐसें[1] कलियुगाच्या मुळें । जाले धर्माचें वाटोळें ॥ १ ॥
सांडुनियां रामराम । ब्राह्मण म्हणती दोमदोम ॥ २ ॥

---

१ एवढा.

शिवों नये तीं निळीं । वस्त्रें पांघरती काळीं ॥ ३ ॥
तुका म्हणे वृत्ति । सांडुनि गदा मागत जाती ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– दोम दोम–भिक्षेच्या वेळी फकीर लोक करतात तो उच्चार, गदा–भीक.

अर्थ :– अशा रीतीने या कलियुगात सर्व धर्माचे वाटोळे झालेले असते ते या शाक्ताच्या अनाचारामुळे. १ रामनामासारखा सोपा उपाय सोडून ब्राह्मण लोकसुद्धा फकीराप्रमाणे 'दोम दोम' म्हणत फिरायला लागले आहेत. २ ज्या वस्त्रांना शिवूसुद्धा नये अशी काळी वस्त्रे पांघरून हे शाक्त फिरतात. ३ तुकाराम महाराज म्हणतात, हे सर्व लोक आपापली उच्च रीत सोडून भीक मागायलाच हिंडतात. ४

७९४ अवघ्या पापें घडला एक । उपासक शक्तीचा ॥ १ ॥
त्याचा विटाळ नको अंगा । पांडुरंगा माझिया ॥ २ ॥
काम क्रोध मद्य अंगीं । रंगला रंगीं अवगुणी ॥ ३ ॥
करितां पाप न धरी शंका । म्हणे तुका कोणी ही ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– अवघ्या–सर्व, एक–देवीचा उपासक.

अर्थ :– हा अनाचाराने वागणारा देवीचा उपासक म्हणजे जगातील सर्व पापांचाच घडविलेला आहे असे वाटते. १ पांडुरंगा, माझ्या शरीरास त्याचा विटाळसुद्धा नको. २ कारण त्याच्या अंगी काम व क्रोध पूर्णपणे भरले असून मद्याच्या किंवा दारूच्या नादात तो रंगून गेलेला असतो. ३ कोणतेही पाप करताना याला कधीही शंका वाटत नाही, असे तुकाराम महाराज म्हणतात. ४

७९५ वारितां बळें धरितां हातीं । जुलुमें जाती नरकामधीं । १ ॥
रंडीदासाप्रति कांहीं । उपदेश तो ही चालेना ॥ २ ॥
जन्म केला वाताहात । थोर घात येठायीं ॥ ३ ॥
तुका म्हणे पंढरीनाथा । तुझी कथा दूषीती ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– वारितां–निवारण करीत असताना.

अर्थ – या देवीच्या अनाचारी उपासकास बळाने हाती धरून दूर करण्याचा प्रयत्न केला तरी पुनः ते नरकात जाण्याचा प्रयत्न करतातच. १ रांडेच्या या दासास कसलाही उपदेश केला तरी तो रुचत नाही, त्याच्या मनास या एका पापी मार्गाशिवाय दुसरे काही पटतच नाही. २ माणसाच्या जन्मास येऊन याचा घातच झाला. फार मोठा अपाय याच्यामुळे घडत राहतो. ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, पंढरीनाथा, तुझ्या कथेलासुद्धा हे नीच लोक दूषणे देतात, नावे ठेवितात. ४

७९६ शाक्तांची शूकरी माय । विष्ठा खाय विदीची ॥ १ ॥
तिची त्या पडली[1] सवे । मागें धांवे म्हणोनि ॥ २ ॥
शाक्तांची गाढवी माय । भुंकत जाय वेसदारा ॥ ३ ॥
तुका म्हणे शिंदळीचे । बोलतां वाचे निंद्य ते ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – शूकरी–डुकरीण, विदीची–रस्त्यावरील.

अर्थ :– वाम मार्गाने देवीची उपासना करणाऱ्या या शाक्तांची आई म्हणजे रस्त्यावरील विष्ठा खाणारी डुकरीणच समजावी. १ तिला त्याच घाण वस्तूची सवय असल्यामुळे तिच्याच मागे मागे ती असते २ गावच्या वेशीपर्यंत भुंकत, ओरडत जाणारी गाढवी म्हणजे या शाक्तांची आई असेच मानावे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, हे लोक फार वाईट चालीचे आहेत. त्यांचे वाणीने वर्णन केले तरी वाणी विटाळून जाईल इतके ते नीच आहेत. ४

१ लागली.

७९७ हरिहर साडुनि देव । धरिती भाव क्षुल्लकीं ॥ १ ॥
ऐका त्याची विटंबणा । देवपणा भक्ताची ॥ २ ॥
अगीं कवडे घाली गळा । परडी कळाहीन हातीं ॥ ३ ॥
गळा गाठा हिंडे दारीं । मनुष्य परी कुतरी तीं ॥ ४ ॥
माया सेंदुर दात खाती । जेंगट हातीं सटवीचे ॥ ५ ॥
पूजिती विकट दोंद । पशु सोंड गजाची ॥ ६ ॥
ऐशा छंदें चुकली वाट । भाव खोटा भजन ॥ ७ ॥
तुका म्हणे विष्णुशिवा । वाचुनि देवा भजती ते ॥ ८ ॥

शब्दार्थ व टीपा – साडुनि–सोडून, गाठा–खंडोबाच्या भक्ताच्या गळ्यातील रुप्याची हासळी, जेंगट–वाद्य किंवा थाळी दोंद–ढेरपोट

अर्थ – हे शक्तीचे वा देवीचे उपासक हरि व हर हे मुख्य देव सोडून इतरच क्षुल्लक देवाना भजतात १ पण अशा भक्ताची कशी विटंबना होते ती ऐका व त्याच्या देवाचीही फजिती नीट ऐका २ हे भक्त गळ्यात कवड्याची माळ घालतात, हातामध्ये भिक्षेसाठी परडी घेतलेली असल्यामुळे हे कळाहीन दिसतात ३ याच्या गळ्यात रुप्याची हासळी असते व हे दारोदारी हिंडतात हे लोक मनुष्य असून कुत्रीच वाटतात ४ याचे देव कसे असतात ? तर त्याच्या माथ्यावर शेंदूर फासलेला असतो ते क्रोधाने कराकरा दात खात असतात आणि त्याच्या हातात सटवीचे जेंगट वाद्य असते ५ ज्या देवाचे पोट मोठे व ज्यास हत्तीची सोंड आहे त्याची हे लोक बरवर पूजा करतात ६ अशा विविध प्रकारच्या खोट्या मार्गांनी याची खरी वाट चुकलेली असते याचे भजन व याचा भाव याही बाबी खोट्याच असतात ७ तुकाराम महाराज म्हणतात, कारण हे लोक शिवाला किंवा विष्णूला सोडून इतर क्षुल्लक देवानाच भजतात ८

७९८ काद्यासाटीं जाले ज्ञान । तेणे जन नाडिले ॥ १ ॥
काम क्रोध बुचबुची । भुके पुची व्यालीची ॥ २ ॥
पूजेलागीं द्रव्य मागे । काय सांगे शिष्याते ॥ ३ ॥
तुका म्हणे कैचें ब्रह्म । अवघा भ्रम विषयाचा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – नाडिले–फसविले

अर्थ – शक्तीची उपासना करणाऱ्याना कसले आले आहे ज्ञान ? स्वत कांदे खातात व मग ब्रह्मज्ञानाचा खोटा आविर्भाव आणून लोकाना फसवितात १ याच्या अंगी कामक्रोध भरपूर भरलेले असून व्यालेल्या कुत्रीप्रमाणे ते ज्ञानाची व्यर्थ बडबड करतात २ हे लोक पूजेसाठी लोकाजवळ द्रव्य मागतात व काही तरी वेडावाकडा उपदेश करतात ३ तुकाराम महाराज म्हणतात, याच्याजवळ कसले आले आहे ब्रह्मज्ञान? येथे विषयाचाच सर्व भ्रम आहे ४

७९९ साडुनिया पंढरीराव । कवणाते म्हणों देव ॥ १ ॥
बहु लाज वाटे चित्ता । आणिकातें देव म्हणता ॥ २ ॥
साडुनिया हिरा । कोणे वेचाव्या त्या गारा ॥ ३ ॥
तुका म्हणे हरिहर । ऐसी साडुनिया धुर ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – आणिकातें–इतराना, धुर–श्रेष्ठ

अर्थ :– एका पंढरीनाथास सोडून दुसऱ्या कुणास देव म्हणावे ? १ इतरांना देव म्हणताना माझ्या चित्तास फारच लाज वाटते. २ चांगल्या मौल्यवान हिऱ्यास सोडून गारा वेचण्यात कुणी सुख मानावे ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, हरिहरांसारखे श्रेष्ठ व मुख्य देव सोडून इतर क्षुद्र देवांच्याकडे का जावे ? ४

८०० बहुतें गेलीं वांयां । न भजतां पंढरीराया ॥ १ ॥
करिती कामिकांची सेवा । लागोन मागोन खात्या देवा ॥ २ ॥
अवघियांचा धनी । त्यासी गेलीं विसरोनि ॥ ३ ॥
तुका म्हणे अंतीं । पडती यमाचिया हातीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– कामिकांची–लोभी देवाची.

अर्थ :– या पंढरीनाथाला न भजल्यामुळे पुष्कळ लोकांचे आयुष्य वायाच गेले आहे. १ लोकांना मागून खाणाऱ्या लोभी देवांची पूजा करण्यात हे अडाणी लोक गुंतलेले दिसतात. २ आणि सर्व विश्वाचा धनी जो विठ्ठल त्यास मात्र विसरून गेली आहेत. ३ तुकाराम महाराज म्हणतात, त्यामुळे शेवटी हे लोक यमाच्याच हातात सापडणार. ४

८०१ असो आतां ऐसा धंदा । तुज गोविंदा आठवूं ॥ १ ॥
रक्षिता तूं होसी जरी । तरि काय येरीं करावें ॥ २ ॥
काया वाचा मन पायीं । राहे ठायीं करूं तें ॥ ३ ॥
तुका म्हणे गाइन गीतीं । रूप चित्तीं धरूनियां ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– आस–इच्छा.

अर्थ :– आम्ही विष्णुदास मात्र कशाचीही इच्छा करीत नसतो. १ मग हे दुष्ट लोक आमची निंदा नेहमी का बरे करतात ? २ असू द्या. त्यांना त्यात समाधान असेल तर राहतील आपल्याच ठिकाणी ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तुझी सेवा हाच एक आमचा नित्याचा धंदा आहे. त्यात कमी पडणार नाही. ४

८०२ नाहीं आम्ही विष्णुदास । करीत आस कोणांची ॥ १ ॥
कां हे नष्ट करिती निंदा । नेणों सदा आमुची ॥ २ ॥
असों भलते ठायीं मनें । समाधानें आपुलिया ॥ ३ ॥
तुका म्हणे करूं देवा । तुझी सेवा धंदा तो ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– आस–इच्छा.

अर्थ :– आम्ही या श्रीहरीचे जे दास आहोत ते कशाचीही इच्छा करीत नसतो. १ तरीसुद्धा हे दुष्ट, नष्ट लोक आमची निंदा नेहमी का करतात, हे काही समजत नाही. २ असू द्या. त्यांची मने भलत्याच ठिकाणी असली तर असू द्या. आम्ही आमच्या ठिकाणी समाधानी राहू. ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तुझी एकनिष्ठ सेवा करणे हाच माझा धंदा झाला आहे. ४

८०३ पाखांड्यांनीं पाठी पुरविला दुमाला । येथें मी विठ्ठला काय बोलों[1] ॥ १ ॥
कांद्याचा खाणार चोजवी कस्तुरी । आपुलें[2] भिकारी अर्थ नेणे ॥ २ ॥
न कळे तें मज पुसती छळूनी । लागतां चरणीं न सोडिती ॥ ३ ॥
तुझ्या पायांविण दुजें नेणें कांहीं । तूंचि सर्वाठायीं एक मज ॥ ४ ॥
तुका म्हणे खोळ पडो त्यांच्या तोंडा । किती बोलों भांडो वादकांशीं ॥ ५ ॥

---

१ करू, २ आपण.

शब्दार्थ व टीपा :– दुमाला–पाठ, चोजवी–इच्छा करितो.

अर्थ – देवा, या नास्तिकांनी तर माझी एकसारखी पाठ पुरविली आहे विठ्ठला, मी त्याच्या विषयी काय बोलू ? १ फाके खाऊन समाधान मानणाऱ्यास कस्तुरीची इच्छा झाली तर तिचा काय उपयोग ? स्वत भिकारी असल्यामुळे त्याला तिची किंमत समजणारच नाही २ मला जी गोष्ट समजत नाही, तीच गोष्ट पुन पुन त्रास देऊन लोक विचारतात, माझ्या चरणाशी लागतात व आग्रह करतात सांगितल्याशिवाय पाय काही सोडीत नाहीत ३ देवा, मी त्याना काय सांगावे ? तुझ्या पायावाचून मी काहीच जाणीत नाही सर्व ठिकाणी तूच एक मला दिसतोस ४ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, अशा लोकाच्या ताडाला खोळ पडो असल्या या भाडखोर लोकाशी मी किती बोलावे ? ५

८०४ कलियुगीं कवित्व करिती पापाड । कुशळ हे भाड बहु जाले ॥ १ ॥
द्रव्य दारा चित्तीं प्रजाची आवडी । मुखें वडबडी[1] कोरडाचि ॥ २ ॥
दभ करी सोग मानावया जग । मुखें बोले त्याग मनीं नाहीं ॥ ३ ॥
वेदाज्ञे करोनि न करिती स्वहित । नव्हती आलिप्त देहाहुनी ॥ ४ ॥
तुका म्हणे दड साहील यमाचे । न करी जो वाचे बोले तैसें ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – पापाड–पाखंडी, नास्तिक, दारा–स्त्री

अर्थ – या कलियुगात कवित्व करणारे पुष्कळ नास्तिक लोक झाले असून ते केवळ भाडण करण्यातच कुशल आहेत १ त्याच्या मनात द्रव्य व स्त्री याची आणि पुष्कळ प्रजा आपणास व्हावी एवढीच आवड असते त्याच्या मुखातून कोरडी बडबड उगाच सारखी चालू असते. २ लोकानी आपणास मानावे म्हणून उगाचच दभ अथवा सोंग करतात, मुखाने त्यागाच्या गोष्टी बोलतात, पण त्याच्या मनात तशी भावना नसते ३ वेदाच्या आज्ञेप्रमाणे वागून हे आपले स्वहित साधीत नाहीत व देहाविषयीच्या प्रीतीपासून अलिप्तही होत नाहीत ४ तुकाराम महाराज म्हणतात, असे हे कविलोक पुढे यमाची शिक्षा सहन करतील कारण वाणीने बोलल्याप्रमाणे कर्म याचे नसते ५

८०५ विषयाचे सुख एथें वाटे गोड । पुढें अवघड यमदड ॥ १ ॥
मारिती तोडिती झोडिती निष्ठुर । यमाचे किंकर बहुसाल ॥ २ ॥
असिपत्री तरुवरखैराचे इगळ । निघतील ज्वाळ तेलपाकीं ॥ ३ ॥
तप्तभूमीवरि लोळविती[2] पाहीं । अग्निस्तभ बाहीं कवळविती ॥ ४ ॥
म्हणऊनि तुका येतो काकुलती । पुरे आता याती गर्भवास ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – किंकर–सेवक, असिपत्रीं–तरवारीच्या पात्यावर, धारेवर, इगळ–अग्नी, विस्तव, बाही–बाहूनी, हातानी

अर्थ – या लोकाना माणसाच्या जन्मी येऊन नाना विषयाचे सुख घेताना मोठे गोड वाटते पण पुढे फार मोठे असे यमाकडून शासन होणार असते हे ध्यानात हवे १ यमाच्या हाती सापडल्यावर मग त्या पापी माणसास मारतात, तोडतात, झोडपतात यमाचे सेवक मोठ्या निष्ठुरतेने त्याचे किंत्येक वर्षे हाल हाल करतात २ त्याला हे तरवारीच्या धारेवर धरतात, वृक्षामधील श्रेष्ठ असणाऱ्या खैराच्या लाललाल विस्तवावर चालायला लावतात, ज्यातून ज्वाला निघत आहेत अशा तेलात किंवा पाकात टाकतात ३ तापलेल्या भूमीवर लोळवितात अग्नीच्या तप्त खाबास दोन्ही हातानी मिठी मारायला लावतात ४ हे त्याचे हाल पाहून तुकाराम महाराज म्हणतात, मी काकुळतीस येत आहे आता मला हे गर्भवास नकोत ५

---

१ मुखी बडबडी भलतेचि, २ चाळविती पायी

८०६ अल्प माझी मती । म्हणोनि येतों काकुलती ॥ १ ॥
आतां दाखवा दाखवा । मज पाउलें केशवा ॥ २ ॥
धीर माझ्या मना । नाहीं नाहीं नारायणा ॥ ३ ॥
तुका म्हणे दया । मज करा अभागिया ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– मती–बुद्धी.

अर्थ :– देवा, माझी बुद्धी फार अल्प असल्यामुळे मी फार काकुळतीस आलो आहे रे. १ केशवा, आता मला तुमची पाऊले दाखवा ना. २ माझ्या मनास आता धीर नियवत नाही नारायणा, आता नाही सहन होत रे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, आता या मजसारख्या अभाग्यावर एकदा दया कर ना. ४ (हाच अभंग पुढे क्र. १६३३ वा म्हणून आलेला आहे.)

८०७ वाटुली पाहातां सिणले डोळुले । दाविसी पाउलें कें वो डोळां ॥ १ ॥
तूं माय माउली कृपेची साउली । विठ्ठले पाहिली वास तुझी ॥ २ ॥
तुका म्हणे माझ्या आसावल्या बाह्या । तुज क्षेम द्याया पांडुरंगा ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा :– वाटुली–वाट, वास–वाट, आसावल्या–उत्सुक झाल्या आहेत, क्षेम–आलिंगन.

अर्थ :– देवा, तुमची वाट पाहून पाहून माझे डोळे शिणून गेले आहेत. तू तुझी पावले माझ्या डोळ्यांना कधी दाखविणार आहेस ? १ तू माझी प्रेम माउली व कृपेची सावली आहेस ना ? विठ्ठले, तुझी वाट तरी किती पाहावयाची मी ? २ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तुला आलिंगन देण्यासाठी माझे बाहू फार उत्सुक झाले आहेत. ३

८०८ देह हा सादर पाहावा[1] निश्चित । सर्व सुख एथें नाम आहे ॥ १ ॥
ब्रह्म जें देखणें द्वैत जेव्हां गेलें । शरीर तें जालें ब्रह्मरूप ॥ २ ॥
यजन याजन तप व्रतें करिती । विकल्पें नागवती शुद्ध पुण्या ॥ ३ ॥
तुका म्हणे सर्व सुख एथें आहे । भ्रांति दूर पाहें टाकुनियां ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– यजन–होमहवन, याजन–यज्ञयाग वगैरे.

अर्थ :– तुम्हास देह जर निश्चितपणे समजावून घ्यायचा असेल तर सर्व सुखांचे सार जे नामस्मरण आहे, त्यातच तो पाहावा. या नामाच्याच साह्याने त्याचे सार्थक होईल. १ द्वैताच्या अथवा दोनपणाच्या बुद्धीचा जेव्हा नाश होईल, तेव्हाच ब्रह्माचा साक्षात्कार होईल, व मग हे शरीरही ब्रह्मरूप होऊन जाईल. २ पुष्कळ लोक होमहवन, यज्ञयाग वगैरे करतात. नाना प्रकारची व्रते व तपे आचरतात; पण त्यांच्या मनांत विकल्प असल्यामुळे शुद्ध पुण्य काही त्यांना कधीही मिळत नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, पण या नामात मात्र सर्व प्रकारचे सुख असून, सर्व भ्रांती दूर करून या नामाचाच सर्वांनी आश्रय धरावयास हवा. ४

८०९ तुझे वर्णूं गुण ऐसी नाहीं मती । राहिल्या त्या श्रुती मौन्यपणें ॥ १ ॥
मौन्यपणें वाचा थोंटावल्या चारी । ऐसें तुझें हरी रूप आहे ॥ २ ॥
रूप तुझें ऐसें डोळां न देखवे । जेथें हें झकवे ब्रह्मादिक ॥ ३ ॥
ब्रह्मादिकां देवां कर्माची कचाटी । म्हणोनि आटाटी फार त्यांसी ॥ ४ ॥
तुका म्हणे तुझें गुण नाम रूप । आहेसी अमुप वाणूं काई ॥ ५ ॥

[1] पाहावया.

शब्दार्थ व टीपा – श्रुती–वेद, थोटावल्या–कुंठित झाल्या, शकये–फमले, कचाटी–पाच, त्रास, आटाटी–खटाटोप, वाणू–वर्णू

अर्थ – देवा, तुझे रूप वर्णन करता येईल अशी बुद्धी मला नाही प्रत्यक्ष वेदानाही तुझे वर्णन करता येत नसल्याने ते मौन राहिले आहेत १ परा, पश्यंती, मध्यमा, वैखरी या चारही वाणी तुझे वर्णन करताना कुंठित झाल्या असे हे तुझे रूप आहे २ तुझ्या रूपास डोळ्याना पाहावतही नाही त्याकडे पाहण्याच्या उद्योगात ब्रह्मादिकही फसून गेले आहेत ३ ब्रह्मादिक देवाना कर्माची कटकट मागे लागल्यामुळे तर त्याना हा खटाटोप करावा लागत असतो ४ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तुझे गुण, नाम, रूप इत्यादी सर्व न मापण्यासारखे असल्याने त्याचे वर्णन मी काय करावे? ५

८१० मनवाचातीत तुझें हे स्वरूप । म्हणोनिया माप भक्ति केलें ॥ १ ॥
भक्तीचिया मापें मोजितो अनंता । इतराने तत्वता न मोजवे ॥ २ ॥
योग याग तपें देहाचिया योगें । ज्ञानाचिया लागें न सापडसी ॥ ३ ॥
तुका म्हणे आम्ही भोळ्या भावे सेवा । घ्यावी जी केशवा करितो ऐसी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – मनवाचातीत–मन व वाणी याच्या पलीकडे

अर्थ – ईश्वरा, तुझे हे रूप मन, वाणी यानी न समजण्यासारखे आहे याच्याही पलीकडे हे आहे म्हणून भक्तीच्या मापाने त्याला मोजण्याचा प्रयत्न केल्यास त्याचे थोडेसे आकलन होते १ मी या अनंताचे मोजमाप भक्तीच्या मापानेच करितो इतर साधनानी याची खरी पारख होत नाही २ यज्ञ, याग, तपे, देहाची कर्मे, ज्ञानी माणसाची तपश्चर्या याच्या साह्याने हे रूप कधीच सापडणार नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, परंतु केशवा, आमच्यासारख्या भोळ्या भावाच्या भक्ताची सेवा मात्र तू प्रेमाने घ्यावीस ४

८११ देवा ऐसा शिष्य देईं । ब्रह्मज्ञानी निपुण पाहीं ॥ १ ॥
जो का भावाचा आगळा । भक्तिप्रेमाचा पुतळा ॥ २ ॥
ऐशा युक्ति ज्याला बाणे । तेथें वैराग्याचे ठाणे ॥ ३ ॥
ऐसा जाला हो शरीरी । तुका लिंबलोण करी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – आगळा–निराळा, विशेष

अर्थ – देवा, असा एक मला शिष्य दे, की जो ब्रह्मज्ञानात निपुण आहे १ ज्याचा तुजविषयीचा भाव विशेष स्वरूपाचा असेल, व जो भक्तिप्रेमाचा केवळ पुतळा असेल, असा शिष्य मला दे २ अशी भक्तिप्रेमाची युक्ती ज्याला साधते, तिथेच वैराग्याचेही स्थान असते ३ असा हा शिष्य प्रत्यक्ष शरीरानेही ब्रह्मस्वरूप झालेला असावा मी तुकाराम त्याच्यावरून माझा जीव ओवाळून टाकीन ४

८१२ जववरी नाही देखिली पंढरी । तोवरी वर्णिसी[१] थोरी वैकुंठींची ॥ १ ॥
मोक्षसिद्धि तेथें हिंडे दारोदारी । होऊनि कामारी दीनरूप ॥ २ ॥
वृंदावन सडे चौक रंग माळा । अभिनव सोहोळा घरोघरीं ॥ ३ ॥
नामघोष कथापुराणकीर्तनी । ओविया कांडणीं पांडुरंग ॥ ४ ॥
सर्व सुख तेथें असे सर्वकाळ । ब्रह्म ते केवळ नांदतसे ॥ ५ ॥
तुका म्हणे जें न साधे सायासे । तें हें प्रत्यक्ष दिसे विटेवरि ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – कामारी–सेवक, सायासे–प्रयत्नाने

१ वर्णिसील

अर्थ – जोपर्यंत पंढरपूर क्षेत्राचे दर्शन झालेले नाही, तोपर्यंतच वैकुंठाची थोरवी तुम्ही वर्णन कराल १ या क्षेत्रात मोक्षाची सिद्धी सेवकाप्रमाणे दीन रूप धारण करून घरोघरी जाऊन हिंडत असते २ येथे प्रत्येकाच्या घरी अंगणात तुळशीवृंदावन असून सडे टाकलेले असतात रांगोळ्या काढलेल्या असतात प्रत्येकाच्या घरी मोठा अभिनव सोहळा चालू असतो ३ येथे कथाकीर्तनात एकसारखा विठ्ठलाचा नामघोष चाललेला असतो दळणकांडण करताना येथे पांडुरंगाच्या ओव्याही गाइल्या जातात ४ या ठिकाणी सर्व प्रकारची सुखे नेहमी भक्तांच्या सेवेस तयार असतात येथे परब्रह्म मूर्तिमंत होऊन नांदत असते ५ तुकाराम महाराज म्हणतात, जे मोठ्या प्रयत्नाने मोठमोठ्यांना साध्य होत नाही, ते हे रूप येथे पंढरीत विटेवर प्रत्यक्ष दिसते ६

८१३ दु ख वाटे ऐसी ऐको नये[1] गोष्टी । जेणे घडे तुटी तुझ्या पायी ॥ १ ॥
येतो कळवळा देखोनिया घात । करितो फजित नाइकती ॥ २ ॥
काय करू देवा ऐसी नाहीं शक्ति । दडुनि पुढती वाटे लावूं ॥ ३ ॥
तुका म्हणे मज दावू नको ऐसे । दृष्टीपुढें पिसे पांडुरंगा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – तुटी–वियोग, दडुनि–शिक्षा करून, पिसे–वेडे

अर्थ – देवा, जेणेकरून तुमच्या पायाचा वियोग होईल व मनाला दु ख होईल अशा गोष्टी तू मला ऐकू येतील असे करू नकोस १ या प्रापंचिकांची केवळ ऐहिक दृष्टी पाहून माझ्या मनात फारच कळवळा निर्माण होतो रे त्यांचा हा घात पाहून मी त्यांची फजिती करून पाहिली, परंतु ते काही ऐकतही नाहीत २ देवा, मी याच्या-साठी काय करू रे ? यांना चांगली शिक्षा करून मार्गाला लावावे अशी शक्तीही माझ्याजवळ नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, असे संसाराच्या आसक्तीने वेडे झालेले लोक माझ्या दृष्टीपुढे सुद्धा नकोत ४

८१४ शूकरासी विष्ठा माने सावकास । मिष्टान्नाची त्यास काय गोडी ॥ १ ॥
तेवीं अभक्तासी आवडे पाखांड । न लगे त्या गोड परमार्थ ॥ २ ॥
श्वानासी भोजन दिले पंचामृत । तरी त्याचे चित्त हाडावरि ॥ ३ ॥
तुका म्हणे सर्पा पाजिलिया क्षीर । वमिता विखार विष जाले ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – शूकरासी–डुकरास, पाखंड–नास्तिकपणा, वमितां–ओकल्यावर

अर्थ – डुकरासारख्या प्राण्यास विष्ठा सावकाशपणे चघळीत राहणेच आवडते त्याला जरी मिष्टान्न वाढले, तरी त्याचा उपयोग त्याला काय ? त्याला काय गोडी वाटणार त्या पक्वान्नाची ? १ त्याप्रमाणे जे अभक्त आहेत, त्यांना केवळ नास्तिकपणाच आवडतो त्यांना कधी परमार्थ गोड लागतच नाही २ कुत्र्याला जरी पंचामृताचे भोजन दिले, तरी त्याचे चित्त हाडे चघळण्यावरच राहणार ३ तुकाराम महाराज म्हणतात, सापाला जरी दूध पाजले, किंवा खीर पाजली, तरी ती विषाच्या रूपानेच ओकली जाणार ४

८१५ रासभ धुतला महा तीर्थामाजी । नव्हे जैसा तेजी शामकर्ण ॥ १ ॥
तेवीं खळा काय केला उपदेश । नव्हेचि मानस शुद्ध त्याचे ॥ २ ॥
सर्पासी पाजिले शर्करापियूष । अंतरींचे विष जाऊ नेणे ॥ ३ ॥
तुका म्हणे श्वाना क्षिरीचें भोजन । सवेचि वमन जेवी तया ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा –रासभ–गाढव, शामकर्ण–सुलक्षणी घोडा, खळा–दुष्टास, शर्करापीयूष–साखरमिश्रित दूध

अर्थ – गाढवाला गंगेच्या तीर्थाने जरी न्हायला घातले, तरी काही त्याचा शुभलक्षणांनी युक्त असा देखणा घोडा होणार नाही १ त्याप्रमाणे दुष्ट असणाऱ्या माणसास उपदेश करून काय उपयोग ? त्याचे मनच कधी शुद्ध

---

१ एकोनिया

नसते २ साखरेनें युक्त असणारे दूध जरी सापाला पाजले, तरी त्याच्या अंतरंगातील विष नाहीसे कसे होणार ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, कुत्र्याला जरी गोड खिरीचे भोजन वाढले, तरी ते चटकन ओकून पडेल ४

८१६ जेवीं नवज्वरें तापलें शरीर । लागे तया क्षीर विषातुल्य ॥ १ ॥
तेवीं परमार्थ जीहीं दुराविला । तपालागीं झाला सन्निपात ॥ २ ॥
कामिनी जयाच्या जाहाली नेत्रासी । देखी तो चंद्रासी पीतवर्ण ॥ ३ ॥
तुका म्हणे मद्यपानाची आवडी । न रुचे त्या गोडी नवनीताची ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – सन्निपात–वात, कफ, पित्त याचा प्रकोप कामिनी–कावीळ

अर्थ – ज्याचे शरीर नवज्वराने तापले आहे, त्याला दूध विषाप्रमाणे कडूच लागणार १ त्याचप्रमाणे ज्याना परमार्थविचार दुरावलेला आहे, त्याला सन्निपातासारखा रोग झाला आहे असेच समजावयास हवे २ ज्याच्या डोळ्याना कावीळ झाली आहे, त्याला सर्व जगत चंद्रासह पिवळेच दिसणार ३ तुकाराम महाराज म्हणतात, ज्याला मद्यपानाची आवड आहे त्याला ताज्या लोण्याचीही चव काय बरे असणार ? ४

८१७ आतां असो मना अभक्ताची कथा । न होईं दुश्चिता हरिनामीं ॥ १ ॥
नये त्याची कदा गोष्टी करूं मात । जिव्हे प्रायश्चित्त त्याच्या नांवे ॥ २ ॥
प्रभातें न घ्यावें नांव माकडाचें । तैसें अभक्ताचें सर्वकाळ ॥ ३ ॥
तुका म्हणे आतां आठवूं मंगळ । जेणें सर्व काळ सुखरूप ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – दुश्चिता–उदास, मंगळ–पवित्र

अर्थ – मना, आता जे अभक्त आहेत, त्याची गोष्ट राहू दे दूर तू मात्र हरिनामाविषयी उदास होऊ नकोस १ त्याच्यासंबंधी आता तू कधीही विचार करू नकोस त्याचे नाव घेतले तरी, जिभेस प्रायश्चित्त घ्यावे लागेल २ सकाळच्या प्रहरी जसे माकडाचे नाव घेऊ नये, त्याचप्रमाणे त्या अभक्ताचेही नाव कधी घेऊ नये ३ तुकाराम महाराज म्हणतात आता अत्यंत पवित्र असा जो विठ्ठल त्याचेच स्मरण करू, तोच नेहमी सुखरूप असा आहे ४

८१८ नाम आठवितां सद्‌गदित कंठीं । प्रेम वाढे पोटीं ऐसें करीं ॥ १ ॥
रोमांच जीवन आनंदाश्रु नेत्रीं । अष्टांग ही गात्रीं प्रेम तुझें ॥ २ ॥
सर्व ही शरीर वेचो या कीर्तनीं । गाऊं निशिदिनीं नाम तुझें ॥ ३ ॥
तुका म्हणे दुजें न करीं कल्पांतीं । सर्वदा विश्रांति संतां पायीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – वेंचो–खर्च होवो दुजें–दुसरे

अर्थ – देवा, तुझे नाव आठवताच कंठ सद्‌गदित व्हावा, अशा प्रकारचे प्रेम मनात वाढेल असे तू कर १ या सर्व अंगावर रोमांच उभे राहावेत, डोळ्यात आनंदाचे अश्रू उभे राहावेत आणि सर्व अष्टांगातही तुझे प्रेम भरून यावे असे देवा, तू कर २ तुझ्या नामसंकीर्तनात माझे सर्व शरीर खर्च व्हावे व रात्रंदिवस देवा, तुझेच नाम मी गावे ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, कल्पाचा शेवट झाला तरी पायरीज दुसरे तू काहीही करू नकोस नेहमीच मला संताच्या पायी विश्रांती मिळेल असे कर तू ४

८१९ जननी हे जाणे बाळकाचें वर्म । सुख दुःख धर्म जें जें कांहीं ॥ १ ॥
अधापुढें जेणें दिधला आधार । त्याचा हा विचार तोचि जाणें ॥ २ ॥
शरणागता जेणें घातलें पाठीशीं । तो जाणे तेविशीं राखों तया ॥ ३ ॥
कासे लागे तया न लगती सायास । पोहोणारा त्यास पार पावी ॥ ४ ॥
तुका म्हणे जीव विठ्ठलाचे हातीं । दिला त्याची गति तोचि जाणे ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– पार पावी–पैलतीरावर पोचवितो.

अर्थ :– आपल्या मुलाचे वर्म नेमके कोणते आहे, हे त्याची आई बरोबर ओळखत असते. त्याचे जे सुख किंवा दुःख असेल ते तिला सर्व माहीत असते. १ एखाद्या आंधळ्यास जो आधार देतो त्यालाच पुढल्या खाचखळग्यांचा या संकटांचा विचार करावा लागतो. २ शरण आलेल्याना ज्याने अभय देऊन पाठीशी घातले आहे, तोच त्याच्या रक्षणाविषयी जाणतेपणाने जाणीत असतो. ३ पाण्यात बुडणाऱ्यास काढण्यासाठी ज्याने कास घातली आहे, त्याला त्याचे काही वाटत नाही. फारसे प्रयत्नही करावे लागत नाहीत. हा पोहणारा मनुष्य त्या बुडणाऱ्या इसमास सहजासहजी पैलतीरावर नेऊन पोचवितो. ४ तुकाराम महाराज म्हणतात, एकदा आपला हा जीव विठ्ठलाच्या हातांत दिल्यावर त्याचे कार्य तो रक्षणाचे करणारच. ५

८२० नका वांटूं मन विधिनिषेधांसी । स्मरावा मानसीं पांडुरंग ॥ १ ॥
खादलिया अन्ना मासी बोलों नये । अवघेंचि जाये एका घांसें ॥ २ ॥
जोडी होते परी ते बहु कठिण । करितां जतन सांभाळावें ॥ ३ ॥
तुका म्हणे येथें न मना[1] विषाद । निंबेंविण व्याध तुटों नये ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– मासी–माशी, जोडी–प्राप्ती, व्याध–रोग, न मना–मानू नका.

अर्थ – विधिनिषेधांच्या फचाटघात तुमचे मन गुंतवू नका केवळ पांडुरंगाचे स्मरण सतत करा, म्हणजे झाले १ खाऊन झालेल्या अन्नाच्या शेवटच्या घासाच्या वेळी त्यात माशी पडली होती असे बोलू नये. केवळ एका घासासाठी मग सर्वच कल्पनेने ओकावे लागते. २ कोणत्याही चांगल्या गोष्टीची प्राप्ती सहजासहजी होईल एखाद्या वेळेस; पण त्याचे रक्षण मात्र नीट काळजीपूर्वक करावे लागते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, माझ्या या बोलण्याचा राग मानू नका तुम्ही कुणी. कडू लिंबाच्या रसातून औषध घेतल्यावाचून शरीरात मुरलेला रोग दूर होणार तरी कसा? ४

८२१ नको होऊं देऊं भावीं अभावना । याचि नांवें जाणा बहु दोष ॥ १ ॥
मेघवृष्टि येथें होते अनिवार । जिव्हाळ्या उखर लाभ नाड ॥ २ ॥
उत्तमा विभागें कनिष्ठाची इच्छा । कल्पतरु तैसा फळे त्यासी ॥ ३ ॥
तुका म्हणे जिणें बहु थोडें आहे । आपुलिया पाहें पुढें बरें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– जिव्हाळ्या–सुपीक जमीन, उखर–नापीक जमीन, न –तोटा.

अर्थ :– देवा, माझ्या मनात तुमच्याविषयी जी भक्तिभावना आहे, तीत अभावना म्हणजे विपरीत भावना निर्माण करू नका. कारण यामुळे फार मोठा दोष निर्माण होईल १ जर पुष्कळ पाऊस पडला तर सुपीक जमिनीचा फायदा होईल व नापीक जमिनीचा तोटाच होईल. २ कल्पतरूच्या छायेखाली बसून चांगली कल्पना केल्यास चांगले फळ मिळेल. वाईट कल्पना केली तर वाईट फळ मिळेल. ३ तुकाराम महाराज म्हणतात, आपले आयुष्य फार थोडे असल्यामुळे जेणेकरून हित होईल, असे तुम्ही नेहमी पाहात जा. ४

८२२ त्याग तंव मज न वजतां केला । कांहींच विठ्ठला मनांतूनि ॥ १ ॥
मागलिया आला उबग सहज । न धरितां काज जालें मनीं ॥ २ ॥
देह जड जालें ऋणाच्या आभारें । केलें संवसारें कासावीस ॥ ३ ॥
तुका म्हणे गेला आळसकिळस । अकर्तव्य दोष निवारले ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– न वजता–ध्यानात न येताच.

१ माना.

अर्थ :– देवा, विठ्ठला, प्रपंचातील गोष्टींचा त्याग माझ्या मनातून सहजच, ध्यानात न येताही होत राहिला. १ संसाराच्या त्रासाने मी दमलेलो असल्यामुळे त्याग करावा असा भाव मनात येण्यापूर्वीच सहजासहजीच त्याग घडला. २ संसाराच्या भारामुळे, ऋणाच्या ओझ्यामुळे, माझा देह फारच जड झाला होता; आणि या संसाराच्या तापामुळे मी फारच कासावीस झालो होतो. ३ तुकाराम महाराज म्हणतात, पण आता मात्र परमार्थाच्या मार्गाविषयीचा आळस माझ्या मनातून पुरता गेला व अकर्तव्य अशा संसारापासून निर्माण होणाऱ्या दोषांपासून मी मुक्त झालो. ४

८२३ मढें झांकुनियां करिती पेरणी । कुणबियाचे वाणी लवलाहें ॥ १ ॥
तयापरी करीं स्वहित आपुलें । जयासी फावलें नरदेह ॥ २ ॥
ओटीच्या परिस मुठीचें तें वाढे । यापरि कैवाडें स्वहिताचें ॥ ३ ॥
नाहीं काळसत्ता आपुलिये हातीं । जाणते हे गुंती उगविती ॥ ४ ॥
तुका म्हणे पाहें आपुली सूचना । करितो शाहाणा मृत्युलोकीं ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– वाणी–वदा, फावलें–प्राप्त झाले, कैवाडें–निश्चय.

अर्थ :– शेतकीचा धंदा करणाऱ्या कुणब्यास किंवा शेतकऱ्यास वेळ आली तर घरातील प्रिय माणसाचा मृत्यू झाला तरी, ते प्रेत तसेच झाकून ठेवून प्रथम शेत पेरण्याचे काम पाहावे लागते. १ त्याप्रमाणे तुम्ही आपले स्वतःचे हित साधावे. ज्यांना हे मानवी शरीर प्राप्त झाले आहे, त्यांनी तरी या हिताचा विचार करावा. २ धान्य पेरताना शेतकऱ्याच्या ओटीवर जे धान्य असते, त्याच्यापेक्षा पाभारीवरील मुठीत थोडे असले तरी ते जास्त समजायला हवे; कारण त्यातूनच अनेक पटींनी धान्य निर्माण होणारे असते; वाढणारे असते. त्याचप्रमाणे वाढणाऱ्या स्वहिताचा तुम्ही विचार निश्चयाने करावा. ३ कारण काळाची सत्ता काही आपल्या हातात नसते. जाणत्या माणसाने हे जाणून जन्ममृत्यूचा गुंता सोडवावा. ४ तुकाराम महाराज म्हणतात, मी ही सूचना तुम्हांस केली आहे. जो या मृत्युलोकी शहाणा असेल त्यानेच हिचा विचार करावा. ५

८२४ राजा चाले तेथें वैभव सांगातें । हें काय लागतें सांगावें त्या ॥ १ ॥
कोणी कोणां एथें न मनी जी फुका । कृपेविण एका देवाचिया ॥ २ ॥
शृंगारिलें तरी तगोंयेत वरि । उमटे लौकरि जैसें तैसें ॥ ३ ॥
तुका म्हणे घरीं वसे नारायण । कृपेची ते खुण साम्या[1] येते ॥ ४ ॥

*शब्दार्थ व टीपा :– सांगातें–बरोबर, तगोंयेत–टिकून राहात.*

अर्थ :– जेथील मार्गाने राजा चाललेला असतो, त्याच मार्गाने त्याचे सर्व वैभव येत असते. त्या छत्रचामरधारींना किंवा हत्तीघोड्यांना हे काही सांगावे लागत नाही. १ या जगात कुणीही कुणास विनाकारण मान देत नाही देवाच्या कृपेशिवाय असा मानही कुणाला मिळणार नाही २ एखाद्या वस्तूस वरवर शृंगारून टाकिले तरी, ती शोभा काही कायमची टिकून राहात नाही जे मूळचे स्वरूप असेल तेच लौकर बाहेर पडते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, ज्याच्या हृदयामध्ये नारायणाने निवास केला आहे, त्याच्यावर सर्वत्र समत्वाने पाहण्याची दृष्टी येऊन त्याच्यावर कृपाच होते. त्याचे समत्वदर्शन हीच त्याच्या कृपेची खूण होय ४

८२५ वत्स पळे धेनु धांवे पाठीलागीं । प्रीतीचा तो अंगीं आविर्भाव[2] ॥ १ ॥
शिकविले काय येईल कारणा । सूत्र ओढी मना आणिकांच्या ॥ २ ॥
सांडिले तें नाहीं घेत मेळवितां । म्हणऊनि लाता मार्गे सारी ॥ ३ ॥
तुका म्हणे आग्रह करावा न लगे । सांगतसे अंगें अनुभव ॥ ४ ॥

---

१ दिसो, २ आयुर्भाव.

शब्दार्थ व टीपा :– आणिकांच्या–दुसऱ्याच्या, मेळवितां–भेटविल्यावर.

अर्थ :– एखादे वासरू पुढे पळू लागले तर, त्याची आई ( गाय ) त्याच्यापाठीमागे धावत जाते कारण या वासराविषयीचा प्रेमभाव त्या गाईच्यामध्ये सहजच निर्माण झालेला असतो. १ असे हे प्रेम शिकवून कधी उपयोगास येईल काय ? मनातील दृढ प्रेमाचा तंतूच दुसऱ्याच्या मनास ओढीत असतो. २ पुढे वासरू मोठे झाले की गाय मग त्यास सोडून देते; मग पुन. तिला जरी ते वळेच भेटविले, तरी ती काही त्याला प्रेमपान्हा पाजीत नाही, उलट लाथा मारून ती त्याला दूरच करील. ३ तुकाराम महाराज म्हणतात, अंतरीचे प्रेम आग्रह करून निर्माण होत नाही. अगचा अनुभवच ते बोलून दाखवीत असते. ४

८२६ देवाच्या संबंधें विश्वचि सोयरें । सूत्र ओढे दोरें एका एक ॥ १ ॥
आहाच हें नव्हे विटायासारिखें । जीव जीवनीं देखें सामावलें ॥ २ ॥
आणिकांचें सुख दुःख उमटे अंतरीं । एथील इतरीं तेणें न्यायें ॥ ३ ॥
तुका म्हणे ठसावलें शुद्ध जाती । शोभाचि पुढती विशेषता ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – आहाच–व्यर्थ, उगाच.

अर्थ :– एकदा देवाचा संबंध आल्यावर मग सर्वत्र विश्वच आपले सोयरे बनून राहते आणि मग परस्परांच्या आतरिक नात्याची सूत्रे एकमेकांना ओढीत राहतात. १ असे हे विश्वात्मक प्रेम उगाच वरवरचे व चटकन वीट येणारे नसते. या प्रेमात जीव स्वत चे जे जीवन परमेश्वरस्वरूप त्यात सामावून गेलेला असतो. २ या प्रेमाचे लक्षणच असे असते की, इतरांचे सुखदु ख याच्या अत करणात उमटते व याच न्यायाने याला एकाला झालेले दु ख इतरत्र उमटून राहते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, याप्रमाणे शुद्ध स्वरूपाचा एकात्मभाव अंतःकरणात दृढ झालेला असल्यामुळे त्याची शोभा उत्तरोत्तर वाढीसच लागलेली असते. ४

८२७ अवघा वेंचलों इंद्रियांचे ओढी । जालें तें तें घडी निरोपिलें ॥ १ ॥
असावा जी ठावा सेवेसी विचार । आपुला म्यां भार उतरिला ॥ २ ॥
कायावाचामनें तोचि निजध्यास । एथें जालों ओस भक्तिभावें ॥ ३ ॥
तुका म्हणे करूं येईल धावणें । तरि नारायणें सांभाळावें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– वेंचलों–खर्च झाले, धावणें–रक्षण.

अर्थ :–देवा, या इंद्रियांच्याच ओढीमुळे माझे सर्व आयुष्य खर्च झाले. याविषयी जे ज्या ज्या वेळी घडले, ते ते सर्व मी तुम्हांस सांगितले आहे. १ देवा, आपल्याला हा विचार माहीत असावा म्हणून सांगून माझ्यावरचा भार मी कमी केला आहे. २ माझ्या शरीराने, वाणीने, मनाने विषयांचा ध्यास एकसारखा घेतल्यामुळे मी भक्तिभावरहित होऊन बसलो आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, नारायणा, तुम्हांस जर माझे रक्षण करावयाचे असेल तर, माझा सांभाळ आताच करावा. ४

८२८ राहो आतां हेंचि ध्यान । डोळां मन लंपटो ॥ १ ॥
कोंडकोंडूनि धरीन जीवें । देहभावें ओंवाळीन ॥ २ ॥
होईल येणें पाळसा आलें । स्थिरावलें अंतरीं ॥ ३ ॥
तुका म्हणे गोजिरिया । विठोबा पायां पडों द्या ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– लंपटो–जडून राहो, पाळसा आलें–परिपूर्ण झाले.

अर्थ :– आता श्रीविठ्ठलाचे हेच ध्यान माझ्यासमोर स्थिर व्हावे. यावरच माझे डोळे व मन जडून राहावेत. १ या पांडुरंगाला मी आता माझ्या हृदयात कोंडून ठेवीन व देहभावाच्या प्रेमाने मी याला ओवाळीन. २ याप्रमाणे

विठ्ठलाचे हे एक ध्यान हृदयात स्थिर झाले म्हणजे, सर्व परिपूर्ण झाले असे होईल ३ तुकाराम महाराज म्हणतात, गोजिरवाण्या दिसणाऱ्या विठोबा, मला तुमच्या पाया पडू द्यात, ४

८२९ आदि मध्य अंत दाखविला दीपें । हा तो आपणापें यत्न बरा ॥ १ ॥
दासत्वे दाविले धन्याचें भांडार । तोंतो नव्हे सार एथुनिया ॥ २ ॥
उपायानें सोस नासला सकळ । सत्तें सत्ताबळ अंगा आलें ॥ ३ ॥
तुका म्हणे दृष्टि सकळाचे शिरीं । वचनचि करी बैसोनिया ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – दीपें–दिव्याने, सोस–इंद्रियसुखाची हौस

अर्थ – कोणत्याही पदार्थाचा आदी, मध्य, अंत काळोखात दिव्यानेच स्पष्ट होतो त्यामुळे अशा या दिव्याच्याच उपयोगाचा आश्रय करावा हे बरे १ दास्यत्वामुळेच धन्याचे भांडार दृष्टीस पडते ही वृत्ती जर अंगी बाणली नाही, तर मात्र ते भांडार दृष्टीस पडणार नाही २ या ईश्वराच्या प्रेमाच्या उपायाने इंद्रियसुखाची हौस सर्व संपली आणि या प्रभूच्या प्रेमाचीच सत्ता अंगी बाणून राहिली ३ तुकाराम महाराज म्हणतात, आमची दृष्टी सर्वांच्यावर सारखी असते आणि बसल्याबसल्याच आम्ही सर्वांना आज्ञा करीत असतो ४

८३० सांटविलें वाण । पेंस घातला दुकान ॥ १ ॥
जें ज्या पाहिजे जे काळीं । आहे सिद्धचि जवळी ॥ २ ॥
निवडिलें साचें । उत्तममध्यमकनिष्ठाचें ॥ ३ ॥
तुका बैसला दुकानीं । दावी मोला ऐसी वाणी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – वाण–माल, पेंस–ऐसपैस, मोठे

अर्थ – भक्तांच्या नाना प्रकाराचा माल मी माझ्या दुकानात भरलेला आहे मी दुकान चांगले ऐसपैस घातले आहे १ जे कुणाला ज्या वेळी पाहिजे, ते त्याने सांगावे सर्व काही जवळच येथें तयार आहे २ उत्तम, मध्यम, कनिष्ठ अशा प्रकाराचा खराखुरा माल निवडून आम्ही ठेविला आहे ३ तुकारामच या दुकानावर बसून जो ज्या भावाने, वृत्तीने मागणी करील त्याप्रमाणे तो मालाचा पुरवठा करीत आहे ४

विवरण – तुकारामबुवा धद्याने वाणी होते हे प्रसिद्ध आहे व्यापार करावा, थोडी सावकारकीही करावी, दुकानदारी चालवावी, हा त्याचा धंदा होता याच धंद्यात पुढे तूट आली, दुष्काळामुळे द्रव्य संपून गेले, दुकानाचे दिवाळे निघाले, वैराग्यशील वृत्ती मूळचीच ती अधिक परमार्थप्रवण होऊन हरिभजनात दंग झाली भामनाथाच्या डोंगरावर वृक्षवल्लींच्या सहवासात रममाण झाली ज्ञानेश्वरी, एकनाथी भागवत व गीता यांच्या पारायणांनी व नामस्मरणाच्या सतत संगतीने बुवांची वृत्ती उल्हसित व प्रसन्न झाली नामसंकीर्तन व भजन हा सोपा मार्ग हाताशी आला. नामदेवाकडून कवित्वाची प्रेरणा झाली सद्‌गुरुनाथांनी कृपा केली तुकोबाच्या मुखातून प्रसादपूर्ण अशी अभंगवाणी स्रवू लागली

त्यांच्या अभंगवाणीत काव्यगुणांचे सर्वोत्तम दर्शन होते हे खरेच परंतु परमेश्वराशी प्रेमपूर्वक कलह करीत असताना, आपला मुद्दा स्पष्ट करताना एखादा सिद्धान्त सांगताना बुवा कधी उदाहरण म्हणून कधी रूपक म्हणून आपल्या धंद्याचा अथवा व्यवसायाचा उपयोग मोठ्या चातुर्याने व समर्पक रीतीने करतात **'फोडिले भांडार धन्याचा हा माल'** ही प्रसिद्ध ओळ ( क्र ६९६ ) आपण पाहिलीच आहे याखेरीज अनेक ओळींत तुकारामबुवा आपल्या व्यापाराच्या, दुकानदारीच्या व्यवसायाचा मोठ्या गमतीने पण समर्पक रीतीने उल्लेख करितात **'येच हातीं येच हाटीं । बांधा गाठीं पारखून', 'उतरला कसीं खरा माल', 'सवंग जालें सवंग जालें । घरा आलें बदरीचें', 'पंढरी चोहोटा घातलें दुकान', 'नाम घ्यारे कोणी फुका । भाव सांगतसे तुका', 'उधार घ्यारे उधार घ्यारे । अवघे यारे जातीचे', 'दुबळा तुका भावहीन । उधार देव घेतला ऋण', 'माप आणि गोणी । तुका म्हणे रितीं दोन्हीं,' 'मुदल**

जतन झाले। मग नामाचे काम आले?', 'प्रेम व्याज देई हरी। माझा हिशेब लवकरी करी' यासारख्या अनेक वचनातून तुकोबानी व्यापारी वृत्तीला वरवर तरी विसगत वाटणाऱ्या परमार्थवृत्तीशी भावपूर्ण अत करणाने रमविले आहे

८३१ लागलिया मुख स्तना। घाली पान्हा माउली ॥ १ ॥
उभयता आवडी लाडें। कोडें कोड पुरतसे ॥ २ ॥
मेळविता अगें अग। प्रेमें रग वाढतो ॥ ३ ॥
तुका म्हणे जड भारी। अवघें शिरीं जननीचे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – कोड–हौस, जड–ओझे

अर्थ – या विठाईमाउलीच्या स्तनास मुख लावताच तिच्या प्रेमाला पान्हा फुटतो १ या ठिकाणी माउली व तिचे मूल या उभयताच्या लाडास व कौतुकास हौसेचे भरते येते २ अग अगाला मिळवून, मुलाला पोटाशी धरून प्रेमाचा रग बहारीने वाढतो ३ तुकाराम महाराज म्हणतात, या प्रकारे आईच्या शिरावर मुलाची फार मोठी जबाबदारी असते याच्या कल्याणाचे फार मोठे ओझे तिला वागवावे लागते ४

८३२ अवगुण तो कोणी नाही प्रतिष्ठिले। मार्गे होत आले शिष्टाचार ॥ १ ॥
दुर्बळाच्या नावे पिटावा डांगोरा। हा तो नव्हे बरा सत्यवाद ॥ २ ॥
मद्य आणि मधु एकरासी नावे। तरि का ते खावे आधारे त्या ॥ ३ ॥
तुका म्हणे माझा उच्छिष्ट प्रसाद। निवडी भेदाभेद वृष्टिन्यायें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – एकरासी–एकाच वर्गातील

अर्थ – यापूर्वी अवगुणाची अथवा दुर्गुणाची प्रतिष्ठा बळच कुणीही केलेली नाही पूर्वीपासून चागल्या आचाराचेच पालन होत आले आहे १ अशी स्थिती असताना उगाच दुबळ्या माणसाच्या नावाने डांगोरा पिटावा, हे काही ठीक नाही हो गोष्ट सत्यालाही धरून नाही २ मद्य व मध या वस्तू एकाच वर्गातील असल्या तरी, मद्याचे सेवन मधाच्या आधाराने करणे इष्ट आहे काय? ३ तुकाराम महाराज म्हणतात, सतांच्या कृपेने मेघ-वृष्टीप्रमाणे मला उपदेशाचा उच्छिष्ट प्रसाद मिळालेला असल्याने, त्यायोगे गुण व अवगुण याची अथवा भेद व अभेद याची निवड मी करू शकतो ४

८३३ मूर्ती भगवत। हा तो जाणतो सकेत ॥ १ ॥
भारी मोकलितो बाण। ज्याचा त्यासी कळे गुण ॥ २ ॥
करावा उपदेश। निवडोनि तरि दोष ॥ ३ ॥
तुका म्हणे वाटे। चुकता आडराने काटे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – मोकलितों–सोडतो

अर्थ – सर्व भूतमात्रामध्ये भगवताचाच अश भरून राहिला आहे, हे तर मी जाणतो १ म्हणूनच मी शब्दरूपाचे तीक्ष्ण बाण सोडीत असतो या बाणाचा गुण ज्याचा त्यास बरोबर समजतो २ दोष वगळून योग्य तो उपदेश करावा, हेच मी जाणतो ३ तुकाराम महाराज म्हणतात, नीट सरळ मार्ग सोडून जर आडवाटेने गेलात तर पायांना काटे टोचतील मात्र ४

८३४ आम्हा हे कौतुक जगा द्यावी नीत। करावे फजित चुकती ते ॥ १ ॥
कासयाचा बाध एकाच्या निरोपें। काय व्हावे कोपें जगाचिया ॥ २ ॥

अविद्येचा येथें कोठें परिश्रम । रामकृष्णनाम ऐसे बाण ॥ ३ ॥
तुका म्हणे येथें खऱ्याचा विकरा । न सरती येरा खोट्या परी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – नीत–नीतीचा विचार, विकरा–विक्री

अर्थ – वाट चुकलेल्या जगास काही नीतिविचार सांगावा, हेच आम्हास कौतुकाचे आहे जे कुणी वागायला चुकतील, त्यांची फजिती करावी हेच आम्ही पाहतो १ त्या एका देवाचा निरोप नीटपणे लोकांना सांगितला तर त्यात कसली बाधा आहे ? यासाठी लोक कितीही रागावले तरी काय होणार आहे ? २ या आमच्या भक्तिमार्गात रामनामाचे बाण सुटत असल्यामुळे येथे अविद्येस थाराच मिळत नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, येथे खरा-खुरा उपदेश असेल त्याचीच विक्री होत असून खोट्या प्रकाराचे येथें काही चालत नाही ४

८३५ दर्पणासी [1]नखटें लाजे । शुद्ध खिजे देखोनि ॥ १ ॥
ऐसे अवगुणाच्या बाधें । दिसे सुदें विपरीत ॥ २ ॥
अधळ्यास काय हिरा । गाराचि तो सारिखा ॥ ३ ॥
तुका म्हणे भुके सुने । ठाया नेणे ठाव तो ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – दर्पणासी–आरशाला नखटें–नकट्या नाकाचा, सुदें–चांगले, सुनें–कुत्रे

अर्थ – समोर आरशात तोंड पाहून नकटा मनुष्य लाजतो व चांगला आरसा असला तरी तो त्या आरशावरच चिडतो १ याप्रमाणे जो अवगुणाच्या बाधेने पीडलेला आहे, त्याला जे जे चांगले आहे, ते ते सर्व विपरीतच दिसते २ आंधळ्याला हिरा दाखवून काय उपयोग ? तो त्याला गारेप्रमाणेच वाटणार ३ तुकाराम महाराज म्हणतात, याप्रमाणे उचित, अनुचित न पाहता कुत्रे नुसते भुंकतच राहते ४

८३६ नावडे तरि का येतील हे भाड । घेउनिया तोंड काळें येथें ॥ १ ॥
नासोनिया जाय रस यासगती । खळाचे पगती नारायणा ॥ २ ॥
तोंडावाटा नर्क काढी अमगळ । मिष्टान्ना विटाळ करी सुनें ॥ ३ ॥
तुका म्हणे नाहीं संताची मर्यादा । निंदे तोचि निंदा मायझवा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – भाड–भाडखोर लोक, खळाचे–दुष्टाच

अर्थ – या भाडखोर माणसाना आमचा भक्तिमार्ग जर पसत नाही, तर मग पुन पुन काळें तोंड दाखविण्यासाठी हे आमच्याकडे येतात तरी कशाला ? १ नारायणा, या दुष्ट लोकांच्या संगतीने व पंगतीने आमच्या प्रभुप्रेमाचा सर्व रंग बिघडून जातो ना ? २ हे दुष्ट लोक आपल्या मुखातून अमंगल अशी वाईट वचने काढतात व कुत्र्याप्रमाणे चांगल्या अन्नाला शिवून विटाळ पसरवितात ३ तुकाराम महाराज म्हणतात, ज्याला संताची मर्यादा राखता येत नाही, मान ठेवता येत नाही, जो त्याची निंदा करतो, तो अति दुष्ट समजावा ४

८३७ लेकरा आईते पित्याची जतन । दावी निजधन सर्व जोडी ॥ १ ॥
त्यापरि आमचा जालासे सांभाळ । देखिलाचि काळ नाहीं आड ॥ २ ॥
भुकेचे सनिध वसे स्तनपान । उपायाची भिन्न चिंता नाहीं ॥ ३ ॥
आळवूनि तुका उभा पैलथडी । घातली या उडी पांडुरंगें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – आइतें–आयतं

अर्थ – पित्याने जन्मभर जे जे साठविलेले असते, ते आयतेच उभे करून तो मुलासमोर ठेवतो सर्व संपत्ती त्याने जी मिळवलेली असते, ती तो त्याच्या स्वाधीन करतो १ त्याचप्रमाणे या देवाने आमचा सांभाळ केलेला असल्याने, आम्ही काळाला कधी पाहिलेच नाही २ भूक लागली की, प्रेमाचे स्तनपान द्यायला आई जवळच उभी

---
[1] नकटें

आहे नाना उपाय करण्याची चिंता आम्हास काही करावी लागत नाही ३ हा तुकाराम त्या पांडुरंगास आळवीत भवनदीच्या एका तीरावर उभा आहे, असे पाहून पांडुरंगाने त्याला वाचविण्यासाठी नदीत उडीच टाकलेली आहे ४

८३८ शुद्ध चर्या हेंचि संताचें पूजन । लागतचि धन नाहीं वित्त ॥ १ ॥
सगुणाचे सोई सगुण विश्रांती । आपणचि येती चोजवीत ॥ २ ॥
कीर्तनींचि वोळे कृपेचा वोरस । दुरीपणें वास संनिधता ॥ ३ ॥
तुका म्हणे वर्म सांगतों सवर्गें । मन लावा लागें स्वहिताच्या ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – चर्या–दिनक्रम आचार, चोजवीत–शोधीत, वोरस–प्रसाद

अर्थ – आपले आचारविचार व रोजचा कार्यक्रम शुद्ध ठेवणे हेच खरे म्हणजे संताचे पूजन आहे आणखी काही धन किंवा संपत्ती यासाठी लागत नाही १ या श्रीहरीच्या सगुण रूपाच्या प्राप्तीमुळे हे सगुण रूपच आपण होऊन आपल्या भक्ताला शोधीत येत असते २ हा श्रीहरी दूर असला तरी कीर्तनाच्या वेळी याच्या कृपेचा रस किंवा प्रसाद प्राप्त होतो व त्याची जवळीक जाणवते ३ तुकाराम महाराज म्हणतात मी हे सोपे वर्म तुम्हास सांगत आहे की, तुम्ही आपले मन स्वत च्या हिताकडे लावा ४

८३९ जीवींचें जाणावें या नांवें आवडी । हेकड ते ओढी अमंगळ ॥ १ ॥
चित्ताच्या संकोचें काहींच न घडे । अतिशयें वेडे चार तेचि ॥ २ ॥
काळाविण काहीं नाहीं रुचों येत । करूनि संकेत ठेवियेला ॥ ३ ॥
तुका म्हणे कळे वचनें चाचणी । काय बोलवूनि वेळोवेळा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – आवडी–प्रेम हेकट–हेक्ट हट्टी

अर्थ – आपल्या मानवी जीवनाचा हेतु जाणावा यालाच प्रेम हे नाव आहे पण जे हट्टी असतात त्याची ओढ मात्र जे अपवित्र आहे त्याकडेच असते १ चित्त अप्रसन्न व संकोची झाल्यास काहीच समजणार नाही की हातून होणार नाही अतिशय वेडे असणारे चार गान हातून घडतील २ पण योग्य काळाशिवाय कोणतीही गोष्ट एकदम समजत नाही, मान्य होत नाही असा जणु जुनाच संकेत आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, याची चाचणी शब्दानीच मधून मधून होत असते या संबधी पुन पुन बोलण्याने काय होणार आहे ? ४

८४० कामातुर चवी सांडी । बरळ तोंडीं बरळे ॥ १ ॥
रगले ते अंगीं दावी । विष देववी आसडे ॥ २ ॥
धनलोभें लागे वेड । ते बडबड शमेना ॥ ३ ॥
तुका म्हणे वेसनें दोन्ही । नर्कखाणी भोगावया ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – चवी–मर्यादा रीत, आसडे–आचके वेसनें–व्यसन

अर्थ – कामाने आसक्त झालेला मनुष्य व्यवहाराच्या सर्व मर्यादा सोडतो आणि तोंडास जे येईल ते बरळत असतो १ जे अंगात भिनून गेलेले असते, तेच बाहेर प्रकट होते अंतरगात बाणलेले विषच बाहेर आचक्याच्या रूपाने प्रकट होते २ अनिवार संपत्ती मिळविण्याच्या नादाने वेडच लागते माणसास त्याची येताल बडबड काही केल्या शमत नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, ही दोनही व्यसने नर्कवास भोगण्याचीच आहेत ४

८४१ कृष्णाजनें जालें सोज्वळ लोचन । तेणें दिलें वान[1] निवडुनी ॥ १ ॥
निरोपाच्या मापें करी लडबड । त्याचें त्यानें गोड नारायणें ॥ २ ॥
भाग्यवंताघरीं करितां विश्वासें । कार्य[2] त्यासरिसें होईजेतें ॥ ३ ॥
तुका म्हणे पोट भरे घरेंवोजा । निज ठाव निजा निजस्थानीं ॥ ४ ॥

१ वाण २ काय

शब्दार्थ व टीपा :– वान–पदार्थ, वस्तु, बरवेजा–चांगल्या प्रकाराने.

अर्थ :– श्रीकृष्णाच्या रूपाचे कृष्णांजन माझ्या डोळ्यांत घातलेले असल्याने ते मोठे सोज्वळ व निर्मळ बनले आहेत. १ परमेश्वराचा निरोप सांगण्यासाठी म्हणूनच मी खटपट करीत आहे त्या नारायणाने त्याचा हा निरोप गोड करून मला सांगितला आहे. २ जे भाग्यवंत आहे, ते त्यांच्या घरी विश्वासाने चाकरी केल्यासच मनासारखे कार्य साधते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा प्रकाराने पोटही चांगले भरते व आपल्या स्वामी आपल्याला आश्रय आपोआप मिळतो. ४

८४२ मैंद आला पंढरीस । हातीं घेउनि प्रेमपाश ॥ १ ॥
पुढें नाडियेलें जग । नेतो लागों नेदी माग ॥ २ ॥
उभारोनि बाहे । दृष्टादृष्टी वेधीताहे ॥ ३ ॥
वैकुंठीहुनि पेणें । केलें पंढरीकारणें ॥ ४ ॥
पुंडलिकें थारा । देउनि आणिले या चोरा ॥ ५ ॥
तुका म्हणे चला । तुम्ही आम्ही धरूं त्याला ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा :– मैंद–ढोंगी, कपटी ( लटक्या अर्थाने ), नाडियेले–फसविले, पेणें–मुक्काम.

अर्थ :– प्रेमाचा पाश हातात घेऊन हा ढोंगी श्रीहरी पंढरपुरास येऊन स्थिर झाला आहे. १ याने नंतर जगातील अनेकांना फसविले. काही मागमूस लागणार नाही अशा ठिकाणी हा लबाड घेऊन जातो. २ दोनही हात उभारून केवळ दृष्टीनेच वेधून हा आपणाकडे सर्वांना आकर्षित करून घेतो. ३ पुंडलीक भक्ताने या चोरास आश्रय देऊन या स्थानावर स्थिर केले आहे. ४ या पंढरपूरच्या लोभासाठी या श्रीहरीने वैकुंठ सोडून मुक्काम आपल्या भक्तांसाठी केलेला आहे. ५ तुकाराम महाराज म्हणतात, चला, तुम्ही आम्ही सर्व मिळून त्याला धरुन त्याचेच भजनपूजन करू. ६

८४३ भांडवी माउली कवतुकें बाळा । आपणा सकळां साक्षित्वेसीं ॥ १ ॥
माझी माझी म्हणे एकएकां मारी । हें तों नाही दुरी उभयतां ॥ २ ॥
तुझें थोडें भातें माझें बहु फार । छंद करकर वाद मिथ्या ॥ ३ ॥
तुका म्हणे एके ठायीं आहे वर्म । हेचि होय श्रम निवारितें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– दुरी–उणीव, भातें–खाऊ.

अर्थ :– कधी कधी आई आपल्या मुलाचे भांडण कौतुकाने लावते व आपण दूर उभी राहून साक्षित्वाने पाहात असते. १ ती कधी एका मुलास माझा लाडका असे म्हणते व दुसऱ्याल मार देते. पण या दोनही मुलाच्या प्रेमात काही उणीव नसते २ मला फार खाऊ मिळाला, तुला थोडाच आहे, असे भांडण विनाकारण कटकट करून मुले करतात व आई प्रेमाने ते सोडविते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, पण या वृथा भांडणाचे वर्म एका आईस मात्र माहीत असल्याने ती त्यांचे श्रम दूर करण्याचे प्रयत्न करते. ४

८४४ लटकियाची आशा । होतो पडिलों वळसा ।
होउनियां दोषा । पात्र मिथ्या अभिमानें ॥ १ ॥
बरवी उघडली दृष्टी । नाहीं तरी होतों कष्टी ।
आक्रंदते सृष्टी । मात्र या चेष्टांनीं ॥ २ ॥
मरणाची नाहीं शुद्धी । लोभीं प्रवर्तली बुद्धी ।
परती तों कधीं । घडेचि ना माघारीं ॥ ३ ॥

साचूनि मरे धन । लावी पोरासी भांडण ।
नाही नारायण । तुका म्हणे स्मरीला ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – लटकियाची–खोट्याची, वळसा–भोवऱ्यात

अर्थ – धन, दौलत पुत्र, देह, पत्नी या सर्व खोट्या पसाऱ्याच्या आशेत गुतल्यामुळे मी जन्ममृत्यूच्या भोवऱ्यातच सापडलो होतो सर्व दोषाना मी यामुळे पात्र झालो आहे १ परतु याचवेळी माझी दृष्टी आत्मज्ञानाने उजळली हे बरे झाले नाही तर मग मी फार कष्टी झालो असतो अशा या खोट्याच शब्दानी सर्व जग आक्रोश करीत असते २ या माणसाना मरणाचेही भय, ते वृद्ध झाल्यामुळे कधी वाटतच नाही नाना प्रकारच्या इद्रियसुखात त्याचे मन गुतून राहिलेले असते तेथून त्याची दृष्टी परत माघारी वळते असे कधी होतच नाही ३ अशी माणसे पुष्कळ धन साचवितात, आणि एक दिवस मरून जातात मग त्याच्या मुलामध्ये मात्र भाडण लागते तुकाराम महाराज म्हणतात, जिवत असताना यानी कधीही नारायणाचे स्मरण केलेले नसते ४

८४५ जवळी मुखापाशीं । असता नेघे अर्हनिशीं ॥ १ ॥
भवनिर्दाळण नाम । विठ्ठल विठ्ठल नासी काम ॥ २ ॥
सुखाचे शेजार । करू का नावडे घर ॥ ३ ॥
तुका म्हणे ठेवा । का हा न करीचि बरवा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा –अर्हनिशी–रात्रदिवस भवनिर्दाळण–ससाराचा नाश

अर्थ –श्रीहरीचे नाव चागले मुखाजवळ असतानाही हा ते रात्रदिवस का बरे घेत नाही ? १ या विठ्ठलाचे नाम पुन पुन घेतल्याने ससाराचा ससारबुद्धीचा नाश होऊन, इतर अनेक इच्छाही नष्ट होतात २ प्रभूचे हे नाम चागली सुखाची शय्या असून ती का आवडत नाही ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, हरिनामाचा हा उत्तम ठेवा तू जवळ का राखून ठेवीत नाहीस ? ४

८४६ बरवे देशावर जाले । काय बोले बोलावे ॥ १ ॥
लाभें लाभ दुणावला । जीव धाला दर्शनें[1] ॥ २ ॥
भाग्यें जाली सतभेटी । आवडी पोटीं होती ते ॥ ३ ॥
तुका म्हणे श्रम केला । अवघा आला फळासी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – दुणावला–दुप्पट झाला, धाला–सतुष्ट झाला

अर्थ – देशावर परमार्थलाभाचा व्यवहार फार चागला झाला त्याचे वाणीने वर्णन काय करावे ? १ मनुष्यदेहाचा लाभ झाल्यामुळे व सतदर्शनामुळे जीव सतुष्ट होऊन गेला २ मोठ्या भाग्याने माझी या सताची भेट झाली याच भेटीची माझ्या पोटात इच्छा होती ३ तुकाराम महाराज म्हणतात या भेटीसाठी जे जे श्रम केले ते सर्व फळास आले ४

८४७ सागता हे नये सुख । कोर्टी मुख न पुरे ॥ १ ॥
आवडीनें सेवन करू । जीवींचे धरू जीवींच ॥ २ ॥
उपमा या देता लाभा । काशा शोभा सारिखी ॥ ३ ॥
तुका म्हणे नुचलीं डोई । ठेविली पायीं सताचे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – काशा–कशासारखा, नुचलीं–उचलीत नाही

अर्थ – सताच्या सहवासाचे जे सुख झाले, त्याचे वर्णन करून सागता येण्यासारखे नाही त्याची कोणीही तोंडाने वर्णन करता यत नाही १ मोठ्या प्रीतीने त्याच्या सगतीचे सुख सेवन करू व आमच्या जीवातील जीव

१ दर्शने

जपून ठेवू. २ हा जो लाभ आम्हांला झाला आहे, त्याला उपमा द्यायला जावे तर तो कशासारखा आहे म्हणून सांगावे ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी या संतांच्या पायावर डोके ठेविले आहे, ते काही वर उचलत नाही. ४

८४८ आपुलाला लाहो करूं । केणें भरूं हा विठ्ठल ॥ १ ॥
भाग्य पावलों या ठाया । आतां काया कुरवंडी ॥ २ ॥
पुढती कोठें घडे ऐसें । बहुतां दिसें फावलें ॥ ३ ॥
तुका म्हणे जाली जोडी । चरण घडी न विसंबें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपाः– लाहो–लाभ, केणे–माल, जिन्नस.

अर्थ :– आता आपला आपण लाभ करून घेण्यासाठी हा विठ्ठलरूपी माल भरून ठेवू. १ माझे मोठे भाग्य म्हणूनच मी या स्थानास प्राप्त झालो आहे. आता मी माझा जीव याच्यावरून ओवाळून टाकीन. २ असा हा लाभ, यापुढे घडेल असे नाही. फार दिवसांनी या लाभाची प्राप्ती मला झालेली आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात श्रीहरीचा हा जो लाभ मला झाला आहे, तो स्मरून मी याचे चरण एक क्षणही सोडणार नाही. ४

८४९ उजळलें भाग्य आतां । अवघी चिंता वारली ॥ १ ॥
संतदर्शनें हा लाभ । पद्मनाभ जोडला ॥ २ ॥
संपुष्ट हा हृदयपेटी । करूनि पोटीं सांटवूं ॥ ३ ॥
तुका म्हणे होता ठेवा । तो या भावा सांपडला ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपाः–वारली–दूर झाली, संपुष्ट–देवाला ठेवण्याचे पात्र

अर्थः–आज माझे भाग्य किती उजळून आले आहे पाहा. या श्रीहरीच्या प्राप्तीमुळे माझी सर्व चिंता दूर झाली. १ संतांच्या दर्शनाने हा लाभ मला झाला, हा पद्मनाभ मला भेटला. २ याला आता माझ्या हृदयपेटीचे संपुष्ट करून मी जपून ठेवीन, साठवून ठेवीन. ३ तुकाराम महाराज म्हणतात, हा जो श्रेष्ठ प्रकारचा साठा होता, तो मला भक्तिभावामुळे सापडला आहे. ४

८५० आम्हां आपुलें नावडे संचित । चरफडे चित्त कळवळ्यानें ॥ १ ॥
न कळतां जाला खोळंब मारगा । जगीं जालों जगा बहुरूपी ॥ २ ॥
कळों आलें बरें उघडले डोळे । कर्णधार मिळे तरि बरें ॥ ३ ॥
तुका म्हणे व्हाल ऐकत करुणा । तरि नारायणा उडी घाला ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा –संचित–साठलेले कर्म

अर्थः– ईश्वरा, आम्हांला आमचे कर्म आवडत नाही. यासाठी रात्रंदिवस आमचे चित्त एकसारखे तळमळत असते. १ खरोखर या परमार्थमार्गाचे खरे मर्म न समजल्यामुळे आमचा खोळंबाच झाला असून या जगात लोकांच्या दृष्टीने मी नाना सोंगे आणणारा बहुरूपीच बनलो आहे. २ पण या सर्व गोष्टी आता मला समजून आल्या आहेत हे एक बरे झाले. आता माझे डोळे उघडले आहेत. आता या मार्गात एखादा मार्गदर्शक कर्णधार मिळेल तर बरे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, आमची करुणा तुम्हांस येत असेल तर, नारायणा, आमच्या सरक्षणासाठी उडी घ्या ना ४

८५१ बरगासाटीं खादलें शेण । मिळतां अन्न न संडी ॥ १ ॥
फजित तो केला लाहे । ताडण साहे गौरव ॥ २ ॥
ओढाळाची ओंगळ ओढी । जगीं खोडी नवजाय ॥ ३ ॥
तुका फजीत करी बुच्या[1] । विसरे कुच्या खोडी तेणें ॥ ४ ॥

---

१ बुका.

शब्दार्थ व टीपा :– वरगासाठीं–ज्वारी वगैरेसाठी, नवजाय–जाणार नाही, बुचा–निलाजरा, मूर्ख, कुच्या–ठोका, ठेम

अर्थ – ज्वारी वगैरे धान्य न मिळाल्याने कुणी दुष्काळामध्ये क्षीण झाले; पण त्याची त्याला एवढी चटक लागली की, पुढे अन्न मिळायला लागल्यानंतरही त्याने ते खायचे सोडले नाही. १ अशा माणसाची मार देऊन फजिती केली, तरी ती त्याला गौरवाचीच वाटते. २ ओढाळ जनावरास वाईटसाईट खाण्याची जी गोडी लागलेली असते, ती खोड काही त्याची सहजासहजी जात नाही. ३ अशा या निलाजऱ्या व मूर्ख माणसाची तुकाराम चांगलीच फजिती करीत असतो. चांगला मार बसल्यावर मग आपली खोड ते सोडतात. ४

८५२ धांव घालीं आई । आतां पाहातेसी काई ॥ १ ॥
धीर नाहीं माझे पोटीं । जालें वियोगें हिंपुटी ॥ २ ॥
करावें सीतळ । बहु जाली हळहळ ॥ ३ ॥
तुका म्हणे डोई । कधीं ठेवीन हे पायीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– हिंपुटी–कष्टी, उदास

अर्थ :– विठोबा माउली, आता माझ्या रक्षणासाठी तू धाव ना. आता तू कशासाठी थांबली आहेस? कशाची वाट पाहतेस? १ माझ्या पोटात आता कसलाच धीर नाही. मी तुझ्या वियोगाने फारच दुःखीकष्टी झालो आहे. २ आई, मला अतिशय ताप आला आहे, मला शांत कर ना. ३ देवा, मी आता अधीर झालो असून तुझ्या पायावर डोके कधी ठेवीन असे मला झाले आहे, असे तुकाराम महाराज म्हणतात. ४

८५३ तुम्हां ठावा होता देवा । माझे अंतरींचा हेवा ॥ १ ॥
होती काशानें सुटका । तरि हे वैकुंठनायका ॥ २ ॥
नसतें सांभाळिलें । जरि तुम्हीं आश्वासिलें ॥ ३ ॥
तुका म्हणे कृपाळुवा । बरवा केला सावाधावा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– हेवा–हाव, सावाधावा–साह्य करण्यासाठी धाव घेणे.

अर्थ :–देवा, माझ्या मनातील हाव कसली आहे याची माहिती तुम्हांस प्रथमपासूनच आहे. १ वैकुंठनायका, माझी सुटका या संसारपाशातून कशाने होईल हो? २ तुम्ही आश्वासन दिल्याप्रमाणे मला सांभाळले नसते तर मग काय झाले असते? ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तू फारच कृपाळू असून मला साह्य करण्यासाठी धाव घेतलीस हे फार चांगले केलेस. ४

८५४ देऊं ते उपमा । आवडीनें पुरुषोत्तमा ॥ १ ॥
पाहतां काशा तूं सारिखा । तिहीं लोकांच्या जनका ॥ २ ॥
आरुष हे वाणी । गोड करूनि घेतां कानीं ॥ ३ ॥
आवडीनें खेळे । तुका पुरवावे[1] सोहाळे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– आरुष–बोबडी, काशा–गवताचा एक प्रकार

अर्थ :–पुरुषोत्तमा, तुला जी उपमा आम्ही आवडीने देऊ ती शोभून दिसेल. १ एका बाजूस गवताच्या काशासारखाही तू आहेस, तर दुसऱ्या बाजूस तू तीनही लोकांचा जनक आहेस. २ देवा, माझी ही बोबडी वाणी तुम्ही चांगली कानांनी गोड करून ऐकता. ३ आवडीने खेळणाऱ्या या तुकारामाचे सर्व सोहाळे देवा, तुम्ही पुरवावेत ४

८५५ दर्शनाची आस । आतां न साहे उदास ॥ १ ॥
जीव आला पायांपाशीं । येथें असे कलिवरेंसीं ॥ २ ॥

---

१ पुरवावे.

कांहींच नाठवे । ठायीं बैसलें नुठवे ॥ ३ ॥
जीव असतां पाही । तुका ठकावला ठायीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– आस–इच्छा, कलिवरेंसी–शरीर तेवढे, नुठवे–न उठवे, उठवत नाही, ठकावला–फसला गेला.

अर्थ :– देवा, मला तुमच्या दर्शनाचीच तेवढी तीव्र इच्छा आहे. आता या बाबतीतील उदासीनता मला सहन होणार नाही. १ माझा सारा जीव देवा, तुमच्या पायाशी असून येथे शरीर तेवढे शिल्लक राहिलेले आहे. २ मला आता दुसरे काहीच आठवत नसून बसल्या जागेवरून उठवतही नाही. ३ देवा, तुमच्या चरणांवर मी माझा जीव वाहिलेला असतानासुद्धा मी असा फसवला जावा ना? ४

८५६ भोगावरि आम्हीं घातला पाषाण । मरणा मरण आणियेलें ॥ १ ॥
विश्व तूं व्यापक काय मी निराळा । काशासाठीं बळा येऊं आतां ॥ २ ॥
काय सारुनियां काढावें बाहेरी । आणूनि भीतरी काय ठेवूं ॥ ३ ॥
केला तरी उरे वादचि कोरडा । वळें घ्यावी पीडा स्वपनींची ॥ ४ ॥
अवघेचि याण आले तुम्हां घरा । मजुरी मजुरा रोज कोर्दी[1] ॥ ५ ॥
तुका म्हणे कांहीं नेणें लाभ हानी । असेल तो धनी राखो वाडा ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा :– याण–प्रकार, रोजकोर्द–रोजच्या जमाखर्चाची वही

अर्थ :– देहासंबंधी असणाऱ्या सुखदु:खादी भोगावर आम्ही पाषाण घालून ते जणू सर्व बंदच केले आहेत, आणि मरण देहाला व इंद्रियांच्या वृत्तींना असते हे जाणून मी आत्मतत्त्वाच्या जाणिवेमुळे अमर होऊन राहिलो. अशा प्रकारे मरणालाच मी मारून टाकले आहे. १ देवा, सर्व विश्वाला जर तू भरून राहिला असशील तर मी त्यातून निराळा कसा राहू शकेन? मग मी वेगळा मानून उगाच कोणत्या बळाने भांडण काढू? २ सर्वत्र तूच आत व बाहेर जर भरून राहिला असशील, तर मग मी आतून बाहेर तरी काय काढावे? व बाहेरून आत तरी काय ठेवावे? ३ याविषयी वादही किती जरी केला तरी तो कोरडाच राहतो. असे असल्याने देहादींची व इंद्रियांची दु:खे ही स्वप्नवत असल्याने ती घेण्याची किंवा खरी मानून कष्टी होण्याची यातायात मी का करावी? ४ देवा, सर्व प्रकार तुमच्या घरीच आले असताना, सर्व मजुरांची मजुरी रोजच्या जमाखर्चाच्या वहीस आहे. ५ तुकाराम महाराज म्हणतात, यात मी लाभहानी काही जाणणार नाही. या देहाचा जो कुणी धनी असेल तो हा देहाचा वाडा रक्षण करील. ६

८५७ कां हो एथें काळ आला आम्हां आड । तुम्हांपाशीं नाड करावया ॥ १ ॥
कां हो विचाराचें पडिलें सांकडें । काय ऐसें कोडें उपजलें ॥ २ ॥
कां हो उपजेना द्यावी ऐसी भेटी । काय द्वैत पोटीं धरिलें देवा ॥ ३ ॥
पाप फार किंवा जालासी दुर्बळ । मागिल तें बळ नाहीं आतां ॥ ४ ॥
काय जाले देणें[2] निघालें दिवाळें । कीं बांधलासि बळें ऋणेंपायीं ॥ ५ ॥
तुका म्हणे कां रे ऐसी केली गोवी । तुझी माझी ठेवी निवडुनियां ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा :–नाड–अडथळा, साकडें–संकट, कोडें–अडचण.

अर्थ :– देवा, तुमच्या व माझ्या भेटीत आड येणारा काळ का हो मध्येच आला? त्याने तुमच्याजवळ येऊन अडथळा का हो निर्माण केला? १ मला भेट देण्याविषयीच्या विचाराचे संकट तुम्हांस का पडले आहे? अशी कोणती अडचण निर्माण झाली आहे की, तुम्ही भेट देण्याचा विचार रहित केला? २ देवा, मला भेट द्यावी अशी भावना

१ कीर्दी, २ नेणे

तुमच्या अंतःकरणात का हो निर्माण होत नाही ? तुमच्या-माझ्यामधील द्वैताची, वेगळेपणाची भावना तुम्ही अजून कायम धरली आहे काय ? ३ मला भेट देण्याचे तुम्ही टाळता, याचे कारण देवा, आमचे पाप फार बलवत्तर आहे, का ? किंवा तूच दुर्बळ झालास की काय रे ? तुझ्या अंगी आता पापी लोकांचा उद्धार करण्याचे बळ पूर्वीसारखे उरलेले नाही काय ? ४ किंवा देवा, तुला इतराचे देणे फार झाले की काय ? तुझेही दिवाळे निघाले ? की कुणाच्या ऋणात तू जखडून राहिला आहेस ? ५ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, अशी गुंतवणूक करून का ठेवितो आहेस ? तुझ्या व माझ्या संबंधाचे स्वरूप स्पष्टपणे ठरीव ना देवा ६

विवरण –वारंवार प्रार्थना करून, स्तुती करून, आर्त भावनेने करुणा भाकूनही देव आपल्यावर का कृपा करीत नाही ? या एका प्रश्नाच्या पोटी थोर भक्ताच्या मनात जे जे विकल्प सहजासहजी येतात, त्यातील काही या अभंगात आहेत तुझ्यामाझ्या मार्गात काळ आडवा आला काय ? विचाराचे भेट द्यावी अथवा न द्यावी या सारख्या विचाराचे संकट निर्माण झाले काय ? का भेट न देण्याविषयीचे द्वैत पोटात निर्माण झाले ? आमचे पाप फार झाले ? की देवा, तुझी पापमोचनाची शक्तीच कमी झाली ? तुझ्याही शक्तीचे दिवाळे निघाले की काय ? की कुणाच्या ऋणात जखडून गेला असल्यामुळे आमच्यासारख्याच्या वाटचास येत नाहीस ? असासारखे अनेक संशय भक्ताच्या मनात येतात त्याचा उच्चार तुकारामबुवानी येथे केलेला आहे मोरोपंताची 'संशयरत्नमाला' प्रसिद्ध असून तिच्यातही लडिवाळ भक्ताच्या मनातील संशयावद्दलचा आविष्कार फार चांगल्या प्रकारे झाला आहे भक्ताने वारंवार करुणा भाकावी, दीन वाणीने प्रार्थना करावी, नाना तर्क करावेत, शंकाकुशंका काढाव्यात, देवाशी प्रेमाने भांडण करावे व मग देवाने कृपा करावी, यामधील सुकुमारता व भक्तीची, जिव्हाळ्याची वृत्ती अधिक संतोषदायी आहे देवा, मला भेट, म्हटल्यावरोबर देव भेटल्यास त्या भेटीमधील आनंद व तळमळ केल्यावर, हट्ट केल्यावर भेटल्यानंतरचा आनंद, यात फरक असणारच लेकराने रागवावे, रुसावे, नाना शंका घ्याव्यात व आईने मग त्याची समजूत काढावी, यात सर्व आले

८५८ काय देह घालू करवती कमरी । टाकू या भितरी अग्नीमाजी ॥ १ ॥
काय सेवू वन शीत उष्ण ताण । साहो कीं मोहन[1] धरुनी बैसो ॥ २ ॥
काय लावू अंगीं भस्म उधळण । हिंडू देश कोण खुंट चारी ॥ ३ ॥
काय त्यजू अन्न करूनि उपास । काय करू नास जीवित्वाचा ॥ ४ ॥
तुका म्हणे काय करावा उपाव । ऐसा देईं भाव पांडुरंगा ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – करवती-शस्त्र, मोहन–मौन, चार खुंट–चार धाम

अर्थ – देवा, मी तुमच्या भेटीसाठी करावे तरी काय हो ? काय माझ्या देहावर शस्त्र चालवून त्याला कापून काढू ? की त्याला अग्नीमध्ये टाकून देऊन भाजून काढू ? १ की एखाद्या रानावनात जाऊन शीत, उष्ण, तहान याचा त्रास सहन करू ? का मौन धारण करून तेथे स्वस्थपणे बसून राहू ? २ की अंगावर भस्माची उधळण करून वैरागी-गोसावी बनू ? चार खुंट फिरून कोणत्या देशाची वारी करू रे देवा, तुझ्यासाठी ? चार धामाची यात्रा करू तुझ्या प्राप्तीसाठी ? ३ अन्न सोडून देऊन देवा मी उपास करू का ? की माझ्या जिवितांचा नाश करून टाकू ? ४ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, मला सांग ना एखादा उपाय तुमच्या प्राप्तीचा याविषयी तुम्हीच मला आता एखाद्या भावभक्तीचा मार्ग दाखवा ना ५

८५९ दंभें कीर्ति पोट भरे मानी जन । स्वहित कारण नव्हे काहीं ॥ १ ॥
अंतरतो तुझे पाय मज दुरी । धरिता हे थोरी जाणिवेची ॥ २ ॥
पिंडाच्या पाळणें धावती विकार । मज दावेदार मजमाजी ॥ ३ ॥

---

१ मौन

कैसा करूं घात आपुला आपण । धरूनि गुमान लोकलाज ॥ ४ ॥
तुका म्हणे मज दावी तो सोहळा । देखें पाय डोळां तुझे देवा ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपाः–पिंडाच्या–शरीराच्या, गुमान–पर्वा, फिकीर

अर्थ :– ढोंग करून परमार्थ केल्यास, भक्तीचा डौल मिरविल्यास पोट भरते. लोकांत मानमान्यताही मिळते. पण त्याच्यामुळे स्वतःचे मात्र कसलेही हित होत नाही. १ मी मोठा ज्ञानी व शहाणा या ज्ञानाच्या जाणिवेने देवा, तुझे पाय मात्र अंतरतात २ आणि केवळ देहाचेच पालनपोषण केल्याने कामक्रोधादी वृत्ती बळावतात, व माझ्यात असलेले माझे हे शत्रू माझे दावेदार बनतात ३ लोकाची पर्वा न करता मी माझा घात कसा करून घेऊ ? ४ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तुझे पाय मी पाहिले आहेत, असा सोहळा मला दाखवा ना. ५

८६० धिग जिणें त्याचा स्वामी हीन वर । मरण तें वर[१] भलें मग ॥ १ ॥
आइका जी देवा ऐसी आहे नीत । काय तें उचित सांभाळावें ॥ २ ॥
देशोदेशीं धाक जयाच्या उत्तरें । तयाचें कुतरें परि भलें ॥ ३ ॥
तुका म्हणे हें कां सुचलें उत्तर । जाणोनि अंतर ओळखावें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा –वर–चांगले

अर्थ :– ज्याचा मालक वाईट आहे, त्याच्या जिण्याला धिक्कार असो. मग त्यापेक्षा मरण कितीतरी चांगले समजावे की. १ देवा, नीट ऐका; अशी ही एकंदर नीती आहे; म्हणून जे योग्य व उचित असेल त्यांचा सांभाळ तुम्ही करावा. २ ज्याचा शब्दाचा दरारा सर्व देशातून आहे, त्याचा कुत्राही होणेही बरे, फार चांगले वाटते, ३ देवा, अशा प्रकारच्या कडक शब्दांचे उत्तर मी तुम्हास का देत आहे, याचा विचार तुम्ही माझे अंतःकरण जाणून करावा ना एकदा ४

८६१ आतां गाऊं तुज ओविया मंगळी । करूं गदारोळी हरिकथा ॥ १ ॥
होसि निवारिता आमुचें सकळ । भय तळमळ पापपुण्य ॥ २ ॥
भोगिले ते भोग लावूं तुझे अंगीं । अलिप्त या जगीं होउनि राहों ॥ ३ ॥
तुका म्हणे आम्ही लाडिकीं लेंकरें । न राहों अंतरें पायांविण ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा –मंगळी–पवित्र, मंगलदायक, गदारोळी–आग्रहाने, गर्जना करून

अर्थ :– देवा, आता तुला मंगलदायक ओव्या गाऊन तुझी आम्ही स्तुती करू. या हरिकीर्तनाची एकच गर्जना सर्वत्र करून देऊ. १ आमच्यावर जी जी संकटे येतील त्याचे निवारण देवा, तूच करणारा होशील. भय, तळमळ, पापपुण्य यांना दूर करण्याचे कार्य तूच देवा करशील. २ आम्ही आजपर्यंत जे जे भोग घेतले, ते ते सर्व तुझ्या अंगी लावून आम्ही या जगात अलिप्त होऊन राहू भोगणारा केवळ तूच आहेस, या जाणिवेने आमचेकडे कर्तृत्व काही नाही असे समजू ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, आम्ही सर्व लेकरे तुझी फारच लाडकी आहोत रे. तुझे पाय सोडून आता आम्ही दुसरीकडे कुठेही राहणार नाही. ४

८६२ सर्व सुखें आजी एथेंचि वोळलीं । संतांचीं देखिलीं चरणांबुजें ॥ १ ॥
सर्वकाळ होतों आठवीत मनीं । फिटली ते धणी येणें काळें ॥ २ ॥
तुका म्हणे वाचा राहिली कुंटित । पुढें जालें चित्त समाधान ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा – वोळली–प्राप्त झाली, चरणांबुजें–चरणकमले, धणी–तृप्ती.

---

१ बरें.

अर्थ :–आज सर्व सुखांची प्राप्ती मला येथेच झाली आहे. कारण येथे संतांचे चरणकमल मी पाहिले आहेत. १ याच पावलांची इच्छा मी माझ्या मनात सदासर्वकाळ करीत होतो. आज मात्र माझी इच्छा तृप्त झाली. २ तुकाराम महाराज म्हणतात, आता मात्र माझी वाणी काही बोलू शकत नसून ती कुंठित झाली आहे; व माझ्या चित्तात पूर्ण समाधान प्राप्त झाले आहे. ३

८६३ विठ्ठल सोयरा सज्जन सांगाती । विठ्ठल या चित्तीं बैसलासे ॥ १ ॥
विठ्ठलें हें अंग व्यापिली ते काया । विठ्ठल हे छाया माझी मज ॥ २ ॥
बैसला विठ्ठल जिव्हेचिया माथां । न वदे अन्यथा आन दुजें ॥ ३ ॥
सकळां इंद्रियां मन एक प्रधान । तें ही करी ध्यान विठोबाचें ॥ ४ ॥
तुका म्हणे या विठ्ठलासी आतां । नये विसंबतां माझें मज ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा.– काया-शरीर, आन–दुसरे

अर्थ :– हा विठ्ठल आता माझा अत्यंत आवडता असा सज्जन सोयरा झाला असून माझ्या चित्तात त्याचेच स्थान दृढ झाले आहे. १ या विठ्ठलरूपानेच माझे सर्व शरीर व्यापून गेलेले असून माझी छायाही त्यामुळे विठ्ठल-रूपाचीच बनलेली आहे. २ माझ्या जिव्हेच्या अग्रावर विठ्ठलच बसला असून, तो त्याच्यावाचून दुसऱ्या कुणाचे नावही घेत नाही. ३ सर्व इंद्रियात मन हे प्रमुख इंद्रिय असून, तेही याच विठ्ठलाचे ध्यान करू लागले आहे ४ तुकाराम महाराज म्हणतात, आता या विठ्ठलास मला क्षणभरही विसरता येणार नाही. ५

८६४ होय[1] वारकरी । पाहें पाहे रे पंढरी ॥ १ ॥
काय करावीं साधनें । फळ अवघेंचि तेणें ॥ २ ॥
अभिमान नुरे । कोड अवघेंचि पुरे ॥ ३ ॥
तुका म्हणे डोळां । विठो बैसला सांवळा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– नुरे–उरत नाही, कोड–इच्छा.

अर्थ –अरे मनुष्या, तू पंढरपूरचा वारकरी हो ना. एकदा तरी पंढरपूर येथे जाऊन त्या विठ्ठलास डोळे भरून पाहा ना १ इतर साधनांचा काय उपयोग? सर्व फळ याच एका दर्शनाने मिळते २ याच्या भेटीमुळे मनात अभिमान उरत नाही व मनातील सर्व इच्छा मात्र तृप्त होतात ३ तुकाराम महाराज म्हणतात, हा सावळा विठ्ठल माझ्या डोळ्यात निवास करून राहिला आहे ४

८६५ पंढरीसी जाय । तो विसरे बापमाय ॥ १ ॥
अवघा होय पांडुरंग । राहे धरूनियां अंग ॥ २ ॥
न लगे धन मान । देहभावे उदासीन ॥ ३ ॥
तुका म्हणे मळ । नासी[2] तात्काळ तें स्थळ ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– नासी–नाश होतो

अर्थ .– जो पंढरपूरला मनोभावे जातो, तो देवाच्या दर्शनाने इतका भारावला जातो की आपल्या आई-बापासही विसरून जातो. १ तो सर्वांगानी पांडुरंगच बनलेला असून केवळ अंग धरून राहिलेला असतो. २ त्याला धनाची वा मानाची मुळीच इच्छा नसते. स्वतःच्या देहाविषयीही तो उदासीन बनलेला असतो. ३ या पंढरीच्या वास्तव्यामुळे मनात विकारादिकाचा जो मळ असतो त्याचा संपूर्ण नाश होत असतो. ४

---

१ होय होय, २ नाही.

८६६ बळें बाह्यात्कारें संपादिलें सोंग । नाहीं जाला त्याग अंतरींचा ॥ १ ॥
ऐसें येतें नित्य माझ्या अनुभवा । मनासी हा ठावा समाचार ॥ २ ॥
जागृतीचा नाहीं अनुभव स्वप्नीं । जातो विसरुनि सकळ हे ॥ ३ ॥
प्रपंचाबाहेरि नाहीं आलें चित्त । केले करी नित्य वेवसाय ॥ ४ ॥
तुका म्हणे मज भोरप्याचि परी । जालें सोंग वरी आंत तैसें ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– वेवसाय–उद्योग, व्यवसाय, भोरप्याचि परी–बहुरूप्याप्रमाणे.

अर्थ – साधुत्वाच्या बळानेच बाह्यात्काराने सोंग संपादन केले; पण अंतरंगातून मात्र इंद्रियसुखाचा त्याग झाला नाही १ असे माझ्या अनुभवास नित्य येत असते व यासंबंधीचा खरा विचार काय आहे, याचीही जाणीव माझ्या मनास नेहमीच असते २ जो अनुभव जागेपणीचा असतो, तो कधी स्वप्नामध्ये दिसत नाही. यावेळी मी सर्व काही विसरून जातो ३ माझे चित्त खरोखर या प्रपंचातून बाहेर आलेलेच नाही. मागचेच सर्व उद्योग ते पुन: एकसारखे करीत असते ४ तुकाराम महाराज म्हणतात, माझी अवस्था निरनिराळी सोंगे घेणाऱ्या बहुरूप्याप्रमाणे झालेली आहे. वरवर पुष्कळ सोंगे वेळोवेळी केली तरी आत मी जसाचा तसाच शिल्लक असतो. ५

८६७ म्हणवितो दास ते नाहीं करणी । आत वरी दोन्ही भिन्न भाव ॥ १ ॥
गातो नाचतों तें दाखवितो जना । प्रेम नारायणा नाहीं अंगी ॥ २ ॥
पाविजे तें वर्म न कळेचि कांहीं । बुडालों या डोहीं दंभाचिया ॥ ३ ॥
भांडवल काळें हातोहातीं नेलें । माप या लागलें आयुष्यासी ॥ ४ ॥
तुका म्हणे वांयां गेलो ऐसा दिसे । होईल या हांसें लौकिकाचें ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – करणी–कृत्य, वर्म–रहस्य

अर्थ – मी स्वत:स ईश्वराचा दास म्हणवून घेतो; पण माझ्या हातून तशी कृत्ये मात्र होत नाहीत कधी. माझ्या अंतरंगातील व बाहेरचा भाव वेगवेगळाच दिसतो १ मी प्रेमाने हरीचे गुण गातो त्याच्यासाठी नाचतोही; पण ते सर्व लोकांना दाखविण्यासाठी आहे. माझ्या अंत:करणात ईश्वराविषयी प्रेम हटकून आहेच असे मात्र नाही. २ ईश्वरस्वरूपाच्या रहस्याचे ज्ञान जे मला हवे आहे, ते काही अजून मिळालेले नाही या ढोंगाच्या डोहातच मी पूर्णपणे बुडून जात आहे ३ माझ्या आयुष्याचे जे भांडवल होते ते मात्र काळाने हातोहात संपवीत आणले आहे. या माझ्या आयुष्यास माप लागले असल्याने ते उतरणीस लागले आहे ४ तुकाराम महाराज म्हणतात, मी तर या माणसाच्या जन्मास येऊन वायाच गेलो आहे असे दिसते माझ्या सर्व लौकिक संसाराचे हसेच होईल असे दिसते ५

विवरण –वरील दोन अभंगात भक्तश्रेष्ठ तुकोबांनी आपल्या मनाची दुर्बलता स्पष्टपणे मांडलेली आहे तुकारामबुवा एवढे साधू, एवढे विठ्ठलभजनात रंगलेले,एवढे परोपकारी, पण त्याचेही मन त्यांना किती खात असावे हे या अभंगातून ध्यानात येते आपण हे साधुत्वाचे बाह्यात्कारी सोंग घेऊन लोकांच्या मनाची फसवणूक तर करीत नाही ना? अशी शंका त्यांच्या मनास चाटून गेलेली आहे आपले मन प्रपंचातून संपूर्णपणे निघालेले नाही, जागृती व स्वप्नी एकच ईश्वरभाव अजून आपल्यात निर्माण झालेला नाही, आपण बहुरूप्याप्रमाणे वरवर सोंगधारीच आहोत की काय ? आपले गाणे व आपले नाचणे हे केवळ वरवरचे तर नव्हे ? आपल्या अंत:करणात ईश्वराविषयी दृढ प्रेम किती आहे ? आपले आयुष्य काळाच्या मानाने हातोहात कमी तर होत नाही ना ? अशा एकसारख्या शंका त्यांना येत असून ते अत्यंत जागृकतेने आपले चित्त सदैव श्रीहरीच्या चरणी जडून राहील अशा विवंचनेत असतात. स्वत:चे हे जे कठोर आत्मनिरीक्षण तुकोबांनी केले आहे, त्यावरून वस्तुस्थितीच तशी होती असे मानण्याचे कारण नाही.

आपल्या मनात नारायणाविषयी प्रेम नाही व आपण अजून संसारापासून मुक्त झालो नाही, असे जेव्हा तुकाबा म्हणतात, तेव्हा त्यांच्या म्हणण्यापाठीमागची भूमिका समजावून घ्यावयास हवी आपण जास्तीत जास्त निर्विकार व्हाव, जास्तीत जास्त पूर्णत्वाने श्रीहरीशी एकरूप व्हाव, जास्तीत जास्त आपले चित्त निर्लेप व निर्मळ असावे, हा त्यामागचा उद्देश आहे थोर थोर लोकांचेही मन कसे चळते व मग सव आयुष्याचा नाश कसा होतो हे बुवांना चांगलेच माहीत होते म्हणूनच त्यांनी आपल्या मनास नित्य वैराग्याचा विवेकाचा, आत्मपरीक्षणाचा कठोर अंकुश लावून घेतलेला दिसतो व या आत्मपरीक्षेतूनच त्यांना सदैव जागृती येत राहिली हे स्पष्टच आहे त्यांनीच एके ठिकाणी म्हटले आहे ' तुका म्हणे मना पाहिजे अंकुश । नित्य नवा दिस जागृतीचा ॥ '

८६८ न कळता काय करावा उपाय । जेणें राहे भाव तुझ्या पायीं ॥ १ ॥
येउनिया वास करिसी हृदयीं । ऐसे घडे कइं कासयाने ॥ २ ॥
साच भावे तुझें चिंतन मानसीं । राहे हे करिसी कं गा देवा ॥ ३ ॥
लटिके हे माझें करूनिया दुरी । साच तू अंतरीं येउनि राहे ॥ ४ ॥
तुका म्हणे मज राखावे पतिता । आपुलिया सत्ता पांडुरंगा ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – साच–खऱ्या

अर्थ – देवा, माझ्या अंतःकरणातील प्रेमभाव सतत तुझ्या पायावर स्थिर व्हावा, अशासाठी मी काय उपाय करावा ? हे काही समजत नाही १ देवा तू माझ्या हृदयात येऊन निवास करशील अशी गोष्ट कशाने घडे होईल ? २ खऱ्या भावनेने तुझेच चिंतन घडेल व तेच मनात स्थिर राहील असे कधी होईल रे ? ३ देवा, माझ्यात जे जे खोटे असेल ते दूर व्हावे व तूच खऱ्या स्वरूपात माझ्या अंतःकरणात दृढ व्हावास ४ देवा पांडुरंगा, तुकाराम महाराज म्हणतात, मला या पतिताला तू आपल्या सत्तेने सांभाळावेस ५

८६९ चिंतिलें तें मनिचें जाणे । पुरवी खुणे अंतरीचें ॥ १ ॥
रात्री न कळे दिवस न कळे । अंगीं खेळे दैवत हे ॥ २ ॥
नवसियाचे नव[1] रस । भोगी त्यास भिन्न नाहीं ॥ ३ ॥
तुका म्हणे समचि देणें । समचरण उभा असे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा –सम–एकसारखे स्वरूप

अर्थ – हा देव कसा आहे ? मनामध्ये जी जी इच्छा भक्त धारण करतो ती ती तो मोठ्या प्रेमाने पूर्ण करतो १ त्याला रात्र झालेलीही समजत नाही, दिवस झालेलाही ध्यानात येत नाही पांडुरंग दैवत हे त्याच्या अंतरंगात व शरीरात एकसारखे खेळत असते २ या देवाची प्राप्ती व्हावी म्हणून जे जे भक्त नवस करतात, ते ते हा पूर्ण करतो जो यास स्मरून भोग भोगीत असतो त्याला तो भिन्न वाटत नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, सर्व भक्तांना आपल्या एकसारख्या स्वरूपाची प्राप्ती करून देणारा हा विठ्ठल समचरणानी विटेवर उभा आहे ४

८७० उद्धाराचा[2] संदेह नाहीं । याचा काहीं सेवका ॥ १ ॥
पांडुरंग अभिमानी । जीवदानी कोंवसा ॥ २ ॥
बुडतां जळीं जळतां अंगी । ते प्रसंगीं राखावे ॥ ३ ॥
तुका म्हणे आम्हांसाटीं । कृपा पोटीं वागवी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – संदेह–शंका, कोंवसा–आश्रय, आधार

अर्थ – हा देव आपला उद्धार करील की नाही, अशी शंका कधी याच्या सेवकाच्या मनात येत नाही १ हा पांडुरंग आपल्या भक्ताविषयी अभिमानी असून त्यांच्या जीवदानाचा एकमेव आधारच आहे २ पाण्यात

१ पुरवी नवस २ उद्धारीचा

बुडण्याच्या प्रसंगी किंवा अग्नीत जळण्याच्या प्रसंगी हा ईश्वर आपल्या भक्तांचे नेहमीच रक्षण करतो. ३ तुकाराम महाराज म्हणतात, हा देव आमच्यासाठीही आपल्या अंतःकरणात निरंतर दया वागवीत असतो. ४

८७१ काय विरक्ति कळे आम्हां । जाणों एका नामा विठोबाच्या ॥ १ ॥
नाचों सुखें वैष्णवमेळीं । टाळघोळीं आनंदें ॥ २ ॥
शांति क्षमा दया मी काय जाणें । गोविंद कीर्तनेंवांचूनियां ॥ ३ ॥
कासया उदास असों देहावरी । अमृतसागरीं बुडोनियां ॥ ४ ॥
कासया एकांत सेवूं तया वना । आनंद तो जनामाजी असे ॥ ५ ॥
तुका म्हणे आम्हां ऐसा भरवसा । विठ्ठल सरसा चालतसे ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – वैष्णवमेळीं–विठ्ठलभक्ताच्या मेळाव्यात, घोळ–वीणा, सरसा–बरोबर

अर्थ :– वैराग्याची थोरवी आम्हांस कुठून कळणार? आम्ही त्या विठोबाचे एक नाममात्र जाणीत असतो. १ मोठ्या सुखाने व आनंदाने आम्ही विठ्ठलभक्तांच्या मेळाव्यात नाचत असतो. टाळ व घोळ यांच्या नादांत आम्ही तल्लीन होत असतो. २ शांती, क्षमा, दया यांचे महत्त्व आम्ही काय जाणावे? या पांडुरंगाच्या, गोविंदाच्या कीर्तनात हे सर्व काही येते. गुणकीर्तनावाचून दुसरे काहीही आम्ही जाणीत नाही. ३ नामामृताच्या सागरात बुडी दिल्यानंतर देहावर उदास होऊन काय उपयोग? ४ या लोकातच एवढा आनंद भरलेला असताना मी रानावनात जाऊन उगीच शीण कशास वाढवून घेऊ? ५ तुकाराम महाराज म्हणतात, आम्हांस आता कसलीच भीती नाही. कारण हा श्रीविठ्ठल आमच्याबरोबर आहे, असा विश्वास आम्हांस नेहमीच वाटत आलेला आहे. ६

८७२ जेथें वैष्णवांचा वास । धन्य भूमी पुण्य देश ॥ १ ॥
दोष नाहीं ओखदासी । दूत सांगे[1] यमापाशीं ॥ २ ॥
गरुडटक्यांच्या भारें । भूमि गर्जे जयजयकारें ॥ ३ ॥
सहज तयां जनां छंद । वाचे गोविंद गोविंद ॥ ४ ॥
तुळसीवनें रंगमाळा । अवघा वैकुंठसोहळा ॥ ५ ॥
तुका म्हणे भेणें । काळ नये तेणें राणें ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा :– ओखदासी–औषधासमुद्धा, भेणें–भयाने

अर्थ :– ज्या स्थानावर विठ्ठलभक्तांचा निवास असतो, ती भूमी व तो देश पुण्यवान आहे असेच समजावे १ या ठिकाणी औषधालासुद्धा दोष दिसणार नाही, असे यमाचे दूत यमास सांगत असतात. २ गरुडाचे निशाण ज्यांच्या खांद्यावर आहे अशा वैष्णवांच्या समुदायाने व नामकीर्तनाने सर्वत्र या विठ्ठलाचाच जयजयकार होत असतो. ३ येथील लोकांच्या वाणीस गोविंद गोविंद–विठ्ठल विठ्ठल म्हणण्याचा सहजच छंद असतो ४ या ठिकाणी तुळशीची वने असून नाना प्रकारच्या रांगोळ्या काढलेल्या असतात. येथील सर्व सोहळा वैकुंठाप्रमाणेच असतो. ५ तुकाराम महाराज म्हणतात, भीतीने काळ या बाजूस फिरकतसुद्धा नाही. ६

८७३ माझ्या विठोबाचा कैसा प्रेमभाव । आपणचि देव होय गुरु ॥ १ ॥
पढियें देहभावें पुरवितो वासना । अंतीं तें आपणापाशीं न्यावें ॥ २ ॥
मागें पुढें उभा राहे सांभाळीत । आलिया आघात निवारावे ॥ ३ ॥
योगक्षेम त्याचें जाणे जडभारी । वाट दावी करीं धरूनियां ॥ ४ ॥
तुका म्हणे नाहीं विश्वास ज्या मनीं । पाहावें पुराणीं विचारूनी ॥ ५ ॥

१ सागती.

शब्दार्थ व टीपा – पडिये–आवडत, आपात–सकट, जड–सकट

अर्थ – या माझ्या विठोबाचा प्रेमभाव कसा आहे म्हणून सागू ? तोच माझा देव व तोच माझा गुरू झालेला आहे १ भक्ताना जे जे आवडते, प्रिय आहे ते ते किंवा ती ती इच्छा हा देव पुरवितो आणि शेवटी आपणापाशी घेऊन येतो त्याना २ आपल्या प्रिय भक्ताच्या मागेपुढे उभा राहून हा त्याचा साभाळ करीत असतो येईल त्या सकटाचे निवारण करीत असतो ३ आपल्या भक्ताचे मोठे सकट जाणून त्याचे रक्षण करून त्याचा हा देव नीट योगक्षेमही चालवितो हाताला धरून या भक्तिमार्गाची वाट तो दाखवीत असतो ४ तुकाराम महाराज म्हणतात, माझ्या या वचनावर ज्याचा विश्वास नाही, त्यानी पुराणातील अनेक दाखल्याचा विचार करावा ५

विवरण – ईश्वर आपल्या भक्ताची काळजी कशी करतो, त्याचे सकट कसे निवारण करतो, त्याचा योगक्षेम कसा चालवितो, याबद्दल तुकारामबुवानी अनेक अभगातून फार कोवळीकतने दिग्दर्शन केले आहे. स्वत चे अनुभवही सागितले आहेत या एक फार गोड व तत्त्वस्पर्शी अभगात बुवा अगदी साध्या भाषेत आपल्या विठोबाच्या प्रेमभावाचे वर्णन करीत आहेत आपल्या भक्ताची जी जी इच्छा असत, ती ती हा पूर्ण करीत असतो आपल्या लाडक्या भक्ताच्या मागेपुढे उभे राहून हा त्याच रक्षण करीत असतो हातात धरून तो भक्ताना परमार्थमार्गाची किंवा स्वरूपाची वाट दाखवीत असतो, आणि हा सव भाव पुराणातूनही व्यक्त झालेला आहे, असे बुवा आत्मविश्वासाने सागत आहेत

८७४ सकळ धर्म मज विठोबाचे नाम । आणीक ते वर्म नेणें काहीं ॥ १ ॥
काय जाणो सता निरविलें देवे । करिती या भावे कृपा मज ॥ २ ॥
तुका म्हणे माझा कोण अधिकार । तो मज विचार कळो यावा ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा – निरविले–सोपविले.

अर्थ – या विठोबाच्या एका नामोच्चारात मला सर्व धर्म घडतात याखेरीज दुसरे कुठलेही वर्म मी जाणीत नाही १ या सतानी मजवर कृपा करावी म्हणूनच देवाने मला त्याच्यावर सोपविले की काय न जाणे २ तुकाराम महाराज म्हणतात, नाही तर असा माझा काय अधिकार आहे, की हा भक्तिज्ञानाचा विचार मला पूर्णपणे समजून यावा ? ३

८७५ उदड शाहाणे होत तर्कवत । परि या नेणवे अत विठोबाचा ॥ १ ॥
उदडा अक्षरा करीत भरोवरी । परि ते नेणवे थोरी विठोबाची ॥ २ ॥
तुका म्हणे नाहीं भोळेपणाविण । जाणीव ते सिण रितें माप ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा – उदड–पुष्कळ, भरोवरी–श्रम, सायास, सिण–त्रास

अर्थ – नाना प्रकारचे तर्क करणारे शहाणे पुष्कळच आहेत पण त्यांना या विठ्ठलाच्या स्वरूपाचा अत काही लागणार नाही १ अक्षरे घोकून पाठातर करणारे व अभ्यासाचा त्रास घेणारेही पुष्कळ आहेत, पण त्याना काही विठ्ठलाची थोरवी समजून येत नाही २ तुकाराम महाराज म्हणतात, या विठ्ठलाचा लाभ भोळेपणाशिवाय होणार नाही ज्ञानाची जाणीव ही त्रास देणारीच वाटते कारण ज्ञानाच्या या मापाने या थोर विठ्ठलाला मापताच येणार नाही ज्ञानाचे माप कितीही मोठे असले तरी ते रितेच असते ३

८७६ आधारावाचुनी । काय सागसी काहाणी ॥ १
ठावा नाहीं पढरीराव । तोंवरी अवघेंचि वाव ॥ २ ॥
मानिताहे कोण । तुझें कोरडें ब्रह्मज्ञान ॥ ३ ॥
तुका म्हणे ठेवा । जाणपण एक सवा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – वाव–व्यर्थ, एक सवा–एकाबाजूला

अर्थ – शास्त्रपुराणांतील किंवा साधुसंताच्या वचनावाचून तू ज्ञानाची कसली कहाणी सांगतोस ? १ जोपर्यंत तुला हा पंढरीचा राणा माहीत झालेला नाही, तोपर्यंत तुझे हे ज्ञानसंपादन सर्वत्र व्यर्थ आहे २ तुझे हे कोरडे ब्रह्मज्ञान कोण मानायला तयार होईल ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, अहो पंडित लोकहो, तुम्ही तुमच्या जाणिवेचा ठेवा एका बाजूलाच ठेवून द्या ४

८७७ अनाथाची तुम्हा दया । पंढरीराया येतसे ॥ १ ॥
ऐसी ऐकोनिया कीर्ति । बहु विश्रांति पावलों ॥ २
अनाथाच्या धावा घरा । नामें करा कुडावा ॥ ३ ॥
तुका म्हणे सवघड हित । ठेवू चित्त पायायें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – कुडावा–रक्षण, सवघड–उघड असलेले

अर्थ –पंढरीराया, जे अनाथ असतात, त्यांची दया तुम्हास नेहमीच येत असते १ अशी तुमची कीर्ती ऐकून माझ्या मनास फारच समाधान लाभले आहे २ देवा, तुम्ही अनाथाचे रक्षण करण्यासाठी त्यांच्या घरी धावून जाता व तुमच्या नामाच्या साहाय्याने त्यांचे रक्षण करता ३ तुकाराम महाराज म्हणतात, माझे हे उघड असणारे चित्त मी तुमच्या पायावर ठेवीत आहे ४

८७८ येथें नाहीं उरो आले अवतार । येर ते पामर जीव किती ॥ १ ॥
विपयाचे झणी व्हाल लोलिंगत । चेवलिया अंत न लगे मज ॥ २ ॥
वाहोनिया भार कुथसील ओझें । तेंचि माझें थीता त्याग ॥ ३ ॥
तुका म्हणे फंसी नाही त्याची लाज । संतीं केशीराज साधियेला ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – लोलंगित–आसक्त

अर्थ – मत्स्य, कूर्म इत्यादी अवतारही जेथे उरले नाहीत, तेथे मजसारख्या सामान्य माणसाची व गरीब पामराची काय कथा आहे ? १ इंद्रियांच्या विषयांशी जर आसक्त व्हाल तर ती इंद्रिये एकदा चेतवली गेली की मग त्यांचा अंत लागेनासा होतो २ या इंद्रियसुखाचे ओझे डोक्यावर वागवीत बसला व मग विनाकारण कुथाल तर मात्र माझ्या भावाचा त्याग करावा लागेल ३ तुकाराम महाराज म्हणतात, संतानी या विठ्ठलाला मिळवून घेतला आहे, याची लाज तुम्हास कुणास कशी नाही ? ४

८७९ हींच त्याचीं पंचभूतें । जीवन भातें प्रेमाचें ॥ १ ॥
कळवळा धरिला संतीं । ते निगुती कैवाड ॥ २ ॥
हाच काळ वर्तमान । साधन ही संपत्ती ॥ ३ ॥
तुका म्हणे दिवसराती । हेचि खाती अन्न तें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – भातें–अन्न, निगुती–खरोखर, कैवाड–स्वीकार

अर्थ – या विठ्ठलाविषयी प्रेम हेच या भक्तांचे मुख्य जीवनदायी अन्न व पंचभूतात्मक शरीर आहे १ या संतानीच या श्रीहरीविषयी चित्तात कळवळा धारण करून खरोखर त्याचा स्वीकार केलेला आहे २ या हरीविषयी त्यांना वाटणारे हे प्रेम हेच त्यांचा वर्तमानकाळ असून सर्व साधनसंपत्तीही याच स्वरूपाची आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, रात्रंदिवस हे हरिभक्त हेच प्रेमाचे अन्न सेवन करीत असतात ४

८८० दीप न देखे अंधारा । आता हेचि करा जतन ॥ १ ॥
नारायण नारायण । गांठी धन बळकट ॥ २ ॥
चिंतामणीपाशीं चिंता । तत्त्वता ही नयेल ॥ ३ ॥
तुका म्हणे उभयलोकीं । हेचि निकी सामग्री ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– गांठी–सांभाळावे, चिंतामणी–चिंतिलेले देणारे रत्न, निकी–चांगली.

अर्थ :– सर्वत्र, सर्वकाळ प्रकाशमान असणारा दिवा काही कधी अंधाराला पाहात नाही. हाच भाव मनात धारण करून तुम्ही ईश्वरास जवळ करा. १ नारायण, नारायण हे धन तुम्ही चांगले जतन करून सांभाळावे. २ चिंतामणी जवळ असल्यावर खरे पाहता मग कसलीही चिंता उरू नये. ३ तुकाराम महाराज म्हणतात, उभय लोकी याच ईश्वरप्रेमाच्या रूपाच्या धनाची सामग्री फार चांगली आहे ४

८८१ धन्य काळ संतभेटी । पायीं मिठी पडिली तो ॥ १ ॥
संदेहाची सुटली गांठी । जालें पोटी शीतळ ॥ २ ॥
भवनदीचा जाला तारा । या उत्तरा प्रसादें ॥ ३ ॥
तुका म्हणे मंगळ आतां । कोण दाता याहूनि ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– संदेहाची–संशयाची, गांठी–प्रश्न, तारा–नाव.

अर्थ :– या संतांच्या पायांशी मिठी पडते, तो काळ फारच धन्य होय. १ यांच्या भेटीमुळें संशयाचे सर्व प्रश्न सुटून जातात आणि त्यामुळे मन शांत व प्रसन्न होते. २ यांच्या कृपेने भवनदीच स्वत नाव होऊन कृपा-प्रसादाने तरून जेण्यास समर्थ बनते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, आता या संतापेक्षा अधिक मंगलदायक असा दाता कोण आहे ? ४

८८२ दिनरजनीं हाचि धंदा । गोविंदाचे पवाडे ॥ १ ॥
संकल्पिला देह देवा । सकळ हेवा तये ठायीं ॥ २ ॥
नाहीं अवसान घडी । सकळ जोडी इंद्रिया ॥ ३ ॥
कीर्ति मुखें गर्जे तुका । करी लोकां सावध ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– दिनरजनी–रात्रदिवस, हेवा–हाव.

अर्थ :– रात्रदिवस या गोविंदाची कीर्ती पोवाड्यातून गावी, हाच एक आमचा सततचा उद्योग आहे १ या सर्व देहाचा संकल्पही देवा, तुझ्याचसाठी अर्पण व्हावा अशी आमची एकमेव इच्छा आहे. २ सर्व इंद्रियांची वृत्ती हीच असून याखेरीज दुसरी भावना क्षणभरसुद्धा नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, या श्रीहरीची कीर्ती मी गर्जून सर्वत्र पसरवीत आहे व सर्व लोकांना सावध करीत आहे. ४

८८३ खरें नानवट निक्षेपीचें जुने । काढिलें ठेवणें समर्थाचें ॥ १ ॥
मजुराच्या हातें मापाचा उकल । मी तो येथें फोल सत्ता त्याची ॥ २ ॥
कुलाळाच्या हाते घटाच्या उत्पत्ति । पाठवी त्या जाती पाकस्थळा ॥ ३ ॥
तुका म्हणे जीवन तें नारायणीं । प्रभा जाते कीर्णीं प्रकाशाची ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :–नानवट–नाणे, निक्षेपीचे–पुरून ठेविलेले, कुलाळाच्या–कुंभाराच्या, कीर्णी–किरणामधून.

अर्थ :– समर्थ अशा संतांच्या घरी विठ्ठलरूपाचे जुनाट नाणे जमिनीत पुरून ठेविलेले होते, ते मी बाहेर सर्वांसाठी काढले आहे १ मजुराच्या हातानेच धान्याचे माप होत असले मी या ठिकाणी फुकटचा असून खरी सत्ता त्याचीच आहे. २ कुंभाराच्या हातून घटाची उत्पत्ती होते, हे खरे असले तरी, जो कोणी खरेदी करणारा असतो, तोच त्यांना स्वयंपाकाच्या ठिकाणी पाठवीत असतो. ३ तुकाराम महाराज म्हणतात, सूर्याचेच तेज त्याच्या किरणांतून फाकत असते, त्याप्रमाणे सर्व जीवनातून नारायणच व्यक्त होत असतो. ४

८८४ गंगेचिया अंताविण काय चाड । आपुले तें कोड तृषेपाशीं ॥ १ ॥
विठ्ठल हे मूर्ति साजिरी सुंदर । घाली[१] निरंतर हृदयपुटीं ॥ २ ॥

---

१ पाळू.

तु गाथा ५२

कारण तें असे नवनीतापाशीं । गबाळ तें सोसी इतर कोण ॥ ३ ॥
बाळाचे सोईतें घांस घाली माता । अट्टाहास चिंता नाहीं तया ॥ ४ ॥
गाऊं नाचों करूं आनंदसोहळा । भावचि आगळा[1] नाहीं हातां ॥ ५ ॥
तुका म्हणे अवघें जालें एकमय । परलोकींची काय चाड आतां ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा :– अंताविण–खोली समजल्याशिवाय.

अर्थ :– जो तान्हेलेला आहे त्याने गंगेचे पाणी प्यावे. त्या पाण्याच्या खोलीची चौकशी त्याने कधी करू नये. तहान भागली की नाही, हे मात्र त्याने पाहावे. १ त्याचप्रमाणे इतर कसलीही चौकशी न करिता विठ्ठलाची ही साजिरी व सुंदर अशी मूर्ती निरंतर हृदयात स्थिर करून ठेवावी. २ सारभूत असणाऱ्या नवनीतापाशीच आपले काम असावे. इतर गबाळघाशी आपण संबंध कशास ठेवावा? ३ बाळाची सोय व्हावी म्हणून आई त्याला एक एक घास करून घालीत असते. त्यासंबंधी कसली चिंता किंवा कसला खटाटोप बाळाला कधी करण्याची जरूरी नसते. ४ त्याचप्रमाणे आम्ही या श्रीहरीच्या प्रेमात नाचू, गाऊ व आनंदाने सुखाचा सोहळा करू. याखेरीज दुसरा भाव आपल्या मनात कधी नसतो ५ तुकाराम महाराज म्हणतात, आता सर्व एक श्रीहरिमय झाल्यामुळे आम्हास परलोकीचे भय उरलेलेच नाही. ६

८८५ स्त्रीपुत्रादिकीं राहिला आदर । विषयीं पडिभर अतिशय ॥ १ ॥
आतां सोडवणें धांवा नारायण । मज हे वासना अनावर ॥ २ ॥
येऊनियां आड ठाके लोकलाज । तें हें दिसे काज अंतरलें ॥ ३ ॥
तुका म्हणे आम्हां जेथें जेथें गोवा । तेथें तुम्हीं देवा सांभाळावें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– पडिभर–अधिक प्रेम.

अर्थ :– देवा, या स्त्रीपुत्रादिक नातेवाईकाविषयी मला विशेष प्रेम वाटते व विषयसुखांवर माझे अधिक प्रेम आहे. १ नारायणा, तुम्ही धावत यावे व मला यातून सोडवावे. या वासना मला आवरेनाशा झाल्या आहेत. २ ही लोकलज्जा आमच्या मार्गात उभी राहिलेली असल्यामुळे देवा, आमचे कार्य दूर झाले असे वाटते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, आम्हांस जिथे तिथे गुंतून पडण्याचेच प्रसग दिसतात नारायणा, अशा ठिकाणी तुम्हीच मला सावरावे. ४

८८६ पडिलों भोवनीं । होतों बहु चिंतवनी ॥ १
होतों चुकलों मारग । लाहो केला लाग[2] वेगें ॥ २ ॥
इंद्रियांचे संदी । होतों सांपडलों बंदीं ॥ ३ ॥
तुका म्हणे बरें जालें । विठ्ठलसें वाचे आलें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:– भोवनीं–भोवऱ्यात, चिंतवनी–चिंतेत, संदी–अडचणीत.

अर्थ –मी या संसारचक्राच्या भोवऱ्यात सापडलो होतो. फार मोठ्या चिंतेत होतो. १ मी मार्ग चुकून गेलो होतो. पण आता मात्र त्वरित लाभ करून घेतला आहे. २ इंद्रियवृत्तींच्या अडचणीत मी चांगलाच सापडलो होतो, चांगलाच बंदिवासात फसत होतो. ३ तुकाराम महाराज म्हणतात, पण बरे झाले; माझ्या वाचेतून विठ्ठलाचे नाम आले ४

८८७ बरें जालें आलीं ज्याचीं त्याच्या घरा । चुकला पान्हेरा[3] ओढाळांचा ॥ १ ॥
बहु केलें दुःखी त्यांचिया सांभाळें । आतां तोंड काळें तेणें लोभें ॥ २ ॥

---

१ वेगळा, २ वेग, ३ पान्हेरा

त्याचिया अन्यायें भोगा माझें अंग । सकळ ही लाग द्यावा लागे ॥ ३ ॥
नाहीं कोठें स्थिर राहो दिलें क्षण । आजिवरी सिण पावलो तो ॥ ४ ॥
वेगळाल्या खोडी केली तडातडी । सागावया घडी नाहीं सुख ॥ ५ ॥
* निरवूनि तुका चालिला गोवारें । देवापाशीं भार साडवूनि ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – पान्हेरा–सवध, गोवारें–समुदाय

अर्थ – देवा, हे एक बरे झाले बाहेर धावणारी इद्रिये आत मुरडून ज्याची त्याची आपापल्या घरात येऊन मुरडून राहिली या ओढाळ इद्रियाचा सवध आता सुटला १ याचा साभाळ करता करता मला फार दु ख झाले. पण आता त्याच्याबद्दल असणाऱ्या लाभाचे अथवा लोभाचे तोंड काळेच झाले असे समजा ना २ या इद्रियानी जर काही अन्याय आता केला तर, त्या अन्यायाची फळे मला शरीरावर भोगावी लागत असत ३ या इद्रियानी मला कुठेही एक क्षणभरसुद्धा स्थिर राहू दिले नाही याच्या नादाने आजपर्यंत फारच क्षीण मला झाला ४ या इद्रियाच्या निरनिराळ्या खोडींपायी माझी व ईश्वराची ताटातूट अनेकदा झाली सागण्यासारखे सुख यानी मला एक क्षणभरही दिले नाही ५ तुकाराम महाराज म्हणतात, मी आता या इद्रियाचा समुदाय देवापाशी सोपवून, त्याच्यावर याचा भार टाकून निघालो आहे ६

८८८ न करावी आता पोटासाटीं चिंता । आहे त्या सचिता माप लावू ॥ १ ॥
दृष्टि ते घालावी परमार्थाठायीं । क्षुल्लका उपायीं सिण जाला ॥ २ ॥
येथें तव नाहीं घेइजेसे सवे । काही नये जीवे वेचो मिथ्या ॥ ३ ॥
खडणेचि नव्हे उद्वेग वेरझारीं । बापुडे ससारीं सदा असो ॥ ४ ॥
दोवटा पावघी नावेचे बैसणे । भुजाबळें कोणे कष्टी व्हावे ॥ ५ ॥
तुका म्हणे आता सकळाचे सार । कराचा व्यापार तरी ऐसा ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – भुजाबळें–हाताच्या बळान

अर्थ –आता पोटासाठी चिंता करण्याची जरूरी नाही जे अन्नधान्य जवळ आहे, तेच पुरवून पुरवून खाऊ १ आपली दृष्टी परमार्थाच्या विचारात गुतवावी, उगाच बाकीच्या क्षुल्लक उपायाचा त्रास कशाला घ्यावा ? २ काही येथून आपल्याबरोबर घ्यावे असे नाही खोट्या लाभासाठी आपल्या जीवाची शक्ती कशाला खर्च करायची ? ३ आपल्या चिंतेने जन्ममृत्यूच्या खेपात काही कधी खड पडणार नाही आम्ही ससारात नेहमीच गुरफटून दीन झालेलो आहोत ४ पण शेवटी या भवसागरावरील नौकेत बसलो आहोत ती प्रवास शेवटपर्यंत सुखरूप करणारी असताना तिच्या गतीसाठी उगाच आपल्या हाताचे बळ कशासाठी खर्च करायचे ? ५ तुकाराम महाराज म्हणतात सर्वांचे सार जे असेल तेच आता आपण करीत असावे ६

८८९ आमच्या हे आले भागा । जिव्हार या जगाचे ॥ १ ॥
धरूनिया ठेलो जीवे । बळकट भावे एकविध ॥ २ ॥
आणूनिया केला रूपा । उभा सोपा जवळी ॥ ३ ॥
तुका म्हणे अंकित केला । खालीं आला वचनें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा –जिव्हार–अत करण

अर्थ – सर्व जगास अत करणरूपाने असणारा हा विठ्ठल आमच्या वाट्याला आला आहे १ यास मी आपल्या जीवात मोठ्या बळकट भावानें धारण करून ठेवले आहे २ या निर्गुण निराकारास आम्ही सगुण रूप देऊन नीट आकारास आणले ३ तुकाराम महाराज म्हणतात, मीच त्याला आपल्या स्वाधीन केला असून आपल्या प्रेमळ वचनामुळे तो आपल्या उच्च स्थानापासून खाली उभा आहे ४

८९० खरें भांडवल सांपडलें गांठी । जेणें नये तुटी उदमासी ॥ १ ॥
सवंगाचें केणें सांपडलें घरीं । भरूनि वैखरी सांटविलें ॥ २ ॥
घेतां देतां लाभ होतसे सकळां । सदेवां दुर्बळा भाव तैसा ॥ ३ ॥
फडा आलिया तो न वजे निरासे । जरि कांहीं त्यास न कळतां ॥ ४ ॥
तुका म्हणे आतां जालीसे निश्चिती । आणीक तें चित्तीं न धरूं दुजें ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– उदमासी–व्यापारास, केणे–जिन्नस, माल, फडा–मंडळीस.

अर्थ:– या विठ्ठलाच्या रूपाने खरेखुरे भांडवल आमच्या हाती आले असल्यामुळे याला काही आमच्या व्यापारात तूट येणार नाही. १ अतिशय स्वस्त असलेला असा विठ्ठलरूपी माल आमच्या घरीच सापडला असून त्याला आम्ही आमच्या वाणीतून साठवून ठेविला आहे. २ याचा लाभ सर्वांना देताना व घेताना होत असून सुदैवी असो, अथवा दुर्बल असो, सर्वांना त्यांच्या त्यांच्या भावाप्रमाणे हा प्राप्त होतो. ३ एकदा विठ्ठलभक्तांच्या मंडळीत, मेळाव्यात तो असला म्हणजे, काही मग निराश होत नाही हा; मग जरी त्यास आपण समजून घेण्याच्या प्रयत्नात नसलो तरी चालेल. ४ तुकाराम महाराज म्हणतात, आता मात्र माझी निश्चिती झाली असून या विठ्ठलनामरूपी भांडवलाखेरीज आता चित्तात दुसरे काहीच धरणार नाही. ५

८९१ पदोपदीं दिलें अंग । जालें सांग कारण ॥ १ ॥
रुधवूनि ठेलों ठाव । जागा वाव सकळ ॥ २ ॥
पुढती चालो मनालाहो । वाढे देहो संतोष ॥ ३ ॥
तुका म्हणे क्षरभागीं । जालों जगीं व्यापक ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – रुधवूनि–व्यापून, क्षरभागी–क्षरणाऱ्या, कमी होणाऱ्या.

अर्थ.–या श्रीहरीला मी माझे अंग पावलोपावली दिलेले असल्यामुळे माझे सर्व कार्य आता पूर्ण झाले आहे. १ जेवढी म्हणून विस्तृत जागा होती ती सर्व मी व्यापून राहिलो आहे. २ पुढे पुढे जाण्यात मनाला आनंद होत असून देहामध्ये संतोषही वाढत आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, प्रत्येक दिवशी कमी कमी होत जाणाऱ्या या जगाच्या आत, बाहेर मी सर्वत्र व्यापून राहिलो आहे. ४

८९२ निवडुनि दिलें नवनीत । संचित ते भोगीत ॥ १ ॥
आतां पुढें भावसार[१] । जीवना थार पाहावया ॥ २ ॥
पारखियाचे पडिलें हातीं । चांचपती आंधळीं ॥ ३ ॥
तुका म्हणे सेवन घडे । त्यासी जोडे लाभ हा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– संचित–नशिबात

अर्थ :– आम्ही आता श्रीहरीच्या नामाचे नवनीत सर्वांना निवडून दिले आहे. ज्याने त्याने आपल्या नशिबाप्रमाणे त्याचा आस्वाद घ्यावा. १ आता यापुढे जीवनाला काही आधार शोधायचा असेल तर, हरिविषय हा एकच आधार होय. २ जे कोणी परीक्षा करणारे डोळस असतील, त्यांच्या हाती हे हरिनामाचे नवनीत पडेल व जे देहाविकांच्या बुद्धीने आंधळे बनलेले असतील, ते मात्र उगाच चाचपडत राहतील. ३ तुकाराम महाराज म्हणतात, जो कोणी याचे मनोभावे सेवन करील, त्यासच हा लाभ निश्चित होईल. ४

८९३ उचित न कळे इंद्रियाचे ओढी । मुखें बडबडी शिकलें तें ॥ १ ॥
आपण जाऊन न्यावीं नरकास । वळें बेताळीस कुळें जग ॥ २ ॥

---

१ भवसार.

अबोलणे बोले डोळे झांकुनिया । बडबडी वाया दंभासाटीं ॥ ३ ॥
तुका म्हणे आम्ही तेथील पारखी । नाचे देखोवेखीं जाणों खरें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– देखोवेखी–दुसऱ्याचे पाहून

अर्थ :– जे केवळ इंद्रियाच्याच ओढीमुळे त्यांच्या आधीन झालेले असतात, त्यांना योग्य काय, अयोग्य काय, हे काहीसुद्धा समजत नाही आपल्या गुरुजवळ ते जे शिकले त्याची वृथा बडबड मात्र करीत असतात १ अशा वागण्याने हे लोकही नरकास जातातच, पण यांच्या आधीच्या बेचाळीस पिढ्यातील पूर्वजही नरकास जातात २ हे लोक नुसते डोळे झाकतात व ब्रह्माचा अनुभव आला असल्याचे अबोल राहून बोलून दाखवितात. यांची दांभिक बडबड मात्र व्यर्थ असते ३ तुकाराम महाराज म्हणतात, आम्ही तर तेथील चांगले परीक्षा करणारे असून जे दुसऱ्याचे पाहून ढोंग करून नाचतात, त्यांना आम्ही नीट जाणतो हे खरे आहे ४

८९४ एक मन तुझ्या अवघ्या भांडवला । वांटिता ते तुला येईं कैसें ॥ १ ॥
म्हणउनि दृढ धरीं पांडुरंग । देहा लावीं संग प्रारब्धाचा ॥ २ ॥
आणिका संकल्पा नको गोऊं मन । तरीच कारण साध्य होय ॥ ३ ॥
तुका म्हणे ऐसे जाणावे उचित । तरी सहज स्छित येईल कळो ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – स्छित–स्थित

अर्थ – तुला असणारे एक मन तू निरनिराळ्या व्यवहाराकडे कसे वाटून देणार आहेस ? १ यासाठी तू मनात पांडुरंग दृढ धरून राहा ना, व तुझा देह प्रारब्धाच्या संगतीत लाव ना. २ याखेरीज इतर कुठल्या संकल्पा-तून तू आपल्या मनास गुंतवू नकोस असे झाले तरच तुझे जीवितध्येय जे परमार्थसाधन ते साध्य होईल. ३ तुकाराम महाराज म्हणतात, असे हे जे उचित आहे ते तू जाणावेस असे तू जाणलेस तर तुला सहजस्थित अशी असणारी आत्मभावाची स्थिती समजून येईल ४

८९५ गावे म्हणउनि गीत । धरुनि राहे तैसे चित्त ॥ १ ॥
हेंचि थोर अवघड आहे । अन्न देखोनि भूक राहे ॥ २ ॥
ऐकावी म्हुण कथा । राहे तैसें धरूनि चित्ता ॥ ३ ॥
तुका म्हणे धणी । नव्हे जेविल्यावांचुनि ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– धणी–तृप्ती

अर्थ :– या श्रीहरीचे जे गीत असेल तेच गावे व त्या गाण्यातील रूपच मनात धरून असावे १ पण हे फारच अवघड काम असून, नुसते अन्न पाहून कधी भूक लागलेल्या माणसाची भूक भागेल काय ? २ म्हणून या श्रीहरीची कथा चित्तात राहील तशीच धरून ठेवावी लागते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, खरी तृप्ती पोटभर जेवण केल्याखेरीज होत नसते. ४

८९६ कळेल हे खुण । तरि दावी नारायण ॥ १ ॥
सत्य संतापाशी राहे । येरा भय आड आहे ॥ २ ॥
अणुचिया ऐसें । असे भरले प्रकाशें ॥ ३ ॥
इंद्रियाचे धनी । ते हे जाती समजूनि ॥ ४ ॥
तर्क कुतर्क याटा । नागवण घटापटा ॥ ५ ॥
तुका म्हणे त्यावें । डोळा अंजन बरवे ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा :–येरा–संतांशिवाय इतरांना, घटापटा–घटाकाश, पटाकाश अशी वेदान्तातील शुष्क चर्चा.

अर्थ – हा नारायण कृपा करील, वर्म दाखवील तरच पुढील खूण कळेल १ सत्य सतापाशी असते व त्याच्याशिवाय इतरांना मात्र भयाचीच परिस्थिती असते २ या परमेश्वराचे स्वरूप अणुरेणुएवढे असून त्याच्यात सर्वत्र प्रकाशच भरून राहिलेला आहे ३ इंद्रियावर स्वामित्व ठेवणारे जे कोणी आहेत त्यानाच हे वर्म नीटपणे समजते ४ अनेक तर्क व कुतर्क करून नाना वाटा निर्माण करणारे व घटापटादिकाची शुष्क चर्चा करणाराची व्यर्थ नागवणूक मात्र होते ५ तुकाराम महाराज म्हणतात, यासाठी चागले असे ज्ञानाजन डोळ्यात घालावे ६

८९७ जातो न येतिया वाटा । काय निरवितो करटा ॥ १ ॥
कैसा जालासे बेश्रम । लाज नाहीं न म्हणे राम ॥ २ ॥
पाहे वैरियाकडे । डोळे वासुनिया रडे ॥ ३ ॥
बाधुनिया यमा हातीं । दिला नाहीं त्याची खती ॥ ४ ॥
नाही यापें काम । ऐसे जाणे तो अधम ॥ ५ ॥
अझुन तरि मुका । का रे जालासि म्हणे तुका ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – बेश्रम–निलाजरा

अर्थ – जेथे गेल्याने परत येता येणार नाही, अशी वस्तुस्थिती असली तरी आपल्या धनदौलतीची व सपत्तीची व्यवस्था हा करटा पुरुष अशाही वेळेस करीत बसला आहे १ कसा हा निलाजरा झाला आहे पाहा याला कसलीच लाज नाही रामाचे नाम घ्यायला काही हा तयार नाही २ हा अजूनही आपल्या शत्रूकडे डोळे मोठे करून पाहतो व रडतो ३ सर्वांनी मिळून याला बाधून यमाच्या हातात दिलेले असले तरी त्याची काही चिंता कधी हा करीत नाही ४ या यमदूतांशी आपले काहीच काम नाही, असे अजूनही हा अधम समजत असतो ५ तुकाराम महाराज म्हणतात, तू या प्रभूचे नाम घेण्याविषयी अजून तरी का मूक राहिला आहेस ? ६

८९८ वाटा घेई लवकरि । मागें अतरसी दुरी । केली भरोवरी । सार नेतो आणीक ॥ १ ॥
ऐसीं भाबावली किती । काय जाणो नेणो किती[१] । समय नेणती । माया भार वाहोनि ॥२॥
नाहीं सारिलें तोवरी । धाव घेई वेग करीं । घेतलें पदरी । फावलें ते आपुलें ॥ ३ ॥
फट लडी म्हणे तुका । एक न साहावे धका । तरिच या सुखा । मग कैसा पावसी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – भरोवरी–खटपट, फटलडी–हलकट मनुष्य

अर्थ – अरे माणसा, नीट ध्यानात घे परमार्थाचा वाटा लौकर घे ना पदरात नाही तर मग विनाकारण प्रभूला तू अतरला जाशील सारी खटपट तू केलीस व त्या श्रमाचे श्रेय दुसरच घेऊन जात आहेत असे होऊ नये १ अज्ञाच भ्रमात कितीजण सापडली आहेत ते काही नीट समजत नाही ही माणसे प्रसग न ओळखता वृथा ससाराचा भार डोक्यावर वागवून कष्टी होत असतात २ जोपर्यंत आयुष्य सरले नाही, तोपर्यंतच वेगाने, त्वरेने धाव घेऊन जे पदरात आहे ते आपलेच आहे असे समजून ऐस ३ तुकाराम महाराज म्हणतात, अरे हलकट मनुष्या, तुला सत्यज्ञानाचा किंवा परमार्थविचाराचा एक धक्कासुद्धा सहन होत नाही असे असेल तर मग तुला या परमार्थ सुखाचा ठेवा कसा प्राप्त होईल ? ४

८९९ चालावा पथ तो पाविजे त्या ठाया । ऐकिल्या वाया वारता त्या ॥ १ ॥
ऐका जी वोजे पडतसे पाया । भावाचि तें जायावाट नव्हे ॥ २ ॥
व्याली कुमारीचा अनुभवे अनुभव । सागता तो भाव येत नाहीं ॥ ३ ॥
तुका म्हणे येथें पाहिजे आरालें । बिबीं निवळलें तरि भासे ॥ ४ ॥

---

१ मिती

शब्दार्थ व टीपा :– वोजें–सरळपणाने, व्याली–वाळंत झालेल्या स्त्रीस, आराले–शांत.

अर्थ – असा पथ चालावा की, जेथे आपणास पोचावयाचे आहे, तेथे तो घेऊन जाणारा असावा. या ठिकाणी एकदा पोचल्यावर मग पूर्वीच्या ऐकलेल्या वाटा व्यर्थ होऊन जातात. १ मी पाया पडून सांगत आहे, ते नीट सरळ मनाने ऐका ना तेथे निश्चितपणे जाण्यासाठी भक्तिभावाचीच वाट निश्चित नाही का? २ जी बाळंतीण आहे, तिला आपला अनुभव कुमारिकेस काही कधी सांगता येणार नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, येथे मन शांत पाहिजे, कारण बिंबाचे रूप स्वच्छ भासावयास हवे. ४

९०० काय नाहीं लवत झाडें । विसरे वेडें देहभाव ॥ १ ॥
जया न फळे उपदेश । घस ऐसा त्या नांवें ॥ २ ॥
काय नाहीं असत जड । दगड तो अबोलणा ॥ ३ ॥
तुका म्हणे कुचर दाणा । तैसा म्हणा[1] डेंग हा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– घस–अविचारी, मद बुद्धीचा, कुचर–न शिजणारा, डेंग–मूर्ख.

अर्थ – वारा आल्यावर झाडे काय लवत नाहीत? वेडा मनुष्य आपल्या देहाचे हावभाव काय विसरत नाही? १ ज्याला चांगला उपदेश रुचत नाही, त्याला मद बुद्धीचा, अविचारी म्हणतात. २ दगड हा न बोलणारा जड असत नाही काय? ३ तुकाराम महाराज म्हणतात, अन्नात न शिजणारा एखादा टणक दाणा असतो, त्याप्रमाणे हा मूर्ख मनुष्य या भक्तिमार्गाच्या विचारात समरस न होणाराच असतो ४

९०१ देखीचा दिमाख शिकोनियां दावी । हिऱ्या ऐसी केवीं गारगोटी ॥ १ ॥
मर्यादा ते जाण अरे अभागिया । देवाच्या ऐसिया सकळ मूर्ति ॥ २ ॥
काय पडिलेंसी लटिक्याचे भरी । वोंवाळुनि थोरी परती सांडीं ॥ ३ ॥
तुका म्हणे पुढें दिसतसे घात । करितों फजित म्हणउनी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– देखीचा–दुसऱ्याचे पाहून, थोरी–थोरवी.

अर्थ – दुसऱ्याचे पाहून काही दिमाख किंवा डौल दाखविला तरी तो काही खरा नव्हे. गारगोट्या कितीही झाल्या तरी हिऱ्यासारख्या कशा होतील? १ अरे, अभाग्या, तू नीट मर्यादा जाणून ऐस ना. सर्व भूतमात्र हे त्या देवाच्या मूर्तीच आहेत, हे नीट समजून घे. २ उगाच खोट्या भरीस पडू नकोस व स्वतःच्या ठिकाणची थोरवी थोडी दूर सारून ठेव. ३ तुकाराम महाराज म्हणतात, मला पुढे तुझा घात दिसत आहे. म्हणून मी तुला फजीत करून पाहात आहे. ४

९०२ संसाराचा माथां भार । कांहीं पर न ठेवीं ॥ १ ॥
भक्तीची ते जाती ऐसी । सर्वस्वासी मुकावें ॥ २ ॥
भिक्षा आणि वेवसाव । काला करितो गाढव ॥ ३ ॥
करुनि वस्ती बाजारीं । म्हणवी कासया निस्पृही ॥ ४ ॥
प्रसादा आडुनि कवी । केलें तुप पाणी तेवीं[2] ॥ ५ ॥
तुका म्हणे होईं शूर । किंवा निसुर मजूर ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा :– निसुर–निवळ.

अर्थ :– संसाराचे ओझे माथ्यावर असले की, मग पलीकडे काही उरतच नाही १ या भक्तीची जातच अशी आहे की, तिच्यासाठी सर्वस्वाला मुकावे लागते. २ वैराग्यासाठी भिक्षा मागायची असेल तर, तिची व

१ जाणा, २ जेवी.

व्यवसायाची गल्लत करून मागणार नाही. असा काला करणारा गाढवच म्हणायला हवा ३ बाजारात लोभाने गेला आहे आणि स्वत स मी निःस्पृह म्हणवून घेत आहे, हे कसे पटणार ? ४ दुसऱ्याच्या कवितेतील काही प्रासादिक शब्द उचलून कवित्व करणाऱ्या भोंदू कवीचे काव्य हे खऱ्या तुपात पाणी मिसळल्याप्रमाणेच नव्हे काय ? ५ तुकाराम महाराज म्हणतात, एक चांगले शूर तरी व्हावे, किंवा निव्वळ मजूर तरी बनावे. ६

९०३ तेज्या इशारती । तट्टा फोक वरी घेती ॥ १ ॥
काय सांगावें त्याहुनी । ऐका रे धरा मनीं ॥ २ ॥
नव्हे भांडखोर । ओढूनि धरूं पदर ॥ ३ ॥
तुका म्हणे तोंड । काळें करा खालीं मुंड ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– तेज्या–तेजीत असणाऱ्या घोड्यास.

अर्थ – तेजीत असणाऱ्या घोड्याला नुसती इशारत करताच त्याला समजते व तो त्याप्रमाणे वागू लागतो; परंतु निर्बुद्ध तट्टाला कितीही फोक मारिले तरी ते काही ऐकत नाही. १ तुम्हाला काय सांगावे ? तुम्ही त्याच्याहूनही नीच झालेले दिसता. तेव्हा मी काय सांगतो ते नीट मनात धरा व त्याप्रमाणे वागा. २ मी काही तसा भांडखोर नाही; पण तुमचा पदर ओढून धरीन व काही सांगू शकेन. ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा लोकांनी तोंड खाली करून काळे करावे. ४

९०४ मागें संतीं होतें जें जें सांगितलें । तें येऊं लागलें अनुभवा ॥ १ ॥
आचारभ्रष्ट होती लोक कळी । पुण्य क्षीण बळी जालें पाप ॥ २ ॥
वर्णधर्म कोणी न धरी विटाळ । घालिती गोंधळ एके ठायीं ॥ ३ ॥
वेदाचे पाठक सेवितील मद्य । न देखती भेद विषयीं भांड ॥ ४ ॥
तुका म्हणे किती करावे फजित । तेचि छंद नित्य वहु होती ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – कळीं–कलियुगात

अर्थ – मागच्या संतांनी पुढे होणार होणार म्हणून जे जे सांगितले आहे, ते ते सर्व अनुभवास येऊ लागले आहे. १ या कलियुगात लोक आचारभ्रष्ट होतील व त्यामुळे पुण्य क्षीण होऊन पाप मात्र बलवान ठरेल. २ वर्णधर्मांचा कोणीही विटाळ न मानता एकाच ठिकाणी सर्व वर्णांचा व जातींचा गोंधळ निर्माण होईल. ३ वेदाचे पठण करणारेच दारूचे सेवन करतील व हे भांडखोर विषयाचा भेद पाहणार नाहीत ४ तुकाराम महाराज म्हणतात, यांची फजिती तरी किती करावी ? त्यांचे तेच तेच छंद नित्याचे म्हणून होत राहतात ५

९०५ अक्षरांचा श्रम केला । फळा[1] आला तेणे तो ॥ १ ॥
अवघियाचा तळ धरी । जीवा उरी नुरउनी ॥ २ ॥
फळलें[2] तें लवे भारें । पिक खरें[3] आलें तईं ॥ ३ ॥
तुका म्हणे देवा । पुढें भाव सारावा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– अक्षरांचा–पाठांतराचा.

अर्थ :– काही अक्षरांचे व ग्रंथांचे पाठान्तर करण्याचे श्रम केले म्हणून पुढील फळ प्राप्त झाले. १ त्याच्या आयुष्यात जीवदशा उरलेली नसून सर्व प्राणिमात्रांच्या ठिकाणी तो विनम्र झालेला आहे. २ जो वृक्ष फळांच्या भारांनी खाली लवला आहे, त्यासच खरे व समृद्ध पीक आले आहे, हे खरेच आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, असा हा भाव या देवापुढे ठेवावा सर्वांनी ४

---

१ फळो, २ भरले,३ बरे

९०६ उचित जाणावे मुख्य धर्म आधीं। चित्तशुद्ध बुद्धी ठायीं स्थीर ॥ १ ॥
न घलावी[1] धाव मनाचिये ओढी। वचन आवडी संताचिये ॥ २ ॥
अंतरीं या राहे वचनाचा विश्वास। न लगे उपदेश तुका म्हणे ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा – स्थिर–स्थिर

अर्थ – आपले चित्त शुद्ध करून, बुद्धी परमेश्वराच्या पायाशी स्थिर करून, उचित असेल त्या धर्माचे धर्म आधी नीट जाणावे १ केवळ ओढाळ मनाच्याच ओघाने किंवा ओढीने धावत सुटू नये संताच्या वचनाचा आवडीने व्यासंग ठेवावा २ या संतवचनाचा विश्वास एकदा मनात स्थिर झाला म्हणजे मग तुकाराम महाराज म्हणतात, उपदेशाही करावा लागणार नाही ३

९०७ जीवन हे मुक्त नर जाले पावन। तजा हो दुर्जनसंगति ही ॥ १ ॥
बहुत अन्न विष मोहरीच्या माने। अवघेंचि तेणे विष होय ॥ २ ॥
तुका म्हणे जेणे आपुलें स्वहित। तैसी करीं नीत विचारूनि ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा – मानें–प्रमाणानसुद्धा

अर्थ – एखादा मनुष्य अत्यंत पवित्र आचरणाचा असून तो जीवन्मुक्तही आहे तरीसुद्धा त्याने दुर्जनांची संगत सोडायला हवी १ अन्न पुष्कळ असले तरी मोहरीएवढ्या विषानेसुद्धा त्याच्यात सर्वत्र विष पसरून राहाते २ तुकाराम महाराज म्हणतात, ज्यात आपले स्वहित आहे त्याविषयी बरी नीती पाहून विचार करावा ३

९०८ द्रव्याचा तो आम्ही धरितो विटाळ। तया पाठी काळ लाग करी ॥ १ ॥
करोनिया हेंचि राहिलो जीवन। एक नारायण नाम ऐसें ॥ २ ॥
तुका म्हणे हेंचि करूनि जतन। आलिया हो दान याचकासी ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा – लाग–पाठलाग

अर्थ – द्रव्याचा आम्ही नेहमी विटाळच मानलेला आहे कारण या द्रव्याच्या मागे काळ एकसारखा पाठलाग करीत असतो १ म्हणून नारायणाचे नाम हेच मी माझे जीवन ठरवून राहिलो आहे २ तुकाराम महाराज म्हणतात, याच भावाची मी जपणूक करणार असून जे कुणी याचक दान मागायला येतील त्यानाही हेच देणार आहे ३

९०९ द्रव्याचिया मागें कळिकाळाचा लाग। म्हणोनिया संग खोटा त्याचा ॥ १ ॥
निरयाचे मूळ घालुनिया मागें। मांडिली प्रसंगें कथा पुढें ॥ २ ॥
आजिच्या प्रसंगें हाचि लाभ घ्यावा। पुढील भार देवावरी घाला ॥ ३ ॥
प्रारब्ध काहीं न पालटे सोसें। तृष्णेचे हे पिसें वायाविण ॥ ४ ॥
तुका म्हणे घेईं राहे ऐसें धन। सादर श्रवण करोनिया ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – लाग–पाठलाग निरयाचे–नरकाचे, प्रारब्ध–दैव

अर्थ – द्रव्याची संगत, सोबत खोटी आहे असेच समजा कारण त्याच्या पाठीमागे एकसारखा काळ लागलेला असतो कळिकाळ त्याचा पाठलाग करीत असतो १ नरकाचे मूळ असणारे हे द्रव्य सोडून, त्याचा त्याग करूनच मी यापुढची कथा प्रसंगाने सांगत आहे २ आजच्याही प्रसंगी हाच लाभ तुम्ही करून घ्याया व देवावर भार घालावा ३ आपल्या दैवात जे असेल ते कितीही प्रयत्न केला तरी पालटणार नाही त्यामुळे एकसारख्या तृष्णेचे वेड व्यर्थ आहे असेच समजावे ४ तुकाराम महाराज म्हणतात नीट आदराने श्रवण करून परमार्थमार्गाचे जे धन कायम टिकेल तेच स्वीकारावे ५

---

१ घालावी

९१० रडे अळंकार दैन्याचियें[1] कांती । उत्तमा विपत्तिसंग घडे ॥ १ ॥
एकाविण एक अशोभ्य दातारा । कृपेच्या सागरा पांडुरंगा ॥ २ ॥
रांधूं नेणे तया पुढील आइतें । केलें तें सोइतें वांयां जाय ॥ ३ ॥
तुका म्हणे चिंतामणि डोळी गळा । पावे अवकळा म्हणउनी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– रांधू नेणे–स्वयपाक करणे जाणीत नाही.

अर्थ :– अंगावर भरपूर अलकार घातले आहेत; पण ज्याच्या अंगावर अलंकार आहेत, तोच सारखा रडत असेल किंवा तोच कांतीविहीन व दैन्यवाणा असेल तर मग काय उपयोग ? कारण दागिने अथवा अलंकार उत्तम असले तरी, ते विपत्तीच्या संगतीत असल्याने त्याची कांती असून नसल्यासारखीच वाटते १ एकास दुसरे शोभून दिसणारे जर दातारा, नसेल तर त्याचा उपयोग काय ? पांडुरंगा, कृपेच्या सागरा, मग ते सुरूपही विशोभित दिसेल. २ चांगली स्वयंपाकाची आयती तयारी केली व ती ज्याला स्वयपाक बिलकूल येत नाही, त्याच्यापुढे नेऊन ठेविली तर तिचा काय उपयोग होणार ? ती सर्व वायाच जाणार ना ! ३ तुकाराम महाराज म्हणतात, डोळीच्या गळ्यात कुणी सर्व चिंता दूर करणारा चिंतामणी बांधला तरी त्याचा काय उपयोग होणार तिला ? तो त्या स्थानी विशोभितच दिसणार. ४

९११ दुःखाचे डोंगर लागती सोसावे । ऐसें तंव ठावें सकळांसी ॥ १ ॥
कांहीं न करिती विचार हिताचा । न करिती वाचा नामघोष ॥ २ ॥
भोग कळों येतो मागिल ते जन्म । उत्तम मध्यम कनिष्ठ ते ॥ ३ ॥
तुका म्हणे येथें झांकितील डोळे । भोग देतेवेळे येइल कळों ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– तव–तर.

अर्थ :– या मानवी जन्मात दु खाचे डोंगरच्या डोंगर सहन करावे लागतात, हे तर सर्वानाच माहीत आहे. १ असे असूनही हे लोक आपल्या हिताचा विचार कधी करीत नाहीत, की कधी प्रभूच्या नामाचा घोष करीत नाहीत. २ या जन्मी आपण जे भोग भोगीत आहोत, ते पाहून या मागील जन्मात आपण उत्तम, मध्यम, कनिष्ठ असे जे जे कर्म केले असेल ते ते ध्यानी येते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, हे लोक याकडे या जन्मी डोळेझाक करतील व मग नाना खडतर भोग भोगताना मात्र त्याना समजून येईल. ४

९१२ सदैव तुम्हां अवघें आहे । हातपाय चालाया ॥ १ ॥
मुखीं वाणी कानीं कीर्ति । डोळे मूर्ती देखाया ॥ २ ॥
अंध बहिर ठकलीं किती । मुकीं होतीं पांगुळें ॥ ३ ॥
घरास आगि लावुनि जागा । न पळे तो[2] गा वांचे ना ॥ ४ ॥
तुका म्हणे जागा हिता । कांहीं आतां आपुल्या ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– सदैव–सुदैवाने, ठकलीं–फसली.

अर्थ :– तुम्ही फार सुदैवाने जगणारे आहात, कारण ईश्वराने तुम्हाला सर्व अवयव नीटनेटके दिलेले आहेत. चालण्यासाठी पाय आहेत, पुण्यकर्म करण्यासाठी हात आहेत १ देवाचे नाव घेण्यासाठी वाणी मुखात आहे. त्याची कीर्ती ऐकण्यासाठी कान आहेत, त्याची मूर्ती पाहण्यासाठी डोळे आहेत. २ कित्येक आंधळे, बहिरे, मुके, पांगळे परमेश्वराची सेवा करिता येत नाही म्हणून फसले गेले आहेत ३ घराला आग लागली आहे व आत राहणारा जागा असून पळत नाही, तो कसा जिवंत राहणार ? ४ तुकाराम महाराज म्हणतात, लोकहो, तुम्ही आपल्या हिताविषयी नीट जागृत असा. ५

---

१ विघ्नेंचे संगतीं, २ तें.

९१३ ऐसे पुढती मिळता आता । नाहीं सत्ता स्वतंत्र ॥ १ ॥
म्हणउनि फावलें तें घ्यावें । नाम गावें आवडी ॥ २ ॥
संचित प्रारब्ध गाढें । धावे पुढें क्रियमाण ॥ ३ ॥
तुका म्हणे घुवडा ऐसे । जन्म सरिसे शुकराचे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – ऐसें–असा मानवी देह शूकर–डुक्कर

अर्थ – मानवी देहासारखे उत्तम साधन पुढे प्राप्त होईल असे नाही यावाबतीत आपण स्वतंत्र नसून आपल्या हाती सत्ताही काही नाही १ म्हणून जो आज मिळाला आहे, त्याचा फायदा घेऊन ईश्वराचे नाव मोठ्या प्रेमाने घेत जावे २ कारण आपल्या संचित कर्माची मोठ्या प्रारब्धाची व क्रियमाणाची गती एकसारखी पुढे धावत असते ३ तुकाराम महाराज म्हणतात यापुढे कदाचित घुवडाचे, डुकराचे जन्म न येतील हे कशावरून ? तेव्हा तुम्ही या नरजन्मातच काय साधायचे असेल ते साधा ४

९१४ सर्वविशीं माझा त्रासलासे जीव । आता कोण भाव निवडे एक ॥ १ ॥
संसाराची मज न साहेचि वार्ता । आणीक म्हणता माझें कोणी ॥ २ ॥
देहसुख काहीं बोलिले उपचार । विष ते आदर बंद[1] वाटे ॥ ३ ॥
उपाधि दाटणी प्रतिष्ठा गौरव । होय माझा जीव कासावीस ॥ ४ ॥
तुका म्हणे काहीं आणीक न साहे । आवडती पाय वैष्णवांचे ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – न साहे–सहन होत नाही, बंद–बंधन उपाधी–अडचण

अर्थ – या सर्व लौकिक व सांसारिक गोष्टींविषयी माझा जीव त्रासून गेला आहे त्रास नाही असा कोणता एक भाव मी निवडून सांगू ? १ संसारासंबंधी तर मला कसलीच रुची नाही, त्याची वार्ताही सहन होत नाही आणि दुसऱ्याने कुणी हा संसार माझा माझा असे म्हटल्याचेही सहन होत नाही २ देहाला सुख देणाऱ्या काही उपचाराविषयी कुणी सुचविले तर तेही मला आवडत नाही इंद्रियसुखाचे हे भोग मला विषाप्रमाणे वाटतात त्याचे मोठे बंधनच माझ्या मनावर असते ३ कुणी माझा गौरव केला, कुणी माझी प्रतिष्ठा सांगितली तर त्या स्तुतीने माझा जीव फार कासावीस होतो ४ तुकाराम महाराज म्हणतात मला आता दुसरे काहीही सहन होत नाही मला या वैष्णवांचेच पाय नेहमी आवडतात मी त्यांचाच आश्रय घेतो ५

९१५ आणीक काहीं या उत्तराचें काज । नाहीं आता मज बोलावया ॥ १ ॥
भिन्न भेद हे भावनास्वभाव । नव्हे काहीं देव एकविध ॥ २ ॥
गुण दोष कोणें निवडावे धर्म । कोण जाणे कर्म अकर्म ते ॥ ३ ॥
तरिच भलें आता न करावा संग । दुःखाचा प्रसंग तोडावया ॥ ४ ॥
तुका म्हणे गुण गाईं या देवाचे । घेईं माझे वाचे हेचि धणी ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – काज–कारण धणी–तृप्ती

अर्थ – आता दुसरे काही बोलावे हे कारणच मजजवळ नाही १ मानवी स्वभावानुसार ज्या ज्या भावना असतील त्या त्या प्रमाणे भिन्न भिन्न प्रकार असले तरी देव हा एकविध म्हणजे विविधतेतही एकयानेच नटलेला आहे २ गुणांची व दोषांची निवड कोणत्या धर्मावरून करावी ? कर्म व अकर्म यांची निवड कशी करावी ? याना कसे जाणावे ? ३ आता कुणाचीही संगत धरू नये यातच खरे म्हणजे चांगले आहे यामुळ दुःखाचे प्रसंगही आपोआप तुटले जातील ४ तुकाराम महाराज म्हणतात, माझी वाणी या देवाचेच गुण गात राहील यानच तिची तृप्ती आहे ५

---
[1] बंध

९१६ आपुल्या विचार करीन जीवाशीं । काय या जनाशीं चाड मज ॥ १ ॥
आपुलें स्वहित जाणती सकळें । निरोधितां बळें दुःख वाटे ॥ २ ॥
आइको नाइको कथा कोणी तरी । जाऊनियां घरीं निजो सुखें ॥ ३ ॥
माझी कोण वोज जाला हा शेवट । देखोनियां वाट आणिकां लावूं ॥ ४ ॥
तुका म्हणे भाकूं आपुली करुणा । जयाची वासना तया फळे ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– चाड–किंमत, वोज–चांगला.

अर्थ :– परमार्थासंबंधीचा विचार मी माझ्या जीवाला विचारूनच करीन. इतर लोकांची किंमत मला काय असणार? त्यांचा संबंध काय? १ जो तो आपले हित नीटपणे जाणीत असतोच; त्यांना त्यांच्या कर्मापासून निरोधित केले तर दुःखच होणार. २ माझी ही कथा कुणी ऐको वा न ऐको, किंवा कुणी आपल्या घरी सुखाने झोपी जावोत. ३ माझा तरी या मार्गात असा कोणता चांगला शेवट झाला आहे की, ज्याच्यामुळे मी इतरांना मार्गाला लावावे? ४ तुकाराम महाराज म्हणतात, मी स्वतःपुरती त्या ईश्वराची करुणा भाकेन. ज्याची जशी वासना तसा तो त्यास प्रसन्न होईल. तशी त्याची वासना फलद्रूप होईल. ५

९१७ धाई अंतरिच्या सुखें । काय बडबड वाचा मुखें ॥ १ ॥
विधिनिषेध उर फोडी । जंव नाहीं अनुभवगोडी ॥ २ ॥
वाढे तळमळ उभयता । नाहीं देखिलें अनुभवितां ॥ ३ ॥
अपुल्या मतें पिसें । परि तें आहे जैसेंतैसें ॥ ४ ॥
साधनाची सिद्धि । मौन करा स्थिर बुध्दि ॥ ५ ॥
तुका म्हणे वादें । वांयां गेलीं ब्रह्मवृंदें ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – धाई–संतुष्ट, ब्रह्मवृंदें–ब्राह्मणांचे मेळावे.

अर्थ :– अंत करणातील परमेश्वररूपाच्या दर्शनाने जे सुख होईल ते ध्यानात धरून संतुष्ट व्हावे. मुखाने उगाच बडबड कशास करावी? १ परमेश्वराच्या विषयीची अनुभवाची गोडी जोपर्यंत लाभलेली नाही, तोपर्यंत विधिनिषेधांची शुष्क चर्चा नुसती ऊर फोडणारी व्यर्थच होते. २ जोपर्यंत ईश्वरविषयक अनुभव आलेला नाही, तोपर्यंत हृदयातील तळमळ मात्र वाढत असते. ३ कित्येक जण आपल्याच विशिष्ट मताने वेडावलेले असून त्यांचा त्यायोगे काहीही फायदा झालेला नाही. ते जिथे आहेत, तिथेच दिसतात. त्यांच्यांत कसलीही प्रगती झालेली नाही. ४ तुम्ही मौन धारण करून बुद्धी स्थिर करा. हीच खरी म्हणजे सर्व साधनांची सिद्धी आहे. ५ तुकाराम महाराज म्हणतात, परंतु व्यर्थ वादविवाद करकरून हे ब्राह्मणांचे समुदाय किंवा मेळावे उगाच वाया मात्र गेलेले दिसतात. ६

९१८ कुशळ गुंतले निषेधा । वादी प्रवर्तले वादा ॥ १ ॥
कैसी ठकलीं बापुडीं । दंभविषयांचे सांकडीं ॥ २ ॥
भुस उपणुनि केलें काय । हारपले दोन्ही ठाय ॥ ३ ॥
तुका म्हणे लागे हातां । काय मथिलें घुसळितां ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– कुशळ–कुशल, सांकडीं–संकटात, उपणुनि–पाखडून, मथिलें–घुसळले असता.

अर्थ :– जे शास्त्रांमध्ये कुशल आहेत, त्यांचे सारे आयुष्य विधिनिषेधांच्या जंजाळातच जाते व ज्यांची बुद्धी प्रगल्भ आहे, ते नेहमीच वाद करण्यास प्रवृत्त झालेले असतात. १ ढोंग किंवा दंभ व विषयांची संकटे यांत हे दीन बापडे लोक कसे फसून गेले आहेत पाहा. २ भुसा पाखडून काय हाती लागणार? दाणेही जातील व भुसाही हातचा जाईल. ३ आधीच लोणी काढून घेतले असताना मग ताक घुसळले असता काय हातात येणार? ४

९१९ संतांचीं उच्छिष्टें बोलतों उत्तरें । काय म्यां गव्हारें जाणावें हे ।। १ ।।
विठ्ठलाचें नाम घेतां नये शुद्ध । तेथें मज बोध काय कळे ।। २ ।।
करितों कवतुक बोबडा उत्तरीं । झणी मजवरि कोप धरा ।। ३ ।।
काय माझी याति नेणां हा विचार । काय मी तें फार बोलों नेणें ।। ४ ।।
तुका म्हणे मज बोलवितो देव । अर्थ गुह्य भाव तोचि जाणे ।। ५ ।।

शब्दार्थ व टीपा – गव्हारें–गवार माणसानें, अडाणी माणसानें, झणी–नको

अर्थ :– मी माझ्या कवित्वामधून जे काही बोलतो, ते खरे म्हणजे पूर्वी होऊन गेलेल्या संतांचीच उच्छिष्ट अशी वचने असतात मी अडाणी माणसाने याशिवाय काय बोलावे ? १ मला एका विठ्ठलाचे नामही शुद्धत्वाने नीट घेता येत नाही अशा स्थितीत मला आत्मबोधाचे ज्ञान कसे होणार ? २ मी काही कौतुकाने कवित्व करून बोबडे बोल बोलतो, यासाठी मजवर तुम्ही कुणी राग करू नका. ३ माझी जाती कोणती ? माझा अधिकार कोणता ? यासंबंधी तुम्ही कसलाही विचार नका करू. आणि याविषयीही मी फार बोलू नये ४ तुकाराम महाराज म्हणतात, परंतु हा देवच मला बोलवितो. त्यात काही गुह्य अर्थ असला किंवा काही भावरहस्य असले, तर तो एक परमेश्वरच जाणणारा आहे. ५

विवरण – या एका महत्त्वाच्या व प्रसादपूर्ण अभंगात आपल्या कवित्वाविषयी व अनुभूतीविषयी तुकोबांनी दोनतीन तत्त्वे फार स्पष्टपणे व मार्मिक रीतीने सांगितली आहेत प्रथमच त्यांनी नेहमीप्रमाणे कबूल केले आहे की, मी तसा अडाणीच मनुष्य असून मागील, जे कुणी मोठे सतपुरुष होऊन गेले त्यांचेच उष्टे बोल मी बोलत आहे मागे जे श्रेष्ठ ऋषीमुनी बोलून होते, त्यांचाच भाव आपण कवितेत सांगून 'झाडू संतांचे मारग । आडरानीं भरले जग । उच्छिष्टाचा भाग । शेष उरला तो सेवू ' अशा ओळींतून त्यांनी आपल्या कवित्वाच्या व भक्तिप्रसाराच्या कार्याचे पूर्वपरंपरामूल थोडक्यात येथेही स्पष्ट केले आहे

दुसरा एक मुद्दा येथे उपस्थित झालेला आहे तो असा की, तुकोबा उच्च वर्णीयाच्या जातीचे नसल्यामुळे त्यांना कवित्व परमार्थनिरूपणाचा अधिकार आहे की नाही ? त्यांनी वेदाचा अर्थ सांगावा की नाही ? अशा प्रकारचे प्रश्न व त्यांची चर्चा बुवांच्या वेळी होत होती या प्रकरणात त्यांच्यावर विशेष कठिण असे अपमानाचे प्रसंगही गुदरले होतेच ते लक्षात ठेवूनच सांगतात का, मी हे सारे कौतुकाने कवित्व करीत आहे माझ्यावर कुणी रागही धरू नये माझी जात कोणती, हेही कुणी विचारू नये, असे त्यांनी विनविले आहे खरे म्हणजे विष्णुदासांना कसली आली ही जात ? असाच सिद्धान्त त्यांनी इतरत्र सांगितलेला आहे, आणि हा निर्णयही वेदशास्त्रांस धरूनच असल्याची साक्षी त्यांना होती *'यातायाती धर्म नाहीं विष्णुदासा । निर्णय हा ऐसा वेदशास्त्रीं'* उगाच आपला वर्णाचा अभिमान धरून कोण ब्राह्मण झाले आहेत ? कोण पवित्र झाले आहेत ? उलट 'अंत्यजादि योनि तरल्या हरिभजनें । तयांचीं पुराणें भाट झालीं ' एवढेच सांगून बुवा थांबत नाहीत, तर कबीर, लतिफ, सेना, कान्होपात्रा, दादू, चोखा, जनी इत्यादी तथाकथित यातिहीनांची उदाहरणे देऊन तुकारामबुवा विष्णुदासांना, विठ्ठलभक्तांना जातिधर्म उरत नाही, असेच सांगतात "तुका म्हणे नाहीं जातीसवें काम । ज्याचे मुखीं नाम तोचि धन्य '

तिसरा एक महत्त्वाचा विचार या अभंगातील असा की, आपण जरी यातीहीन आहोत तरी आपल्या मुखातून जी अभंगवाणी स्रवते ती नुसती प्रासादिक आहे असे नव्हे, तर प्रत्यक्ष देवाचीच आहे असा बुवांचा विश्वास होता *आपणास देव बोलवितो हे त्यांनी विशेष ठिकाणी स्पष्ट केले आहे तुकोबांना देव बोलविता* याचा अर्थ असा की, अनुभवाने तुकाराम स्वतःच देवत्व या पदवीस पोचलेले होते ततर्वाही देवच पसरून राहिलेला असल्याची अनुभूती त्यांना होती ' भावारूढ तुका झाला एका एकीं । देवच लौकिकीं अवघा केला ' एका भक्तिभावामुळे सर्व विश्वच देवमय झाल्यामुळे तुकोबा बोलतील ते देव बोलला असे मानण्यात गैर काय आहे ? आणि याच भूमिकेवरून तुकारामबुवा नेहमी म्हणत असत, ' तुका म्हणे मज बोलवितो देव ', ' नव्हती माझे बोल बोले पांडुरंग, ' ' पांडुरंगें भार घेतला माझा, ' ' भावारूढ तुका मुद्रा विठोबाची, ' ' बोलवितो देव मज ', ' परि त्या विश्वंभरें बोलविलें ',

'मज विश्वंभर बोलवितो' 'वदवी गोविंद तेंचि वदें' यासारख्या वचनाचा भावार्थ सहज, स्पष्ट व तर्कासही पटणारा असाच आहे

९२० चंदनाच्या वासें धरितील नाक । नावडे कनक न घडे हें ॥ १ ॥
साकरेची गोडी सारखी सकळां । थोरां मोठ्या बाळां धाकुटियां ॥ २ ॥
तुका म्हणे माझें चित्त शुद्ध होतें । तरि कां निंदितें जन मज ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा – कनक–सोनं

अर्थ – सुवासिक चंदनाच्या वासाने त्रस्त होऊन कुणी स्वतःचे नाक धरून बसतील का? सोने कुणाला आवडणार नाही असे कधी होईल का? १ साखरेची गोडी सर्वांना, थोरांना, लहानांना, मध्यम वयाच्या लोकांना सारखीच असते २ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, माझे चित्त जर शुद्ध असते तर लोकांनी ही अशी निंदा कधी केली नसती ३

९२१ तुज ऐसा कोण उदाराची रासी । आपुलेंचि देसी पद दासा ॥ १ ॥
शुद्ध हीन काहीं न पाहासी कुळ । करिसी निर्मळ वास देहीं ॥ २ ॥
भावें हें कदान्न खासी त्यांचे घरीं । अभक्ताच्या परी नावडती ॥ ३ ॥
न वजासी जेथें दुरी दवडितां । न येसी जो चित्ता योगियाच्या ॥ ४ ॥
तुका म्हणे ऐसीं ब्रीदें तुझीं खरीं । बोलतील चारी वेद मुखें ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – परी–प्रकार न वजासी–जात नाहीस

अर्थ – देवा, तुझ्यासारख्या उदार दात्याचे नाव दुसरीकडे कुठे मिळणार? तू दातृत्वाची एक रासच आहेस तू आपले स्वतःचे स्थानही आपल्या दासांना देतोस १ मग त्या सेवकाचे अथवा भक्ताचे कुळ शुद्ध आहे, की अशुद्ध आहे उच्च आहे की नीच आहे, हेही न पाहता त्याच्या निर्मळ देहात तू निवास करीत असतोस २ त्याच्या घरचे निकृष्ट अन्नही तू मोठ्या प्रीतीने खातोस देवा, परंतु जे अभक्त असतात त्यांच्या घरी असणाऱ्या नाना पक्वान्नांचे प्रकारही तुला आवडत नाहीत ३ भक्तांच्या येथून तुला दूर केले, तरी तेथून तू हालत नाहीस, जात नाहीस, पण मोठमोठ्या योग्यांच्याही चित्तात तू क्षणभरही ठरत नाहीस ४ तुकाराम महाराज म्हणतात, देवा हीच तुझी खरी खरी ब्रीदे आहेत असे चारही वेद सांगतात ५

९२२ तरि कां नेणते होते मागें ऋषी । तींहीं या जनासी दुराविलें ॥ १ ॥
वोळगती जया अष्ट महासिद्धी । ते या जनबुद्धी नातळती ॥ २ ॥
कंदमूळें पाला धातूच्या पोषणा । खातील वास राणां तरी केला ॥ ३ ॥
लावुनियां नेत्र उगेचि बैसले । न बोलत ठेले [1]मौन्यमुद्रें ॥ ४ ॥
तुका म्हणे ऐसें करीं माझ्या चित्ता । दुरावीं अनंता जन दुरी ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – तींहीं–त्या ऋषींनाही, वोळगती–प्रसन्न होतात अष्ट महासिद्धी–अणिमा–शरीर सूक्ष्म होणे, महिमा–शरीर मोठे होणे, गरिमा–शरीर हलके होणे प्राप्ति–सर्व प्राण्यांच्या इंद्रियांशी त्या त्या अधिष्ठात्री देवतांच्या रूपाने संबंध येणे प्राकाम्य–ऐहिक व पारलौकिक स्थानी भोग व दर्शनाचे सामर्थ्य येणे ईशिता–ईश्वराच्या ठिकाणची मायेचा प्रेरणा वशिता–आगमन न होणे आणि प्राकाम्य–इच्छित गुण अमर्यादपणे प्राप्त होणे या आठ महासिद्धी म्हणून सांगितल्या आहेत राणां–रानावनात

अर्थ – जे या सर्वसामान्य लोकांपासून दूर राहिले, ते पूर्वीचे ऋषिमुनी काय अज्ञानी होते की काय? त्यांनी या सामान्य जनांना का दूर केले? १ ज्यांना अष्टमहासिद्धी प्रसन्न आहेत, त्यांनी सुद्धा या सामान्य लोकांच्या

[1] मौनरूप

बुद्धीने वागण्याचे नाकारलेले आहे. २ ज्यांनी रानावनांत निवास केला आहे, ते केवळ शरीरधारणेसाठीच कंदमुळे व पाला भक्षण करतात. ३ या स्थानांवर हे साधक सज्जन डोळे मिटून, ध्यानस्थ होऊन, अबोल होऊन, मौनव्रत स्वीकारून बसले आहेत. ४ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, माझ्याही चित्ताची अवस्था अशीच होईल, असे तू करावेस अनंता, या सर्वसामान्य लोकांपासून तू मला दूर करावेस. ५

९२३ कोणाच्या आधारें करूं मी विचार । कोण देइल धीर माझ्या जीवा ॥ १ ॥
शास्त्रज्ञ पंडित नव्हें मी वाचक । यातिशुद्ध एक ठाव नाहीं ॥ २ ॥
कलियुगीं बहु कुशळ हे जन । छळितील गुण तुझे गातां ॥ ३ ॥
मज हा संदेह झाला दोहीं सवा । भजन करूं देवा किंवा नको ॥ ४ ॥
तुका म्हणे आतां दुराविता जन । किंवा हें मरण भलें दोन्ही ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– ठाव–आधार, सवा–बाजूनी.

अर्थ :– देवा, आता मी कुणाच्या आधाराने या मार्गाविषयी विचार करू रे ? माझ्या दीन जीवास कोण धीर देईल रे ? १ मी काही मोठा शास्त्रज्ञ नाही, पंडित नाही, मोठा वाचकही नाही. मी एक यातीहीन असून मला दुसरीकडे कुठे आधारही नाही. २ आणि या कलियुगात तर लोक किती चतुर झाले आहेत ते पाहा तुझे गुणगान करीत असतानाही ते मला छळतील. ३ तेव्हा, देवा, आता मी काय करावे रे ? तुझे भजन करू ? की या लोकांच्या नादी लागू ? दोन्हीकडून मी संशयात सापडलो आहे. मी काय करावे आता ? ४ तुकाराम महाराज म्हणतात, आता मी या लोकांना दूर करू ? की यांच्याबरोबर मरण पत्करू ? दोनही गोष्टी मला बऱ्याच दिसतात. ५

९२४ काय उणें जालें तुज समर्थासी । ऐसा मजपाशीं कोण दोष ॥ १ ॥
जो तूं माझा न करिसी अंगीकार । सांगेन वेव्हार संतांमधीं ॥ २ ॥
तुजविण रत आणिकांचे ठायीं । ऐसें कोण ग्वाही दावीं मज ॥ ३ ॥
तुका म्हणे काय धरूनी गुमान । सांग उगवून पांडुरंगा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – वेव्हार–प्रकार, रत–रममाण, आणिकांचे–दुसऱ्याचे, गुमान–भीड, उगवून–स्पष्ट करून.

अर्थ .– देवा, तू सर्वसमर्थ असताना तुला कोणत्या गोष्टीची उणीव आहे ? किंवा माझा तरी असा कोणता दोष निर्माण झाला आहे ? १ तू माझा स्वीकार का करीत नाहीस ? मी हा सर्व प्रकार संतांच्या मेळाव्यात सागू का ? २ तुझ्याशिवाय इतर दैवताच्या ठिकाणी मी रममाण झालो आहे, अशी साक्ष कुणी तरी द्यायला तयार आहे का ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, उगाच भीड धरून काय बसला आहेस रे ? सर्व काही गोष्टी तुम्ही मला समजावून सांगा ना ४

९२५ काय करूं आन दैवतें । एका विण पंढरीनाथें ॥ १ ॥
सरिता मिळाली सागरीं । आणिकां नांवां कैंची उरी ॥ २ ॥
अनेक दीपींचा प्रकाश । सूर्य उगवतां नाश ॥ ३ ॥
तुका म्हणे नेणे दुजें । एका विण पंढरीराजें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– आन–इतर, दुजें–दुसरे.

अर्थ :– या एका पंढरीनाथाशिवाय इतर दैवताचा मला काय उपयोग आहे ? १ एकदा नदी समुद्रास मिळाली की मग ती आपल्या वेगळ्या नावाने कुठे उरते ? २ सूर्य उगवताच इतर लहानसान दिव्याचा प्रकाश संपतोच की नाही ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, या एका पंढरीराजाशिवाय मी दुसरे दैवत कधीच जाणीत नाही. ४

९२६ काय करूं कर्माकर्म । बरें सापडले वर्म ॥ १ ॥
होसी नामाच सारिखा । समजाविली नाहीं लेखा ॥ २ ॥
नाहीं वेचावेच जाला । उरला आहेसी सचला ॥ ३ ॥
तुका म्हणे माझें । काय होईल तुम्हा ओझें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – लेखा-मर्यादा, वेचावेच-जमाखर्च

अर्थ – कर्म व अकर्म याच्या कटकटींची चर्चा मी कशास करू? मला या विठ्ठलाच्या नामाचे हे वर्म बरे सापडले आहे १ देवा, तू तुझ्या नामासारखाच कृपाळू व वत्सल होतोस व त्याचप्रमाणे आपल्या भक्ताची समजूत काढतोस अशी किती जणाची समजूत काढलीस त्याला सीमा नाही २ तुझ्या स्वरूपाविषयीही देवा काही खर्च वा काही जमा, असे न होता तू जसा आहेस तसाच साचून आहेस ३ तुकाराम महाराज म्हणतात देवा, माझे ओझे तुम्हो का मानावे? ४

९२७ एकाएकीं हातोफळी । ठाया बळी पावले ते ॥ १ ॥
आम्ही देवा शक्तिहीनें । भाकू तेणे करुणा ॥ २ ॥
पावटणी केला काळ । जया बळ होते ते ॥ ३ ॥
तुका म्हणे वीर्यावीर । सतधीर समुद्र ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – हातोफळी–हातावर हात मारून ठाया–ईश्वरस्वरूपात पावटणी–पायरी

अर्थ – कित्येक बलवान साधुसत आपल्या हातावर हात देऊन, टाळी वाजवून ईश्वरस्वरूपास प्राप्त झाले आहेत १ पण देवा, आम्ही मात्र शक्तिहीन असल्याने तुझी करुणाच केवळ भाकू २ ज्या साधुसताना सामर्थ्य होतें, त्यानी यमास आपल्या घरी चढून जाण्याच्या पायरीचे स्थान दिले आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, हे सत म्हणजे धैर्यवान व वीरातील वीर असून धीराचे समुद्रच आहेत ४

९२८ पुढिलाचे इच्छी फळ । नाहीं बळ तें अगीं ॥ १ ॥
सत गेले तया ठाया । देवराया पाववीं ॥ २ ॥
ज्येष्ठाचीं का आम्हा जोडी । परवडी न लभो ॥ ३ ॥
तुका म्हणे करीं कोड । पुरवीं लाड आमुचा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – परवडी–प्रकार

अर्थ – आमच्या पुढे जाऊन साधुसतानी जे मिळविले, त्याचीच इच्छा मीही करीत आहे पण माझ्या अगी तेवढे बळ मात्र नाही १ पण देवराया, यापूर्वीचे साधुसत जेथे जाऊन पोचले आहेत, ते स्थान मला दाखवा त्या स्थानावर मला पोचवा २ ज्येष्ठ असणाऱ्या साधुसतानी भक्तीचे जे जे प्रकार भोगले त्याचा लाभ आम्हांस का होऊ नये? ३ तुकाराम महाराज म्हणतात देवा तुम्ही आमचे कोडकौतुक करून लाड पुरवा ना ४

९२९ कैवल्याच्या तुम्हा घरीं । रासी हरी उदड ॥ १ ॥
मजसाटीं का जी वाणी । नव्हे धणी विभागा ॥ २ ॥
सर्वा गुणीं सपुरता । ऐसा पिता असोनी ॥ ३ ॥
तुका म्हणे पाडुरगा । जालो सागा सन्मुख ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – कैवल्याच्या–मोक्षाच्या, उदड–पुष्कळ वाणी–कमतरता

अर्थ – देवा, तुमच्या घरी मोक्षाच्या पुष्कळ राशी असतील १ मग मलाच सर्व बाबतीत कमतरता का हो? मला त्यांचा वाटा का मिळत नाही? २ तू सर्व गुणानी सपूर्ण असून, सर्वांचा पिता असून माझ्या

यावतीत अशी उणीव का? ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, मी तुमच्या समोर येऊन उभा आहे, मला सागा ना सर्व काही ४

९३० आपलाल्या तुम्ही रूपासी समजा । कासया वरजा आरसिया ॥ १ ॥
हे तो नव्हे देहवुद्धीचे कारण । होईल नारायणे दान केले ॥ २ ॥
वज्रूचिया बाणे वर्मासि स्पर्शावे । हे तो नाहीं ठावे मोकलित्या ॥ ३ ॥
तुका म्हणे बहु मुखें या वचना । सत्याविण जाणा चाल नाहीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – कासया–काय म्हणून, वरजा–त्याग, राग

अर्थ – आपापल्या रूपांना तुम्ही समजून घ्या ना उगाच रागारागाने आरसाच टाकून देण्यात काय अर्थ आहे? १ देहबुद्धी निर्माण होऊन नीट शरीर रक्षणाचे समजले म्हणजे सुस्वरूप प्राप्त होते असे नाही नारायणाने दान दिले तरच रूप आपणास मिळते २ वज्रूच्या बाणामुळे शत्रूच्या वर्मास स्पर्श होतो, पण ते बाण सोडण्याऱ्यास समजत नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, बहुमुखानी ही वचने सांगितली तरी सत्याशिवाय त्याना महत्त्व नाही ४

९३१ न मनावी चिंता तुम्ही सतजनीं । हिरा स्फटिकमणी केवि होय ॥ १ ॥
पडिला प्रसग स्थळा त्या सारिखा । देखिला पारिखा भाव काहीं ॥ २ ॥
बहुतासी भय एकाचिया दडें । बहुत या तोडें वचनासी ॥ ३ ॥
तुका म्हणे नाहीं वैखरी वा सर । करायाचे चार वेडे वेडे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – न मनवी–मानू नये करू नये पारिखा–परका, सर–बरोबरी

अर्थ – तुम्ही सत लोकानी कसलीही चिंता करू नये कारण हिऱ्याप्रमाणे लाभलेला हा परमेश्वर स्फटिक-मण्याप्रमाणे होणार नाही १ जेथे आपण आहोत, त्यानुसारच जो प्रसग निर्माण झाला आहे काही परका भावही पाहिला हेही खरे आहे २ एकाला शिक्षा केली की, इतर पुष्कळाना भय वाटू लागते शब्दानाही पुष्कळ वेगवेगळा अर्थ प्राप्त झालेला असतो ३ तुकाराम महाराज म्हणतात, नाना प्रकारचे वेडेचार करणारी व इतराची बरोबरी करणारी अशी माझी वाणी नाही ४

९३२ यथाविधि पूजा करी । सामोग्री तोवरि हे नाहीं ॥ १ ॥
आतां माझा सर्व भार । तू दातार चालविसी ॥ २ ॥
*मगळ ते तुम्हीं[1] जाणा । नारायणा काय ते ॥ ३ ॥*
तुका म्हणे समर्पिला । तुज विठ्ठला देहभाव ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – सामोग्री–सामग्री

अर्थ – देवा यथाविधीने पूजा करावी अशी काही सामग्री मजजवळ नाही १ परतु दातारा, माझा सर्व भार आता तुम्हीच चालवीत आहात २ नारायणा, जे काही पवित्र व मगल आहे ते तुम्ही जाणीत आहात ३ तुकाराम महाराज म्हणतात देवा हा सव देहभाव मी तुलाच समर्पित केलेला आहे ४

९३३ भवसिंधूचे हे तारू । मज विचारू पाहाता ॥ १ ॥
चित्तीं तुझे धरिन पाय । सुख काय तें तेथें ॥ २ ॥
माझ्या खुणा मनापाशी । तें या रसीं बुडाले ॥ ३ ॥
तुका म्हणे वर्म आले । हाता भले हें माझ्या ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – विचारू–विचार करून पाहता

---

१ आम्ही जाणा
तु गाथा ५४

अर्थ :– मी नीट विचार करून पाहिले, तेव्हा देवा, तुम्ही मला भवसिंधू तरून नेण्याइतके समर्थ असे तारू आहात हे समजले. १ देवा, तुमचेच पाय मी माझ्या चित्तात धारण करीन सुख काय ते तेथेच आहे. २ माझ्या मनाच्या असलेल्या परमार्थाच्या सर्व खुणा या हरीच्या भक्तिरसात बुडून गेल्या आहेत ३ तुकाराम महाराज म्हणतात, माझ्या हातात हे मर्म आले; हे फार चांगले झाले आहे ४

९३४ पाहाता श्रीमुख सुखावले सुख । डोळियांची भूक न वजे माझी ॥ १ ॥
जिव्हे गोडी तीन अक्षराचा रस । अमृत जयास फिके पुढें ॥ २ ॥
श्रवणींची वाट चोखाळली शुद्ध । गेले भेदाभेद वारोनियां[1] ॥ ३ ॥
महामळें मन होतें जें गांदले । शुद्ध चोखाळले स्पटिक जैसे ॥ ४ ॥
तुका म्हणे माझ्या जीवाचें जीवन । विठ्ठल निधान सापडलें ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – न वजे–जात नाही, गादले–भरलेले

अर्थ – या श्रीहरीचे मुख पाहताच माझे सुख सुखावले गेले व माझ्या डोळ्याची भूक ही कधी जात नाही असे झाले. १ विठ्ठल या तीन अक्षराच्या भक्तिरसात गोडी निर्माण झाली असून तिच्यापुढे प्रत्यक्ष अमृतही फिके पडत आहे २ या श्रीहरीचे गुणगान ऐकण्याची वाटही चांगली शुद्धपणे चोखाळलेली असून सर्व भेदाभेद संपून गेले आहेत. ३ माझे मन मोठ्या मळामुळे भरलेले होते, ते यामुळे शुद्ध होऊन स्फटिकाप्रमाणे निर्मळ झाले. ४ तुकाराम महाराज म्हणतात, हा विठ्ठल म्हणजे माझ्या जीवनाचे जीवन असून एका फार मोठ्या मोलाचा साठा मला सापडला आहे ५

९३५ हाचि परमानंद आळंगीन बाहीं । क्षेम देता ठायीं द्वैत तुटे ॥ १ ॥
बोलायासि मात मन निवे हर्षे चित्त । दुणी वाढे प्रीत प्रेमसुख[2] ॥ २ ॥
जनात भूषण वैकुंठी सरता । फावले स्वहिता सर्वभावें ॥ ३ ॥
तुटला वेव्हार माया लोकाचार । समूळ संसार पारुषला ॥ ४ ॥
तुका म्हणे हा विठ्ठलचि व्हावा । आणिकी या जीवा चाड नाहीं ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – आळगीन–आलिंगीन, बाहीं–बाहूनी.

अर्थ :– या परमानंदस्वरूपाच्या श्रीहरीस मी दोनही बाहूनी आलिंगन देईन. त्याला आलिंगन दिल्या-बरोबर द्वैताचा नाश होतो १ त्याच्याविषयी गोष्टी करण्यातच विशेष आनंद चित्ताला होतो, मन निवून जाते व प्रेमसुखात दुपटीने वाढ होते २ लोकात भूषण वाढून शेवटी वैकुंठाची प्राप्ती होते सर्व प्रकारचे स्वहित साधले जाते ३ सर्व प्रकारचा लौकिक व्यवहार संपतो, मायिक लोकाचार संपून जातो, आणि संसाराविषयीची भावना समूळ नष्ट होते ४ तुकाराम महाराज म्हणतात, मला याच विठ्ठलाची संगतसोबत हवी; माझ्या जीवास आणखी दुसरी कसलीही हौस नाही ५

९३६ आमुची कृपाळू तूं होसी माउली । विठ्ठले साउली शरणागता ॥ १ ॥
प्रेमपान्हा स्तनीं सदा सर्वकाळ । दृष्टि हे निर्मळ अमृताची ॥ २ ॥
भूक तान दु:ख वारी नेदी सीण । अतरींचा गुण जाणोनिया ॥ ३ ॥
आशा तृष्णा माया चिंता दवडी दुरी । ठाव आम्हा करीं खेळावया ॥ ४ ॥
तुका म्हणे लावीं संताचा सांगात । जेथें न पवे हात कळिकाळाचा ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा.– दवडी–नाहीशा कर, ठाव–स्थान, सांगात–सोबत.

१ निवारूनि, २ प्रेमसुखें

अर्थ – देवा, तू आमची कृपाळ अशी माउली आहेस आमची सावलीच असणाऱ्या विठ्ठला, मी तुला शरण आलेलो आहे १ देवा, तुझ्या स्तनात माझ्यासाठी सदासर्वकाळ प्रेमपान्हा तयार असावा तुझी दृष्टी अमृताची व निर्मळ अशी मजवर असावी २ देवा, मला भूक, तहान, दु:ख, त्रास याचे कष्ट होऊ नयेत तू माझ्या अंत:करणाचे गुण जाणून आहेस ३ आशा, चिंता, तृष्णा, माया याना तू दूर घालविले असून, आम्हास तुझ्या स्वरूपात खेळण्यासाठी स्थान निर्माण केले आहेस ४ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तू आम्हाला संताची संगत दे ती अशी दे की, ज्या ठिकाणी कळिकाळ यमाचाही हात पोचू शकणार नाही ५

९३७ जेथें जावें तेथें कपाळ सरिसे । लाभ तो विशेषें संतसगें ॥ १ ॥
पूर्व पुण्यें जरि होतीं सानुकूळ । अंतरायमूळ नुपजे तेथें ॥ २ ॥
भाग्य तरी नव्हे धन पुत्र दारा । निकट वास बरा संतापायीं ॥ ३ ॥
तुका म्हणे हेचि करावी मिरासी । बळी संतापाशीं द्यावा जीव ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – कपाळ–नशीब, सरिसे–बरोबर

अर्थ – ज्या ज्या ठिकाणी जावे, त्या त्या ठिकाणी आपले नशीब आपल्याबरोबर येत असते संताच्या संगतीने आपल्याला विशेष लाभ होत असतो १ आपल्याला आपली पूर्वपुण्ये जर अनुकूल झाली तर मग या विठ्ठलाशी किंवा संताशी वियोग होणारे मूळच उत्पन्न होणार नाही. २ संपत्ती, मुलगा, पत्नी हे खरे म्हणजे आपले भाग्य नव्हे या संताच्या चरणापाशी असलेला निवास चागला असतो ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, संताचे पाय हेच आमच्या मिराशीचे ठाणे व्हावे व आमच्या जीवाचा बळी याच संतांच्या पायावर जावा असे वाटते. ४

९३८ आतां कांहीं सोस न करीं आणीक । धरीन तें एक हेंचि दृढ ॥ १ ॥
जेणें भवसिंधु उतरिजे पार । तुटे[1] हा दुस्तर गर्भवास ॥ २ ॥
जोडीन तें आतां देवाचे चरण । अविनाश धन परमार्थ ॥ ३ ॥
तुका म्हणे बरा जोडला हा देह । मनुष्यपणें इहलोका आलों ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – तुटे–सपरे, दुस्तर–सपण्यास कठिण असा

अर्थ :– आता मी या आयुष्यात इतर काही सोस करणार नाही या विठ्ठलाचे पाय दृढ भावाने चित्तात धरून ठेवीन १ यामुळे भवसिंधू उतरून जाण्यास मदत होईल सपण्यास कठिण असा गर्भवासही सपेल २ या आयुष्यात मी आता देवाचे चरण जोडीन, हेच माझे परमार्थविषयक असे अविनाशी धन आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, बरे झाले, हा मनुष्यदेह मला मिळाला आणि याच देहाने मी या लोकी जन्मास आलो ४

९३९ जतन करीन जीवें । शुद्धभावें करूनी ॥ १ ॥
विठ्ठल विठ्ठल हे धन । जीवन अंतकाळींचें ॥ २ ॥
वर्दळ हे संचित सारूं । बरवा करूं उदिम हा ॥ ३ ॥
तुका म्हणे हृदयपेटीं । ये संपुटीं साठवूं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – वर्दळ–वरवरचे

अर्थ – या विठ्ठलाचा ठेवा मी आता जीवाभावाने जपून ठेवीन शुद्ध भावाने मी त्याचे रक्षण करीन १ अंतकाळच्या जीवनाचे मुख्य धन, हे विठ्ठलरूपाचेच आहे २ वरवरचे संचितकर्म जे आहे ते दूर सारून या विठ्ठलाच्या प्राप्तीचा व्यवहार यथार्थकी करू ३ तुकाराम महाराज म्हणतात, या विठ्ठलास हृदयाच्या पेटीत, या संपुटात साठवून ठेवू ४

---

[1] पुढें

९४० एवढा प्रभु भावे । तेणे सपुष्टीं राहावे ॥ १ ॥
होय भक्तीं केला तैसा । पुरवी धरावी ते इच्छा ॥ २ ॥
एवढा जगदानी । मागे तुळसीदळ पाणी ॥ ३ ॥
आला नावा रूपा । तुका म्हणे जाला सोपा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – सपुष्टीं–भक्ताच्या हृदयरूपी सपुष्टात, सपुटात

अर्थ – हा प्रभू खरे पाहता केवढा मोठा, पण नवल असे की, तो भक्ताच्या प्रेमासाठी तो त्याच्या हृदयसपुटात वास करतो १ याची जशी भक्ती करावी तसा तो प्रसन्न होतो जो इच्छा मनात धरावी ती तो पुरवितो २ एवढा मोठा हा सव जगास दान देणारा ईश्वर, पण भक्ताजवळ केवळ एखादे तुळशीचे पान मागतो पाण्याचा थेंब मागतो, व तेवढ्याने तो सतुष्ट होतो ३ हा ईश्वर आपल्या भक्तासाठी खरे म्हणजे नावारूपास, आला व तुकाराम महाराज म्हणतात, हा सर्व लोकाना अतिशय सुलभ असाही झाला ४

९४१ भाग्यें ऐसी जाली जोडी । आता घडी विसभेना ॥ १ ॥
विटेवरी समचरण । सतीं खुण सागितली ॥ २ ॥
अवघें आता काम सारू । हाचि करू कैवाड ॥ ३ ॥
तुका म्हणे खडू खेपा । पुढें पापापुण्याच्या ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – विसभेना–सोडणार नाही कैवाड–निश्चयाने

अर्थ – माझे फार मोठे भाग्य, म्हणून या विठ्ठलाची प्राप्ती मला झाली आता याला मी एक क्षणभरही सोडणार नाही १ सतानी खूण सागितल्याप्रमाणे विटेवर समचरण असलेल्या या देवाचा लाभ मला झाला २ आता बाकीची सर्व कामे दूर सारून याची जपणूक निश्चयाने करू ३ तुकाराम महाराज म्हणतात, पापपुण्यामुळे होणाऱ्या या पुढच्या जन्ममरणाच्या खेपा खडित करू ४

९४२ पतिव्रते जैसा भ्रतार प्रमाण । आम्हा नारायण तैशापरी ॥ १ ॥
सर्वभावे लोभ्या आवडे हे धन । आम्हा नारायण तैशापरी ॥ २ ॥
तुका म्हणे एकविध जाले मन । विठ्ठला वाचून नेणे दुजें ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा – प्रमाण–पूज्य

अर्थ – पतिव्रता स्त्रीस जसा तिचा पती नेहमी पूज्य असतो, त्याप्रमाणे हा नारायण आम्हास अत्यंत प्रिय आहे १ सर्वांचा लोभ असणाऱ्या माणसास ज्याप्रमाणे धन अतिशय प्रिय असते, त्याप्रमाणे या नारायणाविषयी आमच्या मनात प्रीती आहे २ तुकाराम महाराज म्हणतात, या पाडुरगचरणी आमचे मन एकरूप झाले असून या विठ्ठलाशिवाय दुसरे मी काहीही जाणीत नाही ३

९४३ विठ्ठल गीतीं गावा विठ्ठल चित्तीं ध्यावा । विठ्ठल उभा पाहावा विटेवरी ॥ १ ॥
अनाथाचा बधु विठ्ठल कृपासिधु । तोडी भवबधु यमपाश ॥ २ ॥
तोचि शरणागता हा विठ्ठल मुक्तिदाता । विठ्ठल या सतासमागमें ॥ ३ ॥
विठ्ठल गुणनिधि विठ्ठल सर्व सिद्धि । लागली समाधि विठ्ठलनामें ॥ ४ ॥
विठ्ठलाचे नाम घेता जाले सुख । गोडावले मुख तुका म्हणे ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – गोडावले–गोड झाले

अर्थ – या विठ्ठलाचेच नाम गीतामध्ये गावे, याच विठ्ठलाचे ध्यान चित्तामध्ये धरावे विटेवर उभा असणारा हा विठ्ठल डोळे भरून पाहावा १ हा विठ्ठल अनाथांचा बधू असून कृपेचा सागर आहे हाच आपल्या

भक्ताचे भवपाश व यमपाश तोडून टाकतो २ शरण आलेल्या भक्तांना हाच विठ्ठल मुक्तीचे दान देणारा असून या सतसमागमात हा नेहमीच प्राप्त होतो. ३ हा विठ्ठल म्हणजे गुणाचा साठा असून याच्यामुळेच सर्व सिद्धी प्राप्त होण्यासारख्या आहेत. या विठ्ठलाच्या नामामुळे समाधीच लागून राहते. ४ विठ्ठलाचे नाम घेताना फारच सुख झाले असून मुखही गोड झाले आहे, असे तुकाराम महाराज म्हणतात. ५

९४४ विठो सांपडावया हातीं । ठावी जाली एक गती ।
न धरी भय चित्तीं । बळ किती तयाचे ॥ १ ॥
लागे आपणचि हातीं । किव भाकावी काकुलती ।
करीं मग चित्तीं । असेल तें तयाचे ॥ २ ॥
एकलिया भावबळें । कें सांपडे तो काळें ।
वैष्णवांच्या मेळें । उभा ठाके हाकेसी ॥ ३ ॥
बाधा माझिया जीवासी । तुका म्हणे प्रेमापाशीं ।
न सोडीं तयासी । सर्वस्वासी उदार ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – गती–मार्ग

अर्थः– हा विठ्ठल हातात सापडण्याचा एक मार्ग सापडलेला आहे. आता त्याची भीती तुम्ही मुळीच बाळगू नका, त्याची शक्ती अशी कितीशी आहे ? १ त्याच्याजवळ जरा काकुळतीचा भाव व्यक्त केला, की तो आपण होऊन आपल्या भक्ताच्या हातात येतो. मग तो आपल्या मनात असेल त्याप्रमाणे त्या भक्ताचे करतो. २ एकट्याच्याच भक्तीच्या बळाने तो कधी तरी कालान्तराने सापडतो; पण वैष्णवाच्या समुदायात मात्र नुसती हाक मारली तरी तो उभा राहतो ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा या देवाला माझ्या जीवाशी बांधून टाकावे. प्रेमपाशाने हृदयाशी बांधल्यावर सर्वांविषयी मी उदार असलो तरी याला मात्र सोडणार नाही. ४

९४५ वाट वैकुंठीं पाहाती । भक्त कें पां येथें येती ।
तया जन्ममरणखती । नाहीं चित्तीं परलोक ॥ १ ॥
धन्यधन्य हरिचे दास । तयां सुलभ गर्भवास ।
ब्रह्मादिक करिती आस । तीर्थावास[1] भेटीची ॥ २ ॥
कथाश्रवण व्हावयास । यमधर्मा थोर आस ।
पाहे रात्रदिवस । वाट कर जोडोनियां ॥ ३ ॥
रिद्धिसिध्दी न पाचारितां । त्या धुंडिती हरिभक्तां ॥
मोक्षसायुज्यता । वाट पाहे भक्तांची ॥ ४ ॥
असती जेथें उभे ठेले । सदा प्रेमसुखें धाले ।
आणीक ही उध्दरिले । महादोषी चांडाळ ॥ ५ ॥
सकळ करिती त्याची आस । सर्वभावें ते उदास ।
धन्यभाग्य त्यास । तुका म्हणे दरुषणें ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपाः– कें–केव्हा, खती–काळजी, सायुज्यता–चतुर्विध मुक्तीमधील एक.

अर्थः– या वैकुंठात भक्त केव्हा येतील ? याविषयी तेथील लोक एकसारखी वाट पाहात असतात. पण भक्तांना जन्ममरणाची चिंता कधीच नसल्याने त्यांच्या चित्तात परलोकाची अथवा वैकुंठाची इच्छा कधीच नसते १ श्रीहरीचे हे दास धन्य होत. त्यांना गर्भवासाचे दुःख नेहमीच सहजसुलभ वाटते. ब्रह्मादिक देवही यांच्या भेटीची

[1] तीर्थां आस

इच्छा करीत असतात आणि अनेक तीर्थे यांनाच भेटावयास उत्सुक असतात २ यांच्याकडून हरिकथेचे श्रवण व्हावे म्हणून यमधर्मासारखे थोर थोरही यांची वाट रात्रंदिवस पाहात असतात हात जोडून ते मार्गप्रतीक्षा करतात ३ रिद्धीसिद्धी या न बोलावता येऊन हरिभक्ताचा शोध घेतात सायुज्यतेची मुक्ती अशा भक्ताची उत्सुकतेने वाट पाहात असते ४ हे हरिभक्त ज्या ठिकाणी उभे राहतील, त्या ठिकाणी नेहमीच प्रेमसुखात तल्लीन झालेले दिसतील यांनी आपल्या संगतीने अनेक महादोषी व चाडाळ अशा दुर्जनाचाही उद्धार केला आहे ५ तुकाराम महाराज म्हणतात, सर्वजण यांच्याच दर्शनाची इच्छा करितात, पण हे हरिदास मात्र सर्व भावानी उदासच असतात यांचे दर्शन ज्याना होते त्याचे भाग्य धन्य आहे, असेच म्हणावयास हवे ६

९४६ सोनें दावी वरी तांबें तयापोटीं । खरियाचे साटीं विकूं पाहे ॥ १ ॥
पारखी तो जाणे तयाचे जीवींचे । निवडी दोहींचे वेगळाले ॥ २ ॥
क्षीरा नीरा कैसें होय एकपण । स्वादी तोचि भिन्न भिन्न काढी ॥ ३ ॥
तुका म्हणे धीता [1]नागवलाचि खोटा । अपमान मोटा पावईल ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – पारखी–परीक्षा करणारा, क्षीर–दूध, नीर–पाणी धीटा–खोटा

अर्थ – एखाद्या दागिन्यावर सुवर्णाची चमक असावी, पण पोटात मात्र तांबेच बसविलेले असावे, व खरे सोने म्हणून तो विकायला जावा १ पण नीट परीक्षा करणारा जो असतो तो त्यातील आत्यात ओळखतात व तांबे आणि सोने वेगळे काढून दाखवितात २ दूध व पाणी यांचे एक मूल्य कसे होईल ? स्वादामुळे दोनही वस्तू भिन्न भिन्न आहेत असेच ठरेल ३ तुकाराम महाराज म्हणतात असा हा स्वत मोठे असल्याचा अभिमान खोटाच आहे त्यामुळे अपमान मात्र होण्याचा संभव फार असतो ४

९४७ फोडुनि सांगडी बांधली माजासी । पैल थडी कैसी पावे सहजी ॥ १ ॥
आपला घात आपणचि करी । आणिका सांगता नाइके तरी ॥ २ ॥
मुकेभेणे विष घेऊं पाहे आता । आपल्याचि घाता करूं पाहे ॥ ३ ॥
तुका म्हणे एक चालतील पुढें । तयासी वांकडें जाता ठके ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – सांगडी–नदी तरून जाण्याचे साधन, माजासी–कमरेला मुकेभेणे–भुकेच्या भीतीने

अर्थ – नदीचे पाणी तरून जाण्याचे भोपळ्यासारखे साधन जर फोडून ते कमरेस बांधले तर मग तो सहजासहजी पैलतीरास कसा पोचणार ? १ तो मनुष्य आपला घात आपणच करून घेतो दुसऱ्याने सांगितले तरी ऐकत नाही २ भूक लागली या भीतीने भूक भागविण्यासाठी कुणी जर विष खाल्ले तर मग काय होईल ? आपलाच घात आपण केल्याप्रमाणे होईल ३ तुकाराम महाराज म्हणतात, पूर्वीपासून जे योग्य मार्गाने पुढे चालले आहेत, त्यांच्याच मार्गाने आपणही जावे त्यांच्याहून वेगळ्या मार्गाने जाताच फसल्यासारखे होईल ४

९४८ उपकारासाटीं बोलों हे उपाय । येणेंविण काय आम्हा चाड ॥ १ ॥
बुडता हे जन न देखवे डोळां । येतो कळवळा म्हणउनि ॥ २ ॥
तुका म्हणे माझे देखतिल डोळे । भोग देते वेळे येईल कळो ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा – चाड–गरज

अर्थ – हे परमार्थसाधनाचे उपाय मी केवळ दुसऱ्यावर उपकार करण्यासाठी बोलत आहे नाही तर यांविना माझे काय अडले आहे ? हे सांगण्याची गरज मला काय आहे ? १ परंतु हे अज्ञ लोक अज्ञानात बुडून चालले आहेत त्यांचे दु ख डोळ्यांनी पाहवत नाही याचा कळवळा माझ्या मनात फार येतो २ या संसारी लोकांना भोग भोगण्याची पाळी येईल तेव्हा तुकाराम महाराज म्हणतात, यांच्या दु खाने आमचेच डोळे यांच्याकडे करुणेने पाहतील ३

---

[1] आपण

विवरण:— स्वरूप साक्षात्कार झाल्यावर, स्वतः ईश्वरभेटीने तृप्त झाल्यावर, जीवशिवाच्या, आत्मा-परमात्म्याच्या ऐक्याची प्रचीती आल्यावर साधुसंत कशासाठी या जगात वावरतात? या एका प्रश्नाचे स्पष्ट उत्तर तुकाराम महाराजांनी या एका महत्त्वाच्या अभंगात दिले आहे. सर्व जगत हे एका बीजाचा विस्तार असल्याने व एकच आत्मतत्त्व सर्व वस्तुमात्रात भरून असल्यामुळे, ब्रह्मभाव अथवा साक्षात्काराची भावना ही कधी एकाच व्यक्तीत सीमित होऊन राहात नाही. ती साऱ्या विश्वाला कवटाळण्यास सिद्ध होते. अज्ञानाने कष्टी व दुःखी होणाऱ्या मानवाचे अश्रू पुसायला ती उत्सुक होते. ज्ञानेश्वरापासून तुकाराम-रामदासापर्यंत सर्व संतांनी आपल्या या कार्याचे स्पष्ट केले आहे. धर्माच्या पालनासाठी व पाखंडखंडणासाठी आपण हातात शब्दाचे सोडून चाप धरून हिंडत आहोत, असे तुकोबांनी एका अभंगात म्हटले आहे. जे रंजले-गांजलेले आहेत, त्यांना जवळ करणे हाच साधुसंतांच्या देवत्वाचा मुख्य धर्म आहे, असेही तुकारामबुवा सांगतात. अशा या दुःखी, कष्टी लोकांचा कळवळा या साधुसंतांना मोठाच असतो. सर्व भूतमात्रात भरून राहिलेला ईश्वरी अंश दुःखित झालेला त्यांना पाहावत नाही. 'चिंतेनें उर फाटतो' या शब्दात अस्तान्यस्त झालेल्या समाजिकाच्या दुःखाचे स्वरूप रामदासांनी व्यक्त केले आहे.

९४९ आठवे देव तो करावा उपाव । येर तजीं वाव खटपटा ॥ १ ॥
होईं बा जागा होईं बा जागा । वाउगा कां गा सिणसील ॥ २ ॥
जाणिवेच्या भारें भवाचिये डोहीं । बुडसी तों कांहीं निघेसि ना ॥ ३ ॥
तुका म्हणे देवा पावसील भावें । जाणतां तें ठावें कांहीं नव्हे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:— उपाव-उपाय, येर-दुसरा, वाव-व्यर्थ, जाणिवेच्या-ज्ञानाच्या

अर्थ:— ज्यामुळे ईश्वराची आठवण होईल, तो उपाय आपण करावा. इतर सर्व व्यर्थ आणणारा खटाटोप टाकून द्यावा. १ अरे बाबा, माणसा, तू नीट जागे व्हायेस. उगाच का शिणतोस? कष्टी होतोस? २ ज्ञानाच्या व्यर्थ ओझ्याने तू या संसारसागरात बुडशील मात्र; मग त्यातून सुखरूपपणे बाहेर पडणे, कधी होणार नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, तू एका भावभक्तीच्या बळावरच ईश्वरास प्राप्त करून घेशील. केवळ ज्ञानाने तुला सर्व काही समजेल असे नाही. ४

९५० माझ्या मुखावाटा नयो[१] हें वचन । व्हावें हें संतान द्रव्य कोणां ॥ १ ॥
फुकाचा[२] विभाग पतनदुःखासी । दोहींमुळें त्यासी तेंचि साधे[३] ॥ २ ॥
नाइकावी निंदा स्तुति माझ्या कानें । सादर या मनें होऊनियां ॥ ३ ॥
तुका म्हणे देव असाध्य यामुळें । आशामोहजाळें गुंतलिया ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:— संतान-मूलबाळ.

अर्थ:—कुणाला मूलबाळ व्हावे, कुणाला संतती प्राप्त व्हावी, असे शब्द माझ्या मुखावाटे कधी निघू नयेत. १ कारण या दोन गोष्टींमुळे फुकट दु.खाचा व पतनाचा वाटा मात्र प्राप्त होतो. २ माझ्या कानांनी कुणाची निंदा-स्तुती ऐकू नये व मनाने या मार्गास, म्हणजे निंदास्तुतीच्या मार्गास कधीही लागू नये. ३ तुकाराम महाराज म्हणतात, आशा व नाना मोह यांच्या जाळ्यांत सापडल्यानंतर देव मात्र अप्राप्य होतो. ४

९५१ चित्त ग्वाही तेथें लौकिकाचें काई । स्वहित तें ठायीं आपणापें ॥ १ ॥
मनासी विचार तोचि साच भाय । व्यापक[४] हा देव अंतर्बाहीं ॥ २ ॥
शुद्ध भावा न लगे सुचाया परिहार । उमटे साचार आणिके ठायीं ॥ ३ ॥
भोगित्यासी काज अंतरींचें गोड । वाहिरल्या पाड नाहीं रंगें ॥ ४ ॥
तुका म्हणे भाय शुध्द हें कारण । भाट नारायण होईल त्यांचा ॥ ५ ॥

१ नये, २ फुकाचा, ३ साध्य, ४ व्यापला.

शब्दार्थ व टीपा – ग्वाही–साक्ष, काज–कारण

अर्थ – ज्या ठिकाणी चित्त साक्षी झाले आहे, त्या ठिकाणी लौकिक गोष्टींची काय किंमत ? आपले स्वहित आपणच पाहावे १ अंतर्बाह्य सर्वत्र एकच परमेश्वर भरून राहिलेला आहे, असा जो मनाचा भाव होत असतो, तोच खरा मानावयास हवा २ आपल्या मनातील शुद्ध भाव काही कुणाला सांगावा लागत नाही तो दुसऱ्याच्या ठिकाणी आपल्याकडून प्रकट होत असतो ३ भोगणारा मनुष्य असतो त्यास अंतरंगातील गोडीशी कारण असते, बाहेरच्या रंगास तो कधी भुलत नाही ४ तुकाराम महाराज म्हणतात आपल्या मनातील शुद्ध भाव हेच खरे म्हणजे ईश्वरप्राप्तीचे कारण होय अशा शुद्ध भावाने भजणाऱ्या भक्ताचा तो परमेश्वरच भाट होऊन जातो ५

९५२ नव्हती माझे बोल । अवघें करितो विठ्ठल ।। १ ।।
काहीं न धरावी खंती । हित होईल धरा चित्तीं ।। २ ।।
खोटी ते अहंता । वाट टाकिली सांगता ।। ३ ।।
ज्याचे तोचि जाणे । मी मापाडें तुका म्हणे ।। ४ ।।

शब्दार्थ व टीपा – खंती–चिंता, मापाडें–माप टाकणारा

अर्थ – मी हे जे बोलत आहे, ते काही माझे नव्हेच, ते सर्व त्या विठ्ठलाकडूनच बोलले जात आहे १ याविषयी तुम्ही कसलीही चिंता करू नये यात तुमचे हितच होईल, हे चित्तात नीट धारण करावे २ अहंकाराची खोटी वाट जी असते, ती सांगितल्याबरोबर टाकून द्यावी ३ तुकाराम महाराज म्हणतात, माझकडून बोलविणारा जो विठ्ठल तो खरे काय ते जाणतो, मी केवळ माप टाकणारा मापाडी आहे ४

९५३ वासनेच्या मुखीं अदळूनि भीतें । निर्वाहापुरतें कारण तें ।। १ ।।
या नावें अंतरा आला नारायण । चित्तसमाधान खुण त्याची ।। २ ।।
सर्वकाळ हाचि करणें विचार । विवेकीं सादर आत्मत्वाचे ।। ३ ।।
तुका म्हणे जो जो भजनासी वळे । अंग तो तो कळे सन्निधता ।। ४ ।।

शब्दार्थ व टीपा – भीतें–भिऊन, कारण–कार्य

अर्थ – नाना वासनांना भिऊन, त्याची भीती बाळगून, त्याच्या तोंडात काही देऊन आपण शरीरापुरतेच कार्य करावे १ चित्तात समाधान असणे हीच एक खूण मनात नारायणाचा निवास झाल्याची आहे २ आत्मतत्त्वाचा विवेक मनात निरंतर करून, नेहमी हाच एक विचार करीत असावे ३ तुकाराम महाराज म्हणतात आपण ज्या ज्या प्रमाणात भजनाकडे वळू, त्या त्या प्रमाणात आपल्या अंगाअंगातून ईश्वराची जवळीक अनुभवास येईल ४

९५४ चिंतनें अचिंत राहिलों निश्चळ । तेचि किती काळ वाढवावें ।। १ ।।
अबोल्याचा काळ आतां ऐसावरी । वचनाची उरी उरली नाहीं ।। २ ।।
करूं आला तो तो केला लवलाहो । उरोच संदेहो दिला नाहीं ।। ३ ।।
तुका म्हणे मोह परतेचि ना मागें । म्हणउनि त्यागें त्याग जाला ।। ४ ।।

शब्दार्थ व टीपा – अचिंत–निश्चिंत, चिंतारहित, उरी–उणीव, बाकी

अर्थ – या भगवंताचे चिंतन एकसारखे केल्याने मी चिंतारहित झालो आहे आता हे चिंतन तरी किती काळपर्यंत वाढवावे ? १ आता न बोलण्याचीच वेळ आलेली दिसते काही बोल बोलावेत अशी बाकी आता राहिली आहे असे नाही २ ईश्वरप्राप्तीसाठी जो जो उपाय करावयास हवा, तो तो मी त्वरित केला असून मी माझ्या मनात कुठलाही संशय उरू दिलेला नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात तरीसुद्धा माझ्या मनातील लौकिक गोष्टी विषयींचा मोह कधी संपतच नाही म्हणूनच मी सर्व प्रपंचाचाच त्याग करून या मार्गास येण्याचे निश्चित केले ४

९५५ निर्गुणाचे घ्यावें गुणासी दर्शन । एकाएकीं भिन्न भेद घडे ॥ १ ॥
तुम्हां आम्हां आतां न पडे यावरी । आहों तेंचि वरी जेथें तेथें ॥ २ ॥
आपणापासुनी नसावें अंतर । वेचिलें उत्तर म्हणऊनि ॥ ३ ॥
तुका म्हणे अंगा आली कठिणता । आमच्या अनंता तुम्हां ऐसी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – न पडे–पटणार नाही.

अर्थ :– या सगुण रूपातच त्या निर्गुणनिराकार ईश्वराचे दर्शन घ्यावे हे खरे असले तरी त्यामुळे परमेश्वराच्या एकत्वामध्ये भेद निर्माण होतो १ त्यामुळे नारायणा, तुमचे व आमचे काही पटणार नाही म्हणून यापुढे तुम्ही व आम्ही ज्या स्थानावर होतो तेथेच राहू. २ देवा, आपल्यापासून वेगळे आम्ही नसावे काही अंतर उरू नये, अशी विनवणी आम्ही पुष्कळ वचनानी केलेली आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, अनंता, तुमच्याप्रमाणेच आमच्या अंगात कठिणता निर्माण झालेली आहे. ४

९५६ तुजच पासाव जालोंसों निर्माण । असावे तें भिन्न कासयानें ॥ १ ॥
पाहावा जी ठायीं करूनि विचार । न्यून कोठें फार असेचि ना ॥ २ ॥
ठेविलिये ठायीं आज्ञेचे पाळण । करूनि जतन राहिलोंसें ॥ ३ ॥
तुका म्हणे आतां बोलतसें स्पष्ट । जालों क्रियानष्ट तुम्हाऐसा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– पासाव–पासून, क्रियानष्ट–क्रिया न करणारा ज्याच्या क्रिया करणे संपले आहे असा

अर्थ :– देवा, आम्ही तुमच्यापासूनच निर्माण झालो ना ? मग आम्ही तुमच्यापासून भिन्न कशाने झालो हो ? १ देवा, याचा विचार तुम्हीच करून पाहा ना एकदा तुमच्या-आमच्यात कमीपणा कुठेच असू नये २ ज्या ठिकाणी तुम्ही जसे ठेविले आहे, त्याच स्थितीत तुमच्या आज्ञेचे पालन करून मी राहिलो आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, आता मी तुमच्यासारखाच देवा, काहीही क्रिया न करणारा झालो आहे करून अकर्ता बनलो आहे ४

विवरण –एकाच ब्रह्मतत्त्वापासून, चैतन्यतत्त्वापासून या सर्व चराचर विश्वाची निर्मिती झाली असा सिद्धान्त भारतीय तत्त्वज्ञानात प्रमुखपणे प्रसिद्ध आहे ते तत्त्व अगदी प्रारंभी एकटेच होते, पण पुढे 'बहु स्या प्रजायेय 'अशी त्यास बुद्धी झाली व मग सर्व सृष्टीची उभारणी झाली म्हणजे या एकाच ब्रह्मापासून, एकाच बीजापासून सर्व सृष्टीचा चराचर संसार आकारास आला एकाच अव्यक्तापासून हे सर्व गुणरूपधारी व्यक्त जगत निर्माण झाले या ब्रह्मवृक्षाचे वर्णन महाभारतात फार समर्पक रीतीने आलेले आहे "अव्यक्त प्रकृती हे याचे बीज, बुद्धी हे खोड, अहंकार हा मुख्य पल्लव. मन व दहा इंद्रिये या सूक्ष्म ढोल्या, पंचमहाभूते ह्या मोठ्या शाखा स्थूल महाभूते इतर डहाळ्या, अशा स्वरूपाचा हा ब्रह्मवृक्ष पानाफुलांनी व शुभाशुभ फळांनी नेहमी समृद्ध असता सर्व प्राणिमात्रांना आधारभूत होतो " असे याचे वर्णन आढळते ऋग्वेदादी ग्रंथापासून या प्रक्रियेचे वर्णन करताना या मूलभूत बीजातून निर्माण होणाऱ्या व्यक्त जगतास वृक्ष व त्याचा विस्तार याचीच उपमा देण्यात आलेली आहे हाच उपनिषदे व गीता यातील अश्वत्थ वृक्ष होय.

परब्रह्म किंवा ईश्वर व व्यक्त जगत किंवा जीव याचे हे असे बीजवृक्षाचे नाते लक्षात ठेवूनच साधुसंतांनी मग ईश्वरास प्रश्न मोठ्या अडचणीचा प्रत्येक वेळा टाकलेला दिसतो आम्ही जीव बद्ध आहोत, पापी आहोत, संसारपाशात जखडलेले आहोत, कर्मांनी बद्ध आहोत व यातून आता मुक्त व्हावयास हवे, हा सारखा ध्यास सर्वांना असतो पण मी पापी, मी पतित, मी हीन, मी दुराचारी असे भाग तरी कसे संभवते ? हे पाप आले कोठून ? दुराचाराची वासना उठली कुठून ? यासारख्या प्रश्नांनी साधुसंतांनी देवासही साकडे घातलेले दिसते मग चोखोबांनी विटाळाचे अभंग लिहिले आहेत, त्यात हाच प्रश्न निर्माण केला आहे आमच्यात जर विटाळ असेल, पाप असेल तर देवा, तुम्हीही प्रकृती तपासावयास हवी कारण तू बीजरूपाने आहेस आम्ही कार्यरूपाने आहोत बीजातील सर्व

शब्दार्थ व टीपा – ग्वाही–साक्ष, काज–कारण

अर्थ – ज्या स्थानी चित्त साक्षी झाले आहे त्या ठिकाणी लौकिक गोष्टींची काय किंमत ? आपले स्वहित आपणच पाहावे १ अंतर्बाह्य सर्वत्र एकच परमेश्वर भरुन राहिलेला आहे असा जो मनाचा भाव होत असतो, तोच खरा मानावयास हवा २ आपल्या मनातील शुद्ध भाव काही कुणाला सांगावा लागत नाही तो दुसऱ्याच्या ठिकाणी आपल्याकडून प्रकट होत असतो ३ भोगणारा मनुष्य असतो त्यात अंतरंगातील गोष्टीशी कारण असते, बाहेरच्या रंगास तो कधी भुलत नाही ४ तुकाराम महाराज म्हणतात आपल्या मनातील शुद्ध भाव हेच खरे म्हणजे ईश्वरप्राप्तीचे कारण होय अशा शुद्ध भावाने भजणाऱ्या भक्ताचा तो परमेश्वरच भाट होऊन जातो ५

९५२ नव्हती माझे बोल । अवघें करितो विठ्ठल ।। १ ।।
काहीं न धरावी खंती । हित होइल धरा चित्तीं ।। २ ।।
खोटी ते अहंता । वाट टाकिली सांगता ।। ३ ।।
ज्याचे तोचि जाणे । मी मापाडें तुका म्हणे ।। ४ ।।

शब्दार्थ व टीपा – खंती–चिंता, मापाडें–माप टाकणारा

अर्थ – मी हे जे बोलत आहे, ते काही माझे नव्हेच, ते सर्व त्या विठ्ठलाकडूनच बोलले जात आहे १ याविषयी तुम्ही कसलीही चिंता करू नये यात तुमचे हितच होईल, हे चित्तात नीट धारण करावे २ अहंकाराची खोटी वाट जी असते, ती सांगितल्याबरोबर टाकून द्यावी ३ तुकाराम महाराज म्हणतात, माझ्याकडून बोलविणारा जो विठ्ठल तो खरे काय ते जाणतो, मी केवळ माप टाकणारा मापाडी आहे ४

९५३ वासनेच्या मुखीं अदळूनि भीतें । निर्वाहापुरतें कारण ते ।। १ ।।
या नांवे अंतरा आला नारायण । चित्तसमाधान खुण त्याची ।। २ ।।
सर्वकाळ हाचि करणें विचार । विवेकी सादर आत्मतत्त्वाचे ।। ३ ।।
तुका म्हणे जो जो भजनासी वळे । अंग तो तो कळे सन्निधता ।। ४ ।।

शब्दार्थ व टीपा – भीतें–भिऊन, कारण–काय

अर्थ – नाना वासनांना भिऊन, त्यांची भीती बाळगून, त्यांच्या तोंडात काही देऊन आपण जरुरीपुरतेच कार्य करावे १ चित्तात समाधान असणें हीच एक खूण मनात नारायणाचा निवास झाल्याची आहे २ आत्मतत्त्वाचा विवेक मनात निरंतर करुन, नेहमी हाच एक विचार करीत असावे ३ तुकाराम महाराज म्हणतात आपण ज्या ज्या प्रमाणात भजनाकडे वळू, त्या त्या प्रमाणात आपल्या अंगाअंगातून ईश्वराची जवळीक अनुभवास येईल ४

९५४ चिंतने अचिंत राहिलों निश्चळ । तेचि किती काळ वाढवावें ।। १ ।।
अबोल्याचा काळ आता ऐशावरी । वचनाची उरी उरली नाहीं ।। २ ।।
करू आला तो तो केला लवलाहो । उरोंच संदेहो दिला नाहीं ।। ३ ।।
तुका म्हणे मोह परतेचि ना मागें । म्हणउनि त्यागें त्याग जाला ।। ४ ।।

शब्दार्थ व टीपा – अचिंत–निश्चित, चितारहित, उरी–उणीव, बाकी

अर्थ – या भगवताचे चिंतन एकसारखे केल्याने मी चिंतारहित झालो आहे आता हे चिंतन तरी किती काळपर्यंत वाढवावे ? १ आता न बोलण्याचीच वेळ आलेली दिसते काही बोल बोलावेत अशी बाकी आता राहिली आहे असे नाही २ ईश्वरप्राप्तीसाठी जो जो उपाय करावयास हवा तो तो मी त्वरित केला असून मी माझ्या मनात कुठलाही संशय उरू दिलेला नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात तरीसुद्धा माझ्या मनातील लौकिक गोष्टी विषयींचा मोह कधी संपतच नाही म्हणूनच मी सर्व प्रपंचाचाच त्याग करून या मार्गास येण्याचे निश्चित केले ४

९५५ निर्गुणाचे घ्यावें गुणासी दर्शन । एकाएकीं भिन्न भेद घडे ॥ १ ॥
तुम्हां आम्हा आता न पडे यावरी । आहों तेंचि वरी जेथें तेथें ॥ २ ॥
आपणापासुनी नसावे अंतर । वेचिलें उत्तर म्हणउनि ॥ ३ ॥
तुका म्हणे अंगा आली कठिणता । आमच्या अनंता तुम्हां ऐसी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – न पडे–पटणार नाही

अर्थ – या सगुण रूपातच त्या निर्गुणनिराकार ईश्वराचे दर्शन घ्यावे हे खरे असले तरी त्यामुळे परमेश्वराच्या एकत्वामध्ये भेद निर्माण होतो १ त्यामुळे नारायणा, तुमचे व आमचे काही पटणार नाही म्हणून यापुढे तुम्ही व आम्ही ज्या स्थानावर होतो तेथेच राहू. २ देवा, आपल्यापासून वेगळे आम्ही नसावे काही अंतर उरू नये, अशी विनवणी आम्ही पुष्कळ वचनानी केलेली आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, अनंता, तुमच्या-प्रमाणेच आमच्या अंगात कठिणता निर्माण झालेली आहे. ४

९५६ तुजच पासाव जालोसो निर्माण । असावे तें भिन्न कासयाने ॥ १ ॥
पाहावा जो ठायीं करूनि विचार । न्यून कोठें फार असेचि ना ॥ २ ॥
ठेविलिये ठायीं आज्ञेचे पाळण । करूनि जतन राहिलोसें ॥ ३ ॥
तुका म्हणे आतां बोलतसे स्पष्ट । जालो क्रियानष्ट तुम्हाऐसा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा '– पासाव–पासून, क्रियानष्ट–क्रिया न करणारा ज्याच्या क्रिया करणे संपले आहे असा

अर्थ :– देवा, आम्ही तुमच्यापासूनच निर्माण झालो ना ? मग आम्ही तुमच्यापासून भिन्न कशाने झालो हो ? १ देवा, याचा विचार तुम्हीच करून पाहा ना एकदा तुमच्या-आमच्यात कमीपणा कुठेच असू नये २ ज्या ठिकाणी तुम्ही जसे ठेविले आहे, त्याच स्थितीत तुमच्या आज्ञेचे पालन करून मी राहिलो आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, आता मी तुझ्यासारखाच देवा, काहीही क्रिया न करणारा झालो आहे करून अकर्ता बनलो आहे ४

विवरण –एकाच ब्रह्मतत्त्वापासून, चैतन्यतत्त्वापासून या सर्व चराचर विश्वाची निर्मिती झाली असा सिद्धान्त भारतीय तत्त्वज्ञानात प्रमुखपणे प्रसिद्ध आहे ते तत्त्व अगदी प्रारंभी एकटेच होते पण पुढे ' बहु स्या प्रजायेय ' अशी त्यासच वृद्धी झाली व मग सर्व सृष्टीची उभारणी झाली म्हणजे या एकाच ब्रह्मापासून, एकाच बीजापासून सर्व सृष्टीचा चराचर संसार आकाराम आला एकाच अव्यक्तापासून हे सर्व गुणरूपधारी व्यक्त जगत निर्माण झाले या ब्रह्मवृक्षाचे वर्णन महाभारतात फार समर्पक रीतीने आलेले आहे " अव्यक्त प्रकृती हे याचे बीज बुद्धी हे खोड, अहंकार हा मुख्य पल्लव मन व दहा इंद्रिये या सूक्ष्म डोल्या, पंचमहाभूते हा मोठया शाखा स्थूल महाभूते इतर डहाळ्या, अशा स्वरूपाचा हा ब्रह्मवृक्ष पानाफुलानी व शुभाशुभ फळानी नेहमी समृद्ध असतो सर्व प्राणिमात्राना आधारभूत होतो ' असे याचे वर्णन आढळते ऋग्वेदादी ग्रंथापासून या प्रक्रियेचे वर्णन करताना या मूलभूत बीजा-तून निर्माण होणाऱ्या व्यक्त जगनाम वृक्ष व त्याचा विस्तार यांचीच उपमा देण्यात आलेली आहे हाच उपनिषदे व गीता यातील अश्वत्थ वृक्ष होय.

परब्रह्म किंवा ईश्वर व व्यक्त जगत किंवा जीव यात हे असे बीजवृक्षाचे नाते लक्षात ठेवूनच साधुसतानी मग ईश्वरास प्रश्न मोठ्या अडचणीचा कित्येक वेळा टाकलेला दिसतो आम्ही जीव बद्ध आहोत, पापी आहोत, संसारपाशात जखडलेले आहोत, कर्मांनी बद्ध आहोत व यातून आता मुक्त व्हावयास हवे, हा सारखा ध्यास सर्वांना असतो पण मी पापी, मी पतित, मी हीन मी दुराचारी अशी भाषा तरी कशी संभवते ? हे पाप आले कोठून ? दुराचाराची वासना उठली कुठून ? यासारख्या प्रश्नानी साधुसतानी देवासही सावडे घातलेले दिसत सत चोखामेळ्यानी विटाळाचे अभग लिहिले आहेत त्यात हाच प्रश्न निर्माण केला आहे आमच्यात जर विटाळ असेल, पाप असेल तर देवा, तुझीही प्रकृती तपासावयास हवी कारण तू बीजरूपाने आहेस आम्ही कार्यरूपानी आहोत बीजातील सर्व

गुणदोष वृक्षाच्या फुलाफळात येतात ना ? मग याचा दोष कुणाकडे ? या प्रश्नाच्या उत्तराचा शोध घेण्याचा निष्कर्ष असा की, आम्ही सर्व देवा, तुझ्यापासून निर्माण झालेलो असल्यामुळे तुमच्या–आमच्यात भिन्नता नसावी तुकोबांची शिष्या बहिणाबाई हिने तर एका अभगात या भूमिकेवरून विठ्ठलास विचारिले आहे,'' तुम्ही आम्ही सुखें होतों एके ठायीं । कोणते अन्यायीं सापडलों ।। तुझ्याचि हिताने वाढला ससार । आम्ही का रे दूर अतरलों ? '' तुझ्याच इच्छेने हा ससार वाढला, मग तू स्वतत्र, शुद्ध, मुक्त व मी मात्र बद्ध, पतित कसा ? असा हा प्रश्न आहे

सर्व चराचर जगत व अव्यक्त ब्रह्मतत्त्व याच्या या विशेष नात्यावर आधारलेला हा भक्तीचा विकास मराठी सतानी अतिशय गोड व लडिवाळ स्वरूपात रगविला आहे या त्याच्या सुखविलासास तत्त्वज्ञानाचे पाठबळ आहेच ' मया ततमिद सर्वं जगदव्यक्तमूर्तिना । मत्स्थानि सर्वभूतानि ' मी आपल्या अव्यक्त स्वरूपाने हे सर्व जग विस्तारलेले आहे व माझ्या ठिकाणी ही सर्व भूते आहेत अशा अर्थाच्या गीतेतील श्लोकावर भाष्य करिताना ज्ञानेश्वरानी अतिशय बहार करून आत्मा व परमात्मा, जीव व शिव, ईश्वर व भक्त याचा एकत्वाचा सबध वर्णन केलेला आहे त्यानी अनेक गरस व समर्पक दृष्टान्त देऊन म्हटले आहे की, ' माझेया विस्तारलेपणा नावे । हें जगचि नोहे आघवें ? । जैसे दूध मुराले स्वभावें । तरि तेंचि दहीं ।। का बीजचि जाहले तरु । अथवा भागराचि अलकारु । तैसा मज एकाचा विस्तारु । तें हे जग ।। ''

९५७ प्रीतिभग माझा केला पाडुरगा । भक्तिरस सागा का जी तुम्हीं ।। १ ।।
म्हणऊनि काही न ठेवींचि उरी । आलो वर्मावरी एकाएकीं ।। २ ।।
न देखोचि काही परतो माघारी । उरली ते उरी नाही मुळीं ।। ३ ।।
तुका म्हणे आला अतरासी खड । तरि माझें तोंड खर्वाळिले ।। ४ ।।

शब्दार्थ व टीपा.– उरी–कमतरता, वर्मावरी–सूक्ष्म मुद्यावर अतरासी–सवधास

अर्थ – पाडुरगा, या भक्तिरसाच्या निमित्ताने तुम्ही माझ्या प्रीतीचा भग केला आहे ना ? १ म्हणूनच मी आता कसलीच कमतरता न ठेवता, मी सूक्ष्म मुद्यावर येऊन तुमची वर्मे काढणार आहे २ तुमच्यापासून काही माघारे परतून येईल, असे मी पाहणारच नाही काही कमतरताही उरू देणार नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, तुमच्या-आमच्या सवधास असा हा खड पडला तर माझे तोंड मात्र खवळून जाईल ४

९५८ लटिका ऐसा म्हणता देव । सदेहसा वाटतसे ।। १ ।।
ऐसे आलें अनुभवा । मज ही सेवा करिता ।। २ ।।
शून्याकारी बहु मोळा । भेंडोळा हे पवाडे ।। ३ ।।
तुका म्हणे ताळी नाहीं । एके ठायी चपळत्वे ।। ४ ।।

शब्दार्थ व टीपा – लटिका–खोटा, मोळा–रीत, भेंडोळा–गुडाळे, ताळी–ताळमेळ

अर्थ – हा देव खोटाच आहे की काय, असा सशय माझ्या मनात आलेला आहे १ याची सेवा करता करता हाच अनुभव मला आलेला आहे २ तुम्ही देवा, शून्याकारी आहात, व तसेच असण्याची तुमची रीत आहे; असा तुमच्या कीर्तीचा डका सर्वत्र गर्जत आहे तुमच्या कीर्तीचे हे भेंडोळे सर्वत्र प्रसिद्ध आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, तुम्ही एकाच ठिकाणी असूनही चपळ असल्यामुळे तुमच्या कोणत्याही गोष्टीत ताळमेळ बसत नाही ४

९५९ जैशासाटीं तैसे व्हावें । हे बरवें कळलेसे ।। १ ।।
उदास[1] तूं नारायणा । मी ही म्हणा तुम्हीच ।। २ ।।
ठका महाठक जोडा । जो धडफुडा लागासी ।। ३ ।।
एकांगीच मांडे तुका । नाहीं धोका जीवित्वे ।। ४ ।।

---

१ उदार

शब्दार्थ व टीपा :– बरवें–चांगले, धडकुडा–धडधडीत, प्रत्यक्ष

अर्थ :– जो जसा असेल तसे आपण व्हावे, हे आम्हांस चांगले समजून आले आहे. १ नारायणा, तू जर उदास असशील, तर मीही तसाच उदास झालो आहे २ एका ठकास दुसरा महाठक भेटला, तसा तुमचा व आमचा प्रत्यक्ष संबंध आलेला आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी एकाकी होऊनच माझा जीव बिनधोक असल्याने या देवापाशी असा भाडत आहे. ४

९६० बहुतां रीती काकुलती । आलों चित्तीं न धराच ॥ १ ॥
आतां काशासाटीं देवा । मिथ्या हेवा वाढवूं ॥ २ ॥
तुम्हां आम्हां जाली तुटी । आतां भेटी चिंतनें ॥ ३ ॥
तुका म्हणे लाजिरवाणें । अधीर जिणें इच्छेचें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– हेवा–हाव

अर्थ :– देवा, मी तुमच्यासाठी अनेक प्रकारांनी काकुळतीस आलो आहे; पण तुम्ही मात्र यासंबंधी तुमच्या चित्तात काहीही आणलेले दिसत नाही. १ मग देवा, आता कशासाठी खोटी हाव मी माझ्या मनात वाढवू? २ देवा, तुमच्याआमच्यांत ताटातुटी झाली आहे. आता तुमच्यात व आमच्यात भेट होणार, ती केवळ तुमच्याविषयीच्या चिंतनानेच. ३ तुकाराम महाराज म्हणतात, असे हे जिणे मनातील इच्छेमुळे मोठे लाजिरवाणे झाले आहे. ४

९६१ आश्चर्य तें एक जालें । मना आलें माझिया ॥ १ ॥
मढ्यापाशीं करुणा केली । तैसी गेली वृथा हे ॥ २ ॥
न यावा तो कैसा राग । खोटें मग देखोनि ॥ ३ ॥
तुका म्हणे कैचा बोला । शोध विठ्ठला माझिया ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– मढ्यापाशी–प्रेताजवळ ?

अर्थ :– एक आश्चर्याची गोष्ट घडलेली माझ्या मनात आलेली आहे. १ प्रेतापाशी बसून त्याच्या नातेवाईकांनी केलेला शोक जसा व्यर्थ जातो, तशीच मी आजवर देवा, तुमचेपाशी करुणा भाकली ती फुकट गेली. २ एखादे खोटे कृत्य पाहून मग राग कसा येऊ नये? ३ तुकाराम महाराज म्हणतात, विठ्ठला, माझ्या शब्दांना हा कसला शोध लागला? ४

९६२ मागायाची नाहीं इच्छा । जो मी ऐसा संकोचों ॥ १ ॥
¹लटकियाची न करूं स्तुति । इच्छा चित्तीं धरूनि ॥ २ ॥
हिशोबें तें आलें घ्यावें । हें तों ठावें सकळांसी ॥ ३ ॥
तुका म्हणे स्वामिसेवा । येथें देवा काशाची ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – संकोचों–संकोच करू

अर्थ :– मला कोणतीही वस्तू मागण्याची इच्छा नसल्यामुळे मी संकोच कोणत्या गोष्टीसाठी धरावा? १ कुठल्याही खोट्या गोष्टीची मी स्तुती करणार नाही; कारण माझ्या मनात कोणतीच इच्छा नसते. २ जे हिशोबाने येईल त्याचा स्वीकार करावा, हे तर सर्वांनाच समजते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, या ठिकाणी कसली स्वामीसेवा आहे? ४

९६३ पाठवणें¹ पडणें पायां । उद्धार वांयां काशाचा ॥ १ ॥
घडलें तें भेटीसवें । दिसेल बरवें सकळां ॥ २ ॥

---

१ पाटवणे.

गुणदोष वृक्षाच्या फुलाफळात येतात ना ? मग याचा दोष कुणाकडे ? या प्रश्नाच्या उत्तराचा शोध घेण्याचा निष्कर्ष असा की, आम्ही सर्व देवा, तुझ्यापासून निर्माण झाल्लो असल्यामुळे तुमच्या–आमच्यात भिन्नता नसावी तुकोबाची शिष्या बहिणाबाई हिने तर एका अभगात या भूमिकेवरून विठ्ठलास विचारिले आहे,' तुम्ही आम्ही मुळें होतों एके ठायीं । कोणते अन्यायीं सापडलों ॥ तुम्याचि हिताने वाढला ससार । आम्ही का रे दूर अतरलों ?" तुझ्याच इच्छेन हा ससार वाढला, मग तू स्वतत्र, शुद्ध, मुक्त व मी मात्र बद्ध, पतित कसा ? असा हा प्रश्न आहे

सर्व चराचर जगत व अव्यक्त ब्रह्मतत्त्व याच्या या विशेष नात्यावर आधारलेला हा भक्तीचा विकास मराठी सतानी अतिशय गोड व लडिवाळ स्वरूपात रगविला आहे या त्यांच्या मुखविलासास तत्त्वज्ञानाचे पाठबळ आहेच ' मया ततमिदं सर्वं जगदव्यक्तमूर्तिना । मत्स्थानि सर्वभूतानि ' मी आपल्या अव्यक्त स्वरूपाने हे सर्व जग विस्तारलेले आहे व माझ्या ठिकाणी ही सर्व भूतें आहेत अशा अर्थाच्या गीतेतील श्लोकावर भाष्य करिताना ज्ञानेश्वरानी अतिशय वहार करून आत्मा व परमात्मा, जीव व शिव, ईश्वर व भक्त याचा एकत्वाचा सबध वर्णन केलेला आहे त्यानी अनेक सरस व समर्पक दृष्टान्त देऊन म्हटले आहे की, माझेया विस्तारलेपणा नावे । हें जगचि नोहे आघवे ? । जैसें दूध मुराले स्वभावें । तरि तेंचि दहीं ॥ का बीजचि जाहले तरू । अथवा भांगाराचि अलकारु । तैसा मज एकाचा विस्तारु । ते हे जग ॥ '

९५७ प्रीतिभग माझा केला पाडुरगा । भक्तिरस सागा का जी तुम्हीं ॥ १ ॥
म्हणऊनि काही न ठेवींचि उरी । आलों वर्मावरी एकाएकीं ॥ २ ॥
न देखोंचि काहीं परती माघारी । उरली ते उरी नाही मुळीं ॥ ३ ॥
तुका म्हणे आला अतरासी खड । तरि माझें तोड खवळिले ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – उरी–कमतरता, वर्मावरी–सूक्ष्म मुद्यावर अतरासी–सबधास

अर्थ – पाडुरगा या भक्तिरसाच्या निमित्ताने तुम्ही माझ्या प्रीतीचा भग केला आहे ना ? १ म्हणूनच मी आता कसलीच कमतरता न ठेवता, मी सूक्ष्म मुद्यावर येऊन तुमची वर्मे काढणार आहे २ तुमच्यापासून काही माघारे परतून येईल, असे मी पाहणारच नाही काही कमतरताही उरू देणार नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, तुमच्या-आमच्या सबधास असा हा खड पडला तर माझे तोंड मात्र खवळून जाईल ४

९५८ लटिका ऐसा म्हणता देव । सदेहसा वाटतसे ॥ १ ॥
ऐसे आले अनुभवा । मज ही सेवा करिता ॥ २ ॥
शून्याकारी बहु मोळा । भेंडोळा हे पवाडे ॥ ३ ॥
तुका म्हणे ताळी नाहीं । एके ठायीं चपळत्वे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – लटिका–खोटा मोळा–रीत भेंडोळा–गुडाळ ताळी–ताळमेळ

अर्थ – हा देव खोटाच आहे की काय, असा सशय माझ्या मनात आलेला आहे १ याची सेवा करता करता हाच अनुभव मला आलेला आहे २ तुम्ही देवा, शून्याकारी आहात, व तसेच असण्याची तुमची रीत आहे, असा तुमच्या कीर्तीचा डका सर्वत्र गर्जत आहे तुमच्या कीर्तीचे हे भेंडोळे सर्वत्र प्रसिद्ध आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, तुम्ही एकाच ठिकाणी असूनही चपळ असल्यामुळे तुमच्या कोणत्याही गोष्टीत ताळमेळ बसत नाही ४

९५९ जैशासाठी तैसे व्हावे । हे बरवे कळलेसे ॥ १ ॥
उदास[1] तू नारायणा । मी ही म्हणा तुम्हीच ॥ २ ॥
ठका महाठक जोडा । जो धडफुडा लागासी ॥ ३ ॥
एकागीच भाडे तुका । नाहीं धोका जीवित्वे ॥ ४ ॥

१ उदार

शब्दार्थ व टीपा :– बरवें–चांगले, धडफुडा–धडधडीत, प्रत्यक्ष.

अर्थ :– जो जसा असेल तसे आपण व्हावे, हे आम्हांस चागले समजून आले आहे. १ नारायणा, तू जर उदास असशील, तर मीही तसाच उदास झालो आहे २ एका ठकास दुसरा महाठक भेटला, तसा तुमचा व आमचा प्रत्यक्ष संबंध आलेला आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी एकाकी होऊनच माझा जीव बिनधोक असल्याने या देवापाशी असा मांडत आहे. ४

९६० बहुतां रीती काकुलती । आलों चित्तीं न धराच ॥ १ ॥
आतां काशासाटीं देवा । मिथ्या हेवा वाढवूं ॥ २ ॥
तुम्हां आम्हां जाली तुटी । आतां भेटी चिंतनें ॥ ३ ॥
तुका म्हणे लाजिरवाणें । अधीर जिणें इच्छेचें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– हेवा–हाव

अर्थ :– देवा, मी तुमच्यासाठी अनेक प्रकारानी काकुळतीस आलो आहे; पण तुम्ही मात्र यासंबंधी तुमच्या चित्तात काहीही आणलेले दिसत नाही. १ मग देवा, आता कशासाठी खोटी हाव मी माझ्या मनात बाळगू? २ देवा, तुमच्याआमच्यांत ताटातुटी झाली आहे. आता तुमच्यात व आमच्यात भेट होणार, ती केवळ तुमच्याविषयीच्या चिंतनानेच. ३ तुकाराम महाराज म्हणतात, असे हे जिणे मनातील इच्छेमुळे मोठे लाजिरवाणे झाले आहे. ४

९६१ आश्चर्य तें एक जालें । मना आलें माझिया ॥ १ ॥
मढयापाशीं करुणा केली । तैसी गेली वृथा हे ॥ २ ॥
न यावा तो कैसा राग । खोटें मग देखोनि ॥ ३ ॥
तुका म्हणे कैचा बोला । शोध विठ्ठला माझिया ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा .– मढयापाशी–प्रेताजवळ ?

अर्थ .– एक आश्चर्याची गोष्ट घडलेली माझ्या मनात आलेली आहे. १ प्रेतापाशी बसून त्याच्या नातेवाईकांनी केलेला शोक जसा व्यर्थ जातो, तशीच मी आजवर देवा, तुमचेपाशी करुणा भाकली ती फुकट गेली. २ एखादे खोटे कृत्य पाहून मग राग कसा येऊ नये ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, विठ्ठला, माझ्या शब्दांना हा कसला शोध लागला ? ४

९६२ मागायाची नाहीं इच्छा । जो मी ऐसा संकोचों ॥ १ ॥
'लटकियाचो न करूं स्तुति । इच्छा चित्तीं धरूनि ॥ २ ॥
हिशोबें तें आलें घ्यावें । हें तों ठावें सकळांसी ॥ ३ ॥
तुका म्हणे स्वामिसेवा । येथें देवा काशाची ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – संकोचों–संकोच करू

अर्थ .– मला कोणतीही वस्तू मागण्याची इच्छा नसल्यामुळे मी संकोच कोणत्या गोष्टीसाठी धरावा ? १ कुठल्याही खोटया गोष्टीची मी स्तुती करणार नाही; कारण माझ्या मनात कोणतीच इच्छा नसते. २ जे हिशेबाने येईल त्याचा स्वीकार करावा, हे तर सर्वांनाच समजते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, या ठिकाणी कसली स्वामीसेवा आहे ? ४

९६३ पाठवणें[1] पडणें पायां । उद्धार वांयां काशाचा ॥ १ ॥
घडलें तें भेटीसवें । दिसेल बरवें सकळां ॥ २ ॥

१ पाटवणे.

न घडतां दृष्टादृष्टी । काय गोष्टी कोरडचा ॥ ३ ॥
अबोल्यानें असे तुका । अंतर ऐका[1] साक्षीतें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– पाठवणें–पायरीला.

अर्थ :– देवाच्या देवळाच्या पायरीला नुसता स्पर्श करून, नमस्कार करून काय उपयोग? त्याने उद्धार कसा होणार? १ प्रत्यक्ष भेटीत जे सुख उमे राहील, तेच सर्वत्र चांगले शोभून दिसणारे आहे. २ जर एकमेकाची दृष्टादृष्टच झाली नाही, तर मग सर्व गोष्टी वरवरच्याच, कोरडयाच राहतात ३ तुकाराम महाराज म्हणतात, यासाठीच मी अबोल झालो असून अंतःकरणात त्याच्या साक्षीने मौन धारण केले आहे. ४

९६४ अभयाचें स्थळ । तें हें एक अचळ ॥ १ ॥
तरि धरिला विश्वास । ठेलों होउनियां दास ॥ २ ॥
पुरली आवडी । पायीं लागलीसे गोडी ॥ ३ ॥
तुका म्हणे कंठीं नाम । अंगी भरलेंसे प्रेम ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– अचळ–स्थिर, न चळणारे.

अर्थ :– निर्भय असणारे असे हे एकच स्थान म्हणजे, या विठ्ठलाचे चरण होत १ म्हणूनच मी याचा विश्वास धरून याच्या पायांचा दास होऊन राहिलो आहे. २ या श्रीहरीच्या पायांची गोडी मला लागली, म्हणूनच माझी आवड पूर्ण झाली आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, माझ्या कंठात या श्रीहरीचे नाम असून अंगात रोमरोमी या श्रीहरीचे प्रेम भरून राहिले आहे ४

९६५ संदेह निरसे तरि रुचिकर । फिक्यासी आदर चवी नाहीं ॥ १ ॥
आतां नको मज खोटयानें फटवूं । कोठें येऊं जाऊं वेळोवेळां ॥ २ ॥
गेला तरि काय जीवाचें सांकडें । वांचउनि पुढें काय काज ॥ ३ ॥
तुका म्हणे कसीं निवडा जी बरें । केलीं तैसीं पोरें आळीपायीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – संदेह–संशय, निरसे–दूर होईल, फिक्यासी–रुचीहीन, फिके असणाऱ्यास, फटवूं–फसवू, आळीपायीं–पायापाशी हट्ट

अर्थ :– सर्व संशयाचे निरसन झाले, ते दूर झाले तरच चांगले रुचकर असते. जे फिके व रुचिहीन असते, त्याविषयी कुणासही आदर वाटत नाही कुणालाही ते आवडतही नाही. १ देवा, आता मला खोटी आशा दाखवून उगाच फसवू नका मी आता तुमच्याकडे वारवार पुढे ये-जा करू? २ आता तुमच्या लाभावाचून माझा जीव जरी गेला तरी काय संकट ओढवणार आहे? मी वाचून तरी काय मोठे कार्य साधले जाणार आहे? ३ तुकाराम महाराज म्हणतात, आम्ही पोरांनी आपल्या पायांशी हट्ट केला आहे, तो तुम्ही नीट कसास लावून पुरवावा, आमची निवड नीट करावी ४

९६६ वदे वाणी परि दुर्लभ अनुभव । चालीचाचि वाहो बहुतेक ॥ १ ॥
आम्ही ऐसें कैसें राहावें निश्चळ । पाठिलागा काळ जिततसे ॥ २ ॥
वाढवितां पोट दंभाचे पसारे । येतील माघारे मुदला तोटे ॥ ३ ॥
तुका म्हणे वरें जागवितां मना । तुमच्या नारायणा अभयें करें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा .– वाहो–प्रवाह, निश्चळ–स्वस्थ

अर्थ :– वाणीने वृथा वडवड पुष्कळ करण्यासारखी आहे; पण त्याप्रमाणे अनुभव मात्र दुर्लभ आहे. बहुतेक ठिकाणी आधीची जी चाल असेल, तिचाच मागोवा घेत जाण्याची रीत असते. १ अशा परिस्थितीत आम्ही स्वस्थ

१ एका.

कसे राहावे ? कारण आमच्या पाठीमागे एकसारखा काळ लागलेला आहे. तो आम्हास जिंकू पाहात आहे. २ केवळ पोट भरण्यासाठी परमार्थाचे व भक्तीचे ढोंग करून कसे चालेल ? त्यायोगे मूळ मुदलातच तोटा येईल ना. ३ तुकाराम महाराज म्हणतात, नारायणा, तुमच्या अभय अशा वरदहस्ताने मी माझ्या मनास जागृत ठेवणे हेच चांगले होय. ४

९६७ उगेंचि हे मन राहातें निश्चळ । तरि कां तळमळ साट[1] होती ॥ १ ॥
काय तुमचीं नेणो कवतुक विदानें । सर्वोत्तमपणें खेळतसां ॥ २ ॥
नानाछंदें आम्हां नाचवावें जीवां । वाढवाव्या हांवा भलत्यापुढें ॥ ३ ॥
तुका म्हणे तुम्ही आपुली प्रतिष्ठा । वाढवावया चेष्टा करीतसां ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – साट–एकसारखी, विदानें–कौशल्ये

अर्थ :– माझे हे मन उगेच राहून स्थिर होत असूनही मग ही तळमळ एकसारखी का होत आहे हो ? १ तुमची कौशल्ये काय व कशी आहेत, हे काही ध्यानात येत नाही तुम्ही सर्वोत्तमपणाने क्रीडा करीत असता २ देवा, तुम्ही नाना छंद करून आम्हा जीवांना नाना प्रकारांनी नाचविता, आमच्या हावा भलत्यासलत्या वाढविता. ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तुम्ही तुमची प्रतिष्ठा वाढविण्यासाठी अशा प्रकारच्या चेष्टा करीत आहात. ४

९६८ आम्ही बळकट जालो फिराउनी । तुमच्या वचनीं तुम्हां गोऊं ॥ १ ॥
जाले तेव्हां जाले मागील ते मागें । आतां वर्मलागें ठावी जालीं ॥ २ ॥
तोडावया अवघ्या चेष्टाचा संबंध । शुद्धापाशीं शुद्ध युद्ध व्हावें ॥ ३ ॥
तुका म्हणे आम्हां आत्मत्वाची सोय । आपणचि होय तैसाचि तूं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– फिराउनी–फिरून, गोऊ–गुतवू

अर्थ – देवा, आम्ही फिरून आता मोठे बळकट झालो आहोत. आम्हांस सांभाळण्याचे किंवा आमच्यावर कृपा करण्याचे जे ब्रीद तुम्ही घेतले आहे, त्यात तुम्हास गुंतवून टाकू १ यापूर्वी काय झाले असेल ते असो, आता मात्र तुला पकडण्याची सर्व वर्मे आम्हास माहीत झाली आहेत २ देवा, तुझ्या सर्व चेष्टांचा संबंध तोडण्यासाठीच आम्ही शुद्ध भावाने तत्पर झालेलो आहोत. तुम्हीही आमच्यासारख्या शुद्धापाशी शुद्धबुद्ध व्हावे ३ तुकाराम महाराज म्हणतात, आम्हास आत्मस्वरूपात येण्याची जशी सोय आहे, तशीच ती तुम्हासही असेलच ४

९६९ तुम्ही साच नुपेक्षाल हा भरवसा । मज जाणतसां अधीरसे ॥ १ ॥
कासया घातला लावणी उद्धार । ठेवा करकर वारूनियां ॥ २ ॥
सुटो नये ऐसे कळलें निरुतें । कां घ्यावें मागुतें आळवूनि ॥ ३ ॥
तुका म्हणे तुम्ही सभाग्य जी देवा । माझा तुम्हा केवा काय आला ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – साच–खरोखर, नुपेक्षाल–अव्हेर करणार नाही, करकर–कटकट, वारूनिया–दूर करून, निरुतें–खरोखर, केवा–पर्वा, फिकीर, अवघड

अर्थ :– देवा, तुम्ही माझा अव्हेर कधीही करणार नाही, अशीच खात्री मला आहे मला तुम्ही, फार अधीर आहे मी, असेच समजता. १ देवा, माझ्या उद्धाराची गोष्ट एवढ्या लावणीवर का हो टाकली आहे ? एकदा उद्धार करून ही कटकट कायमची मिटवा ना. २ खरोखर ही कटकट काही मागची सुटणार नाही, असे तुम्हांस कळले तर मग पुन: पुन: अशी आळवणी करून का घेता हो ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तुम्ही मोठे भाग्यवान आहात, तुम्हांला माझ्यासारख्याच्या उद्धाराचे एवढे अवघड का वाटावे ? ४

[1] साठ.

९७० तुम्हा होईल देवा पडिला विसर । आम्हीं ते उत्तर यत्न केलें ॥ १ ॥
पतितपावन ब्रीदें मिरविसी । याचा काय देसी झाडा सांग ॥ २ ॥
आहाच मी नव्हें अर्थाचे भुकेले । भलत्या एका बोले वारेन त्या ॥ ३ ॥
तुका म्हणे देह देईन साडणे । सहित अभिमाने ओवाळूनि ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – झाडा–हिशेब, अर्थाचे–संपत्तीचा वारेन–दूर करता येईल

अर्थ – देवा, आमचा विसरच तुम्हास पडलेला दिसतो आम्ही तर उद्धारासाठी एकसारखी बडबड तुमच्यासमोर केलेली आहे १ पतितपावन असे ब्रीद देवा, तू मिरवितोस, मग माझा जर उद्धार केला नाहीस, तर या ब्रीदाचा हिशेब कसा देशील ? २ उगाच मी आपला काही संपत्तीचा भुकेलेला नाही तुम्हास भलत्या सलत्या बोलाने मला दूर करता येईल असे नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, हा देह मी सर्व अभिमानासहित तुमच्यावरून ओवाळून टाकीन ४

९७१ जडलो अगाअगीं । मग ठेवी प्रसंगी । काहीं उरीजोगी । लोकी आहे पुरती ॥ १ ॥
ठेवी निवारूनि आधीं । अवकाश तोचि बुद्धी । सापडली संधी । मग बळ कोणासी ॥ २ ॥
गळा बांधेन पायीं । हालो नेदी ठायिचा ठायीं । निवाड तो तईं । अवकळा केलिया ॥ ३ ॥
तुका म्हणे ठावे । तुम्ही[1] असा जी बरवे । वोभाटाची सवे । मुळीहुनी विठोबा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – उरीजोगी–शिल्लक राहील असा सवे–सवय

अर्थ – देवा, मी तुमच्या अंगाला येऊनच जडलो आहे अशा या प्रसंगी तुमचा मोठेपणा शिल्लक राहील, असा काही मी ठेवणार नाही तुमचा व आमचा संबंध कसा आहे याविषयीची कीर्ती लोकात पूर्णपणे आहेच १ आमच्या बुद्धीने अजून धीर धरला आहे, तोवर्यतच देवा, तुम्ही पूर्णपणे विचार करा मग संधी सापडल्यावर आम्ही तुला धरून ठेवले तर, बळ कुणाचे मोठे आहे हे ध्यानात येईल २ अशा वेळी माझा गळा आपल्या पायाशी बांधेन, मग तुम्हाला जाग्यावरून काही हालता यायचे नाही यावेळी तुमची पुरती फजीती केल्याशिवाय निवाडा होईल असे नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, तुम्ही आम्हास पुरतेच ठाऊक आहात आपल्या दारात आलेल्या याचकाला असेच ओरडत ठेवण्याची सवयच पहिल्यापासून तुम्हाला आहे ४

९७२ आम्ही शक्तिहीने । कैसे कराल ते नेणे ।
लिगाडाच्या गुणें । खोळबला राहिलो ॥ १ ॥
माझें मज देई देवा । असे ठेविला तो ठेवा ।
नाहीं करीत हेवा । काहीं अधीक आगळा ॥ २ ॥
नाहीं गळा पडलो झोड । तुमचे तेचि माझें तोड ।
चौघा चार खड । लावणी हे अनुचित ॥ ३ ॥
नाही येत वळा । आता तुम्हासी गोपाळा ।
तुका म्हणे गळा । उगवा पाया लागतो ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – लिगाडाच्या–कटकटीच्या, झोड–निलाजरा, दाडगा

अर्थ – देवा, आम्ही तर शक्तीहीन आहोत आमचा उद्धार तुम्ही कसा करणार आहात, ते काही समजत नाही तुम्हाला स्वत पाठीमागे अशीच सारखी कटकट ठेवण्याची सवयच असल्यामुळे, मी असा कृपेशिवाय खोळबून राहिलो आहे १ देवा, मी माझा जो ठेवा तुमच्याजवळ ठेविला आहे, तो मला परत द्या ना मी काही आणखी अधिक मिळावे म्हणून काही हाव धरीत नाही २ मी एखादा दाडगा असून तुमच्या गळ्यात बळेच पडलो आहे

[1] आम्हा

असे नव्हे तुमचे व माझे बोलणे एकसारखेच असल्याने चौघांना बोलावून दोघांच्या भांडणाचा निकाल लावून टाका ना एकदाचा हे काम लांबणीवर टाकणे उचित नाही देवा ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, मी काही आता निकरावर येत नाही तुमच्या पायावर मी माझे डोके ठेविले आहे, ते जाणून माझी मुक्तता करा एवढीच विनंती आहे ४

९७३ काय कृपेविण घालावे साकडें । निश्चिती निवाडें कोण्या एका ॥ १ ॥
आहो तैसीं पुढें असो दीनपणे । वेचूनि वचने करुणेची ॥ २ ॥
धरूं भय आता काय वाहो चिंता । काय करूं आता आप्तपण ॥ ३ ॥
तुका म्हणे आम्ही भावहीन जीव । म्हणउनी देव दुरे दुरी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – साकडें–संकट

अर्थ – देवा, तुम्ही मजवर कृपा केलेली नाही म्हणून काय मी तुम्हास संकटात घालावे? देवा, मी निश्चिंत असावे, असा कोणताही एखादा निवाडा तुम्ही केलेला नाही १ देवा, यापुढेही आम्ही पूर्वी होतो तसेच दीन वृत्तीने राहू करुणेची वचने तुमच्यासमोर बोलत राहू २ आता कसले भय धरून मनात चिंता वागवू? आता आप्तपणाच्या संबंधास तरी काय करावे? ३ तुकाराम महाराज म्हणतात आम्ही जीव भावभक्तीच्या शिवाय आहोत, म्हणूनच देव आमच्यापासून दूर झाला आहे ४

९७४ नाहीं उल्लंघिले कोणाचे वचन । मज का नारायण दुरी जाला ॥ १ ॥
अशंकिते मने करीं आळवण । नाहीं समाधान निश्चितीचे ॥ २ ॥
दासाचा विसर हे तो अनुचित । असे[1] सर्व नीत पायापाशीं ॥ ३ ॥
तुका म्हणे तुम्हा लाज येत नाहीं । आम्हा चिंताडोहीं बुडविता ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – दुरी–दूर अशंकिते–सशयित होऊन

अर्थ – शास्त्रवचनांची अथवा साधुसंतांची मर्यादा मी अजून कधी ओलांडली नाही मग हा नारायण मला एवढा दूर का धरे झाला आहे? १ याच संशयित मनाने मी या देवाची प्रार्थना करीत आहे, पण माझ्या मनाच्या ठिकाणी चितारहित असे समाधान नाही २ देवा, तुला तुझ्या दासाचा विसर पडला आहे हे तर फारच अनुचित दिसते तुमच्याजवळ तर सर्व नीती आहे असे असून तुम्ही असे वागता? ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, आम्हाला अशा प्रकारे नाना प्रकारच्या चिंतांच्या डोहामध्ये बुडविताना तुम्हाला कधी लाज वाटत नाही? ४

९७५ जीव जायवरी सांडी करी माता । हे तो आश्चर्यता बाळकाची ॥ १ ॥
दुर्बळ कीं नाहीं आइकत कानीं । काय नारायणीं न्यून जाले ॥ २ ॥
क्षणक्षणा माझा न घ्यावा सांभाळ । अभाग्याचा काळ ऐसा आला ॥ ३ ॥
तुका म्हणे नाहीं वचनासी रुचि । फल फटवेचि तें तें होय ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – सांडी–त्याग फल फटवेंचि–फालकटाप्रमाण

अर्थ – एखाद्या मुलाचा प्राण जाईपर्यंत त्याची आई त्याचा त्याग करते, हे एक मोठे आश्चर्यच आहे १ देवा, तुम्ही दुर्बळच आहात, काय? मग आम्ही जे सांगतो आहोत, ते तुम्ही नीट कानानी का ऐकत नाही? तुमच्या ठिकाणी काय कमीपणा निर्माण झाला की काय हो? २ क्षणाक्षणात आमचा सांभाळ तुम्ही करूच नये, अगा दुर्दैवाचा काळ मोठा विपरीत आलेला दिसतो ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, आमच्या बोलण्यास काही रुचीच नाही, असे झाले आहे फोलकटाप्रमाणे ते व्यर्थ होत आहे ४

---

[1] असो

९७६ म्हणउनी दास नव्हे ऐसा जालों । अनुभवें बोलों स्वामीपुढें ॥ १ ॥
कां नाहीं वचन प्रतिउत्तराचें । मीच माझ्या वेचें अट्टाहासें ॥ २ ॥
कासयानें गोडी उपजावा विश्वास । प्रीती कांहीं रस वांचुनियां ॥ ३ ॥
तुका म्हणे अगा चतुरा शिरोमणी । विचारावें मनीं केशीराजा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– विचारावें–विचार करावा

अर्थ :– देवा, मी तुमचा दास असून नसल्यासारखा झालो आहे. अनुभवानेच हे सर्व मी बोलतो आहे स्वामीपुढे. १ देवा, मी तुमच्यापाशी एवढे बोलतो; तर तुम्ही उत्तर म्हणून एका शब्दाने का बोलत नाही माझ्याशी ? मीच मात्र हट्टाने सारखी बडबड करीत आहे. २ देवा, तुमच्याबद्दल गोडी निर्माण होऊन तुमच्याविषयी विश्वास कसा वाटेल आम्हांस ? कारण तुमच्याआमच्यामध्ये प्रीतीचा थोडाही भाव दिसत नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, अरे चतुरांच्यांत चतुर असणाऱ्या ईश्वरा, तूच तुझ्या मनात एकदा याचा विचार करून पाहावा ना. ४

९७७ काय आतां आम्हीं पोटचि भरावें । जग चाळवावें भक्त म्हूण ॥ १ ॥
ऐसा तरि एक सांगा जी विचार । बहु होतों फार कासावीस ॥ २ ॥
काय कवित्वाची घालूनियां रूढी । करूं जोडाजोडी अक्षरांची ॥ ३ ॥
तुका म्हणे काय गुंपोनि दुकाना । राहों नारायणा करूनी घात ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– चाळवावे–फसवावे, गुंपोनि–गुतून

अर्थ – देवा, आता तुझे भक्त म्हणून आम्ही ढोंगीपणाने लोकांना फसवून काय नुसते पोटच भरावे की काय ? १ असाच तुमचा विचार असेल तर, तो आम्हांस सांगा ना एकदाचा देवा, आम्ही फारच कासावीस झालो आहोत. २ अक्षरांची कशी तरी जोडणी करून आम्ही रूढीप्रमाणे कवित्व करूनच आयुष्य घालवावे की काय ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, की देवा, आम्ही आमचा घात करून नेहमीच्या दुकानदारीतच गुंतून असावे की काय ? ४

९७८ वर्म तरि आम्हां दावा । काय देवा जाणें मी ॥ १ ॥
बहुतां रंगीं हीन जालों । तरि आलों शरण ॥ २ ॥
द्याल जरि तुम्ही धीर । होईल स्थिर मन ठायीं ॥ ३ ॥
तुका म्हणे सत्ताबळें । लडिवाळें राखावीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– दावा–दाखवा

अर्थ :– देवा, आता तुमच्या प्राप्तीचे खरे वर्म काय आहे, ते तरी दाखवा ना. कारण मी खरे काय आहे ते जाणीत नाही. १ अनेक इंद्रियांच्या सुखांच्या रंगात माझी वृत्ती हीनदीन झाल्यामुळे देवा, मी तुला शरण आलो आहे २ देवा, तुम्हीच जर मला धीर द्याल, तर तुमच्या पायी माझे मन स्थिर होईल. ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तुम्ही तुमच्या सत्तेच्या बळाने माझ्यासारख्या लाडक्या बाळांचे रक्षण करावे ४

९७९ सांगों काय नेणा देवा । बोलाची त्या आवडी ॥ १ ॥
वांयां मज चुकुर करा । विश्वंभरा विनोदें ॥ २ ॥
आवडीच्या करा ऐसें । अंतर्वसें जाणतसां ॥ ३ ॥
तुका म्हणे समाधानें । होइन मनें मोकळा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– चुकुर–गोंधळलेल्या.

अर्थ – देवा, तुमच्या बोलाची आवड मला काय असते, ते काय सांगायला हवे ? १ सर्व विश्वात भरून असणाऱ्या देवा, विनोदाने मला गोंधळलेल्या मनस्थितीत कृपा करून घालू नका २ देवा, तुम्ही अंतःकरणात निवास करीत असल्यामुळे सर्व काही जाणताच, तुम्हास जसे आवडेल तसे देवा, तुम्ही करा ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, मग मी मोठ्या समाधानाने मनापासून मोकळा होईन ४

९८० निर्धाराचे अवघें गोड । वाटे कोड कौतुक ॥ १ ॥
बैसलिया भाव पायीं । बरा तईं नाचेन ॥ २ ॥
स्वामी कळे सावधान । तरि मन उल्हासे ॥ ३ ॥
तुका म्हणे आश्वासावे । प्रेम द्यावे विठ्ठले ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – तईं–तव्हा

अर्थ – कोणतीही गोष्ट निर्धाराने करणे, हेच गोड असून त्याचेच कोडकौतुक होते १ देवा तुझ्या पायाशी एकदा माझा भाव निश्चित झाला की मग मी त्यानुसार सुंदर नृत्य करीन २ माझा स्वामी मोठ्या सावधतेने मजकडे लक्ष देत आहे, असे दिसल्यास मला मनात मोठाच उल्हास वाटेल ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, मला नीट आश्वासन देऊन तुजविषयीचे प्रेमसुख द्यावे ४

९८१ जाली तडातोडी । अवघीं पडिलों[1] उघडीं ॥ १ ॥
नव्हो कोणाचीच काहीं । तुझे भरलिया वाहीं ॥ २ ॥
पारुपला संवसार । मोडली बैसण्याची थार ॥ ३ ॥
आता म्हणे तुका । देवा अंतरें राखों नका ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – वाहीं–प्रवाहात, पारुपला–नष्ट झाला, थार–स्थान

अर्थ – देवा, आता आमची व लौकिक गोष्टींची ताटातूट झाली आहे त्यामुळे आम्ही आता उघडे पडलो आहोत १ आता आमचा व कुणाचाच संबंध नाही, अशी स्थिती प्राप्त झाली असून आम्ही तुझ्या भक्तिमार्गाच्या प्रवाहात सापडलो आहोत २ आमची आता संसारावरील आस्था संपल्यामुळे तो जवळजवळ नष्टच झाला आहे हा संसार ज्या आसक्तीवर उभा राहतो, ती आसक्तीची बैठकच मोडून गेल्यासारखी झाली आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, आता तुम्ही मला आपल्यापासून दूर अंतरावर ठेवू नका ४

९८२ आधार तो व्हावा । ऐसी आस करीं देवा ॥ १ ॥
तुम्हापाशीं काय उणें । काय वेचे समाधानें ॥ २ ॥
सेवेच्या अभिलाषें । मन बहु जालें पिसें ॥ ३ ॥
अरे भक्तपराधीना । तुका म्हणे नारायणा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – अभिलाषें–इच्छेने, पिसें–वेडे, भक्तपराधीना–भक्ताच्या स्वाधीन असणाऱ्या देवा

अर्थ – देवा, आता मला तुमच्याच पायाचा आश्रय मिळावा अशी मी इच्छा करीत आहे १ खरे पाहता तुमच्यापाशी काय कमी आहे ? माझे थोडकेसे समाधान केले तर काय कमी पडणार आहे तुम्हास ? २ देवा, तुमच्या सेवेच्या इच्छेने माझे मन वेडे बनले आहे ३ अरे भक्ताच्या स्वाधीन असणाऱ्या देवा, नारायणा, तू माझी अवस्था जाणून माझ्यावर कृपा कर ना ४

९८३ तुमचा तुम्हीं[2] केला गोवा । आता चुकविता देवा ॥ १ ॥
कैसें सरे चाळवणें । केलें काशाला शाहाणें ॥ २ ॥

---

१ पडिली, २ आम्ही

फासया रूपा । नावा आलेति गा बापा ॥ ३ ॥
तुका म्हणे आता । न सरे हवाले घालिता ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – गोवा–गुतागुत, हवाले घालिता–हवाले देण्याने

अर्थ – देवा, हा व्यक्त होण्याचा तुमचा तुम्ही खेळ करून गुतागुत केलीत, आणि आता चुकवाचुकवी करीत आहात १ अशी फसवणूक आता कशी चालेल हो? आम्हाला जन्मास घालून असे शहाणे तरी कशास केले? २ देवा, तुम्ही पतितपावन, भक्तवत्सल, करुणासागर इत्यादी नावारूपास तरी का हो आलात? ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, आता नुसते हवाले देऊन भागणार नाही माझ्यावर कृपा केलीच पाहिजे ४

९८४ माझी भक्ती भोळी । एकविध भावबळी ॥ १ ॥
मी का पडेन निराळा । ऐसा साडूनि सोहळा ॥ २ ॥
आता अनारिसा । येथें न व्हावें सहसा ॥ ३ ॥
तुका म्हणे जोडुनि पाय । पुढें उगा उभा राहे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – एकविध–एकनिष्ठ, अनारिसा–वगळे

अर्थ – देवा, माझी ही भक्ती भोळीभाबडी असली तरी, तो एकनिष्ठ व भावाने बळकट अशी आहे, १ अशा प्रकारचा भक्तीचा सोहळा सोडून मी काही निराळा होणार नाही २ आता या ठिकाणी वेगळे होणे सहसा जमणारे नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तुम्ही आपले पाय एकमेकास जुळवून आमच्यासमोर उगेच उभे राहावे, आम्हास त्याच्यावर मस्तक ठेवायचे आहे ४

९८५ आहे तरि सत्ता । ऐशा करितो वारता ॥ १ ॥
अगसगाची उत्तरे । सलगीसेवेनें लेकरें ॥ २ ॥
तरी निकटवासें । असो आशंकेच्या नासें ॥ ३ ॥
तुका म्हणे रुची । येथें भिन्नता कैंची ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – वारता–वार्ता बोलणी, अगसगाची–जिव्हाळ्याने, आशंकेच्या नासें–शकाकुशका टाकून

अर्थ – देवा, आमची तुमच्यावर थोडीबहुत सत्ता आहे, म्हणूनच अशी धिटाईची बोलणी मी करीत आहे १ मुलालेकराचे धनी आम्हीही असल्याने विशेष प्रकारच्या जिव्हाळ्याने व सलगीने आम्ही तुमच्याशी लडिवाळ बोलणी करीत असतो. २ तरी मनातील सर्व शकाकुशका काढून टाकून आम्ही नेहमी तुमच्याजवळच असू ३ तुकाराम महाराज म्हणतात, याच सान्निध्याची मला मोठी रुची आहे यात भिन्नता नाही ४

९८६ काळ साराया चिंतनें । एकांतवासी गंगास्नानें । देवाचें पूजन । प्रदक्षणा तुळसीच्या[1]॥ १ ॥
युक्त आहार विहार । नेम इंद्रियांचा सार । नसावी वासर । निद्रा बहु भाषण ॥ २ ॥
परमार्थ महाधन । जोडी देवाचे चरण । व्हावया[2] जतन । हे उपाय लाभाचे ॥ ३ ॥
देह समर्पिजे देवा । भार कांहींच न घ्यावा । होईल आघवा । तुका म्हणे आनंद ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – चिंतनें–ईश्वराच्या नामस्मरणात, विहार–विश्रांती, वासर–स्वच्छंदी

अर्थ – मनुष्याने आपले आयुष्य ईश्वराच्या नामस्मरणात घालवावे एकान्तवासात राहून गंगास्नानाने पवित्र व्हावे मनोभावे देवाचे पूजन करावे तुळशीस प्रदक्षिणा घालाव्यात १ विधियुक्त व उचित असा आहार घेऊन आवश्यक तेवढीच विश्रांती घ्यावी इंद्रियसुखांना नियमितता हेच सुखी आयुष्याचे सार आहे उगाच स्वच्छंदीपणाचे वागणे नसावे, फार झोप नसावी, फार बडबड नसावी २ परमार्थविचार हेच महाधन मानून देवाचे चरण जोडावेत व एकदा जोडलेले हे चरण जपावेत कसे, यासबंधीचे उपाय शोधणे हेच लाभाचे होण्यासारखे आहे ३

१ तुळशीची, २ करावया

देह परमेश्वरास समर्पित केलेला असावा. स्वत च्या शिरावर मीपणानें कसलाही भार घेऊ नये. यामुळे तुकाराम महाराज म्हणतात, जीवनात आनंदीआनंद निर्माण होईल ४

विवरण – तुकाराममुखाच्या अभंगात कित्येक वेळा वरवर परस्परविरोधी वचने असल्यासारखी वाटतात संसार करावा की करू नये ? मुलामाणसाबद्दल उद्गार कसे असावेत ? घरदार सोडावयास हवे काय ? धनसंपत्तीचा वीट किती मानायचा ? यासारख्या प्रश्नाचा विचार करताना मोठीच सावधगिरी बाळगून, संदर्भ पाहून निर्णय घ्यावयास हवा ज्यांना खरोखरीच परमार्थाचे गुह्य शोधावयाचे आहे, आत्मतत्त्वाची अनुभूती घ्यावयाची आहे, अलौकिकाचा साक्षात्कार करून घ्यायचा आहे, त्याच्यासाठी प्रखर वैराग्यादी साधने आवश्यक आहेत परंतु सर्व-सामान्य सांसारिक स्त्री-पुरुषांना तुकाराम महाराजांनी काणता उपदेश केलेला आहे ? या प्रश्नाचे उत्तर या अभंगात आहे प्रपंच व परमार्थ हे एकाच वेळी एकाच माणसास जमणार नाहीत, असेही तुकोबा मधून-मधून म्हणत असले तरी सांसारिकांनी परमार्थविचार अगदीच सोडावा असे त्यांना कधीही सांगितले नाही उलट भल्याभल्यांनाच अधारी मार्गांच्या साधनांची त्यांनी अवहेलना करून नामसंकीर्तनाचे, भजनमार्गाचे सर्वश्रेष्ठ साधन उपलब्ध करून दिले जे जे फुलेल ते ते प्रभुसत्तेतूनच, अशी मनाची धारणा झाल्यावर मग संसाराचे रूपही पालटते यासाठी अगदी साधे आचार-विचार तुकाराम महाराजांनी या अभंगात स्पष्टपणे सांगितले आहेत

अखंड परमेश्वराचे अनुसंधान असावे, एकान्तवास सेवावा, गंगास्नान करावे, देवाचे पूजन, तुळशीला प्रद-क्षिणा, युक्त असा आहार, नियमित विश्रांती, इंद्रियसुखाची नियमित प्राप्ती, परमार्थ हेच महाधन मानावे, देवाचे चरण सोडू नये, असे अगदी साधे सोपे आचारविचार तुकोबांनी या अभंगात सांगितलेले आहेत यात आचरावयास कठीण अशी साधने नाहीत, की प्रदीर्घ व्रतवैकल्यांची यातायात नाही, यात कर्मकांड नाही, की गुंतागुंतीचे विधि-निषेध नाहीत अतिशय सोप्या अशा आचरणमार्गाचा निदर्शक असा हा अभंग नित्य स्मरणीय असाच आहे

९८७ मऊ मेणाहूनि आम्ही विष्णुदास । कठिण वज्रास भेदूं ऐसे ॥ १ ॥
मेले जित असो निजोनिया[1] जागे । जो जो जें जें मागे ते ते देऊं ॥ २ ॥
भले तरि देऊं गांडीची लंगोटी । नाठाळाचि गाठीं देऊं माथां ॥ ३ ॥
मायबापाहूनि बहु मायावंत । करूं घातपात शत्रूहूनि ॥ ४ ॥
अमृत तें काय गोड आम्हांपुढें । विष तें बापुडें कडू किती ॥ ५ ॥
तुका म्हणे आम्ही अवघेंचि गोड । ज्याचे पुरे कोड त्याचेपरि ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – नाठाळा–दुष्टाच्या

अर्थ :– आम्ही विष्णुदास कसे आहोत ? तर प्रसंगी मेणाहूनही आम्ही मऊ आहोत, आणि प्रसंग पडला तर इंद्राच्या वज्रासही आम्ही भेदून टाकू, अशी आमची शक्ती आहे १ आम्ही देहबुद्धीने मेलेलो असून आत्मतत्त्वाच्या जाणिवेने जिवंत आहोत आम्ही देहबुद्धीच्या दृष्टीने झोपलेले असून आत्मतत्त्वाच्या जाणीवेने जागेच आहोत २ जे कुणी आम्हास चांगले भेटतील, त्यांना आम्ही कमरेची लंगोटीही देऊन टाकू, पण जर कुणी नाठाळ व दुष्ट भेटतील, तर त्यांच्या डोक्यात काठी आम्ही मारायला मागेपुढे पाहणार नाही ३ आम्ही मायबापापेक्षाही पुष्कळच दयाळू व कृपावंत आहोत, पण प्रसंग पडला तर आम्ही शत्रूपेक्षाही घातपात करू शकतो ४ आमच्यापुढे अमृताची गोडी असो किती असणार ? आणि आमच्यासमोर विष तर बिचारे दीन होऊन उभे असते ५ तुकाराम महाराज म्हणतात, आम्ही सर्वच बाजूंनी पूर्णपणे गोडच आहोत ज्याची जशी इच्छा असेल, तशी आमच्याकडून ती सफल होईल ६

विवरण –तुकाराम महाराजांचा अतिशय प्रसिद्ध असा हा एक अभंग आहे विष्णुदास किंवा विठ्ठलभक्त कसे असतात, याचे मोठे योग्य शब्दचित्र तुकोबांनी यात काढले आहे आम्ही विष्णुदास लोण्याहून मऊ आहोत, कमरेची लंगोटीही कुणी मागितली तर ती देऊ मायबापाहूनही आम्ही दयावंत आहोत, अमृतापेक्षा आमची गोडी अधिक आहे वगैरे वर्णन संताचे, किंवा विठ्ठलभक्ताचे सहज समजण्यासारखे आहे

[1] निजेलिया

पण विष्णुदासाच्या स्वभावाची जी दुसरी एक बाजू या अभगात दर्शविलेली आहे, ती अधिक महत्वाची आहे किंबहुना ही दुसरी बाजू जेवढी भक्कम, तवढी पहिलीची सुरक्षितता अधिक असं मानावे लागते साधुपुरुषाच्या रक्षणाची पहिली पायरी म्हणजे दुष्टाचा नाश, असा निर्वाळा गीतनेच दिलेला आहे तुकाराम महाराजानीही दयेची व्याख्या सागताना 'दया तिचे नाव भूताचे पाळण । आणिक निर्दाळण कटकाचे ' असेच आग्रहाने म्हटलेले आहे दुष्ट लोकाचा नाश हाही एक दयेचाच भाग मानणे क्रमप्राप्त असते, आणि याच हेतूस ध्यानात धरून या अभगात बुवा म्हणत आहेत, आम्ही कठिण अशा इद्राच्या वज्रासही फोडून टाकू, नाठाळ माणसाच्या डाक्यावर आम्ही काठी हाणू, शत्रू सुद्धा करणार नाही असं घातपात आम्ही करू आमच्या पुढे कडू विषाची काय किंमत ? अशा भाषेतील अति शयोक्ती जरी सोडून दिली तरी मेणाहून मऊ असणाऱ्या विष्णुदासाच्या स्वभावातीलही कणखर बाजू ध्यानात येण्या-सारखी आहे याच वृत्तीस शोभणार असा आणखी एक अभग 'पाया जाला नारू' ( क्रमाक ४३७८ ) या ओळीने सुरू होणारा आहे त्यातील निष्कर्षही अधमासी तो अधम' असाच आहे देव्हाऱ्यावर जर विंचू आला तर त्याची पूजा कशी करावी ? या प्रश्नाचे उत्तर देताना बुवानी म्हटले आहे, 'तेथे पैजारेचे काम यावरून सताच्या मवाळ पणातील काठिण्य प्रसगी किती प्रखर असते त ध्यानात येण्यासारखे आहे.

९८८ गाढवाचे तानें । पालटले क्षणक्षणें ॥ १ ॥
तैसे अधमाचे गुण । एकविध नाहीं मन ॥ २ ॥
उपजता बरें दिसे । रूप वाढता ते नासे ॥ ३ ॥
तुका म्हणे भुंकते वेळे । वेळ अवेळ न कळे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – तानें–मूल पिलू, उपजता–जन्मास येताच

अर्थ – गाढवाचे लहान पिलू किती गोजिरवाणे दिसते पण त्याची वाढ होत असताना मात्र त्याचे गुण क्षणाक्षणाला पालटलेले दिसतात ते अवगुणाकडे झुकते १ तशाच प्रकारे अधम माणसाचे गुण असतात त्याचे मन एकचित्ताने कुठेच स्थिर राहात नाही २ गाढवाचे पिलू जन्माला आल्यावर फार चागले दिसते पण वय वाढल्यावर त्याचे रूप बिघडून जाते त्याचे अवगुण प्रकट होतात ३ तुकाराम महाराज म्हणतात, असे हे अवगुणी गाढव वेळी अवेळी उगाच भुंकत असते अधम माणसाचेही असेच असते ४

९८९ विटाळ तो परद्रव्य परनारी । येथुनि जो दुरी तो सोवळा ॥ १ ॥
गद्यें पद्यें काहीं न धरावी उपाधी । स्वाधीनचि बुध्दि करुनी ठेवा ॥ २ ॥
विचाराचे काही करावे स्वहित । पापपुण्यातीत भाडवल ॥ ३ ॥
तुका म्हणे न लगे जावें वनातरा । विश्व विश्वंभरा सारिखेंचि ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – उपाधी–अडचण

अर्थ – दुसऱ्याचे द्रव्य व दुसऱ्याची स्त्री याचा विटाळ मानून जो तेथून दूर राहतो, तोच खरा सोवळा म्हणावा १ काही गद्य अथवा पद्य ग्रथाचे पठण करून वृथा अडचण निर्माण न करिता आपली बुद्धी आपल्याच स्वाधीन करून ठेवावी २ परमार्थविचार करून काही स्वहित साधावे व पापपुण्याच्या पलीकडे असणाऱ्या आत्म-सुखाचे भाडवल प्राप्त करून घ्यावे ३ तुकाराम महाराज म्हणतात, या सुखासाठी रानावनात जाण्याची जरुरी नाही, कारण सबध विश्वात भरून राहिलेला तो विश्वभर व त्यापासून निर्माण झालेले हे चराचर विश्व, यात भेद नाही तोच सर्वत्र सामावून राहिलेला आहे ४

९९० कल्पतरु त्या नव्हती बाभुळा । पुरविती फळा इच्छितिया[१] ॥ १ ॥
उदड त्या गाई म्हैसी आणि शेळ्या । परि त्या निराळ्या कामधेनु ॥ २ ॥
तुका म्हणे देव दाखवील दृष्टी । तया सवे भेटी थोर पुण्य ॥ ३ ॥

१ इच्छी तया

शब्दार्थ व टीपा :– रया–रुईची झाडे, कामधेनु–इच्छिलेली वस्तू देणाऱ्या गाई

अर्थ :– रुईची झाडे, बाभळीची झाडे हे काही कल्पतरु नव्हेत. त्यांच्यापासून इच्छिलेले फळ कधी प्राप्त होणार नाही. १ सर्वसामान्य अशा गाई, म्हशी व शेळ्या पुष्कळच आहेत. परंतु मनात इच्छिलेली वस्तू देणाऱ्या कामधेनू मात्र यांच्याहून वेगळ्याच आहेत. २ तुकाराम महाराज म्हणतात, देव आपणांस ज्या ज्या गोष्टी दाखवील त्यांची भेट डोळ्यांनी घेणे, यातच फार मोठे पुण्य आहे असे समजावे. ३

९९१ जळो प्रेमा तैसा रंग । जाय उडोनि[१] पतंग ॥ १ ॥
सासूसाटीं रडे सून । भाव अंतरींचा भिन्न ॥ २ ॥
मंद मुखींचा कोवळा । भाव अंतरीं निराळा ॥ ३ ॥
जैसी वृंदावनकांती । उत्तम धरूं नये हातीं ॥ ४ ॥
बक ध्यान धरी । सोंग करूनि[२] मासे मारी ॥ ५ ॥
तुका म्हणे सर्प डोले । तैसा कथेमाजी खुले ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा :– पतंग–फुलपाखराची एक जात, मंद–लबाड, कपटी, वृंदावनकांती–कडू वृंदावनाचे फळ, बक–बगळा.

अर्थ :– फुलपाखरांच्या एका जातीस, पतंगास दिव्याविषयी मोठेच प्रेम असते. या प्रेमापोटी तो दिव्यावर झडप घालून जळून जातो. अशा प्रेमाच्या रंगास आग लागो. १ सासू मरण पावली म्हणजे सून रडत असते, पण तिच्या अंतरंगातील भाव मात्र निराळाच असतो. २ कपटी मनुष्य हा चेहऱ्यावरून फार चांगला दिसतो, कोमलतेने बोलतो, पण त्याच्या मनातील भाव मात्र निराळाच असतो. ३ कडू वृंदावनाच्या फळाची वरवरची कांती किती शोभिवंत असते. पण आतून ते कडूच असल्यामुळे हातातही धरू नये ते. ४ बगळा नदीच्या काठी डोळे मिटून ध्यान केल्यासारखा उभा राहतो; पण ते सर्व सोंग असते. संधी सापडताच मासे पकडण्यासाठी तो टपलेला असतो. ५ तुकाराम महाराज म्हणतात, गारुड्याच्या पुंगीच्या नादाने सर्प जसा डुलतो, तसाच हा वरवर भाविकपणा दाखविणारा मनुष्य कथेमध्ये डुलत असतो; पण त्याचे हे करणे खरे नसते. ६

९९२ वेशा नाहीं बोले अवगुण दूषीले । ऐशा बोला भले झणें क्षोभा ॥ १ ॥
कोण नेणें अन्न जीवाचें जीवन । विषमेळवण विष होय ॥ २ ॥
सोने शुध्द नेणे कोण हा विचार । डांकें हीनवर केलें त्यासी ॥ ३ ॥
याती शुध्द परि अधम लक्षण । वांयां गेलें तेणें सोंगें ही तें ॥ ४ ॥
तुका म्हणे शूर तोचि पावे मान । आणीक मंडण भार वाही ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– वेशा–वेषास, पोशाखास, झणे क्षोभा–राग मानू नका, डांके–सराफानी, सोनारांनी, हीनवर–हिणकस, मंडण–वरवरची शोभा.

अर्थ :– साधू लोकांनी घेतलेल्या वेषास मी बोल देत नसून त्यांच्या अंगच्या अवगुणांना मात्र दोष देत आहे. माझ्या या बोलण्यामुळे भल्या माणसांनो, तुम्ही रागावू नये. १ सर्व वस्तुमात्रांचे व प्राण्यांचे जीवन अन्न हेच आहे, असे कोण जाणीत नाही? पण त्यात विष कालविले गेले असेल तर सर्वच अन्न विषमय होऊन सर्वांनाच घातकारक होईल ना. २ सोने हे शुद्ध व चांगलेच असते, असे कोण जाणीत नाही? पण सोनारानी मात्र त्यात हीन धातूंचे मिश्रण करून ते हीन केलेले असते. ३ एखाद्याची जात जरी शुद्ध असली, तरी ती अधमाच्या लक्षणांनी वायाच गेल्यासारखी असते. शुद्धत्वाचेही सोंग मग वायाच जाते. ४ तुकाराम महाराज म्हणतात, शत्रूचा नाश करून विजय संपादन करणारा तोच शूर होय. तोच मानसन्मानास योग्य होय. पण इतरांनी अंगावर सैनिकाची वस्त्रे पांघरून शोभा वाढविण्याचा प्रयत्न केला तरी, ते केवळ ओझेच आहे असे मानणे भाग आहे. ५

१ भुलोनि, २ धरूनि.

९९३ अणुरणीया[1] थोकडा । तुका आकाशाएवढा ॥ १ ॥
गिळुनि साडिले कळिवर । भव भ्रमाचा आकार ॥ २ ॥
साडिली त्रिपुटी । दीप उजळला घटीं ॥ ३ ॥
तुका म्हणे आता । उरलो उपकारापुरता ॥ ४ ॥

**शब्दार्थ व टीपा :–** अणुरणीया–अणुरेणूपेक्षाही, थोकडा–सूक्ष्म, त्रिपुटी–ज्ञेय ज्ञाता, ज्ञान इत्यादी तिहींचा समुदाय

**अर्थ –** मी तुकाराम तसे पाहिले तर अणुरेणूपेक्षाही सूक्ष्म असूनही आकाशाएवढा विस्तारलेलो आहे १ मी देहादी व प्रपचादिकाचा अभिमान गिळून शरीर सोडून दिल्यासारखेच आहे प्रपचरूपी भ्रमाचा आकारही मी सोडलेला आहे २ ज्ञेय, ज्ञाता, ज्ञान अशासारख्याची त्रिपुटी सोडून मी आत्मज्ञानाचा दीप माझ्या देहामध्ये प्रज्ज्वलित केला आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी आता केवळ दुसऱ्यावर उपकार करण्यासाठीच उरलेलो आहे ४

**विवरण .—** या अतिशय प्रसिद्ध अशा अभगात तुकाराम महाराजानी आपण आणुरेणूपेक्षाही सूक्ष्म व आकाशापेक्षाही विशाल कसे आहोत, याचे त्याच्या श्रेष्ठ अनुभूतीवरून वर्णन केले आहे एकच सूक्ष्म तत्त्व सर्व जगतात भरून राहिलेले आहे, याचा सुदर आविष्कार जो 'अणोरणीयान्महतो महीयान' या कठोपनिषदातील सूत्रात झालेला आहे, त्याचा अनुवाद तुकोबानी सहजासहजी या अभगात मार्मिकपणे केलेला आह 'अणु अणोरणीया आगळें' या शब्दानी मागेही अभग क्र ४५१ मध्ये बुवानी असेच वर्णन केलेले आपण पाहिल आहे अणुरेणूपक्षाही सूक्ष्म असलेल्या तत्त्वाचाच सर्व विश्वास भरून राहिलेला अविष्कार असल्याने त्याला सोडून दुसरे काहीच नाही याची जाणीव श्रेष्ठ साधकास नेहमीच होत असते जळीस्थळी ईश्वरतत्त्व पाहाणे व एकाच आत्मतत्त्वाच्या धाग्याने सर्व सृष्टी गुफिली गेली आहे, असे अनुभवास येणे, हेच ईश्वरी साक्षात्काराचे मर्म होय तुकोबाना ही अनुभूती तीव्रतेने आलेली होती **'आत हरि बाहेर हरि । हरिनें घरीं कोंडिलें', 'नभोमय जाले जळ । एकीं सकळ हरपलें', 'तुका म्हणे कल्प झाला । अस्त गेला उदयीं', 'काहींच मी नव्हे कोणिये गावींचा । एकटा ठायींच्या ठायीं एक', 'आमुचा स्वदेश भुवनत्रयामध्यें वास'** इत्यादी वचनातून तुकाबाच्या अनुभूतीची विशालता ध्यानात येण्यासारखी आहे

अनुभूतीची एवढी विशालता व तीव्रता ज्याना लाभली आहे, ते देह धारण करून जगतात तरी कशासाठी ? याही प्रश्नाचे उत्तर तुकारामबुवानी या अभगात दिले आहे इतर लोकाच्यावर उपकार करण्यासाठी आपण आता उरलेलो आहोत, असे त्यानी या ठिकाणी स्पष्टपणे म्हटले आहे स्वत स साक्षात्कार झाल्यानवर **'आपण जेऊन जेववी लोका । सतर्पण करी तुका'** अशी भूमिका तुकोबासारख्या सत्पुरुषाना घ्यावी लागते लोकानी सन्मार्गावर राहावे, केवळ प्रपच व पैसापैसा न करिता ईश्वराची आठवण ठेवावी, अनाचारात व व्यसनात रमू नये, दुष्टाच्या सगतीत राहू नये, म्हणून साधुसताच्या एकसारख्या उपदेशाची फार मोठी जरूरी असत **'उपदेशी तुका । मेघवृष्टीनें आइका'** असा निर्वाळा दुसऱ्या एका अभगात त्यानी दिलेला आहे मेघाचा स्वभावच सहज वृष्टीचा असून त्याचा फायदा ज्याचा त्यान घ्यावयाचा असतो

९९४ धन्य आजि दिन । जाले सताचे दर्शन ॥ १ ॥
जाली पापातापा तुटी । दैन्य गेले उठाउठी ॥ २ ॥
जाले समाधान । पायीं विसावले मन ॥ ३ ॥
तुका म्हणे आले घरा । तोचि दिवाळीदसरा ॥ ४ ॥

**शब्दार्थ व टीपा :–** दिन–दिवस, तुटी–नाश, उठाउठी–तावडतोब, त्वरित

---

१ अणुरेणुया

अर्थ :– आजचा दिवस केवढा धन्यतेचा आहे ! कारण आज मला संताचे दर्शन झाले १ यांच्या दर्शनाने माझे पाप ताप नष्ट झाले माझे आजवरचे दैन्य त्वरित नाहीसे झाले २ माझ्या मनाचे पूर्ण समाधान झाले व या संताच्या पायाशी माझे मन पूर्णपणे विसावले आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, हे साधुसंत आमच्या घरी आलेले असल्यामुळे आम्हाला दिवाळीदसऱ्याच्या सणाचाच आनंद झालेला आहे ४

९९५ हेचि माझें धन । तुमचे वंदावे चरण ॥ १ ॥
येणें भाग्यें असो जीत । एवढें समर्पूनी चित्त ॥ २ ॥
सांभाळिले देवा । मज अनाथा जी जीवा ॥ ३ ॥
जोडूनियां कर । तुका विनवितो किंकर ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – जीत–जगण्याचे

अर्थ – देवा, तुमचे चरण वंदावेत हेच खरे म्हणजे माझे धन आहे १ तुमच्या पायावर चित्त समर्पून टाकावे यातच खरे म्हणजे जगण्याचे सार्थक आहे २ देवा, मजसारख्या अनाथाचा तुम्ही नीटपणे सांभाळ केलात ३ हा तुकाराम दास देवा, तुम्हास हात जोडून विनंती करीत आहे ४

९९६ फजितखोरा मना किती तुज सांगो । नको कोणा लागो मागें मागें ॥ १ ॥
स्नेहवादें दुःख जडलेसे अंगीं । निष्ठुर हे जगीं प्रेमसुख ॥ २ ॥
निंदास्तुति कोणी करो दयामाया । न धरीं चाड या सुखदुःखें ॥ ३ ॥
योगिराज का रे न राहाती बैसोनी । एकिये आसनीं याचि गुणे ॥ ४ ॥
तुका म्हणे मना पाहें विचारून । होईं रे कठिण वज्राऐसे ॥ ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – चाड–पर्वा

अर्थ – माझ्या फजितखोरा मना, तुला आता किती सांगावे ? किती शिकवावे ? तू आता कुणाच्याही मागे जाऊ नकोस कधी १ कुणाच्या विषयी प्रेम धरले की, आपल्या अंगी दुःख मात्र निर्माण होते. त्यामुळे जे निष्ठुर राहतात, त्यांनाच श्रीहरीचे प्रेमसुख प्राप्त होते २ कुणी निंदा करील, कुणी स्तुती करील, कुणी दयामाया करील, पण मी या सुखदुःखाची अथवा दयामाया करणाराची पर्वा धरणार नाही कधी ३ मना, याचसाठी योगिराज एकाच स्थानावर, एकाच आसनावर स्वस्थपणे बसून नाही का राहात ? ४ तुकाराम महाराज म्हणतात, तू या सर्व गोष्टींचा विचार कर व इंद्राच्या वज्राप्रमाणे कठिण होऊन राहा ५

९९७ जळो माझी ऐसी बुध्दी । मज घाली तुजमधीं ।
आवडे हे विधि । निषेधींचि चांगली ॥ १ ॥
तू स्वामी मी सेवक । उंच पद निंच एक ।
ऐसे करावें कौतुक । नको करूं खंडणा ॥ २ ॥
जळ न खाती जळा । वृक्ष आपुलिया फळा ।
भोक्ता निराळा । तेणें गोडी निवडिली ॥ ३ ॥
हिरा शोभला कोंदणें । अळंकारीं मिरवे सोनें ।
एक असता तेणे । काय दुजें जाणावें ॥ ४ ॥
उष्णें छाये सुख वाटे । बाळें माते पान्हा फुटे ।
एका एक भेटे । कोण सुख ते काळीं ॥ ५ ॥
तुका म्हणे हित । हेचि मानी माझे चित्त ।
नव्हे आता मुक्त । ऐसा जाला भरवसा ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा :– खडणा–भेदास

अर्थ – देवा, तुझ्यामध्ये मी सर्व भावानी मुरून जावे, विलीन व्हावे, अशी जर माझी क्षुद्र बुद्धी असेल तर तिला आग लागो. ऐक्यभावाच्या या विधीचा निषेध करण्याचीच आवड मला मोठीच आहे १ खरे म्हणजे देवा, तू आमचा स्वामी व्हावेस, मी तुझा सेवक व्हावे तुमचे स्थान उचावर असावे, माझे खाली असावे, असे कौतुक देवा, तू करावेस यामध्ये कधी भेदास वा तुटीस समय प्राप्त न व्हावा २ कारण, मग एकच सर्व झाल्यावर काय उपयोग ? पाणी कधी पाण्यास पीत असते काय ? वृक्षच कधी आपल्या फळाचा उपभोग घेतात काय ? या ठिकाणी भोग घेणारा निराळाच असल्याने सेवनातील गोडी कायम टिकलेली आहे ३ हिरा नेहमी त्याच्या कोंदणातच शोभून दिसतो सुवर्णाची शोभा दागिन्याच्या रूपानीच ध्यानात येते जर सर्व एकच असते, तर एकाने दुसऱ्यास कसे जाणावे ? एकाने दुसऱ्याची शोभा कशी पाहावी ? ४ उन्हात तापल्यानतरच थडगार सावलीचे सुख वाटते, बालकाच्यामुळेच आईला पान्हा फुटतो ना ? एक दुसऱ्यास वेगळेपणाने भेटतो म्हणूनच सुख आहे ५ तुकाराम महाराज म्हणतात, असे वेगळे राहण्यातच माझे मोठे हित असून मी आता मुक्त होणारच नाही, असा मला विश्वास वाटू लागला आहे ६

विवरण —या एका सुदर अभगात तुकारामबुवानी आपण स्वस्वरूपात न मिळावे, मोक्षपदी न बसावे, ईश्वरस्वरूपात विलीन न व्हावे, ब्रह्मपदाची प्राप्ती न व्हावी म्हणून परमेश्वरास आग्रहाने विनविले आहे खर म्हणजे याचसाठी सर्व खटाटोप असतो जीवदशा सपावी, देहात्मबुद्धीचा नाश व्हावा, दूरपणा सपावा, ईश्वर व आपण एकच अशी अनुभूती येऊन आपले सर्वस्व त्याच्याच स्वरूपात समर्पित व्हावे, यापेक्षा श्रेष्ठ अवस्था कोणती ? पण थोर भक्तास अशी विलीनस्थिती, अशी समर्पित स्थिती, अशी ब्रह्मस्थिती अथवा मुक्तीची स्थिती अडचणीची वाटते एकत्वाची अनुभूती आल्यानतर कोण कुणाचे स्तवन करणार ? कोण कुणास डोळे भरून पाहणार ? कोण कुणापुढे लडिवाळ हट्ट करणार ? कोण कुणावर लटक्या प्रीतीने रुसणार ? दूर असलेल्या स्थितीमधील हुरहूर, मनाची तळमळ, उत्कठा यातील सुख मग कुणास मिळणार ? नामसकीर्तन कोण कुणाचे गाणार ? आणि मग सतसगतीच काय ? या सताच्या सगतीत असणारा आनद आत्मस्थितीपेक्षाही, मोक्षस्थितीपेक्षाही फार मोठा असल्यामुळेच पुष्कळदा नामदेवतुकारामासारखे साधुसत म्हणतात, 'ज्ञानी मुक्तिपद देशी पाडुरगा । मग या सत सगा पाहू कोठें ?' ह सुख अखड टिकावे म्हणूनच विलीन होण्याची कल्पना सताना सहन होत नाही प्रेमसुखासाठी आपण सेवक अथवा भक्त व ईश्वर धनी अथवा स्वामी या दोनपणाच्या भूमिकेवरच असणे यात खरी बहार आहे पुन एक उच स्थानी, एक खालच्या पायरीवर उभा असलेला असे असेल तरच अधिक सुख या सुखास सोडून मुक्तीची अथवा स्वस्वरूपी विलीन होण्याची आशा धरील तो करटा, असे तुकारामबुवानीच दुसऱ्या एका अभगात म्हटले आहे, 'साडुनि सुखाचा वाटा । मुक्ति मागे तो करटा ' या साधसताना 'या वैष्णवाचे घरीं । प्रेमसुख इच्छा करी ' हीच इच्छा नेहमी असते 'जन्मोजन्मीं तुझा दास पुरुषोत्तमा । हेचि गोडी माझ्या देईं जीवा ' अशी मागणी या सताची असते 'देवभक्त कोड तेथें नाहीं ' अशा मुक्तीची फिकीर सत कधीच करीत नाहीत यासाठीच 'तुका म्हणे आम्ही मृत्युलोकीं बरे । तुझेचि अकिले पाडुरगा ' अशी इच्छा त्याच्या मनात सतत असते

९९८ मनीं वसे त्याचे आवडे उत्तर । वाटे समाचार घ्यावा ऐसें ॥ १ ॥
जातीचे तें झुरे येर येरासाटीं । वियोगें ही तुटी नेघे कधीं ॥ २ ॥
भेटीची अपेक्षा वारता आदर । पुसे नव्हे धीर मागुताले ॥ ३ ॥
तुका म्हणे माझ्या जीवाचे जीवन । सोइरे हरिजन प्राणसखे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – येरयेरासाठीं–एक दुसऱ्यासाठी, वारता–धावविले

अर्थ – आपल्या मनात ज्याच्याविषयी प्रेम आहे त्याचे बोलणे आपणास पसत असते त्याचाच समाचार घ्यावा असे आपणास पुन पुन वाटते १ जे एका जातीचे, एका आवडीचे असतात तेच एकमेकांसाठी झुरत

असतात यामुळे वियोगातही कधी त्याच्यात तुटी पडत नाही २ एकमेक एकमेकांच्या भेटीची इच्छा धरीत असतात, कुणी त्याना थांबविले, तर ते धीर धरून पुन पुन त्याच्याविषयीच विचारतात ३ तुकाराम महाराज म्हणतात, हे हरिभक्त माझ्या जीवाचे जीवन असून माझे केवळ प्राणसखेच आहेत ४

९९९ नव्हे आराणूक परि मनीं वाहे । होईल त्या साहे पाडुरग ॥ १ ॥
पढरीसि जावें उद्वेग मानसीं । धरिल्या पावसी सदेह नाहीं ॥२ ॥
नसो बळ देह असो पराधीन । परि हें चिंतन टाको नको ॥ ३ ॥
तुका म्हणे देह पडो या चिंतनें । पुढें लागे येणे याजसाटीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – आराणूक–शाती, सुख, उद्वेग–तळमळ

अर्थ – मनात कसलेही सुख नसतानाही जो निरतर पाडुरगासच मनात वागवितो, त्याचेच नित्य स्मरण करितो, त्यासच तो विठ्ठल मदत करीत असतो १ पढरपुरास जावे, पढरपुरास जावे, अशी एकसारखी मनात तळमळ धरशील, तरच तू नि सशय त्या ठिकाणी पावशील २ मग तुझा देह पराधीन असो, अथवा त्यात बळ नसो, पण पांडुरगाचे चितन कधी तोडू नये ३ तुकाराम महाराज म्हणतात, या विठ्ठलचिंतनात देह पडला तरी त्याची पर्वा करू नये कारण पुढे याच चिंतनासाठी देह धारण करावा लागला तरी त्याची चिंता नसावी ४

१००० कोठें देवा आलें अगा थोरपण । बरें होतें[१] दीन होतों तरीं ॥ १ ॥
साधन तें सेवा सताची उत्तम । आवडीनें नाम गाईन तें ॥ २ ॥
न पुसते कोणी कोठें ही असता । समाधान चित्ताचिया सुखें ॥ ३ ॥
तुका म्हणे जन अव्हेरिते मज । तरी केशीराज साभाळिता ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – कोठें–कशासाठी, अव्हेरितें–दूर लोटतात

अर्थ – देवा, माझ्या अगाला असा हा मोठेपणा व्यर्थ कशासाठी आला आहे ? मी आपला दीन वृत्तीनें होतो तेच बरे नव्हते का ? १ सताची सेवा करीत असणे हेच एक उत्तम साधन आहे मी मोठ्या प्रीतीने श्रीहरीचे नाम घेत राहीन २ मी कुठेही मनमोकळेपणाने गेलो असता कुणी विचारीत नाही, माझ्या चित्तात एक प्रकारचे समाधान पूर्णपणे भरून राहिलेले असते ३ तुकाराम महाराज म्हणतात, लोक मला दूर लोटतात, माझा अव्हेर करतात, अशा वेळी देवा, तूच माझा साभाळ करितोस ४

१००१ चतुर मी जालों आपुल्या मोवता । भावेंविण रिता [२]फुज अगीं ॥ १ ॥
आता पुढें वाया जावें हें तें काई । कामक्रोधें ठायीं वास केला ॥ २ ॥
गुणदोप आले जगाचे अतरा । भूताच्या मत्सरावरी बुध्दि ॥ ३ ॥
तुका म्हणे करूं उपदेश लोकां । नाहीं जालों एका परता दोपा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – फुज–अभिमान, गर्व, जगाचे अतरा–लोकांच्या अत करणातील

अर्थ – मी माझ्या भोवतीच केवढा चतुर होऊन राहिलो आहे पाहा श्रीहरीच्या भावभक्तिशिवाय मी रिकामाच आहे उगाच पोकळ अभिमान मात्र अगचा वाढला आहे १ आता माझे आयुष्य यापुढे वाया जाईल यात नवल काय ? माझ्यात कामक्रोधानीही वास्तव्य केलेले आहे २ लोकांच्या अतकरणातील गुणदोष एकत्र होऊन माझ्याही मनात ते निर्माण झाले आहेत सर्व प्राणिमात्राचा मत्सर करावा अशीच बुद्धी मजमध्ये निर्माण झाली ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी लोकांना उपदेश करतो, पण मी स्वत मात्र एकाही दोषापासून मुक्त झालेलो नाही ४

---

१ होतो, २ स्फुट

१००२ धन्य ते संसारीं । दयावंत जे अंतरीं ॥ १ ॥
येथें उपकारासाठीं । आले घर ज्यां वैकुंठीं ॥ २ ॥
लटिकें वचन । नाहीं देहीं उदासीन ॥ ३ ॥
मधुरा वाणी ओंठीं । तुका म्हणे वाव पोटीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – अंतरीं–मनात, लटिकें–खोटे, ओंठीं–ओठात, वाव–माया

अर्थ – जे अंतःकरणात दयावंत असतात, तेच या संसारात धन्यवान म्हणून गणले जातात १ खरे म्हणजे या साधुसंतांचे घर वैकुंठातच असते पण ते इतरांवर उपकार करण्यासाठीच या जगतात वावरत असतात २ यांना खोटे भाषण माहीत नसते हे स्वतःच्या देहासंबंधी नेहमीच उदासीन झालेले असतात ३ तुकाराम महाराज म्हणतात, यांच्या ओठात मधुर अशी वाणी असून पोटात पुष्कळच थोर माया असते ४

१००३ कुदल्याविण[1] नव्हे माडा । अळसें धोंडा पडतसे ॥ १ ॥
राग नको धरूं मनीं । गाडमणी सांगतो ॥ २ ॥
तरटापुढें वरें नाचे । सुतें काचे मुसळ ॥ ३ ॥
तुका म्हणे काठी सार । करी फार शाहाणे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – गाडमणी–गुह्य गोष्ट, तरटापुढें–चाबकापुढे

अर्थ – कणीक चांगली कुटून घतल्याखेरीज चांगला मांडा कधी तयार होत नाही या कामी आळस केला तर मात्र पदरात धोंडा पडतो १ या आमच्या स्पष्टपणे सांगण्याचा राग तुम्ही मनात धारण करू नये आम्ही ही एक गुह्य गोष्टच तुम्हास सांगितली आहे २ चाबकापुढे घोडा बरोबर नाचतो सुताने मुसळही कांचले जाते ३ तुकाराम महाराज म्हणतात, कुणाला शहाणे करायचे असेल तर, समजावून सांगायचे तर, हातामधील काठी हेच प्रमुख साधन आहे ४

१००४ कळो येतें तरि कां नव्हे । पडती गोवे भ्रमाचे ॥ १ ॥
जाणतांचि होतो घात । परिसा मात देवा हे ॥ २ ॥
आमिसासाटीं फांसा मान । पाडी धनइच्छा ते ॥ ३ ॥
तुका म्हणे होणार खोटें । कर्म मोटें बळिवंत ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – गोवे–गुंते, परिसा–ऐका मत–मात, हकीगत, मान–गळा

अर्थ – खरी स्थिती काय आहे, हे समजत असूनही लोक भ्रमाच्या गुंत्यात का सापडतात ? १ देवा, खरे काय आहे याची जाणीव असतानाही याचा घात कसा होतो हे ऐका २ आमिष पाहून मासा फासात अडकतो, त्या प्रमाणे धनाच्या इच्छेने लोक त्यात गुरफटून जातात ३ तुकाराम महाराज म्हणतात, कर्म मोठे बलवान असते त्यामुळे जर खोटे व्हायचे असेल तर होईलच ४

१००५ मोकळें मन रसाळ वाणी । याचि गुणीं संपन्न ॥ १ ॥
लक्ष्मी ते ऐशा नांवें । भाग्यें ज्यावें तरि त्यांनीं ॥ २ ॥
नमन नम्रता अंगीं । नेघे रंगीं पालट ॥ ३ ॥
तुका म्हणे त्याच्या नांवें । घेतां व्हावें संतोषी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – ज्यावें–जगावे

अर्थ – ज्याची वाणी रसाळ असून मन मोकळे आहे, तोच सर्वगुणसंपन्न असतो १ त्यालाच लक्ष्मी प्रसन्न आहे, असे समजावे त्यांनेच भाग्यवंत होऊन जगावे २ त्याच्या अंगी नमन करण्याची वृत्ती व नम्रता, या दोन

१ काडल्या कुटिल्या हाता माडा

गुणांचा वास असावा मग त्याच्या स्थितीत कधीही पालट होणार नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, त्याचे नाव एवढे मोठे असते की, त्याच्या नावानेही सर्वांनी संतोषित व्हावे ४

१००६ शेवटीची विनवणी । संतजनीं परिसावी ॥ १ ॥
विसर तो न पडावा । माझा देवा तुम्हांसी ॥ २ ॥
पुढें फार बोलों काई । अवघें पायीं विदित ॥ ३ ॥
तुका म्हणे पडिलों पायां । करा छाया कृपेची ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – परिसावी–एकावी, विदित–माहीत

अर्थ – माझी एक शेवटची विनंती आहे ती साधुसंतांनी ऐकावी १ ती अशी की तुम्हास व देवास कधी माझा विसर पडू नये २ यापुढे आम्ही अधिक काय बोलावे ? तुमच्या पायाजवळ सर्व सांगितले असल्यामुळे माहीत आहेच ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी तुमच्या पाया पडलो आहे, तुम्ही मजवर कृपेची छाया करावी ४

१००७ करितों कवित्व म्हणाल हें कोणी । नव्हे माझी वाणी पदरींची ॥ १ ॥
माझिये युक्तीचा नव्हे हा प्रकार । मज विश्वंभर बोलवितो ॥ २ ॥
काय मी पामर जाणें अर्थभेद । वदवी गोविंद तेंचि वदें ॥ ३ ॥
निमित्त मापासी बैसविलों आहें । मी तों काहीं नव्हे स्वामिसत्ता ॥ ४ ॥
तुका म्हणे आहें पाईकचि खरा । वागवितों मुद्रा नामाची हे ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – पाईक–प्रामाणिक सेवक शिपाई गडी

अर्थ – मी तुकाराम कवित्व करीत आहे, असे जर कुणी म्हणत असाल, तर खरी स्थिती अशी आहे की कवित्वाची वाणी ही काही माझ्या पदरची नाही १ कवित्वाचा हा सर्व प्रकार केवळ माझ्याच युक्तीचा नसून मला तो विश्वंभर बोलवितो त्याच्याकडून मला बोलाविले जाते २ त्याशिवाय मी पामर निरनिराळया शब्दांचे अर्थ-भेद जाणणार तरी कसे ? हा गोविंद जे मला वदवितो, तेच मी बोलतो ३ मी फक्त माप टाकण्याच्या निमित्तास मात्र बसलो आहे या कामी मी खरे म्हणजे कुणीच नव्हे त्या स्वामीची सर्व सत्ता आहे ४ तुकाराम महाराज म्हणतात, मी या देवाचा खराखुरा असा प्रामाणिक सेवक आहे त्याच्याच नामाची चिन्हे मी माझ्या अंगावर वागवीत आहे नामदेवाच्या मुद्रेने मी अंकित झालेलो आहे ५

विवरण – तुकोबाना कवित्वाची स्फूर्ती कधी व कशी झाली यासंबंधी स्वतंत्र विवरण पुढे ' नामदेवें केलें स्वप्नामाजीं जागें ( अभंग क्र १,२० ) व सत्य अगत्यासी मन केलें ग्वाही (अभंग क्र १३३३) च्या वेळी स्वतंत्रपणे येईलच येथे फक्त एवढाच गोष्टीचाच खुलासा करावयाचा आहे पहिली गोष्ट अशी की, आपण कवित्व करिता याविषयी तुकोबांची भूमिका अत्यंत नम्रतेची पण निश्चयाची होती तुकोबांच्या अगोदर वेदवाणीचा अर्थ मराठी भाषेत सांगण्याचे धाडस कवित्वातून करावे हे अलौकिक होतेच पण याही दिव्य वाणीस प्रारंभ प्रथम विरोध झाला तुकोबा हे काही जन्माने वरिष्ठ वर्णातील नव्हेत वेदांतील परमार्थतत्त्व संस्कृतखेरीज इतर भाषेत येत होते, हेही काहीजणांना पसंत नव्हते या सर्वांना उत्तर म्हणून या अभंगी वस्तुस्थितीचे निवेदन म्हणून तुकोबा आपल्या कवित्वाचे वैशिष्ट्य सांगून सांगून माघारा दिसतात

त्यांच्या कवित्वाचे एक वैशिष्ट्य या अभंगात असे आले आहे की, आपल्या कवित्वाची वाणी ही आपली स्वतःची नसून ती त्या विश्वंभराने, ईश्वराने वदविली आहे आपण केवळ निमित्तमात्र आहोत केवळ धन्याच्या मालाचे माप टाकणारे आहोत आपण हमाल असून त्याचीच सत्ता खरी आहे, असा भाव इतरही सर्वत्र प्रकटलेला दिसून येतो ' मजुराच्या हातें मापाचा उकल । मी तों येथें फोल सत्ता त्याची ' 'नव्हे अर्थ काहीं राहतो माझे बोल । नव्हती माझे बोल बोले पांडुरंग', 'माझी वदवितों वाणी । ज्याणें धरिली धरणी ', ' आपुलिया बळें नाहीं मी बोलत ।

सखा कृपावंत वाचा त्याची', 'सिकविता धनी वेगळाचि', 'परि त्या विश्वंभरें बोलविले', 'तुका म्हणे मज बोलविती देव', 'वदे साक्षत्वेसीं वाणी। नारायणीं मिश्रित' अशा अनेक वचनांतून तुकोबांनी आपली वाणी ही आपली नसून प्रत्यक्ष विठ्ठलाची, विश्वंभराची आहे असे पुनःपुन्हा सांगितले आहे. म्हणूनच तुकोबांच्या वाणीचे व कवित्वाचे तेज दिव्य, अलौकिक व जिव्हाळ्याचे असे आहे. कवित्वाचे शब्द हे काही टांकसाळीतील नाणे नव्हे, असेही त्यांनी एका अभंगात म्हटले आहे. केवळ देवानेच प्रेरणा दिली म्हणूनच आपली वाणी एवढी दिव्य व रसाळ झाली, असा त्यांचा अभिप्राय आहे. याच अभंगात त्यांनी या तीव्रतेचे वर्णन करताना म्हटले आहे. 'तुका म्हणे देवें केला बलात्कार.'

सारांश, आपण पामर आहोत. साध्या साध्या शब्दांचेही अर्थ आपणास समजणारे नाहीत, पण तो गोविंद वदविणारा असल्यामुळे आपल्याकडून हा कवित्वाचा प्रकार होतो. आपण खरे म्हणजे ईश्वराचे केवळ एकनिष्ठ सेवक आहोत, व त्याच्या नामाची मुद्रा आपल्या कृतीवर असल्याने ती प्रासादिक व प्रसादपूर्ण झाली आहे. या अभंगातील 'मुद्रा नामाची' यावरील श्लेषही ध्यानात घेण्यासारखा आहे. तुकोबांना कवित्वाचे देणे नामदेवांच्या परंपरेपासून लाभलेले आहे. नामदेवांनी त्यांना अभंगरचनेची स्फूर्ती दिली अशी त्यांचीच साक्ष आहे. 'मुद्रा नामाची' म्हणजे नामदेवरायांची मान्यता असाही अर्थ शोभून दिसणारा आहे.

१००८ आम्ही गावे तुम्ही कोणीं काहीं न म्हणावे। ऐसे तव आम्हा सांगितले नाहीं देवें ॥ १ ॥
म्हणा रामराम टाळी वाजवा हातें। नाचा डोला प्रेमें आपुलिया स्वहितें ॥ २ ॥
सहज घडे तया आळस करणे ते काई। अग्नीचे भातुके हात पाळिता[1] कां पायीं ॥ ३ ॥
येथें नाहीं लाज भक्तिभाव लौकिक। हासे तया घडे ब्रह्महत्यापातक ॥ ४ ॥
जया जैसा भाव निरोपण करावा। येथें नाहीं चाड ताळविताळ या देवा ॥ ५ ॥
सदैव ज्या कथा काळ घडे श्रवण। तुका म्हणे येर जन्मा आले पाषाण ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – भातुके–खाद्य, ताळविताळ–ताल, वेताल. येर–दुसरे.

अर्थ – आम्ही मात्र देवाचे नाम घ्यावे व तुम्ही मात्र कुणी काहीही म्हणू नये, हा प्रकार काही आम्हांस आमच्या देवांनी सांगितलेला नाही. १. यासाठी तुम्ही मुखाने रामराम म्हणावे, हातांनी टाळी वाजवावी आणि स्वहितासाठी प्रेमाने प्रभूसाठी नाचा, डोलत राहा. २. प्रभुप्राप्ती जी अशी सहज होणारी आहे, तिच्याविषयी आळस काय कामाचा? आपल्या हातापायांना जपून का ठेविता? शेवटी त्यांचे खाद्य अग्नीसच होणार आहे ना? मग त्यांचा उपयोग आधीच हरिभजनाकडे का नाही करीत? ३. भक्तिभावाच्या ठिकाणी लाज कसली आली आहे? लौकिकाची पर्वा तरी कशास हवी? या ठिकाणी जो कुणी हसेल, त्याला ब्रह्महत्येचे पातक लागेल. ४. ज्याचा जसा भाव असेल, तसे त्याने भक्तीचे प्रतिपादन करावे. या ठिकाणी देवास भजनातील तालाची किंवा बेतालाची पर्वा मुळीच नसते. ५. हरिकथेच्या वेळेस ज्याला श्रवण घडते, तो सुदैवीच म्हणावयास हवा. तुकाराम महाराज म्हणतात, हरिभजन न करणारे दुसरे जे कुणी लोक असतील, ते मनुष्याच्या जन्माला येऊन दगडच आहेत असे समजावे. ६.

१००९ देव घ्या कोणी देव घ्या कोणी। आइता आला घर पुसोनी ॥ १ ॥
देव न लगे देव न लगे। सांटवणेंचे रुधले जागे ॥ २ ॥
देव मदला देव मदला। भाव बुडाला काय करूं ॥ ३ ॥
देव घ्या फुका देव घ्या फुका। न लगे रुका मोल काहीं ॥ ४ ॥
दुबळा तुका भावेंविणे। उधारा देव घेतला रुणे ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – रुधले–अडून गेले, फुका–फुकट, रुका–पैसा.

---

१ पोळिता

अर्थ :– कुणी तरी या देवास घ्याहो. देवास घ्याहो. आयता तुमच्या घरास चालून आला आहे हा देव. १ आणि लोक म्हणतात, देव नको, देव नको, घरी साठवण करून सर्व जागा अडून गेली आहे. आता आणखी जागा देयाला नाहीच. २ अशा प्रकारे देवाचा भाव मंदावला आहे. देवाचा भाव घसरला. आता काय करू हो? ३ मग हा देव अगदी फुकटचाच आहे. हा तरी आता घ्या ना. याला काही पैसे द्यावे लागत नाहीत. याला काही किंमत पडत नाहीं. ४ हा तुकाराम अतिशय दुबळा आहे. त्याच्या मनात पुरता भावसुद्धा नाही. पण त्याने देवास उधार घेऊनच ॠण फरून ठेविले आहे. ५

१०१० विष्णुमय सर्व वैष्णवांसी ठावें । येरांनीं वाहावे भार माथां ॥ १ ॥
साधनें संकटें सर्वांलागीं सीण । व्हावा लागे क्षीण अहंमान ॥ २ ॥
भाव हा कठीण वज्र हें भेदवे । परि न छेदवे मायाजाळ ॥ ३ ॥
तुका म्हणे वर्म भजनेंचि सांपडे । येरांसी तों पडे ओस दिशा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– येरांनीं–इतरांनी, अहंमान–अभिमान, ओस–रिकाम्या

अर्थ :– सर्व जग विष्णूने भरलेले आहे, याची जाणीव फक्त विष्णुभक्तांनाच असते. इतरांनी मात्र वृथा ज्ञानाचे ओझे डोक्यावर धरावे. १ नाना प्रकारांच्या साधनाच्या संकटांचा शीण मात्र सहन करावा लागतो. तेव्हा मुख्यत अभिमान गळून जाणे हे महत्त्वाचे आहे २ पण अहंकाराचा भाव हा अतिशय कठिण आहे. एखाद्या वेळेस इंद्राच्या वज्राचा भंग करता येईल, पण मायाजाळाचा भंग करणे जमणार नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, या देवाचे वर्म केवळ भजनामुळे हाताशी येईल. इतराना मात्र सर्व दिशा शून्य होऊन जातील. त्याच्या हाती काहीही सापडणार नाही. ४

१०११ कीर्तनाची गोडी । देव निवडी आपण ॥ १ ॥
कोणी व्हा रे अधिकारी । त्यासी हरि देईल ॥ २ ॥
वैराग्याचे बळें । साही खळ जिणावे ॥ ३ ॥
उरेल ना उरी । तुका करी बोभाट ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– साही–कामक्रोधादी सहा शत्रू, खळ–शत्रू, दुष्ट, जिणावें–जिंकावेत.

अर्थ :– या देवास कीर्तनसुखाची गोडी स्वत: होऊन निवडावीशी वाटते; त्याला ती फार आवडते. १ या कीर्तनसुखासाठी जर कुणी अधिकारी असतील, तर त्यांस श्रीहरी हे सुख प्राप्त करून देईल. २ तीव्र वैराग्याच्या बळावर कामक्रोधादी सहा शत्रू जिंकावेत. ३ एवढे झाल्यावर मग काही करायचे आहे, असे उरणार नाही; असा बोभाटा, अशी गर्जना मी तुकाराम करीत आहे. ४

१०१२ कायावाचामन ठेविलें गाहाण । घेतलें तुझें रिण जोडीलागीं ॥ १ ॥
अवघें आलें आंत पोटा पडिलें थीतें । सारुनि निश्चित[1] जालों देवा ॥ २ ॥
द्यावयासी आतां नाहीं तोळा मासा । आधील मवेशा तुज ठावी ॥ ३ ॥
तुझ्या रिणें गेले बहुत बांधोन । जाले मजहून थोरथोर ॥ ४ ॥
तुका म्हणे तुझें सर्ती जें गुंतलें । करुनि आपुलें घेईं देवा ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– जोडीलागीं–प्राप्तीसाठी, थीतें–पुरे, मवेशा–प्रिय स्वामी, सर्ती–कर्जरोख्यात

अर्थ :– देवा, माझे, शरीर, माझी वाणी, माझे मन; या सर्व गोष्टी मी तुमच्यापाशी गहाण ठेविल्या आहेत. तुम्या प्राप्तीसाठी मी कर्ज घेतले आहे. १ आता माझ्या पोटात सर्व काही सामावून पुरे झाले आहे. मी त्यामुळे आता अगदी निश्चित आहे. २ आता देवा, यापुढे तुला देण्यासाठी म्हणून मजजवळ अगदी तोळामासा एवढेसुद्धा

[1] निश्चित.

सोने उरले नाही, आणि प्रिय स्वामी, या पूर्वीची हकीगत तर तुम्हास माहीत आहेच ३ देवा, तुझ्या या प्रकारच्या ऋणाने किती तरी लोक बद्ध झाले आहेत, ते सर्व माझ्यापेक्षा किती तरी थोर थोर आहेत ४ तुकाराम महाराज म्हणतात, देवा तुझ्या कर्जरोख्यासारख्या कागदपत्रात जे गुतून गेले आहेत, त्याना तू आपलेसे करून घे ना ५

# ध्रुवक—अभंग २८.

१०१३ करिसी कीं न करिसी माझा अंगीकार । हा मज विचार पडिला देवा ॥ १ ॥
देसी की न देसी पायाचे दर्शन । म्हणऊनि मन स्थिर नाहीं ॥ २ ॥
बोलसी कीं न बोलसी मजसवे देवा । म्हणोनिया जीवा भय वाटे ॥ ३ ॥
होईल की न होय तुज माझा आठव । पडिला संदेह हाचि मज ॥ ४ ॥
तुका म्हणे मी तो कमाईचे हीण । म्हणऊनि सीण करीं देवा ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – अंगीकार–स्वीकार, संदेह–संशय

अर्थ – देवा, तू माझा स्वीकार करशील, न करशील असा मला विचार पडलेला आहे १ तू मला तुझ्या पायाचे दर्शन देशील न देशील, अशा शकेने माझे मन अस्थिर बनलेले आहे २ देवा, तू माझ्याशी बोलशील न बोलशील, या संशयाने माझ्या मनास भीती वाटत आहे ३ देवा, तुला माझी आठवण होईल न होईल, या शंकेने मी व्यथित झालो आहे रे ४ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, माझी कमाई कमी, माझ्याकडून मेहनतही फार होत नाही म्हणून मनास फार शीण वाटतो ५

१०१४ ऐसा माझा कोण आहे भीडभार । नावाचा मी फार वाया गेलो ॥ १ ॥
काय सेवा रुजु आहे सत्तावळ । तें मज राउळ कृपा करी ॥ २ ॥
काय याती शुद्ध आहे कुळ कर्म । तेणे पडे वर्म तुझे ठायीं ॥ ३ ॥
कोण तपोनिध दानधर्मसीळ । अगीं एक बळ आहे सत्ता ॥ ४ ॥
तुका म्हणे वाया जालो भूमी भार । होईल विचार काय नेणो ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – भीडभार–भीडेचे ओझे, राउळ–देव

अर्थ – असा मी कोण एवढा थोर आहे की, माझी भीड ध्यानात ठेवून माझे काम व्हावे ? उलट मी तर एक वाया गेलेला मनुष्य आहे १ माझी काय ईश्वराच्या चरणी सेवा रुजू झालेली आहे ? का त्याच्यावर सत्ता करीन असे बळ तरी माझ्याजवळ आहे ? २ माझी काय जात शुद्ध आहे ? की कुळ पवित्र आहे ? काय म्हणून देवा, तुझे रहस्य माझ्या ध्यानी यावे ? ३ मी काय असा मोठा तपस्वी आहे ? की दानधर्म मनोभावे करणारा आहे ? माझ्या अंगी काही सत्ता आहे ? बळ आहे काय ? ४ तुकाराम महाराज म्हणतात, या जगात जन्मास येऊन मी भूमीला भारच झालो आहे या सर्व आयुष्याचो अखेर काय होणार आहे कुणास माहीत ? ५

१०१५ साच मज काय कळों नये देवा । काय तुझी सेवा सत्य नव्हे ॥ १ ॥
करावें ते वरें जेणे समाधान । सेवावें हें वन न बोलावें ॥ २ ॥
शुद्ध माझा भाव होइल तुझे पायीं । तरिच हे देईं निवडूनि ॥ ३ ॥
उचित अनुचित कळो आली गोष्टी । तुझे कृपादृष्टी पाडुरंगा ॥ ४ ॥
तुका म्हणे मज पायासवें चाड । सांगमी ते गोड आहे मज ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – साच–खरी, चाड–इच्छा

अर्थ – देवा, खरी स्थिती काय आहे, हेसुद्धा मला कळू नये ना ? तुझी सेवा मी कधीच करीत नसतो काय ? १ जेणेकरून माझे समाधान होईल, ते देवा, तुम्ही करा ना नाही तर न बोलता वनात जाऊन एकांत-

वासात मी राहावे हेच उत्तम नाही का ? २ जेणेकरून माझा भाव देवा, तुझ्या पायांवर शुद्धपणे समर्पित होईल, असे काही निवडून मजजवळ दे. ३ पांडुरंगा, तुझ्या कृपादृष्टीमुळे योग्य काय, अयोग्य काय, हे मला चांगलेच समजून आले आहे. ४ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, मला तुमच्या पायांचीच एक इच्छा आहे. जे तू मला सांगशील ते गोडच वाटेल मला. ५

१०१६ नाहीं कांटाळलों परि वाटे भय । करावें तें काय न कळतां ॥ १ ॥
जन वन आम्हां समानचि जालें । कामक्रोध गेले[1] पायवणी ॥ २ ॥
षडऊर्मी शत्रु जिंतिले[2] अनंता । नामाचिया सत्ताबळें तुझ्या ॥ ३ ॥
मुख्य धर्म आम्हां सेवकांचा ऐसा । स्वामी करी शिरसा पाळावें तें ॥ ४ ॥
म्हणऊनि तुका अवलोकुनी पाय । वचनाची पाहे वास एका ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– पायवणी–पायऱ्या, अवलोकुनी–पाहून, वास–वाट.

अर्थ :– देवा, मी आयुष्यास काही कंटाळलो नाही; पण काय करावे, न करावे या संभ्रमात मी असल्यामुळे भयभीत झालो आहे. १ वनवास व जनवास हे आम्हास सारखेच झाले असून कामक्रोधांना आम्ही आमच्या घराच्या पायऱ्या केल्या आहेत. २ अनंता, तुझ्या नामाच्या सत्तेमुळे आम्ही कामक्रोधादी मनाच्या सहा ऊर्मी जिंकल्या आहेत. ३ स्वामीची आज्ञा शिरसावंद्य मानून ती पाळावी हाच आम्हा सेवकाचा धर्म आहे. ४ तुकाराम महाराज म्हणतात, म्हणूनच देवा, मी तुमची पवित्र पावले पाहून, त्यावर लक्ष ठेवून, तुमच्या कृपेच्या वचनाची वाट पाहात आहे. ५

१०१७ वांयांविण वाढविला हा लौकिक । आणिका लटिक वाद दोघां ॥ १ ॥
नाहीं ऐसा जाला देव माझ्या मतें । भुकेलें जेवितें काय जाणे ॥ २ ॥
शब्दज्ञानें गौरविली हे वैखरी । साच तें अंतरीं विंबेचि ना ॥ ३ ॥
जालों परदेशी गेले दोन्ही ठाय । संसार ना पाय तुझे देवा ॥ ४ ॥
तुका म्हणे मागें कळों येतें ऐसें । न घेतों हें पिसें लावूनियां ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– वैखरी–वाणी, साच–खरे,

अर्थ :– देवा, मी हा परमार्थाचा लौकिक व्यर्थच वाढविला, असे मला वाटते. धड प्रपंच नाही, धड परमार्थ नाही. असे होऊन गेल्यामुळे या दोघांचा वाद लटकाच ठरलेला आहे. १ आता माझ्या मनास असे वाटत आहे की, या जगात देवच नाही, मग तो भुकेलेल्यांचे जीवित जाणणार तरी कसे ? २ उगाच मी आपली वाणी शब्दरूपाने गौरवून पाहिली. पण ईश्वराच्या रूपाचे खरे बिंब काही तीमध्ये उमटलेले मला दिसले नाही. ३ असा मी देवा, परदेशी बनलो आहे. दोनही मार्ग हुकले धड परमार्थही नाही, धड संसारही नाही तुझ्या पायांपासून असा मी अंतरलो आहे. ४ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, असे मागेच मला समजून येते, तर मी हे तुझे वेड माझ्या मनास लावूनच घेतले नसते. ५

१०१८ न कळे तत्त्वज्ञान मूढ माझी मती । परि ध्यातों चित्तीं चरणकमळ ॥ १ ॥
आगमाचे भेद मी तों काय जाणें । काळ तो चिंतनें सारीतसें ॥ २ ॥
कांहीं नेणें परि म्हणवितों दास । होईल त्याचा त्यास अभिमान ॥ ३ ॥
संसाराची सोय सांडिला मारग । दुराविलें जग एका घायें ॥ ४ ॥
मागिल्या लागाचें केलेंसे खंडण । एकाएकीं मन रासियेलें ॥ ५ ॥
तुका म्हणे अगा रखुमादेवीवरा । भक्तकरुणाकरा सांभाळावें ॥ ६ ॥

---

१ केले, २ जिंकिले.

शब्दार्थ व टीपा :– मूढ–मूर्ख, मद, आगमाचे–वेदशास्त्राचे, घायें–घावाने,

अर्थ :– देवा, मी अतिशय मंद बुद्धीचा असल्यामुळे, मला तुझे ते गूढ तत्त्वज्ञान काही समजत नाही. पण मी माझ्या चित्तात तुझ्याच चरणकमलांचे ध्यान करतो. १ वेदशास्त्रांतील भेद मी कसे जाणणार ? १ पण मी तुझ्याच चिंतनात काल कसा तरी संपवीत आहे. २ मी तमे काहीही जाणीत नसलो तरी, मी तुझा दास म्हणवून घेत आहे. याचा अभिमान ज्याचा त्याने धरायला हवा. ३ मी संसाराची सर्व इच्छा सोडून देऊन तो मार्गही दारून दिला आहे. अशा प्रकाराने एका घावाने मी या जगाचा संबंध दूर केला आहे ४ मी मागच्या जन्मीच्या धर्माच्या लाभाचेही खंडण केले असून, मी माझे एकाएकी मन रक्षण केले आहे ५ तुकाराम महाराज म्हणतात, अगा, रखुमाईच्या वरा, भक्तांवर करुणा करणाऱ्या देवा, मला तुम्ही सांभाळावे ६

१०१९ इतुलें करीं देवा ऐकें हें वचन । समूळ अभिमान जाळीं माझा ॥ १ ॥
इतुलें करीं देवा ऐकें हे गोष्टी । सर्व समदृष्टी तुज देखें ॥ २ ॥
इतुलें करीं देवा विनवितों तुज । संतांचे चरणरज वंदीं माथां ॥ ३ ॥
इतुलें करीं देवा ऐकें हे मात । हृदयीं पंढरीनाथ दिवसरात्रीं ॥ ४ ॥
भलतिया भावें तारीं पंढरीनाथा । तुका म्हणे आतां शरण आलों ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – इतुले–इतकेसे तरी, भलतिया–कोणत्याही

अर्थ :– देवा, माझे बोलणे नीट ऐकून एवढीशी लहान गोष्ट तरी कर ना, माझा देहाभिमान समूळ जाळून टाक ना. १ देवा, तू नीट ऐक; मी सर्वत्र समदृष्टीने तुला पाहावे अशी तरी माझ्यावर कृपा कर. २ देवा, निदान एवढे तरी कर की, संतांच्या चरणावरची धूळ माझ्या माथ्यास लागेल असे तू करावेस, अशी माझी तुला विनवणी आहे. ३ देवा, पंढरीनाथा, नाही तर एवढेच कर की, माझ्या हृदयात रात्रदिवस निवास कर ना. ४ पंढरीनाथा, मी आता तुला पूर्णपणे शरण आलो आहे. तू कोणत्याही का मार्गाने असो, पण माझ्यावर कृपा कर. मला तार. ५

१०२० तुझा दास ऐसा म्हणती लोकपाळ । म्हणऊनि सांभाळ करीं माझा ॥ १ ॥
अनाथाचा नाथ पतितपावन । हें आतां जतन करीं नाम ॥ २ ॥
माझे गुण दोष पाहतां न लगे[1] अंत । ऐसें माझें चित्त मज ग्वाही ॥ ३ ॥
नेणें तुझी कैसी करावी हे[2] सेवा । जाणसी तूं देवा अंतरींचें ॥ ४ ॥
तुका म्हणे तूं या कृपेचा सिंधु । तोडीं भवबंधु माझा देवा ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– लोकपाळ–राजा, प्रमुख लोक

अर्थ :– देवा, मी तुझाच दास आहे, असे आता सर्व प्रमुख लोक बोलत राहिले आहेत, म्हणून तरी तू माझा सांभाळ करावास. १ देवा, तू अनाथांच्यावर कृपा करणारा अनाथनाथ आहेस ना ? पापी लोकांचा उद्धार करणारा तू पतितपावन आहेस ना ? मग आता तुझी ही नावे तुलाच सांभाळली पाहिजेत. २ माझ्या गुणदोषांकडे देवा, पाहशील तर त्यांचा अंतच लागणार नाही. माझे चित्तच याविषयी मला ग्वाही देत आहे. ३ देवा, तुझी सेवा कशी करावी, हेही मी नीटपणे जाणीत नाही. परंतु तू माझ्या मनातील भाव जाणून आहेस. ४ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तू कृपेचा सागर असून माझे हे भवसागराचे बंधन तोडून टाक ना. ५

१०२१ जाणवें तें काय नेणावें तें काय । ध्यावे तुझे पाय हेंचि सार ॥ १ ॥
करावें तें काय न करावें तें काय । ध्यावे तुझे पाय हेंचि सार ॥ २ ॥
बोलावें तें काय न बोलावें तें काय । ध्यावे तुझे पाय हेंचि सार ॥ ३ ॥
जावें तें कोठें न जावें तें आतां । बरवें आठवितां नाम तुझें ॥ ४ ॥
तुका म्हणे तूं करिसी तें सोपें । पुण्यें होती पापें आमुच्या मतें ॥ ५ ॥

---
१ कळे, २ तें.

शब्दार्थ व टीपा :– ध्यावे–वंदन करावे

अर्थ – देवा, काय जाणावे, न जाणावे, ते काही समजत नसल्यामुळे तुझ्या पायावर मस्तक ठेवावे, हेच एक तात्पर्य आहे १ काय करावे, काय न करावे, या संभ्रमात तुझ्या पायाचे चिंतन करावे हे एकच सार आहे. २ काय बोलावे, काय बोलू नये, या संशयाच्या अवस्थेत देवा, तुझ्या पायावर मस्तक नमवावे, हेच एक सार वाटते. ३ कुठे जावे, कुठे जाऊ नये, या संभ्रमात, तुझे नाव आठवावे हेच चांगले आहे ४ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तू जे जे करशील ते ते सोपेच वाटेल पुण्यमय वाटणारी पापेच आमच्या हातून होतात; पण तू आहेस म्हणून सर्व निभावते ५

१०२२ नको ब्रह्मज्ञान आत्मस्थितिभाव । मी भक्त तूं देव ऐसें करीं ॥ १ ॥
दावीं रूप मज गोपिकारमणा । ठेवीन[1] चरणावरी माथा ॥ २ ॥
पाहोनि श्रीमुख देइन आलिंगन । जीवें निंबलोण उतरीन ॥ ३ ॥
पुसता सांगेन हितगुज मात । बैसोनि एकांत सुखगोष्टी ॥ ४ ॥
तुका म्हणे यासी न लावीं उशीर । माझें अभ्यंतर जाणोनियां ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – आत्मस्थितिभाव–आत्मा ब्रह्मरूपच आहे अशी भावना, अभ्यंतर–अंतरंग, अंतःकरण

अर्थ :–देवा, मला तुमचे ते ब्रह्मज्ञान नको आहे आत्मस्थितीची किंवा मोक्षाची अथवा मुक्तीची भावनाही मला नको. अशा प्रकारे एकच होऊन मुक्त होण्यापेक्षा देवा, मी भक्त व तू देव असेच नाते असावे १ गोपिकारमणा, तू तुझे सुंदर सगुण असे रूप मला दाखीव मी तुझ्या चरणावर माझे मस्तक ठेवीन २ तुझे शोभिवंत मुख पाहून मी तुला आलिंगन देईन, माझा जीव तुझ्यावरून उतरून टाकीन ३ काही प्रेमाने विचारशील तर तुला काही गोष्टी प्रेमातील व एकान्तामधील सांगेन काही गुजगोष्टी करीन देवा ४ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, या गोष्टीस मात्र उशीर लावू नकोस माझे अंतःकरण जाणून तू माझ्यावर कृपा कर. ५

विवरण — तुकाराम महाराजाच्या या एका अभंगात पुनः एकदा निर्गुणाऐवजी सगुणाचे महत्त्व स्पष्ट करण्यात आले आहे मुक्तीऐवजी, मोक्षाऐवजी 'मी भक्त तूं देव' ही द्वैतावरची भावना या ठिकाणी स्पष्ट आहे या द्वैताच्या बुडाशी अविनाशी असे अद्वैततत्त्व असले तरी, निर्गुण निराकाराशी सुखसंवाद शक्य नाही, मुक्त स्थितीत प्रेमाचे हितगुज नाही, पायावर डोके ठेवणे नाही, आलिंगन नाही, जीव ओवाळून टाकणे नाही आणि भक्तीमध्ये तर याच भावनेचे सुख अवीट मानले गेले आहे ईश्वर निर्गुण, निराकार आहे व आपण त्याच्यापैकी एक किंवा तोच व्यक्त झाला ते आपण, असे नुसते ज्ञान उपयोगी पडत नाही त्याचा भोग अनुभूतीत हवा किंवा त्याची प्रतीती संवादसुखातून यावयास हवी यासाठी एकच तत्त्व दोन या अवस्थेस येते एक होते देव, दुसरे भक्त, एक होतो परमात्मा, दुसरा बनतो आत्मा पण ही भाषा अपुरी ठरते भक्तास सुंदर रूपाची, देखण्या मुखसौंदर्याची, कोवळ्या चरणकमलाची, गोपिकारमणाची अपेक्षा वाटू लागते भगवद्गीतेच्या अकराव्या अध्यायात भगवंताने आपले विराट रूप अर्जुनास दाखविले सर्व ब्रह्माण्डास सामावून घेणारे ते अनंताचे रूप पाहून अर्जुन चकित झाला पण त्याचे मन भयाने व्याकुळ झाले आणि त्याने व्याकुळतेने श्रीकृष्णास प्रार्थना केली की, 'तदेव मे दर्शय देव रूपं प्रसीद देवेश जगन्निवास, हे जगन्निवासा, देवदेवा, प्रसन्न व्हा, आणि देवा, आपले ते पूर्वीचेच स्वरूप मला दाखवा' अर्जुनाला श्रीकृष्णाच्या पूर्वीच्याच स्वरूपाचा लोभ जडला कारण ते सुंदर होते, सगुण होते भक्ताच्या डोळ्यांना तृप्त करणारे होते अनेक सहस्र हात असलेल्या रूपापेक्षा चारच हात असलेले ईश्वराचे सुंदर व परिचयाचे रूप अर्जुनाला पुन पुन पाहावेसे वाटते हे रूप कसे होते ? 'किरीटिनं गदिनं चक्रहस्तमिच्छामि त्वां द्रष्टुमहं तथैव । तेनैव रूपेण चतुर्भुजेन सहस्रबाहो भव विश्वमूर्ते, किरीट व गदा धारण करणारे, हातात चक्र घेतलेले, पूर्वीप्रमाणेच मी तुम्हाला पाहू इच्छितो म्हणून हे सहस्रबाहो, विश्वमूर्ते, त्याच चतुर्भुज रूपाने तुम्ही प्रकट व्हावे' या अर्जुनाच्या मनातील

---

१ ठेवू दे

तु गाथा. ५८

इच्छेचे रहस्य समजावून घेण्यासारखे आहे ईश्वराचे हे मानवी रूपच सौम्य व तृप्ती देणारे असते त्याच रूपाच्या सहवासात भक्ताचे मन विसावते

या अभंगात ईश्वराचे निर्गुणनिराकार रूपाचे ज्ञान नको, आत्मस्थितीभाव नको, ब्रह्मज्ञान नको, असे म्हटले आहे याचा अर्थच असा की, त्या परमेश्वरास आपल्या सर्व इंद्रियांनी भोगता यावे, अशी इच्छा भक्ताची असते चरणावर डोके ठेवण्यापासून एकान्तात हितगुज करण्यापर्यंतच्या विविध बाबतीत भक्ताना माठे सुख वाटते सर्व काही एकच आहे, हे ज्ञानाने समजते बुद्धीस त्याचे आकलन होते, पण प्रेमाशिवाय त्यात मग उणीव निर्माण होते म्हणून भक्त सगुण प्रेमावर येऊन ज्ञानाचाच भाग मागतात परमेश्वराचे विश्वरूप पाहून अर्जुन त्यास म्हणाला, *'ते हें विश्वरूप आपुले । तुम्हीं मज डोळां दाविलें । तरि माझें मन झाले । हृष्ट देवा'* अवाढव्य असे हे डोळ्यात न मावणारे रूप जरी अर्जुनास आनंद देणारे होते, तरी त्यात एक प्रकारची भीती होती या हजार बाहूंच्या रूपास दोन हातांनी कवळावे कसे ? हाही प्रश्न त्याच्या समोर होता त्याच्याशी प्रियत्वाच्या गोष्टी कशा बोलाव्यात ? म्हणूनच त्याने जी विनंती ईश्वरास केली, तिचा आविष्कार ज्ञानेश्वराच्या शब्दात सहजसुंदर अशा स्वरूपात असा आहे *'परि आता ऐसी चाड जीवीं । जे तुजसी गोठी करावी । जवळीक हे भोगावी । आलिंगुनि तूतें'* पण हे सर्व या विश्वरूपाशी कसे घडणे शक्य आहे? *'ते येचि स्वरूपीं करूं म्हणिजे । तरि कोणें एकें मुखेंसीं चावळिजे । आणि कवणा खेंव देइजे । तुज लेख नाहीं ।'* अशी अवस्था असल्याने त्या सगुण रूपाशिवाय भक्तास कधीच समाधान होत नाही अर्जुनाला कसे रूप हवे होते ? ज्ञानेश्वरानी आपल्या सुकुमार शब्दात वर्णन केले आहे *'मस्तकीं मुगुटातें ठविलें । कीं मुकुटा मुकुट मस्तक झालें । शृंगारा लेणें लाधलें । अंगाचेनि जया ॥ इंद्रधनुष्याचिये आडणी । माजी मेघ गगनरंगणीं । तैसें आवरिलें शारंगपाणी । वैजयंतिया ।'* अशा या सुंदर सगुणरूपाची आवड भक्ताच्या मनात नेहमीच असते अर्जुनाने अगदी व्याकुळतीस येऊन व भगवंतास विनंती केली आहे की, *'हे विश्वरूपाचे सोहळे । भोगूनि निवाले जी डोळे । आता होतात आधले । कृष्णमूर्तीलागीं ॥ ते साकार कृष्णरूपडें । वाचूनि पाहीं नावडे । तें न देखता थोडें । मानिताती हे ॥ आम्हां भोगमोक्षाचिया ठायीं । श्रीमूर्तीवाचूनि आन नाहीं । म्हणोनि तैसाचि साकारू होईं । हे सावरी आता ।'*

याही ठिकाणी ज्ञानेश्वरानी या सगुण व साकार मूर्तीपुढे आम्हास मोक्षाचीही काही किंमत नाही, असे सांगितले आहे सगुणभक्तीपुढे, ईश्वरस्मरणापुढे, भजनापुढे, सतसंगतीपुढे संताना मोक्ष तुच्छ वाटतो ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ, तुकाराम या थोर संतांनी मुक्तीची अथवा मोक्षाची कधीही चिंता केलेली नाही उलट भक्ति-सुखावाचून मोक्ष असेल तर तो कटाक्षाने दूर सारला आहे *'सांडुनि पंढरीची वारी । मोक्ष मागती ते भिकारी ।' 'भुक्ति मुक्ति मागों तुज । तरी मज हांसती पूर्वज ।', 'मुक्तिपद मी या अभिलाषीन चित्तीं । क्षणी अंतरेती पाय तुझे ', 'कर जोडूनि दोन्ही मोक्ष पाहे वास । म्हणे होईन दास हरिदासाचा ।'* यासारख्या नामदेवाच्या वचनातून मुक्तीएवजी थोर भक्त भक्तीतच कसा सुखावलेला असतो, हे ध्यानात येईल सर्व संताची साक्ष याच पद्धतीची आहे *'सांडोनि भजनाचा प्रेमा । मुक्ती मागसी अधमा ।', 'न मागो भुक्ति आणि मुक्ति । ती फजीती कोण सोसी ' 'मुक्तिपद देता न घे फुकासाठीं । तें हिंडे वाळुवंटी दीन रूप ' 'मोक्ष मुक्तितें देवा । नको गोऊ तया ठाया '* यासारख्या वचनामधून एकनाथानी मुक्तीपेक्षा भक्तीच श्रेष्ठत्व प्रस्थापित केलेले आहे तुकारामबुवानी तर मोक्षाच्या तुच्छतेचा आपल्या अभंगातून वर्षावच केलेला आहे *'मोक्षपदें तुच्छ केलीं या कारणें । आम्हा जन्म घेणें युगायुगीं ।', 'देवा एक हे विनंति । मज नको रे हे मुक्ती', 'मोक्ष तुमचा देवा । तुम्ही दुर्लभ तो ठेवा ।', 'नलगे वैकुंठ मोक्ष सायुज्यता । सुख वाटे घेता जन्म ऐसे ', 'नाहीं चाड मोक्षपदीं, भजनीं आवडी ।'* यासारख्या अनेक चरणातून मोक्षसुखाऐवजी सगुण रूपाच्या भक्तीचे व सतसंगाचे महिमान तुकोबानी वर्णन केले आहे

१०२३ मागें शरणागत तारिले बहुत । म्हणती दीनानाथ तुज देवा ॥ १ ॥
पाहिले अपराध नाहीं याती कुळ । तारिला अजामेळ गणिका भिल्ली ॥ २ ॥
अढळपदीं बाळ बैसविला ध्रुव । क्षीराचा सागर उपमन्या ॥ ३ ॥

गजेंद्रपशु नाडियें[1] जळचरें । भवसिंधुपार उतरिला ॥ ४ ॥
प्रल्हाद अग्नींत राखिला जळात[2] । विषाचें अमृत तुझ्या नामें ॥ ५ ॥
पाडवा सकट पडता जडभारी । त्याचा तूं कैवारी नारायणा ॥ ६ ॥
तुका म्हणे तूं या अनाथाचा नाथ । ऐकोनिया मात शरण आलो ॥ ७ ॥

शब्दार्थ व टीपा -- दीनानाथ-गरिबाचा नाथ, अजामेळ-कान्यकुब्ज देशातील दुराचारी ब्राह्मण, गणिका-वेश्या, पिंगला, भिल्ली-शबरी, ध्रुरु-ध्रुव, उपमन्यू-व्याघ्रपादाचा मुलगा, गजेन्द्रपशु-गजेन्द्र हत्ती, नाडियें-ग्रस्त केले, जळचरें-मगरीने, जडभारी-मोठे सकट, मात-कीर्ती

अर्थ -- देवा, यापूर्वी तुम्ही पुष्कळ पातकी लोकाचा उद्धार केलेला आहे म्हणूनच तू दीनाचा, गरिबाचा नाथ आहेस ना? १ त्यावेळी तुम्ही कुणाचेही अपराध पाहिले नाहीत, की कुणाची जात कोणती आहे? कूळ कोणते आहे? हेही पाहिले नाही अजामेळ, गणिका, भिल्लीण यासारखे हीन व पातकीही तू तारलेस २ त्या ध्रुव बालकास तू ध्रुवस्थानाच्या अढळ पदावर बसविलेस त्या उपमन्यू बालकास दुधाचा समुद्र मिळवून दिलास. ३ गजेन्द्र नावाच्या हत्तीस पाण्यातील एका मगराने पकडले तेव्हा, त्याला या सकटातून तूच ना राखलेस? त्याचे तूच ना रक्षण केलेस? ४ प्रल्हादासारख्या विष्णुभक्तास त्याच्या पित्याने अग्निकुंडात टाकले, तेव्हा त्याचे रक्षण तूच देवा केलेस त्याचे पाण्यापासूनही रक्षण केलेस त्याच्या मुखात जाणाऱ्या विषाचे अमृत देवा, केवळ तुझ्याच नामामुळे झाले, हे खरे ना? ५ त्या पाडवाना त्याच्या आयुष्यात मोठमोठी सकटे थोडी का आली? पण नारायणा, त्याचा कैवार घेऊन तूच त्यांना वाचवीत होतास तूच त्याचे अनेक प्रसगी रक्षण केलेस ६ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तू अशा प्रकारे अनाथाचा नाथ आहेस अशी ही तुझी कीर्ती ऐकून मी तुला शरण आलो आहे ७

विवरण --आपणास ईश्वराने तारावे, आपणावर कृपा करावी, म्हणून थोर भक्त मागचे दाखले देत असतात याही अभगात तुकोबानी अजामेळ, गणिका, ध्रुव, उपमन्यू गजेन्द्र प्रल्हाद, पाडव इत्यादीची उदाहरणे नेहमीप्रमाणे दिलेली आहेत मागे अभग क्र २५७, ३७२, ४२७ इत्यादीमधून वरील अभगातील काही कथाचे सदर्भ आलेले असल्यामुळे त्या त्या ठिकाणचे अर्थ व विवरण पाहावे येथे फक्त ध्रुवाची कथा व गजेन्द्रमोक्षाची कथा याचा सदर्भ थोडक्यात पाहू ध्रुव हा उत्तानपाद राजाचा सुनीती नावाच्या पत्नीपासून झालेला मुलगा, हा मोठा भगवद्भक्त होऊन गेला एकदा याच्या सावत्र आईने, सुरुचीने, सवतीमत्सराने ध्रुवास उत्तानपादाच्या माडीवरून खाली ओढले, कठोर शब्दाचे भाषणही तिने केले बिचारा ध्रुव रडत रडत आपल्या आईजवळ गेला आपल्यावर ईश्वराची कृपा नाही म्हणूनच आपणास हे दु ख भोगावे लागले, असे त्यास आईने सागितल्यावर ध्रुव ईश्वरप्राप्तीसाठी तपश्चर्या करण्यासाठी रानावनात निघून गेला तेथे नारदानी त्याला 'ॐ नमो भगवते वासुदेवाय' हा मत्र दिला या मत्राच्या साह्याने बालध्रुवाने तपश्चर्या केल्यावर ईश्वर प्रसन्न झाले व त्यानी त्याची भक्ती पाहून त्याला अढळपद दिले, अशी पुराणातून कथा आहे तुकाराम महाराजानी मोठ्या कौशल्याने 'अढळपदीं बाळ बैसविला ध्रुरु' असा सार्थ उल्लेख केला आहे

भगवताने गजेन्द्राचे रक्षण कसे केले, याविषयीही कथा पुराणातून सापडते अगस्त्य मुनीच्या शापाने इद्रद्युम्न नावाचा एक राजा हत्तीच्या जन्मास जाऊन त्रिकूट गिरीवर निवास करीत होता तहानेने व्याकूळ झालेला असताना एकदा हा सरोवरात पाणी पिण्यासाठी व जलक्रीडेसाठी गेला असताना, त्याचा पाय पाण्यातील एका मगरीने धरला हा मगर अथवा नक्र हा पूर्वजन्मीचा गधर्व असून देवलमुनीच्या शापाने या नक्राच्या जन्मास आलेला होता गजेन्द्र सकटात सापडताच त्याचे आप्तस्वकीय त्याचा त्याग करून गेले मगराची मिठी तीव्र होत होती अशा सकटप्रसगी गजेन्द्राने भगवताची स्तुती केली व त्यानतर श्रीहरीने येऊन स्वत च्या सुदर्शन चक्राने नक्रास मारून गजेन्द्राचे रक्षण केले ईश्वराच्या कृपेने पुढे गजेन्द्र व नक्र असे दोघेही वैकुठलोकी गेले असल्याची कथा आहे तुकाराम महाराजानीसुद्धा या गजेन्द्रकथेचे अनेक उल्लेख आपल्या अभगातून केलेले आहेत 'गजेन्द्र तो हस्ती सहस्त्र वरुषें । जळामाजि नक्रें

१ नाडिला, २ जळत

धीडिलासे' (अभग क्र ३०८७) व 'राजइद्र पशु आर्ते मोकलिला। तो तुज स्मरला पाडुरग (अभग क्र २४५५) असे दोन स्वतत्र अभगच बुवानी गजेन्द्राच्या चरित्रकथेवर लिहिलेले आहेत

१०२४ तुझा शरणागत जालो मी अकित । करीं माझें हित पाडुरगा ॥ १ ॥
पतितपावन तुझी ब्रीदावळी । ते आता साभाळीं मायबापा ॥ २ ॥
अनाथाचा नाथ बोलतील सत । ऐकोनिया मात विश्वासलो ॥ ३ ॥
न करावी निरास न धरावें उदास । देईं याचकास कृपादान ॥ ४ ॥
तुका म्हणे मी तो पातकाची रासी । देईं पायापाशीं ठाव देवा ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – अकित–स्वाधीन, मात–गोष्ट, निरास–निराशा

अर्थ – देवा, मी तुझ्या स्वाधीन झालेलो असून तुलाच शरण आलेलो आहे पाडुरगा, माझे काही तरी हित तुम्ही करावे असे वाटते १ देवा, तुझी पतिताना पावन करण्याची जी कीर्ती आहे, ती तू आता नीटपणे साभाळलीस २ हे सर्व सत तुला तू अनाथाचा नाथ आहेस असे बोलतात, त्याची ही गोष्ट मोठ्या विश्वासाने मी हृदयाशी धारण केली आहे ३ देवा, माझी निराशा तुम्ही कधी करू नये माझ्यासबधी तुम्ही उदासही राहू नये या याचकास तू कृपेचे दान द्यावेस देवा ४ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, मी तर पातकाची रास आहे परतु तू तुझे ब्रीद ध्यानात घेऊन मला आपल्या पायापाशी आश्रय द्यावास ५

१०२५ सर्वस्वाचा त्याग तो सदा सोवळा । न लिंपे विटाळा अग्नि जैसा ॥ १ ॥
सत्यवादी करी ससार सकळ । अलिप्त कमळ जळीं जैसें ॥ २ ॥
घडे ज्या उपकार भूताची ते दया । आत्मस्थिति तया अगीं वसे ॥ ३ ॥
नो[1] ब्रोले गुणदोष नाइके जो कानीं । वर्तोनि तो जनीं जनार्दन ॥ ४ ॥
तुका म्हणे वर्म जाणितल्याविण । पावे करिता सीण साडीमाडी ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – सत्यवादी–खर बोलणारा, साडीमाडी–सोडणे, धरण

अर्थ – ज्याने सर्वस्वाचा त्याग केला आहे, तो नेहमीच सोवळा असतो अग्नी ज्याप्रमाणे कोणत्याही विटाळाने दूषित होत नाही, तसा तो असतो १ खरे बोलणारा ससार करीत असला तरी, तो पाण्यातील कमळाप्रमाणे पाण्यात राहूनही, ससारात राहूनही आसक्त असत नाही २ ज्याना भूतमात्राची दया येते व ज्याच्या हातून त्याच्यावर उपकार होतो, त्याच्या अगी आत्मस्थितीचा भाव निर्माण झालेला असतो असे समजावे ३ जो दुसऱ्याचे गुणदोष बोलत नाही कानानेही ऐकत नाही, तो जगात वावरत असूनही जनार्दनाप्रमाणेच असतो ४ तुकाराम महाराज म्हणतात, परमार्थाचे नीट धम जाणून घेतले नाही तर, उगाचच काही धारण करणे, काहीचा त्याग करणे याचा शीण मात्र व्यर्थ होतो ५

१०२६ कुळधर्म ज्ञान कुळकर्म साधन । कुळधर्में निधान हातीं चढे ॥ १ ॥
कुळधर्म भक्ति कुळधर्म गति । कुळधर्म विश्राति पाववील ॥ २ ॥
कुळधर्म दया कुळधर्म उपकार । कुळधर्म सार साधनाचे ॥ ३ ॥
कुळधर्म महत्त्व कुळधर्म मान । कुळधर्म पावन परलोकींचे ॥ ४ ॥
तुका म्हणे कुळधर्म दावी देवीं देव । यथाविध भाव जरीं होय ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – निधान–ठेवा

अर्थ – आपण ज्या कुळात जन्मास आलो आहोत, त्याच कुळधर्माचे ज्ञान करून घ्यावे व त्याचेच साधन करावे. त्यामुळेच आपल्या हातात श्रीहरीच्या कृपेचा ठेवा प्राप्त होईल १ कुळधर्माप्रमाणे वागणे हीच भक्ती व

[1] ना

हीच गती होय. कुळधर्मांच्या योगानेच उत्तम प्रकारची विश्रांती आपल्या मनास मिळत राहील. २ दुसऱ्यावर दया करण्याचाच आपला कुळधर्म आपण पाळावा. उपकार करणे, हाही एक कुळधर्मच आहे. सर्व साधनाचे सार म्हणजे आपल्या कुळाचा धर्म होय. ३ कुळधर्म चांगल्या रीतीने पाळण्यामुळेच मानसन्मान होतो, महत्त्व प्राप्त होते. कुळधर्मामुळेच आचरण पवित्र होऊन परलोकाची उत्तम गती प्राप्त होते. ४ तुकाराम महाराज म्हणतात, ज्याचा जसा भाव असेल, तशा प्रकारच्या कुळधर्माची प्राप्ती आपणास आपला देव अथवा देवी करून देतील. ५

१०२७ पुण्य परउपकार पाप ते परपीडा । आणीक नाहीं जोडा दुजा यासी ॥ १ ॥
सत्य तोचि धर्म असत्य तें कर्म । आणीक हें वर्म नाहीं दुजें ॥ २ ॥
गति तेचि मुखीं नामाचे स्मरण । अधोगति जाण विन्मुखता ॥ ३ ॥
संतांचा संग तोचि स्वर्गवास । नर्क तो उदास अनर्गळा ॥ ४ ॥
तुका म्हणे उघडें आहे हित घात । जयाचें उचित करा तैसें ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – परउपकार–दुसऱ्यावर उपकार, परपीडा–दुसऱ्यास दुःख, जोडा–तुलना, अनर्गळा–स्वच्छंदी

अर्थ.– दुसऱ्यावर उपकार करणे हेच श्रेष्ठ प्रकारचे पुण्य होय व दुसऱ्यास त्रास देणे हे खरे पाप आहे. याशिवाय दुसरे पापपुण्य कोणतेही नाही १ सत्याने वागणे, हाच खरा धर्म असून असत्याने वागण्याने पापकर्म मात्र वाढते याखेरीज धर्माचे वर्म दुसरे नाही. २ मुखामध्ये एकसारखे प्रभूचे नाम असणे, हीच एक गती होय पण यापासून विन्मुख असणे हीच अधोगती होय. ३ साधुसंताची संगत हा एक प्रकारचा स्वर्गवास असून सतसंगतीविषयी उदास असणे, यास स्वच्छंदी व उदासवाणा नर्क समजावा. ४ तुकाराम महाराज म्हणतात, अशा प्रकारे हित आणि अहित कशात आहे, यासंबंधी स्पष्टता आहे. जे जसे उचित असेल तसे तुम्ही करा. ५

विवरण.– पुण्य म्हणजे काय, पाप म्हणजे काय, सत्य म्हणजे काय, असत्य म्हणजे काय, धर्म म्हणजे काय, अधर्म म्हणजे काय, याचा मार्मिक निवाडा तुकाराम महाराजांनी या अभंगात दिलेला आहे दुसऱ्याचे दुःख जाणून त्यावर उपकार करणे, हे पुण्य व दुसऱ्यास विनाकारण पीडा देणे, त्रास देणे, हे पाप अशी साधी, सोपी व सुटसुटीत व्याख्या तुकारामबुवांनी येथे केली आहे ती भागवतधर्माच्या परंपरेला धरून अशीच आहे जे रंजले गांजले असतील, जे पीडित आहेत, वंचित आहेत, त्यांचे दुःख दूर करणे, हा साधुसंताच्या कार्याचा एक महत्त्वाचा भाग आहे जगातील पापताप दूर करावेत, खळांची बुद्धी वाईट असते ती चांगली व्हावी, सबंध विश्व धर्मप्रकाशाने धवलित व्हावे, हे खरे म्हणजे संताचे कार्य 'तैसी बाधिलीं सोडीत । बुडालीं काढीत । साकडीं फेडित । आर्तीचिया ।' आर्तांची दुःखे फेडणे व बुडणाऱ्यास वर काढणे हेच खरे म्हणजे संताचे जीवितकार्य याचसाठी परउपकार व परपीडा याचा उल्लेख संत करीत असतात दुसऱ्यास पीडा न देण्याचे कारण केवळ त्याच्या पोटी कळवळा असतो, किंवा सहानुभूती असते, हेच नसून सर्वत्र पसरून राहिलेल्या आत्मतत्त्वाची जाणीव त्यांना फार मोठ्या प्रमाणावर असल्याने ' कोणाही जीवाचा न घडो मत्सर ' असे त्यांना मनापासून वाटत असते

१०२८ न वजे वांयां कांहीं ऐकतां हरिकथा । आपण करितां वांयां न वजे ॥ १ ॥
न वजे वांयां कांहीं देवळासी जातां । देवासी पूजितां वांयां न वजे ॥ २ ॥
न वजे वांयां कांहीं केलिया तीर्थ । अथवा का व्रत वांयां न वजे ॥ ३ ॥
न वजे वांयां जाले संताचें दर्शन । शुद्ध आचरण वांयां न वजे ॥ ४ ॥
तुका म्हणे भाव असतां नसतां । सायास करितां वांयां न वजे ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा:– न वजे–जाणार नाही.

अर्थ – श्रीहरीची कथा आपण स्वत वाचली किंवा दुसऱ्याकडून ऐकली, तर ती काही वाया जाणार नाही १ देवळात जाऊन देवाचे दर्शन जर घेतले तर, ते काही वाया नाही जायचे देवाची पूजा केली तर, ती वाया जाणार नाही २ एखाद्या तीर्थयात्रेस जाता आले अथवा एखाद्या व्रताचे आचरण करता आले तर, ते काही वाया जाणार नाही ३ साधुसंतांचे दर्शन झाल्यास काही वाया जाणार नाही आचरण जर शुद्ध असेल तर तेही वाया जाणार नाही ४ तुकाराम महाराज म्हणतात, मनात श्रेष्ठ प्रकारचा भाव असो नसो, चांगल्या कामाचे श्रम कधी वाया जाणारे नसतात झालाच तर त्याच्यापासून फायदाच होत असतो ५

१०२९ चित्तीं धरीन मी पाउलें सकुमार । सकळ बिढार संपत्तीचे ॥ १ ॥
कठीं धरिन मी नाम अमृताची वल्ली । होईल राहिली शीतळ तनु ॥ २ ॥
पाहेन श्रीमुख साजिरे सुदर । सकळा आगर लावण्याचे ॥ ३ ॥
करिन अगसग बाळकाचे परी । बैसेन तो वरी नुतरीं कडिये ॥ ४ ॥
तुका म्हणे हा केला तैसा होय । धरिली मनें सोय विठोबाची ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – बिढार–बिऱ्हाड आश्रयाचे स्थान, वल्ली–वेल तनु–शरीर आगर–खाण, नुतरी–उतरणार नाही, कडिये–कडेवरून

अर्थ – या देवाची ही सुकुमार पावले मी माझ्या हृदयाशी धारण करीन कारण सर्व प्रकारच्या संपत्तीचे हेच एक आश्रयस्थान आहे १ अमृताची वेल असणारे या श्रीहरीचे नाम हेच मी माझ्या मुखात सतत धारण करीन त्यामुळे त्रिविध तापानी संतप्त झालेला माझा देह हा अतिशय शीतल होईल २ सर्व प्रकारच्या सौंदर्याची खाणच असलेले असे हे या श्रीहरीचे सुंदर व शोभिवंत मुख मी पाहात बसेन ३ या देवाच्या अंगाशी लडिवाळ पणा एखाद्या बालकाप्रमाणे मी करीन मी कौतुकाने त्याच्या कडेवर जाऊन बसेन तो परत खाली उतरणार नाही ४ तुकाराम महाराज म्हणतात, हा श्रीहरी आपण ज्या भावाने जो भजतो, त्या भावाने तो आकारास येतो म्हणून तर याची संगत माझ्या मनाने धरलेली आहे ५

१०३० बाळ मातेपाशीं सागे तानभूक । उपायाचे दु ख काय जाणे ॥ १ ॥
तयापरी करीं पाळण हे माझें । घेउनिया ओझें सकळ भार ॥ २ ॥
कासया गुणदोष आणिसील मना । सर्व नारायणा अपराधी ॥ ३ ॥
सेवाहीन दीन पातकाची रासी । आता विचारिसी काय ऐसें ॥ ४ ॥
जेणे काळें पायीं अनुसरलें चित्त । निर्धार हे हित जालें ऐसें ॥ ५ ॥
तुका म्हणे तुम्ही तारिले बहुता । माझी काहीं चिंता असो दे बो ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – कासया–काय म्हणून

अर्थ – देवा एखादे बालक आपल्या मातेस आपली तहानभूक सांगत असते त्यावर उपाय काय करायचा हे काही ते कधी जाणत नाही त्याचे काम फक्त आईस भूक, गरज सांगणे हेच होय १ त्याप्रमाणे देवा, तुम्ही माझे पालनपोषण करावे माझा सर्व भार आता देवा तुम्हीच घ्यावा २ नारायणा, माझे गुणदोष आता तू मनात तरी का आणतोस रे? मी अपराधाची रासच आहे असे समज ना रे ३ मला तुझी सेवा नीट घडलेली नाही मी दीन आहे, पातकी आहे आता काय काय माझ्यात दोष नाहीत म्हणून विचारतोस? सर्व काही आहेत असेच समज ४ ज्या काळात माझे चित्त तुझ्या पायाशी स्थिर झाले, त्याच वेळी मी मानले की, माझे हितच होणार ५ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तुम्ही पुष्कळजणाचे रक्षण केले आहे त्यात माझी थोडी तरी चिंता तुम्हास असावी ६

विवरण – भक्तिभावातील वात्सल्याच्या दृष्टीने तुकाराम महाराजांचा हा 'एक अतिशय प्रसिद्ध व थोर अनुभूतीचा अभंग आहे बाळाने आपणास लागलेली तहान भूक आईस सांगावी फक्त त्याला पुढल्या उपायाचे चिंतन करण्याचे काय कारण आहे ? आईच ते सर्व पाहणार नाही का ? खरे म्हणजे मुलास लागलेली भूक आईसच समजते आधी कारण तिचे त्याकडेच सारखे लक्ष असते तुकाराम महाराज म्हणतात, या आईच्या वात्सल्याने परमेश्वराने आपले पालन करावे ईश्वरास, विठ्ठलास आई म्हणून संबोधण्याची रीत फार पूर्वीपासून साधुसंतानी सुरु केलेली आहे बाप, बंधू, पत्नी इत्यादी नात्यात थोडासा दूरत्वाचा अंश उरतो पण आईचे नाते असे आहे की, त्यात उभयताना कसलाच संकोच धरणे आवश्यक नसते सहजसुलभ असा हा निर्व्याज प्रेमाचा आविष्कार असतो आईवर रागवावे, रुसावे, तिच्याशी भांडावे, तिच्या मांडीवर बसावे, तिच्याजवळ हट्ट करावा, तिचा पदर धरावा, हे सर्व लडिवाळ प्रकार फक्त आईच्याच नात्यात संभवतात, म्हणून तुकारामबुवासारख्या थोर भक्ताने विठ्ठलास आई म्हटले आहे माउली म्हणूनच तिची आळवणी केली आहे पंढरपूरच्या संप्रदायात याच वात्सल्याच्या भावनेने सर्वत्र विठ्ठलाची उपासना चालू आहे

विठ्ठल आपली आई व आपण त्याचे लाडके, हट्टी, रुसणार एक मूल या वात्सल्यभावावरील तुकोबाचे अनेक अभंग आर्द्रतेने चिंब झालेले आहेत भक्तांच्या सहजभाव्य अशा आविष्कारात डोळ्यात अश्रू येणे, ऊर भरून येणे, अष्टसात्त्विक भाव जागृत होणे व हृदय द्रवून जाणे, विरघळून जाणे, याचा अनुभव तुकाराम महाराजांच्या या भावावरील निश्चयाने येतो संसारतापाने त्रस्त झालेल्या, रोजच्या व्यवसायातील चिंतानी खंगलेल्या, मानसिक चिंतानी ग्रस्त झालेल्या माणसास तुकोबाचे हे अभंग म्हणजे एक प्रकारचे श्रेष्ठ वरदानच होय व्यावहारिक क्षेत्रातील विविध तापाचा उन्हाळा तुकोबाच्या या प्रकारच्या अभंगाच्या सान्निध्यात सहज सुखद असा वाटावा

तुकोबाच्या या अमृतमधुर व चंद्रिकेप्रमाणे शीतल असणाऱ्या वचनाचा अनुभव प्रत्यक्षाने एकदा तरी घेण्यासारखा आहे ज्या तुकोबानी हा श्रेष्ठ अनुभव भोगला ते फारच श्रेष्ठ, पण ज्याच्या कानावर तो अभंगरूपानी पडला व ज्याचे चित्त शांत झाले, तेही तितकेच धन्य मानावयास हवेत संसारग्रस्त व तापत्रयाने भयभीत झालेल्या माणसाने डोळे मिटावेत, श्रीविठ्ठलाचे रूप डोळ्यापुढे आणावे आणि मुखाने उच्चार करावा, 'मायें मोकलिलें कोठें जावें बाळें ?', 'मायबापापुढें लाडिकें लेकरूं । तैसें बोल करूं कवतिकें', 'घेई उचलोनि पुसे तानभूक । पुसी मायें मुख पीतांबरें', 'कोण आम्हां पुसे सिणलें भागलें । तुजविण उगलें पांडुरंगा ?' 'वेडें वाकुडें बाळकाचें बोल । करिती नवल मायबाप', 'तूं माउलीहून मायाळ । चंद्राहूनी शीतळ । पाणियाहूनि पातळ । कल्लोळ प्रेमाचा', 'नलगे मायेसी बाळ निरवावें । आपुल्या स्वभावें ओढे त्यासी', 'विठ्ठल माझी माय । आम्हां सुखा उणें काय' अशा सारख्या शेवडो वचनाचा उच्चार मुखातून होत असताना अंतःकरण द्रवून येईल शीतल होईल अपार असे प्रभुप्रेमाचे सुख अनुभवास येईल तुकारामबुवानी जे भोगले ते थोडक्या अंशान का होईना पण प्रतीतीस येईल

**१०३१** **जीवनावाचूनि तळमळी मासा । प्रकार हा तैसा होतो जीवा ॥ १ ॥**
**न सपडे जालें भूमिगत धन । चरफडी मन तयापरी ॥ २ ॥**
**मातेचा वियोग जालिया हो बाळा । तो कळवळा जाणा देवा ॥ ३ ॥**
**सांगावे ते किती तुम्हांसी प्रकार । सकळांचें सार पाय दावीं ॥ ४ ॥**
**येचि चिंते माझा करपला भीतर । का नेणों विसर पडिला माझा ॥ ५ ॥**
**तुका म्हणे तूं हें जाणसी सकळ । यावरि कृपाळ होईं देवा ॥ ६ ॥**

शब्दार्थ व टीपा – जीवनावाचूनि–पाण्याशिवाय, न सपडे–सापडत नाही, भीतर–मनाचा गाभा

अर्थ – पाण्याबाहेर काढलेला मासा जसा तडफडतो तसा देवा, तुझ्यावाचून माझा जीव तळमळत आहे हो १ भूमीमध्ये दडलेले धन सापडत नसले म्हणजे जसे लोभी माणसाचे मन तडफडते, तशीच अवस्था माझ्या मनाची झालेली आहे २ आईचा वियोग झालेल्या मुलाचे मन जसे कासावीस होते, तोच कळवळा माझ्या पोटात

देवा, तुमच्यासाठी आहे हे नीट जाणावे तुम्ही. ३ देवा, आणखी माझ्या मनाची ही अवस्था तुम्हांस किती प्रकारांनी सांगावी हो ? सर्व प्रकारांचे सार हेच की, तुम्ही तुमच्या पायांचे दर्शन मला लौकर द्यावे. ४ तू मला भेट देशील न देशील, याच चिंतेने माझ्या मनाचा गाभा करपून गेला आहे. देवा, माझा तुला एवढा विसर का पडला आहे हेच मला समज नाही. ५ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, हे तू सर्व जाणीत का नाहीस ? सर्व काही तू जाणून आहेस. तरी देवा तू मजवर कृपा कर ना एकदा. ६

१०३२ शरण आलें त्यासी न दावीं हे पाठी । ऐका जगजेठी विज्ञापना ॥ १ ॥
आळविती तयांसी उत्तर झडकरी । द्यावें परिसा हरी विज्ञापना ॥ २ ॥
गांजलियाचें करावें धांवणें । विनंती नारायणें परिसावी हे ॥ ३ ॥
भागलियाचा होईं रे विसांवा । परिसावी केशवा[1] विज्ञापना ॥ ४ ॥
अंकिताचा भार वागवावा माथां । परिसावी अनंता विज्ञापना ॥ ५ ॥
तुका म्हणे आम्हां विसरावें ना देवा । परिसावी हे देवा विज्ञापना ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा :– विज्ञापना–विनंती, परिसा–ऐका, धावणें–रक्षण, अंकिताचा–स्वाधीन असलेल्याचा.

अर्थ :– देवा, जे शरण आलेले तुझे भक्त आहेत, त्यांना तू पाठ न दाखविता, त्यांच्यावर कृपाच करावीस अशी हे जगजेठी, तुला नम्र विनंती आहे. १ जे मनोभावे तुझी आळवणी करतात, त्यांना स्वीकृतीचे, कृपाप्रसादाचे उत्तर झटकन देऊन तू त्यांना तृप्त करावेस अशी विनंती आहे देवा. २ देवा, जे रंजलेले, गाजलेले, त्रासलेले आहेत, त्यांचे तू रक्षण करावेस, नारायणा, ही माझी विनंती तुम्ही ऐकावी. ३ जे दमलेले आहेत, भागलेले आहेत, त्यांचा देवा, तू विसावा व्हावास. त्यांच्या विश्रांतीचे स्थान व्हावेस, केशवा, ही माझी विनंती तू ऐक ना. ४ जे तुझ्या स्वाधीन झाले आहेत, त्यांच्या रक्षणाचा भार देवा, तूच तुझ्या मस्तकावर घ्यावयास हवा. ही ही माझी विनंती अनंता, तू ऐकावीस. ५ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, आता आम्हांस तुम्ही बिलकूल विसरून जाऊ नये. देवा, ही एक विनंती माझी तुम्ही ऐका ना. ६

१०३३ कोण आम्हां पुसे सिणलें भागलें । तुजविण उगलें पांडुरंगा ॥ १ ॥
कोणापाशीं आम्हीं सांगावें[2] सुखदुःख । कोण तानभूक निवारील ॥ २ ॥
कोण या तापाचा करील परिहार । उतरील पार[3] कोण दुजा ॥ ३ ॥
कोणापें इच्छेचें मागावें भातुकें । कोण कवतुकें बुझावील ॥ ४ ॥
कोणावरी आम्हीं करावी हे सत्ता । होईल साहाता कोण दुजा ॥ ५ ॥
तुका म्हणे अगा स्वामी सर्व जाणां । दंडवत चरणां तुमच्या देवा ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – पुसे–विचारील, सिणलें भागलें–दमलेले, त्रासलेले, उगलें–उगाच, आपोआप, पार–(भार)–ओझे, भातुकें–खाऊ.

अर्थ :– देवा, आम्ही दमलेले आहोत, शिणलेले आहोत, त्रासलेले आहोत; अशा वेळी पांडुरंगा, तुझ्याशिवाय उगाच आमची चौकशी प्रेमाने दुसरे कोण रे करणार आहे ? १ देवा, आम्ही आमच्या मनाचे सुखदुःख कुणापाशी सांगावे रे ? कोण माझी तहानभूक निवारण करील ? २ मला हा जो त्रिविध ताप झालेला आहे, तो तुझ्याशिवाय कोण रे दूर करील ? माझ्या मनावरचे हे ओझे कोण दूर करणार आहे ? ३ देवा, माझ्या इच्छेस येईल तो खाऊ मी कुणाजवळ रे मागावा ? आणि असा हट्ट केल्यावर कौतुकाने, प्रीतीने माझी समजूत तरी देवा, तुझ्याशिवाय दुसरे कोण काढणार आहे रे ? ४ आम्ही प्रेमाने, हक्काने कुणावर रे सत्ता करावी ? आमचा हा त्रास सहन करणारा कोण दुसरा आहे ? ५ तुकाराम महाराज म्हणतात, अरे देवा, तूच माझा स्वामी असल्यामुळे तूच सर्व काही जाणणार आहेस, असे मी मानतो. नारायणा, तुमच्या चरणांवर माझे दंडवत असो. ६

[1] दे, [2] सागो, [3] भार.

विवरण —या व या वरील दोन तीन अभंगातील तुकाराममहाराजांच्या मनाची अवस्था सहज ध्यानात येण्यासारखी आहे. वात्सल्य व कारुण्य या दोन भावांनी महाराजांचे चित्त द्रवून गेलेले असल्यामुळे या अभंगातून उच्च भूमिकेवरचे भाव सोप्या सोप्या शब्दात सहज रीतीने व्यक्त झाले आहेत. ईश्वराशी किती लडिवाळ असावे, त्याच्याशी किती जवळीक साधावी, किती कौतुकाने त्याच्याशी लगट करावी, किती प्रेमाने त्याच्याशी नाते जडवावे, यासर्वांची उत्तम साक्ष या अभंगात आहे. आपला शीण कुणी तरी जाणावा, कुणी तरी आपल्या तहानभुकेची चौकशी करावी, कुणीतरी कौतुकाने आपली समजूत काढावी, अशी जी आपली इच्छा असते, ती पुरविणारा हा एक समर्थ श्रीविठ्ठलच असल्यावर मग त्या सुखाचे वर्णन अवीट व्हावे यात नवल ते काय ?

१०३४ तेव्हां धाले पोट बैसलो पंगती । आता आम्हा मुक्तिपांग काई ॥ १ ॥
धांवा केला आता येईं यो[1] धांवोन । येथें काई करणे न लगे संदेह ॥ २ ॥
गायनाचा आतां कोठें उरला काळ । आनंदें सकळ भरी आले ॥ ३ ॥
देवाच्या सख्यत्वे विषमासी ठाव । मध्यें कोठें वाव राहो सके ॥ ४ ॥
तेव्हां जालो अवघी बाधा वाताहात । प्रेम हृदयांत प्रवेशले ॥ ५ ॥
तुका म्हणे आम्हीं जितिले भरवसा । देव कोठें दासा मोकलितो ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा :– धाले–सतुष्ट झालो, मुक्तिपाग–मुक्तीची इच्छा, विषमासी–सकटास, ठाव–जागा

अर्थ.– जेव्हा मी देवाबरोबर त्याच्या पगतीसच बसलो, तेव्हा माझे पोट भरून आल्यामुळे मी सतुष्ट झालो आता आम्हास मुक्तीची इच्छा कुठून असणार ? १ आता त्याचा धावा करताच तो धाऊन येईल; या विषयी मनात सशयच नको. २ आता त्याचे गायन करून गुणवर्णन करण्याचीही वेळ राहिलेली नाही, सर्वच याच्या प्रेमानंदाने भरून गेले आहे ३ देवाच्या मैत्रीमध्ये विषम भावनेस किंवा सकटाना स्थान कुठून असणार? कारण मध्ये कुठे रिकामी जागा असतच नाही ४ या श्रीहरीचे प्रेम जेव्हा माझ्या हृदयात प्रवेश करू लागले, तेव्हा सर्व कामादिक शत्रूंची वाताहत झाली दुर्वासनाचा घात झाला ५ तुकाराम महाराज म्हणतात, आम्ही या देवास खात्रीने जिंकले आहे, असा विश्वास मला आहे. कारण आपल्या दासास देव कधी सोडून देईल की काय ? ६

१०३५ तरि का पवाडे गर्जती पुराणे । असता नारायण शक्तिहीन ॥ १ ॥
कीर्तीविण नाहीं नामाचा डांगोरा । येर कां इतरा वाणील ना ॥ २ ॥
तरिच म्हणा तो आहे चिरंजीव । केलियाचा जीव सुखीं गुण ॥ ३ ॥
चांगलेपण हें निरुपमता[2] अंगी । वाणले श्रीरंगीं म्हणऊनि ॥ ४ ॥
तरिच हा थोर सांगितले करी । अभिमान हरीपाशीं नाहीं ॥ ५ ॥
तुका म्हणे तरि करिती याची सेवा । देवापाशीं हेवा नाहीं कुडें ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – निरुपमता–उपमा नसलेल्या, हेवा–हाव, कुडें–वाईट

अर्थ – जर खरोखरच हा नारायण दुर्बल असता, तर त्याची एवढी कीर्ती पुराणानी गर्जून का सागितली असती ? १ याची कीर्ती असल्याखेरीज का नामाच्या महात्म्याचा डांगोरा सर्वत्र पिटून राहिला आहे ? याशिवाय नामाने व कीर्तीने एवमेकांची स्तुती केलीच असती २ देवा, तुम्ही या जीवास जर सुखी केलेत, तरच तो चिरजीव आहे असे म्हणता येईल ३ या श्रीहरीच्या अगी चांगुलपणा हा इतका आहे की, त्यास उपमा नाही या श्रीरंगाच्या अंगी हा चांगुलपणा पूर्णपणे बाणलेला आहे ४ या श्रीहरीपाशी कसलाच अभिमान नसल्यामुळेच तो थोर असल्याचे सांगितले जाते ५ तुकाराम महाराज म्हणतात, या देवापाशी कधी कुणाची वाईट हाव नसते म्हणूनच सर्व लोक त्याची सेवा करतात ६

---

१ होईल धावणें । तया काई करणें लागे संदेह, २ निरुपायत

१०३६ अविट हे क्षीर हरिकथा माउली । सेविती[1] सेविली वैष्णवजनीं ॥ १ ॥
अमृत राहिलें लाजोनि माघारे । येणें रसे थोरें ब्रह्मानंदें ॥ २ ॥
पतित पातकी पावनपगती । चतुर्भुज होती देवाऐसे ॥ ३ ॥
सर्व सुखें तया मोहोरती ठाया । जेथें दाटणी या वैष्णवांची ॥ ४ ॥
निर्गुण[2] हे सोंग धरिलें गुणवंत । धरूनिया प्रीत गाये नाचे ॥ ५ ॥
तुका म्हणे केलीं साधनें गाळणी । सुलभ कीर्तनीं होउनि ठेला ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – अविट–कंटाळा न यणारे, क्षीर–दूध गाळणी–वगळन,

अर्थ – या हरिकथामाउलीचे दूध अतिशय अवीट आहे त्याचा कधीही कंटाळा यत नाही याचे सेवन आजपर्यंत अनेक वैष्णवानी केलेले आहे १ या हरिकथेपुढ प्रत्यक्ष अमृतही लाजून माघारे फिरते या हरिकथेच्या रसाने फार थोर प्रकारचा ब्रह्मानद झालेला असतो २ जे कुणी पतित, पातकी आहेत, ते सताच्या पवित्र पगतीस या हरिकथेच्या प्रसगी बसून पावन होतात या कथामृतान तेही देवाप्रमाणेच चतुर्भुज होऊन जातात ३ ज्या ठिकाणी या कथेच्या निमित्ताने वैष्णवाची गर्दी होते तेथे सर्व प्रकारची सुखे मोहोरली जातात, अकुरतात ४ या निर्गुण श्रीहरीने या कथारसाच्या वेळस गुणवान असे रूप धारण केले असून तो मोठ्या प्रीतीने स्वत च नृत्य करू लागतो, गाऊ लागतो ५ तुकाराम महाराज म्हणतात, सर्व साधनाना वगळून, चाळणी करून, निवडून मी हे हरिकथेचे साधन अतिशय सुलभ असे निश्चित केले आहे याच सुखात मी तृप्त झालो आहे ६

विवरण —हरिकथा किंवा कीतनभक्ती ह एक सर्वोत्तम साधन ईश्वरप्राप्तीचे म्हणून साधुसतानी मानले आहे या हरिकथामाउलीची थोरवी तुकोबानी या अभगात गाइली आह हिच्यापुढे अमृत लाजून दूर सरत, पतित लोक पावन होऊन जातात, निगुण असणारा भगवत हिच्याच नादात सगुणसुदर होऊन या कीतनाच्या जागी येऊन उभा असतो, वगैरे वणन मागील सतपरपरेस धरूनच आह हरिकथा वा कीतन हे सर्वांना आवडणारे व सुलभ असे साधन आह गायन, नृत्य, वाद्य याच्या आविष्कारास यात भरपूर वाव असल्यामुळे बहुजनासही याची प्रीती विशेष असत शिवाय कथात्मक निरूपणामुळ मनरजनावरावर परमेश्वराच गुणगान केल्याचेही श्रेय हाती यत

नामदव महाराज हे महाराष्ट्रातील आद्य कीतनकार मानल जातात सुभाचा करगोटा व रकटयाची लगोटी लावून त वाळवटात पढरपुराम कीतन करीत असत सगुण प्रीतीचा व कीर्तनभक्तीचा एक थोर आदश म्हणजे नामदेवराय होत 'नाचू कीर्तनाचे रगीं । ज्ञानदीप लावू जगीं' अशीच त्याची प्रतिज्ञा होती; या कीतनात प्रत्यक्ष दव सगुणसुदर रूपात हजर असता अशी श्रद्धा तर सवच सतानी व्यक्त केलेली आह 'कीतनाचे सुखें सुखीं होतो देव' या नामदवाच्या वचनात स्वत भगवतास कीतनाची आवड किती आहे हे स्पष्ट केले आहे 'कीर्तनाची आवडी देवा । वैकुंठाहुनी घाली धावा । नवल वैकुंठीच नसे । तो कीर्तनीं नाचतसे', 'देवासी तो मुख्य कीर्तनाची गोडी । म्हणोनिया उडी घाली स्वयें', 'कीतने तोषे अधोक्षज । राखी लाज भक्ताची', 'कीर्तनाची आवडी मोठी । प्रेमें देव घाली मिठी' इत्यादी शेकडो वचनातून एकनाथानी कीतनाचा व देवाच्या आवडीचा सबध स्पष्ट केलेला आहे ज्ञानेश्वर नामदवापासून तुकाराम-रामदासापर्यंतच सर्वच श्रेष्ठ साधुसत हे स्वत थोर दर्जाचे कीर्तनकारही होते त्यामुळे कीतनाचे सुख त्याना स्वानुभवान पटलले हात कीतनसुखाची चटक त्या प्रभूलाही कशी असत, याचे वणन तुकोबानीही पुन पुन केल आह 'कीर्तनाच्या सुखें सुखी होय देव । पढरीचा राव सगी आहे', 'न राहे क्षण एक वैकुठीं । क्षीरसागरीं त्रिपुटीं । जय तेथें दाटी । वैष्णवांची धावोनि', 'हरिकथेची आवडी देवा । करितो सेवा दासाची' इत्यादी वचनातून प्रत्यक्ष ईश्वरासही या कीर्तनाने किती सुख होते, याच वर्णन तुकाराम महाराजानी केले आहे

या कीर्तनाचा आणखी एक लाभ असा की, या साधनान देवास व भक्तास जसे सुख होते, तसाच फायदा पातकी लोकानाही होतो नारदापासून या कीतनाचा महिमा सर्वांनी गाइला आहे यज्ञयाग, जपतप, व्रतवैकल्य

१ सेविता सेविली, २ निगुण आकार झाला गुणवत

असला खटाटोप न करता अगदी सोपे असे हे नामसंकीर्तनाचे साधन या कलियुगात माणसास उपलब्ध झाले आहे 'हेंचि कलिमाजी साधन। आवडी कीर्तन हरीचे' कारण या कीर्तनामुळे 'महापापराशी तरले कीर्तनीं। प्रत्यक्ष पुराणीं वद जाले' अशी साक्ष एकनाथांनी दिली आहे 'पतित पातकी पावनपणतीं। चतुर्भुज होती देवा ऐसे' असा निर्णय या एका अभंगात तुकाराममहाराज देतात त्यास आधारही त्यांच्या व इतर संतांच्या वाङ्मयात भरपूर सापडतात 'कीर्तन श्रेष्ठ कलियुगीं सेवा। तरले पातकी ते देवा॥ वाल्ह्या तारिला कीर्तनीं। पावन झाला त्रिभुवनीं॥ गणिका कीर्तनें तरली। मोक्षधामा ती नेली॥ अजामेळ चोखा महार। कीर्तनी तरले अपार॥ एका जनार्दनी कीर्तन। तिन्ही लोक जाले पावन' असा या कीर्तनाचा महिमा स्वत एकनाथांनी वर्णन केलेला आहे या कीर्तन परंपरेविषयीच्या अधिक माहितीसाठी अभंग क्र ९६ वरील विवरण पहावे

१०३७ संसारसोहळे भोगिता सकळ। भक्तां त्याचें बळ विटोबाचें॥ १॥
भय चिंता[1] धाक न मानिती मनीं। भक्तां चक्रपाणि सांभाळीत॥ २॥
पापपुण्य त्याचें धरू न शके अंग। भक्तांसी श्रीरंग सर्वभावें॥ ३॥
नव्हती ते मुक्त आवडे संसार। देव भक्तां[2] भार सर्व वाहे॥ ४॥
तुका म्हणे देव भक्तां वेळाईत। भक्त ते निश्चिंत त्याचियानें॥ ५॥

शब्दार्थ व टीपा – वेळाईत–साह्यकारी कैवारी

अर्थ – संसाराचे सर्व सोहळे अलिप्तपणे भोगणारे जे कुणी आहेत, अशा भक्तांना त्या विठोबाचे साह्य नेहमीच असते १ जो चक्रपाणी श्रीकृष्णच त्यांचा सांभाळ करीत असल्यामुळे त्यांना भय, चिंता धाक यांची बाधा कधीही होत नसते २ सर्व भक्त एका त्या श्रीरंगाच्या नावेच रंगून गेलेले असल्यामुळे, त्यांच्या अंगास पापपुण्याचा स्पर्श कधीच होऊ शकत नाही ३ त्या भक्तांना मुक्तही व्हावेसे वाटत नाही पुन पुन जन्म घेऊन संसार करावा अशी त्यांच्या मनांत एक इच्छा असते कारण त्यांचा सर्व भार तो परमेश्वरच वहात असतो ४ तुकाराम महाराज म्हणतात देव हा आपल्या भक्तांचा कैवारी आहे, असे त्यांना वाटत असल्यामुळे ते निश्चिंत असतात ५

१०३८ देवासी अवतार भक्तांसी संसार। दोहींचा विचार एकपणें॥ १॥
भक्तांसी सोहळे देवाचिया अंगें। देव त्यांच्या संगें सुख भोगी॥ २॥
देवें भक्तां रूप दिलासे आकार। भक्तीं त्याचा पार वाखाणिला॥ ३॥
एका अंगीं दोन्ही जालीं हीं निर्माण। देवभक्तपण स्वामिसेवा॥ ४॥
तुका म्हणे येथें नाहीं भिन्नभाव। भक्त तोचि देव देव भक्त॥ ५॥

शब्दार्थ व टीपा – पार–महिमा

अर्थ – देवाने भक्ताच्यासाठी अवतार घेणे व भक्ताने त्याचे स्मरण ठेवून संसार करणे या दोन्ही बाबींचे स्वरूप एकच आहे १ देवाच्या मुळेच भक्तास सर्व सुखाचे सोहाळे उपभोगता येतात व देवही त्या भक्तांच्या संगतीत सुखी होऊन जातात २ या देवानेच आपल्या भक्तांना जन्म देऊन रूप व आकार दिलेले असतात आणि भक्तांनी त्या देवाचा महिमा वर्णन केलेला असतो ३ एकाच परब्रह्माच्या अंगावर दोन भाव निर्माण झाले देव व भक्त, स्वामी व सेवक अशा दोन भावांनी ते परब्रह्म व्यक्त झाले ४ तुकाराम महाराज म्हणतात, तरी त्यांच्यात भेद कधीही नसतो भक्त हाच देव व देव हाच भक्त, इतकी एकरूपता त्यांच्यांत असते ५

विवरण – या एका तत्त्वस्पर्शी अभंगात तुकाराम महाराजांनी देव व भक्त यांच्या अभेदत्वाचे समर्पक वर्णन केले आहे केवळ सुखासाठी भोगविलासासाठी, प्रेमाच्या सुखार्थ एकच तत्त्व दोन अवस्थांना आले एक देव झाले, एक भक्त झाले आणि हे सर्व त्याच तत्त्वाच्या आवडीने झाले 'आपुलीच आवडी धरूनि सांठिया। आपआपणाते

१ चिंता, २ त्याचा

१०३६ अविट हें क्षीर हरिकथा माउली । सेविती[1] सेविली वैष्णवजनीं ॥ १ ॥
अमृत राहिलें लाजोनि माघारें । येणे रसे थोरे ब्रह्मानंदें ॥ २ ॥
पतित पातकी पावनपगती । चतुर्भुज होती देवाऐसे ॥ ३ ॥
सर्व सुखें तया मोहोरती ठाया । जेथें दाटणी या वैष्णवाची ॥ ४ ॥
निर्गुण[2] हे सोग धरिलें गुणवंत । धरूनिया प्रीत गाये नाचे ॥ ५ ॥
तुका म्हणे केलीं साधनें गाळणी । सुलभ कीर्तनीं होउनि ठेला ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – अविट–कटाळा न यणारे, क्षीर–दूध गाळणी–वगळन,

अर्थ – या हरिकथामाउलीचे दूध अतिशय अवीट आहे त्याचा कधीही कटाळा येत नाही याचे सेवन आजपर्यंत अनक वैष्णवानी केलेले आहे १ या हरिकथेपुढे प्रत्यक्ष अमृतही लाजून माघारे फिरते या हरिकथेच्या रसाने फार थोर प्रकारचा ब्रह्मानद झालेला असतो २ जे कुणी पतित, पातकी आहेत, ते सताच्या पवित्र पगतीस या हरिकथेच्या प्रसगी बसून पावन होतात या कथामृतान तेही देवाप्रमाणेच चतुर्भुज होऊन जातात ३ ज्या ठिकाणी या कथेच्या निमित्ताने वैष्णवाची गर्दी होते, तेथे सर्व प्रकारची सुखे मोहोरली जातात, अकुरतात ४ या निर्गुण श्रीहरीने या कथारसाच्या वेळेस गुणवान असे रूप धारण केले असून तो मोठया प्रीतीने स्वत च नृत्य करू लागतो, गाऊ लागतो. ५ तुकाराम महाराज म्हणतात, सर्व साधनाना वगळून, चाळणी करून, निवडून मी हे हरिकथेचे साधन अतिशय सुलभ असे निश्चित केले आहे याच सुखात मी तृप्त झालो आहे ६

विवरण —हरिकथा किंवा कीर्तनभक्ती ह एव सर्वोत्तम साधन ईश्वरप्राप्तीचे म्हणून साधुसतानी मानले आहे या हरिकथामाउलीची थोरवी तुकोबानी या अभगान गाइली आह हिच्यापुढे अमृत लाजून दूर सरत, पतित लोक पावन होऊन जातात, निर्गुण असणारा भगवत हिच्याच नादात सगुणसुदर होऊन या कीर्तनाच्या जागी येऊन उभा असतो, वगैरे वर्णन मागील सतपरपरेस धरूनच आहे हरिकथा वा कीतन ह सर्वांना आवडणारे व सुलभ असे साधन आह गायन, नृत्य, वाद्य यांच्या आविष्कारास यात भरपूर वाव असल्यामुळे बहुजनासही याची प्रीती विशेष असते शिवाय कथात्मक निरूपणामुळ मनरजनाबरोबर परमेश्वराचे गुणगान केल्याचेही श्रेय हाती येत

नामदेव महाराज हे महाराष्ट्रातील आद्य कीर्तनकार मानल जातात सुभाचा दगाटा व रकटयाची लगोटी लावून ते वाळवटात पढरपुरास कीतन करीत असत सगुण प्रीतीचा व कीर्तनभक्तीचा एक थोर आदर्श म्हणजे नामदेवराय होत 'नाचू कीतनाचे रगीं । ज्ञानदीप लावू जगीं' अशीच त्याची प्रतिज्ञा होती; या कीर्तनात प्रत्यक्ष देव सगुणसुदर रूपात हजर असता, अशी श्रद्धा तर सवच सतानी व्यक्त केलेली आहे 'कीर्तनाचे सुखें सुखी होतो देव' या नामदेवाच्या वचनात स्वत भगवतास कीर्तनाची आवड किती आह हे स्पष्ट केले आहे 'कीर्तनाची आवडी *देवा । वैकुंठाहूनी घाली धावा । नवल वैकुंठीच नसे । तो कीर्तनीं नाचतसे',* 'देवासी तो मुख्य कीर्तनाची गोडी । म्हणोनिया उडी घाली स्वयें', 'कीर्तनें तोषें अधोक्षज । राखी लाज भक्ताची', 'कीर्तनाची आवडी मोठी । प्रेमें देव घाली मिठी' इत्यादी शेकडो वचनातून एकनाथानी कीतनाचा व देवाच्या आवडीचा सबध स्पष्ट केल्ला आह ज्ञानेश्वर-नामदेवापासून तुकाराम-रामदासापर्यंतचे सर्वच श्रेष्ठ साधुसत हे स्वत थोर दर्जाचे कीर्तनकारही होते त्यामुळ कीतनाचे सुख त्याना स्वानुभवान पटलेले होत कीर्तनसुखाची चटक त्या प्रभूलाही कशी असते, याचे वर्णन तुकोबानीही पुन पुन केले आहे 'कीर्तनाच्या सुखें सुखी होय देव । पढरीचा राव सगी आहे', 'न राहे क्षण एक वैकुंठीं । क्षीरसागरीं त्रिपुटीं । जय तेथें दाटी । वैष्णवाची धावोनि', 'हरिकथेची आवडी देवा । करितो सेवा दासाची' इत्यादी वचनातून प्रत्यक्ष ईश्वरासही या कीर्तनाने किती सुख हात, याचे वर्णन तुकाराम महाराजानी केले आह

या कीर्तनाचा आणखी एक लाभ असा की, या साधनाने देवास व भक्तास जसे सुख होत, तसाच फायद । पातकी लोकानाही होतो नारदापासून या कीतनाचा महिमा सर्वानी गाइला आहे यज्ञयाग, जपतप, व्रतेवैकल्य

१ सेविता सेविली, २ निर्गुणे आकार झाला गुणवत

असला खटाटोप न करता अगदी सोपे असे हे नामसंकीर्तनाचे साधन या कलियुगात माणसास उपलब्ध झाले आहे. 'हेंचि कलिमाजी साधन । आवडी कीर्तन हरीचें ' कारण या कीर्तनामुळे 'महापापराशी तरले कीर्तनीं । प्रत्यक्ष पुराणीं वंद्य जाले ' अशी साक्ष एकनाथानी दिली आहे. 'पतित पातकी पावनपंगती । चतुर्भुज होती देवा ऐसे ' असा निर्णय या एका अभंगात तुकारामबुवा देतात त्यास आधारही त्यांच्या व इतर संतांच्या वाङ्मयात भरपूर सापडतात. 'कीर्तन श्रेष्ठ कलियुगीं सेवा । तरले पातकी ते देवा ॥ वाल्ह्या तारिला कीर्तनीं । पावन झाला त्रिभुवनीं ॥ गणिका कीर्तनें तरली । मोक्षधामा ती नेली ॥ अजामेळ चोखा महार । कीर्तनी तरले अपार ॥ एका जनार्दनी कीर्तन । तिन्ही लोक जाले पावन ' असा या कीर्तनाचा महिमा स्वतः एकनाथानी वर्णन केलेला आहे या कीर्तन परंपरेविषयीच्या अधिक माहितीसाठी अभंग क्र ९६ वरील विवरण पाहावे

१०३७ संसारसोहळे भोगितां सकळ । भक्तां त्याचें बळ विठोबाचें ॥ १ ॥
भय चिंता[1] धाक न मानिती मनीं । भक्तां चक्रपाणि सांभाळीत ॥ २ ॥
पापपुण्य त्यांचें धरूं न शके अंग । भक्तांसी श्रीरंग सर्वभावें ॥ ३ ॥
नव्हती ते मुक्त आवडे संसार । देव भक्तां[2] भार सर्व वाहे ॥ ४ ॥
तुका म्हणे देव भक्तां वेळाईत । भक्त ते निश्चित त्याचियानें ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– वेळाईत–साह्यकारी, कैवारी.

अर्थ :– संसाराचे सर्व सोहळे अलिप्तपणे भोगणारे जे कुणी आहेत, अशा भक्तांना त्या विठोबाचे साह्य नेहमीच असते. १ जो चक्रपाणी श्रीकृष्णच त्यांचा सांभाळ करीत असल्यामुळे त्याना भय, चिंता, धाक याची बाधा कधीही होत नसते. २ सर्व भक्त एका त्या श्रीरंगाच्या नावेच रंगून गेलेले असल्यामुळे, त्यांच्या अंगास पापपुण्याचा स्पर्श कधीच होऊ शकत नाही. ३ त्या भक्तांना मुक्तही व्हावेसे वाटत नाही पुन पुनः जन्म घेऊन संसार करावा, अशी त्यांच्या मनांत एक इच्छा असते कारण त्यांचा सर्व भार तो परमेश्वरच वहात असतो ४ तुकाराम महाराज म्हणतात, देव हा आपल्या भक्तांचा कैवारी आहे, असे त्याना वाटत असल्यामुळे ते निश्चित असतात. ५

१०३८ देवासी अवतार भक्तांसी संसार । दोहींचा विचार एकपणें ॥ १ ॥
भक्तांसी सोहळे देवाचिया अंगें । देव त्यांच्या संगें सुख भोगी ॥ २ ॥
देवें भक्तां रूप दिलासे आकार । भक्तीं त्याचा पार वाखाणिला ॥ ३ ॥
एका अंगीं दोन्ही जालीं हीं निर्माण । देवभक्तपण स्वामिसेवा ॥ ४ ॥
तुका म्हणे येथें नाहीं भिन्नभाव । भक्त तोचि देव देव भक्त ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– पार–महिमा.

अर्थ :– देवाने भक्तांच्यासाठी अवतार घेणे व भक्ताने त्याचे स्मरण ठेवून संसार करणे या दोनही बाबींचे स्वरूप एकच आहे. १ देवाच्या मुळेच भक्तास सर्व सुखाचे सोहाळे उपभोगता येतात व देवही त्या भक्तांच्या संगतीत सुखी होऊन जातात २ या देवानेच आपल्या भक्तांना जन्म देऊन रूप व आकार दिलेले असतात आणि भक्तांनी त्या देवाचा महिमा वर्णन केलेला असतो. ३ एकाच परब्रह्माच्या अंगावर दोन भाव निर्माण झाले. देव व भक्त, स्वामी व सेवक अशा दोन भावांनी ते परब्रह्म व्यक्त झाले. ४ तुकाराम महाराज म्हणतात, तरी त्यांच्यांत भेद कधीही नसतो. भक्त हाच देव व देव हाच भक्त; इतकी एकरूपता त्यांच्यांत असते. ५

विवरण:– या एका तत्त्वस्पर्शी अभंगात तुकाराम महाराजानी देव व भक्त याच्या अभेदत्वाचे समर्पक वर्णन केले आहे. केवळ सुखासाठी, भोगविलासासाठी, प्रेमाच्या सुखार्थ एकच तत्त्व दोन अवस्थाना आले एक देव झाले, एक भक्त झाले. आणि हे सर्व त्याच तत्त्वाच्या आवडीने झाले. 'आपुलीच आवडी धरूनि खेळिया । आपआपणाते

१ चित्ती, २ त्याचा.

त्याले रे ' अशा भाषेत नामदेवानी या क्रीडेचे वर्णन केले आहे केवळ प्रेमसुखासाठी ' देवचि झाला भक्त ' हेच खरे आहे देवभक्ताचे हे ऐक्य व प्रेमाच्या भोगासाठी त्याच्यातील भेद हा भक्तिमार्गातील एक मोठा तरल विचार आहे ' देव ते संत । देव ते संत । निमित्त त्या प्रतिमा ', ' आम्ही जाणो तुझा भाव । कैचा भक्त, कैचा देव ? ' इत्यादी वचनातून तुकारामबुवानी देव व भक्त याचे अभिन्नत्व वर्णन केले असून 'अभेदानें भेद राखियेला अंगीं । वाढावया जगीं प्रेमसुख ' असा निर्णय दिलेला आहे

१०३९ हुबरती गाये तयाकडे कान । कैवल्यनिधान देउनि ठाके ॥ १ ॥
गोपाळाची पूजा उच्छिष्ट कवळी । तेणे वनमाळी सुखावला ॥ २ ॥
चोरोनिया खाये दुध दहीं लोणी । भावे चक्रपाणि गोविला तो ॥ ३ ॥
निष्काम तो जाला कामासी लपट । गोपिकाची वाट पाहात बैसे ॥ ४ ॥
जगदानी इच्छी तुळसी एकदळ । भावाचा सकळ विकिला तो ॥ ५ ॥
तुका म्हणे हेंचि चैतन्य सावळें । व्यापुनि निराळें राहिलेंसे ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा :– हुबरती–मोठ्या प्रेमाने, कैवल्यनिधान – मोक्षाचा, कैवल्याचा साठा, गोविला–गुतला गेला

अर्थ – जो भक्त मोठ्या प्रेमाने गाऊन देवाचे गुणगान करतो, त्याच्याकडे कान देऊन हा कैवल्याचा साठा श्रीहरी उभा राहिलेला असतो १ तो गोपाळानी केलेली पूजा मोठ्या प्रेमाने घेतो, त्याचे उच्छिष्टही ग्रहण करतो त्याच्यातच हा वनमाळी सुखावून जातो २ हा गोपाळाचे दहीदूध, लोणी चोरून खातो व त्यांच्या भावभक्तीत गुतला जातो ३ गोपिकाविषयी हा प्रेमासक्त असला तरी निष्काम असल्यामुळे त्याची वाट पाहण्यात त्याला सुख वाटते ४ सर्व जगातील लोकाना आपल्या कृपेचे दान देणारा हा प्रभू, एका तुळशीच्या पानाची इच्छा करीत असतो भक्ताच्या भावास तो अशा प्रकारे जणु विकलाच गेलेला असतो ५ तुकाराम महाराज म्हणतात, असें हे सावळे चैतन्य सर्व विश्वास व्यापून आपण पुन वेगळे राहिलेच आहे ६

१०४० समर्थासी नाहीं वर्णावर्णभेद । सामग्री ते सर्व सिद्ध घरीं ॥ १ ॥
आदराचे ठायीं बहुच आदर । मागितले फार तेथें[1] वाढी ॥ २ ॥
न म्हणे सोइरा सुहृद आवश्यक । राजा आणि रंक सारिखाचि ॥ ३ ॥
भाव देखे तेथें करी लडवड[2] । जडा राखे जड निराळेंचि ॥ ४ ॥
कोणी न विसभे याचकाचा ठाव । विनवुनी देव शंका फेडी ॥ ५ ॥
तुका म्हणे पोट भरूनी उरवी । धाले[3] ऐसे दावी अनुभवे ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – समर्थासी–श्रीमत व उदार गृहस्थाच्या ठिकाणी, वर्णावर्णभेद–उत्तम–कनिष्ठ असा भेद, धालें–संतुष्ट झाले

अर्थ :– श्रीमताच्या घरी मेजवानीच्या प्रसगी, हा श्रेष्ठ हा कनिष्ठ, असा भाव कधी नसतो त्याच्या घरची सामग्री सर्वासाठी सिद्ध असते १ ज्याच्या मनात देवाविषयी विशेष आदर असतो त्याचा आदर मग देवही करतो व त्यामुळे भक्त जेवढे मागतील त्याच्यापेक्षाही जास्त तो त्याना देतो २ त्यावेळी तो हा माझा सोयरा आहे, हा मित्र आहे, हा राजा आहे, हा भिकारी आहे, असा भेद तो कधी करीत नाही ३ जेथे भक्ताचा दृढ भाव त्यास दिसतो, तेथे हा देव फार लुडबुड करून त्याला जड अशा ससाराच्या उपाधीपासून वेगळे ठेवतो ४ कोणत्याही याचक भक्ताकडे हा दुर्लक्ष करीत नाही त्याची शका समजावून घेऊन त्याची इच्छा हा देव पूर्ण करितो ५ सर्वांचे पोट भरले आहे व अन्न उरले आहे, सर्वजण जेवून तृप्त झाले आहेत, असे स्वानुभवाने हा जाणतो भक्तानाही असाच अनुभव येतो ६

---

१ ते ते, २ वडवड, ३ आल.

१०४१ आलें भरा केणें । येरझार चुके जेणें ॥ १ ॥
उभें केलें विटेवरी । पेठ इनाम पंढरी ॥ २ ॥
वाहाती मारग । अवघें मोहोरलें जग ॥ ३ ॥
तुका म्हणे माप । खरें आणा माझे बाप ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– केणें–माल, जिन्नस.

*अर्थ :– ज्याच्या साह्याने आपली जन्ममृत्यूची येजा सपते, असा हा या विठ्ठलनामाचा माल बाजारात आला* आहे, तो नीट भरून ठेवा. १ पंढरी ही भक्तांना दिलेली इनामाची मोठी पेठ मिळालेली आहे, आणि या ठिकाणी विटेवर हा विठ्ठल उभा राहिलेला आहे. २ तो प्राप्त व्हावा म्हणून चहू दिशांनी एकसारखा ओघ लागलेला आहे. सर्व दिशांनी याला पाहण्यासाठी लोकांची एकच गर्दी उसळून गेली आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, बापहो, हा माल घेण्यासाठी माप मात्र खरेखुरे आणा. ४

१०४२ लक्ष्मीवल्लभा । दिनानाथा पद्मनाभा ॥ १ ॥
सुख वसे तुझे पायीं । मज ठेवीं तेचि ठायीं ॥ २ ॥
माझी अल्प हे वासना । तूं तो उदाराचा राणा ॥ ३ ॥
तुका म्हणे भोगें । पीडा केली धांव वेगें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– लक्ष्मीवल्लभा–लक्ष्मीपती, पद्मनाभा–ज्याच्या नाभीमधून कमळ उगवले आहे, असा देवा.

अर्थ :– लक्ष्मीपती, दीनाच्या नाथा, पद्मनाभा, १ तुझ्याच पायांवर सर्व सुखांची वसती आहे व त्याच *ठिकाणी मला तू ठेव. २ हीच माझी अल्प वासना असून तू उदारांचा राजा असल्यामुळे ती पुरवावीस.* ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, या माझ्या कर्मभोगाने फार त्रास दिला आहे. तू लौकर धावत येऊन माझे रक्षण कर. ४

१०४३ करीं ऐसें जागें । वेळोवेळां पायां लागें ॥ १ ॥
प्रेम झोंबो[1] कंठीं । देह धरणिये लोटीं ॥ २ ॥
राहे लोकाचार । पडे अवघा विसर ॥ ३ ॥
तुका म्हणे ध्यावें । तुज व्यभिचारभावें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– झोंबो–टिकून राहो.

अर्थ :– देवा, तुमच्याच पायांवर वारवार पडून राहण्याची इच्छा व्हावी, असे मला जागें करा. १ माझ्या कंठात तुमच्या विषयीचे प्रेम सदैव टिकून राहो. माझ्या या देहाने धरणीवर तुम्हांस लोटांगण घालावे. २ माझा सर्व लोकाचार, लौकिक व्यवहार दूर व्हावा आणि मला सर्वांचा विसर पडावा. ३ तुकाराम महाराज म्हणतात, एखाद्या जारिणीने व्यभिचारीभावाच्या तीव्रतेने आपल्या प्रियकराचे ध्यान करावे, तसे देवा, माझे चित्त तुझ्यावर जडावे. ४

१०४४ टाळ दिंडी हातीं । वैकुंठींचे ते सांगाती ॥ १ ॥
जाल तरी कोणी जा गा । करा सिदोरी ते वेगा ॥ २ ॥
जाती सादावीत । तेथें असों द्यावें चित्त ॥ ३ ॥
तुका म्हणे बोल । जाती बोलत विठ्ठल ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– सांगाती–सोबती, मित्र, सादवीत–सावध करीत, समजावीत.

---

१ झोंबे.

अर्थ :– हातात टाळ वीणा घेऊन निघालेल्या या विष्णुभक्ताची सोबत ज्याना आहे १ त्यानी लगबग करून या मार्गाने चालावे. पुण्याची शिदोरी तयार ठेवावी २ असे हे भक्त सर्वांना सावध करीत जात असल्याने सर्वांनी त्याच्यावर आपले चित्त द्यावे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, हे वैष्णववीर, विठ्ठल, विठ्ठल बोल बोलीत निघाले आहेत. ४

१०४५ वांयां जातो देवा । नेणे भक्ती करूं सेवा ॥ १ ॥
आता जोडोनियां हात । उभा राहिलो निवांत ॥ २ ॥
करावें ते काय । न कळे अवलोकितो पाय ॥ ३ ॥
तुका म्हणे दान । दिले पदरी घेईन ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :— निवांत–स्तब्ध, अवलोकितों–पाहतो

अर्थ :– देवा, आता माझा जन्म व्यर्थच चाललेला दिसतो मला तुझी सेवा करता येत नाही भक्ती करता येत नाही. १ आता तुझ्यापुढे हात जोडून मी निवान्तपणे उभा आहे २ काय करावे, ते मला समजत नाही तुमच्या पायाकडे पाहात देवा, इथे उभा मात्र आहे मी ३ तुकाराम महाराज म्हणतात, जे दान देवा, द्याल ते मी पदरात घेईन. ४

१०४६ जीव खादला दैवतें । माझा येणें महाभूतें । झोंबले निरुतें । कांही करितां न सुटे ॥ १ ॥
आतां करूं काय । न चले करितां उपाय । तुम्हा आम्हा सये । विघडाविघड केली ॥ २ ॥
बोलतां दुश्चिती । मी वो पडियेले भ्रांती । आठव हा चित्तीं । न ये म्हणतां मी माझें ॥३॥
भलतेंचि चावळे । जना अवघिया वेगळे । नाठवती बाळें । आपपर सारिखें ॥ ४ ॥
नका बोलो सये । मज वचन न साहे । बैसाल त्या राहे । उग्या वाचा खुंटोनी ॥ ५ ॥
तुम्हां आम्हा भेटी । नाही जाली जीवेसाटीं । तुका म्हणे दृष्टी । पाहा जवळी आहे तो ॥६॥

शब्दार्थ व टीपा :– खादला–खाल्ला, सये–सखे, विघडाविघड–वियोग, खुंटोनी–बंद करून,

अर्थ :– हा महाभूत असणारा जो देव त्याने तर माझा जीवच खाल्ला आहे. हे दैवत माझ्या जीवाला इतके झोंबून राहिले आहे की, काही केल्याने सुटत नाही १ आता मी काय करू? काहीही उपाय केले तरी, काही उपयोग नाही सखे, याने तुमच्याआमच्यात वियोग निर्माण केला आहे २ असे बोलत असतानाच मी दुश्चित होऊन भ्रांतीमध्ये पडले आहे माझ्या मनात मी व माझे असा आठवसुद्धा राहिला नाही ३ मी काहीतरी भलतेच बोलू लागले आहे मला माझी मलेबाळेही काही आठवत नाहीत आपले व परके हा भावही माझ्यामधील निघून गेला आहे ४ सख्यानो, माझ्याशी बोलूही नका, कारण मला आता एक वावगा शब्द सहन होत नाही. वाणी बंद करून जशा आहात तशाच उगाच बसून राहा ५ तुमचीआमची भेट होणार नाही, अशी स्थिती आता निर्माण झाली आहे आता हा श्रीहरी माझ्याजवळ एकसारखा आहे हे तुम्ही नीट पाहा ६

१०४७ जीवींचा जिव्हाळा । पाहों आपुलिया डोळा ॥ १ ॥
आम्हां विठ्ठल एक देव । येर अवघेचि वाव ॥ २ ॥
पुंडलिकाचे पाठीं । उभा हात ठेवुनि कटीं ॥ ३ ॥
तुका म्हणे चित्तीं । वाहू रखुमाईचा पती ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– येर–इतर, वाव–व्यर्थ

अर्थ :– आमच्या जीवाचा जिव्हाळा असणारा हा श्रीहरी आम्ही आपल्या डोळ्यानी पाहू. १ विठ्ठल हाच एक देव असून इतर सर्व व्यर्थ आहेत आमच्या दृष्टीने. २ हा विठ्ठल पुंडलिकासाठी कमरेवर हात ठेवून उभा आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, हा रखुमाईचा पती श्रीविठ्ठल आम्ही आमच्या चित्तात धारण करू. ४

१०४८ माझें आराधन । पंढरपुरींचें निधान ॥ १ ॥
तया एकाविण दुजें । कांहीं नेणें पंढरीराजें ॥ २ ॥
दास विठ्ठलाचा । अंकित अंकिला ठायींचा ॥ ३ ॥
तुका म्हणे आतां । नव्हे पालट सर्वथा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– आराधन–आराध्य दैवत, निधान–ठेवा.

अर्थ :– माझे आराध्य दैवत म्हणजे पंढरपूरचा हा एक ठेवा श्रीविठ्ठल हेच आहे. १ त्याच्या एकाशिवाय आम्हास दुसरे कुणी माहीत नाही. पंढरीराज विठ्ठल हेच आमचे एकमेव दैवत. २ मी या विठ्ठलाचा दास असून त्याच्या स्थानाचा अंकित असा सेवक आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, आता यात कधी पालट होणार नाही. ४

१०४९ आतां आम्हां हेचि काम । न[1] विसंभावें तुझें नाम ।
वाहुनियां टाळी । प्रेमसुखें[2] नाचावें ॥ १ ॥
अवघी जाली आराणूक । मागें पुढें सकळिक ।
त्रिपुटीचें दुःख । प्रारब्ध सारिलें ॥ २ ॥
गोदातटें निर्मळें । देव देवांचीं देवळें ।
संत महंत मेळें । दिवस जाय सुखाचा ॥ ३ ॥
तुका म्हणे पंढरीनाथा । आणिक नाहीं मज चिंता ।
योगक्षेम माथां । भार तुझ्या घातला ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– न विसभावें–विसरू नये, आराणूक–विश्रांती, गोदातीरें–गोदावरी नदीच्या काठी.

अर्थ :– आता आम्हास हे एकच काम उरले आहे. तुला विसरू नये. वाणीने एकसारखे तुझेच नाम गावे. दोनही हातानी टाळी वाजवून प्रेमसुखाने नाचावे. १ या सुखामुळे मनास पूर्ण विश्रांती प्राप्त झाली असून मागची-पुढची सर्व काळजी संपलेली आहे. आध्यात्मिक, आधिदैविक आणि आधिभौतिक अशा प्रकारचे त्रिपुटीचे दुःख संपून आमचे प्रारब्धही पूर्णपणे संपले आहे. २ गोदावरीच्या स्वच्छ व निर्मळ किनाऱ्यावर अनेक देवांची देवळे पाहून, संतमहंतांच्या मेळाव्यात वागून दिवस मोठ्या सुखाचा जात आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, पंढरीनाथा, आता कसलीही चिंता मला उरलेली नाही. माझा सर्व योगक्षेम मी तुझ्याकडे सोपविलेला आहे. सर्व भार तुझ्यावरच टाकला आहे. ४

१०५० चोरटें सुनें मारिलें टाळें । केंउं करी परि न संडी चाळे ॥ १ ॥
ऐसें एक दुराचारी गा देवा । आपुलिया जीवा घात करी ॥ २ ॥
नाक गेलें तरि लाज ना विचार । हिंडे फजितखोर दारोदारीं ॥ ३ ॥
तुका म्हणे कर्म बळिवंत गाढें । नेदी तया पुढें मार्गें सरों ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– सुनें–कुत्रे, टाळें–जोडयाच्या तळव्याने.

अर्थ :– चोरट्या कुत्र्याला जोडयाच्या तळव्याने मारले तर 'केउ केउ' करीत ते पळून जाते; पण ते स्वतःचे चाळे काही कधी सोडीत नाही. १ देवा, असे काही दुराचारी असतात, ते आपल्या जीवास आपणच घात करून घेतात. २ त्यांचे नाक कापले गेले असले तरी, त्यांना त्याची लाज कधीच वाटत नाही. फजितखोर होऊनही ते दारोदार हिंडत असतात. ३ तुकाराम महाराज म्हणतात, त्याचे प्रारब्धकर्म बलवान म्हणून, ते त्याना मागेपुढे चांगल्या मार्गाने सरकू देत नाहीत. ४

---

१ वाचे गाऊं तुझें नाम, २ सुखें आनंदें.

१०५१ मुनि मुक्त जाले भेणे गर्भवासा । आम्हा विष्णुदासा सुलभ तो ॥ १ ॥
अवघाचि ससार केला ब्रह्मरूप । विठ्ठलस्वरूप म्हणोनिया ॥ २ ॥
पुराणीं उपदेश साधन उद्भट । आम्हा सोपी वाट वैकुठीची ॥ ३ ॥
तुका म्हणे जना सकळासहित । घेऊ[1] अखडित प्रेमसुख ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – भेणें–भिऊन, भीतीने, उद्भट–कठिण

अर्थ – थोर ऋषिमुनी गर्भवासाच्या भीतीने मुक्तीच्या मार्गास लागले, परतु हा गर्भवास आम्हा विष्णुदासाना मात्र अतिशय सुलभ असा झाला आहे १ आम्ही सव ससारच ब्रह्मरूप मानल्यामुळे आम्हास ससाराचे अथवा जन्ममृत्यूचे भय नाही आमचे सव विठ्ठलरूप होऊन गेले आहे २ ब्रह्मलोकाला अथवा वैकुठाला जाण्याचा मार्ग फार कठिण आहे असे उल्लेख नाना पुराणातून असले तरी, आम्हा भक्ताना मात्र वैकुठाची वाट अतिशय सोपी अशी निर्माण झाली आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, आम्ही सव लोकाच्या सहित या ईश्वराचे प्रेमसुख मोठ्या आवडीने भोगू ४

१०५२ न करावी स्तुति माझी सतजनीं । होईल या वचनीं अभिमान ॥ १ ॥
भारे भवनदी नुतरवे पार । दुरावती दूर तुमचे पाय ॥ २ ॥
तुका म्हणे गर्व पुरवील पाठी । होईल माझ्या तुटी विठोबाची ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा – सतजनीं–सत लोकानी नुतरवे–उतरवणार नाही

अर्थ – तुम्ही सत लोकानी माझी आता स्तुती थोडीसुद्धा करू नये त्यामुळे माझ्या सतत्वाबद्दल मला मोठा अभिमान निर्माण होईल १ आणि या भारामुळे मला भवनदी तरून जाण्याचे सामर्थ्य राहणार नाही, आणि तुमच्यासारख्या साधुसताचे पायही दूरावतील २ तुकाराम महाराज म्हणतात आणि गव तर माझी पाठ पुरवील, व त्यायोगे या विठोबाची आणि माझी ताटातूट होईल ३

१०५३ तुमचिये दासींचा दास करूनि ठेवा । आशीर्वाद द्यावा हाचि मज ॥ १ ॥
नवविधा काय बोलिली जे भक्ती । घ्यावी[2] माझ्या हातीं सतजनीं ॥ २ ॥
तुका म्हणे तुमच्या पायाच्या आधारें । उतरेन खरें भवनदी ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा – नवविधा–शास्त्रात सागितलेली श्रवण कीतन, स्मरण पादसेवन इत्यादी नऊ प्रकारची भक्ती

अर्थ – सत सज्जनहो, मला तुमच्या दासाचा दास जरी करून ठेविले तरी चालेल हाच आशीर्वाद मला तुम्ही द्यावा १ शास्त्रामध्ये जी नवविधा भक्ती सागितली आहे,ती तुम्ही सत लोकांनी मजकडून करवून घ्यावी २ तुकाराम महाराज म्हणतात, तुमच्या पायाच्या आधाराने मी ही भवनदी खरोखरीच उतरून जाईन ३

१०५४ चोर टेंकाचे निघाले चोरी । आपले तैसे पारखे घरीं[3] ॥ १ ॥
नाहीं नफा नागवे आपण । गमाविले कान हात पाय ॥ २ ॥
बुद्धिहीन नये काहींचि कारणा । तयासवे जाणा तेंचि सुख ॥ ३ ॥
तुका म्हणे नाहीं ठाउके वर्म । तयासी कर्म बोडवले ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – टेंकाचे–समूहान पारखे–दुसऱ्याच्या

अर्थ –काही कमकुवत चोर समूहान चोरी करायला निघाले आणि आपल्या घरात जसे आपण वावरतो तसेच ते दुसऱ्याच्या घरीही वावरू लागले १ त्यामुळे काय झाले ? त्याना तेथे काहीच फायदा न होता, उलट ते स्वतःच नागवले गेले घरातील मालकाकडून त्याचे कान व हातपाय कापले गेले मात्र २ याप्रमाणे बुद्धिहीन माणसाचा

१ बैसोनि निवान्त सुख भोगू, २ द्यावी, ३ घरी

उपयोग काहीच होत नाही. आणि त्याच्या बरोबर असणारासही त्याच प्रकारचे भोग भोगायला लागतात. ३ तुकाराम महाराज म्हणतात, ज्याला खरोखरच एखाद्या गोष्टीचे वर्म माहीत नाही, त्याला हे असे कर्मगतीचे फळ भोगावे लागते. ४

१०५५ समर्थाचें बाळ कीविलवाणें दिसे । तरी कोणा हांसे जन देवा ॥ १ ॥
अवगुणी जरी जालें तें वोंगळ । करावा सांभाळ लागे त्याचा ॥ २ ॥
तुका म्हणे तैसा मी एक पतित । परि[1] मुद्रांकित जालों तुझा ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा :– जन–लोक, वोंगळ–वाईट, मुद्रांकित–कृपेने, स्वाधीन.

अर्थ :– देवा, एखाद्या समर्थ असणाऱ्या श्रीमंत माणसाचे मूल जर दीनवाणे अथवा केविलवाणे दिसत असेल तर, त्याकडे पाहताच लोक कुणाला हसतील ? त्याच्या आईबापासच बोल देतील, नाही का ? याचा विचार तुम्ही केला आहे ? १ ते मूल कितीही अवगुणी असेल व कितीही वाईट असेल, तरी त्याना त्याचा सांभाळ करावा लागतोच. २ तुकाराम महाराज म्हणतात, तसा मी एक पतित असून देवा, त्याची चिंता तुला असावी, कारण मी तुमच्या पतितपावन या मुद्रेने अंकित झालो आहे. तुमच्याच स्वाधीन आहे ३

१०५६ गाढवाचे अंगीं चंदनाची उटी । राखेसवें[2] भेटी केली तेणे ॥ १ ॥
सहज गुण जयाचे देहीं । पालट कांहीं नव्हे तया ॥ २ ॥
माकडाचे गळां मोलाचा मणि । घातला चावुनी टाकी थुंकोनि ॥ ३ ॥
तुका म्हणे खळा नावडे हित । अविद्या वाढवी आपुलें मत ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– मणि–रत्न, खळा–दुष्टास

अर्थ :– एखाद्या गाढवाच्या अंगाला चांगली चंदनाची उटी लावली तरी त्याचा त्याला काय उपयोग ? ते लागलीच नेहमीच्या स्वभावाप्रमाणे राखेत जाऊन लोळणारच. १ ज्याचे जे सहज स्वभावातील गुण असतील ते काही बदलत नाहीत. २ एखाद्या माकडाच्या गळयात जर किंमतवान रत्न बांधले तर त्याचा त्याला काय उपयोग? ते त्याचे तुकडे तुकडे करून घघळूनच टाकणार ना ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, याप्रमाणे दुष्ट माणसास चार हिताच्या गोष्टी सांगितल्या तर त्या त्याला आवडत नाहीत. आपल्याच मताने ते अज्ञानाची गोष्ट वाढवितात ४

१०५७ नेणे सुनें चोर पाहुणा मागता । देखून भलता भुंकतसे ॥ १ ॥
शिकविलें कांहीं न चले तया । बोलियेले वांयां बोल जाती ॥ २ ॥
क्षीर ओकूनियां खाय अमंगळ । आपुली ते ढाळ जाऊं नेदी ॥ ३ ॥
वंदूं निंदूं काय दुराचार[3] । खळाचा विचार तुका म्हणे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– सुनें–कुत्रे, ढाळ–खोड, वागण्याची रीत

अर्थ :– दारात बांधलेले कुत्रे चोर कोण, पाहुणा कोण, हे न ओळखता सर्वांवरच भुंकत राहते १ त्याला कितीही शिकविले तरी त्याचा काही उपयोग त्याला कधी होत नाही. त्याला शिकविले ते सर्व वायाच जाते. २ त्याला जरी चांगले दूध पाजले तरी, ते ओकून टाकून अमंगळ अशा घाणेरड्या पदार्थाकडेच त्याचे लक्ष जाणार. ते आपली खोड काही सोडायला तयार नसते. ३ त्याचप्रमाणे एखाद्या दुष्टाला कितीही वंदा अथवा निंदा, त्याच्या स्वभावात काही कधी फरक होणार नाही, असे तुकाराम महाराज म्हणतात. ४

१०५८ जन मानवलें वरी बाह्यात्कारीं । तैसा मी अंतरीं नाहीं जालों ॥ १ ॥
म्हणउनी पंढरीनाथा वाटतसे चिंता । प्रगट बोलतां लाज वाटे ॥ २ ॥

१ दास, २ राख तया तेणे केलीसे भेटी, ३ दुराचारी थोर.

सता ब्रह्मरूप जालें अवघें जन । ते माझे अवगुण न देखती ॥ ३ ॥
तुका म्हणे मी तो आपणासी ठावा । आहे वरा देवा जैसा तैसा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – मानविले–मानसन्मान केला

अर्थ – देवा, बाहेरच्या दृष्टीने या लोकानी माझा मानसन्मान केला असला तरी, मी अत करणाने मात्र तेवढा मोठा झालेलो नाही १ म्हणूनच पढरीनाथा, माझ्या मनास फारच चिता वाटत आहे, आणि मनाची खरी अवस्था प्रकट करताना भारी लाज वाटते २ साधुसताना सारे जगच ब्रह्मरूप दिसत असल्याने ते कुणाचेच दोष पाहात नाहीत माझेही अवगुण त्यामुळे त्याना दिसले नाहीत ३ परतु देवा मी कसा आहे हे तुम्हास माहीत आहे तुकाराम महाराज म्हणतात, मी जसा आहे तसाच आहे हे तुम्ही जाणता ४

१०५९ काम क्रोध माझे जीताती शरीरीं । कोवळें ते वरी बोलतसे ॥ १ ॥
कैसा सरता जालो तुझ्या पायीं । पाडुरगा काहीं न कळे हे ॥ २ ॥
पुराणीची ग्वाही वदतील सत । तैसे नाहीं चित्त शुद्ध जालें ॥ ३ ॥
तुका म्हणे मज आणूनि अनुभवा । दाखवी हे देवा साच खरें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – जीताती–जिवतपण वावरतात, सरता जालो–मान्य झालो, साच–खरे

अर्थ – खरे पाहिले असताना माझ्या शरीरात कामक्रोधादी विकार जिवतपणे वावरत असूनही मी वरच्या बाजूने मात्र अतिशय मृदू शब्द बोलीत आहे १ तरी सुद्धा पाडुरगा मी तुमच्या पायाशी कसा मान्य झालो, हे काही माझ्या ध्यानात येत नाही २ पुराणातील सतानी चित्त कशा प्रकारे शुद्ध असायला पाहिजे, याची ग्वाही दिलेली आहे तशा प्रकारचे काही माझ चित्त शुद्ध झालेले नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, म्हणून देवा, जी काही खरी गोष्ट असेल ती माझ्या अनुभवास आणून द्या ना ४

१०६० स्तुति करीं जैसा नाहीं अधिकार । न कळे विचार योग्यतेचा ॥ १ ॥
तुमचे मी दास सताचे दुर्बळ । करूनि साभाळ राखा पायीं ॥ २ ॥
रामकृष्णहरि मत्र उच्चारणा । आवडी चरणा विठोबाच्या ॥ ३ ॥
तुका म्हणे तुमचे सेवितो उच्छिष्ट । क्षमा करीं धीट होऊनिया ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा — आवडी–प्रेम, सेवितों–खातो

अर्थ — सत लोकहो, मी तुमची स्तुती करावी, असा अधिकार मजजवळ नाही कारण तुमच्या योग्यतेचा विचारच मला समजत नाही १ तुम्हा सताचा मी एक दुबल असा दास असल्याने तुम्ही तुमच्या पायावरच माझे रक्षण करावे २ रामकृष्ण हरि या मत्राचाच मी उच्चार करीत असतो व माझे प्रेम विठ्ठलाच्या चरणावर दृढ असे आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, सतहो, मी तुमचे उच्छिष्ट खात असतो, मोठ्या धिटाईने सेवन करीत असतो मला तुम्ही क्षमा करावी ४

१०६१ बहु दूरवरी । वेठीं ओझें होते शिरीं ॥ १ ॥
आता उतरला भार । तुम्ही केला अगीकार ॥ २ ॥
बहु काकुलती । आलो मागें किती ॥ ३ ॥
तुका म्हणे देवा । आजि सफळ जाली सेवा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – वेठी–विगारीच्या पद्धतीत, अगीकार–स्वीकार

अर्थ –कित्येक जन्मपर्यंत मी या जन्ममृत्यूच्या फेऱ्यात विगारीस धरलेल्या नोकराप्रमाणे सापडलो होतो फार मोठे ओझे माझ्या डोक्यावर होते १ पण आता ते सर्व ओझे कमी झाले आहे देवा, तुम्ही माझा स्वीकार

केल्यामुळे आता माझा भार हलका झाला आहे २ मी पूर्वीपासून तुमची कितीतरी काकुळतीने विनवणी करीत आलो आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, आज मात्र तुम्ही मला पदरी घेतल्यामुळे माझी सेवा सफळ झाली असे मला वाटते ४

## पाईक–अभंग ११.

१०६२ पाईकपणें[1] जोतिला सिद्धात । शूर धरी मात वचन चित्तीं ॥ १ ॥
पाइकावाचून नव्हे कधीं सुख । प्रजामध्यें दु ख न सरे पीडा ॥ २ ॥
तरि व्हावें पाईक जिवाचे उदार । सकळ त्याचा भार स्वामी वाहे ॥ ३ ॥
पाइकीचे सुख जया नाही ठावे । धिग त्यानीं ज्यावे वायाविण ॥ ४ ॥
तुका म्हणे एका क्षणाचा करार । पाईक अपार सुख भोगी ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा –पाईकपणें–सेवकाचा, जोतिला–जोडिला, सागितला, ज्यावें–जगावे

अर्थ :–मी सेवकपणाचा जो विचार सागितला आहे, तो जो शूर पुरुप असेल तोच चित्तात धरून नीट समजावून घेईल १ सेवक झाल्यावाचून सुख कधीच लाभणार नाही त्याशिवाय प्रजेमधील दु ख, पीडा दूर होणारच नाही २ तरी जीवावर उदार होऊन तुम्ही सेवक व्हावे. तुमचा सर्व भार तो देव स्वत वाहील ३ सेवकाच्या सुखाची ज्याला कल्पना नाही, त्याचे जन्माला येऊन जगणे व्यर्थच आहे ४ तुकाराम महाराज म्हणतात, एक क्षणभर जरी सेवकपणा अगी बाणला तर अपार असे सुख त्यास भोगायला मिळेल ५

विवरण – या पुढचे दहा अभग पाईक-अभग म्हणून प्रसिद्ध आहेत पाईक म्हणजे शूर शिपाई, सेवक, वीर पुरुप जीवनाच्या विविध क्षेत्रात पाईकपणाने वागणे किती महत्वाचे आह, याचा स्पष्ट बोध या अभगातून तुकाराम बुवानी केलेला आहे राजकारण असो, देशरक्षण असो, विद्यासपादन असो की परमेश्वरप्राप्तीची साधना असो, त्यात पाईकाचे, सेवकाचे गुण हवेतच या सेवकाच्या वृत्तीशिवाय कोणतही अवघड काम होणें शक्य नाही तुकाराम-बुवाच्या या अभगातून निवळ परमार्थाचा बोध किती, व त्यातील राजकारणाचा अर्थ किती, याबद्दल काहीच्या मनात सशय येण्यासारखा आहे शिवरायाचे कार्य नजरेसमार ठेवून तुकोबानी पाईकाना, स्वराज्याच्या शिपायाना उद्देशून या अभगातून उपदेश केलेला आहे, असेही सागितले जात या अभगाच्या निर्मितीचाही प्रसग सागितला जातो, तो असा की, एकदा शिवबा व त्याचे सहकारी शूर वीर पुरुप असे सर्वजण तुकाराममहाराजाचे कीर्तन ऐकत बसले होत ' थोर विठ्ठलाचे गाढे । कळिकाळ पाया पडे ' या अभगाचे स्मरण होऊन वारकरी विठ्ठलभक्ताना व स्वराज्यसाधकाना एकदमच बोध द्यावा, असे तुकोबाच्या मनात आले व त्या प्रसगी त्यानी हे 'पाईक अभग ११' म्हटले वीरत्व, पुढारी-पणाची वृत्ती, धीटपणा , जीवावर उदार होउन कुठेही धैर्याने उडी घेण्याची हिमत या सर्व गोष्टींची जशी जरूरी स्वराज्यसाधनेस आहे, तशीच ती जीवनाच्या इतरही क्षेत्रात विविध ठिकाणी आहे, असे स्पष्ट दिसत परमार्थाच्या क्षेत्रातही या गुणाना किती महत्त्व आह, ते या अभगावरून समजण्यासारखे आहे

१०६३ पाइकीचें सुख पाइकासी ठावें । म्हणोनिया जीवे केली साटी ॥ १ ॥
येता गोळ्याचा बाण साहिले भडमार । वर्षता अपार वृष्टि वरी ॥ २ ॥
स्वामीपुढें व्हावे पडता भाडण । मग त्या मडन शोभा दावी ॥ ३ ॥
पाइकानीं सुख भोगिले अपार । शुद्ध आणि धीर अतर्बाहीं ॥ ४ ॥
तुका म्हणे या सिद्धाताच्या खुणा । जाणे तो शाहाणा करी तो भोगी ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – मडन–भूषण, अलकार

---

१ पाईक म्हणे

अर्थ – शिपाई किंवा सेवक होण्यात काय सुख असते, हे एक सेवकच जाणतो. म्हणून तर जीवावर उदार होऊन पाईक व्हावे. १ समोरून तोफांच्या गोळ्यांचा अथवा धनुष्यातून निघालेल्या बाणांचा वर्षाव सहन करावा, अगणित शस्त्राचा मारा सहन करावा २ युद्ध सुरू असताना आपल्या स्वामीपुढे होऊन हा सर्व मारा सहन करणे यातच सर्व शोभा आहे. शस्त्राचे वार अंगावर घेणे, हीच शूराची खरी भूषणे आहेत. ३ अंतर्बाह्य असे जे शूर पुरुष आहेत, धैर्यवान आहेत, त्यांनी पाईकपणाचे सुख अपार भोगले आहे ४ तुकाराम महाराज म्हणतात, या सर्व सिद्धान्ताच्या खुणा मी सांगितल्या आहेत. जो शहाणा व जाणणारा असेल, तो त्या ओळखील व त्याप्रमाणे स्वामीकार्य करून सुखी होईल. ४

१०६४ पाईक तो जाणे पाइकीचा भाव । लाग पगें ठाव चोरवाट ॥ १ ॥
आपणां राखोनि ठकावे आणीक । घ्यावें सकळीक हरुनियां ॥ २ ॥
येऊं नेदी लाग लागों नेदी भाग । पाइक त्या जग स्वामी मानी ॥ ३ ॥
ऐसे जन केलें पाइकें पाईक । जया कोणी भीक न घालिती ॥ ४ ॥
तुका म्हणे ऐसे जयाचे पाईक । बळिया तो नाइक त्रैलोकींचा ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– पगें–पाय, पावले

अर्थ :– जो खरा सेवक असेल तोच सेवकाचा भाव जाणेल, त्यालाच कोणत्या ठिकाणी काय आहे, चोरवाटा कुठे आहेत, हे माहीत असल्याने तो आपली पावले नेमकी टाकीत असतो. १ तो आपले स्वत:चे रक्षण करून इतरांना फसवितो, त्याचे सर्वस्व हरण करून घेतो. २ हे असे शूर सेवक कुणाविषयी फारसा सुगावा लागू देत नाहीत; आणि स्वत:विषयीही फारशी माहिती कुणास सांगत नाहीत असे सेवक स्वामीसही जगासारखे मान्य होतात. ३ ज्यांना कुणी विचारीतही नव्हते, अशाही लोकांना या सेवकांनी सेवकत्वाची दीक्षा देऊन पाईक केले आहे. ४ तुकाराम महाराज म्हणतात, असे ज्याचे सेवक आहेत, तो त्रैलोक्यात मोठा बलवान व श्रेष्ठ राजा आहे असे समजावे. ५

१०६५ पाइकांनीं पंथ चालविल्या वाटा । पारख्याचा सांटा मोडोनियां ॥ १ ॥
पारखिये ठायीं घेउनिया खाणें । आपलें तें जन राखियेलें ॥ २ ॥
आधारेविण जें बोलता चावळे । आपलें तें कळे नव्हे ऐसें ॥ ३ ॥
सांडितां मारग मारिती पाईक । आणिकांसी शीक लागावया ॥ ४ ॥
तुका म्हणे विश्वा घेऊनि विश्वास । पाईक तयास सुख देती ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– पारख्याचा–परक्या शत्रूचा, सांटा–स्थाने.

अर्थ :– या सेवकांनी शत्रूची स्थाने मोडून चांगले निर्भय असे मार्ग निर्माण केले आहेत. १ या पाईकांनी शत्रूच्या ठिकाणी हल्ला केला असून तेथेच ते वसती करून आहेत. त्यांनी या वेळी आपल्या लोकांचे मात्र रक्षण केले आहे. २ शास्त्राचा आधार नसताना जे लोक उगाच बोलतात, ते आपल्या जातीचे नव्हेतच असे समजून घेते. ३ कुणी ठरलेला, शिस्तीचा रस्ता सोडून गेले की, त्यांना हे सेवकलोक शिक्षा करतात. कारण त्यामुळे मग इतरांनाही नीट शिक्षण मिळते ४ तुकाराम महाराज म्हणतात, हे सेवक लोक सर्व लोकांना विश्वासात घेऊन त्यांना सर्व प्रकारचे सुख देतात ५

१०६६ पाईक तो प्रजा राखोनियां कुळ । पारखिया मूळ छेदी दुष्टा ॥ १ ॥
तो एक पाईक पाइका नाईक । भाव सकळीक स्वामिकार्जी ॥ २ ॥
तृणवत तनु सोनें ज्या पाषाण । पाइका त्या भिन्न नाहीं स्वामी ॥ ३ ॥

विश्वासावांचूनि पाइकासी मोल । नाहीं मिथ्या बोल बोलिलिया ॥ ४ ॥
तुका म्हणे नये स्वामी उणेंपण । पाइका जतन करी त्यासी ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– तृणवत–गवताप्रमाणे क्षुद्र.

अर्थ :– हा सेवक कसा असतो ? तर तो आपल्या प्रजेचे रक्षण करतो आणि जो शत्रू असेल त्याचे मूळ छेदून त्याचा नाश करितो. १ ज्याचा सर्व भाव एका स्वामीच्याच कार्यावर असतो. तो सर्व पाईकांचा नायकच बनतो. २ त्याला स्वतःचा देह गवताप्रमाणे क्षुद्र वाटतो. त्याने सोने दगडाप्रमाणे मानलेले असते. अशा सेवकास हा पाईक स्वतःहून काही वेगळे मानत नाही. ३ स्वामीवर असा दृढ विश्वास ठेवल्याखेरीज त्या सेवकाला कधी मोल घडत नाही. ४ तुकाराम महाराज म्हणतात, स्वामीस जेणेकरून कमीपणा येणार नाही, अशा कार्याचे जतन हे पाईक लोक करीत असतात. ५

१०६७ धनी ज्या पाइका मानितो आपण । तया भितें जन सकळीक ॥ १ ॥
जियाचे उदार शोभती पाईक । मिरवती नाईक मुगुटमणि ॥ २ ॥
आपुलिया सत्ता स्वामीचें वैभव । भोगिती गौरव सकळ सुख ॥ ३ ॥
कमाइचीं हीणें पडिलीं उदंडें । नाहीं तयां खंड येती जाती ॥ ४ ॥
तुका म्हणे तरि पाइकीच भली । थोडीबहुत केली स्वामिसेवा ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– हीण–कमी प्रतीची.

अर्थ :– जो स्वामी आपल्या सेवकास मानतो, त्या सेवकासही मग सर्वजण भिऊन असतात. १ जीवावर उदार होऊन लढणारे सेवकच शोभून दिसतात. ते सेवकांचे प्रमुख नाईक होऊन मोठ्या दिमाखाने शोभतात. २ असे हे सेवक सत्तेने स्वामीचे सर्व सुख भोगतात. त्यांचा गौरव सर्व प्रकारांनी होत असतो. ३ परंतु ज्यांची कमाईच हीन प्रतीची असते, असे किती तरी सेवक पडले आहेत. असे किती येतात आणि जातात, त्यांचा हिशेबच नाही. ४ तुकाराम महाराज म्हणतात, परंतु स्वामीची सेवा करणारे पाईकच भले होत. ५

१०६८ पाइकपणें खरा मुशारा । पाईक तो खरा पाइकीनें ॥ १ ॥
पाईक जाणे मारिलें अंग । पाइकासी भंग नाहीं तया ॥ २ ॥
एके दोहीं घरीं घेतलें खाणें । पाईक तो पणें निवडला ॥ ३ ॥
करूनि कारण स्वामी यश द्यावें । पाइका त्या नांव खरेंपण ॥ ४ ॥
तुका म्हणे ठाव पाइकां निराळा । नाहीं स्वामीं स्छळा गेल्याविण ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– मशारा–वेतन, कारण–कार्य.

अर्थ :– सच्चेपणाने सेवा करणे, हेच खरे म्हणजे पाईकाचे वेतन आहे. सेवेच्या योगानेच तो खरा पाईक शोभून दिसतो. १ ज्या सेवकास लढाईचे अंग माहीत आहे, त्याच्या सेवेस कधी कमतरता पडणार नाही. २ एक दोन ठिकाणी स्वतः होऊन लढाई जिंकणारा जो सेवक असतो, तोच शूर सेवक म्हणून ओळखला जातो. ३ त्याने काही विशेष कार्य करून स्वामीस यश दिलेले असते. त्याच्या सेवेलाच खऱ्या सेवेचे नाव मिळते. ४ तुकाराम महाराज म्हणतात, अशा स्वामीनिष्ठ पाईकांना त्यांच्या स्वामीखेरीज इतर विश्रांतीचे ठिकाण कुठलेही नाही. ५

१०६९ उंच निंच कैसी पाइकाची ओळी[1] । कोण गांडे वळी निवडिले ॥ १ ॥
स्वामिकाजीं एक सर्वस्वें तत्पर । एक ते कुचर आशाबद्ध[2] ॥ २ ॥
प्रसंगावांचूनि आणिती आविर्भाव[3] । पाईक तो नांव मिरवी वांयां ॥ ३ ॥

---

१ बोली, २ आशा बद्ध, ३ आयुर्भाव.

गणतीचे एक उच्च निच फार । तयामध्यें शूर विरळा थोडे ॥ ४ ॥
तुका म्हणे स्वामी जाणे त्याचा मान । पाईक पाहोन मोल करी ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – ओळी–प्रकार, गाढे–भिन्न, बळी–बलवान, कुचर–कुचराई करणारे

अर्थ – या सेवकाचे श्रेष्ठ व कनिष्ठ असे प्रकार कसे असतात ते पाहा कुणी भित्रे असतात कुणी शूर व बलवान असतात १ कुणी आपल्या स्वामीच्या सेवेत तत्पर असतात, तर कुणी त्याविषयी कुचराई करतात नुसतेच आशेने बद्ध असतात २ शौर्य दाखविण्याचा प्रसंग आल्याशिवायच ते वृथा शूरत्वाचा खोटा आविर्भाव आणतात व आपण सेवक आहोत, अशी विनाकारण ऐट मिरवितात ३ या सेवकाची गणतीच करायला गेले तर, खरा व प्रामाणिक असा सेवक एखादाच मिळतो खालच्या दर्जाचेच सेवक फार असतात त्यांच्यात शूर असे वीर सेवक क्वचितच आढळून येतात ४ तुकाराम महाराज म्हणतात, अशा शूर सेवकाचा मान त्याचा स्वामी जाणीत असतोच त्याच्या सेवेप्रमाणेच त्याचा स्वामी त्याचे मोल यथायोग्य करीत असतो ५

१०७० एकाच स्वामीचे पाईक सकळ । जैसें बळ तैसे मोल तया ॥ १ ॥
स्वामिपदीं एका ठाव उच्च स्थळीं । एक तीं निराळीं जवळी दुरी ॥ २ ॥
हीन कमाईचा हीन आन ठाव[1] । उचा सर्व भाव उच्च पद ॥ ३ ॥
पाइकपणे तो सर्वत्र सरता । चाग तरी परता गाढचा ठाव ॥ ४ ॥
तुका म्हणे मरण आहे या सकळा । भेणे अवकळा अभयें मोल ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – भेणें–भीतीने

अर्थ – एकाच स्वामीचे सव पाईक असले तरी त्यांच्यात ज्याचे जसे बळ असेल तसे त्याचे मोल ठरते १ जे खरे, सच्चा दिलाचे असतात, शूर व प्रामाणिक असतात, त्याना स्वामीजवळच उचावर आसन मिळते व दुसरे कुणी यमी प्रतीचे असतात, त्याना स्वामीच्या आसपास पुढे तरी दूरच्या ठिकाणी जागा मिळत असते २ ज्याचे पर्तृत्व कमी प्रतीचे असते, त्याना स्थानही खालच्या दर्जाचे मिळते उलट ज्याचे शौर्य श्रेष्ठ दर्जाचे असते, त्याना मानाचे स्थानही फार उचीचे मिळते ३ तो सेवक आपल्या सेवेने सर्वांना प्रिय झालेला असतो, परतु एखादा चागला असूनही जर कुचराई करील, तर मात्र तो भिन्नाच ठरतो ४ तुकाराम महाराज म्हणतात मरण तर सर्वांनाच आहे पण मरणाचे भय धारण केल्यास अप्रतिष्ठा होत व अभय धरल्यास जीवितास मोल चढते ५

१०७१ प्रजी तो पाईक ओळीचा नाईक । पोटासाटीं एके जैशीं तैशीं ॥ १ ॥
आगळें पाऊल आणिकासी तरी । पळती माघारीं तोडिजेती ॥ २ ॥
पाठीवरी घाय[2] म्हणती फटमर । धडा अगें शूर मान पावे ॥ ३ ॥
घेईल दरवडा देहा तो पाईक । मारी सकळीक सर्व हरी ॥ ४ ॥
तुका म्हणे नव्हे बोलाचे कारण । कमाईचा पण सिद्धी पावे ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – प्रजी–प्रजेच्या सुखासाठी फटमर–भ्याड

अर्थ – प्रजेच्या सुखासाठी मरण पत्करणारा जो सेवक असतो, तोच नाईकाच्या योग्यतेस पोचतो आणि केवळ पोटासाठी लढणारे असतात, त्याना मानही जसास तसा असाच जमलेम मिळतो १ कित्येकजण शत्रूवर चाल करून वेगळेच पाऊल टाकतात, तर कित्येक शत्रूच्या भीतीने माघारी वळून पळत असतात, याचे मात्र पाय तुटले जातात २ शत्रूचे घाव पाठीवर घेऊन जे पळून यतात ते शिपाईगडी भ्याडच म्हणावेत व जे धड अगाने शत्रूवर समोर होऊन चालून जातात, त्याचाच मान सर्वत्र वाढतो ३ आपल्या जीवावर उदार होऊन जो पाईक शत्रूवर

१ वाव, २ धाव

हल्ला करील, तोच त्याचा पराभवही करू शकेल त्यालाच जय मिळेल ४ तुकाराम महाराज म्हणतात, या शूरत्वाच्या गोष्टी नुसत्या बोलायच्या नसतात, तर मोठा निश्चय करून कार्यसिद्धी करणे हेच सेवेकाच्या सेवेचे सार्थक आहे ५

१०७२ जातीचा पाईक ओळखे पाइका । आदर तो एका त्याचे ठायीं ॥ १ ॥
धरितील पोटासाटीं हतियेरें । कळती तीं खरें वेठीचींसीं ॥ २ ॥
जातीचे ते असे खरें घायडाय । पारखिया काय पाशीं लोपे ॥ ३ ॥
तुका म्हणे नमू देव म्हूण जना । जालियाच्या खुणा जाणतसों ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – जातीचा–श्रेष्ठ प्रकारचा, खरा, खरें–गाढवे, वेठीचींसीं–बिगारीची, घायडाय–रीत, डावपेच, पारखिया–पारख करणाऱ्या लोकापाशी

अर्थ – जो खरा जातिवंत सेवक असतो, तोच दुसऱ्या सेवकास ओळखतो त्यासच त्याच्या कार्याविषयी आदर वाटतो १ व जे केवळ पोटासाठीच हातात हत्यारे धरून असतात, ती माणसे केवळ बिगारीच्या गाढवा-प्रमाणेच नुसती हेतुशून्य होऊन राबतात असे समजावे २ जे जातीने खरे शूरवीर पुरुष आहेत, त्याचे डावपेच जो पारखी असतो, त्याच्या दृष्टीतून सुटत नाहीत त्यास त्याची ओळख पटतेच ३ तुकाराम महाराज म्हणतात, *सर्वत्र देवाचीच वसती आहे, असे समजून आम्ही या सेवकास वदन करूच, पण जे खऱ्या अर्थाने पूर्णत्वाला गेलेले* आहेत, त्याच्याही खुणा आम्ही जाणतोच ४

विवरण – तुकाराम महाराजाचे हे पाईकाचे अकरा अभंग अनेक दृष्टीनी महत्त्वाचे आहेत. परमेश्वर-प्राप्तीच्या मार्गात अथवा भक्तिसाधनेत पाईकाच्या गुणाची कितीतरी आवश्यकता आहे आपले सर्व गुणसर्वस्व आपल्या धन्यासाठी, स्वामीसाठी खर्च करण्याची प्रतिज्ञा या सेवकाने घेतलेली असते अशी ही निकराची भावना भक्तीच्या वृत्तीस पोषकच आहे तुकाराम महाराजाच्या या विशेष अभगाचा अर्थ दोनही प्रकारानी लावता येण्या-सारखा आहे शिवबा व त्याचे स्वराज्यसाधनाचे कार्य व त्यासाठी तळहातावर शीर घेऊन निघालेले वीर सेवक, याच्या धैर्याचे व काहीच्या कुचराईचे वर्णन बुवानी केले आहे हे सर्व वर्णन परमार्थाच्या मार्गावर निघालेल्या विठ्ठलाच्या वीर पुरुषानाही यथार्थपणे लागू पडते

*समोरील बाणाचा, तोफेच्या गोळ्याचा वर्षाव छाती पुढे करून झेलणे, शत्रूच्या चोरवाटा शोधणे,* आपले शरीर गवताप्रमाणे क्षुल्लक मानणे, सुवर्ण दगडाप्रमाणे मानून वागणे, आपल्या गुणवत्तेने पाईकाने सेवकाचा नाईक होणे, थोर प्रकारची सेवा, हेच खरे वतन मानणे, पाठीवर शत्रूचे घाव घेऊन पळून न येणे, सर्व धैर्य एकवटून शत्रूवर तुटून हल्ला करणे, ही सर्व खऱ्या पाईकाची लक्षणे तुकारामबुवानी दिली आहेत ती पाहून यावेळी त्याच्या भावती खरोखरच शिवबाचे शूरवीर शिपाई त्याची कथा ऐकण्यासाठी तत्पर झालेले असावेत असे वाटत तुकोबानी त्यानाही स्वदेशकार्यासाठी उत्तेजित केले व आपल्या भक्तानाही परमार्थमार्गात पाईकपणाचे महत्त्व काय आहे हे विशद करून सागितले

किंवा असेही असेल की, प्रत्येकाने जसे परमार्थमार्गात निपुण असावे, तसेच देशकार्याचीही त्यास जाणीव असावी हे दोनही मार्ग बरोबर दिसतात, तवढे भिन्न नाहीत केवळ भक्तीमार्गी लोकाना व केवळ देशवीराना उद्देशून प्रत्येकाच्या वर्गास उपयोगी पडेल असा उपदेश या अभगात आहे, असे म्हणण्यापेक्षा सरमिसळ करून प्रत्येक माणसास या दोनही अगाचे महत्त्व समजावे अशीही कल्पना बुवाच्या मनात असेल ईश्वरप्राप्ती हेच जीविताचे ध्येय तुकारामादी साधुसतानी मानले होते, हे खरे असले तरी त्याचे लक्ष भोवती असाव असे वाटते त्याचे परमार्थज्ञान एवढे सकुचित मानण्याचे काही कारण नाही त्याच्या आत्मज्ञानात सर्व विश्वाचा समावेश होतो व त्यामुळे पीडलेल्या प्रजेच्या पारमार्थिक अराजकाने ते जसे कळवळून गेले, तसेच त्याचे ऐहिक दुर्दैवही त्याना पाहावले नाही दोहोंची सागड घालण्याचा प्रयत्न त्यानी केला

१०७३ बुद्धीचा पालट धरा रे कांहीं । मागुता नाहीं मनुष्यदेह ॥ १ ॥
आपुल्या हिताचे न होती सायास । गृहदाराआसधनवित्त ॥ २ ॥
अवचितें निधान लागलें हे हातीं । भोगावी विपत्ति गर्भवास ॥ ३ ॥
यावें जावें पुढें ऐसेचि कारण । भोगावें पतन नरकवास ॥ ४ ॥
तुका म्हणे धरीं आठव या देहीं । नाही तरि काहीं बरें नव्हे ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– मागुता–यानंतर, दारा–बायको.

अर्थ :– लोकहो, तुम्ही तुमच्या बुद्धीत काही तरी पालट करावा कारण यानंतर हा मनुष्यदेह मिळेलच असे नाही. १ आपल्या आयुष्याचे सर्व बाजूनी हित होईल, असे काही प्रयत्न तुम्ही करीत नाही तुमचे चित्त रात्रंदिवस घर, बायको, पैसा यांच्या आशेतच गुरफटून राहिले आहे. २ अवचितपणे मनुष्यदेहाचा हा ठेवा तुमच्या हाताशी आला आहे मग विनाकारण गर्भवासाची विपत्ती पुन पुन: का भोगावी? ३ एकदा हा मनुष्यदेह संपला की मग सारख्या जन्ममृत्यूच्याच फेऱ्या सुरू होऊन नरकवास मात्र भोगावा लागेल, ४ तुकाराम महाराज म्हणतात, तेव्हा तू याच जन्मी नीट आठवण प्रभूची ठेव. नाहीतर पुढे काही ठीक होणार नाही ५

१०७४ आम्हीं पतितांनीं घालावें सांकडें । तुम्हा लागे कोडें उगवणें ॥ १ ॥
आचरतां दोष न धरूं सांभाळ । निवाड सकळ तुम्हां हातीं ॥ २ ॥
न घेतां कवडी करावा कुढावा । पाचारिता देवा नामासाठीं ॥ ३ ॥
दयासिंधु नाम पतितपावन । हें आम्हा वचन सांपडलें ॥ ४ ॥
तुका म्हणे करू अन्यायाच्या कोटी । कृपावंत पोटीं तूंचि देवा ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– सांकडें–संकट, उगवणें–सोडवणे, मोकळे करणे, कुढावा–रक्षण, पाचारिता–बोलविता.

अर्थ – देवा, आम्ही पातकी लोकांनी नाना पापे करून तुम्हास संकटात टाकावे व तुम्ही आम्हास त्या संकटांतून मुक्त करावे. १ अनेक प्रकारच्या दोषाचे आचरण करिताना आम्ही कधीच आम्हास जपणार नाही पण त्यातून मोकळे करण्याचे काम मात्र देवा, तुम्हास करावे लागते. २ देवा, तुमचे नुसते नाव घेऊन जरी तुम्हास कुणी हाक मारिली, तरी तुम्ही एका कवडीची किंमत न घेता त्याचे रक्षण करता ३ तुमचे नावच दयेचा सागर व पतितपावन असे आहे. असे तुम्ही आमच्या भक्तांना जे सांगितले आहे, तेच वचन आमच्या हाती आहे ४ तुकाराम महाराज म्हणतात, आम्ही अनेक कोटी अन्याय करू तरी सुद्धा देवा, तुम्ही कृपावंत आहात असेच, आमच्या अनुभवास येईल. ५

१०७५ जो भक्ताचा विसावा । उभा पाचारितो धांवा ॥ १ ॥
हातीं प्रेमाचे भातुकें । मुखीं घाली कवतुकें ।
भवसिंधू सुखें । उतरी कासे लावूनि ॥ २ ॥
थोर भक्ताची आस । पाहे भोंवताली वास ॥ ३ ॥
तुका म्हणे कृपादानी । फेडी आवडीची धणी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – पाचारितो–बोलावितो, भातुकें–खाऊ, वास–वाट, धणी–तृप्ती.

अर्थ :– हा देव भक्तासाठी किती तत्पर असतो पाहा. भक्ताचा विसावाच असणारा हा देव उभे राहून आपल्या भक्तांना जवळ बोलवितो तरी त्याच्याकडे धाव घ्यावी १ त्याच्या हातात प्रेमाचा खाऊ असून तो मोठ्या कौतुकाने भक्ताच्या मुखात तो खाऊ घालण्यास उत्सुक आहे. आपली कास आधरून हा देव आपल्या भक्ताचे रक्षण या संसारसागरातून करीत असतो. २ याला आपल्या भक्ताची आवड फार मोठीच आहे. भोंवताली दृष्टी ठेवून

तो त्यांची घाट एकसारखी पाहात असतो. ३ तुकाराम महाराज म्हणतात, कृपेचे दान देणारा हा देव भक्तांवर कृपा करून त्यांच्या विषयी आपल्या प्रेमाची तृप्ती करीत असतो. ४

१०७६ अखंड तुझी जया प्रीति । मज दे त्यांची संगति ।
मग मी कमळापति । तुज नाणीं कांटाळा ॥ १ ॥
पडोन राहेन ते ठायीं । उगाचि संतांचिये पायीं ।
न मगें न करीं कांहीं । तुझी आण विठोबा ॥ २ ॥
तुम्ही आम्ही पीडों ज्यानें[1] । दोन्ही वारती एकानें ।
बैसलों धरणें । हाका देत दारेशीं ॥ ३ ॥
तुका म्हणे या बोला । चित्त द्यावें बा विठ्ठला ।
न पाहिजे केला । अवघा[2] माझा आव्हेर ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– नाणीं–न आणी, आणणार नाही, आण–शपथ.

अर्थ :– देवा, तुझ्यावर ज्यांची अखंड प्रीती असते, त्या साधुसंतांची व भक्तांची संगत मला द्यावी. कमलापती, मग सारखे सारखे मागून मी तुला कंटाळा येईल असे काही करणार नाही १ त्या संतांच्या पायांजवळच पडून राहीन. मी काही करणार नाही. काही मागणारही नाही. देवा, याविषयी त्या विठ्ठलाची शपथ आहे. २ तुमच्या दाराशी हाका देऊन सारखे धरणे धरल्याने तुम्हास व आम्हांस अशी दुहेरी पीडा होत असते; ती यामुळे आता दूर होईल. ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा विठ्ठला, माझ्या या बोलण्याकडे लक्ष द्यावे आता. माझा त्याग तुम्ही करू नये. ४

१०७७ पुनीत केलें विष्णुदासीं । संगें आपुलिया दोषी ॥ १ ॥
कोण पाहे तयांकडे । वीर विठ्ठलाचे गाढे ।
अशुभ त्यांपुढें शुभ होउनिया ठाके ॥ २ ॥
प्रेमसुखाचिया रासी । पाप नाहीं ओखदासी ॥ ३ ॥
तुका म्हणे त्यांनीं । केली वैकुंठ मेदिनी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– पुनीत–पवित्र, ओखदासी–औषधालासुद्धा, मेदिनी–पृथ्वी.

अर्थ :– या विष्णुदासांनी आपल्या पावन संगतीने भोवतीच्या सर्व पातकी लोकांना पवित्र केले आहे १ आता यांच्याकडे वाकड्या नजरेने कोण पाहील ? कारण ते या विठ्ठलाविषयी प्रेम धारण करणारे शूर वीर आहेत. जर काही अशुभ असेल तर ते होऊनच त्यांच्या पुढे उभे राहते. २ त्यांच्या समोर श्रीहरीच्या प्रेमाचे पर्वतच्या पर्वत उभे असून पाप औषधाला सुद्धा उरत नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, या संत पुरुषांनी सर्व पृथ्वीच वैकुंठरूपाची करून टाकली आहे. ४

१०७८ जन[3] देव तरी पायांचि पडावें । त्याचिया स्वभावें चाड नाहीं ॥ १ ॥
अग्नीचें सौजन्य शीतनिवारण । पालवीं बांधोनि नेतां नये ॥ २ ॥
तुका म्हणे विंचु सर्प नारायण । वंदावे दुरोन शिवों नये ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा :– चाड नाहीं–पाहू नये, ध्यानात धरू नये, पालवीं–पदरात.

अर्थ :–सर्व लोक ही देवाचीच स्वरूपे आहेत, असे असले तरी त्यांचे अवगुण ध्यानात न धरता त्यांच्या पायां पडावे. १ असे असले तरी हेही ध्यानात ठेवावे की, अग्नीचे काम शीतनिवारण आहे. थंडी दूर करणे, हे अग्नीचे

१ जन, २ आता, ३ जग.

सौजन्य असून यासाठी त्याचा उपयोग आपणास मोठाच आहे म्हणून काही त्याला आपल्या पदरात बाधून घेता येत नाही २ तुकाराम महाराज म्हणतात, विंचू व सर्प ही नारायणाची रूपे, परतु त्याना न शिवता दुरूनच वदन करावे ३

१०७९ भूत भविष्य कळो यावें वर्तमान । हे तों भाग्यहीन त्याची जोडी ॥ १ ॥
आम्ही विष्णुदासीं देव ध्यावा चित्तें । होणार तें होतें प्रारब्धें ॥ २ ॥
जगरुढीसाटीं घातलें दुकान । जातो नारायण अंतरोनि ॥ ३ ॥
तुका म्हणे हा हो प्रपंच गाढा । थोरली ते पीडा रिद्धिसिद्धी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – जोडी–प्राप्ती

अर्थ – आपणास भूतकाळातील व भविष्यकाळातील वर्तमान समजावे म्हणून पुष्कळ लोकाची खटपट असते पण या ज्ञानाची प्राप्ती ही भाग्यहीन माणसास होते म्हणजे ही प्राप्ती काही विशेष भाग्याची नव्हे १ आम्ही विष्णुदासानी मात्र निरतर या देवाचेच चिंतन मनात करावे, व जे प्रारब्धानुसार असेल ते भोगावे २ केवळ जगरुढीसाठीच भूतभविष्य समजणाऱ्या लोकांनी दुकान घालून धदा सुरु केलेला आहे पण त्यामुळे परमेश्वराचे पाय अतरून जातात ना ३ तुकाराम महाराज म्हणतात, हा प्रपच मोठा गहन असून त्यात, रिद्धीसिद्धींची पीडाही फार मोठी असते ४

## घोंगड्याचे अभंग – १२

१०८० ठकिलें काळा मारिली दडी । दिली कुडी टाकोनिया ॥ १ ॥
पाघुरलों बहु काळें । घोंगडें बळें साडवलें ॥ २ ॥
नये ऐसा लाग वरी । परते दुरी लपालें ॥ ३ ॥
तुका म्हणे आड सेवा । लाविला हेवा धादली ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – ठकिले–फसविले, कुडी–देह, लाग–लाभ, हेवा–हाव

अर्थ – मी काळाला फसवून दडी देऊन लपून राहिलो देहभावाची वृत्तीही टाकून दिली १ पुष्कळ दिवसपर्यंत मी हे काळे घोंगडे पाघरले होते, ते मुद्दामच टाकून दिले आहे २ आता त्या काळास कसलाही लाभ होणार नाही, अशा दूरच्या ठिकाणी जाऊन मी लपले आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, बाह्य सेवा करण्याची माझी वरवरची हाव होती, तिची आडकाठी मी या प्रकारानें झटपट दूर केली ४

१०८१ घोंगडियाचा पालट केला । मुलामुला आपुल्यात ॥ १ ॥
कान्होबा तो मीच दिसे । लाविलें पिसें सवंगडिया ॥ २ ॥
तो बोले मी उगाच बैसें । आनारिसें न दिसे ॥ ३ ॥
तुका म्हणे दिलें सोंग । नेदी व्यंग जाऊं देऊं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – पिसे–वेड, आनारिसे–वेगळेपणा

अर्थ – खेळताना या गोपाळाच्या मुलानी आपल्या घोंगड्याची अदलाबदल केली. १ प्रत्येकजणानें कान्होबा मीच, असे सोंग घेऊन इतर सोबत्याना बतावणी केली. २ तो बोलतो व मी उगाच बसतो असे असले तरी, त्याच्यात व आमच्यात वेगळेपणा नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, या श्रीहरीनें हे जे सोंग त्याना दिले आहे, ते काहीं व्यर्थ वाया जात नाही ४

१०८२ खेळों लागलों सुरकवडी । माझी घोंगडी हारपली ॥ १ ॥
काऱ्होबाचे पडिलों गळां । घेई गोपाळा देई झाडा ॥ २ ॥
मी तों हागे उघडा जालों । अवघ्या आलों बाहेरी ॥ ३ ॥
तुका म्हणे बुद्धि काची । नाहीं ठायींची मजपाशीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– हारपली–हरवून गेली, काची–खोटी.

अर्थ :– देवा, सुरकवडीचा खेळ मी खेळू लागलो, तेव्हा माझ्या खांद्यावरची घोंगडी हरवून गेली. १ त्या वेळी मी काऱ्होबाच्या गळ्यात पडून म्हणालो की, गोपालकृष्णा, तू माझी झडती घे व तूही तुझ्या अंगाची झडती दे. २ हा पाहा मी झडतीसाठी उघडा झालो आहे. सर्व उपाधी सोडून आलो आहे. सर्व वासनांतून मुक्त झालो आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, माझ्या जवळ माझी मूळचीच बुद्धी काही खोटी नाही. ४

१०८३ घोंगडियांची एकी राशी । त्याचपाशीं तें ही होतें ॥ १ ॥
माझियाचा माग दावा । केला गोवा उगवों द्या ॥ २ ॥
व्हावें ऐसें निसंतान । घेइन आन तुजपाशीं ॥ ३ ॥
तुका म्हणे लाहाण मोठा । सांडा[1] ताठा हा देवा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– गोवा–गुंतवणूक, उगवो द्या–सोडवा, आन–शपथ

अर्थ :– देवा, तुझ्याजवळ अनेक लोकांच्या घोंगड्यांचे ढीगच्या ढीग होते. माझेंही हे घोंगडे तेथेच होते. १ देवा, माझा मार्ग मला दाखवा ना. ज्या गुंत्यात माझी गुंतवणूक झाली आहे त्यातून माझी सुटका करावी. २ माझ्या वासनांचे व देहरूपी घोंगडीचे निसंतान व्हावे, अशी शपथ मी तुझ्यापाशी घेत आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तुम्ही हा लहानमोठेपणाचा ताठा सोडून द्यावा. ४

१०८४ नाहीं तुझे उगा पडत गळां । पुढें गोपाळा जाऊं नको ॥ १ ॥
चाहाड तुझे दाविन घरीं । बोलण्या उरी नाहीं ऐसी ॥ २ ॥
तुम्हां आम्हां पडदा होता । सरला आतां सरोबरी ॥ ३ ॥
तुका म्हणे उरती गोठी । पडिली मिठी न सुटे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– उगा–उगाच, सरोबरी–बरोबरी, गोठी–हकीगत, गोष्टी.

अर्थ :– देवा, गोपाळा, माझी घोंगडी तू घेतलीस, तेव्हा मी काही उगाचच गळ्यात पडलो म्हणून नव्हे. गोपाळा, तू तसाच जाऊ नकोस १ तुझ्या बोलण्यात काहीच ताळतंत्र नाही असे तुझ्या घरी जाऊन सांगणारे चहाडखोर मित्र मी तुला दाखवीन. २ आतापर्यंत तुमच्याआमच्यांत मर्यादेचा व भेदाचा पडदा होता, तो आता संपला. आता तुझीआमची बरोबरी झाली आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, आता त्या भेदाच्या नुसत्या गोष्टीच उरतील. आता तुमच्या पायाशी जी मिठी पडली आहे, ती काही सुटणार नाही. ४

१०८५ तुम्हां आम्हां उरी तोंवरी । जनाचारी ऐसें तैसी ॥ १ ॥
माझें घोंगडें टाकुन देईं । एके ठायीं मग असों ॥ २ ॥
विरोधानें पडे तुटी । कपट पोटीं नसावें ॥ ३ ॥
तुका म्हणे तूं जाणता हरी । मज चेव्हारीं बोलविसी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– जनाचारी–लोकव्यवहार, लोकाचार.

अर्थ :– तुमच्यात व आमच्यात जोपर्यंत भेद आहे, मर्यादा आहे, तोपर्यंतच लोकव्यवहार असा तसाच राहणार. १ देवा, माझे घोंगडे टाकून द्या ना. मग तुम्ही व आम्ही एकाच ठिकाणी असू. २ आपापसांत विरोध

[1] मांडवा.

सौजन्य असून यासाठी त्याचा उपयोग आपणास मोठाच आहे म्हणून काही त्याला आपल्या पदरात बाधून घता येत नाही २ तुकाराम महाराज म्हणतात, विंचू व सर्प ही नारायणाची रूपे, परतु त्याना न शिवता दुरूनच वदन करावे ३

१०७९ भूत भविष्य कळो यावे वर्तमान । हे तो भाग्यहीन त्याची जोडी ॥ १ ॥
आम्ही विष्णुदासीं देव ध्यावा चित्तें । होणार तें होतें प्रारब्धें ॥ २ ॥
जगरूढीसाटी घातले दुकान । जातो नारायण अतरोनि ॥ ३ ॥
तुका म्हणे हा हो प्रपच गाढा । थोरली ते पीडा रिद्धिसिद्धी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – जोडी–प्राप्ती

अर्थ – आपणास भूतकाळातील व भविष्यकाळातील वर्तमान समजावे म्हणून पुष्कळ लोकाची खटपट असते पण या ज्ञानाची प्राप्ती ही भाग्यहीन माणसास होते म्हणजे ही प्राप्ती काही विशेष भाग्याची नव्हे १ आम्ही विष्णुदासानी मात्र निरतर या देवाचेच चिंतन मनात करावे व जे प्रारब्धानुसार असेल ते भोगावे २ केवळ जगरूढीसाठीच भूतभविष्य समजणाऱ्या लोकानी दुकान घालून धदा सुरू केलेला आहे पण त्यामुळे परमेश्वराचे पाय अतरून जातात ना ३ तुकाराम महाराज म्हणतात, हा प्रपच मोठा गहन असून त्यात, रिद्धीसिद्धींची पीडाही फार मोठी असते ४

## घोंगड्याचे अभंग– १२

१०८० ठकिले काळा मारिली दडी । दिली कुडी टाकोनिया ॥ १ ॥
पाघुरलों बहु काळें । घोगडें बळें साडवलें ॥ २ ॥
नये ऐसा लाग वरी । परते दुरी लपालें ॥ ३ ॥
तुका म्हणे आड सेवा । लाविला हेवा धावली ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – ठकिले–फसविले, कुडी–देह लाग–लाभ, हेवा–हाव

अर्थ – मी काळाला फसवून दडी देऊन लपून राहिलो देहभावाची वृत्तीही टाकून दिली १ पुष्कळ दिवसपर्यंत मी हे काळे घोंगडे पाघरले होते, ते मुद्दामच टाकून दिले आहे २ आता त्या काळास कसलाही लाभ होणार नाही, अशा दूरच्या ठिकाणी जाऊन मी लपले आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, बाह्य सेवा करण्याची माझी वरवरची हाव होती, तिची आडकाठी मी या प्रकाराने झटपट दूर केली ४

१०८१ घोगडियाचा पालट केला । मुलामुला आपुल्यात ॥ १ ॥
कान्होबा तो मीच दिसे । लाविलें पिसें सवगडिया ॥ २ ॥
तो बोले मी उगाच बैसे । आनारिसे न दिसे ॥ ३ ॥
तुका म्हणे दिलें सोंग । नेदी व्यग जाऊ देऊ ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – पिसे–वेड, आनारिसे–वेगळेपणा

अर्थ – खेळताना या गोपाळाच्या मुलानी आपल्या घोंगड्याची अदलाबदल केली. १ प्रत्येकजणाने कान्होबा मीच, असे सोंग घेऊन इतर सोबत्याना बतावणी केली २ तो बोलतो व मी उगाच बसतो असे असले तरी, त्याच्यात व आमच्यात वेगळेपणा नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, या श्रीहरीने हे जे सोंग त्याना दिले आहे, ते काहीं व्यर्थ वाया जात नाही ४

१०८२ खेळों लागलों सुरकवडी । माझी घोंगडी हारपली ॥ १ ॥
कान्होबाचे पडिलों गळां । घेईं गोपाळा देईं झाडा ॥ २ ॥
मी तों हागे उघडा जालों । अवघ्या आलों बाहेरी ॥ ३ ॥
तुका म्हणे बुद्धि काची । नाहीं ठायींची मजपाशी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – हारपली–हरवून गेली, काची–खोटी.

अर्थ :– देवा, सुरकवडीचा खेळ मी खेळू लागलो, तेव्हा माझ्या खांद्यावरची घोंगडी हरवून गेली. १ त्या वेळी मी कान्होबाच्या गळ्यात पडून म्हणालो की, गोपालकृष्णा, तू माझी झडती घे व तूही तुझ्या अंगाची झडती दे २ हा पाहा मी झडतीसाठी उघडा झालो आहे. सर्व उपाधी सोडून आलो आहे. सर्व वासनांतून मुक्त झालो आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, माझ्या जवळ माझी मूळचीच बुद्धी काही खोटी नाही. ४

१०८३ घोंगडियांची एकी राशी । त्याचपाशीं तें ही होतें ॥ १ ॥
माझियाचा माग दावा । केला गोवा उगवों द्या ॥ २ ॥
व्हावें ऐसें निसंतान । घेइन आन तुजपाशीं ॥ ३ ॥
तुका म्हणे लाहाण मोठा । सांडा[1] ताठा हा देवा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– गोवा–गुंतवणूक, उगवों द्या–सोडवा, आन–शपथ

अर्थ :– देवा, तुझ्याजवळ अनेक लोकांच्या घोंगड्याचे ढोगच्या ढीग होते. माझेही हे घोंगडे तेथेच होते. १ देवा, माझा मार्ग मला दाखवा ना. ज्या गुंत्यात माझी गुंतवणूक झाली आहे त्यातून माझी सुटका करावी २ माझ्या वासनांचे व देहरूपी घोंगडीचे निसंतान व्हावे, अशी शपथ मी तुझ्यापाशी घेत आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तुम्ही हा लहानमोठेपणाचा ताठा सोडून द्यावा ४

१०८४ नाहीं तुझे उगा पडत गळां । पुढें गोपाळा जाऊं नको ॥ १ ॥
चाहाड तुझे सांगिन घरीं । बोलण्या उरी नाहीं ऐसी ॥ २ ॥
तुम्हां आम्हां पडदा होता । सरला आतां सरोबरी ॥ ३ ॥
तुका म्हणे उरती गोठी । पडिली मिठी न सुटे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– उगा–उगाच, सरोबरी–बरोबरी, गोठी–हकीगत, गोष्टी

अर्थ :– देवा, गोपाळा, माझी घोंगडी तू घेतलीस, तेव्हा मी काही उगाचच गळ्यात पडलो म्हणून नव्हे. गोपाळा, तू तसाच जाऊ नकोस १ तुझ्या बोलण्यात काहीच ताळतंत्र नाही असे तुझ्या घरी जाऊन सांगणारे चहाडखोर मित्र मी तुला दाखवीन. २ आतापर्यंत तुमच्याआमच्यात मर्यादेचा व भेदाचा पडदा होता, तो आता संपला. आता तुम्हीआमची बरोबरी झाली आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, आता त्या भेदाच्या नुसत्या गोष्टीच उरतील. आता तुमच्या पायाशी जी मिठी पडली आहे, ती काही सुटणार नाही. ४

१०८५ तुम्हां आम्हां उरी तोंवरी । जनाचारी ऐसे तैसी ॥ १ ॥
माझें घोंगडें टाकुन देईं । एके ठायीं मग असों ॥ २ ॥
विरोधानें पडे तुटी । कपट पोटीं नसावें ॥ ३ ॥
तुका म्हणे तूं जाणता हरी । मज वेव्हारी बोलविसी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – जनाचारी–लोकव्यवहार, लोकाचार

अर्थ – तुमच्यात व आमच्यात जोपर्यंत भेद आहे, मर्यादा आहे, तोपर्यंतच लोकव्यवहार असा तसाच राहणार. १ देवा, माझे घोंगडे टाकून द्या ना मग तुम्ही व आम्ही एकाच ठिकाणी असू. २ आपापसांत विरोध

१ माडवा.

वाढला म्हणजे विनाकारण अंतर निर्माण होते, म्हणून देवा, पोटात कधी कपट ठेवू नये. ३ तुकाराम महाराज म्हणतात, श्रीहरी, तू स्वत जाणता आहेस पण मला मात्र व्यवहारातील बोलणे करायला उगाच लावतोस ४

१०८६ मुळींचा तुम्हा लागला चाळा । तो गोपाळा न सडा ॥ १ ॥
घ्यावे त्याचे देणेचि नाहीं । येचि वाहीं देखतसो ॥ २ ॥
माझी तरी घोंगडी मोठी । गांडीची लंगोटी सोडिस ना ॥ ३ ॥
तुका म्हणे म्या सांडिली आशा । हुगिला फासा येथुनिया ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – वाहीं–प्रवाह, आघ, रीत

अर्थ – देवा, तुम्हांला मूळचीच सवय लागली आहे, ती काही तुम्ही सोडीत नाही. १ ज्याचे तुम्ही एकदा घेता, ते कधी परत देतच नाही हाच प्रवाह तुमच्या येथील मी पाहात आहे २ तू माझी भली मोठी घोंगडी घेतलीस तेवढी, पण स्वत ची लंगोटीसुद्धा देत नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, मी तर आता आशाच सोडली आहे अशा प्रकारचा पाश मी हुगून टाकून दिलेला आहे ४

१०८७ घोंगडियास घातली मिठी । न सोडी साटी केली जीवें ॥ १ ॥
हा गे चोर धरा धावा कोणी । घरात राहाटे चहू कोणी ॥ २ ॥
नोळखवे म्या धरिला हातीं । देहा दीप माय लाविली वाती ॥ ३ ॥
न पावे धांवणे मारितो हाका । जनाचारीं तुका नागवला ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – साटी केली–सोडून दिला, राहाटे–फिरता आहे

अर्थ – या देवाने माझ्या घोंगड्यासच मिठी मारली आहे हो जीव गेला माझा तरी तो आता सोडणार नाही १ लोकहो, हा एक चोरच माझ्या घरात शिरून चारही कोपऱ्यातून फिरतो आहे धावा हो धावा याला कुणी तरी धरा हो २ मी माझ्या देहाचा दीप मायची वात करून प्रकाशित केला आहे, तरी मी त्याला काही ओळखू शकत नाही त्याला हातात मात्र पकडून ठेविले आहे ३ हा तुकाराम यामुळे लोकव्यवहारदृष्टीने नागवला जात असून, रक्षणासाठी लोकाना हाक मारीत असून त्याच्या मदतीसाठी कुणीही धावून येत नाहीत ४

१०८८ आता मी देवा पावरो काई । भिकेचे तेही उरेचि ना ॥ १ ॥
सदैव दुबळें नेणे चोर । देखोनि सुनाट फोडितो घर ॥ २ ॥
नाही मजपाशीं फुटकी फोडी । पाचांनीं घोंगडी दिली होती ॥ ३ ॥
तुका म्हणे जना वेगळें जाले । एकचि नेले एकल्याचे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – सदैव–सुदैवी श्रीमान, सुनाट–उघड फोडी–कवडी, सुपारीचे खांड, पाचांनी–पचमहाभूतानी

अर्थ – देवा, आता मी पावलू तरी काय रे ? एक घोंगडी मी भिक्षा मागून आणली होती, तीही तू नेलीस आता माझ्यापाशी काहीच उरले नाही १ चोर चोरी करताना श्रीमान, सुदैवी अथवा दरिद्री, दुबळा असा फरक कधीच करीत नाही घर उघडे पाहिले की तो फोडतो व चोरी करून निघून जातो तसेच माझे झाले २ माझ्या पाशी तसे पाहिले तर फुटकी कवडीसुद्धा नाही, मला तेवढीच एक पचमहाभूतानी देहरूपी घोंगडी दिली होती ३ तुकाराम महाराज म्हणतात, त्या एका परमेश्वराने माझी एकट्याची घोंगडी नेऊन मला लोकाचारातून वेगळे केले ४

१०८९ मी माझें करित होतो जतन । भीतरिल्या चोरें घेतलें[1] खानें ॥ १ ॥
मज आल्याविण आधींच होता । मज न कळता मज[2] माजी ॥ २ ॥

१ घतली खाण, २ मजमाजी

घोंगडें नेलें घोगडें नेलें । उघडें केलें उघडेंचि ॥ ३ ॥
तुका म्हणे चोरटाचि जाला साव । सहजचि न्याय नाहीं तेथें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – जतन–सांभाळ, सार्ने–चोरी करून, साव–प्रतिष्ठित

अर्थ – माझे पंचमहाभूतात्मक देहाचे घोंगडे मी चांगले जपून ठेविले होते त्याचा सांभाळ चांगला केला होता पण घरातल्या, हृदयामधील चोरानेच चोरी करून ते पळवून नेले १ मी येथे यायच्या आधीपासूनच तो इथे होता मला न कळताच तो माझ्याही हृदयात स्थान मिळवून बसला होता २ या देवाने माझे घोंगडे नेले हो, घोंगडे नेले हो त्याने मला आता उघडे केले आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, आणि नवल असे की, जो चोरटा होता, तोच आता प्रतिष्ठित होऊन बसला आहे या ठिकाणी न्याय राहिलेला नाही, हे सहजच दिसते. ४

१०९० घोंगडें नेलें सांगो मी कोणा । दुबळें माझें नाणीत मना ॥ १ ॥
पुढें तें मज न मिळे आता । जवळी सत्ता दाम नाहीं ॥ २ ॥
सेटे महाजन ऐका कोणी । घोंगडियाची करा शोधणी ॥ ३ ॥
घोंगडियाचा करा बोभाट । तुका म्हणे जंव भरला हाट ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा .– नाणीत–आणीत नाहीत, हाट–बाजार

अर्थ – माझे देहरूपी घोंगडे नेले हे आता मी सांगू तरी कुणास ? मी दुबळा असल्याने कुणीच माझ्याविषयी मनात आणीत नाहीत १ आता यापुढे ते घोंगडे मला परत मिळेल, अशी आशा दिसत नाही कारण माझ्याजवळ पैसा नाही, कसली सत्ता नाही २ अहो श्रीमान शेट सावकार, महाजन लोकहो, मासे कुणी तरी ऐका हो कुणी तरी माझ्या घोंगड्याचा शोध करा ना ३ तुकाराम महाराज म्हणतात, लौकिकाचा हा बाजार भरला आहे, तोपर्यंतच या माझ्या घोंगड्याचा बोभाटा करून शोध करा ना तुम्ही ४

१०९१ माझें घोंगडें पडिलें ठायीं । माग तया पायीं सांपडला ॥१ ॥
चोर तो भला चोर तो भला । पाठिसी घातला पुंडलिकें ॥ २ ॥
चोर कुठोरि एकेचि ठायीं । वेगळें पाहावे न लगे काही ॥ ३ ॥
आणिकांचीं ही चोरलीं आधीं । माझें तयामधीं मेळविलें ॥ ४ ॥
आपल्या आपण शोधिलें तींहीं । करीन मी ही तेचि परी ॥ ५ ॥
तुका म्हणे माझें हितचि जालें । फाटकें जाउन धडकें आलें ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – मार्ग–शोध, कुठोरि–आश्रय देणारा कोठारी

अर्थ – एवढा बोभाटा झाल्यावर माझे देहरूपी घोंगडे आहे त्या ठिकाणीच पडले आहे असे माझ्या ध्यानात आले त्या विठ्ठलाच्या पायापासूनच मला याचा शोध लागला १ हा देव मोठाच चोर असून त्याला या पुंडलीकाने आपल्या पाठीशी घातले आहे २ त्यामुळे चोर व त्यास आश्रय देणारा कोठारी एकाच ठिकाणी आहेत दोघेजण एकत्र असल्याने त्यांना वेगळे पाहण्याची जरूरीच नाही ३ या चोराने माझ्याही आधी पुष्कळांची घोंगडी चोरली होती त्याच्यातच माझे घोंगडही मिसळून टाकले होते ४ ज्यांनी आपण होऊन शोध घेतला, त्यांना त्यांचे त्यांचे घोंगड मिळाले मीही त्यांच्याप्रमाणेच शोध करून माझे घोंगडे परत मिळविले ५ तुकाराम महाराज म्हणतात, यात माझा फायदाच झाला कारण सतरा ठिकाणी फाटके असलेले माझे गरिबाचे घोंगडे जाऊन चांगले ईश्वरी कृपेचे नवे घोंगडे मला मिळाले ६

विवरण – तुकाराम महाराजांचे हे घोंगड्याचे अभंग रूपकात्मक म्हणून प्रसिद्ध आहेत श्रीकृष्णाबरोबर रानात जाताना अनेक गोपाळ खांद्यावर कांबळ किंवा घोंगडे घेत असत त्यांचे अनेक खेळ वनात गाई चरू लागल्या की होत असत त्यामध्ये एकमेकांचे घोंगडे पळविणे, लपवून ठेवणे, असा थट्टेचाही प्रकार असे श्रीकृष्णाने आपले

घोगडे पळविले, ते पाहून गोपाळ गलगा करीत असत. श्रीमंत मुलाची घोगडी चांगली असून त्यामुळे सर्वांना त्याचा लोभ इतरांना वाटे याच घोगड्याच्या खेळातून पुढे रूपकात्मक अर्थ तयार झाला असावा श्रीकृष्ण घोगडे चोरून घेतो, म्हणजे पंचमहाभूतांचे बनलेले हे शरीर नाहीसे करतो देहभाव नष्ट करतो इंद्रियादींच्या वृत्तींतून तो आपणास मुक्त करतो हा देह म्हणजेच मी, अशी अहंकाराची भावना दूर करतो याच देहभावाला घोगडे म्हटले आहे पंचमहाभूतांचे बनलेले हे घोगडे केव्हा तरी सोडायचे, किंवा त्याच्या अंतर्यामी दमलेला त्याचा खराखुरा मालक ओळखायचा, अशी भाषा संतांच्या परिवारात रूढ झाली याही ठिकाणी तुकारामबुवांचे घोगडे गोपाळकृष्णाने चोरून नेले असाच बोभाटा आहे श्रीकृष्णाने देहभाव कमी केला, असा याचा अर्थ शेवटी घोगडे सापडले, पण ते पहिल्यापेक्षा कितीतरी पटींनी चांगले होते पहिले गरिबांचे सतरा ठिकाणी फाटलेले, किंवा ठिगळ लावलेले होते, तर आता हे नवे भरजरीच होते कारण आता त्याला ईश्वरी कृपेची ऊब लाभली होती

या घोगड्याच्या पाठीमागे आणखीही एक संकेत असावा वारकरी भक्तांना आजही खांद्यावर कांबळे किंवा घोगडे टाकणे आवडते श्रीकृष्ण खांद्यावर घोगडे किंवा कांबळे टाकून रानावनात गाईमागून जात असे, अशी कल्पना आहे तोच धागा येथेही परिपुष्ट झालेला आहे पंढरपूरच्या यात्रेच्या निमित्ताने आजही बाजारात पासोड्या व घोगड्या भरपूर प्रमाणात विकायला येतात पंढरपूरला आल्यावर विठ्ठलाचे दर्शन घेऊन घरी निघताना एखाद्या भाविकाने घोगडे विकत घेतले, तर त्यातील गरजेची व भावाची वृत्ती सहज समजून येण्यासारखी आहे ही प्रथा ज्ञानेश्वरांच्या काळापासून चालत आली असावी श्रीसोपानदेवांनी ' **घोंगडियां साठीं पंढरीये पेठीं । वैष्णवांची दाटी होती तेथें** ' या ओळीने सुरू होणारा एक सुंदर अभंग रूपकाचा म्हणून लिहिलेला आहे या घोंगड्याच्या बाजारात सोपानदेवांनी एक घोगडे घेतले व ते श्रीगुरूंच्या चरणी अर्पण केले ' **सोपान घोंगडी घडी केली । चरणीं राहिली निवृत्तीच्या** ' म्हणून त्यांनी म्हटले आहे सर्व देहभाव देवाच्या अथवा श्रीगुरूंच्या चरणी अर्पण करावा असाच भावार्थ याचा आहे

श्रीज्ञानेश्वरांचेही ' **घोंगडी** ' वर फार चांगले अभंग आहेत त्यांच्या तर घोंगड्यावर ब्रह्माचा गाडा असून ते त्यांना ' **रखुमादेविवरें विठ्ठलें दिधलें** ' असल्यामुळे ' **अमोलिक झालें मोलेविण** ' ज्ञानेश्वरांनीही पंढरीच्या घोंगड्यांच्या बाजाराचा उल्लेख केलेला आहे ' **घोंगडी घेऊनि हाटासि जावें । पंढरिये आहे वस्ती आम्हां** ' या बाजारात आपणास मिळालेले घोगडे कसले आहे ? ज्ञानदेवांनी वर्णन केले आहे ' **काळें ना सावळें धवळें ना पिवळें । घोंगडें निराळें लाधलों मी** ' इतकेच नव्हे तर तुकोबांना जशी ' **फाटकें जाऊन धडकें आलें** ' अशी प्रचीती आली तशीच ती ज्ञानेश्वरांनाही आली होती ' **मागील रगटें झाडिलें आतां । पंढरीनाथा चरणा जवळीं । नवें नवधड हाता आलें । दृष्टी पाहे तंव मन हारपलें । सहस्र फुलींवरी गोंडा थोरू । घडुतें दावी रखुमादेविवरू** ' असा त्यांनी या गोंडेवाल्या घोंगड्याचा उल्लेख केलेला आहे खरे म्हणजे हे घोगडे अद्वैत पंठेहून आणलेले असते हे ' **व्योमाकारें वेद प्रसिद्ध पाघुरवो** ' असे असते

या घोंगड्यावरून ईश्वर व भक्त यांचे ऐक्य प्रस्थापित व्हावे अशी ही एक कल्पना आहे ईश्वर मोठा व मी भक्त लहान, पण दोघांचे घोगडे एकच, अशी भाषा ज्ञानेश्वरांनी वापरलेली आहे ' **तू माझा स्वामी मी तुझा रंक । पाहतां न दिसे वेगळिक ॥ मी तूं पण जाऊं दे दुरी । एकचि घोंगडें पांघरूं हरी** ' असे ज्ञानेश्वरांनी म्हटले आहे कधी श्रीकृष्णाची घोगडी चांगली व आपली मात्र वाईट का ? अशी गमतीची तक्रारही आहे ' **कान्होबा तुझी घोंगडी चांगली । आम्हांसी कां दिली वाईट** ? ' अशी विचारणा एका गोपाळाने केलेली आहे

१०९२ **सर्प भुलोन गुंतला नादा । गारुडियें फांदा घातलासे ।**
**हिंडवुनि पोट भरी दारोदारीं । कोंडुनि पेटारी असेरया ॥ १ ॥**
**तैसी परी मज जाली पांडुरंगा । गुंतलों तो मी गा सोडीं आतां ॥**
**माझें मज कांहीं न चलेसें जालें । कृपा तुज न करितां ॥ २ ॥**

आविसें मीन लावियला गळीं । भक्ष तो गिळी म्हणउनियां ।
काढूनि बाहेरी प्राण घेऊं पाहे । तेथे बापमाये कवण रया ।। ३ ।।
पक्षी पिलयां पातलें आशा । देखोनियां फांसा गुंते वळें ।
मरण नेणें मायां धांवोनि वोसरे । जीवित्व ना जालें बाळें ।। ४ ।।
गोडपणें मासी गुंतली लिगाडी । सांपडे फडफडी अधिकाअधिक ।
तुका म्हणे प्राण घेतला आशा । पंढरीनिवासा धांव घालीं ।। ५ ।।

शब्दार्थ व टीपा :– फांदा–पाश, परी–अवस्था, आविसे–आमिषाने, रया–रक्षण.

अर्थ :– गारुड्याची पुंगी वाजत असताना सर्प त्या नादास मुलला. त्याच वेळी त्या गारुड्याने त्याच्यावर पाश टाकून त्याला पकडले. सर्पास पेटाऱ्यात कोंडून दारोदारी तो हिंडतो व आपले पोट कसे तरी भरतो. काय त्या सर्पाची किंमत असते ? १ पांडुरंगा, माझीही अशीच अवस्था झाली आहे. मीही आता या संसारपाशात गुंतून गेलो आहे. मला आता त्यातून तू सोडीव. तू जर कृपा केली नाहीस, तर माझे काहीच चालणार नाही. अशी स्थिती झाली आहे. २ मासे धरणाऱ्या कोळ्याने मासे पकडण्यासाठी गळाच्या टोकास एक लहान मासा आमिष म्हणून लाविला. पाण्यातील माशाने ते चांगले भक्ष्य म्हणून तोंडात धरण्याचा प्रयत्न केला व त्यातच तो सापडला. मग कोळ्याने त्या माशास बाहेर काढून त्याचा प्राणच घेण्यास सुरुवात केली. तेथे त्याचे रक्षण करणारे कोण आईबाप आहेत ? ३ घरट्यात असणाऱ्या आपल्या लहान लहान पिलांना पारध्याने पाशात पकडले आहे, असे मोठ्या आशेने आलेल्या त्यांच्या आईबाप पक्ष्यांनी पाहिले. मग त्यांनी मरणाची फिकीर न करिता मायेने, पिलांवरील प्रेमाने त्यांनी त्या जाळ्यात उडी घेतली. त्यामुळे त्यांची मुलेही वाचली नाहीत व त्यांचे जीवनही संपले. तेही पारध्याच्या हाती पिलांसहित सापडले. ४ गुळचट असणाऱ्या पदार्थावर माशी भुलली व तेथेच गुंतून राहिली. निसटण्यासाठी तिने आणखी फडफड केली, तो ती अधिकच चिकटून राहिली. तुकाराम महाराज म्हणतात, देवा, ही अशी आशा माझाही प्राण घेऊ पाहात आहे. पंढरीनिवासा, पांडुरंगा, तू आता माझ्यासाठी धावत ये. ५

१०९३ यातिहीन मज काय तो अभिमान । मानी तुज जन नारायणा ।। १ ।।
काय सुख मज तयाची हे खंती । आपुलाला घेती गुणभाव ।। २ ।।
द्रव्यामुळें माथां वाहियेली चिंधी । होन जयामधीं होता गांठी ।। ३ ।।
तुका म्हणे जन वंदितो वेगळा । मजसी दुर्बळा काय चाड ।। ४ ।।

शब्दार्थ व टीपा :– यातिहीन–हीन जातीचा, होन–द्रव्य, चाड–इच्छा.

अर्थ :– देवा, मी तर हीन जातीचा असल्याने मला कसला आला आहे अभिमान ? नारायणा, तुम्हास मात्र सर्व लोक मानतात. १ मला मान नाही, याची कसलीच चिंता वाटत नाही. कसलेच सुखदु:ख नाही. जो तो आपल्या गुणांप्रमाणे मान सन्मान होतील. २ एखाद्या चिंधीत जर द्रव्य बांधले असेल, तर ती चिंधी त्या द्रव्यासाठी मस्तकावर धारण केली जाते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, लोक ज्याला वंदन करतात, मानसन्मान देतात, तो निराळाच आहे. मला दुबळ्याला मानाची काहीच चिंता नाही, इच्छा नाही. ४

१०९४ शीतळ साउली आमुची माउली । विठाई वोळली प्रेमपान्हा ।। १ ।।
जाऊनि वोसंगा रिघेन चोरस । लागलें तें इच्छे पीइन वरी ।। २ ।।
कृपा तनु माझी सांभाळी दुभूनि । अमृतजीवनीं लोटलीसे ।। ३ ।।
आनंदाचा ठाव नाहीं माझे चित्तीं । सागर तो किती उपमेसी ।। ४ ।।

सैर जाये पडे तयेसी साकडें । साभाळीत पुढें मागें आस[1] ॥ ५ ॥
तुका म्हणे चिंता कैसी ते मी नेणे । लडिवाळ तान्हे विठाईचे ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – वोळली–देत राहिली, वोसगा–वासेस, वोरस–स्ने[illegible]पान्हा, तनु–शरीर, सैर–हवा तसा, वावडा तिरडा

अर्थ – ही आमची विठाई माउली शीतळ अशा छायेप्रमाणे असून ती प्रेमाचा पान्हा देत राहिलेली आहे १ मी तिच्या कासेत तोंड खुपसून इच्छेस येईल त्याप्रमाणे मी तिच्या प्रेमाचा पान्हा चाखीन, इच्छेस येईल तितके तिचे कृपामृत पीत राहीन २ ही विठाई माउली मोठ्या कृपेने दुधाचा पान्हा सोडून माझ्या शरीराचा साभाळ करिते तिच्यामुळे अमृताची सजीवनीच निर्माण झालेली आहे ३ या कृपेमुळे माझ्या चित्तात आनदास एवढे भरते आले आहे की, आणखी आनदाला आता स्थानच उरलेले नाही या आनदाच्या उधाणास सागराचीमु ा उपमा कशी पुरी पडेल ? ४ मी जर वेडावाकडा चालू लागलो तर, या आईसच त्याचे सकट पडते माझ्या मागेपुढे राहून ती माझे रक्षण एकसारखे करीत असते ५ तुकाराम महाराज म्हणतात, यामुळे मला चिंता कशी माहीत नाही मी या विठाई माउलीचे लडिवाळ असे तान्हे मूलच आहे ६

## रामचरित्र—अभंग १४

१०९५ रामा वनवास । तेणे वसे[2] सर्व देश ॥ १ ॥
केले नामाचे जतन । समर्थ तो नव्हे भिन्न ॥ २ ॥
वनातरीं रडे । ऐसे पुराणीं पवाडे ॥ ३ ॥
तुका म्हणे ऋषिनेम । ऐसा कळोनि का भ्रम ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – ऋषिनेम–वाल्मीकी ऋषींनी सागितल्याप्रमाण

अर्थ – श्रीरामचद्राना वनवास घडला म्हणूनच दडकारण्यात वसती वाढण्यास मदत झाली १ रामचद्रानी आपल्या नावाचे सार्थक केले त्याच्याखेरीज समर्थपणा असा स्वतत्र नाही २ स्वत ची पत्नी सीतादेवी हिला रावणाने नेल्यावर शोकाने व्याकुळ होऊन रामप्रभूही शोकाने वनात रडत होते, असे पुराणानी वर्णन केले आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, वाल्मीकी ऋषींनी जसे लिहून ठविले होते, तसेच रामचद्राचे वर्तन झाले असे समजत असूनही तुमच्या मनात सभ्रम कशासाठी आहे ? ४

१०९६ राम म्हणे ग्रासोग्रासी । तोचि जेविला उपवासी ॥ १ ॥
धन्य धन्य ते शरीर । तीर्थांव्रताचे माहेर ॥ २ ॥
राम म्हणे करिता धदा । सुखसमाधि त्या सदा ॥ ३ ॥
राम म्हणे वाट चाली । यज्ञ पाउलापाउली ॥ ४ ॥
राम म्हणे भोगीं त्यागी । कर्म न लिपे त्या अगीं ॥ ५ ॥
ऐसा राम जपे नित्य । तुका म्हणे जीवन्मुक्त ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – ग्रासोग्रासीं–प्रत्येक घास घताना

अर्थ – जेवताना प्रत्येक घासाच्या वेळी रामनाम जर घेतले तर, त्याला उपवासाचेच पुण्य लाभते १ त्याच्या शरीरास तीर्थाचे व व्रताचे माहेरघर होण्याचे भाग्य लाभते, तो धन्यधन्य होय २ रोजचा व्यवसाय करीत असताना राम राम असे नाम जर आपल्या मुखामधून येत राहिले तर समाधीचेच सुख आपणास मिळेल ३ वाटचाल करताना प्रत्येक पावलागणिक रामाचे नाम उच्चारिले तर, यज्ञयाग केल्याचे श्रेय मिळेल ४ कोणत्याही

१ अस, २ असे

भोगाच्या अथवा त्यागाच्या वेळी रामनाम जर मुखात असले, तर ते कर्म आपल्या अंगी लागणार नाही आपण त्यापासून निर्लेप राहू. ५ अशा प्रकारे जो रोज रामनामाचा सतत जप करीत असतो, त्यास तुकाराम महाराज जीवन्मुक्तच म्हणतात ६

१०९७ तारी ऐसे जड । उदकावरी जो दगड ॥ १ ॥
तो हा न करी तें काई । का रे लीन नव्हां[1] पायीं ॥ २ ॥
सीळा मनुष्य जाली । ज्याच्या चरणाचे चाली ॥ ३ ॥
वानरा हातीं लंका । घेवविली म्हणे तुका ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – उदकावरी-पाण्यावर, सीळा–दगड

अर्थ – या रामाचे महत्त्व असे आहे की, याच्या नावाचे जड जड दगडही पाण्यावर सेतुबंधनाच्या वेळी तरले १ असा हा रामप्रभू करणार नाही असे काय आहे ? त्याच्या पायांवर तुम्ही लीन का हो होत नाही ? २ याच रामाच्या पायाच्या स्पर्शाने अहल्या शिळा होऊन पडली होती, ती परत मनुष्यरूपास आली. ३ याच रामचंद्राने वानराच्या साह्याने सबंध लंकेचे राज्य रावणापासून हिरावून घेतले व सीतेची मुक्तता केली ४

विवरण:– श्रीरामचंद्राच्या पावन व उद्बोधक चरित्रातील काही कथांचा उल्लेख तुकोबांनी रामचरित्रपर अभंगातून केलेला आहे सेतुबंधनास, रावणाशी लढण्यात वानरांचे साहाय्य रामचंद्रांना विशेष झाले असल्याचे प्रसिद्ध आहे रामचंद्र वनवासास निघाल्यानंतर ज्या अनेक घटना झाल्या, त्यात अहल्येच्या उद्धाराची घटना महत्त्वाची होती. रामाच्या चरणस्पर्शाने शिळा होऊन पडलेली, फत्तराप्रमाणे निर्विकार झालेली, अहल्या मनुष्य झाली, माणसात आली, अशी कथा आहे अहल्या ही गौतम ऋषींची पत्नी ब्रह्मदेवाने ही आपली मानसकन्या गौतमास अर्पण केली इंद्र, अग्नी वरुण इत्यादिकांचेही प्रेम हिच्यावर होते, इंद्राने गौतमाचे रूप धारण करून अहल्येचे पातिव्रत्य भंग करण्याचा प्रयत्न केला गौतमास हे समजल्याने त्याने इंद्रास व अहल्येस दोघानाही शाप दिले अहल्या शिळा होऊन पडेल असा, गौतमाचा शाप होता व प्रभू रामचंद्र जेव्हा वनात येतील, तेव्हा अहल्येचा उद्धार होईल असाही उःशाप तिला मिळाला होता या संकेतानुसार प्रभू रामचंद्रांनी आपल्या पदस्पर्शाने शापित अहल्येचा उद्धार करून तिला मुक्त केले.

१०९८ राम म्हणता रामचि होइजे । पदीं बैसोन पदवी[2] घेइजे ॥ १ ॥
ऐसे सुख वचनीं आहे । विश्वासे अनुभव पाहें ॥ २ ॥
रामरसाचिया चवी । आन रस रुचती केवीं ॥ ३ ॥
तुका म्हणे चाखोनि सांगें । मज अनुभव आहे अंगें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– आन–दुसऱ्या

अर्थ :– या रामनामाचे माहात्म्य असे आहे की, जो कुणी त्याचा जप करितो तो स्वतःच रामरूप होऊन जातो. १असे अलौकिक सुख रामनामाच्या जपात आहे विश्वास ठेवून अनुभव घेऊन पाहा तुम्ही २ एवढा रामनामाच्या रसयत्तेची चव मिळाली की, मग दुसऱ्या चवींची आवडच संपून जाते ३ तुकाराम महाराज म्हणतात, ही रामनामाची चव मी स्वतः चाखून पाहिली आहे मला स्वतःला जो अनुभव आला आहे, तोच मी तुम्हांस सांगत आहे ४

१०९९ रामराम उत्तम अक्षरें । कंठीं धरिलीं आपण शंकरें ॥ १ ॥
कैसीं तारक उत्तम तिहीं लोकां । हळाहळ शीतळ केलें शिवा देखा ॥ २ ॥
हाचि मंत्र उपदेश भवानी । तिच्या चुकल्या गर्भादियोनि ॥ ३ ॥
जुनाट नागर नीच नवें । तुका म्हणे म्यां धरिलें जीवें भावें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– हळाहळ–हलाहल नावाचे उग्र विष, नीच–नित्य

१ व्हाना, पद पैविर्जे

तु गाथा. ६२

अर्थ :– राम राम ही अक्षरे फार सामर्थ्यवान व उत्तम असल्यामुळेच शिवशंकरांनी आपल्या कंठात धारण केली आहेत. १ ही अक्षरे उत्तम असून तीनही लोकांना तारणारी आहेत. शिवशंकराना विषप्राशनामुळे जो त्रास झाला, तो याच रामनामामुळे दूर झाला. त्यांच्या अंगाचा दाह रामनामामुळे थांबून शीतलता प्राप्त झाली. २ याच राममंत्राचा उपदेश शिवांनी पार्वतीस केलेला असल्यामुळे, तिच्या अनेक जन्मांचे, गर्भवासाचे दु:ख संपले. ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशी ही रामनामाची अक्षरे अत्यंत पुरातन असून पवित्र आहेत. शिवाय त्यांच्यात नित्य नवे चैतन्य आहे; म्हणूनच मी हे मनोभावे धारण केले आहे. ४

१९०० राम म्हणतां तरे जाणतां नेणतां । हो का यातिभलता कुळहीन ॥ १ ॥
राम म्हणतां न लगे आणीक सायास । केले महा दोष तेही जळती ॥ २ ॥
राम म्हणे तया जवळी नये भूत । कैंचा यमदूत म्हणतां राम ॥ ३ ॥
राम म्हणतां तरे भवसिंधुपार । चुके येरझार म्हणतां राम ॥ ४ ॥
तुका म्हणे हे सुखाचें साधन । सेवीं अमृतपान एका भावें ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– यातिभलता– भलत्या जातीचा, कोणत्याही जातीचा

अर्थ – रामनामाचा उच्चार करिताच जाणते, नेणते सर्वचजण तरून जातात. कोणत्याही जातीचा अथवा कुलहीन किंवा हीन कुळाचा असला तरी तो तरून जातो. १ रामनामाचा उच्चार करण्यास कसलाही त्रास पडत नाही. काही महादोष आपल्या हातून घडलेले असतील, तर तेही जळून नष्ट होतात. २ रामनामाचा जप जर कुणी करीत असतील, तर त्याना भूतपिशाचाची बाधाही कधी होत नसते. रामनामाचा उच्चार करीत असताना यमदूतांचेही काही चालत नाही. ३ रामनामाचा जप केल्यानतर संसारसागर सहज तरून जाता येतो. रामनामाच्या उच्चारामुळे जन्ममृत्यूंच्या खेपा चुकतात ४ तुकाराम महाराज म्हणतात, असे हे रामनाम सुखाचे एकमेव साधन असून एकनिष्ठ अशा भावाने या रामनामामृताचे सेवन सर्वांनी करावे. ५

११०१ पैल आला राम रावणासी सांगती । काय निदसुरा निजलासी भूपति ॥ १ ॥
अवघे लंकेमाजी जाले रामाचे दूत । व्यापिलें सर्वत्र बाहेरी भीतरी आंत ॥ २ ॥
अवघे अंगलग तुझे वधियेले वीर । होईं शरणागत किंवा युद्धासी सादर ॥ ३ ॥
तुका म्हणे एक्या भावें रामेसी भेटी । करूनि घेईं आता संबंधेसी तुटी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – निदसुरा–अर्धवट झोपलेल्या, अज्ञानी, भूपती–रावण, अंगलग–जवळचे.

अर्थ :– रावणाचे दूत त्याला सांगू लागले, रामराय पलीकडेच येऊन उभे आहेत. अरे अर्धवट झोपलेल्या अज्ञानी राजा रावणा, झोपून काय राहतोस? ऊठ ना. १ या सर्व लंकेत जिकडे तिकडे रामाचेच दूत पसरून राहिलेले दिसतात. यांनीच सर्व लंका आतून बाहेरून व्यापलेली दिसते. २ तुझ्या जवळ कित्येक मोठे मोठे वीर पुरुष युद्धात मरण पावले आहेत तू त्या रामचंद्रास त्वरित शरण तरी जा, किंवा त्याच्याशी युद्धास तरी तयार हो. ३ तुकाराम महाराज म्हणतात, या दोन मार्गांपैकी एक असा की, एकचित्ताने तू रामाचीच भेट घ्यावीस व आपला लौकिक प्रपंचाचा व ऐहिकाचा संबंध तोडून टाकावास. ४

११०२ समरंगणा आला । रामें रावण देखिला ॥ १ ॥
कैसे मोडतील दोन्ही । नांव सारुनियां रणीं ॥ २ ॥
प्रेमसुखाचे संधान । बाणें निवारती बाण ॥ ३ ॥
तुकयास्वामी रघुनाथ । वर्म जाणोनि केली मात ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– समरंगणा–रणभूमीवर.

अर्थ – रावण रणभूमीवर येऊन उभा राहिल्याचे प्रभू रामचंद्रांनी पाहिले १ या रणांगणावर आता आपापली नावे विसरून हे दोघे एकमेकांना भिडतील २ परस्परांविषयी असणाऱ्या प्रेमसंबंधाच्या अनुसंधानामुळे हे एकमेकांचे बाण निवारण करतील ३ तुकाराम महाराज म्हणतात, या रघुनाथाने रहस्य जाणून फार मोठा पराक्रम केला ४

११०३ केला रावणाचा वध । अवघा तोडिला संबंध ॥ १ ॥
लंकाराज्यें बिभीषणा । केली चिरकाळ स्थापना ॥ २ ॥
औदार्याची सीमा । काय वर्णू रघुरामा ॥ ३ ॥
तुका म्हणे माझा दाता । रामें सोडविली सीता ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – चिरकाल–कायमची, दीर्घ कालपर्यंत

अर्थ – या रामप्रभूने मदमत्त रावणाचा वध केला व त्याच्या पूर्वकर्मांच्या संबंधापासून त्याला मुक्त केले १ नंतर लंकेचे राज्य रामचंद्राने बिभीषणाला दिले त्या राज्यावर त्याची दीर्घकाळपर्यंत स्थापना केली २ या रामचंद्राच्या औदार्याची सीमा मी काय वर्णन करावी ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, असा हा माझा दाता प्रभू रामचंद्र असून, त्याने सीतेची रावणाच्या बंदिवासातून मुक्तता केली ४

११०४ रामरूप केली । रामें कौसल्या माउली ॥ १ ॥
राम राहिला मानसीं । ध्यानीं चिंतनीं जयासी ।
राम होय त्यासी । संदेह नाहीं हा भरवसा ॥ २ ॥
अयोध्येचे लोक । राम जाले सकळीक ॥ ३ ॥
स्मरता जानकी । रामरूप जाले कपि ॥ ४ ॥
रावणेंसी लंका । राम आपण जाला देखा ॥ ५ ॥
ऐसा नित्य राम ध्याय । तुका वंदी त्याचे पाय ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – कपी–वानर

अर्थ – आयोध्येस परत आल्यावर रामप्रभूंनी आपल्या कौसल्या मातेस रामरूप करून टाकले १ ज्याच्या मनात सतत रामनाम आहे, ज्याच्या चिंतनात सतत रामनाम आहे, तो रामरूपासच जाऊन पोचेल, याविषयी कुणीही संदेह धरू नये २ आयोध्येमधील सर्व प्रजाच रामरूप होऊन गेली ३ सीतादेवींचे व रामचंद्राचे स्मरण करता करता सर्व वानरही रामरूप होऊन गेले ४ रावणाच्या लंकेतील सर्व राक्षसानाही, या रामाचीच मोती एकसारखी असल्यामुळे तेही रामरूपच बनून गेले ५ अशा प्रकारे नित्य जो रामनामाचे स्मरण करितो, त्याचे पायावर तुकाराम महाराज डोके ठेवितात ६

११०५ आनंदले लोक नरनारी परिवार । शंखभेरीतुरें वाद्यांचे गजर ॥ १ ॥
आनंद जाला अयोध्येसी आले रघुनाथ । अवघा जयजयकार आळंगिला भरत ॥ २ ॥
करिती अक्षवाणें ओवाळिती रघुवीरा । लक्ष्मीसहित लक्ष्मण दुसरा ॥ ३ ॥
जाले रामराज्य आनंदलीं सकळें । तुका म्हणे गाईवत्सें नरनारीबाळें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – अक्षवाणें–दिव्याच्या आरतीने ओवाळण्याची मंगल क्रिया

अर्थ – रामचंद्र परत आयोध्येस आल्यानंतर सर्वत्र आनंदीआनंद झाला सर्व स्त्रीपुरुष नागरिक हर्षभरित होऊन गेले शंख, भेरी, तुताऱ्या यांच्या जयनादांचा गजर झाला १ रघुनाथ आयोध्येस आल्यामुळे अवघ्या

आयोध्येत आनंदीआनंद होऊन गेला. सर्वत्र जयजयकार झाला. प्रभू रामचंद्रानी बंधू भरताला प्रेमाने आलिंगन दिले २ आयोध्येच्या नारी, रामलक्ष्मण व सीतामाई याना प्रीतीने ओवाळून औक्षण करू लागल्या. ३ सर्वत्र रामराज्य झाल्यामुळे आनंदी आनंद पसरला. गाई, वत्से, स्त्री, पुरुष, मुले, सर्वांनाच आनंद झाला, असे तुकाराम महाराज म्हणतात. ४

११०६ जाले रामराज्य काय उणे आम्हांसी । घरणी धरी पीक[1] गाई वोळल्या म्हैसी ॥ १ ॥
राम वेळोवेळां आम्ही गाऊं ओवियें । दळिता कांडितां जेवितां गे बाइये ॥ २ ॥
स्वप्नीं ही दुःख कोणी न देखे डोळां । नामाच्या गजरें भय सुटले काळा ॥ ३ ॥
तुका म्हणे रामें सुख दिलें आपुलें । तयां गर्भवासी येणे जाणे खुंटलें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – वोळल्या–दूध देत्या झाल्या

अर्थ – आता रामाचे राज्य झाले असल्यावर मग आम्हास काय कमी आहे ? पृथ्वीवर उत्तमपैकी पीक वेळच्या वेळी येत राहिले. गाई म्हशी पुष्कळ दूध देत्या झाल्या १ आता या रामाचे ध्यान आम्ही आमच्या ओवीत रोज रोज गाऊ दळताना, कांडताना, जेवण करिताना, याच रामनामाचा जप आम्ही करीत राहू. २ स्वप्नातसुद्धा कुणासही दुःख दिसेनासे झाले. रामनामाच्या गजरामुळे प्रत्यक्ष यमासही भीतीने थरकाप सुटला. ३ तुकाराम महाराज म्हणतात, या रामचंद्रानी आपले स्वसुख सर्वांना दिले असल्याने, त्यांच्या गर्भवासाचे दुःखच संपले आहे, असे समजावे. जन्ममृत्यूच्या खेपा त्याना पडत नाहीत. ४

११०७ अहल्या जेणे तारिली रामें । गणिका परलोका नेली नामें ॥ १ ॥
रामहरे रघुराजहरे । रामहरे महाराजहरे ॥ २ ॥
कंठ शीतळ जपता शूळपाणी । राम जपता अविनाशभवानी ॥ ३ ॥
तारकमंत्रश्रवण काशी । नाम जपतां वाल्मीक ऋषि ॥ ४ ॥
नामजप बीजमंत्र नळा । सिंधु तरती ज्याच्या प्रतापें शिळा ॥ ५ ॥
नामजप जीवन मुनिजना । तुकयास्वामी रघुनंदना ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – शूळपाणी–ज्याच्या हातात शूल आहे असा शंकर, भवानी–पार्वती

अर्थ – या रामनामाचे महत्त्व किती मोठे आहे पाहा या रामनामामुळे अहल्येचा उद्धार झाला. गणिका याच नामामुळे उद्धरून गेली १ अशा या रामाच्या नावाचा, रामहरे रघुराजहरे असा जप एकसारखा करा ना. २ याच रामनामाचा जप केला, तेव्हा समुद्रमंथनाच्या वेळी निघालेल्या हलाहल विषामुळे ज्याच्या कंठाची आग होत होती, त्या महादेवाचा कंठ शीतल झाला याच रामनामाच्या जपामुळे पार्वतीदेवीसही अविनाशी पदाची प्राप्ती झाली. ३ काशीस राहून याच तारकमंत्राचा उच्चार केला असता, सर्वांचा उद्धार होतो. याच नामाचा जप वाल्मीकी ऋषींनी करून स्वतःस पावन करून घेतले. ४ नळ नावाच्या वानरास हाच एक नाममंत्र बीजमंत्र म्हणून मिळाला होता. याच रामनामाच्या सामर्थ्यामुळे समुद्रावर निर्जीव दगडसुद्धा तरले. ५ मुनिजनानाही याच रामनामामुळे जीवन कृतार्थ वाटते. या तुकयाचाही स्वामी हाच श्रीरघुनंदन आहे ६

११०८ मी तो अल्प मतिहीन । काय वर्णूं तुझे गुण ।
उदकीं तारिले पाषाण । हे महिमान नामाचे ॥ १ ॥
नाम चांगले चांगलें । माझे कंठीं राहो भले ।
कपिकुळ उद्धरिले । मुक्त केले राक्षसां ॥ २ ॥

[1] पिका

द्रोणागिरि कपिहातीं । आणविला सीतापती ।
थोर केली ख्याति । भरतभेटीसमयीं ॥ ३ ॥
शिळा होती मनुष्य जाली । थोर कीर्ति वाखाणिली ।
लंका दहन केली । हनुमंतें काशानें ॥ ४ ॥
राम जानकीजीवन । योगियांचें निजध्यान ।
राम राजीवलोचन । तुका चरण वंदितो ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– मतिहीन–बुद्धीहीन, राजीवलोचन–कमळाप्रमाणे डोळे असणारा.

अर्थ :– माझी बुद्धी तर अतिशय तोकडी आहे. रामराया, मी तुझे वर्णन काय करावे ? पाण्यामध्ये दगड तारण्याचे सामर्थ्य तुझ्या नामामध्ये आहे. १ रामचंद्रा, तुझे नाम अतिशय चांगले व पवित्र असल्याने ते नेहमी माझ्या मुखात राहो. या तुझ्या नामानेच सर्व वानरकुळांचा उद्धार झाला असून राक्षसांनाही तूच मुक्त केलेस. २ हनुमंतांच्या हातून द्रोणागिरी पर्वत आणण्याचे महत्कार्य रामचंद्रा, तुम्हीच करविले. भरतभेटीच्या वेळी तुम्ही मोठीच कीर्ती करून दाखविली. ३ गोतमाच्या शापाने दगड होऊन पडलेली अहल्या तुमच्याच प्रभावाने मनुष्यरूप झाली. अशी तुमची कीर्ती अतिशय थोर व वाखणण्यासारखी आहे. सर्व लंकेचे दहन रामचंद्रा, तुमच्याच बळावर हनुमंताने केले. ४ असा हा श्रेष्ठ रामचंद्र सीतादेवीचे जीवनच असून योगीजनाचे ध्यान आहे. या रामाचे डोळे कमळाप्रमाणे आहेत. हा तुकाराम त्याचे चरण मनापासून धरून ठेवीत आहे. ५

विवरण .–तुकाराम महाराजानी गाइलेल्या या रामचरित्राचे महत्त्व विशेष आहे. श्रीविठ्ठल हे दैवत वारकरी पंथीयांना व नामदेवतुकारामादी संताना अतिशय प्रिय आहे. हे श्रीकृष्णाचे म्हणजे विष्णूचेच रूप होय. रामचंद्र हाही विष्णूचाच अवतार होय. त्या दृष्टीने रामचंद्राचे न त्याच्या नामाचे माहात्म्य वारकरी संताना विशेष वाटणे स्वाभाविकच आहे. त्याच्या मंत्रात राम हेच नाम अगोदर आहे. 'राम कृष्ण हरि' या मंत्राची महिती मराठी साधुसंतानी व विठ्ठलभक्तानी अनेक प्रसंगी गाइलेली आहे. तुकोबानी या रामचरित्रपर अभंगातून रामाच्या जीवनातील महत्त्वाच्या घटनाचा उल्लेख केलेला आहे. वाल्मीकीच्या रामायणानंतर रामकथेवर इतरही कवीकडून जे अनेक संस्कार झाले, त्याचा प्रभाव तुकोबाच्या मनावर असावा असे दिसते. रामनामानी जड दगड पाण्यावर तरले, राम व रावण यांच्यात काही 'प्रेमसुखाचें संधान' असल्याने त्यानी एकमेकाचे बाण बाणानीच निवारण केले. प्रभू रामचंद्राकडूनच आपणास मृत्यू येऊन आपणास मुक्ती मिळावी अशा हेतूने, विरोधी भक्ती करूनच रावण रामचंद्राकडे आकर्षित झाला होता, वगैरे कल्पना पुढे भक्तीच्या क्षेत्रात बलवान ठरल्या. ऐतिहासिक वस्तुस्थितीच्या दृष्टीने रामकथा पाहण्यापेक्षा, भक्तिभावाच्या परिपुष्टतेसाठीच त्या चरित्रकथेचा उपयोग पुढे पुढे होत राहिला. अध्यात्मरामायणाचा प्रभाव भक्तिमार्गावर पुढच्या काळात विशेष रूपाने पडला असल्याचे स्पष्ट आहे

रावणाच्या वधानंतर रामचंद्रानी स्वतः लंकेवर राज्य केले नाही. बंधू लक्ष्मण याजकडून त्यानी रावणाचा बंधू बिभीषण याला राज्यावर बसविले ! हा भारतीय संस्कृतीचा एक आदर्श मानावयास हवा. कारण लंकेवर स्वारी ही अन्यायाच्या परिमार्जनार्थ होती. मदोन्मत्त रावणशक्तीचा नाश करण्यासाठी तो एक महान प्रयत्न होता. ऋषिमुनींचे यज्ञयाग सुरक्षित राहावेत व अबलांच्या शीलाचे रक्षण व्हावे, म्हणून ती एक योजना होती. स्वतःच्या लहरीसाठी या बडेजावासाठी साम्राज्यविस्तार करण्याची ती महत्त्वाकांक्षा नव्हती, की वेताल लालसा नव्हती. मानवी संस्कृतीच्या इतिहासात 'लंकाराज्यें बिभीषणा । केली चिरकाल स्थापना' हे एक लोकोत्तर व प्रगल्भ मनाचे कृत्य मानावे लागेल. तुकोबानी केलेल्या रामराज्याच्या सुखाच्या वर्णनासही रामायणात भरपूर आधार सापडण्यासारखा आहे.

अभंगक्रमांक ११०७ मध्ये तुकोबानी 'नामजप बीजमंत्र नळा' असा एक महत्त्वाचा उल्लेख केलेला आहे. यातील नळ हा प्रसिद्ध नळ राजा न मानिता रामाच्या सैन्यातील एका वानराचे नांव नल होते, हाच संदर्भ महत्त्वाचा

मानणे भाग आहे हवी ती वस्तू निर्माण करण्याची शक्ती याला वरप्रसादामुळे प्राप्त झालेली होती रामाच्या आज्ञेवरून यानेच सेतुबधाचे काम पूर्ण केले, म्हणून या सेतूस नलसेतू असेही नाव आहे या नलाने जान्हवी नदीत एका ब्राह्मणाचे अनेक शाल्ग्रिाम विसर्जन केले होते त्यावेळी त्या ब्राह्मणाने 'तुझ्या हातून पाण्यात दगड तरतील' असा वर त्याला दिला होता म्हणूनच याच्या हातून सेतू पूर्ण झाला

रामनाम हे बीजमत्राने उपयुक्त आहे मनातील सर्व कामना या नामजपामुळे सिद्धीस जातात, अशुभाचे निवारण होते, सकटाचा परिहार होतो, पातकाचा नाश होतो, प्रत्यक्ष यमास दरारा वाटतो, वगैरे रामनामजपाचे माहात्म्य सस्कृत, मराठी अशा ग्रथातून पुष्कळानी वर्णन केले आहे **'एकैकमक्षर पुसा महापातकनाशनम्'** एकएक अक्षर पापनाश करणारे आहे याचे वर्णन केले जाते अशा या रामनामाचा व रामजपाचा प्रभाव किती मोठा आहे, हे अनेक ग्रथातून व स्तोत्रातून प्रकट झालेले आहे रा या अक्षराचे रहस्य काय ? म या अक्षराचे रहस्य काय ? आकारातील अर्धचद्र व त्यावरील बिंदू यात 'राम ही अक्षरे कशी आहेत ? यासारख्या रहस्यमय वर्णनाचेही नमुने पुराणातून व उपासनापर वाड्मयातून पुष्कळ मिळतात 'श्रीराम' मधील श्री म्हणजे लक्ष्मी, राम म्हणजे आत्मा, जयजय म्हणजे ३६ या अकाचा बोध, ३६ म्हणजे छत्तीस तत्त्वानी युक्त असणारा हा देह, इत्यादी वर्णने मत्रशास्त्रास धरूनही पुष्कळानी केलेली आहेत

रामनामाचा मत्रशास्त्रदृष्ट्या जो काय अर्थ होत असेल, तो कितीही महत्त्वाचा असला तरी, भागवत धर्मीय सतानी त्याच्या जपाचे महत्त्व चित्तशुद्धीसाठी, स्वानुभवाच्या सुखासाठी, नामस्मरणाच्या आनदासाठी रामनामाच महत्त्व मान्य केले आहे याच हेतूने तुकोबानी **'रामनामाचे पोवाडे। अखड ज्याची वाचा पढे। धन्य तो एक ससारीं रामनाम जो उच्चारी'** ( अभग क्र ४४४१ ) अशा शब्दात रामनामाचे महत्त्व स्पष्ट केलले आहे मागे ४३२ क्रमाकाच्या अभगात **'रामनाम दोन्ही अक्षरें। सुलभ आणि सोपारें'** म्हणून जो उल्लेख केलेला आहे तोही याच सदर्भात महत्त्वाचा मानावा लागेल याच भूमिकेवरून साधुसतानी रामाचे व रामनामाचे महत्त्व मानले आहे तो विठ्ठलाहून वेगळा नाही त्याच्याच नावाशी रामनाम जोडून देऊन एकत्वाचाही बोध सहजासहजी देण्याचा प्रयत्न सताचा होता दैवत नामरूपानी भिन्न असले तरी, बोधाने, तत्त्वरूपाने त्याचे स्वरूप एकच होते याच दृष्टीने एक नाथानी 'भावार्थरामायण' सारखा ग्रथ लिहिलाच, 'श्रीरामनाममहिमा' असे एक स्वतत्र प्रकरण रामनामाच्या माहात्म्यासाठी लिहिलेले आहे त्यात **'सोपारे मत्र राम अक्षरें दोनी। जपता चुके आयणी चौयाशीची', 'सुख रामनामें अपार। शकर जाणे तोचि विचार', 'रामनाम उच्चार होटीं। ससाराशी होय तुटी', 'धन्य मत्र रामनाम। उच्चारिता होय सकाम', 'जपता रामनामावळी। महादोषा होय होळी'** यासारख्या अनेक ओळीतून एकनाथानी रामाचे माहात्म्यकथन केले आहे 'रामकृष्णहरि' याच एका बीजभूत मत्रात वारकरी पथीयाची सर्व साधना एकवटलेली आहे यातील मर्मही हेच होय की राम व कृष्ण हे एकच व त्याच्या नामजपाने नामस्मरणाने सर्व काही साध्य होते, अशी त्याची निष्ठा होती ईश्वरापेक्षाही त्याच्या नामाचा महिमा कित्येकदा सतानी मोठा मानलेला आहे

## श्लोकरूपी अभंग— ६

**११०९ तुजवाचुनी मागणे काय कोणा। महीमडळीं विश्वव्यापकजना।**
**जीवभावना पुरवू कोण जाणे। तुजवाचुनी होत का रावराणे॥ १॥**
**नसे मोक्षदाता तिहींमाजि लोका। भवतारकु तुजवाचुनि एका।**
**मनीं मानसीं चिंतिता रूपनाम। पळे पाप ताप भयें नास[1] काम॥ २॥**
**हरी नाम हे साच तूझें पुराणीं। हरीहातिचें काळगर्भादियोनी।**
**करू मुखवाणी कैसी देशधडी। तुजवाचुनि वाणिता व्यर्थ गोडी॥ ३॥**

१ नासे काम

भवभंजना व्यापका लोक तिन्ही । तुज वाणितां श्रमला शेषफणी ।
असो भावे जीव तुझ्या सर्व पायीं । तुजें मागणें आणीक व्यर्थ काई ॥ ४ ॥
दिनानाथ हे साक्ष तुझी जनासी । दिनें तारिलीं पातकी थोर दोषी ।
तुका राहिला पायिं तो राख देवा । असे मागतसे तुझी चरणसेवा ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– महीमंडळी–भूतलावर, रावराणे–श्रीमंत, भवतारकु–संसारसागरातून तारून नेणारा, हरी–दुःख हरण करणारे, भवभंजना–संसारभावनेचा नाश करणारा, शेषफणी–शेष नावाचा नाग.

अर्थ :– देवा, तुझ्याशिवाय इतर कुणास आम्ही काय मागावे ? विश्वाला व्यापून राहणाऱ्या देवा, या पृथ्वीवर तूच एक समर्थ असा आहेस. तुझ्यावाचून आम्हा जीवाच्या भावना कोण पुरवू शकणार रे देवा ? तुझ्याच कृपेने लोक श्रीमंत राजे वगैरे होतात १ या तीनही लोकात देवा, तुझ्याशिवाय मोक्ष देणारा कुणीही नाही. संसारातून तारणाराही तुजवाचून कुणीही नाही. तुझ्या नामाचे व रूपाचे मनात चिंतन केले म्हणजे पाप व ताप पळून जातात. तुझ्या भयाने कामादिक वृत्ती उरत नाहीत २ दुःख हरण करणारा म्हणून तुझे नाव हरी, असे जे पुराणांत वर्णन केले आहे ते खरेच आहे. काळाचा व गर्भादीयोनींतून होणाऱ्या जन्माचा सर्व कारभार या श्रीहरीच्या हातातच असतो. तुझ्या नामास न उच्चारिता देवा, ही माझी वाणी देशोधडीस कशी पाठवू ? तुझी थोडी जर तिने वर्णन केली नाही तर सर्वच व्यर्थ आहे. ३ संसारवृत्तीचा नाश करणारा असा तू असून तिन्ही लोकाना तू व्यापून राहिलेला आहेस तुझे वर्णन करताना शेष नावाचा नागही थकून गेला. हा माझा जीव सर्व भावानी तुझ्याच पायी देवा, अर्पण केला आहे. याशिवाय दुसरे काही मागणे व्यर्थपणे मी कशासाठी करावे ? ४ देवा, तू दीनानाथ आहेस, अशी साक्ष सर्व लोकाना पटलेली आहे. तू अनेक दीन, पातकी व दोषी असणाऱ्या लोकांचा उद्धार केला आहेस. देवा, हा तुकाराम तुझ्या पायी शरण आला आहे, त्याचेही रक्षण करावेस तू, तो तुझी चरणसेवा मागीत आहे ५

१११० उभा भींवरेच्या तिरीं राहिलाहे । असे सन्मुख दक्षिणे मूख वाहे ।
महापातकांसी पळ कांप थोर । कैसे गर्जती घोष हे नामवीर ॥ १ ॥
गुणगंभीर हा धीर हास्यमुख । वदे वदनीं अमृत सर्वसुख ।
लागले मुनिवरा हे गोड चित्तीं । देहभावना तुटलियासि खंती ॥ २ ॥
ठसा घातला ये भूमिमाजी थोर । इच्छादाना हा द्यावयासी उदार ।
जया वोळगती सिद्धि सर्वठायीं । तुझें नाम हे चांगले गे विठाई ॥ ३ ॥
असे उघडा हा विटेवरि उभा । कटसूत्र हे धरुनि भक्तिलोभा ।
पुढें वाट दावी भवसागराची । विठो माउली हे सिद्धसाधकांची ॥ ४ ॥
करावे गुहा धरा पंथ आधीं । जया पार नाहीं सुखा तेंच साधीं ।
म्हणे तुका पंढरीस सर्व आले । असे विश्व हे जीवनें त्याचि ज्यालें ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – भींवरेच्या–भिवरा नदीच्या काठावर, पळ कांप–थरकाप, खंती–काळजी, वोळगती–प्राप्त होतात, कटसूत्र–करगोटा, कटीवर हात ठेवून, ज्यालें–जिवंत राहिले

अर्थ :– हा श्रीविठ्ठल देव भिवरा नदीच्या काठावर उभा राहिलेला असून त्याच्या समोरही भिवरा नदी दक्षिणमुखी होऊन वहात आहे. याच्या नामामुळे महापातकाना सुद्धा मोठा थरकाप भरतो. या विठ्ठलाचे नामवीर, नामघोष करणारे थोर पाहा कसा नामाचा घोष करीत आहेत. १ हा देव गुणगंभीर असून मोठ्या धैर्याचा आहे. याच्या मुखावर हास्य आहे. अमृताप्रमाणे सुखदायक वाटणारे शब्द हा आपल्या मुखाने बोलत असतो सर्व मुनिश्रेष्ठांच्या चित्तात याचेच गोड रूप स्थिर झाले आहे. याची देहभावना सुटून सर्व काळज्या यांच्या दूर झाल्या आहेत. २ या भूतलावर हा मोठा थोर कीर्तीचा आहे, असा याचा गौरव सर्वत्र झालेला आहे. भक्तांना त्याच्या इच्छेप्रमाणे

दान देण्यासाठी हा उदार असतो याच्या ठिकाणी सर्व प्रकारच्या सिद्धी प्राप्त झालेल्या असतात विठाईमाउली, तुझे नाम फारच चांगले आहे ३ हा विठ्ठल विटेवर उघडा होऊन उभा आहे त्याने आपले हात कमरेवर ठेविले असून त्याला भक्तीचा लोभ मोठाच आहे भवसागरातून तरून जाण्याची पुढची वाट हा भक्तांना दाखवीत असतो अनेक सिद्धांची व साधकांची ही विठाई माउलीच आहे ४ चला, लौकर त्वरा करून या पथाचा स्वीकार करा ज्या सुखाला सीमा नाही, तेच सुख प्रथम साधा तुकाराम महाराज म्हणतात, या पंढरपुरांत सर्व प्रकारची सुखे आलीच आहेत त्याच्यामुळेच हे विश्व जिवंत राहिले आहे ५

११११ धना गुंतले चित्त माझें मुरारी। मन घेउनी हिंडवी दारोदारीं।
मरे हिंडता न पुरे यासि काहीं। मही ठेंगणी परी ते तृप्त नाहीं ॥ १ ॥
न दिसे शुद्ध पाहाता निजमती। पुढें पडिलो इंद्रिया थोर घातीं।
जिवा नास त्या संगतीं दंड बेडी। हरी शीघ्र या दुष्टसंगासि तोडीं ॥ २ ॥
असीं आणिके काय सांगों अनंता। मोहो पापिणी दुष्टमायाममता।
क्रोध काम यातना थोर करी। तुजवांचुनी सोडवी कोण हरी ॥ ३ ॥
निज देखता निज हे दूरि जाये। निद्रा आळस दंभ या भीत आहे।
तया वस्ति देहीं नको देउं देवा। तुजवाचुनी आणिक नास्ति हेवा ॥ ४ ॥
फरीं घात पात शंका लाज थोरी। असे सत्य भाव बहू भक्ति दूरी।
नको मोकलूं दीनबंधु अनाथा। तुका वीनवी ठेवुनी पायिं माथा ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – मुरारी–मुर नावाच्या दैत्याचा पराभव करणारा, श्रीकृष्ण, मही–पृथ्वी, दुष्टसंगासि–दुष्ट अशा सोबतीस, नास्ती हेवा–हाव नसो, मोकलूं–दूर करू नकोस

अर्थ – हे मुरारी, माझे चित्त धनाच्या आशेत गुंतून राहिले आहे अशा या लोभी मनास बरोबर घेऊन मी दारोदारी हिंडत आहे हिंडून हिंडून हे मरत आहे पण यास काही पुरे पडत नाही याची काही तृप्ती होत नाही याच्या लोभापुढे सारी पृथ्वी ठेंगणी झाली तरी, हे तृप्त झालेले नाही १ माझी बुद्धी तशी पाहिली तर, काही शुद्ध नाही इंद्रियसुखांच्या मोठ्याच संकटातही पुढे मी अडकून पडलो त्याच्या संगतीत माझ्या जीवाचा नाश मात्र होत राहिला मोठाच घात झाला त्याच्या दंडात व बेडीत फार त्रास झाला श्रीहरी, या दुष्ट संगतीस तू लौकर तोडून टाकावेस २ अशा शत्रूंचे आणखी अनंता, तुला काय सांगावे? हा पापी मोह आणि ही पापिणी व दुष्ट माया ममता यांनी मला गांजले आहे फार काम क्रोध यांच्याही यातना फार मोठ्याच आहेत या सर्वांतून श्रीहरी, तुझ्या वाचून मला सोडविणार कोण आहे? ३ निजसुखास मी पाहण्याची इच्छा करीत आहे, तो ते सुख दूर दूरच जात आहे निद्रा, आळस, दंभ यांना देवा, मी भीत आहे माझ्या या देहात त्यांना वसती करू देऊ नकोस देवा, तुझ्याशिवाय मला आता दुसऱ्या कशाचीही हाव नाही ४ माझ्या मनात घातपाताची शंका येऊन मोठी लाज निर्माण होत आहे माझ्यापासून भक्तिभाव व सत्यवृत्ती या गोष्टी दूर दूर होत आहेत असे वाटते दीनांचा बंधू असणाऱ्या देवा, या अनाथास तू दूर सारू नकोस हा तुकाराम तुझ्या पायावर विनंती करून डोके ठेवीत आहे ५

११११२ पैल सांवळें तेज पुंजाळ कैसें। सिरीं तुंबिली साजिरीं मोरवीसे[1]।
हरे त्यासि रे देखतां ताप माया। भजा रे भजा यादवा योगिराया ॥ १ ॥
जया कामिनी लुब्धल्या सहस्रसोळा। सुकुमार ह्या गोपिका दिव्य बाळा।
शोभे मध्यभागीं कळा चंद्रकोटी। रत्नां मीनली साजिरी माळकंठीं ॥ २ ॥

[1] मोरपीसे

असे यादवां श्रेष्ठ हा चक्रपाणी । जया[1] वंदिती कोटि तेहत्तीस तीन्ही ।
महाकाळ हे कांपती दैत्य ज्यासी । पाहा सांवळें रूप हें पावनासी ॥ ३ ॥
कसीं पाउलें साजिरीं कुंकुमाचीं । कसी वीट हे लाधली दैवांची ।
जया चिंतितां अग्नि हा शांति नीवे । धरा मानसीं आपला देहभाव ॥ ४ ॥
मुनी[2] देखतां मुख हें चित्त ध्याय । देह मांडला भाव हा बापमाय ।
तुक्या लागलें मानसीं देवपीसें । चित्त चोरटें सांवळें रूप कैसें ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– पैल–पलीकडे, पुंजाळ–चमकणारे, खुविलो–खोवलेली, मोरवोसें–मोरपिसे, कळा–तेज

अर्थ :– पलीकडे सावळया रंगाचे तेज पाहा कसे चमकणारे दिसत आहे ! त्याच्या डोक्यावर मोरपिसे खोवलेली आहेत. त्याला पाहताच मनातील पापताप दूर होतात. या योगिराज यादवास सर्वजणांनी भजावे, त्याचीच भक्ती करावी. १ याला सोळा सहस्र कुमारी लुब्ध झाल्या. त्या गोपकन्या अतिशय दिव्य व सुकुमार होत्या. त्यांच्या मध्यभागी हा,कोटीचंद्राच्या तेजाप्रमाणे शोभिवंत दिसतो याच्या गळयात शोभून दिसणारी माळ त्याच्या रूपात विरून जाते. २ सर्व यादवाच्यात हा चक्रपाणी श्रीकृष्ण श्रेष्ठ आहे, तीनही लोकातील तेहत्तीस कोटी देव त्याला वंदन करतात. महाकाळाप्रमाणे असणारे दैत्य याला पाहून कापू लागतात. पापाचा नाश करणारे, असे हे सावळे रूप तुम्ही मन लावून पाहावे ३ याची गोजिरवाणी पावले पाहा कशी कुंकुमाच्या रंगाची असून शोभिवंत आहेत याला दैववान अशी ही वीट कशी लाभलेली आहे याचे चिंतन करताच अग्नीसुद्धा शांत होऊन विझून जातो तुम्ही आपल्या मनास, आपल्या देहभावास मात्र जपावे ४ सर्व मुनीलोक सुद्धा याच्याच मुखाचे ध्यान आपल्या चित्तात करतात या देहातील भाव याच मायबापासाठी मी अर्पण केला आहे. या तुकारामाच्या मनास याच देवाचे वेड लागलेले असून हे चित्तचोरटे व सावळे रूप माझ्या मनात स्थिर असावे. ५

११११३ असे नांदतु हा हरी सर्वजीवीं । असे व्यापुनी अग्नि हा काष्ठ तेवीं ।
घटीं बिंबलें बिंब हे ठायिठायीं । तया संगती नासु हा त्यासि नाहीं ॥ १ ॥
तन वाटितां क्षीर हें होत नाहीं । पशू भक्षितां पालटे तेंचि देहीं ।
तया वर्म तो जाणता एक आहे । असे व्यापक व्यापुनी अंतर्बाहे ॥ २ ॥
फळ कर्दळीं सेवटीं येत आहे । असे शोधितां पोकळीमाजि काये ।
धीर नाहीं तें वाउगें धीग जालें । फळ पुष्पना यत्न ते व्यर्थ गेले ॥ ३ ॥
असे नाम हे दर्पणें सिद्ध केलें । असे बिंब तें या मळा आड ठेलें ।
कसें शुद्ध नाहीं दिसे माजिरूप । नका वाढवूं सीण हा पुण्यपाप ॥ ४ ॥
करा वर्म ठावें नका सोंग वांयां । तुका वीनवीतो पडों काय पायां ।
तुज पुत्र दारा धन वासना हे । मग ऊरलें शेवटीं काय पाहे ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :–नासु–नाश, तन–गवत, धीग–ढीग, पुष्कळ, दर्पणें–आरशाने

अर्थ –हा श्रीहरी सर्व जीवात निवास करून आहे लाकडामध्ये अग्नी सुप्त स्थितीत ज्याप्रमाणे असतो, त्याप्रमाणे याचा वास सर्व वस्तूत असतो. घटामध्ये, आकाशाचे बिंब जसे पडावे, तसे याचे बिंब प्रत्येक ठिकाणी पडलेले आहे. घराचा, शरीराचा नाश झाला तरी, या बिंबाचा, चैतन्यतत्त्वाचा नाश कधी होत नाही १ गवत वाटून वाटून कितीही घेतले तरी, त्याचे काही दूध होणार नाही, पण गाईम्हशीने ते गवत खाताच त्याचे स्वरूप पालटून त्याचे उत्तम दूध तयार होते. याचे वर्म जाणणारा तोच एक श्रीहरी आहे. सर्व वस्तुमात्रात अंतर्बाह्य असा तोच व्यापून

१ तया, २ मनी.

आहे २ फळीला, मेळीला फळ शवटी शेवटी यते पण आधीच त्या फळास शोधण्यासाठी तिच्या गाभ्याच्या पोकळीत पाहिले तर काय दिसणार आहे ? ज्याला धीर नाही त्यान पुष्कळ केले तरी ते व्यर्थच होते फळ व पुष्प याच्या साठी प्रयत्न करून काही उपयोग नसतो ३ दर्पणान, आरशान आपले नाव सिद्ध केले आहे त्याच्या योगान दर्प म्हणज अहकार वाढतो या अहकाररूपी मळाच्या आतच या श्रीहरीचे बिंब आहे आपले आचरण जर शुद्ध नसले तर त्याचे हे निजरूप त्या दर्पणात कसे दिसेल ? ते दिसावे यासाठी पापपुण्याचा पसारा मात्र वृथा वाढवू नका ४ या श्रीहरीचे खरे वर्म माहीत करून घ्या उगाच विनाकारण सोगढोंग करू नका हा तुकाराम विनवणी करून तुमच्या पायावर पडत आहे तुम्हास जर धन, पत्नी पुत्र याचीच केवळ वासना असेल तर मग या जीवनात काय शवटी उरले ते तूच सावध होऊन पाहावेस ५

१११४ मना सांडि हे वासना दुष्ट खोडी । मतीं मानसीं एक हे व्यर्थ गोडी ।
असे हीत माझें तुज काहीं एक । धरी विठ्ठलीं प्रेम हे पायिं सूख ॥ १ ॥
ऐसा सवभावें तुज शरण आलो । देहदु:ख हे भोगिता फार भ्यालो ।
भवतारिते दूसरे नाहिं कोणी । गुरु होत का देव तेहेतीस तीन्ही ॥ २ ॥
जना वासना हे धना थोरि आहे । तुज लागली सगती तेचि सोये ।
करीं सर्व सगी परि त्यागु ठायीं । तुका विनवीतो मस्तक ठेवुनि पायी ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा – मतीं–बुद्धीत मानसीं–मनात

अर्थ – मना, दुष्ट वासना व वाईट खोडी याचा तू त्याग कर नेहमी मनात व बुद्धीत याचीच गोडी असण व्यर्थ आहे माझ्या हिताची व तुझ्या हिताची गोष्ट एकच आहे तू या विठ्ठलाचे पाय धरावेस यात सव सुख आहे १ मना असा मी आता सव भावे तुला शरण आलेलो आहे या देहाची दु:ख भोगून मी फारच दमून गलो आहे ससारातून तारणारे मला दुसरे कुणीही नाही तेहतीस कोटी असे तीनही लोकाचे देव जरी गुरु असले तरी त्याचाही उपयोग होत नाही २ या सव लोकाना धनाची इच्छा फार असते मना, तुलाही तीच सगत आवडते पण तू सव सगतीचा त्याग करून या विठ्ठलचरणी लीन व्हावेस अशी विनती मी तुझ्या चरणी मस्तक ठवून करीत आहे ३

विवरण – श्लोकातून बोध दण्याचा प्रयत्न तुकाराम महाराज यानी वरील सहा अभगात केलेला आहे रचनचा थाट रामदासाप्रमाण गद्यप्राय असून रचना वृत्तदृष्ट्या अतिशय शिथिल अशी दिसते तुकोबाच्या अभगातील रग अर्थातच या श्लोकातून नाही भुजगप्रयातासारख वृत्त वापरण्याचा हा एक त्यानी प्रारभी प्रारभी प्रयोग करून पाहिला असावा बहुतक सव अभगातून श्रीविठ्ठलाचेच गुणवणन असून एखाददुसऱ्या श्लोकात मनास बोध आहे ‘ मना सांडि हे वासना दुष्ट खोडी या सारख्या ओळीवरून रामदासाची आठवण होत

१११५ सुटायाचा काहीं पाहातो उपाय । तो हे देखें पाय गोवियेले ॥ १ ॥
एसिया दु:खाचे सापडलो सदीं[1] । हारपली बुद्धि बळ माझें ॥ २ ॥
प्रारब्ध क्रियमाण सचिताचे । वोढत ठायींचे आलें साचे ॥ ३ ॥
विधिनिषेधाचे सापडलो चपे । एके एक लापे निवडेना[2] ॥ ४ ॥
सारावे ते वाढे त्याचियाचि अगें । तृष्णचिया सगें दु:खी जालों ॥ ५ ॥
तुका म्हणे आता करीं सोडवण । सर्वशक्तिहीन जालो देवा ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा –गोंवियले–गुतले गले सदीं–सधीत पेचात चपे–कटकटीत

१ सधी, २ सापडना

अर्थ – ससारपाशातून सुटण्याचा उपाय जो जो मी शोधू लागतो, तो तो त्यात अधिकच गुतून जात आहे त्यात माझे पाय अधिकच गुतले गेले आहेत १ अशा या दु खाच्या पेचात मी सापडलो असून माझी सर्व बुद्धी व माझे सर्व बळ सपत आले आहे २ प्रारब्ध, क्रियमाण व सचित यांच्यामुळे जी जी कर्मे भोगावी लागणार आहेत, ती तीं खरोखर माझ्या मागे धावतच आली आहेत ३ विधिनिषेधाच्या कटकटीत मी सापडलो असून, एक सपविले की दुसरे निर्माण होऊन मी त्यातून काही मोकळा होत नाही मला त्याची निवडही करता येईनाशी झाली आहे ४ ज्याचा निषेध करावा व दूर सारावे त्याचीच वाढ माझ्या अगात होते अशा या तृष्णेच्या वाढीमुळे मी अतिशय दु खीकष्टी झालो आहे ५ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, आता तूच माझी मुक्तता या ससारपाशातून कर. कारण मी आता सर्व शक्तींच्या विरहित असा दुबळा झालो आहे ६

१११६ भय वाटे पर । न सुटे हा ससार ॥ १ ॥
ऐसा पडिलो काचणी । करीं धावा म्हणउनी ॥ २ ॥
विचारितों काहीं । तों हें मन हातीं नाहीं ॥ ३ ॥
तुका म्हणे देवा । येथें न पुरे रिघावा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – पर–परतु काचणी–काचात, पेचात रिघावा–प्रवेश

अर्थ – या ससारपाशाचे देवा, मला फार भय वाटते हा ससार सुटता सुटत नाही १ अशा मोठ्या पेचात मी पडलो असून देवा, माझ्यासाठी तुम्ही सत्वर धावून यावे २ मी स्वत च्या मनाशी पुष्कळच विचार करून पाहतो, पण माझे मन काही माझ्या हाताशी लागत नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा या मनाच्या ठिकाणी काही माझा प्रवेश नीट होत नाही ४

१११७ येगा येगा पाडुरगा । घेईं उचलुनि वोसगा ॥ १ ॥
ऐसी असोनिया वेसी । दिसतो मी परदेसी ॥ २ ॥
उगवूनि गोवा । सोडवूनि न्यावे देवा ॥ ३ ॥
तुज आड काहीं । बळ करी ऐसे नाहीं ॥ ४ ॥
तुका म्हणे हृषीकेशी । काय उशीर लाविलासी ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – वोसगा–पदरामध्ये, वेसी–जवळच आश्रयाने, उगवूनि–सोडवून, गोवा–गुतणूक

अर्थ – पाडुरगा, तू सत्वर धावून ये ना मला उचलून तू आपल्या पदरात घे १ मी असा अगदी तुमच्या जवळच आश्रयास असूनही परदेशी झाल्यासारखा आहे २ देवा, या प्रपचाची गुतणूक सोडवावी व मला यातून तुम्ही मुक्त करावे ३ तुकाराम महाराज म्हणतात, हे हृषीकेशी उगाच उशीर का करीत आहात ? ४

१११८ माझी विठ्ठल माउली । प्रेमपान्हा[१] पान्हायेली ॥ १ ॥
फुर्वाळूनि लावी स्तनीं । न वजे दुरी जवळूनि ॥ २ ॥
केली पुरवी आळी । नव्हे निष्ठुर कोवळी ॥ ३ ॥
तुका म्हणे घास । मुखीं घाली प्रह्मरस ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – न वजे–जात नाही, आळी–हट्ट

अर्थ – ही माझी विठाई माउली किती प्रेमळ आहे पाहा ही माझ्यासाठी प्रेमाच्या पान्ह्याने पान्हावलेली आहे तीच मजसाठी उत्सुक आहे १ ती मला स्वत च्या हळुवार हाताने कुरवाळून व मग आपल्या स्तनांशी लाविते कृपेचे दूध मला पाजते व मग एक क्षणभरही माझ्यापासून दूर जात नाही २ मी जो जो हट्ट करीत असतो,

१ प्रेमें पान्हा

तो तो ती पुरवीत असते तो मनाने निष्ठुर मुळीच नसून अगदी कोमल वृत्तीची आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, ही माझी विठाई माउली माझ्या मुखात ब्रह्मरसाचा घास घालीत असते ४

विवरण – तुकाराम महाराजाचा हा अतिशय गोड अनुभूतीचा एक छोटा, परंतु सर्वोत्तम सुखाची प्रचीती देणारा असा अभग आहे सर्व चिंता मिटल्या, मनाची तगमग थावली, तळमळ दूर झाली सशय फिटले, मी पातकी, अपराधी, ही वृत्ती कमी झाली की, मग एखादा क्षण असा येतो की, ईश्वर दूर नसून आपल्यात आहे असे पटू लागते श्रीविठ्ठल किती कनवाळू आहे! आपण जितके त्याच्यासाठी आतुर आहोत, त्याहीपेक्षा तो आपल्याविषयी जास्त उत्सुक आहे, असे मग ध्यानात येते त्याला तरी प्रेमाने हाक मारणारी मुले कुठ आहेत ? कुणी खऱ्या प्रेमाने आप णास विचारीत आहे काय ? अशाच शोधात ता नेहमी असता, आणि तुकाराम महाराजासारखा एवढा भक्त दिसला की मग त्यालाही मोठेच समाधान लाभते ता त्या भक्ताच सर्व काही करीत असतो त्या विठाई माउलीचा प्रेमपान्हा मग तिलाच आवरेनासा हाता चटकन कुरवाळून ती आपल्या लाडक्या भक्ताला जवळ घेते व त्याला प्रमाने स्तनाशी लावते त्याच्यापासून मग कधीही दूर जातच नाही जो हट्ट हे मूल करील तो ती पुरवीत असत ही माय निष्ठुर नसून मनाची अत्यत कावळी आहे, अशी प्रचीती मग येत असत ब्रह्मरसाच्या घासाने मग भक्त तृप्त होऊन जातो अशा मोठ्या उदात्त व सतोषित वृत्तीचा हा लहानसा अभग मोठ्या गोड भावाचा म्हणून लक्षात राहण्यासारखा आहे विठ्ठलाचे दयालुत्व व भक्ताविषयीचे वात्सल्य, याचे मोठे रेखीव व हृदयावर उमटणारे चित्र या अभगात आहे

११११९ आम्ही उतराई । भाव निरोपूनि पायीं ॥ १ ॥
तुम्ही पुरवावी आळी । करावी ते लडिवाळीं ॥ २ ॥
आमचा हा नेम । तुम्हा उचित हा धर्म ॥ ३ ॥
तुका म्हणे देवा । जाणों सांगितली सेवा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा .– आळी–हट्ट

अर्थ – आमच्या मनाचा भाव देवा, तुमच्या जवळ सागून आम्ही आता उतराई झालेलो आहोत आमच्या कडून काही करावयाचे असे आता राहिलेले नाही १ आता आम्ही लडिवाळ भक्तानी जे जे हट्ट करावेत, ते ते तुम्ही पूर्ण करावेत, एवढीच पायाशी देवा, विनवणी आहे २ अशा प्रकारे नाना हट्ट करणे, हा आमचा स्वभावधर्म आहे व तो पुरविणे हे तुमचे उचित असे कर्तव्यच आहे ३ देवा, तुम्ही जी सेवा करायला मला सांगितली आहे, ती मी जाणून आहे ४

११२० केलें पाप जेणे दिलें अनुमोदन । दोघासी पतन सारिखेंचि ॥ १ ॥
विष नवनीता विष करी सर्गें । दुर्जनाच्या त्यागें सर्व हित ॥ २ ॥
देखिलें ओढाळ निघालिया सेता । टाळावे निमित्ता येंक म्हण ॥ ३ ॥
तुका म्हणे जोडे केल्याविण कर्म । देखता[1] तो श्रम न मनिता ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – अनुमोदन–होकार, पाठिंबा, ओढाळ–आढाळ जनावर

अर्थ – एखाद्याने एखादे पापकर्म केले व दुसऱ्याने त्याला उत्तेजन दिले, तर दोघानाही सारख्याच योग्यतेचे पतन आहे दोघही तितकेच दोषी आहेत, असे समजावे १ लोण्यामध्ये थोडे जरी विष घातले तरी, सर्व लोणी त्याच्या सगतीने विषमय होऊन जाते म्हणून दुर्जनाचा सवस्वी त्याग करणे, यातच हित असते २ एखादे जनावर ओढाळ असून शेताच्या बाधाशी असेल, अथवा त्या दिशेने निघाले असेल, तर त्याला हेंक हेंक म्हणून आपण आपले

१ नेणती तो

कर्तव्य केल्याचे चुकू नये ३ तुकाराम महाराज म्हणतात, एखादे कार्य करण्यातच श्रम आहेत, असे पाहून ते कार्य केल्याशिवाय का कधी त्यापासून होणारा लाभ होणार आहे ४

११२१ विठ्ठल गीतीं विठ्ठल चित्ती । विठ्ठल विश्रांति भोग जया ॥ १ ॥
विठ्ठल आसनीं विठ्ठल शयनीं । विठ्ठल भोजनीं ग्रासोग्रासीं ॥ २ ॥
विठ्ठल जागृतिस्वप्नसुषुप्ती । आन दुजें नेणती विठ्ठलेविण ॥ ३ ॥
भूषण अळंकार सुखाचे प्रकार । विठ्ठल निर्धार जया नरा ॥ ४ ॥
तुका म्हणे ते ही विठ्ठलचि जाले । संकल्प मुराले दुजेपणे ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – ग्रासोग्रासीं–प्रत्येक घास घेत असताना

अर्थ – ज्याच्या गायनात विठ्ठल आहे, चित्तात विठ्ठल आहे, सर्व विश्रांती एकमेव विठ्ठल हीच आहे ज्याचे सर्व भोगही विठ्ठलमय होत असतात १ आसनावर विठ्ठल, शयनावर विठ्ठलच ज्याना दिसतो, जेवण करीत असताना प्रत्यक घासाबरोबर ज्याना विठ्ठलच प्रतीत होतो २ ज्याच्या जागेपणी, स्वप्नामध्ये, अर्धवट झोपलेल्या अवस्थेतही ज्याना विठ्ठलाशिवाय दुसरे काहीच दिसत नाही ३ ज्याचे सर्व भूषण व अलंकार म्हणजे हा एक विठ्ठल आहे व ज्याचा सर्व निर्धार हा विठ्ठलच आहे ४ ते, तुकाराम महाराज म्हणतात, स्वत च विठ्ठलस्वरूपास पावलेले आहेत असे समजावे दुजेपणाची, आपण विठ्ठलावाचून दूर आहोत, अशी भावनाच त्यांच्या ठिकाणी उरलेली नाही, असे जाणावे ५

११२२ दास जालो हरिदासाचा । बुद्धिकायामनेंवाचा ॥ १ ॥
तेथें प्रेमाचा सुकाळ । टाळमृदंगकल्लोळ ।
नासे दुष्टबुद्धि सकळ । समाधी हरिकीर्तनीं ॥ २ ॥
ऐकता हरिकथा । भक्ति लागे त्या अभक्ता ॥ ३ ॥
देखोनि कीर्तनाचा रंग । कैसा उभा पांडुरंग । ॥ ४ ॥
हें सुख ब्रह्मादिका । म्हणे नाहीं नाहीं तुका ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – काया–शरीर

अर्थ – मी कायावाचामनेंकरून या हरिदासाचाच दास बनून राहिलो आहे १ या कीर्तनाच्या स्थानी प्रेमाचा सुकाळ असून टाळ, मृदंग यांच्या गजरात, मनात काही दुष्ट बुद्धी असेल तर ती सर्व नष्ट होईल हरिकीर्तनामध्ये समाधीचे सुख प्राप्त होईल २ या ईश्वराची कथा ऐकत असताना एखादा अभक्त असला, तरी तो भक्त होऊन जाईल ३ या कीर्तनाचा रंग पाहून तेथे प्रत्यक्ष पांडुरंगही भुलून उभा राहिलेला असतो ४ तुकाराम महाराज म्हणतात, अशा प्रकारचे कीर्तनामधील सुख प्रत्यक्ष ब्रह्मदेवादिकानाही प्राप्त होणारे नाही ५

विवरण – वारकरी पंथात कीर्तनभक्तीचे महत्त्व अन-यसाधारण असे सांगितले आहे टाळ, मृदंग, वीणा यांच्या घोषाने युक्त असे ईश्वराचे भजन, हरिकथेचे अथवा भक्तीचे निरूपण, नृत्यसंगीताच्या साह्याने तल्लीनता व प्रभुप्रेमाची लयलूट, हे कीर्तनाचे मुख्य स्वरूप होय या कीर्तनसुखाची गोडी अनेक संतानी गाइली आहे या कीर्तनाच्या सुखाविषयी सर्वांनाच, ब्रह्मदेवालाही लोभ वाटतो, प्रत्यक्ष अमृतही लाजून दूर सरत, असे तुकाराम महाराजानीच म्हटले आहे या कीर्तनाखेरीज दुसरे कुठल्ही साधन नसा कारण यात प्रभूचे गुणगान, ध्यान, नामस्मरण, सत्संग, भजन यांचा समावेश असून हे अतिशय सोपे असे साधन आहे 'पाहता साधन विठ्ठल कीर्तन । भक्त संजीवन आत्माराम ।', 'नित्य हरिकथा नामावळी । वैष्णवांचे कुळीं धन्य जन्म' असा या कीर्तनभक्तीचाच महिमा निवृत्तीनाथानी गाइला आहे या कीर्तनात ईश्वर आपले वैकुंठीचे स्थान सोडून उभा असतो, अशीही साक्ष संतानी वारंवार दिलेली आहे ' क्षीरसागर सांडोनि हरी । कीर्तनीं उभा सहपरिवारी, ' ' कीर्तनाची आवडी देवा । वैकुंठाहूनी पालो

धावा । नवल वैकुंठींच नसे । तो कीर्तनीं नाचतसे', 'कीर्तनाचे थोर सुख । यदुनायक राहे उभा', 'नसे वैकुंठीं हरी । नाचे कीर्तनीं परोपरी । भक्तांबरोबरी' अशा शब्दांत एकनाथांनी कीर्तनाचा व देवाचा संबंध वर्णन केलेला आहे. या कीर्तनामुळे दुष्ट बुद्धी नाहीशी होते. पापवृत्ती नष्ट होते अभक्तही भक्त होऊन जातात, अशी ही साक्ष एकनाथांनी वारंवार दिलेली आहे 'धन्यधन्य कीर्तन भूमंडळी । महादोषा घेतसे होळी', 'पातकी घातकी यासी सोपा पंथ । कीर्तनें सरते कळीमाजी', 'महापातकी तरले कीर्तनीं । प्रत्यक्ष पुराणीं वद्य जाले', 'कीर्तन श्रेष्ठ कलियुगीं सेवा । तरले पातकी ते देवा' असे या कीर्तनाचे माहात्म्य एकनाथांनी वर्णन केलेले आहे.

महाराष्ट्रातील कीर्तनाचे आद्य प्रवर्तक श्रीनामदेवराय यांची 'नाचू कीर्तनाचे रंगीं । ज्ञानदीप लावू जगीं' ही ओळ प्रसिद्धच आहे 'कीर्तन नर्तन वाचे जनार्दन । न पवसी पतन येरझारीं', 'ऐकता कीर्तन होतो जीवन्मुक्त । दाविसी अनंत नाम मार्गें,' 'कीर्तनाच्या सुखें सुखी होतो देव । कोणतें वैभव याणी आता' असे या कीर्तनाचे महत्त्व नामदेव महाराजांनी वर्णन केले आहे तुकाराम महाराजांचे कीर्तनावर तर कितीतरी अभंग आहेत याच एका साध्या, सोप्या व सरळ मार्गाचा पुरस्कार त्यांना करावयाचा होता देव, भक्त आणि नाम असा त्रिवेणी संगम कीर्तनात असल्यामुळे याठिकाणी, 'जळती दोषांचे डोंगर । शुद्ध होती नारीनर । तीर्थें तया ठाया । येती पुनीत व्हावया' असा कीर्तनाचा महिमा असल्याचा तुकारामबुवा एका अभंगात सांगतात 'कीर्तन चांग कीर्तन चांग । होय अंग हरिरूप', याचे कारण असें की, तो विठ्ठलच या कीर्तनात येऊन उभा असतो जो तपश्चर्येने सापडत नाही, तो या कीर्तनात उभा असतो 'न करिता ध्याना । न करिता धारणा । तो नाचे कीर्तनामाजी हरी' अशी या श्रीहरीचीही कीर्तनभक्ती तुकाराम महाराजांनी वर्णन केलेली आहे या कलियुगात नामसंकीर्तन हेच एक अतिशय सोपे असे साधन सर्वांना साधुसंतांनी उपलब्ध करून दिलेले आहे 'सोपें वर्म आम्हा सांगितले संतीं । टाळ दिंडी हातीं घेऊनि नाचा' असे या कीर्तनाच्या साधनाविषयी बुवांनी म्हटले आहे या कीर्तनाच्या लोभासाठी ब्रह्मदेवादी देवही उत्सुक असतात, असे त्यांनी इतरत्रही वारंवार सुचविले आहे स्वर्गामधील देवांची इच्छा आपणास मृत्युलोकात जन्म यावा, अशी असल्याचे त्यांनी सांगितले आहे याच कीर्तनामध्ये काया संपूर्ण ब्रह्ममय होऊन जाते असा त्यांचा अनुभव आहे

११२३ गति अधोगति मनाची युक्ति । मन लावीं एकांतीं साधुसंगें ॥ १ ॥
जतन करा जतन करा । धावतें सैरा ओढाळ ते ॥ २ ॥
मान अपमान मनाचें लक्षण । लाविलिया ध्यान तेंचि करी ॥ ३ ॥
तुका म्हणे मन उतरी भवसिंधु । मन करी बधु[1] चौर्‍यांशीचा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– गति–प्रगती

अर्थ – आपली प्रगती किंवा अधोगती ही केवळ आपल्या मनाच्या स्थितीवर अवलंबून असते यासाठी मनास साधुसंतांच्या संगतीत किंवा एकान्तात लावावे १ या मनास नीट सांभाळा कारण ते ओढाळ असून सैरा-वैरा धावत सुटलेले असते २ आपला मानसन्मान किंवा आपला अपमान हा केवळ या मनाच्या अवस्थेमुळे निर्माण होत असल्याने त्याला ज्याचे ध्यान आपण लावावे, तेच ते करीत असते ३ तुकाराम महाराज म्हणतात, याच मनाच्या साह्याने संसारसागरही तरून जाता येतो चौऱ्याऐंशी लक्ष योनींतून मुक्तता केवळ या एका ओढाळ मनास बधूप्रमाणे वश करून घेतल्यासच होईल ४

विवरण – हे मन मोठे चंचल आहे इंद्रियसुखाकडे धावणारे आहे त्यास प्रथम आवरावे, असे सर्व साधुसंतांनी सांगितले आहे आपल्या आयुष्यातील मान व सन्मान हा सर्व या मनाच्या स्थितीगतीवर अवलंबून आहे या मनास जिंका मनास मोकाट सोडू नका. मनाने सुखी समाधानी व्हा या मनास स्वाधीन ठेवाल, तरच तुम्ही संसार-सागर तरून जाल, असा त्यांच्या उपदेशाचा सारांश असतो भगवद्गीतेनेही हे मन मोठे चंचल असून त्याचा निग्रह करणे अवघड असल्याचे सांगितले आहे परंतु अभ्यासाने व वैराग्याने त्याला स्वाधीन ठेविता येते, असाही निर्देश सहाव्या

[1] बाधु

अध्यायात आहे. मन जिंकण्याचे किंवा ताब्यात ठेवण्याचे मुख्य साधन कोणते ? तर अभ्यास व वैराग्य ही दोन प्रमुख साधने गीतेने सांगितली आहेत. अभ्यास म्हणजे कोणतीही गोष्ट पुन: पुन: करणे व वैराग्य म्हणजे, राग, प्रीती, लोभ नसणे, अशी अवस्था होय. पांतजलयोगसूत्रातही 'योगश्चित्तवृत्तिनिरोधः' म्हणजे चित्तवृत्तीचा निरोध करणे, याचे नाव योग असे सांगून पुढे 'अभ्यासवैराग्याभ्यां तन्निरोधः' अभ्यास व वैराग्य यांनीच या मनाचा अथवा चित्तवृत्तीचा निरोध होतो, असे म्हटले आहे. अशा प्रकारे अतिचपळ असणाऱ्या व आवरण्यास कठिण असणाऱ्या या मनाच्या निरोधाचे उपाय सर्वत्र साधुसंतानी सांगितले आहेत.

'मन आधीं मुंडीं । वासनेतें खंडी । विठ्ठल ब्रह्मांडीं एक आत्मा' असे श्रीसोपानदेवानी या मनाच्या निरोधाविषयी म्हटले आहे. त्यानाही 'विवेक वैराग्य ज्ञानाचे सौभाग्य । सोवळा आरोग्य हरि देखा' असेच साधन मनाच्या निग्रहाविषयी सांगितले आहे. 'मन एके ठायीं । राहे ऐसे करीं कांहीं । सर्व साधनाचे सार । मनीं करावा विचार' अशा शब्दानी सुरुवात करून एकनाथानी मनास उपदेश केलेला आहे. रामदासाचा मनास उपदेश प्रसिद्धच आहे. 'नका धावूं तुम्ही सैरा । मना मार्गे या सत्वरा । मन पं आधीन । तेणें जोडे संतचरण' असा त्यानी मनोजयाचा उपाय व परिणामही सांगितलेला आहे, हे मन किती ओढाळ आहे. किती अस्थिर आहे, किती चंचल आहे, यासंबंधीही त्यानी वारंवार उल्लेख केले आहेत. 'मना तूं अधीर अधीर । बहू पातकी पामर । न राहासी स्थिर । क्षणभर निश्चयें ॥ किती शिकवावें तूतें नायकसी एकचित्तें । बहू गाणें बोलता तूं तें । नायकसी पामरा ॥' अशा मनाचे स्वभाववर्णन एकनाथानी केलेले आहे. 'बैसतां निश्चळ । मन करी तळमळ । ध्यान धारणा ते विधी । मन न पावेचि सिद्धी' असे हट्टवादी व दुराग्रही मन प्रत्येक कार्यात अडथळा निर्माण करते. शेवटी 'तुज सांगतसे मना । पाहे पंढरीचा राणा । नको तुजा छंद काहीं । राहे विठ्ठलाचे पायीं' असे त्यास सांगून 'मन रामीं रंगले अवघे मनचि राम जाले' असा मनोजयाचा निष्कर्ष त्यानी दिलेला आहे 'मन करा रे प्रसन्न । सर्वसिद्धींचे कारण' असा तुकोबाचा अभंग आपणास माहीत आहेच ( क्र. २९१ )

तुकारामबुवानाही मनाच्या ओढाळ व चंचल स्थितीचा अनुभव चांगलाच आला असावा. 'मन उतावीळ । जालें न राहे निश्चळ । मन गुंतलें लुलया । जाय धांवोनि त्या ठाया', 'मन माझें चपळ न राहे निश्चळ । घडी एक पळ स्थिर नाहीं' इत्यादी ओळीवरून तुकोबाच्या आयुष्यातही या मनास जिंकण्याचा संग्राम करा होत असावा याची कल्पना करता येण्यासारखी आहे. अर्थातच तुकोबानी मनास वैराग्याने, नामस्मरणाने, चिंतनाने एकसारखा अंकुश लावलेला असल्यामुळे, त्याना ते जिंकता आले, व रोज नव्या जागृतीचा टप्पा गाठता आला, हे स्पष्ट आहे. 'तुका म्हणे मना पाहिजे अंकुश । नित्य नवा दीस जागृतीचा' असा त्यानी आपल्या साधनेचा निष्कर्ष दिलेला आहे. त्यानीही मनास वारंवार उपदेश केलेला आहे, तोही मार्गदर्शक होण्यासारखा आहे. 'मना एक करी । म्हणे जाईन पंढरी । उभा विटेवरी । तो पाहेन सांवळा ।', 'मना सांडि हे वासना दुष्ट खोडी', वगैरे ओळींतून मनास आवरण्याचे प्रयत्नही त्यानी सुचविले आहेत.

११२४ पंढरीस दुःख न मिळे ओखदा । प्रेमसुख सदा सर्वकाळ ॥ १ ॥
पुंडलिकें हाट भरियेली पेंठ । अवघें वैकुंठ आणियेलें ॥ २ ॥
उदमासी तुटी नाहीं कोणा हानि । घेऊनियां धणी लाभ घेती ॥ ३ ॥
पुरलें देशासी भरलें सिगेसी । अवघी पंचक्रोशी दुमदुमीत ॥ ४ ॥
तुका म्हणे संतां लागलीसे धणी । बैसले राहोनि पंढरीस ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :- ओखदा-औषधासही, हाट-बाजार, उदमासी-व्यापारास, धणी-तृप्ती.

अर्थ :- या पंढरपूर क्षेत्रात दुःख औषधालासुद्धा मिळायचे नाही. नेहमी सर्वत्र प्रेमसुखाचा सुकाळ असतो. १ या पंढरपूरच्या बाजाराची पेठ भक्त पुंडलिकाने भरविलेली असून त्याने वैकुंठाबरोबरच विठ्ठलही आणून

येथें उभा केलेला आहे २ आता या ठिकाणी भक्तीच्या व्यापारास कधी तूट येणार नाही या ठिकाणी सर्व प्रकारचे लाभ होऊन मनाची तृप्ती होत असते ३ या ठिकाणचा हा विठ्ठलरूपी माल शिगोशीग पूर्ण मापाने भरलेला असल्याने, सर्व देशास पुरेल एवढा विपुल प्रमाणात आहे पंढरपूरची पंचक्रोशी याच विठ्ठलरूपी मालाने दुमदुमून गेलेली आहे ४ तुकाराम महाराज म्हणतात, सर्व साधुसंताचे मन तृप्त होईल, असाच माल या पंढरपुरात लाभल्यामळे ते या ठिकाणीच बसून राहिले आहेत ५

११२५ द्वारकेचे केणें आले याचि ठाया । पुढें भक्तराया चोजवीत ॥ १ ॥
गोविले विसारे माप केले खरें । न पाहे माघारें अद्यापवरी ॥ २ ॥
वैष्णव मापारी नाहीं जाली सळे । पुढें ही न कळे पार त्याचा ॥ ३ ॥
लाभ जाला त्यानीं धरिला तो विचार । आहिक्य परत्र साटविले ॥ ४ ॥
तुका म्हणे मज मिळाली मजुरी । विश्वास या घरीं संताचिया ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा –केणे–माल जिन्स चोजवीत–जागवीत, बोध करीत, गोविले–गुतवून ठेविले, सळे–मोजमाप, पार–अत, अहिक्य–यालोकी, परत्र–परलोकी

अर्थ –द्वारकेत असणारा हा श्रीकृष्णरूपी किंवा विठ्ठलरूपी माल आज या पंढरपूरच्या बाजारात आला आहे, आणि त्याच्यापुढे भक्तराज पुंडलिक असा बोध करीत उभा आहे १ या मालासाठी भक्तानी विसार देऊन या विठ्ठलास गुतवून ठेविले असल्यामुळे अजूनही हा परत द्वारकेस गेलेला नाही २ सारे वैष्णव माल घ्यावयास सिद्ध झाले असूनही त्याचे मोजमाप कुणासही घेता आलेले नाही व पुढेही कधी त्याचा अंत लागेल असे वाटत नाही ३ ज्याना त्याचा लाभ झाला त्यानी तोच हातात धरून त्याचे चिंतन केले व या लोकात व परलोकातही त्याची प्राप्ती करून घेतली ४ तुकाराम महाराज म्हणतात या पंढरीच्या क्षेत्रात मलाही मजूरी मिळालेली असून याविषयी मला सताचा मोठाच विश्वास वाटतो ५

११२६ सुरवर येती तीर्थें नित्यकाळ । पेंठ त्या निर्मळ चंद्रभागा ॥ १ ॥
साक्षभूत नव्हे सांगितली मात । महिमा अत्यद्भूत वर्णवेना ॥ २ ॥
पंचक्रोशीमाजी रीघ नाही दोषा । जळती आपेंसा अघोर ते ॥ ३ ॥
निर्विषय नर चतुर्भुज नारी । अवघा घरोघरी ब्रह्मानंदु ॥ ४ ॥
तुका म्हणे ज्यापें नाहीं पुण्यलेश । जा रे पंढरीस घेई कोटि ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – सुरवर–देवश्रेष्ठ, रीघ–प्रवेश, अपेसा–आपोआप ज्यापें–ज्याच्याजवळ

अर्थ – ज्या क्षेत्रात चंद्रभागा निर्मळपणे वाहात आहे, त्या पेठेत सर्व देवश्रेष्ठ व सर्व तीर्थे याची दाटी झालेली असते १ ही मी काही कुणी सांगितलेली गोष्ट सांगत आहे असे नाही, तर प्रत्यक्ष अनुभवाची बाब सांगतो आहे या स्थानाचा महिमा फार मोठा असून त्याचे वर्णनसुद्धा करता येणार नाही २ या क्षेत्राच्या पंचक्रोशीत एकाही दोषाला प्रवेश मिळणार नाही ते सर्व महादोष आपोआप जळून नष्ट होतात ३ या ठिकाणी पुरुष व स्त्रिया निर्विषयी असून देवाप्रमाणे ते चतुर्भुज आहेत प्रत्येक घरात ब्रह्मानंदच निर्माण झालेला आहे ४ तुकाराम महाराज म्हणतात, ज्याच्याजवळ पुण्याचा लवलेशही नाही, त्याने सरळ पंढरपूरला जावे व वाटेल तेवढे पुण्य संपादन करावे ५

विवरण – वरील तीन अभंगातून तुकारामबुवानी पंढरपूर या क्षेत्राच महत्त्व वर्णन केल आहे तुकोबा स्वत वैश्यव्यवसाय करीत असत तेव्हा त्याच व्यापाराच्या भाषत त्यानी चंद्रभागेच्या तीरावर भरलेल्या या विठ्ठलरूपी मालाचे व बाजारपेठेचे वर्णन केले आहे ही बाजारपेठ पुंडलीकान वसविली असून त्याच्याचमळे सारे वैकुंठ या भूतलावर निर्माण झाले, असे तुकाराम महाराजानी म्हटले आहे या ठिकाणी कुणीही व्यापार केला तर त्यास कधी

लूट येणार नाहीं असे तुकोबा सांगतात द्वारकेहून हा श्रीकृष्णरूपी माल पंढरपूरच्या पेठेत सर्वांनाच पसत पडलेला आहे सान्या भक्तानी याला मोजण्याचा प्रयत्न केला, पण त्याचे मोजमाप कुणासही करता आलेले नाही अशा प्रकारे व्यापान्याच्या भाषेत या विठ्ठलरूपी मालाचा सौदा पटविण्याची भाषा या अभगातून आहे भक्ताना विसार देऊन गुतविल्यामुळे या पांडुरगास परत द्वारकेस जाताना आले नसल्याचेही तुकोबानी मार्मिकपणे नमूद केले आहे

या द्वारकेच्या राण्यामुळे सर्वच सतांना पंढरपूरविषयी फार मोठा जिव्हाळा वाटतो ज्ञानेश्वरनामदेवाच्या आधीपासूनच पंढरपूर व श्रीविठ्ठल याचा महिमा गाजत असला तरी माहात्म्यकथनास खरा प्रारभ सताच्या वाङ्मयातूनच होत राहिला श्रीज्ञानेश्वर महाराजानी या क्षेत्राबद्दल आपल्या एका अभगात म्हटले आहे, 'बापतीर्थ पंढरी। भूवैकुठ महीवरी । भक्त पुडलिकाचे द्वारीं । कर कटावरी राहिला 'पुन दुसऱ्या एका अभगात ते म्हणतात, 'पंढरीसी कीर्तन करी । पुडलीकासी नमस्कारी । विठ्ठलचरण अतरी धरी । धन्य जन्म तयाचा ' ज्ञानेश्वरनामदेव यांच्या काळापासून या पंढरपूर क्षेत्राचे माहात्म्य विशेष रुपाने गर्जत राहिले पंढरपूर हे क्षेत्र म्हणजे या भूमीवरील वैकुठनगरी अशी सर्वांचीच समजूत आहे नामदेव हही धद्याने व्यापारी व दुकानदार, त्यानीही तुकोबाप्रमाणेच 'इनामाची भरली पेठ । भूवैकुठ पंढरी' असे म्हटले आहे या क्षेत्रात सर्व पातकाचा नाश होतो येथील देवळे पाषाण, तृण या सर्वांनाच देवाचेच स्वरूप प्राप्त झालेले असते अशा नामदेवाची साक्ष असून ' अनत तीर्थांचे माहेर । अनत रूपाचे सार ।' म्हणजे हे पंढरपूर असे त्यानी म्हटले आहे 'झळझळित सोनसळा । कळस देखिला सोज्वळा । बरवे बरवें पंढरपुर । विठोबारायाचे नगर ', 'सर्व सुखरासी भिवरेच्या तिरीं । आमुची पंढरी कामधेनू ' अशा शब्दात नामदेवानी पंढरीचे वर्णन मोठ्या काव्यमय भाषेत केले आहे त्यानाही या क्षेत्रापुढे मुक्तिसुख अथवा ब्रह्मसुख याची पर्वा नाही त्यानी एका अभगात स्पष्टपणे म्हटले आहे की, ' आम्हीं स्वर्गसुख मानू जैसा ओक । देखोनियां सुख पंढरीचे । नलगे वैकुठ न घाडू कैलास । सर्वस्वाची आस देवापायीं । ' तुकारामबुवाचेही अनेक अभग पंढरपूरचे माहात्म्यकथन करणारे आहेत 'आमुची मिरास पंढरी । आमुचे घर भीमातीरीं', 'पंढरीये माझें माहेर साजणी । ओवीये काडणीं गाऊ गीत', 'पंढरीचे वारकरी । ते अधिकारी मोक्षाचे', 'पंढरीचा महिमा । देता आणीक उपमा । ऐसा ठाव नाहीं कोठें । देव उभाउभीं भेटे' इत्यादी शब्दात या पंढरपूर क्षेत्राचे वर्णन तुकारामबुवानीही केलेले आहे

१९२७ विचार नाहीं नर खर तो तैसा । वाहे ज्ञान पाठी भार लगड तैसा ॥ १ ॥
वादावाद करणे त्यासी तोच वरी । गुखाडोची चाड सरे तोच बाहेरी ॥ २ ॥
सौभाग्यसपन्न हो का वृद्ध प्रतिष्ठ । चिकस्लनि[1] साडी पाया लागली ते विष्ठ ॥ ३ ॥
नाही याति कुळ फासे ओढी तयासी । तुका म्हणे काय मुद्रासोग जाळिसी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – खर–गाढव, लगड–ओझे, गुखाडीची–घाणेरड्या जागेची, चाड–किमत

अर्थ – ज्या माणसाला परमार्थाचा विचारच माहीत नाही, तो मनुष्य असूनही गाढवाप्रमाणेच होय उगाच पाठीवर ब्रह्मज्ञानाचे ओझे वाहणारा मानव तो समजावा १ बाहेरच्या घाणेरड्या जागाची सवय असल्याप्रमाणे त्याला नेहमीच वादविवाद करणे आवडते २ अशा प्रकारचा मनुष्य, मग तो जरी भाग्यवान, श्रीमत, वृद्ध, प्रतिष्ठावान असला तरी त्याचा धि कार पायास लागलेल्या विष्ठेप्रमाणे करावा ३ जो नुसतेच फासे ओढतो, त्याला याती, कूळ यांची प्रतिष्ठा कधीच नसते तुकाराम महाराज म्हणतात, त्याच्या माळामुद्राच्या सोंगाला काय जाळायचेय ? ४

१९२८ देव होसी तरी आणिकाते करिसी । सदेह येविशीं करणे न लगे ॥ १ ॥
दुष्ट होती तरी आणिकातें करिसी । सदेह येविशीं करणे न लगे ॥ २ ॥
तुका म्हणे जे दर्पणीं विवले । ते तया बाणलें निश्चयेंसीं ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा – आणिकातें–इतराना, दुसऱ्याना, दर्पणीं–आरशामध्ये

[1] चिकस्लनि

सु गाथा ६४

अर्थ – तू जर खरोखरच देव होण्याच्या मार्गात असशील व त्याप्रमाणें होशील, तर मग तू स्वतःच्या संगतीने इतरानाही देव करून सोडशील १ आणि तू जर दुष्टच झालास तर, मग इतरानाही तू तसेच दुष्ट बनवशील, याबद्दल तू शंका धारण करू नयेस २ तुकाराम महाराज म्हणतात, ज्याचे जसे रूप असेल, तसे ते आरशात प्रतिबिंबित होत राहील ३

११२९ कलिधर्म मागें सांगितले संतीं । आचार सांडिती द्विज्लोक ॥ १ ॥
तेचि कळो आतां येतसे प्रचिती । अधर्मा टेंकती धर्म नव्हे ॥ २ ॥
तप व्रत करितां लागती सायास । पाळितां पिंडास गोड वाटे ॥ ३ ॥
देव म्हणऊनी न येती देऊळा । संसारा वेगळा तरी कां नव्हे ॥ ४ ॥
तुका म्हणे मज धरितां गुमान । ऐसे कोणी जन नरका जाती ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – कलिधर्म–कलियुगातील धर्म द्विजलोक–ब्राह्मण लोक, पिंडास–शरीरास, गुमान–पर्वा, चौकशी

अर्थ – कलियुगात अधर्मच सर्वत्र पसरेल, असे मागेच सत्पुरुषानी व ऋषिमुनींनी सांगितले आहे ब्राह्मण लोक या कलियुगात स्वतःचा आचारधर्म सोडून वागतील १ त्याचीच प्रचीती आता येत राहिली आहे सर्वजण धर्म सोडून अधर्माचाच आधार धरू लागले आहेत २ तपश्चर्या व व्रते वगैरे करण्यास फारच परिश्रम पडत असल्यामुळे देहाचे लाड करून त्यास वाढविणे यातच त्याला गोडी वाटते ३ ते स्वतःच देव समजत असल्याने देवळात जाण्याची त्याना गरजच वाटत नाही संसारापासून वेगळेही ते कधी निघत नाहीत ४ तुकाराम महाराज म्हणतात, मी जर याची चौकशी केली तर असे जे कुणी असतील ते खात्रीने नरकासच जातील ५

११३० नमो विष्णुविश्वरूपा मायबापा । अपारा अमुपा पांडुरंगा ॥ १ ॥
विनवितो रंक दास मी सेवक । वचन तें एक आइकावें ॥ २ ॥
तुझी स्तुति वेद करितां भागला । निवातचि ठेला नेति नेति ॥ ३ ॥
ऋषि मुनि बहु सिद्ध कविजन । वर्णितां ते गुण न सरती ॥ ४ ॥
तुका म्हणे तेथें काय माझी वाणी । जे तुझी वाखाणी कीर्ती देवा ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – अपार–ज्याचा अंत लागत नाही असा अमूपा–ज्याचे मापच करता येणार नाही असा, रंक–गरीब, वाखाणी–नावाजणी करील

अर्थ – सर्व विश्वास व्यापून असणाऱ्या विश्वरूपा, विष्णू, मायबापा, तुला नमस्कार असो तुझ्या रूपास अंत नाही तुझे माप करता येत नाही १ मी देवा, तुझा गरीब दास व सेवक असून तुला मी विनंती करीत आहे माझे एक वचन तुम्ही ऐकावे २ देवा, तुझी स्तुती करीत असताना वेद थकून जातात 'नेति नेति' म्हणून ते स्तब्धच राहिले ३ अनेक ऋषिमुनी, अनेक सिद्ध, अनेक कविजन, हे जरी तुझे गुणगान करीत असले तरी तुमचे संपूर्ण वर्णन होऊ शकत नाही ४ तुकाराम महाराज म्हणतात, देवा अशा परिस्थितीत तुझ्या कीर्तीचे वर्णन करावे, तुझ्या कीर्तीची वाखाणणी करावी, हे माझ्या वाणीला कसे जमणार ? ५

११३१ अंतरींचा भाव जाणोनिया गुज । तैसें केलें काज पांडुरंगा ॥ १ ॥
घातलें वचन न पडेचि खालीं । तूं आम्हां माउली अनाथांची ॥ २ ॥
मज याचकाची पुरवावी आशा । पंढरीनिवासा मायबापा ॥ ३ ॥
नाशिली आशंका माझिया जीवाची । उरली भेदाची होती कांहीं ॥ ४ ॥
तुका म्हणे आतां केलों मी निर्भर । गाईन अपार गुण तुझे ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – गुज–गुह्य गोष्ट रहस्य, काज–कार्य, निर्भर–पूर्ण

अर्थ – देवा, माझ्या अंतःकरणातील रहस्य तुम्ही जाणलेत व त्याप्रमाणे कार्य केलेत १ आम्ही जी जी वचने बोललो, ती ती तुम्ही काही खाली पडू दिली नाहीत तू आम्हां अनाथांची माउलीच आहेस २ माझ्यासारख्या याचकाची सर्व आशा पंढरीनिवासा, मायबापा, तुम्ही पुरविली ३ माझ्या मनातील सर्व शंका देवा, तुम्ही दूर केल्यात भेदभावाची काही शंका होती, तीही तुम्ही उरू दिली नाही ४ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तुम्ही मला तुमच्या कृपेने आता परिपूर्ण केले आहे मी आता तुझेच अपार असे गुणगान करीन ५

११३२ उदार कृपाळ अनाथाचा नाथ । ऐकसी मात शरणागता ॥ १ ॥
सर्व भार माथा चालविसी त्याचा । अनुसरलीं वाचा काया मनें ॥ २ ॥
पाचारिता उभा राहासी जवळी । पाहिजे ते काळीं पुरवावें ॥ ३ ॥
चालता ही पंथ सांभाळिसी वाटे । वारिसील काटे खडे हाने ॥ ४ ॥
तुका म्हणे चिंता नाही तुझ्या दासा । तू त्याचा कोंवसा सर्वभावें ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – मात–हकीगत कोंवसा–आश्रयाचे स्थान

अर्थ – देवा, तू अतिशय उदार आहेस, कृपाळू असून अनाथांचा नाथ आहेस माझ्यासारख्या शरणागताची हकीगत तू ऐकत असतोस १ जे तुला कायावाचामनेकरून अनुसरतात, त्याचा सर्व भार तू आपल्या मस्तकावर वाहतोस २ त्यांनी तुला हाक मारिली की, तू जवळ येऊन उभा राहतोस त्यांना जे ज्या वेळी हवे असेल, ते त्या काळी तू देतोस ३ ते तुझे भक्त रस्त्याने निघाले की तू त्यांचा सांभाळ करतोस, त्यांच्या पायांना वाटेतील काटे बोचू नयेत म्हणून ते तू आपल्या हातांनी दूर करतोस ४ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तुझ्या दासांना कसलीही चिंता नसते कारण तू सर्वभावे त्यांचा आश्रयदाताच आहेस त्यांचे आश्रयस्थान तूच आहेस ५

११३३ काय कीर्ती करूं लोक दंभ मान । दाखवीं चरण तुझे मज ॥ १ ॥
मज आता ऐसें नको करूं देवा । तुझा दास जावा वाया विण ॥ २ ॥
होइल थोरपण जाणीवेचा भार । दुरावेन दूर तुझ्या पायीं ॥ ३ ॥
अंतरींचा भाव काय कळे लोकां । एक मानी एकां देखोवेखीं ॥ ४ ॥
तुका म्हणे तुझे पाय आतुडती । ते मज विपत्ति गोड देवा ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – जाणिवेचा–ज्ञानाचा देखोवेखीं–वरवरचा आतुडती–प्राप्त होतील, विपत्ती–दारिद्र्य

अर्थ – देवा, मोठी कीर्ती, लौकिक लोकांकडून सन्मान, दंभ इत्यादींना घेऊन काय करू मी ? मला फक्त तुझे चरण दाखीव १ हा तुझा दास आता व्यर्थ जाईल असे देवा, आता मजविषयी काहीही करू नकोस २ मला या ज्ञानाचा फार मोठा भार उगाचच होऊन मी मात्र तुझ्या पायांना मुकेन, असे होऊ देऊ नकोस ३ अंतरंगातील भाव काय लोकांना सहजासहजी समजतो की काय ? मानसन्मान हा एक दुसऱ्याला वरवरचाही दाखविता येतो ४ तुकाराम महाराज म्हणतात देवा, जर तुझे पाय प्राप्त होतील तर मग दारिद्र्यासारखे संकटही मला गोड वाटेल ५

११३४ मानावया जग व्हावी द्रव्यमाया । नाहीं हे माझिया जीवा चाड ॥ १ ॥
तुझ्या पायासाटीं केली आराणूक । आना काहीं एक नको दुजें ॥ २ ॥
करूनिया कृपा करीं अंगीकार । न करीं उशीर आता देवा ॥ ३ ॥
नव्हे साच काहीं कळों आलें मना । म्हणोनि वासना आवरिली ॥ ४ ॥
तुका म्हणे आता मनोरथ सिद्धी । माझे कृपानिधी पाववावे ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – द्रव्यमाया–सपत्तीचा साठा, धनाची जपणूक, आराणूक–विश्राती, अगीकार–स्वीकार, साच–खरे

अर्थ – जगामध्ये मानसन्मान हवा असेल तर जवळ काही धनाची जपणूक हवी सपत्ती जवळ असेल तरच मानसन्मान मिळेल आणि माझ्या मनात तर याची इच्छा बिलकुल नाही १ मी आजपर्यंत तुझ्याच पायाशी विश्रातीचे स्थान मिळविलेले आहे आता मला दुसरे काही एक नको २ देवा, माझ्यावर कृपा करून माझा स्वीकार करावा ना तुम्ही आता तुम्ही या बाबतीत उशीर लावू नये ३ देवा, तुमच्याशिवाय दुसरे काहीच खरे नाही, असे एक माझ्या मनास समजून आले आहे म्हणून मी आपली वासना आवरून धरलेली आहे ४ तुकाराम महाराज म्हणतात, आता माझी सर्व इच्छा कृपानिधी, परमेश्वरा तुम्ही पूर्ण करावी अशी प्रार्थना आहे ५

११३५ आता माझा सर्वभावे हा निर्धार । न करीं विचार आणिकासी ॥ १ ॥
सर्वभावे नाम गाईन आवडी । सर्व माझी जोडी पाय तुझे ॥ २ ॥
लोटागण तुझ्या घालीन अगणी । पाहीन भरोनि डोळे मुख ॥ ३ ॥
निर्लज्ज होऊनि नाचेन रगणीं । येऊ नेदी मनीं शका काहीं ॥ ४ ॥
अकित अकिला दास तुझा देवा । सकल्प हा जीवा तुका म्हणे ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – जोडी–प्राप्ती, अकित–स्वाधीन

अर्थ – आता मी सर्व भावाने माझा एकच निश्चय केला आहे आता दुसऱ्या कोणत्याही साधनाचा विचार मी करणार नाही १ मोठ्या प्रेमाने व सर्व भावाने देवा, मी आता तुमच्याच नामाचे गान करीन व तुमचे पाय हीच माझी सर्वश्रेष्ठ प्राप्ती आहे असे समजेन २ देवा, मी तुझ्या अगणात लोटागण घालीन डोळे भरून मी तुझे मुख पाहीन ३ कसली लाज मनात न आणता देवा, मी तुझ्या भोवती नृत्य करीन मनात कसली शका येऊ देणार नाही ४ देवा, मी तुमच्या स्वाधीन झालेला तुमचाच एक दास असून तुकाराम महाराज म्हणतात, हाच एक सकल्प माझ्या मनात नादत आहे ५

११३६ जनीं जनार्दन ऐकतो हे मात । कैसा तो वृत्तात न कळे आम्हा ॥ १ ॥
जन्म जरा मरण कवण भोगी भोग । व्याधि नाना रोग सुखदु खें ॥ २ ॥
पापपुण्यें शुद्धाशुद्ध आचरणे । ही कोणाकारणे कवणे केलीं ॥ ३ ॥
आम्हा मरण नाश तू तव अविनाश । कैसा हा विश्वास साच मानूं ॥ ४ ॥
तुका म्हणे तूचि निवडीं हा गुढार । दावावी साचार तेंचि मज ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :–जनीं–लोकात, मात–हकीगत, गुढार–गूढ गोष्ट

अर्थ –लोकात, किवा या सबध विश्वात एक परमेश्वर भरून राहिलेला आहे, अशी गोष्ट किवा हकीगत ऐकतो खरी, परतु ही काय परिस्थिती आहे हे मला समजत नाही १ तर तोच जर सर्वत्र असेल तर, जन्म घेतो कोण ? तो तर अमर आहे तर कोण मरतो ? तो तर अविनाशी आहे, तर नाना प्रकारच्या व्याधींनी व दु खानी कोण ग्रस्त झालेला असतो ? नाना प्रकारचे भोग भोगणारा तरी कोण असतो ? २ तोच जर सर्वत्र वस्ती करून आहे तर मग पापपुण्य, शुद्धाशुद्ध आचरण ही मग कुणासाठी कुणी केली आहेत ? ३ आम्हा सर्वांना मरण व नाश आहे, व तू मात्र अविनाशी आहेस यावर विश्वास ठेवून मी ते खरे कसे मानू देवा ? ४ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, या गूढ गोष्टीचा निवाडा तूच कर काय खरे असेल ते मला निवडून दावीव ५

११३७ यथार्थ वाद साडूनि उपचार । बोलती ते अघोर भोगितील ॥ १ ॥
चोरा धरिता सागे बुठोन्याचे नाव । दोघाचे ही पाव हात जाती ॥ २ ॥
तुका म्हणे असे पुराणीं निवाड । माझी हे बडबड नव्हे काहीं ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा :–यथार्थ–खरे, अघोर–घोर नर्क, कुठोऱ्याचे–कोठारीचे, मालकाचे.

अर्थ :–नीट खरे असेल ते यथार्थपणे न सांगता उगाच लोकांना आवडतील अशा थायफळ गोष्टी सांगतील ते महा भयानक अशा नर्कास जातील. १ एखाद्या चोराला धरल्यास तो आपल्याच मालकाचे किंवा प्रभुसाचे नाव सांगतो, मग दोघांनाही बंदिवासाची शिक्षा भोगावी लागते. २ तुकाराम महाराज म्हणतात, असा निवाडा पुराणांनीच केलेला आहे. ही काही केवळ माझीच अशी बडबड नाही. ३

११३८ धीर तो कारण साह्य होतो नारायण । नेदी होऊं सीण वाहों चिंता दासांसी ॥ १ ॥
सुखें करावें कीर्तन हर्षे गावे हरिचे गुण । वारी सुदर्शन आपणचि कळिकाळ ॥ २ ॥
जीव वेची माता बाळा जडभारी होतां । तो तों नव्हे दाता प्राकृतां यां सारिखा ॥ ३ ॥
हें तों माझ्या अनुभवें अनुभवा आलें जीवें । तुका म्हणे सत्य व्हावें आहाच नये कारणा ॥४॥

शब्दार्थ व टीपा :–जडभारी–मोठे दुखणे, सकट, प्राकृत–साधारण, आहाच–उगाच.

अर्थ :– या भक्तिमार्गात किंवा परमार्थविचारात जो धीर धरून वागतो, त्यासच नारायणाचे साह्य कार्य रूपाने होते. तो आपल्या दासांना कधीही शीण होऊ देत नाही, की दासांना चिंता करू देत नाही. १ त्याच्या भक्तांनी सुखात राहून कीर्तन करावे, मोठ्या आनंदाने परमेश्वराचे गुणगान गावे. मग तोच स्वतः आपल्या सुदर्शनाच्या साह्याने प्रत्यक्ष यमाचेही संकट दूर करितो. २ स्वतःच्या मुलावर काही मोठे संकट अथवा दुखणे जर कोसळले, तर त्यातून त्याला मुक्त करण्यासाठी त्याची आई जीव टाकते आणि हा दाता ईश्वर या सर्वसाधारण आई-सारखा नव्हे. तो आपल्या भक्ताची यापेक्षाही फार काळजी घेतो. ३ हे सर्व माझ्या अनुभवास आले आहे. तुकाराम महाराज म्हणतात, हे सर्व सत्यच आहे. माझे हे काही उगाच तुम्हांस सांगत आहे असे नाही. ४

११३९ पुढें आतां कैचा जन्म । ऐसा श्रम वारेसा ॥ १ ॥
सर्वथाही फिरों नये । ऐसी सोय लागलिया ॥ २ ॥
पांडुरंगा ऐसी नाव । तारूं भाव असतां ॥ ३ ॥
तुका म्हणे चुकती[1] बापा । पुन्हा खेपा सकळा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– वारेसा–निवारण होईल असा.

अर्थ :– जन्ममृत्यूच्या खेपाचा श्रम निवारण होईल, असा यापुढे आपणांस कोणता जन्म येईल. १ अशी सोय या मनुष्यजन्मात प्राप्त झालेली असल्यामुळे उगाच वणवण करीत फिरू नये. २ भवसागरातून तरून नेणारी या पांडुरंगासारखी नाव भक्तिभावामुळे आपणास आता प्राप्त झाली आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तेव्हा या देवास मनोभावे धारण केल्याने पुन. पुन: जन्मास येण्याचे सकट मग टळेल. ४

११४० दुध दहीं ताक पशूचें पाळण । त्यांमध्यें कारण घृतसार ॥ १ ॥
हेंचि वर्म आम्हां भाविकांचे हातीं । म्हणऊनि चित्तीं धरिला राम ॥ २ ॥
लोहो कफ गारा अग्नीचिया काजें । येऱ्हवी तें ओझें कोण वाहे ॥ ३ ॥
तुका म्हणे सोरीं पाहारा जतन । जोंवरि हें धन हातीं लागे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– घृतसार–तूप हे सार, लोहो–लोखंड, कफ–कापूस.

अर्थ :– गाईम्हशींचे पालन कशासाठी करायचे असते ? त्यांच्यापासून दूध, दही, ताक वगैरे पदार्थ मिळतात म्हणूनच त्यांची जोपासना आपण करतो. कारण या सर्वांत तुपासारखा पदार्थ हे सारभूत तत्त्व आहे. १ याच तुपाप्रमाणे हे वर्म श्रीहरीचे आमच्या हाती आलेले असल्यामुळे आम्ही आमच्या चित्तात या रामप्रभूस धारण केलेला

[1] चुकवी.

आहे २ लोखंड, कापूस, गारगोटी याचे साह्य अग्नी निर्माण करण्यासाठी होत असते, म्हणूनच त्याचे ओझे वाग वायचे असते एरव्ही कोण त्याची पर्वा करते ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, भूमिगत धन हातात येईपर्यंतच खोरी पहार वगैरे साधने जपून ठेवायची असतात ४

११४१ वीर विठ्ठलाचे गाढे । कळिकाळ पाया पडे ॥ १ ॥
करिती घोष जयजयकार । जळती दोषाचे डोंगर ॥ २ ॥
क्षमा दया शांति । बाण अभंग हे हातीं ॥ ३ ॥
तुका म्हणे बळी । तेचि एक भूमंडळी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – गाढे–शूर, कळिकाळ–यम

अर्थ – या विठ्ठलाचे हे सेवक मोठे शूर असून प्रत्यक्ष यमही त्यांच्या पाया पडत असतो १ ते नेहमी या विठ्ठलाचाच जयजयकार करीत असतात, दोषाचे डोंगरच्या डोंगर त्यामुळे जळून जातात २ या वीर भक्ताच्या हातात दया, क्षमा शांती हेच अभंग, न तुटणारे असे बाण असतात ३ तुकाराम महाराज म्हणतात, या जगतात हे वीर भक्तच अतिशय बलवान म्हणून प्रसिद्ध आहेत ४

११४२ ऐके रे जना तुझ्या स्वहिताच्या खुणा । पंढरीचा राणा मनामाजी स्मरावा ॥ १ ॥
मग कैंचे रे बंधन वाचे गाता नारायण । भवसिंधु तो जाण येचि तीरीं सरेल ॥ २ ॥
दास्य करील कळिकाळ बंद[1] तुटेल मायाजाळ । होतील सकळ रिद्धिसिद्धी म्हणियारी ॥३॥
सकळशास्त्राचे सार हे वेदाचे गव्हर । पाहाता विचार हाचि करिती पुराणे ॥ ४ ॥
ब्राह्मण क्षत्रिय वैश्य शूद्र चांडाळा आहे अधिकार । बाळें नारीनर आदि करोनि वेश्या ही॥५॥
तुका म्हणे अनुभवे आम्ही पाडियले ठावे । आणीक ही दैवे सुख घेती भाविके ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – तीरीं–काठावर बंद–बंधन म्हणियारी–म्हणण्याप्रमाणे वागणाऱ्या, गव्हर–रहस्य, मुख्य अर्थ

अर्थ – लोकहो, तुम्ही आता स्वहिताच्या खुणा कोणत्या त्या नीट ऐका केवळ पंढरीचा राणा मनामध्ये स्मरा म्हणजे झाले १ या नारायणाचे गुणगान गाताना मग कसले आले आहे बंधन ? मग याच्या गुणगानामुळे संसारसागर याच तीरावर संपला, असे समजायला हरकत नाही २ कळिकाळ हा तुमचे दास्य करील माया जाळाचे बंधन सुटेल आणि सर्व रिद्धीसिद्धी तुमच्याच म्हणण्याप्रमाणे वागणाऱ्या होतील ३ सर्व शास्त्राचे व वेदाचे सार ते हेच रहस्य होय हाच मुख्य अर्थ होय पुराणाचाही विचार हाच आहे ४ वर सांगितलेल्या साधनाचा अधिकार सर्वांना आहे ब्राह्मण क्षत्रिय वैश्य, शूद्र, चांडाळ या सर्वांना या विठ्ठलाच्या नामाचा अधिकार आहे लहान मुले पुरुष स्त्रिया इतकेच नव्हे तर, वेश्यानाही याचा अधिकार आहे ५ तुकाराम महाराज म्हणतात आम्हास अनुभवाने ही सर्व माहिती झालेली आहे या सुखाचा अनुभव इतर जी भाविक व सुदैवी माणसं आहेत ती घेतात ६

विवरण –भक्तीच्या क्षेत्रात कुणा कुणास अधिकार आहे याचा पुन पुन उच्चार तुकारामासारखे संत करीत असतात ईश्वराच्या प्राप्तीसाठी केवळ उच्चवर्णीयानाच अधिकार असे खालच्या वर्गास किंवा हीन जातीच्या लोकांना परमेश्वराचे दार युगानुयुग कर्मठ लोकांनी जणु बंद केले होते स्वर्गप्राप्तीसाठी अथवा मोक्षसाधनेसाठी वेदादी ग्रंथातून पहिल्या तीन वर्णातील पुरुषानाच अधिकार प्राप्त झालेले दिसतात सर्वसामान्याचा शूद्र वर्ग व स्त्रिया याना हे अधिकार परंपरेप्रमाण नाहीत वेदउपनिषद वगैरे ग्रंथातून मैत्रेयी गार्गी वगैरे स्त्रियाची नावे असल्यामुळे हे बंधन नंतरच्या काळातील असावे

[1] बंध

परंतु नंतर ही उणीव भरून काढण्याचा पहिला प्रयत्न गीतेमध्ये झाला. जातीचा, वर्णाचा, स्त्रीपुरुषादी भेदाचा किंवा इतर कसलाही फरक न करता सद्‌गती देणारा भगवद्‌भक्तीचा मार्ग सर्वांना सहज व सुलभ करून दिला तो या गीताप्रणीत भागवतधर्मानेच होय. 'स्त्रियो वैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यान्ति परां गतिम्' असा निर्णय भगवद्‌गीतेने दिलेला आहे. स्त्रिया, वैश्य व शूद्र याच्याबरोबर अन्त्यजादी पापयोनी याचाही उल्लेख आहे. याप्रमाणे समाजातील सर्व वर्णांतील लोकांना मोक्षाचे द्वार खुले झाले होते. तोच नेमका आधार घेऊन भागवतधर्मीय संतानी हा मार्ग सहज सुलभ करून सोडला. 'ब्राह्मण क्षत्रिय वैश्य शूद्र । चांडाळां आहे अधिकार । बाळें नारीनर आदि-करोनि वेश्यादि' असा त्याचा खुलासा तुकारामबुवांनी या अभंगात केलेला आहे. हिंदुधर्माप्रमाणे बौद्धधर्मातही वेश्येसही या मार्गाची प्राप्ती सुगम झालेली दिसते. बुद्धाने आम्रपाली या वेश्येस व अंगुलीमाल नावाच्या चोरासही दीक्षा दिली असल्याची हकीगत सापडते. पिंगलादी वेश्यांचा संदर्भ या ठिकाणी ध्यानात राहण्यासारखा आहे. कान्होपात्रा ही तर एका नायकिणीची मुलगी होती. आपल्या दुष्कृत्याबद्दल पूर्णपणे पश्चात्ताप व ईश्वरावर संपूर्ण विश्वास, यामुळे मोक्षाची दारे सर्वांनाच या भक्तिमार्गामुळे खुली झाली

११४३ न करीं तळमळ राहें रे निश्चळ । आहे हा कृपाळ स्वामी माझा ॥ १ ॥
अविनाश सुख देईल निर्वाणी । चुकतील खाणी चौऱ्यांशींच्या ॥ २ ॥
आणिकियां जीवां होईल उद्धार । ते ही उपकार घडती कोटि ॥ ३ ॥
आहिक्य परत्रीं होसील सरता । उच्चारीं[१] रे वाचा रामराम ॥ ४ ॥
तुका म्हणे सांडीं संसाराचा छंद । मग परमानंद पावसील ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– निर्वाणी–अखेरीस, आहिक्य–या लोकात, परत्र–परलोकात.

अर्थ :– काही एक तळमळ न करिता तू आपले मन शांत व स्वस्थ करून तू आता स्थिर हो हा माझा स्वामी मोठा कृपाळू आहे. १ हा तुला अखेरीस अविनाशी असे प्रेमसुख देईल व त्यामुळे तुझ्या चौऱ्याऐंशी लक्ष जन्मांच्या खेपा चुकतील. २ तुझ्या स्वतःच्या अशा उद्धारामुळे आणखीही पुष्कळ लोकांचा उद्धार होईल व तुझ्या हातून कोट्यवधी उपकार घडतील. ३ या लोकी व परलोकीही तुझी मान्यता वाढेल. यासाठी पण तू मुखाने राम राम असे शब्द म्हणत राहा. ४ तुकाराम महाराज म्हणतात, तू या संसाराचा लोभ मात्र सोडून दे. तरच तुला परमावधीचा आनंद प्राप्त होईल. ५

दयाळ मयाळ जाणे कळवळा । शरणागतां ळळा राखों जाणे ॥ ३ ॥
न लगे मागणें सांगणें तयासी । जाणे इच्छा तैसी पुरवी त्याची ॥ ४ ॥
तुका म्हणे लेईं अळंकार अंगीं । विठ्ठल हा जगीं तूंचि होसी ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– निश्चळ–स्थिर.

अर्थ :– एके ठिकाणी तू स्थिर बसून त्या श्रीहरीचे ध्यान कर. तो तुला भरपूर अन्नवस्त्र देईल. १ आम्हांस अधिक वस्तूंचा संग्रह करून काय करायचेय ? आम्हांस सर्वकाही पुरविणारा देव आमचा ऋणी झाला आहे. २ हा देव मोठा दयाळू व ममताळू असल्याने त्याला आमचा कळवळा मोठाच आहे. शरण आलेल्याचे रक्षण कसे करावे हे तो चागले जाणतो. ३ त्या देवास काही मागावे लागत नाही, सांगावे लागत नाही. कारण तो ज्याची जी इच्छा असेल त्याप्रमाणे पूर्ण करीत असतो. ४ तुकाराम महाराज म्हणतात, तू आपल्या वाणीवर या विठ्ठलाचाच अलकार घाल. त्यामुळे या जगात तू स्वत.च विठ्ठल होऊन जाशील ५

११४६ सोनियांचा कळस । माजी भरिला सुरारस ॥ १ ॥
काय करावें प्रमाण । तुम्ही सांगा संतजन ॥ २ ॥
मृत्तिकेचा घट । माजी अमृताचा सांट ॥ ३ ॥
तुका म्हणे हित । तें मज सांगावें त्वरित ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– कळस–भाडे, पात्र, सुरारस–दारूसारखे पेय, मृत्तिकेचा–मातीचा, सांट–साठा.

अर्थ – चांगले सोन्याचे भाडे आहे; पण आत मात्र दारूसारखे पेय भरलेले आहे १ तुम्ही सतलोक, मला सांगा त्या सुवर्णाच्या भांड्याच्या किमतीचा व देखणेपणाचा काही उपयोग आहे का ? २ उलट मातीचेच वेडे-वाकडे मडके आहे परतु आत मात्र अमृताचा साठा आहे. तोच महत्त्वाचा मानावा लागेल. ३ तुकाराम महाराज म्हणतात, या दोहोंपैकी हित कशात आहे, ते मला तुम्हीच सागा ४

## सेतावर–अभंग ३.

११४७ सेत करा रे फुकाचें । नाम विठोबारायाचें ॥ १ ॥
नाहीं वेठी जेवा सारा । जाहाती नाहीं म्हणियारा ।
सरिक नाहीं रे दुसरा । धनी सारा तुझा तूं ॥ २ ॥
जपतप नागरणी । न लगे आटी दुनवणी ॥ ३ ॥
कर्म कुळवणी । न लगे धर्मपाळी दोन्ही ॥ ४ ॥
ज्ञानपाभारी ती फणी । न लगे करावी पेरणी ॥ ५ ॥
बीज न लगे सचिताचे । पीक पिकले ठायींचें ॥ ६ ॥
नाहीं यमाचें चोरटें । विठ्ठल पागोऱ्याच्या नेटें ॥ ७ ॥
पीक न वजे हा भरवसा । करी उद्वेग[१] तो पिसा ॥ ८ ॥
सराई सर्व काळ । वांयां न वजे घटिकापळ ॥ ९ ॥
प्रेम पिकले अपार । नाहीं सांटवावया थार ॥ १० ॥
ऐसीये जोडी जो चुकला । तुका म्हणे धिग त्याला ॥ ११ ॥

---

१ उद्योग

शब्दार्थ व टीपा :– फुकाचें–फुकटचे, जेवा–अन्नखर्च, जाहाती–जुलूम, सरिक–भागीदार, वाटेकरी, पानीदार आटी–खटपट, श्रम, दुनवणी–पुनः नांगरणे, पाभार–शेतात बी पेरण्याचे औजार. पागान्याच्या–गोफणीमुळे.

अर्थ :– अहो, या विठ्ठलरायाच्या नामरूपाचे शेत फुकटचे तुम्ही करावे १ येथे काही बिगारीच्या लोकांचा अन्नखर्च येत नाही, किंवा सरकारला साराही द्यावा लागत नाही. कुणाची हुकुमी जुलूमजबरदस्तीही येथे नाही या शेताच्या उत्पन्नात दुसरा कुणी वाटेकरीही नाही. तूच एक या सर्व शेताचा धनी आहेस. २ या शेतासाठी जप-तपादी साधनांची नांगरणी नको, पुन पुनः नांगरण्याची खटपट नको. ३ नानाविध कर्मांची कुळवणीही नको. कर्म व धर्म यांच्या कुळवणीची जरूरी नाही. ४ ज्ञानरूपी पाभारीची तिफळी नको. येथे बीसुद्धा पेरावे लागत नाही. ५ येथे संचित कर्माचे बी पेरले नाही तरी चालते. येथील नामरूपात्मक शेत मूळचेच पिकलेले आहे. ६ येथे विठ्ठल-नामाची गोफण सिद्ध असल्यामुळे यमरूपी चोरट्याची भीती नाही येथे. ७ येथे पीक कधीच बुडणार नाही, हा विश्वास आहे; विनाकारण जो काळजीच करीत असतो, तो वेडाच समजायला हवा. ८ येथे नेहमीच हंगामाचे रूप असते. येथील एक घटका किंवा पळही हंगामाखेरीज जात नाही. ९ या शेतात प्रेमाचे पीक अपरंपार आले असून, त्याचा साठा करायलासुद्धा जागा नाही. १० तुकाराम महाराज म्हणतात, अशा शेताला लाभ करून घ्यायला जो चुकला त्याच्या जगण्यालाही धिक्कार असो. ११

११४८ वोणव्या सोंकरीं । सेत खादलें पांखरीं ॥ १ ॥
तैसा खाऊं नको दगा । निदसुरा राहूनि जागा ॥ २ ॥
चोरासवें वाट । चालोनि केलें तळपट ॥ ३ ॥
डोळे झांकुनि राती । कूपीं पडे दिवसा जोती ॥ ४ ॥
पोसी वांज[1] गाय । तेथें कैंची दुध साय[2] ॥ ५ ॥
फुटकी सांगडी । तुका म्हणे न पवे थडी ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा :– वोणव्या–खाली वाकून, सोंकरीं–राखण करणाराच्या, निदसुरा–मूर्ख, अर्धवट जागा असलेला, सांगडी–नाव

अर्थ :– शेताकडे चांगले, मान वर करून लक्ष न देता, खाली वाकून जो शेताची राखण करीत असतो, त्याचे शेत कसे राखले जाणार ? ते पाखरांकडून खाल्ले जाणारच. १ याप्रमाणे मूर्ख माणसा, जागा राहून नुकसान करून घेऊ नकोस. २ चोरांच्या बरोबर वाटचाल करून उगाच आपले नुकसान का करून घेतोस ? ३ चांगला दिवसाचा प्रकाश असताना डोळे बांधून चालण्यामुळे विहिरीत पडण्याचे मात्र संकट उभे राहील. ४ वांझ गाय पोसून दुधाची साय कशी मिळणार ? ५ फुटक्या नावेच्या साह्याने तुकाराम महाराज म्हणतात, कोण पैलतीरास जाऊ शकणार ? ६

११४९ सेत आलें सुगी सांभाळावे चारी कोण । पिका आलें परी केलें पाहिजे जतन ॥ १ ॥
सोंकरीं सोंकरीं विसावा तोंवरी । नको खाऊं उभें आहे तों ॥ २ ॥
गोफणेसी गुंडा घाली पागोऱ्याच्या नेटें । पळती हाहाकारें अवघीं पांसरांचीं थाटें ॥ ३ ॥
पेटवूनि आगटी राहें जागा पालटूनि । पडिलिया मान वळ वुद्धि व्हावीं दोनी ॥ ४ ॥
खळे दानें विश्व सुख करीं होतां रासी । सारा सारूनियां ज्याचे भाग देईं त्यासी ॥ ५ ॥
तुका म्हणे मग नाहीं आपुलें कारण । निज आले हातां भूस सांडिलें निकण ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा :– सुगी–हंगामात, कोण–कोपरे, थाटें–थवे

[1] वांझ, सोय.

तु. गाथा . ६५

अर्थ – हे हरिनामाचे शेत चांगले हंगामाला आले आहे. चारही कोपऱ्यांपर्यंत याची राखण करावी. चांगले पीक आले असल्याने याची राखण मात्र नीट केली पाहिजे. १. यासाठी या शेताचा नीट सांभाळ करावा. पीक उभे आहे, तोपर्यंत काही विसावा घेता कामा नये. २. गोफणीस या श्रीहरीच्या नावाचा धोंडा घालून जोराने फेका. मग या नामाच्या गर्जनेने नाना विकारांच्या पाखरांचे थवेच्या थवे उडून जातात. ३. आगटी पेटवून तू जागा बदलून राहावेस. एखादे संकट आले तर बळ व बुद्धी या दोघांचेही साह्य व्हावयास हवे. ४. या शेतावरील, खळ्यावरील धान्याचे दान करून सर्व जगास तू सुखी कर. ज्याचा कर त्यास देऊन साराही चुकता कर. ५. तुकाराम महाराज म्हणतात, यानंतर काही कार्य मग उरणार नाही. कारण निजस्वरूपाचे सत्त्व हाताशी आल्यामुळे व्यर्थ असणारे भूस सांडून गेले तरी हरकत नाही. ६.

विवरण – तुकाराम महाराजांनी अनेक प्रसंगी जी रूपकात्मक रचना केली आहे, त्यांत हे शेतावरील तीन अभंग प्रसिद्ध आहेत. हे शेत म्हणजे विठ्ठलाच्या नामरूपाचे होय. अथवा मानवी देहालाही शेताचीच उपमा देऊन त्याची नीट राखण करण्यासंबंधी उपदेश केलेला असतो. पारमार्थिक दृष्टीनेच या शेतावरील रूपकात्मक अभंगाचा अर्थ लावता येण्यासारखा आहे. गीतेच्या तेराव्या अध्यायातही या शरीरालाच क्षेत्र म्हणजे शेत म्हटले आहे. या क्षेत्राचे म्हणजे पंचमहाभूतांच्या पासून झालेल्या शरीराचे रक्षण कसे व किती करावे, यासंबंधी यात विचार प्रामुख्याने येतो. मनुष्याचा देह हे एक क्षेत्र असून याचा मालक कोण, याची निगा कशी राखावी, या संबंधीचा विचार प्रामुख्याने अध्यात्मशास्त्र करीत असते. पंचमहाभूत, अहंकार, बुद्धी, अव्यक्त प्रकृती, दहा सूक्ष्म इंद्रिये, मन, पांच कर्मेंद्रिये, त्यांचे पांच विषय, इच्छा, द्वेष, दुःख, सुख, संघात, चेतना, धैर्य इत्यादी तत्त्वांचा समुदाय म्हणजे क्षेत्र, अशी व्याख्या गीतेने केलेली आहे. या क्षेत्राचे विस्ताराने निरूपण श्रीज्ञानेश्वर महाराजांनी तेराव्या अध्यायाच्या प्रारंभीच केलेले आहे.

तुकारामबुवांनी खास मराठमोळ्या भाषेत मराठी शेतकऱ्याचे रूपक या देहाच्या क्षेत्राचे वर्णन करण्यासाठी रंगविले आहे. या परमार्थामधील क्षेत्रावर, शेतावर कुणाला वेठीस धरून कामास जुंपावे लागत नाही. त्याच्या अन्नखर्चाचा प्रश्न येथे नाही. येथे कुणाला मारा द्यावा लागत नाही. येथे कुणाची जुलूमजबरदस्ती नाही. नांगरणी, कुळवणी, पाभार घेऊन पेरणी इत्यादी रूपकात्मक भाषेत त्यांनी या शेतावरील हंगामाचे वर्णन केले आहे. खाली मान घालून जो शेती राखेल, त्याचे शेत पाखरे खाऊन जातील असा एक उल्लेख क्र. ११४८ च्या अभंगात आहे. या संदर्भात तुकारामबुवांनी एका शेतकऱ्याचे व्यावहारिक जगातील शेत कसे राखले, याची आठवण होण्यासारखी आहे. या पाखरांपासून शेताचे रक्षण करण्याऐवजी शेतामुळेच, कणसातील दाण्यामुळेच, पाखरांचे रक्षण झाल्याचे पाहून तुकोबा संतुष्ट झाल्याची एक कथा त्यांच्या चरित्रात आहेच. अशा प्रकारे शेताची राखण करूनही तुकोबांचे शेत टपोऱ्या कणसांनी भरून गेलेले आहे, असाच या कथेचा शेवट आहे. तरी सुद्धा या 'शेतावरील अभंगात' मात्र त्यांनी '**वोणव्या सोंकरीं। सेत खादलें पाखरीं**' असाच इशारा दिलेला आहे.

वर डोळे ठेवून, पाखराकडे लक्ष न देता शेत राखता येणार नाही, असेच त्यांना सांगावयाचे आहे. कारण हे शेत नामरूपादीचे अथवा या मानवी देहाचे असल्याने, व पुनः पुनः न लाभणारे असल्याने महत्त्वाचे आहे. कामक्रोधादी विकारांनी अथवा चोरांनी या शेताची लुबाडणूक करू नये, असाही भावार्थ या अभंगाचा असावा. या मानव जन्मात प्राप्त झालेले हे शेत ईश्वरी कृपेने चांगले पिकवावे, चांगला हंगाम काढावा, व खळ्यावरील सर्व धान्य लोकांना देऊन आपण स्वतः तृप्त व्हावे, अशीच शिकवण शेतावरील या रूपकात्मक अभंगाच्या द्वारे तुकाराम महाराजांनी दिलेली आहे.

**११५० नका घालूं दूध जयामध्यें सार। ताकाचे उपकार तरी करा ॥ १ ॥**
**नेदा तरी हे हो नका देऊं अन्न। फुकाचे जीवन तरी पाजा ॥ २ ॥**
**तुका म्हणे मज सगुणाची चाड। पुरवा कोणी कोड दुर्बळाचें ॥ ३ ॥**

शब्दार्थ व टीपा – नेदा–देऊ नका, जीवन–पाणी, कोड–हौस

अर्थ – तुम्हाला दूध जर कुणाला द्यावेसे वाटत नसेल तर देऊ नका कारण त्यात सर्व सारसर्वस्व असते पण दुसऱ्यावर ताकाचे तरी उपकार करावेत १ जर कुणाला अन्न देण्याची शक्ती तुमची नसेल तर नका देऊ, पण फुकटचे पाणी पाजायला काय हरकत आहे ? २ तुकाराम महाराज म्हणतात, मला देवाच्या सगुण रूपाची हौस आहे माझ्यासारख्या दुर्बळाची इच्छा कुणी कधी पूर्ण करील का ? ४

# उत्तराधिपदें–२२.

११५१ क्या गाऊ कोई सुननवाला । देखें तो सब जग ही भुला ॥ १ ॥
खेलो आपने रामहिसात । जैसी वैसी करहो मात ॥ २ ॥
काहासे लाऊ मधुरा बानी । रीझे ऐसी लोक बिरानी ॥ ३ ॥
गिरिधर लाल तो भावका भुका । राग कला नहिं जानत तुका ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – भुला–चुकलेला, रामहिसात–रामाच्या बरोबर, लाऊ–आणू, बानी–वाणी, रीझे–रमेल, बिरानी–दुसरा

अर्थ – जिकडे पाहावे तिकडे सर्व जग चुकल्यासारखेच आहे कोणी ऐकणाराच नाही मी काय गाऊ मग ? १ आता आत्मारामाबरोबरच खेळत राहून जसे होईल तसे त्याच्याशीच बोलत राहू २ ज्या योगे हे विषयांत रममाण होणारे दुसरे लोक रमतील, अशी गोड वाणी मी कोठून आणू ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, गोवर्धन पर्वताला धारण करणारा तो गोपालकृष्ण शुद्ध भावाचा भुकेला आहे आणि मीही रागज्ञान जाणत नाही ४

११५२ छोडें धन मंदिर बन बसाया । मागत टुका घरघर खाया ॥ १ ॥
तीनसो हम करवो सलाम । ज्यामुख बैठा राजाराम ॥ २ ॥
तुलसीमाला बभूत चढ़ावे । हरजीके गुण निर्मल गावे ॥ ३ ॥
कहे तुका जो साईं हमारा । हिरनकश्यप उन्हे मारहि डारा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – बसाया–वस्ती करून टुका–तुकडा, तीनसों–त्याला

अर्थ – आपले घर व द्रव्य याचा त्याग करून जो वनामध्ये वस्ती करून राहिला आहे व खाण्याकरता घरोघर तुकडा मागत आहे, १ ज्याच्या मुखामध्ये निरंतर रामरामाचीच बैठक आहे, त्याला आम्ही नमस्कार करू २ तुळशीची माळ गळ्यात घालून, ज्याने अंगाला राख फासली आहे, असाच हरीचे गुण आम्ही निर्मळ मनाने गाऊ ३ तुकाराम महाराज म्हणतात की, ज्याने हिरण्यकशिपूला मारले तोच आमचा स्वामी आहे ४

११५३ मंत्रयंत्र नहिं मानत साखी । प्रेमभाव नहिं अंतर राखी ॥ १ ॥
राम कहे त्याके पगहू लागू । देखत कपट अभिमान दुर भागू ॥ २ ॥
अधिक याती कुलहीन नहिं जानू । जाने नारायन सो प्रानी मानू ॥ ३ ॥
कहे तुका जीव तन डारू वारी । राम उपासिहु बलियारी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – साखी–पत त्याके–त्याच्या पगहू–पाया याती–जाती, डारू–टाकू, बलियारी–ओवाळून टाकू

अर्थ – अंतःकरणात श्रीहरीचे प्रेम जर नसेल तर मंत्रतंत्राची पत आमच्याजवळ नसून आम्ही ती मानीतही नाही १ जो नेहमी रामभजन करील त्यालाच आम्ही भजू त्याच्याच पाया आम्ही पडू ज्याच्या ठिकाणी कपट व अभिमान आहे त्याला पाहताच आम्ही दूर पळून जाऊ २ त्याची जात, कूळ आम्ही जाणणार नाही जो

नारायणाला जाणेल, त्याच प्राण्याला आम्ही मानू ३ तुकाराम महाराज म्हणतात, जो बलवान प्रभू रामचंद्राची उपासना करतो, त्याच्यावरून जीव व शरीर आम्ही ओवाळून टाकू ४

११५४ चुराचुराकर माखन खाया । गौलनीका नंद कुमर कन्हया ॥ १ ॥
काहे वराई दिखावत मोहि । जानतहु प्रभुपना तेरा खब हि ॥ २ ॥
और बात सुन उखलसु गला । बांधलिया आपना तू गोपाला ॥ ३ ॥
फेरत बनवन गाऊ धरावत । कहे तुकयाबंधु लकरी लेले हात ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – माखन–लोणी, बराई–बढाई लकरी–काठी

अर्थ – नंदाचा मुलगा श्रीकृष्ण हा गौळणींचे लोणी चोरून खातो १ मला कशाला बढाई मारतोस ? तुझा प्रभुपणा मी जाणत आहे, त्याचे तु रक्षण कर २ हे गोपाळा, आणखी एक गोष्ट तू ऐक तू आपला गळा उखळाला बांधून घेतला आहेस ३ तुकयाबंधू म्हणतो, हातामध्ये काठी घेऊन तू रानावनात गाई वळवीत हिंडतोस ४

११५५ हरिसु मिल दे एकहि वेर । पाछे तू फिर नावे घर ॥ १ ॥
मात सुनो दुति आवे मनावन । जाया करति भर जोबन ॥ २ ॥
हरिसुख मोहि कहिया न जाये । तव तू बुझे आगो पाये ॥ ३ ॥
देखहि भाव कछु पकरि हात । मिलाइ तुका प्रभुसात ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – वेर–समय, वळ पाछे–नंतर पकरि–पकडेल, धरेल

अर्थ – एक वेळ तू आपले चित्त हरीस्वरूपात मिळव म्हणजे पुन तुला जन्ममृत्युरूपी घराकडे यावे लागणार नाही १ ह्याविषयी हकीकत अशी आहे की, ज्या वेळी यमदूत येतील, त्यावेळी तू जरी भर जवानीत असलास तरी ते तुला जायबंदी करतील २ हरीचे सुख अवर्णनीय आहे माझ्याने ते सांगवले जाणार नाही ज्या वेळेस तू परमार्थात पाऊल टाकशील, त्यावेळी तुला ते कळेल ३ तुकाराम महाराज म्हणतात, प्रभू भक्ताचा शुद्ध भाव पाहून त्याचा हात धरून आपल्याबरोबर केव्हा मिळवून घेईल हे पाहा ४

११५६ क्या कहु नहीं बुझत लोका । लिजावे जम मारत धका ॥ १ ॥
क्या जोबनेकी पकडी आस । हातो लिया नहिं तेरा घास ॥ २ ॥
किसे दिवाने कहता मेरा । कछु जावे तन तू सब ल्या न्यारा ॥ ३ ॥
कहे तुका तू भया दिवाना । आपना विचार कर ले जाना ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – बुझन–समजूत, जम–यम, दिवाना–वेडा

अर्थ – काय सांगू ! यम धक्के मारून नेईल हे लोकांना समजत नाही १ हातामध्ये घेतलेला घास मरणापूर्वी खात्रीने तोंडात घालीन, इतकी देखील सत्ता तुमच्या हातात नसून आम्ही पुष्कळ जगू, अशी आशा का बाळगली आहे २ हे वेड्या, तू सर्वांहून निराळा आहेस तू देह, स्त्री, पुत्र इत्यादी सर्व माझे असे का म्हणतोस ? ते सर्व नाहीसे होईल ३ तुकाराम महाराज म्हणतात, तू वेडा झाला आहेस लोकहो, तुम्ही आपल्या विषयी विचार करा ४

११५७ कब मरू पाऊ चरन तुम्हारे । ठाकुर मेरे जीवन प्यारे ॥ १ ॥
जग रडे ज्याकु सो मोहि मीठा । मीठा दर आनंदमाहि पैठा ॥ २ ॥
भला पाऊ जनम इन्हे बेर । बस मायाके असंग फेर ॥ ३ ॥
कहे तुका धन मानहि दारा । वोहि लिये गुडलोया पसारा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– डरे–भीते, पंठा–स्थिर होणे.

अर्थ – हे देवा, मी केव्हा मरेन व तुमच्या चरणाशी केव्हा एकरूप होईन, इतके तुम्ही मला जीवापेक्षा प्रिय आहात १ ज्याच्या सबधाने जग दु:खी होते, ते मला गोड आहे त्या गोडीचा इतका आदर आहे की, त्या योगे मी आनदात स्थिरावतो. २ या योगाने आम्ही घातल्या जन्माला जाऊ व मायेचे फेरे पूर्ण झाले म्हणून असग-पणाने राहू ३ तुकाराम महाराज म्हणतात, धन, मान व स्त्री हा सर्व पसारा मी गुडाळून टाकिला आहे. ४

११५८ दासो पाछें दौरे राम । सोवे खडा आपें मुकाम ॥ १ ॥
प्रेमसरडी वांधी गले । खैंच चले उधर ॥ २ ॥
आपने जनसु मुल न देवे । कर हि धर आघें बाट बतावे ॥ ३ ॥
तुकाप्रभु दीनदयाला । वारि रे तुज पर हुं गोपाला ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – दौरे–पळेल, खेंच–खेचणे, ओढणे, भूल न देवे–चुकून देत नाही, वारि–ओवाळून टाकू

अर्थ.– राम हा दासाच्या मागे धावतो व ते आपल्या मुक्कामावर जाऊन निजले की, तेथे उभा राहतो १ भरत प्रेमाची दोरी गळ्यात बाधून त्याला ओढीत चालवितात त्या वेळेस तो तिकडे तोड करून चालतो २ आपल्या दासाचा तो परमार्थाचा रस्ता चुकू देत नाही असावधपणे चुकू लागले तर, हात धरून त्याना परमार्थाची नीट वाटचा खवितो. ३ तुकाराम महाराज म्हणतात, माझ्या स्वामी प्रभो, तू दीनदयाळ आहेस; म्हणून हे गोपाळा, तुझ्यावरून मी आपल्याला ओवाळून टाकीन ४

११५९ ऐसा कर घर आवे राम । और धंदा सब छोर हि काम ॥ १ ॥
इतने गोते काहे खाता । जब तूं आपना भूल न होता ॥ २ ॥
अतरजामी जानत साचा । मनका एक उपर बाचा ॥ ३ ॥
तुकाप्रभु देसबिदेस । भरिया खाली नहिं लेस ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– छोर–सोड, अतरजामी–अतर्यामी, लेस–लेशमात्र

अर्थ :– ज्या योगाने तुझा राम येईल असे कर बाकीच्या धद्याविषयी सर्व इच्छा टाकून दे १ जर तू आपल्या स्वरूपाला विसरला नसतास, तर अनेक जन्ममृत्यूचे फेरे का आले असते ? २ मनात एक भाव व वाणीत दुसरा भाव, परतु हे दोन्ही भाव अतर्यामी असणारा जो परमात्मा तो जाणतो ३ तुकाराम महाराज म्हणतात माझा प्रभू देशविदेशातून भरला आहे त्याच्यावाचून एक लेशमात्र जागा रिकामी नाही. ४

११६० मेरे रामको नाम जो लेवे बारोबार । त्याके पाउं मेरे तनकी पैंजार ॥ १ ॥
हासत खेलत चालत बाट । खाना खाते सोते खाट ॥ २ ॥
जातनसुं मुजे कछु नहिं प्यार । असतेके नहिं हेदु धेड चंमार ॥ ३ ॥
ज्याका चित लगा मेरे रामको नाम । कहे तुका मेरा चित लगा त्याके पाव ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – त्याके–त्याला, पैंजार–जोडा

अर्थ – माझ्या रामाचे नाव जो वेळोवेळी घेईल, त्याच्या पायात मी आपल्या शरीराचा जोडा करून घालीन १ हसताना, खेळताना, जेवताना, पलगावर निजताना जो रामाचे नाव घेतो, २ मग तो कोणत्याही जातीचा, धर्माचा का असेना; त्याच्या जातीची, धर्माची मला प्रीती नाही. तो धेड असो अगर चांभार असो, कोणत्याही जातीचा असेना ३ तुकाराम महाराज म्हणतात, ज्याचे चित्त माझ्या रामाच्या नामाकडे लागले आहे, त्याच्या पायाच्या ठिकाणी माझे चित्त जडो ४

११६१ आप तरे त्याकी कोण बराई। औरनकुं भलो नाम घराई ॥ १ ॥
काहे भूमि इतना भार राखे। दुमत धेनु नहिं दुध चाखे ॥ २ ॥
बरसते मेघ फलतेहैं बिरखा। कोन काम आपनी उन्होति रखा ॥ ३ ॥
काहे चंदा सुरज खावे फेरा। खिन एक बैठन पावत घेरा ॥ ४ ॥
काहे परिस कंचन करे धातु। नहिं मोल तुटत पावत घातु ॥ ५ ॥
कहे तुका उपकारहि काज। सब कररहिया रघुराज ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा :- तरे-तरतो, खिन-क्षण

अर्थ - जो आपण स्वतः परमार्थ करून तरतो, त्याचा काय मोठेपणा आहे ? म्हणून अन्य जीवाना श्रीहरीचे नाव चांगले घ्यावयास लावावे १ पृथ्वी अनेक भूताचा भार वाहते. त्यात तिचे काम काय आहे? गाय ही मालकाला दूध देते, त्यातले किंचितसुद्धा चाखीत नाही. २ मेघ वृष्टी करितात, तिचे फळ मेघाना मिळते काय? म्हणून काय मेघानी आपले वृष्टी करण्याचे काम बंद ठेविले आहे? ३ हे चंद्रसूर्य पूर्वेस उगवून पश्चिमेकडे मावळतात. एक क्षणभर विसावा न घेता फिरतात ४ परीस हा लोखडाचे सोने का करतो? त्याने लोखडाचे सोने केले तरी, त्याची किमत कमी होत नाही व तो स्वतः धातूही होत नाही ५ तुकाराम महाराज म्हणतात, दुसऱ्यावर उपकार करण्याचे कार्य राम करीत असतो. ६

११६२ जग चले उस घाट कोन जाय। नहिं समजत फिरफिर गोते खाय ॥ १ ॥
नहिं एकदो सकल संसार। जो बुझे सो आगला स्वार ॥ २ ॥
उपर स्वार बैठे कृष्णांपीठ। नहिं बाचे कोई जावे लूठ ॥ ३ ॥
देख हि डर फेर बैठा तुका। जोबत मारग राम हि एका ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा - बुझे-समजेल, तृष्णापीठ-तृष्णेच्या आसनावर

अर्थ :- ज्या मार्गाने जग जात आहे, त्या मार्गाने कोण जात नाही ? परंतु त्याचा परिणाम काय होईल, तो कुणी समजत नसल्यामुळे ते वारवार जन्ममृत्यूचे गोते खातात १ असे एकदोन नाहीत, सर्व प्राणीमात्र असेच गोते खातात जो हे जाणतो तो आघाडीचा स्वार होतो. २ जे तृष्णेच्या आसनावर बसले आहेत, त्यातले सर्व वाचणार नाहीत. सर्व लुटले जाणार आहेत ३ तुकाराम महाराज म्हणतात, हा सर्व प्रकार पाहून मला भीती वाटली व मी जगाकडे पाठ फिरवून एकट्या रामाचाच मार्ग धरला ४

११६३ भले रे भाई जिन्हे किया चीज। आछा नहिं मिलत बीज ॥ १ ॥
फीरतफीरत पाया सारा। मीलत लोले धन किनारा ॥ २ ॥
तीरथ बरत फिर पाया जोग। नहिं तलमल तुटत भवरोग ॥ ३ ॥
कहे तुका मैं ताको दास। नहिं सिरभार चलावे पास ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा.- चीज-सार्थक

अर्थ - लोकहो, ज्यानी आपल्या जन्माचे सार्थक केले, ते चांगले. कारण चांगले
अनेक योनींतून फिरत फिरत सारभूत असा नरदेह प्राप्त झाला आहे या ठिकाणी - े
होते. २ सर्वस्वाचा त्याग करून त्याने तीर्थव्रते केली, पण देहादी संसाररूपी रोगाची तळमळ
तुकाराम महाराज म्हणतात, जो देह व देहासबधी माझे अशी भावना बाळगीत नाही त्याचा

११६४ लाल कमलि बोढे पेनाये। मोसु हरिथें कैसे बनाये ॥ १ ॥
कहे सखि तुम्हे करति सोर। हिरदा हरिका कठिन कठोर ॥ २ ॥

नहिं क्रिया सरम कछु लाज। और सुनाउं बहुत हे भाज ॥ ३ ॥
और नामरूप नहिं गोवलिया। तुकाप्रभु माखन खाया ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – कमली–रावळे, घोंगडी, पेनाबे–पांघरून, हिरदा–हृदय, सरम–शर्म, कछु–काही

अर्थ :– हरीने लाल घोंगडी मला पांघरून कसे ,सुशोभित केले आहे. १ मैत्रीण म्हणते, तू हरीविषयी आकांत करतेस, पण हरीचे हृदय तुजविषयी कठोर आहे २ हरीच्या ठिकाणी शरम, लज्जा काही नाही आणखीही तुला सांगते की, त्याला पुष्कळ बायका आहेत. ३ तुकाराम महाराज म्हणतात, ती मैत्रीण आणखी सांगते की, इंद्रियांचे रक्षण करणाऱ्या हरीस नामरूप नाही. असा माझा प्रभू लोणी खात असतो. ४

११६५ राम कहो जीवना फल सो ही। हरिभजनसुं विलंब न पाई ॥ १ ॥
कवनका मंदर कवनकी झोपरी। एकरामबिन सब हि फुकरी ॥ २ ॥
कवनकी काया कवनकी माया। एकरामबिन सब हि जाया ॥ ३ ॥
कहे तुका सब हि चलनार। एकरामबिन नहिं बासारा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – कवनकी–कोणाची

अर्थ :– रामाचे भजन करणे, हीच जगण्याची सफलता आहे. म्हणून हरिभजनास आळस करू नकोस १ कुणाचे घर आणि कुणाची झोपडी; एका रामावाचून सर्व फुकट आहे २ कुणाचा देह व कुणाची ममता ? एका रामा वाचून सर्व नष्ट होणार आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, सर्व काही नष्ट होणार आहे. एका रामावाचून काही सार नाही ४

११६६ काहे भुला धनसंपत्तीघोर। रामराम सुन गाउ हो बाप रे ॥ १ ॥
राजे लोक सब कहे तूं आपना। जब काल नहीं पाया ठाना ॥ २ ॥
माया मिथ्या मनका सब धंदा। तजो अभिमान भजो गोविंदा ॥ ३ ॥
राना रक डोंगरको राई। कहे तुका करे इलाहि ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा .– काल–यम, मिथ्या–खोटा.

अर्थ :– भयकर घातक अशा धनसंपत्तीच्या ठिकाणी तू का गुंतून पडलास ? अरे, बाबा, रामनाम गा, व ऐक १ राजे आदीकरून लोक हे सर्व तू माझे आहेत असे म्हणतोस, पण जोपर्यंत काळ तुझे प्राण आकर्षण करीत नाही, तोपर्यंत हे माझे आहे, असे तुझे म्हणणे शोभते. पण प्रसंगी कोणी उपयोगी पडत नाही. २ देहादी प्रपंचही खोटा असून मनकल्पनेचा आहे, म्हणून त्याचा अभिमान टाक व देवाला भज ३ तुकाराम महाराज म्हणतात, राजाचा रक व डोंगराची मोहरी होईल. याकरता काही तरी उपाय कर ४

११६७ काहे रोवे आगले मरना। गव्हार तू भुला आपना ॥ १ ॥
केते मालुम नहिं पडे। नन्हे बडे गये सो ॥ २ ॥
बाप भाई लेखा नहिं। पाछें तूं हि चलनार ॥ ३ ॥
काले बाल सिपत भये। खबर पकडो तुका कहे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– रोवे–रडतोस, अगले–पुढचे, बाल–केस, सिपत–पांढरे

अर्थ – अरे मूर्खा, पुढचा मेल्याबद्दल तू का रडतोस ? तू आपल्यावर येणाऱ्या मृत्यूस विसरलास काय ? १ किती तरी लहान मोठे मृत्यूच्या मुखी गेले, हे तुला माहीत नाही काय ? २ बाप, भाऊ आदीकरून अनेक मेले;

त्यांची मोजदाद करीत एक दिवस तूही मरणार. ३ तुकाराम महाराज म्हणतात, हे तुझे काळे केस पांढरे झाले, हे तुला माहीत असू दे. ४

११६८ दया मेरे राम कवन सुख सारा। कहकर दे पुछूं दास तुम्हारा ॥ १ ॥
तनजोबनकी कोन बराई। व्याधपीडादि स काटहि खाई ॥ २ ॥
कीर्त बधाऊं तों नाम न मेरा। काहे झुटा पछतऊं घेरा ॥ ३ ॥
कहे तुका नहि समजत मात। तुम्हारे शरन हे जोडहि हात ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– जोबन–यौवन, बराई–मोठेपणा

अर्थ :– माझ्या रामावाचून सारभूत सुख कोणते आहे ? ते मला सांगा, मग मी तुमचा दास होईन १ शरीराच्या ठिकाणी तारुण्याचा, यौवनाचा काय मोठेपणा आहे ? कारण व्याधींचे दुःख त्याला क्षीण करून मारील. २ कीर्ती वाढवावयास जावे तर आपले नाव कुठे आहे ? या खोटयाच्या फेऱ्यात पडून पश्चाताप का करून घ्यावा ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, हा प्रकार लोकांना समजत नाही. याकरिता मी तुम्हाला हात जोडून शरण आलो आहे, याचा तुम्ही विचार करा. ४

११६९ देखत आखों झुटा कोरा। तो काहे छोरा घरबार ॥ १ ॥
मनसुं किया चाहिये पाख। उपर खाक पसारा ॥ २ ॥
कामक्रोधसो संसार। वो सिरभार चलावे ॥ ३ ॥
कहे तुका वो संन्यास। छोडे आस तनकी हि ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– कोरा–निव्वळ, छोरा–सोडलास, पाख–शुद्ध

अर्थ – डोळ्यांना स्पष्ट दिसत आहे की, तू निव्वळ ढोंगी आहेस, तर घरव्यवहार कशाला टाकलास ? १ प्रथम मन शुद्ध केले पाहिजे. तसे न करता वरवर राख फासणे हा सर्व पसारा आहे २ कामक्रोधादी वृत्तींना हृदयात आश्रय देणे, हाच संसार आहे. तू मस्तकावर त्याचे ओझे घेतले आहेस. ३ तुकाराम महाराज म्हणतात, ज्याने आपल्या देहाचा समूळ लोभ टाकला आहे, तोच खरा संन्यासी आहे. ४

११७० रामभजन सब सार मिठाई। हरि संताप जनमदुख राई ॥ १ ॥
दुधभात घृत सकरपारे। हरते भुक नहि अंततारे ॥ २ ॥
खावते जुग सब चलिजावे। खटमिठा फिर पचतावे ॥ ३ ॥
कहे तुका रामरस जो पावे। बहुरि फेरा वो कबहु न खावे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– खटमिठा–आंबटगोड, संताप–त्रिविध ताप

अर्थ :– रामाचे भजन करणे हे सगळ्या गोडाचे सार आहे. हे जन्मदुःख व त्रिविध ताप विशेष नाहीसे करते. १ दूधभात, तूप, साखर सेवन करण्याने भूकही नाहीशी होत नाही व ते पुरतही नाही. २ खाण्यातच सर्व युग निघून जाते. नतर आंबटगोडाच्या रुचीच्या मोहाने पश्चाताप होतो. ३ तुकाराम महाराज म्हणतात, रामरसाचे ज्याने सेवन केले, तो मोठ्या जन्ममृत्यूच्या फेऱ्यात केव्हाही सापडणार नाही ४

११७१ बारबार काहे मरत अभागी। बहुरि मरन संक्या तोरेभागी ॥ १ ॥
ये हि तन करते क्या ना होय। भजन भगति करे वैकुंठे जाय ॥ २ ॥
रामनाम मोल नहिं बेचे कवरि। वो हि सब माया छुरावत झगरी ॥ ३ ॥
कहे तुका मनसुं मिल राखो। रामरस जिव्हा नित्य चाखो ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– अभागी–करंटा, कवरि–कवडी.

अर्थ :– हे करंट्या, तू वेळोवेळी का भरत आहेस? तुझ्या वाटचाला पुष्कळ मरणांची संख्या आली आहे. १ या मनुष्य देहाने केले तर काय होणार नाही ? श्रीहरीच्या भक्तिभजनाने तो वैकुंठास जाऊ शकतो. २ रामनामाचे चिंतन करण्याला एक कवडीसुद्धा किंमत द्यावी लागणार नाही; त्यापासून या सर्व त्रयीतून सुटका होते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, रामाच्या ठिकाणी मन जडवून ठेव; व त्या रसासव जिव्हेने नित्य चाख. ४

११७२ हम उदास तीन्हके सुनाहो लोकां । रावणमार बिभीषण दिई लंका ॥ १ ॥
गोवरधन नखपर गोकुल राखा । बर्सन लागा जब मेंहुं फत्तरका ॥ २ ॥
वैकुंठनायक काल कौंसासुरका । दैत डुबाय सब मंगाय गोपिका ॥ ३ ॥
स्तंभ फोड पेट चिरीया कश्यपका । प्रल्हाद के लियें कहे भाई तुकयाका ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– तीन्हके–त्या, काल–काळ, यम, बर्सन–पाऊन पडू लागला.

अर्थ :– रावणाला मारून बिभीषणाला ज्याने लंका दिली, त्या रामाचा मी दास आहे, असे सर्व लोकांना सांगतो. १ ज्या वेळेस इंद्राने शिळाधारांनी पर्जन्यवृष्टी केली, त्या वेळेस गोवर्धन पर्वत नखाने उचलून नखावर धरला व गोकुळाचे रक्षण केले. २ वैकुंठाचा स्वामी हा कंसासुराचा काळ असून त्याचे सर्व दैत्य सैन्य ज्याने मारून टाकले, त्याला सर्व गोपिकानी मागितले. ३ तुकयाबंधू म्हणतात, प्रल्हादाकरता नरसिंहरूप धारण करून तो खांब फोडून प्रकट झाला; व त्याने हिरण्यकशिपूचे पोट फाडले. ४

## साख्या ३०

११७३ तुका बस्तर बिचारा क्या करे । अंतर भगवान होय ।
भीतर मैला कैंव मिटे रे । मरे उपर धोय ॥ १ ॥

शब्दार्थ व टीपा :– बस्तर–वस्त्र, भीतर–आत

अर्थ :– तुकाराम महाराज म्हणतात, जर अंतःकरण शुद्ध नसेल, तर बाह्य भगवे वस्त्र बिचारे काय करील? वरच्या बाजूने मरेतोपर्यंत धुतले तरी अंतःकरणातील मळ नाहीसा कसा होईल ? १

११७४ रामराम कहे रे मन । औरसुं नहिं काज ।
बहुत उतारे पार । आघे राख तुकाको लाज ॥ १ ॥

शब्दार्थ व टीपा :– औरसुं–दुसऱ्याशी.

अर्थ :– तुकाराम महाराज म्हणतात, अरे मना, तू राम राम असे भजन कर. दुसऱ्याशी काही काम नाही. या रामनामाने या संसारातून पुष्कळ लोक पार पडले. यास्तव यापुढे तू माझी लज्जा रक्षण कर. १

११७५ लोभीकें चित धन बैठे । कामीन चित काम ।
माताके चित पुत बैठें । तुकाके मन राम ॥ १ ॥

शब्दार्थ व टीपा :– कामीन–विषयी, पुत–पुत्र.

अर्थ :– तुकाराम महाराज म्हणतात, लोभ्याचे चित्त धनावर बसलेले असते किंवा विषयी मनुष्याच्या चित्तामध्ये जसा काम असतो, मातेचे चित्त बालकाच्या ठिकाणी असते, तसे माझे मन रामाच्या ठिकाणी जडेल असे काही तू कर. १

११७६ तुका पखिवहिरन मानु । बोई जनावर बाग ।
असतनकु सत न मानू । जे वर्मकु दाग ॥ १ ॥

शब्दार्थ व टीपा – पखिवहिरन–पक्षी बहिरी ससाणा, बाग–वाघ

अर्थ – तुकाराम महाराज म्हणतात, बहिरी ससाण्यास आम्ही इतर पक्ष्याप्रमाणे मानणार नाही व वाघ, हाही इतर जनावराप्रमाणे नाही त्याप्रमाणे असताना सत मानणार नाही त्याच्या वाईट वर्मास आम्ही डाग लावू १

११७७ तुका राम बहुत मिठा रे । भर राखू शरीर ।
तनकी करू नावरि । उतारू पैल तीर ॥ १ ॥

शब्दार्थ व टीपा – नावरि–नौका

अर्थ – तुकाराम महाराज म्हणतात राम हा फार गोड आहे म्हणून सर्व शरीरात त्याला भरून ठेवू व देहाची नौका करुन या भवनदीच्या पार उतरून जाऊ १

११७८ सतन पन्हया ले खडा । राहू ठाकुरद्वार ।
चलत पाछेंहु फिरो । रज उडत लेऊ सीर ॥ १ ॥

शब्दार्थ व टीपा – पन्हया–पादुका रज–धूळी

अर्थ – संताच्या पादुका मस्तकावर घेऊन देवाच्या द्वारात उभा राहीन आणि संत निघाले की त्याच्या मागे मी फिरेन व त्याच्या पायाची जी धूळ उडल ती मी मस्तकावर घईन १

११७९ तुकाप्रभु बडो न मनू न मानू बडो । जिसपास बहु दाम ।
बलिहारि उस मुखकी । जिसती निकसे राम ॥ १ ॥

शब्दार्थ व टीपा – प्रभु–राजा

अर्थ – तुकाराम महाराज म्हणतात, मी राजाला मोठा मानणार नाही व ज्याच्यापाशी पुष्कळ पसा आहे, त्यालाही मी मोठा मानणार नाही ज्याच्या मुखातून रामनाम निघत आहे, त्याचे मुख धन्य आहे व तोच श्रेष्ठ आहे १

११८० राम कहे सो मुख भलारे । खाये खीर खाड ।
हरिबिन मुखमो धूल परी रे । क्या जनि उस राड ॥ १ ॥

शब्दार्थ व टीपा – खाड–खडीसाखर

अर्थ – तुकाराम महाराज म्हणतात जे मुख रामनामाचे चिंतन करीत आहे, ते उत्तम आहे व ते चिंतन नव्हे तर दूधसाखरेचे सेवन आहे ज्या मुखात हरीचे चिंतन नाही त्या मुखात माती पडली त्या आईने रांडेने, त्याला जन्म कशाला दिला ? १

११८१ राम कहे सो मुख भला रे । बिन रामसे बीख ।
आव न जानू रमते बेरो । जब काल लगावे सीख ॥ १ ॥

शब्दार्थ व टीपा – बीख–विष

अर्थ – जे मुख रामचिंतन करीत आहे, ते उत्तम आहे रामचिंतन नसेल तर ते मुख विषाप्रमाणे होय आपल्या मताने आपल्यास मोठे समजू नये कारण ज्या वेळी काळ शिक्षा करील त्या वेळेस आपणांस कळून येईल १

११८२ कहे तुका मैं सवदा वेचूं । लेवेके तन हार ।
मिठा साधुसंतजन रे । मुरखके सिर मार ॥ १ ॥

शब्दार्थ व टीपा – सवदा–सौदा

*अर्थ :–* तुकाराम महाराज म्हणतात, मी सौदा विकत आहे. जे कोणी घेतील त्यांची देहबुद्धीच हरेल. साधुसंत गोड आहेत व मूर्खाच्या डोक्यावर मात्र मार बसेल १

११८३ तुका दास तिनका रे । रामभजन निरास ।
क्या विचारे पंडित करो रे । हात पसारे आस ॥ १ ॥

शब्दार्थ व टीपा – तिनका–त्याचा.

अर्थ :– तुकाराम महाराज म्हणतात, मी निष्काम मनाने रामाचे भजन करतो, त्याचा मी सेवक आहे. मोठे पंडित जरी असले तरी, त्या गरीबाचे काय करावयाचे आहे ? का ? तर ते आशेने ज्याच्या त्याच्या पुढे हात पसरतात. १

११८४ तुका प्रीत रामसुं । तैसी मिठी राख ।
पतंग जाय दीप परे रे । करे तनकी खाक ॥ १ ॥

शब्दार्थ व टीपा :– पतंग–टोळ.

अर्थ – तुकाराम महाराज म्हणतात, ज्याप्रमाणे टोळ हा प्रेमाने दिव्यावर उडी घालून स्वतःस जाळून घेतो, तसे उत्तम प्रेम रामाच्या ठिकाणी तू ठेव. १

११८५ कहे तुका जग भुला रे । कह्या न मानत कोय ।
हात परे जब कालके । मारत फोरत डोय ॥ १ ॥

शब्दार्थ व टीपा :– डोय–डोके.

अर्थ – तुकाराम महाराज म्हणतात, सर्व जग विषयांच्या संगतीने भुलून गेले आहे कितो सांगितले तरी कोणी मानीत नाहीत ज्या वेळेस त्याच्यावर काळाचा हात पडेल त्या वेळेस तो इतका मार घेईल की, त्या योगाने डोके फुटेल. १

११८६ तुका सुरा नहि सबदका रे । जब कमाइ न होये ॥
चोट साहे घनकि रे । हिरा नीबरे तोये ॥ १ ॥

शब्दार्थ व टीपा :– सुरा–शूर, घनकि–घणाचे, चोट–घाव, आघात

*अर्थ :–* तुकाराम महाराज म्हणतात, जे बोलण्याने आपल्याला शूर मानतात, त्यांनी जोपर्यंत शूरत्व गाजवले नाही, तोपर्यंत मी त्यांना मानीत नाही घणाचे घाव सोसून न फुटता जो टिकतो, त्याची खऱ्या हिऱ्याप्रमाणे निवड होते. १

११८७ तुका सुरा बहुत कहावे । लडत विरला कोये ।
एक पावे उंच पदवी । एक खोंसां जोये ॥ १ ॥

शब्दार्थ व टीपा :– विरला–एकादाच

अर्थ :– तुकाराम महाराज म्हणतात, तोंडाने आपणाला शूर म्हणविणारे पुष्कळ आहेत, पण खऱ्या प्रसंगी धैर्य धरून शूरत्वाने युद्ध करणारे असे थोडे; म्हणून असे जे कोणी आहेत ते मोठे अधिकारी होतात. पण कितीएक जोडा खाणारे असे नीच पदवीचे राहतात १

११८८ तुका मान्या पेटका । और न जाने कोये ।
जपता कछु रामनाम । हरिभगतनकी सोये ॥ १ ॥

शब्दार्थ व टीपा – मान्या–मारला गेला, पेटका–पोटाने

अर्थ – तुकाराम महाराज म्हणतात, मी पोटाने मारला गेलो आहे दुसरे काही मी जाणत नाही. त्यातल्या त्यात हरिभक्ताच्या संप्रदायाने मी थोडा रामनामाचा जप करतो १

११८९ काफर सोही आपण बुझे । आला दुनिया भर ।
कहे तुका तुम्हे सुनो रे भाई । हिरिदा जिन्होका कठोर ॥ १ ॥

शब्दार्थ व टीपा – काफर–नास्तिक हिरिदा–हृदय

अर्थ – तुकाराम महाराज म्हणतात, ज्याच्या योगाने प्रेम वाढते, त्यास मी संत समजतो व ज्याच्यामुळे देवावर असलेले प्रेम कमी होते अशा नास्तिकाना मी दुर्जन म्हणतो १

११९० भीस्त न पावे मालथी । पढीया लोक रिझाये ।
निचा जयें कमतरिण । सो ही सो फल खाये ॥ १ ॥

शब्दाथ व टीपा – पढीया–शिकलेले

अथ – तुकाराम महाराज म्हणतात, जे कुणी शिकलेले आहेत, त्यानी आपल्या विद्यारूपी मालावर भरवसा ठेवून लोकरजन केले तर त्याना परमार्थफळ प्राप्त होणार नाही व जे कोणी सर्व अभिमान टाकून आपल्याकडे कमीपणा घेऊन नम्र झाले आहेत तेच खऱ्या परमार्थफलाचे सेवन करितात १

११९१ फल पाया तो खुस भया । किन्होसु न करे बाद ।
बान न देखे मिरगा रे । चित मिलाया नाद ॥ १ ॥

शब्दार्थ व टीपा – भया–झाले, मिरगा–हरीण

अर्थ – जो परमाथफलाचे सेवन करतो, तो सुखी होतो व कुणाशी वादविवाद करीत नाही जसे व्याधाच्या गायनाकडे हरिणीचे चित्त वेधून जाते की व्याधाने मारावयास काढलेल्या बाणाकडे ती पाहातही नाही १

११९२ तुका दास रामका । मनमे एक हि भाव ॥
तो न पालटू आव । यें हि तन जाव ॥ १ ॥

शब्दार्थ व टीपा – पालटू–बदलू

अर्थ – तुकाराम महाराज म्हणतात मी रामाचा दास आहे व माझ्या मनात त्याच्या विषयीचाच एक भाव आहे, तो हे शरीर पडले तरी कधी बदलणार नाही १

११९३ तुका रामसु चित बाध राखू । तैसा आपनी हात ।
धेनु बछरा छोर जावे । प्रेम न छुटे सात ॥ १ ॥

शब्दार्थ व टीपा – बछरा–वासरू वत्स

अर्थ – तुकाराम महाराज म्हणतात वासराला टाकून गाय ही जरी वनात गेली तरी तिचे वासरावरील जे प्रेम आहे ते उठून तिच्या बरोबर जात नाही, तसे तुम्ही आपले चित्त आपल्या हाताने रामाच्या ठिकाणी बाधून ठेवा १

११९४ चितसु चित जब मिले । तब तनु थडा होये ।
तुका मिलना जिन्होसु । ऐसा विरला कोये ॥ १ ॥

शब्दार्थ व टीपा :– बिरला–एकदाच, थोडकेच.

अर्थ :– तुकाराम महाराज म्हणतात, उभयतांच्या चित्तातले विचार जेव्हा एक होतील, त्या वेळेस देह शांत होतो. पण ज्याच्या चित्ताशी आपले चित्त मिळवावे असे सज्जन थोडकेच असतात. १

१९९५ चित मिले तो सब मिले । नहिं तो फुकट संग ।
पानी पथर येक ही ठोर । कोरनभिगे अंग ॥ १ ॥

शब्दार्थ व टीपा :– ठोर–जागा.

अर्थ :– तुकाराम महाराज म्हणतात चित्ताला चित्त मिळाले की, सर्व काही मिळालेच. नाही तर कोणाचीही संगत करणे फुकट. जसे पाणी आणि दगड या दोघांचा योग जरी झाला तरी त्या दगडाच्या आतील एक भागसुद्धा भिजला जात नाही. जलसंगतीने दगडाचे काठिण्यात नरमाई येत नाही. १

११९६ तुका संगत तीन्हसें कहिये । जिनथें सुख दुनाये ॥
दुर्जन तेरा मू काला । थीतो प्रेम घटाये ॥ १ ॥

शब्दार्थ व टीपा :– दुनाये–दुप्पट होईल, मू–मुख.

अर्थ :– तुकाराम महाराज म्हणतात, ज्याच्या सगतीने प्रेमसुख दुप्पट होते, त्याची संगती करावी व ज्याच्या संगतीने असलेले प्रेम नाहीसे होते, त्या दुर्जनांचे तोंड काळे आहे असे समजून जावे. १

११९७ तुका मिलना तो भला । मनसुं मन मिल जाय ।
उपर उपर माटि घसनी । उनकि कोन बराई ॥ १ ॥

शब्दार्थ व टीपा – घसनी–घासून

अर्थ :– जर मिळायचे असेल तर मनाने मनाशी मिळावे हे चांगले. वरवर कितीही मातीने घासले तरी त्याचा मोठेपणा काय आहे? १

११९८ तुका कुटुंब छोरे रे । लरके जोरों सिर मुंडाय ।
जबथें इच्छा नहिं मुई । तब तूं किया काय ॥ १ ॥

शब्दार्थ व टीपा :– मुंडाय–बोडून.

अर्थ :– तुकाराम महाराज म्हणतात, बायका, पोरे इत्यादी सर्व कुटुंबाचा त्याग करून डोके बोडून संन्यास घेतला; पण अंत:करणातील इच्छा नाहीशी झाली नाही तर तू काय केलेस? १

११९९ तुका इच्छा मीटइ तो । काहा करे जट खाक ।
मथीया गोला डारदिया तो । नहिं मिले फेरन ताक ॥ १ ॥

शब्दार्थ व टीपा :– मीटइ–नाहीसी, जट–जटा, मथीया–मथन करून.

अर्थ :– तुकाराम महाराज म्हणतात, अंत:करणातील इच्छा नाहीशी झाल्यावर जटा राखणे व राख लावणे हे काय करावयाचे आहे? तो संसारात जरी असला तरी त्याहून अलिप्त आहे. जसे मंथन करून काढलेला लोण्याचा गोळा पुन्हा ताकात घातला तरी तो अलिप्त राहतो. १

१२०० ब्रीद मेरे साइंयाके । तुका चलावे पास ।
सुरा सो हि लरे हमसें । छोरे तनकी आस ॥ १ ॥

शब्दार्थ व टीपा :– साइंयाके–स्वामीचे, लरे–लढे.

अर्थ :– तुकाराम महाराज म्हणतात, माझ्या स्वामीचे ब्रीद जो चालवतो, त्याच्या जवळ मी असतो. जो कोणी वीर, शूर असून देहाचा लोभ टाकतो तोच आमच्याशी लढेल. १

१२०१ कहे तुका भला भया । हुं हुवा संतनका दास ।
क्या जानूं केते मरता । जो न मिटती मनकी आस ॥ १ ॥

शब्दार्थ व टीपा :– भया–झाला.

अर्थ :– तुकाराम महाराज म्हणतात, मी संताचा दास झालो, हे फार चागले. माझ्या मनातील आशा जर नाहीशी झाली नसती तर किती वेळ मरावे लागले असते हे कळू शकेल. १

१२०२ तुका और मिठाई क्या करूं रे । पाले बिकारपिंड ।
राम कहावे सो भली रुखी । माखन खांडखीर ॥ १ ॥

शब्दार्थ व टीपा – पाले–पाळला, रुखी–कोरडी.

अर्थ :– तुकाराम महाराज म्हणतात, बाकीच्या मिष्ट रसास काय करावयाचे आहे ? त्या योगेकरून विकारी देहाचेच रक्षण होईल. राम भजन करून कोरडी भाकरी खाणे, हे लोणी, दूध, साखर खाल्ल्याप्रमाणे उत्तम होय. १

१२०३ म्हणसी नाहीं रे संचित । न करी न करीं ऐसी मात ॥ १ ॥
लाहो घेईं हरिनामाचा । जन्म जाऊं नेदीं साचा ॥ २ ॥
गळा पडेल यमफांसीं । मग कैचा हरि म्हणसी ॥ ३ ॥
पुरलासाटीं देहाडा । ऐसें न म्हणे न म्हणे मूढा ॥ ४ ॥
नरदेह दुबळा । ऐसें न म्हणे रे चांडाळा ॥ ५ ॥
तुका म्हणे सांगों किती । सेकी तोडीं पडेल माती ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – संचित– प्रारब्धामध्ये, मात–गोष्ट, लाहो–लाभ, पुरलासाटीं–भोगासाठी, देहडा–देह, सेकीं–शेवटी.

अर्थ :– श्रीहरीचे भजन आपल्या प्रारब्धामध्ये नाही अशा प्रकारची गोष्टच मुखातून काढू नकोस. १ या श्रीहरीच्या नामाचा लाभ त्वरित करून घे तू आपल्या या मानवी देहाचा जन्म व्यर्थ जाऊ देऊ नकोस २ कधी तरी लौकरच तुझ्या गळ्यात यमाचा पाश पडेल; मग या श्रीहरीचे नाव तुला कसे घेता येईल ? ३ मूर्ख माणसा, हा आपला देह केवळ विषयाच्या भोगासाठीच आहे, असे तू कधीही समजू नकोस. ४ हा नरदेह दुबळा आहे, असेही चांडाळा, तू कधी म्हणू नकोस ५ तुकाराम महाराज म्हणतात, आता तुला सागू तरी किती ? शेवटी तुझ्या तोंडात मातीच पडेल हे मात्र ध्यानात ठेव. ६

१२०४ सतांचा महिमा तो बहु दुर्गम । शाब्दिकांचे काम नाहीं येथें ॥ १ ॥
बहु घट जरी जाली म्हैस गाय । तरी होईल काय कामधेनु ॥ २ ॥
तुका म्हणे अंगें व्हावें तें आपण । तरीच महिमान येईल कळो ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा – दुर्गम–समजण्यास कठीण, शाब्दिकांचे–पंडिताचे.

अर्थ :– या सताचे माहात्म्य समजून घेण्यास फार कठिण आहे. केवळ पढिक पंडिताचे ते काही काम नव्हे. १ एखादी गाय अथवा म्हैस कितीही धडधाकट झाली तरी, ती काय इच्छिलेली वस्तू देणाऱ्या कामधेनूच्या बरोबरीची कधीतरी होईल काय ? २ तुकाराम महाराज म्हणतात, स्वतः आपण अंगानेच सत झालो, तरच सतांचे महत्त्व समजून येईल. एरव्ही नाही. ३

१२०५ नाहीं संतपण मिळतें[1] हें हाटीं । हिंडता कपाटीं रानीं वनीं ॥ १ ॥
नये मोल देता धनाचिया राशी । नाहीं तें आकाशीं पाताळीं तें ॥ २ ॥
तुका म्हणे मिळे जिवाचिये साटीं । नाहीं तरी गोष्टी बोलों नये ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा – हाटीं– बाजारात, कपाटीं– गुहात.

अर्थ :– संतत्वाची प्राप्ती कुठे बाजारात विकत मिळत नाही किंवा रानावनात कुठे, डोंगरातील गुहांतही ते कधी प्राप्त होत नाही १ वाटेल तेवढे मोल धनाची रास ओतून जरी दिले, तरी काही त्याची प्राप्ती होणार नाही. ते आकाशात किंवा पाताळात धुंडूनही मिळणार नाही २ तुकाराम महाराज म्हणतात, ते फक्त आपला जीव परमेश्वरास अर्पण करण्याची तयारी आपली असेल तरच, ते आपणांस मिळेल. अशी तयारी नसेल तर संतत्वाची गोष्ट कुणीही कधी बोलू नये ३

विवरण – वरील दोन अभगात तुकाराम बुवानी सताचे व सतत्वाचे महत्त्व स्पष्ट केले आहे सताचे महत्त्व शाब्दिक पडिताना कधीच समजणार नाही, आपण स्वत च जेव्हा सतत्व अगी बाणवून घेऊ, तेव्हाच त्याची प्रचीती आपणास येईल सतत्वही बाह्य देखाव्याची खूण नसून ती एक अतरगाची अनुभूती आहे हे सतपण वाटेल एवढी धनसपत्ती जरी खर्च केली तरी बाजारात, गिरिकुहरात, आकाशात, पाताळात, किंवा इतरत्र कुठेही मिळणार नाही केवळ श्रीहरीसाठी सर्वस्व अर्पण करण्याची ज्याची इच्छा आहे, त्यालाच या सतत्वाचा अनुभव घेता येईल, असा निर्णय बुवानी येथे दिलेला आहे

तुकोबाच्या वेळी घरोघरी बुवा व सत निर्माण झाल्यामुळे खरा सत कोण, खरे सतत्व कोणते, यासबधी एकसारखी जागृती त्याना करावी लागली आहे सतदर्शनाची व सतसगतीची गोडी ज्ञानेश्वरनामदेवापासून तुकाराम बुवापर्यंत सर्वच सतानी वर्णन केलेली असली तरी, खऱ्या सतत्वाचा निवाडाही प्रत्येक सतास इतर लोकासाठी करावा लागला आहे लोकाना फसविणारे, खोट्या परमार्थाची भ्रात वाट दाखविणारे, लुबाडणारे, भोंदू साधुसत कितीतरी असतात त्याच्यापासून लोकानी सावध असावे म्हणून जागरूकतेने थोर सतानी सतत्वाच्या खुणा पुन पुन वर्णन करून सागितल्या आहेत 'ब्रह्ममूर्ती सत जगीं अवतरले । उद्धरावया आले दीन जना', 'सर्वांभूतीं पाहे एक वासुदेव । पुसोनिया ठाव अहंतेचा । तोचि सतसाधू ओळखावा निका', असे सताचे वर्णन नामदेवानी केलेले आहे जो लौकिकाविषयी उदासीन आहे, ज्याच्या अतरगात प्रेमाचा जिव्हाळा आहे, ज्याच्या वाणीत नेहमी राम कृष्ण असा जप आहे, तेच खरे सत, असे त्याचे सागणे आहे निळोबारायानी सताच्या लक्षणाविषयी व त्याच्या महत्त्वाविषयी फार उत्तम प्रकारचे मार्गदर्शन केले आहे 'तेचि सत तेचि सत । ज्याचा हेत विठ्ठलीं' हे सत कसे असतात ? तर निळोबानी सागितले आहे, 'नेणती ते आपपर । विश्वीं झाले विश्वभर', 'हरीच्या नामामृतें धाले । गिळूनी ब्रह्मांडा राहिले' अशा भाषेत त्यानी सताचा महिमा वर्णन केलेला आहे

१२०६ नामाची आवडी तोचि जाणा देव ॥ न धरीं[2] संदेह कांहीं मनीं ॥ १ ॥
ऐसे मी हें नाहीं बोलत नेणतां । आणोनि संमता संताचिया ॥ २ ॥
नाम म्हणे तया आणीक[3] साधन । ऐसे हें वचन बोलों नये ॥ ३ ॥
तुका म्हणे सुख पावे या वचनीं । ज्याचीं शुद्ध दोन्ही मायबापें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– संदेह–संशय, संमता–संमती

अर्थ :– श्रीहरीच्या नामाची प्रीती ज्याला आहे, तो प्रत्यक्ष देवच समजावा याविषयी मनामध्ये कसलाही संशय धारण करू नये १ मी अजाणपणे असे काही तरी बोलत आहे, असे तुम्ही कुणी समजू नका या माझ्या बोलण्यास सर्व संताची संमती आहे. जो श्रीहरीचे नाम घेत आहे, त्याने आणखी काही साधने भगवताच्या

[1] मिळत, [2] धरा, [3] उरले

प्राप्तीसाठी करावीत असे कुणी बोलूसुद्धा नये ३ तुकाराम महाराज म्हणतात, ज्याचे आईबाप शुद्ध आहेत, तोच माझ्या या वचनापासून सुखी होईल ४

विवरण – वारकरी पथात इतर साधनापेक्षा कथाकीर्तन, भजन व प्रभूचे सतत नामस्मरण यामच महत्त्व आहे श्रीहरीचे नाम हे एक महत्त्वाचे साधन सर्वच साधुसतानी सागितले आहे या नामाची महती ज्ञानेश्वरनामदेवापासून तुकारामबुवापर्यंत सर्व सतानी एकमुखाने गायिली आहे 'नाम हें मगळ अच्युताचें', 'नित्यनाम वाचे तोचि एक धन्य' 'नामाचेनि बळें तरिजे ससार' इत्यादी ओळीतून निवृत्तीनाथानाही नामाचेच माहात्म्य सागितले आहे 'सकळ मगळनिधी। श्रीविठ्ठलाचे नाम आधी' या भाषेत श्रीज्ञानदेवानी या नामाचा गौरव केलेला आहे 'सार सार सार विठोबा नाम तुझें सार' असे दुसऱ्या एका अभगात त्यानी म्हटले आहे नामदेव महाराज हे तर नामाचेच देव त्याच्या शेकडो अभगातून नामाचे माहात्म्य परोपरीने वर्णन केले आहे 'नाम हे अमृत भक्तासी लाधले', 'नाम तेंचि रूप रूप तेंचि नाम', 'साधनात सोपें नाम हे केवळ। यावीणसकळ सीण वाया', 'नाम फुकाचें चोखट। नाम घेता न लगे कष्ट' अशा अनेक वचनातून नामदेवानी नामाचे महत्त्व सागितले आहे एकनाथ-तुकाराम यानीही याच नामाच्या साधनाचा प्रसार केला आहे

१२०७ सुखें होतो कोठें घेतली सुती। बाधविला गळा आपुले हातीं॥ १॥
काय करूं बहु गुंतलो आता। नये सरता मागें पुढें॥ २॥
होते गाठी ते सरले येता। आणीक माथा ऋण जाले॥ ३॥
सोकरिलियाविण गमाविले पिक। राडापोरे भिके लावियेलीं॥ ४॥
बहुताचीं बहु घेतलीं घरें। न पडे पुरे काहीं केल्या॥ ५॥
तुका म्हणे काहीं न धरावी आस। जावें हे सर्वस्व टाकोनिया॥ ६॥

शब्दार्थ व टीपा – सुती–लाभ, सोकरिलियाविण–राखल्याशिवाय

अर्थ – खरे म्हणजे मी अव्यक्तातच सुखी होतो पण कशी या प्रपचाची व देहादी वृत्तींची गाठ पडली व लोभ जडला, कुणास माहीत, मी त्यात गुतूनच राहिलो आपल्याच हातानी मी माझा गळा या लौकिक व्यवहारात गुतवून टाकला १ आता काय करू? मी फारच गुतत चाललो हो मला आता मागेपुढे सरकण्याचीही काही सोय राहिलेली नाही २ माझ्याजवळ काही थोडी बहुत पुण्याई होती, पण ती येथे जन्म पावताच सपली आणि या प्रपचाचे सले मोठे ऋण मात्र माझ्या डोक्यावर झाले ३ या प्रपचरूपी अथवा देहरूपी शेताची राखण न केल्यामुळे मी सर्वच पीक गमावले व त्यामुळे राडापोराना भिकेस लावले ४ मी पुष्कळाची घरे व्यर्थ खटपट करून घेतली, पण ती हाव काही मला पुरी पडेना ५ तुकाराम महाराज म्हणतात, आता मात्र कशाचीच आशा न धरिता हे सर्व येथेच सोडून कुठे तरी निघून जावे असे वाटते ६

१२०८ न मनावे तैसे गुरूचे वचन। जेणें नारायण अतरे तें।
आड आला म्हून फोडियेला डोळा। वळिनें आधळा शुक्र केला॥ १॥
करी देव तरी काय नव्हे एक। का तुम्ही पृथक सिणा वाया॥ २॥
उल्लघुनिया भ्रताराची आज्ञा। अन्न ऋषिपत्न्या घेउनि गेल्या॥
अवघेचि त्याचे देवे केले काज। धर्म आणि लाज राखियेली॥ ३॥
पितियासी पुत्रें केला वैराकार। प्रल्हादें असुर मारविला॥
बहुत विघ्नें केलीं तया आड। परि नाहीं वेवाड साडियेला॥ ४॥

गौळणी करिती देवाशीं व्यभिचार । सांडुनी आचार भ्रष्ट होती ।
तयासी दिले तें कवणासी नाहीं । अवघा अंतर्बाहीं तोचि[१] जाला ॥ ५ ॥
देव जोडे ते करावे अधर्म । अंतरे तें कर्म नाचरावें ।
तुका म्हणे हा जाणतो कळवळा । म्हणोनि अजामेळा उद्धरिलें ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – मनावे–मानू नये, म्हून–म्हणून, पृथक–वेगळे, वैराकार–वैर, कैवाड–लोभ, नाचरावें–आचरू नये

अर्थ :– जर गुरूच्या वचनानी ईश्वराचे अंतर पडत असेल तर मग ते गुरूचे वचनही मान्य करू नये त्रिपाद भूमीचे दान देताना झारीच्या पाण्यात शुक्र आड आल्यावर बळी राजाने त्याचा डोळा दर्भाच्या काडीने फोडला शुक्राला आंधळेच करून टाकले १ देवाने जर मनात आणले तर मग तो काय करणार नाही? तुम्ही उगाच वेगळे असे परिश्रम व्यर्थ का करिता? २ आपल्या पतींची आज्ञा मोडून ऋषिपत्नी भगवताकडे अन्न घेऊन गेल्या होत्याच ना? त्यावेळी देवाने त्याचे सर्व काम करून त्याची लाज व त्याचा धर्म याचे रक्षण केले ३ प्रल्हाद जेव्हा श्रीहरीची भक्ती करू लागला, तेव्हा त्याच्या पित्याने, हिरण्यकशिपूने त्याला केवढा विरोध केला, पण देवाच्या प्राप्तीसाठी प्रल्हादाने आपल्या दैत्य पित्यास मारविले त्याने प्रल्हादावर परोपरीची संकटे निर्माण केली; पण ईश्वराविषयीचा लोभ प्रल्हादाने सोडला नाही ४ गोकुळच्या गौळणी जरी देवाकडे व्यभिचाराच्या भावाने गेल्या तरी व त्या लौकिक आचारापासून भ्रष्ट झाल्या, तरी देवाने इतर कुणाला जे दिले नाही ते त्याने गौळणींना दिले कारण त्यांचा अंतर्बाह्य विषयच श्रीहरी बनून गेला होता. ५ यासाठी जरी वरवर अधर्म होत असला, पण त्यामुळे जर देव मिळत असेल तर तोही करावा परंतु देवाशी जेणेकरून अंतर पडेल, असे कुठलेही कार्य करू नये तुकाराम महाराज म्हणतात, देवास हा कळवळा हृदयामधील असतोच, म्हणून तर त्याने अजामेळासारख्या पातक्यांचाही उद्धार केला ६

विवरण :– भगवताच्या प्राप्तीच्या मार्गात आईबाप, बंधू, पती, पत्नी किंवा गुरू कुणीही आले तरी त्याचा त्याग करावा, व देवाशी सख्यत्व जोडावे, असा विचार अनेक ठिकाणी संतानी सांगितलेला आहे वरवर अधर्माचे वाटणारे कृत्यही करावे, पण श्रीहरीची प्राप्ती होत असेल तर ती सोडू नये या विचाराच्या पुष्टीसाठी तुकाराम बुवानी दिलेली काही उदाहरणे आपणास माहीत आहेत

ऋषिपत्नीची कथा भागवतादी ग्रंथात विस्ताराने आलेली आहे एकदा श्रीकृष्ण व त्याचे मित्र रानात हिंडता हिंडता खूप दूर आले चालण्याचे परिश्रम फार झाल्यामुळे त्याना फार भूक लागली व त्यानी श्रीकृष्णाजवळ खायला मागितले तेव्हा बलराम व श्रीकृष्ण यानी गोपाळाना सांगितले, 'येथून जवळच ब्राह्मणानी आंगिरस नावाचा यज्ञ सुरू केलेला आहे त्याच्यापाशी जाऊन अन्न घेऊन या' त्याप्रमाणे गोपाळ ऋषींच्या जवळ गेले त्यांनी श्रीकृष्ण व बलराम याचा निरोप त्याना सांगितला परंतु ऋषींनी व ब्राह्मणानी त्याच्याकडे लक्ष दिले नाही श्रीकृष्णास विसरून ते स्वर्गाची इच्छा मनात धरून यज्ञयागादी कर्मे करण्यात गुंतले होते मग ते गोपाळ त्या ऋषींच्या पत्नीकडे गेले श्रीकृष्णाचा निरोप ऐकून ऋषिपत्नींना अतिशय हर्ष झाला त्यांचे चित्त भगवंताकडे एकदम वेधून राहिले नाना प्रकारची अन्ने व खाद्यपदार्थांची ताटे घेऊन त्या श्रीकृष्णाकडे धावल्या भगवताच्या ओढीपुढे त्यानी कुणाचीही, आपल्या पतीचीही आज्ञा मान्य केली नाही त्याच्या प्रीतीमुळे श्रीकृष्णासही आनंद झाला व श्रीकृष्णदर्शनामुळे ऋषिपत्नीही सुखावल्या पुढे ब्राह्मणानाही आपल्या कर्माचा पश्चात्ताप झाला

गोकुळच्या गौळणी ईश्वराकडे कोणत्या भावनेने गेल्या? यासंबंधी भरपूर चर्चा आजवर झालेली आहे 'गौळणी करिती देवाशी व्यभिचार' अशा भाषेत तुकोबानी त्याच्या वृत्तीचे वर्णन केले असले तरी, त्या वर्णनाची वरवरची भाषाही महत्त्वाची नाही, हे ध्यानात घ्यायला हवे व्यभिचाराच्या भावनेत जी तीव्रता व जी समर्पणाची

---

१ हरी

तु गाथा ६७

वृत्ती असते तेवढीच येथे ध्यानात घेणे अगत्याचे आहे सर्व चित्त श्रीकृष्णास अर्पण करून लौकिक ससार करणे हे यातील वर्म आहे, पण हे चित्त कसे अर्पण करायचे ? तर स्वत जवळ काहीही न ठेविता गोकुळच्या गौळणींना श्रीकृष्णाची प्रचीती त्याच्या हृदयातच होत असे त्यानी आपल्या पतीशी वरवर वैर केल्याचे अथवा सदाचार सोडल्याचे दिसत असले तरी, त्याच्या या समर्पणाची भाषा केवळ तुलनेसाठी आहे हे ध्यानात हवे

वामनावताराच्या वेळी बलिराजाने सवस्वाचे दान तीन पावलाच्या रूपात मान्य करून शेवटी विष्णूच्या हातावर उदक सोडण्याचा प्रसग आला तव्हा शुक्राने आपल्या राजाचा सकल्प सिद्धीस जाऊ नये म्हणून सूक्ष्म रूप घेतले व तो झारीच्या तोंडाशी जाऊन बसला झारीच्या तोटीमधून पाणी येईना असे पाहून बळीने दर्भाच्या काडीने ढोसून शुक्राचा एक डोळा फोडला भगवताच्या प्राप्तीसाठी सर्वस्वाचे त्याला दान करण्याच्या आपल्या कृतीसाठी बळीने शुक्राचार्यास देखील दूर केले अशी कथा पुराणातून आहे तुकाराम महाराजानी ' बळीनें आधळा शुक्र केला ' असा मोठा समर्पक उपयोग या अभगात केलेला आहे

१२०९ अरे गिळिले हो ससारे । काहीं तरि राखा खरे ।
दिला करुणाकरे । मनुष्यदेह सत्सग[1] ॥ १ ॥
येथें न घलीं न घलीं आड । सचितसा शब्द नाड ।
उठाउठीं गोड । बीजें बीज वाढवा ॥ २ ॥
केले तें क्रियमाण । जाले ते सचित म्हण ।
प्रारब्ध जाण । उरवरित उरले ते ॥ ३ ॥
चित्त खोटें चालीवरि । रोग भोगाचे अतरीं ।
रसने अनावरी । तुका म्हणे ढुग वाहे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – नाड– अडचण प्रतिबध

अर्थ –अहो लोकहो, तुम्हाला या ससाराने गिळून टाकिले आहे यासाठी काही तरी खऱ्याची धाड ठेवा ना त्या करुणाकर भगवताने तुम्हास हा मनुष्य देह व हा सत्सग दिलेला आहे त्याची थोडी तरी आठवण ठेवा १ येथे सचिताचा किंवा प्रारब्धाचा शब्द आड घालून, आमच्या प्रारब्धात हरिभजन नाही, असे समजून उगाच व्यर्थ आयुष्य घालवू नका हरिनामाच्या बीजाने बीज वाढवून या जन्माचे सार्थक करा २ आजपर्यंत जे कर्म तुमच्याकडून घडले गेले, ते क्रियमाण, जे पूर्वी होऊन गेले, ते सचित व आता भोगण्यासाठी जे उरले आहे ते, प्रारब्ध जाणावे ३ कारण ध्यानात असू द्या की चित्त नेहमीच खोट्या चालीने चालत असते, रोग आपल्याच भोगामुळे निर्माण होत असतात जिव्हेची चटक अनिवार झाली की मग ढुगण वहात राहते ४

१२१० अग्न तापलिया कायाचि होमे । तापत्रयें सतप्त होती ।
सचित क्रियमाण प्रारब्ध तेथें । न चुके ससारस्थिति ।
राहाटघटिका जैसी फिरताचि राहिली । भरली जाती एके रितीं ।
सांधीं हा प्रपच पचाय अग्न । तेणे पावसील निजशाती रे ॥ १ ॥
नारायणनाम नारायणनाम । नित्य करीं काम जिव्हामुखें ।
जन्मजराव्याधि पापपुण्य तेथें । नासती सकळ ही दु खें ॥ २ ॥
शीत उष्ण वन सेविता कपाट । आसनसमाधी साधीं ।
तप तीर्थे दान व्रत आचरण । यज्ञ नाना मन बुद्धी ।

१ सतसग

भोगाभोग तेथें न चुकती प्रकार । जन्मजरादु:खव्याधि ।
साहोनि काम क्रोध अहंकार । आश्रमीं अविनाश साधीं ॥ ३ ॥
घोकिता अक्षर अभिमानविधि । निषेध लागला पाठी ।
वाद करिता निंदा घडती दोष । होय वज्रलेपो भविष्यति ।
दूषणाचे मूळ भूषण तुका म्हणे । साडीं मिथ्या खती ।
रिघोनि संता शरण सर्वभावे । राहे भलतिया स्थिती ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – अग्न–अग्नी, काया–शरीर, पचाय आग्नी–पचाग्नी, चारही बाजूस अग्निकुंडे पटवून केलेली साधना, साडी–सोडून दे, खती–काळजी

अर्थ – आग्नी तप्त झाला की शरीर तापून निघते तापत्रयानेही तो सतप्त होत असतो संचित, क्रियमाण व प्रारब्ध याचा भोग ससाराच्या स्थितीस कधी चुकत नाही ज्याप्रमाणे रहाटगाडग्याची मडकी एकसारखी फिरतच असतात, एक मडके पाण्याने भरले जाते व दुसरे रिकामे होते, त्याचप्रमाणे या प्रपचाची गती आहे हा प्रपच म्हणजे पचाग्नीच्या साधनाप्रमाणे खडतर आहे, तो तू नीट साधून आत्मशाती प्राप्त करून घे १ नेहमी काम करीत असताना नारायण, नारायण असे मुखाने म्हणत जा या योगे जन्म, मृत्यू, जरा, व्याधी, पाप, पुण्ये ही सर्व दु खे नाश पावतील २ रानावनात जाऊन तू शीत व उष्ण याची सवय कर आसन मांडून समाधी साधण्याचा प्रयत्न कर तपश्चर्या, तीर्थयात्रा, दानधर्म, व्रताचे आचरण व यज्ञयाग, वगैरे साधनाच्या व बुद्धीच्या योगाने नाना भोगाचे प्रकार काही चुकत नाहीत तेव्हा जन्म, मृत्यू, म्हातारपण, रोग याना सहन करून, काम, क्रोध, अहकार इत्यादी विकाराना सहन करून आपल्या स्वत च्याच आश्रमात अविनाशी स्वरूपात तू निजसुख प्राप्त करून घे ३ वेदाची अक्षरे घोकण्यास आरभ करशील तर विनाकारण अहकार व विधिनिषेध यांची कटकट मात्र पाठीमागे लागेल. वादविवाद करशील तर वृथा निंदेचा दोष प्राप्त होईल म्हणूनच ही भूषणे वाटली, तरी ती दोषाचीच मूळे आहेत असे तू समज, आणि तुकाराम महाराज म्हणतात, तू या ससाराची खोटी वाटणारी वृथा चिंता सोडून दे सर्व भावाने या सताना तू शरण जावेस व मग हव्या त्या स्थितीत तू राहिलास तरी हरकत नाही ४

१२११ नव्हे गुरुदास्य ससारिया । वैराग्य तरी मेणे धापे विषया ।
तैसे नाम नव्हे पढरीराया । जया सायास न लगती ॥ १ ॥
म्हणोनि गोड सर्वभावे । आघोळी न लगे तोंड धुवावे ।
अर्थचाड जीवे । न लगे भ्यावे ससारा ॥ २ ॥
कर्मा तव न पुरे ससारिक । धर्म तव[1] फळदायक ।
नाम विठ्ठलाचे एक । नाशीं दु ख भवाचे ॥ ३ ॥
न लगे साडणे माडणे । आगमनिगमाचे देखणे ।
अवघें तुका म्हणे । विठ्ठलनामें आटले ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – गुरुदास्य–गुरूचे दास्यत्व, मेणें–भयाने, सायास–प्रयत्न, आटले–समाविष्ट झाले

अर्थ – जी ससारी माणसे आहेत, त्याना श्रीगुरूचे दास्यत्व खडतरपणे होणार नाही, आणि प्रखर वैराग्य म्हणजे विविध विषयांविषयी परत्याग, हेही त्याच्याकडून होणार नाही तसे या पढरीरायाचे नाम नव्हे याच्या प्राप्तीसाठी काही प्रयत्न करावे लागत नाहीत १ यासाठी जे सर्व दृष्टींनी गोड आहे, त्याचा स्वीकार करण्यासाठी आंघोळ करणे अथवा तोंड धुणे याचीही गरज लागत नाही जे सासारिक जीव आहेत, त्यानी धनाची योग्य इच्छा

---
१ तरी

मनात ठेवण्याची भीती बाळगण्याचे कारण नाही ससारास त्यानी भिण्याची जरुरी नाही २ विविध कर्मे सर्व ययासाग करायची झाली तर सासारिक कधीच पुरा पडणार नाही आणि धर्म तर फळ देणारा असल्याने तो या विठ्ठलाच्या नामाच्या रूपानेच आचरावा त्याच्या योगाने ससाराचे दु ख नाहीसे होते ३ या विठ्ठलनामाच्या साधनात काही सोडणे, काही माडणे याची खटपट करावी लागत नाही काही वेदशास्त्राचा अर्थ पाहावा लागत नाही तुकाराम महाराज म्हणतात, एका विठ्ठलनामात सर्व साधनाचा समावेश झाला आहे ४

१२१२ नये इच्छू सेवा स्वइच्छा जगाची । अवज्ञा देवाची घडे तेणे ॥ १ ॥
देहाचा निग्रही त्याचे तो साभाळी । मग नये कळि अगावरी ॥ २ ॥
आपलिया इच्छा माता सेवा करी । न बाधी ते थोरी येणे क्षोभे ॥ ३ ॥
तुका म्हणे साडा देखीचे दिमाख । मोडसीचे दु ख गाड फाटो ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – स्वइच्छा–स्वत च्याच तत्रान वागणाऱ्या जगाची, कळि–सकट

अर्थ – स्वत च्याच तत्रान वागणाऱ्या जगाच्या सेवेची इच्छा कधी करू नये त्यामुळे देवाची अवज्ञा मात्र होत असते १ या देहाचा निग्रह करणारा देवच असल्यामुळे त्याचे तो साभाळीत असतो त्यायोगे कोणतेही सकट आपल्या अगावर कधीच येत नाही २ आई आपल्या मुलाची देखभाल आपल्याच इच्छेनुसार करीत असते या थोरवीमुळे तिच्या मनाचा क्षोभ तिला कधी बाधकारी होत नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, नुसते तोडदेखले दिमाख सोडून द्या साधे मोडशीचे दुखणे झाले तरी गाड फाटली जाते ४

१२१३ सत्य सत्यें देतें फळ । नाही लागतचि बळ ॥ १ ॥
ध्यावे देवाचे ते पाय । धीर सकळ उपाय ॥ २ ॥
करावीच चिंता । नाहीं लागत तत्त्वता ॥ ३ ॥
तुका म्हणे भावे । शरण म्हणविता बरवे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – तत्त्वता–खरे पाहता

अर्थ –सत्य हे सत्याचेच फळ देणारे आहे ते प्राप्त करून घेण्यासाठी काही वेगळ्या शक्तीची जरुरी लागत नाही १ देवाच्या पायाचे चिंतन करावे व धीर धरून असावे, हाच एक धीराचा उपाय आहे २ खरे पाहता मग आपणांस कोणत्याही प्रकारची चिंता करावी लागत नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, मनोभावे आम्ही देवासच शरण आहोत, असे म्हणणे फारच चागले आहे ४

१२१४ साधक जाले कळीं । गुरगुडीची[1] लाब नळी ॥ १ ॥
पचीं पडे[2] मद्यपान । भागभुर्का हे साधन ॥ २ ॥
अभेदाचे पाठातर । अति विषयीं पडिभर ॥ ३ ॥
चेल्याचा सुकाळ । पिंड दड भगपाळ[3] ॥ ४ ॥
सेवा मानधन । बरे इच्छेने सपन्न ॥ ५ ॥
सोगाच्या नरकाडी । तुका बोडोनिया सोडी ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – कळीं–कलियुगात, पचीं–पचनी, पडिभर–प्रेमाचे वैपुल्य, भगपाळ–विषयासक्त, नरकाडी–नरकाला जाणारे

अर्थ – या कलियुगात खोटा परमार्थ साधणारे पुष्कळ झाले आहेत परतु त्यांच्या तोंडांत सतत गुडगुडीची नळी असते १ त्याना मद्याचे पान चांगलेच पचनी पडलेले असते घोटा, भांग याच्या सेवनाचीही गोडी त्यांना विशेष प्रकारची असते २ अभेदाच्या तत्त्वाचे, ईश्वर व जीव यांच्या ऐक्याच्या वचनांचे त्यांचे पाठांतर असते,

१ गुडगुडीची, २ पडिल, ३ भगपाळ

पण त्यांची खरी प्रीती मात्र नाना प्रकारच्या विषयांवर असते ३ त्यांच्यासारख्याच शिष्यांचा सुकाळ असतो त्यांच्याभोवती. त्यांचे देह चांगले जाडजूड असून दंडही चांगले पोसलेले असून ते सर्व चांगलेच विषयासक्त असतात. ४ दुसऱ्याने केलेली सेवा, मान, धन यांच्या इच्छेने त्यांना संपन्न झाल्यासारखे वाटते. ५ तुकाराम महाराज म्हणतात, असे हे सोंगाडे साधक नर्कासच जाणारे आहेत. त्यांची मी चांगलीच फजिती करून सोडतो. ६

विवरण :– साक्षात्कारानंतर तुकोबाचे मन शांत झाले. ईश्वरी कृपेचे तेज त्यांच्या मुखावर विलसू लागले. त्यांच्या वाणीस एका बाजूस वात्सल्याचे, करुणेचे, तृप्तनेचे झरे फुटत राहिले, तर दुसऱ्या बाजूस त्यांच्या वाणीतून प्रखर शब्दांनी समाजसुधारणेचे कार्य पत्करले. ही सुधारणा दुहेरी होती. लोकांचे संसार कसे विस्कटून गेले होते, लोक अनाचाराकडे कसे वळत होते. इंद्रिय सुखसुखातच कशी गोडी त्यांना अवीट वाटत होती, केवळ प्रपंच, केवळ धनदौलत यांचीच चिंता त्यांना कशी असे, याचे वर्णन बुवांनी जितक्या प्रखर व कडक शब्दात केले आहे, तितक्याच तिखट शब्दाच्या प्रहारांनी त्यांनी समकालीन भोंदू गुरूचा, ढोंगी साधकांचा, खोट्या संताचा निषेध केला आहे.

धर्माच्या नावाखाली, देवाच्या प्राप्तीसाठी, साधीसाधु व ढोंगी बुवांनी समाजास लुबाडण्यास व परमार्थाच्या नावे भलत्याच मार्गास नेण्याचा प्रयत्न चालविला होता. बाह्यकर्मकांड, बाह्यवेष, नवससायास, अंगारेधुपारे, जादुटोणा, चमत्कार यांनी खरा परमार्थविचार लुप्त होण्याच्या पथात होता. जिकडे तिकडे ढोंगी साधु व व्यसनी साधक यांचा गजबजाट झालेला होता. या विकृत अशा समाजस्थितीचे चित्रण त्यांच्या कडक निषेधासहित तुकारामबुवांनी केलेले आहे, त्यांनी म्हटलेले आहे, '**ऐसे संत झाले कळीं । तोंडी तमाखूची नळी**' एकसारखी तोंडात चिलीम धरून व्यसनाधीन झालेल्या 'संताचा' आदर्श कसला आला आहे ? हे सर्व सोंग असल्यामुळे तेथे पांडुरंग कधीच असणार नाही असा त्यांचा विश्वास होता. गाजराच्या पुंगीसारखे क्षणभर टिकणारे व जागोजागी दिसणारे योगी अहंकारी झाले होते. '*अल्प असे ज्ञान । अंगीं ताठा अभिमान*' अशी त्यांची स्थिती असे.

पर द्रव्य व परनारी यांची अभिलाषा मनात धरून नाक धरणारे ढोंगी साधू सर्वत्र वावरत होते त्यांचा निषेध करताना तुकोबांनी म्हटले आहे, '*जळो तयाचा आचार । व्यर्थ भार वाहे खर*' कुणी डोक्यावर केस वाढवितात, कुणी अंगात भुते आणतात, कुणी शकुन सांगून लोकांना फसवितात, कुणी जटा वाढवून '**अभिमान मोठा करिताती**' सर्वांगाला विभूतीलेपन असले तरी त्यांचे लक्ष मात्र मिष्टान्नावर असते. तुकारामबुवांनी अशा गोसाव्याचा, नाथाचा, महानुभवाचा निषेध केलेला आहे. '**घालोनियां फेरा मागती द्रव्यासी । परी शंकरासी नोळखती**' अशी त्यांची अवस्था होती असे हे भोंदू साधू सर्वत्र दिसत होते. '**अंगीं लावूनिया राख । डोळे झांकुनि करिती पाप**' कारण त्यांनी केवळ पोटासाठीच ही सर्व बाह्य सोंगे घेतलेली होती, मुखाने ब्रह्मज्ञान बोलणाऱ्याचे चित्त धनावरच असते. सर्व पढिक साधकही पिंडपोषकच म्हणजे शरीरधारणेचीच काळजी करणारे होते. गांजा ओढण्यात, भांग पिण्यात, मद्यपान करण्यातही काही भक्तिसाधनेची जोड आहे, असे प्रतिपादन करण्याचेही धैर्य काही साधुसंतांना होत असे. समाजापुढले हे असे ढोंगी साधु केव्हाही निषेधार्हच असल्याने बुवांनी कडक शब्दात त्यांची धिंड काढली आहे.

**१२१५** **मज पाहातां हें लटिकें सकळ । कोठें मायाजाळ दावीं देवा ॥ १ ॥**
**कोणाचा कोणासीं न[1] धरे संबंध । आहे शुद्धबुद्ध ठायींचे ठायीं ॥ २ ॥**
**काढा जी आपुलें मोह चुंथी जाळें । नका लावूं बळें वेड आम्हां ॥ ३ ॥**
**जीव शिव काहीं ठेवियेलीं नांवें । सत्य तुम्हां ठावें असोनियां ॥ ४ ॥**
**सेवेच्या अभिलाषें न धराचि विचार । आम्हां दारोदार हिंडविलें ॥ ५ ॥**
**आहे तैसें आतां फळलियावरी । परतें सांडा दुरी दुर्जेपण ॥ ६ ॥**
**तुका म्हणे काय छायेचा अभिलाष । हंस पावे नाश तारागणीं[2] ॥ ७ ॥**

१ न धरवे, २ तारागणी.

शब्दार्थ व टीपा :– लटिकें–खोटे, बुंथी–खोळ, वस्त्र

अर्थ .– देवा, मी जर सर्वत्र पाहिले तर मला सारे खोटेच दिसते. तेव्हा हे सर्व मायाजाळ आहे तरी काय? ते मला दाखीव ना १ या जगात कुणाचा कुणाशी संबंध नसून जे आहे ते शुद्ध बुद्ध असे आपल्या जागीच स्वयंसिद्ध असे आहे. २ देवा, तुम्ही आमच्यावर घातलेले हे जे मायेचे वस्त्र आहे तो काढा ना. आम्हाला उगाच त्यापायी वेड लावू नका ३ देवा, खरे पाहता सर्वत्र एकच तत्त्व असताना तुम्ही एकास जीव व एकास शिव अशी नावे ठेवलीत. ४ आमच्याकडून तुम्हास सेवा घ्यायची इच्छा असल्यामुळे तुम्ही या गोष्टीचा विचारच न करिता आम्हास जन्ममृत्यूच्या खेपात फिरवीत आहात ५ आता तरी आहे ही वस्तुस्थिती समजल्यावर देवा, जो काही खोटाच द्वैतभाव धरला आहे तो सोडून द्यावा ६ तुकाराम महाराज म्हणतात, तारागणाचा, आकाशातील तारकांचा देखावा प्रतिबिंबाच्या रूपाने पाण्यावर पडलेला पाहून त्या ठिकाणी मौक्तिकाचा मोह हंसाला उत्पन्न होतो व तेथे उडी घेतल्यामुळे बिचारा हंस मात्र नाश पावतो. ७

१२१६ पंचभूतांचा गोधळ । केला एकेठायीं मेळ ।
लाविला सबळ । अहंकार त्यापाठीं ॥ १ ॥
तेथें काय मी तें माझें । कोण वागवी हें ओझें ।
देहा केवीं रिझे । हे काळाचे भातुके ॥ २ ॥
जीव न देखे मरण । धरी नवी सांडी जीर्ण ।
संचित प्रमाण । भोगा शुभा अशुभा ॥ ३ ॥
इच्छा वाढवी ते वेल । खुंटावा तो खरा बोल ।
तुका म्हणे मोल । झाकलें तें पावेल ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– पंचभूतांचा गोधळ–पृथ्वी, आप, तेज, वायू व आकाश या पंचमहाभूतांच्या एकीकरणातून झालेला मानवी देह

अर्थ .– पृथ्वी, आप, तेजादी पंचमहाभूतांचे एकत्रीकरण होऊन हा मानवी देह निर्माण झाला व हा देह म्हणजेच मी, असा अहंकार जीवाच्या ठिकाणी निर्माण झाला १ या ठिकाणी शरीर म्हणजेच मी, त्याचे ओझे माझ्यावरच आहे अशा ममत्वाच्या भावनेने मनुष्य काळाचेच खाद्य असणारा देह कौतुकाने जपू लागतो. २ खरे पाहिले असता, जीवास मरण कधीही नसते. तो जुने वस्त्र टाकून देऊन नवीन स्वीकारतो. पूर्वजन्मीच्या शुभाशुभ कर्माच्या भोगानुसार हे सर्व घडते ३ मागच्या जन्मीच्या कर्मानुसार इच्छेचा वेल वाढीस लागतो या इच्छारूपी वेलाला न वाढविणे, त्याची वाढच खुंटविणे, हे सत्य होय तुकाराम महाराज म्हणतात, ज्यानी आपली इच्छाच याप्रमाणे नाहीशी केली, तोच गुह्य किंवा गुप्त असलेले हे ज्ञान प्राप्त करून घेण्यास समर्थ होईल. ४

विवरण :– शरीर हे पंचमहाभूतांचे बनलेले असून त्यात अहंकार, इच्छा निर्माण होऊन त्याचे कोडकौतुक केले जाते व त्यात असणारा अविनाशी आत्मा मात्र दुर्लक्षित होतो, हा एक तात्त्विक विचार तुकाराम महाराजांनी या अभंगात मांडलेला आहे. अहंकार व इच्छा यांचा त्याग करून आत्मतत्त्वास ओळखल्यानेच खरे रहस्य समजेल, असे त्यानी या ठिकाणी सुचविले आहे. पंचमहाभूतात्मक मानवी देह, पाच कर्मेंद्रिये, पाच ज्ञानेंद्रिये, यांचे शब्द, स्पर्श, रस गंधात्मक पाच विषय, संकल्पविकल्पात्मक मन, व्यवसायात्मक बुद्धी, अहंकार, इच्छा सुखदु:खादी भावना इत्यादींचा एकच मेळ म्हणजे हे शरीर असा विचार शास्त्रकारांनीही केलेला आहे गीतेच्या तेराव्या अध्यायात या शरीराचे म्हणजे क्षेत्राचे सविस्तर वर्णन आलेले आहे. महाभूते, अहंकार, बुद्धी, अव्यक्त प्रकृती, दहा सूक्ष्म इंद्रिये, एक मन, पंचविषय इच्छा, द्वेष, सुख, दु:ख, संघात, चेतना, धैर्य इत्यादी तत्त्वांच्या समुदायास क्षेत्र अथवा शरीर म्हटले आहे हे क्षेत्र अथवा शरीर जो जाणतो तो क्षेत्रज्ञ होय.

या शरीराचा खरा मालक गीतेच्या तत्त्वज्ञानाप्रमाणे नित्य, अविनाशी असा आत्माच असून त्याला ओळखणे, त्याचे स्वरूप जाणणे, त्याचा व मूळ स्वरूपाचा संबंध ओळखणे हे खरे ज्ञान होय. हा आत्मा कधी मारला जात नाही, नष्ट होत नाही. हा कधी जन्मत नाही, कधी मरत नाही. हा नित्य अज, शाश्वत व पुरातन आहे. व शरीराचा नाश झाला तरीही याला धक्का पोचत नाही. खरे म्हणजे हा देह म्हणजे 'काळाचें भातुकें'च होय. पण या देहाच्या नाशाने 'जीव न देखे मरण' हे गीतेमधील तत्त्वच बुवा सांगत आहेत. 'घरी नवी जीर्ण सांडी' हे शब्द म्हणजे गीतेमधील 'वासांसि जीर्णानि यथा विहाय नवानि गृण्हाति नरोऽपराणि' या तत्त्वस्पर्शी ओळीचाच सुबोध मराठी अनुवाद होय. गीतेच्या तत्त्वाप्रमाणे या आत्मतत्त्वास कधी मरणच नाही. याला अग्नी जाळीत नाही, पाणी भिजवीत नाही, वायु सुकवीत नाही. हा कधीही न तुटणारा, न जळणारा, न भिजणारा, न सुकणारा असा आत्मा नित्य सर्वत्र भरलेला, स्थिर, अचल व सनातन म्हणजे चिरंतन आहे. देहान्तर झाले म्हणून काय झाले? 'जैसीं जीर्णें वस्त्रें सांडिजे। मग नूतनें आणिकें वेढिजे। तैसें देहांतरातें स्वीकारिजे। चैतन्यनाथें' असे थोडक्यात वर्णन ज्ञानेश्वरानी केले आहे. सुखदुःखादी इच्छाची वेल वाढत असलेल्या या शरीराचे खरे महत्त्व ओळखून, ते कमी महत्त्वाचे मानून जे शुद्ध आत्मतत्त्व आहे, त्याचाच विचार केला तरच खरे ज्ञान होईल, असा तुकारामबुवांच्या म्हणण्याचा भावार्थ.

१२१७ पुसावेंसें हेंचि वाटे। जें जें भेटे तयासी ॥ १ ॥
देव कृपा करील मज। काय लाज राखील ॥ २ ॥
अवघियांचा विसर जाला। हा राहिला उद्योग ॥ ३ ॥
तुका म्हणे चिंता वाटे। कोण भेटे सांगेसें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा.– अवघियांचा–सर्व विषयाचा.

अर्थ:– मला जे कुणी भेटतील त्यांना हेच एक विचारावेसे वाटते की, १ देव माझ्यावर कृपा करून माझी लज्जा रक्षण करील काय? २ मला सर्व विषयांचा विसर पडलेला असून हाच एक चिंतनाचा उद्योग राहिलेला आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, या एकाच गोष्टीची मला चिंता वाटत आहे. या प्रश्नाचे उत्तर कुणी देईल असे मला भेटेल काय? ४

१२१८ जाळा तुम्ही माझें जाणतें मीपण। येणें माझा खुण मांडियेला ॥ १ ॥
खादलें पचे तरिच तें हित। ओकलिया थीत पिड पीडी ॥ २ ॥
तरि भलें भोगे जोडिलें तें धन। पडिलिया खानें[1] जीवनासी ॥ ३ ॥
तुका म्हणे मज तारीं गा विठ्ठला। नेणतांचि भला दास तुझा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा.– खुण–घात, खून, थीत–व्यर्थ, खाने–दरोडा.

अर्थ:– देवा, हा जाणतेपणाचा अभिमान माझाच घात करीत असल्यामुळे तुम्ही तो जाळून टाका. १ जे खाल्लेले आहे, ते नीट पचले तर ठीक आहे. पण तेच जर न पचल्यामुळे ओकले गेले तर मग शरीराला व्यर्थच पीडा आहे. २ जे धन मिळविले त्याचा प्रपंचास नीट उपयोग झाला तरच ठीक आहे, पण ते जर दरोड्यात नष्ट होईल तर त्याचा जीवनात काहीच उपयोग न होता उलटा त्रास मात्र होईल. ३ तुकाराम महाराज म्हणतात, विठ्ठला, तूच आता मला या संकटांतून तार. मी नेणता असून तुझाच दास आहे. ४

१२१९ याती मतिहीन रूपें लीन दीन। आणीक अवगुण जाणोनियां ॥ १ ॥
केला त्या विठ्ठलें माझा अंगीकार। ऐसा हा विचार जाणोनियां ॥ २ ॥
जें कांहीं करितों तें माझें स्वहित। आली हे प्रचित कळों चित्ता ॥ ३ ॥

---

१ खाण.

जाले सुख जीवा आनंद अपार । परमानंदे भार घेतला माझा ॥ ४ ॥
तुका म्हणे यासी नावाचा अभिमान । म्हणोनि शरण तारी बळें ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – याती–जाती, मतिहीन–बुद्धीहीन, अंगीकार–स्वीकार प्रचित–अनुभव

अर्थ – मी यातीहीन म्हणजे हलक्या जातीचा असून बुद्धीनेही मंद आहे माझे रूपही मोठे चांगले नसून मी अतिशय दीन असा आहे आणखीही माझ्यात काही अवगुण आहेत हे मी चांगलेच जाणून आहे १ असे असूनही माझा स्वीकार त्या पांडुरंगाने केलेला आहे याची मला चांगलीच जाणीवही आहे २ हा ईश्वर जे काही करतो ते माझेच हित आहे, हा अनुभव माझ्या चित्तास पूर्णपणे आलेला आहे ३ या माझ्या जीवाला अपार असा सुखानंद झाला असून या परमानंदस्वरूपी विठ्ठलाने माझा सर्व भार आपल्या स्वतःच्या शिरावर घेतलेला आहे ४ तुकाराम महाराज म्हणतात, या देवाला स्वतःच्या नावाचा मोठाच अभिमान असल्यामुळे शरण आलेल्या भक्तांना तो तारतो ५

१२२० बहु उतावीळ भक्तीचिया काजा । होसी केशीराजा मायबापा ॥ १ ॥
तुझ्या पायी मज जालासे विश्वास । म्हणोनिया आस मोकलिली ॥ २ ॥
ऋषि मुनि सिद्ध साधक अपार । कळला विचार त्यासी तुझा ॥ ३ ॥
नाहीं नास ते सुख दिले तयास । जाले जे उदास सर्वभावे ॥ ४ ॥
तुका म्हणे सुख न माये मानसीं । धरिले जीवेसी पाय तुझे ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – काजा–कार्यासाठी आस–इच्छा मोकलिली–सोडून दिली नास–नाश

अर्थ – देवा, केशीराजा, मायबापा, भक्ताच्या कार्यासाठी तू फारच उतावीळ झालेला दिसतोस नेहमी १ माझा सर्व विश्वास देवा तुझ्याच पायाशी असल्याने मी इतर ठिकाणची सव आशा आता सोडून दिलेली आहे २ ऋषी, मुनी, साधक सिद्ध यांना अपार असलेल्या तुझ्या रूपाचा विचार थोडासा का होईना समजलेला आहे ३ म्हणूनच ज्याला कधीही नाश नाही, असे सुख जे सर्वस्वावर उदास झाले त्यांनाच तू दिलेस ४ तुकाराम महाराज म्हणतात, असे हे सुख माझ्याही मनात मावेनासे झाले आहे मी तुझे पाय माझ्या जीवापाशी जपून धरले आहेत ५

१२२१ मायामोहजाळीं होतो सापडला । परि या विठ्ठला कृपा आली ॥ १ ॥
काढूनि बाहेरि ठेविलो निराळा । कवतुक डोळा दाखविले ॥ २ ॥
नाचे उडे माया करी कवतुक । नाशवंत सुखें साच केलीं ॥ ३ ॥
रडे फुंदे दुःखें कुंटितील माया । एकासी रडता ते ही मरे ॥ ४ ॥
तुका म्हणे मज वाटते नवल । मी माझें हे बोल ऐकोनिया ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – साच–खरा सत्य

अर्थ – मी प्रपंचाच्या व देहादी वृत्तींच्या मायामोहाच्या जाळ्यात सापडलो होतो पण या पांडुरंगास माझी दया आली व मी त्यातून सुखरूपपणे बचावलो १ त्याने मला त्यातून बाहेर काढले व कृपेचे कौतुक माझ्या डोळ्यांना त्यानेच दाखविले २ नाही तर ही माया कशी असते ? तिच्या मोहाने सवजणांचे देहभान विसरते ती सर्वांना नाचायला लावते व नाशिवंत असणारी ही इंद्रियसुखे खरीच आहेत, असा भास निर्माण करते ३ त्यामुळे सर्व जीवांना रडावे लागते इंद्रियसुखासाठी डोकेफोड करावी लागते आणि एकासाठी रडणारा दुसरा जीव असतो तोही एके दिवशी मरून जातो ४ असे असताना तुकाराम महाराज म्हणतात, मी, माझे शरीर, माझा प्रपंच इत्यादी मिथ्या अभिमानाचे बोल एकून मला फारच नवल वाटते ५

१२२२ देहभाव आम्ही राहिलो ठेवूनि । निवांत चरणीं विठोबाच्या ॥ १ ॥
आमुच्या हिताचा जाणोनि उपाव । तोचि पुढें देव करीतसे ॥ २ ॥

म्हणउनि नाहीं सुख दुःख मनीं । ऐकिलिया कानीं वचनाचें ॥ ३ ॥
जालों मी निःसंग निवांत एकला । भार त्या विठ्ठला घालूनियां ॥ ४ ॥
तुका म्हणे जालों जयाचे अंकित । तोचि माझें हित सर्व जाणे ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– उपाव–उपाय, अंकित–स्वाधीन.

अर्थ :– आम्ही आपला सर्व देहभाव निवान्तपणे त्या विठ्ठलाच्या चरणी वाहून मी आता स्वस्थ झालेलो आहे. १ आमचे हित जेणेकरून होईल, असे सर्व काही उपाय तो करीत असतो. २ म्हणून मला आता हे मी कानांनी ऐकले असल्यामुळे कसलेच सुखदु ख वाटत नाही. ३ मी आपला सर्व भार आता देवावर घालून, नि संग होऊन एकटाच राहिलेलो आहे. ४ तुकाराम महाराज म्हणतात, मी ज्या विठ्ठलाचा अंकित झालो आहे, स्वाधीन बनलो आहे, तो आता माझे जे जे हित असेल ते करील. ५

१२२३ आलें फळ तेव्हां राहिलें पिकोन । जरि तें जतन होय देठीं ॥ १ ॥
नामेंचि सिद्धि नामेंचि सिद्धि । व्यभिचारबुद्धि न पवतां ॥ २ ॥
चालिला पंथ तो पाववील ठाया । जरि आड तया नये कांहीं ॥ ३ ॥
तुका म्हणे मध्यें पडती आघात । तेणें होय घात हानि लाभ ॥ ४ ॥

अर्थ :– ठाया–ठिकाणास, आघात–संकटे

अर्थ :– झाडाला आलेले फळ पिकेपर्यंत टिकून राहील हे खरे, पण केव्हा ? ते जर देठास जपून राहिले तर. १ त्याचप्रमाणे आपण ईश्वराच्या नामाशीच एकनिष्ठ राहिलो तर आपला हेतू सिद्ध होईल, पण हे अनुसरणे दुसरे काही मनात ठेवण्याची व्यभिचाराची बुद्धी नसेल तर. २ ज्या मार्गाने ज्या ठिकाणास आपण निघालो आहोत, ते स्थान मध्येच काही संकट आड आले नाही तर आपण गाठू शकू. ३ तुकाराम महाराज म्हणतात, पण मध्येच जर काही संकटे निर्माण झाली तर मात्र होणाऱ्या लाभाची हानी घडते ४

१२२४ निरोधाचें मज न साहे वचन । बहु होतें मन कासावीस ॥ १ ॥
म्हणऊनि जीवा न साहे संगति । बैसतां एकांतीं गोड वाटे ॥ २ ॥
देहाची भावना वासनेचा संग । नावडे[1] उबग आला यांचा ॥ ३ ॥
तुका म्हणे देव अंतरे ज्यामुळें । आशामोहजाळें दुःख वाढे[2] ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– निरोधाचे–निषेधाचे, विरोधाचे

अर्थ :– या भक्तीच्या किंवा परमार्थाच्या निषेधाचे अथवा विरोधाचे जर एखादे वचन असेल तर ते काही मला सहन होत नाही. त्यामुळे माझे मन फारच कासावीस होते १ यासाठीच माझ्या जीवास कुणाचीही संगत आता सहन होत नाही. एकान्तात बसण्यातच मला फार गोडी वाटते. २ देहबुद्धीची भावना व निरनिराळ्या वासनांची संगत या गोष्टी काही आता मला आवडत नाहीत. त्यांचा मला भारी उबग आला आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, आशा व मोह यांच्या जाळ्यात मी सापडल्यामुळे दु.ख मात्र वाढते व त्यामुळे देवाशी मात्र अंतर पडते. ४

१२२५ तुजशीं संबंधचि खोटा । परता परता रे[3] थोंटा ॥ १ ॥
देवा तुझें काय घ्यावें । आप आपणां ठकावें ॥ २ ॥
जेथें मुदल न ये हातां । व्याज मरावें लेखितां ॥ ३ ॥
तुका म्हणे ऐसा । त्रिभुवनीं तुझा ठसा ॥ ४ ॥

१ न साहे उबग, २ वाटे, ३ रे तू खोटा.

शब्दार्थ व टीपा – परता–दूर ठकावें–फसावे, लेखिता–करीत असताना

अर्थ – देवा, तू खरोखरीच फारच खोटा दिसतोस तुझा सवधच खोटा आहे असे वाटते तू आमच्या पासून दूर होतास तेच बरे होते १ देवा तुझ्या भेटीत मी तुझ्यापासून काय घ्यावे रे? काही घेता येत नाही उलट आम्ही फसले मात्र जातो २ या तुझ्या व माझ्या व्यवहारात मुद्दल काहीच हाताशी आलेले नाही, उलट व्याजाचा मात्र हिशेब करिता करिता मान मरण्याचा प्रसग येत आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, अशी भक्तजनाना फसविण्याची तुझी रीत फारच प्रसिद्ध आहे ४

१२२६ याचि हाका तुझे द्वारीं । सदा देखो ऋणकरी ॥ १ ॥
सदा करिती खड दड । देवा बहुगा तू लड ॥ २ ॥
मुखें गोविसी भोजना । लपवूनिया आपणा ॥ ३ ॥
एके एक बुझविसी । तुका म्हणे ठक होसी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – लड–दाडगा, ठक

अर्थ – देवा, तू आपल्या भक्ताना, सेवकाना फसवितोस, अशीच ओरड नेहमी तुझ्या दाराशी असते १ तू नेहमी कुणाला तरी दड करीत असतोस, कुणाशी तर खडाचे व्यवहार करीत असतोस असा तू मोठा बलदड ठक दिसतोस २ आपल्या भक्ताना त्याचा हेतू जाणून कुठल्या तरी फलाच्या आशेचे वा तिच्या तृप्तीचे भोजन देतोस व आपण मात्र स्वत लपून राहतोस ३ त्याना ज हवे ते न देता देवा, तू त्याची कशी तरी समजूत काढतोस असा तू चागलाच फसविणारा ठक आहेस, असे तुकाराम महाराज म्हणतात ४

१२२७ आम्ही जाणो तुझा भाव । दृढ धरियेले पाव ॥ १ ॥
फाकू नेदू चुकाविता । नेघो थोडें बहु देता ॥ २ ॥
बहुता दिसाचे लिगाड । आले होत होत जड ॥ ३ ॥
तुका म्हणे आता । नेघो सर्वस्व ही देता ॥ ४ ॥

मान्य करून एकदा सर्व चुकते करा ना. म्हणजे लोकांत होणारी फजिती तरी वाचेल तुमची. ३ तुकाराम महाराज म्हणतात, यासाठी मला काही तूट सहन करण्याचा प्रसंग येऊ नये असे तू करावेस. ४

१२२९ नाहीं मागितला । तुम्हां मान म्यां विठ्ठला ॥ १ ॥
जे हे करविली फजिती । माझी एवढी जना हातीं ॥ २ ॥
नाहीं केला पोट । पुढें घालूनि बोभाट ॥ ३ ॥
तुका म्हणे धरूनि हात । नाही नेलें दिवाणांत ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– पोट–पोट भरण्याचा धंदा.

अर्थ :– देवा, विठ्ठला, कोणताही मानसन्मान मी तुझ्याजवळ कधी मागितलेला नाही. १ असे असूनही माझी तुम्ही या सर्व लोकांत एवढी फजीती का आरंभिली आहे? २ मी पोट भरण्यासाठी काही धंदा म्हणून हा मार्ग पत्करण्याचा बोभाटा केलेला नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, किंवा देवा, मी कधी तुम्हांला तुमचा हात धरून कधी भांडणासाठी दिवाणातही नेलेले नाही. ४

१२३० तूं पांढरा स्पटिक मणी । करिसी आणिकां त्याहुनि ॥ १ ॥
म्हणोनि तुझ्या दारा । न येत ठकतो दातारा ॥ २ ॥
तुझी ठावी नांदणूक । अवघा बुडविला लोक[1] ॥ ३ ॥
तुका म्हणे ज्याचें घेसी । त्यास हेचि दाखविसी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– आणिकां–दुसऱ्यास, नांदणूक–वागणूक, रीत.

अर्थ :– देवा, तू खरे म्हणजे पांढऱ्या स्वच्छ स्फटिक मण्याप्रमाणे आहेस व तू जे कुणी दुसरे तुझ्याकडे येतात त्यांनाही तसेच बनवून टाकतोस. १ म्हणून देवा, तुझ्या दारांत कुणीही येत नाही कारण येथे लोक फसले जातात. २ तू सर्व लोकांना बुडविले आहेस, हे आम्हास चांगलेच माहीत आहे ही तुझी रीत सर्वत्र प्रसिद्ध आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, तू कसा आहेस? तर ज्याचे सेवारूपी कर्ज तू घेतोस, त्यालाच फसविण्याची रीत तू चांगलीच दाखवितोस. ४

१२३१ बोलतों निकुरें । नव्हेत सलगीचीं उत्तरें ॥ १ ॥
माझें संतापलें मन । परपीडा ऐकोन ॥ २ ॥
अंगावरि आलें । तोंवरि जाईल सोसिलें ॥ ३ ॥
तुज भक्तांची आण देवा । जरि[2] तुका येथें ठेवा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– निकुरें–निकराला येऊन.

अर्थ :– देवा, मी फार निकराला येऊन, एकेरीवर येऊन बोलत आहे, हे ध्यानात ठेवा. हे काही प्रेमाच्या सलगीचे बोलणे नाही १ माझे मन आता संतापून गेले असून तुझ्या सेवकांना तू जी पीडा दिली आहेस, ती मला आता ऐकवतही नाही. २ जोपर्यंत केवळ माझ्यावरच प्रसंगाचे ओझे होते, तोपर्यंत ते सहन केले; पण आता सर्वांचीच पीडा पाहून मी दुःखी झालो आहे. ३ देवा, या तुकारामास तू जर आहे तिथेच ठेवशील, तर तुला तुझ्या भक्तांची शपथ आहे. ४

विवरण :– तुकाराम महाराज देवाशी कधी कधी विशेष सलगी दाखवून, काही मुद्दे काढून, प्रेमाचे भांडण करितात. वरील सहासात अभंगातून तुकारामबुवांनी भांडणाचा असाच एक मुद्दा उपस्थित केलेला आहे. देव हा आपल्याच सेवकाला ठकविणारा, फसविणारा आहे, तो त्याच्याकडून सेवेचे भांडवल घेतो, पण त्याच्यावर कृपा मात्र करीत नाही देव अशा प्रकारे सर्वांनाच त्रास देतो, मुद्दलही बुडवितो व व्याज देण्यासही हा सळसळ करितो, असे तुकोबांनी

१ लौकिक, २ तरी.

आपल्या नेहमीच्या व्यापारी भाषेत तक्रार केली आहे देवाने आपली ही वचने निकराची आहेत, सलगीची नाहीत असेच मानावे, म्हणूनही त्यानी त्यास सूचना दिलेली आहे आपला संताप झाला आहे असे त्या एका अभगात म्हणत आहेत

अर्थात हे सर्व भाडण प्रेमाच्या पोटीच असते कधी आपण देवास फारच दुरुत्तरे केली, असे वाटून बुवाना पश्चात्तापाचीही भावना निर्माण होते मग ते म्हणतात, ' **नये ऐसे बोलो कठिण उत्तरें । सलगी लेकुरें केलीं पुढें** ' आपला हाही अपराध देवाने क्षमा करावा, अशीही प्रार्थना ते करितात मग तुकोबा भाडतात तरी का ? ईश्वरास एवढ्या कठोरतने का बोलतात ? देवाची अशी फजीती करायला का प्रवृत्त होतात ? या प्रश्नाचे उत्तर असे की, ज्याच्यावर आपला फार मोठा विश्वास त्याच्यावर रागावण्यात रुसण्यात गोडी असते ' **प्रीतीवीण रुसो नये** ' असे समर्थ रामदासानी म्हटले आहे याच प्रीतीच्या अतिरेकामुळे तुकारामामारखे भक्त कधी कधी देवावर रागवतात, त्याच्यावर रुसतात, कडक शब्दानी भाडण काढतात पण या सर्व कठिण शब्दाच्या मागे देवाविषयी अगाध प्रेम असते नाहीतर मग या सतानी कुणावर रागवावे ? कुणावर रुसावे ? कुणावर सत्ता करावी ? ' **कवणाशीं भांडो कोण माझें आहे । कोण मज आहे तुजविण** ' या देवाशिवाय आपला राग तरी कोण सहन करणारा आहे ? आपण कळवळ्याने व पोटतिडकीने का बोलतो, यासबधी बुवानी एका अभगात म्हटले आहे, ' **तुका म्हणे एके गावींची वसती । म्हणऊनि खती वाटे देवा** ' देव व आपण एकाच गावचे असून एवढा भेद व्हावा याचेच नवल तुकोबाना वाटते

**१२३२ बुद्धीचा जनिता लक्ष्मीचा पति । आठविता चित्तीं काय नव्हे ॥ १ ॥**
**आणिका उपाया कोण वाटी मन । सुखाचे निधान पाडुरग ॥ २ ॥**
**गीत गावों नाचो छदें वावो टाळी । वष्णवाचे मेळीं सुखरूप ॥ ३ ॥**
**अनत ब्रह्माडें एके रोमावळी । आम्ही केला भोळीं भावे उभा ॥ ४ ॥**
**लटिका हा केला सवसारसिंधु । मोक्ष खरा बधु नाहीं पुढें ॥ ५ ॥**
**तुका म्हणे ज्याच्या नामाचे अकित । राहिलो निश्चित[1] त्याच्या बळें ॥ ६ ॥**

शब्दार्थ व टीपा – जनिता–जन्म देणारा, निधान–साठा, रोमावळी–केसाची राग

अर्थ – बुद्धीला जन्म देणारा खरे म्हणजे लक्ष्मीपती श्रीविष्णूच आहे त्याचा आठव एकदा झाल्यावर मग काय साध्य होणार नाही ? १ सर्व सुखाचा ठेवा असा हा पाडुरग जो आहे, त्यास सोडून आणखी दुसऱ्या देवताकडे आपले मन कोण धाडून देणार ? २ वैष्णवाच्या मेळाव्यात मोठ्या आनदाने गाऊ नाचू व सुरात टाळ्या वाजवू ३ ज्याच्या एका केसावर अनत ब्रह्माडे आहेत, अशा या श्रीहरीस आम्ही आमच्या भोळ्या भावाने विटेवर उभे केले आहे ४ आम्ही आता याच्या कृपेने ससारसागर खोटाच ठरविला असून बद्धता व मोक्ष याही अवस्था आम्ही मानणार नाही ५ तुकाराम महाराज म्हणतात, ज्याच्या नामाने अकित झालो आहोत, त्याच्याच बळावर आम्ही निश्चित होऊन राहिलो आहोत ६

**१२३३ न लगे मायेसी वाळें निरवावें । आपुल्या स्वभावे ओढे त्यासी ॥ १ ॥**
**मज का लागला करणे विचार । ज्याचा जार भार त्याचे माथीं ॥ २ ॥**
**गोड धड त्यासी ठेवी न मागता । समाधान खाता नेदी मना ॥ ३ ॥**
**खेळता गुतले उमगूनी आणी । बैसोनिया स्तनी लावी बळें ॥ ४ ॥**
**त्याच्या दु खेंपणे आपण खापरीं । लाही तळीं वरी होय जैसे ॥ ५ ॥**
**तुका म्हणे देह विसरे आपुला । आघात तो त्याला लागो नेदी ॥ ६ ॥**

---
१ निश्चित

शब्दार्थ व टीपा – नलगे–लागत नाही, निरवावे–रक्षणासाठी सागावे, आरभार–गर्भाचा भार, उमगूनी–समजावून, खापरी–खापरातील लाहीप्रमाणे कष्टी, दु खी

अर्थ – आपल्या मुलाचे रक्षण आईने करावे अशी सूचना बाळानेच करावी लागत नाही, ती आपल्या स्वभावानेच त्याच्याकडे ओढली जात असते, किंवा त्यास आपल्याकडे ओढीत असते १ या गोष्टीचा मग मीच आता कशास विचार करावा ? ज्याने मला गर्भात धारण केले, तोच आता माझा भार सहन करील हे खरेच २ जे गोड पदार्थ घरात आई तयार करून ठेविते, ते सर्व मुलाने मागायच्या आतच ती त्यासाठी जपून, राखून ठेवीत असते, त्याला सोडून ते पदार्थ खाण्याचे तिला समाधान मुळीच मिळत नाही ३ अशा वेळी जर बालक एखाद्या वेळेस खेळायला गुतले असेल तर आई त्याचा शोध करते व त्यास घरी आणून बळेच स्तनाशी पिण्यास घेते ४ या बालकाच्याच दु खाने ती सतत दु खीकष्टी होत असते खापरात तडफडणाऱ्या लाहीप्रमाणे तिचे चित्त तडफडून जाते ५ तुकाराम महाराज म्हणतात, या मुलाच्या मोहात आई आपला देह देखील विसरून जाते मुलाला कोणत्याही प्रकारचा त्रास होऊ नये म्हणून ती एकसारखी जपत असते ६

विवरण – तुकारामबुवानी विठोबा माउलीला उद्देशून जे वात्सल्याचे फार चागले व थोर अनुभूतीचे अभग लिहिले आहेत, त्यात वरील अभग महत्त्वाचा आहे आईचे नाते ह सर्वात जवळचे असते तिच्यापाशी मुलास मोकळेपणाने बोलता येतो, हट्ट करता येतो, प्रसगी तिच्यावर रागावताही येते व पुत्राचे कितीही अपराध झाले तरी ती त्यास कधी दुखवत नाही, रागावली तरी पुन चटकन जवळ घेत असे हे आईचे भाबडे हृदय प्रेमाने व मुलाच्या हिताने काठोकाठ भरलेले असते सब विश्वाची अनत युगाची ही विठ्ठलमाउली तर किती कनवाळू व हृदयाची कोमल ! तिला मनातील सर्व शकाकुशका सागाव्यात आईच आपल्या मुलास कशी सामाळते, याचे फार चागले व रसाळ चित्रण तुकारामबुवानी या अभगात केले आहे आई आपल्या स्वभावधर्मानुसार आपल्या मुलाची काळजी घेत असते त्याला ती गोड पदार्थ मुद्दाम राखून ठेविते तो खेळायला गेला तर ती त्याला शोधून आणते, त्याला दूध पाजत व मग बाळ तृप्त झाल्यावर ती तृप्त होते त्याच्या दु खाने ती सतावते, सुखाने सुखावते असे हे आईच्या प्रेमाचे निर्व्याज मनोहर रूप तुकारामबुवानी या एका चागल्या अभगात उभे केले आहे,

या विठ्ठल माउलीचे असे वत्सल वर्णन अनेक अभगातून आलेले आहे ' उत्तम तें बाळासाठीं । लावी ओठीं आपुल्या ,' ' लेकराचे हित । वाहे माउलीचें चित्त, ' ' व्यालीचा कळवळा । जीव बहुत कोंवळा, ' ' मातेचिया चित्तीं । अवघी बाळकाची व्याप्ति ' अशा भाषेत त्यानी मातेचा महिमा वर्णन केला आहे ज्याने जन्म दिला, त्यानेच आपली काळजी वहावी, असा एक नाटिकेमही यथे आहे ' लेकराचा भार मातेचिया शिरीं । निढळ ते दूरी धरिलिया ', ' पोटा आले बाळ । त्याचे जाणावे सकळ ', ' मागो नेणे परी माय जाणे वर्म । बाळा नेदी श्रम पावो काही ' ' बाळा न मागता भोजन । माता घाली पाचारून, ' ' खेळता विसरे भूक-तान घर । धरुनिया कर आणी बाळें, ' ' तुका म्हणे माझी विठ्ठल माउली । जाणे ते लागली भूकतान ' अशा ओढीतून त्यानी मातेचा गौरव तर केला आहेच, पण देवाशी तिचा सबध जोडून एक अति रमणीय असे नातेही निर्माण करून अधिकच जवळीक त्यानी साधिली आहे वात्सल्यभक्तीचा सहज सुदर आविष्कार त्याच्या अभगातून होत असतो

१२३४ ब्राह्मण तो नव्हे ऐसी ज्याची बुद्धि । पाहा श्रुतीमधीं विचारुनि ॥ १ ॥
जयासी नावडे हरिनामकीर्तन[1] । आणीक नृत्य न वैष्णवाचे ॥ २ ॥
सत्य त्याचे वेळे घडला व्यभिचार । मातेसी वेव्हार अत्यजाचा ॥ ३ ॥
तुका म्हणे येथें मानी आनसारिखें । तात्काळ तो मुखें कुष्ठ होय ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – श्रुतिमधीं–वेदादी शास्त्रात, आनसारिखें–वेगळेच

अर्थ – खुशाल वेदादी शास्त्रांत चौकशी करून पाहा अशा बुद्धीचा काही ब्राह्मण होऊ शकत नाही १ कशा बुद्धीचा ? तर ज्याला श्रीहरीचे नामसकीर्तन आवडत नाही, व ज्याला विष्णुभक्ताचे कीर्तननृत्य आवडत नाही.

१ नाम सकीर्तन

यांवर त्याचे प्रेम नाही, असा ब्राह्मण जन्माचा ब्राह्मण असला तरी तो तसा नसतो २ जन्माने ब्राह्मण तो जरी असला तरी त्याच्याविषयी असेच म्हणावे लागेल की, यावेळी त्याच्या आईचा अंत्यजाशीच व्यवहार घडलेला असावा ३ तुकाराम महाराज म्हणतात, या माझ्या विचाराखेरीज आणखी काहीं वेगळेच कुणी मानेल तर त्याच्या मुखास त्वरित कोडाचा रोग होईल असे निश्चित समजावे ४

१२३५ ब्राह्मण तो याती अंत्यज असतां । मानावा तत्वता निश्चयेंसीं ॥ १ ॥
रामकृष्णनामें उच्चारी सरळें । आठवी सावळें रूप मनीं ॥ २ ॥
शांति क्षमा दया अलंकार अंगीं । अभंग प्रसंगीं धैर्यवंत ॥ ३ ॥
तुका म्हणे गेल्या षड्ऊर्मी अंगें । सांडुनिया मग ब्रह्मचि तो ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – याती–जात, षडऊर्मी–कामक्रोधादी सहा उर्मी

अर्थ – आणि तो जरी जन्माने अंत्यज असला तरी त्यास निश्चयाने व तात्त्विक दृष्टीनेही ब्राह्मण जातीचेच मानावे १ कुणास ? तर ज्याच्या मुखातून रामकृष्ण या नामाचा सरळ सरळ उच्चार होत आहे, ज्याच्या मनात त्या सावळ्या विठ्ठलाच्याच रूपाचा एकसारखा आठव आहे २ शांती, क्षमा, दया इत्यादी दैवी गुणांचे अलंकार अंगावर शोभत आहेत, व जो कोणत्याही प्रसंगी धैर्यवान आहे, तो ब्राह्मणच समजावा ३ तुकाराम महाराज म्हणतात, ज्याच्यातून कामादी सहा उर्मी नष्ट झाल्या आहेत, तो स्वतः च ब्रह्म बनला आहे, असे समजावे तोच खरा ब्राह्मण ४

विवरण – या दोन अतिशय महत्त्वाच्या अभंगात एक बंडखोर विचार तुकारामबुवानी निर्भिडपणे मांडिला आहे त्यांच्या भक्तीमार्गात जातिभेदाची बंधन शिथिल होत असल्याचे आपण पाहिलेच आहे हीनयातीचे, चांडालादी लोक अथवा दुराचारीही भक्तीच्या क्षेत्रात एकदा मनापासून पदार्पण केले व पश्चात्तापाची दृढभावना निर्माण झाली की श्रेष्ठ पदवीस पोचू शकतात या संबंधीचे अनेक दाखले पुराणातूनही आहेत पण वरील दोन अभंगात बुवानी आणखी एक पाऊल पुढे टाकून जन्मजात असा ब्राह्मणत्वाचा अथवा अंत्यजत्वाचा अधिकार होता, त्यासच धक्का दिलेला आहे ब्राह्मण हा जन्मावरून न ठरता, कर्मावरून गुणावरून त्याच्या आचारावरून समजावा हा नवा विचार रूढ होऊ पाहत होता ज्याला हरिकीर्तनात रुची नाही व जो वैष्णवांच्या संगतीत रमत नाही तो, कसला ब्राह्मण ? उलट एखाद्यास जन्म जरी अंत्यज यानीत आला असेल, पण त्यास श्रीहरीच्या प्रेमाची गोडी असेल रामकृष्णहरि या नामात जर तो तल्लीन होऊन तो जर रमत असेल, तर मग त्यासच ब्राह्मण म्हणावे असे बुवानी स्पष्टपणे सांगितले आहे ब्रह्म जाणणारा तो ब्राह्मण, हीच व्याख्या त्यांनी ब्राह्मणाची केलेली आहे कारण या श्रीहरीचे वर्म केवळ नामसंकीर्तनानेच सापडते अशीही खात्री तुकारामबुवांची होती 'ब्राह्मणा न कळे आपुलें तें वर्म। गवसे, परब्रह्म नामें एका' असे त्यांनीच म्हटले आहे

ब्राह्मणासंबंधी एवढे कडक लिहिण्याचे कारण असे की सर्व वर्णांचे गुरू म्हणून ब्राह्मणांना मान होता वेदाचे अध्ययन अध्यापन ही त्यांची मुख्य कामगिरी, पण मध्ययुगीन काळानंतर ब्राह्मणधर्माचाही ह्रास होत की काय अशी परिस्थिती निर्माण झाली त आपले उच्च आचारविचार सोडून नुसत्या कर्मकांडात रमू लागले त्यांना धनाचा, सत्तेचा लाभ सुटला त्याचे आचारधर्म लुप्त झाले यासंबंधी ह्वी तवढी वर्णने एकनाथ, तुकाराम रामदास या संतांच्या वाङ्मयातून मिळतील केवळ जन्म ब्राह्मण जातीत झाला म्हणून श्रेष्ठता प्राप्त व्हावी अशी समाजाची अवस्था असल्यामुळे तीव्र असंतोष मान पसरला निर्बुद्ध व दुराचारी ब्राह्मणास कोण वंदन करणार ? व ईश्वरप्रेमी आणि सदाचारी अंत्यजास का दूर ठेवावे ? असे प्रश्न निर्माण होऊन जो एक नवा विचार रूढ होऊ पाहात होता त्याचे निदर्शन करणारे हे तुकोबाचे अभंग आहेत, ब्राह्मण कुणास म्हणावे ? असाच मूलभूत प्रश्न निर्माण झाला मराठी संतांनी या प्रश्नाची जी उत्तरे दिली आहेत त्याचे सार बहिणाबाईंत, 'ब्राह्मण तो एक सागेन इत्यर्थ । जेणें हा वेदार्थ साठविला,' 'ब्रह्मभाव देहीं सदासर्वकाळ । ब्राह्मण केवळ तोचि एक', 'ब्रह्म जाणे तोचि बोलिजे ब्राह्मण इतकेच

बोलून बहिणाबाई थांबत नाही, तर ती स्पष्ट म्हणते, ' बहिणी म्हणे ब्रह्मीं नादे तो ब्राह्मण। यातीशीं प्रमाण नसे तेथें '

साधुसंतांनी हा जो निवाडा केला आहे, त्यास केवळ समकालीन परिस्थिती व ब्राह्मणाची अधोगती एवढीच पार्श्वभूमी नाही. या विचारास एक तात्त्विक बैठक असल्याचे आपण पाहिले आहे. एकाच ब्रह्मतत्त्वापासून जर हे चराचर विश्व व्यक्त झाले असेल, तर हा ब्राह्मण, हा अत्यंज हे ठरले कसे ? या प्रश्नाचे उत्तर वाटते तितके सोपे नाही. चोखोबानी याची तात्त्विक मीमांसा श्रेष्ठ प्रकारची केलेली आहे. समकालीन ब्राह्मणाची परिस्थिती, नवीन जाणीव व तत्त्वाची बैठक याचा सुंदर मिलाफ ज्यात आहे, असा एक एकनाथाचा अभंग येथे देणे अस्थानी होणार नाही. एका ब्राह्मणाचा व महाराचा एक खटकेबाज संवाद एकनाथानी देऊन शेवटी निर्णयही दिलेला आहे तो संवाद असा—

| | |
|---|---|
| ' कां रे महारा ! वदमस्ता ? ' | ' का हो ब्राह्मणबावा भलतेंच बोलतां ! ' |
| ' तुझें बापाचें भय काय ? ' | ' मायबाप तुमचे आमचे एकच हाय ' ! |
| ' ऐक ऐसें बोलू नको ' | ' निर्गुणापासून अवघें झालों ' |
| ' निर्गुण तुला काय ठावें ' | ' आत्मरूपीं शोधून पाहावें ' |
| ' आत्मस्वरूप आम्हां कळेना ' | ' नाहीं तरी संतांसीं शरण जाना |

१२३६ एक करिती गुरु गुरु । भोंवता भारु शिष्यांचा ॥ १ ॥
पुंस नाहीं पाय चारी । मनुष्य परी कुतरीं तीं ॥ २ ॥
परस्त्री मद्यपान । पेंडखान माजविलें ॥ ३ ॥
तुका म्हणे निर्भर चित्तीं । अधोगती जावया ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:— भारु-समुदाय, पुंस-शेपूट, पेंडखान-पेंडीचे खाणे, निर्भर-निष्काळजी.

अर्थ:— कित्येक आपल्या भोवती शिष्यांचा समुदाय गोळा करून स्वतः गुरु गुरु म्हणवून घेऊन धन्य होतात. १ पण त्याना मनुष्य म्हणावे काय ? ती माणसे असली तरी शेपूट नसलेली अशी चार पायांची कुत्रीच आहेत, असे समजावे. २ परस्त्रीगमन व मद्यपान हेच जनावराचे पेंडीचे खाणे त्यांनी पसंत केलेले असते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, अधोगतीला जाण्याविषयी याचे चित्त निष्काळजी असते. ते हटकून अधोगतीला जातातच. ४

१२३७ एका पुरुषा दोघी नारी । पाप वसे त्याचे घरीं ॥ १ ॥
पाप न लगे धुंडावें । लागेल तेणें तेथें जावें ॥ २ ॥
कांहीं दुसरा विचार । न लगे करावाचि फार ॥ ३ ॥
असत्य जे वाणी । तेथें पापाचीच खाणी ॥ ४ ॥
सत्य बोले मुखें । तेथें उचंबळती सुखें ॥ ५ ॥
तुका म्हणे दोन्ही । जवळीच लाभहानी ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा:— लाभहानी-फायदा व तोटा.

अर्थ:— एखाद्या पुरुषास दोन बायका आहेत, असे जर असेल तर, त्याच्या घरात पापाचे स्थान आहे, असे मानावे. १ पापाचा शोध ज्याला घ्यावयाचा असेल, त्यास दुसरीकडे मग जाणे नको. त्याच्याच घरी जावे व पापाचे दर्शन घ्यावे. २ याविषयी दुसरा काही विचारच करण्याची जरूरी नाही. ३ जो नेहमीच खोटे बोलतो, त्याची वाणीही पाप निर्माण करणारी खाणच आहे असे समजावे. ४ जो तोंडाने नेहमी सत्य बोलतो, त्याच्या

ठिकाणी सुख नेहमीच उचंबळून येते ५ तुकाराम महाराज म्हणतात, अशा प्रकाराने पापाजवळ तोटा व पुण्या जवळ, सत्याजवळ फायदा अगदी शेजारी शेजारी अशाच या गोष्टी आहेत ६

१२३८ जळते संचित । ऐसी आहे धर्म नीत ॥ १ ॥
माझ्या विठोबाचे पाय । वेळोवेळा मनीं ध्याय ॥ २ ॥
नेदी कर्म घडों । कोठें आडराणे पडो ॥ ३ ॥
तुका म्हणे मळ । राहो नेदी ताप जाळ ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – धर्मनीत–धर्माची नीती

अर्थ – आपले सर्व संचित कर्म जळून जाते अशी या धर्माची नीती आहे १ यासाठीच माझ्या या विठोबाच्या पायाचे चिंतन सतत करीत असावे २ त्यामुळे तुमच्या हातून कधी पापकर्म घडणार नाही, की आडरानातून सापडण्याचाही प्रसंग येणार नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा प्रकारे हे विठ्ठलाचे नाम व त्याचे चिंतन याच्यामुळे तापाचा जाळ व पापाचा मळ राहूच शकत नाही ४

१२३९ संतापाशीं बहु असावे मर्यादा । फलकटाचा धंदा उर फोडी ॥ १ ॥
बासर तो भुंके गाढवाचे परी । उडे पाठीवरि दंड तेणें ॥ २ ॥
समय नेणे ते वेडें चाहाटळ । अवगुणाचा ओंगळ मान पावे ॥ ३ ॥
तुका म्हणे काय वाया चाळवणी । पिटपिटघाणी हागवणेची ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – फलकटाचा धंदा–हलकटपणाचा उद्योग उरफोडी–घात करील बासर–स्वैर, स्वच्छंदी

अर्थ – संताच्याजवळ जाताना नेहमी मर्यादेत वागावे, उगाच हलकटपणाचा उद्योग केला तर, त्यापासून घात होण्याचा संभव फार असतो १ स्वैरपणाने बोलणारे आहेत त्याचे बोलणे म्हणजे गाढवाच्या ओरडण्याप्रमाणेच आहे याचे फळ म्हणजे शेवटी पाठीवर दंडाचे वळच उठलेले दिसतील २ ज्यास प्रसंग समजत नाही तो चावटच समजला पाहिजे तो वेडाच असतो त्यास ओंगळ अशा अवगुणाची पदवी मात्र प्राप्त होते ३ तुकाराम महाराज म्हणतात, हे त्याचे वागणे उगाच आहे हगवण लागलेल्या पोराची पिटपिटवाणी घाण असते तसेच त्याचे वागणे ओंगळ आहे ४

१२४० घेसी तरी घेईं संताची हे भेटी । आणीक ते गोष्टी नको मना ॥ १ ॥
सर्वभावे त्याचे देव भांडवल । आणीक ते बोल न बोलती ॥ २ ॥
करिसील तो करीं संताचा सांगात । आणीक ते मान नको मना ॥ ३ ॥
बैससी तरी बैस संताच मधीं । आणीक ते बुद्धि नको मना ॥ ४ ॥
जासी तरि जाई संताचिया गावा । होईल विसावा तेथें मना ॥ ५ ॥
तुका म्हणे संत सुखाचे सागर । मना निरंतर धणी घेईं ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – आणीक–दुसऱ्या सांगात–संगत सोबत धणी–तृप्ती

अर्थ – मना, तुला भेटच जर घ्यावयाची असेल तर, तू संताची घ्यावीस याखेरीज दुसऱ्या गोष्टीच तू मनात आणू नकोस १ कारण या संताचे सर्व भांडवल म्हणजे तो एक देव झालेला असतो या देवाशिवाय ते दुसरे बोलणे कधीच बोलत नसतात २ मना तुला संगतच जर करायची असेल तर ती संताचीच कर आणखी याखेरीज दुसरी कोणतीच गोष्ट तुला मग करायला नको ३ तुला जर बसायचेच असेल तर तू संताच्याच मध्ये बैस या खेरीज दुसरी कसलीच बुद्धी तुला नको ४ तुला जर गावालाच जायचे असेल, तर तू संताच्याच गावाला जा तुला

तेथेच खरी विश्रांती लाभेल. ५ तुकाराम महाराज म्हणतात, हे संत म्हणजे सर्वसुखाचे सागर असून त्यांच्यामुळे मनाची निरंतर तृप्ती होते. ६

१२४१ संतांचिये गांवीं प्रेमाचा सुकाळ । नाहीं तळमळ दुःखलेश ॥ १ ॥
तेथें मी राहीन होऊनि याचक । घालितील भीक तेचि मज ॥ २ ॥
संतांचियें गांवीं वरो भांडवल । अवघा विठ्ठल धन वित्त ॥ ३ ॥
संतांचें भोजन अमृताचें पान । करिती कीर्तन सर्वकाळ ॥ ४ ॥
संतांचा उदीम उपदेशाची पेठ । प्रेमसुख साटीं घेती देती ॥ ५ ॥
तुका म्हणे तेथें आणिक नाहीं परी । म्हणोनि भिकारी जालों त्यांचा ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा :– वरो–पुष्कळ, उदीम–व्यापार, परी–प्रकार.

अर्थ :– या संतांच्या गावी प्रेमाचा मोठा सुकाळ असतो. त्या ठिकाणी कसली तळमळ असत नाही, की दुःखाचा लेशही उरलेला नसतो. १ त्याच ठिकाणी मी याचक होऊन राहीन तेथे ते मला प्रेमाची भीक घालतील २ संतांच्या गावी श्रीविठ्ठलाचे प्रेम हेच खरे भांडवल आहे. हीच सर्व संपत्ती आहे. ३ संतांच्या घरचे हरिकीर्तनाचे भोजन म्हणजे केवळ अमृताचे पानच होय. कारण ते नेहमीच कथाकीर्तनात दंग झालेले असतात. ४ संतांचा नेहमी व्यापार म्हणजे उपदेशाचाच असतो. ते प्रेमसुखाचीच देवघेव नेहमी करीत असतात. ५ तुकाराम महाराज म्हणतात, त्यांच्या ठिकाणी इतर दुसरे कसलेही प्रकार नसतात. म्हणूनच भिकारी होऊन मी त्यांचा दास झालो आहे. ६

१२४२ संतांचें सुख जालें या देवा । म्हणऊनि सेवा करी त्यांची ॥ १ ॥
तेथें माझा काय कोण तो विचार । वर्णावया पार महिमा त्यांचा ॥ २ ॥
निर्गुण आकार जाला गुणवंत । घाली दंडवत पूजोनियां ॥ ३ ॥
तीर्थें त्यांची इच्छा करिती नित्यकाळ । व्हावया निर्मळ आपणांसी ॥ ४ ॥
अष्टमा सिद्धींचा कोण आला पाड । वागों नेदी आड कोणी तया ॥ ५ ॥
तुका म्हणे ते वळिया शिरोमणी । राहिलों चरणीं निकटवासें ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा :– पार–संपूर्ण, पाड–किंमत.

अर्थ :– या संतांच्या संगतीचे सुख देवासही फार मोठे झाले. म्हणून तोच या संतांची सेवा करण्यास उत्सुक असतो. १ अशा या देवाचा संपूर्ण महिमा मी कसा वर्णन करू शकणार ? माझा अधिकार तो किती. २ या भक्तांच्या साठी निर्गुणनिराकार असणारा देव सगुण व साकार झाला. तोच या संतांना दंडवत घालून त्यांची पूजा करीत असतो. ३ सर्व तीर्थे याच संतांच्या सहवासाची इच्छा करितात व स्वतःच निर्मल होऊन जातात अनेकांची पापे दूर करण्यात आलेले मलीनत्व तीर्थे या संतांच्या संगतीने धुऊन काढतात. ४ अशा या संतांच्या सामर्थ्यापुढे अष्ट सिद्धींची काय किंमत आहे ? त्यांना कुणी समोर राहू देत नाहीत. ५ तुकाराम महाराज म्हणतात, सर्व बलवंतामध्ये संत हे बलवान होऊन राहिले आहेत, मी त्यांच्याच चरणापाशी निकटचा म्हणून राहिलो आहे. ६

विवरण :– वरील चार अभंगात तुकाराम महाराजांनी संतांचा महिमा पुनः एकदा मुक्तकंठाने गाइला आहे. संतांचे चरित्र, संतांचा सहवास, संतांचे बोल, संतांचा उपदेश, संतांची सेवा, संतांची ईश्वराविषयीची जवळीक व स्वतः ईश्वरासही वाटणारे संताविषयी प्रेम याचा विशेष लोभ सर्वच सत्कवींना वाटत असल्यास नवल नाही. ईश्वराएवढेच महत्त्व भागवत संप्रदायात संतांना दिलेले आहे. इतकेच नव्हे तर तुकारामबुवांनी 'देव सारावे परते। संत पूजावे आरतें' असे म्हटले आहे. कारण 'देव ते संत देव ते संत' असाच त्यांचा निर्णय आहे. या साधुसंतांचा व संतसंगतीचा महिमा सर्वच संतांनी एकमुखाने वर्णन केलेला आहे. 'संतांचा महिमा कोण जाणे सीमा। सीणला हा

ब्रह्मा बोलवेना ', 'संतचरणरज उधळले । तेणें सर्वांग डवरले, ' ' संतसंगतीचे काय सांगू सुख ? । आपण पारिखे नाहीं तेथें ', ' सुख सांगावे संतांपुढें । जेणे सुख अधिक वाढें ' अशा भाषेत नामदेवांनी संतांचे महत्त्व स्पष्ट केले आहे

श्रीएकनाथ महाराजांनी आपल्या ग्रंथातून व अभंगातून संतांचे उपकार त्यांच्या माहात्म्यासहित सविस्तर वर्णन केले आहेत 'संतांचे चरणतीर्थ घेतां अनुदिनीं । पातकांची धुणी सहज होय ', 'संतचरणींचा महिमा । काहीं न कळे आगमानिगमा । ब्रह्मा घाली लोटांगण । विष्णु वंदितो आपण ॥ शिव ध्यातो पायवणी । धन्य धन्य संत जनीं ', ' देवाचे ते आप्त जाणावे जे संत । त्यांचे चरणीं रत व्हावे सर्वदा', असे संतमाहात्म्य कथन करुन त्यांनीही 'संत आधी देव मग । हाचि उगम आणा मना ', ' संतांपोटीं देव वसे । देवा पोटीं संत असे ' असाच निष्कर्ष काढलेला आहे

या संतांच्या नादाने देव लोभावला जातो तो त्या सुखामुळे या संतांची सेवा करून त्यांचे परोपरीने रक्षण करीत असतो हा भावही मराठी संतांनी वारंवार प्रकट केला आहे ज्या सुखाकारणे देव वेडावला । वैकुंठ सांडुनी संतसदनीं राहीला । धन्य धन्य संतांचे सदन । जेथें लक्ष्मी सहित शोभे नारायण ', 'संतचरणींचे रजकण । तेणें तिन्ही देव पावन ' अशा शब्दांत या संतांचा वेध देवालाच किती असतो, याचे वर्णन एकनाथांनी केलेले आहे ज्ञानेश्वरांनी तर हा देव चार हातांनी संतांना मिठी मारण्यास कसा उत्सुक असतो याचे मोठे हृद्य चित्र ज्ञानेश्वरीच्या बाराव्या अध्यायात रसाळपणे वर्णन केले आहे या भक्तांचे केवढे कौतुक देवास असते ? ज्ञानेश्वरांनी म्हटले आहे, ' आम्ही तयाचे करू ध्यान । ते आमुचे देवतार्चन । ते वाचूनि आन । गोमटें नाहीं ॥ तयाचे आम्हा व्यसन । ते आमुचे निधिनिधान । किंबहुना समाधान । ते मिळती तें ॥ तो पाहावा हे डोहळे । म्हणोनि अचक्षूसी मज डोळे । हातींचेनि लीलाकमळें । पूजूं तयातें ॥ दोंवरी दोनी । भुजा आलों घेउनि । आलिंगावयालागुनी । तयाचें आंग ।' आपल्या भक्ताविषयी व संताविषयी देवाला हे केवढे प्रेम वाटते ! ज्ञानेश्वरीमधील हाच भाव ज्ञानेश्वरांनी एका अभंगात अतिशय बहारदारपणे व्यक्त केलेला आहे ' संत भेटतीं आजी मज । तेणें मी झालो चतुर्भुज । दोन्ही भुजा स्थूळीं सहज । दोन्ही सूक्ष्मीं वाढल्या ॥ आलिंगनीं सुख वाटे । प्रेम चिदानंदीं गोठें । हर्षे ब्रह्मांड उतरे । समूळ उठे मी पण ' अशा या संतांचे उपकार या जगातील सर्व लोकांवर किती मोठे झाले आहेत याचे वर्णनही संपूर्ण असे करता येणे कठीण आहे

१२४३ जो मानी तो देईल काई । न मनी तो नेईल काई ॥ १ ॥
आम्हा विठ्ठल सर्वभूतीं । राहो चित्तीं भलतैसा ॥ २ ॥
आधीन ते जना काई । जल्पें वायाविण ठायीं ॥ ३ ॥
वंदी निंदी तुज तो गा । तुका म्हणे पांडुरंगा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – भलतैसा–कसा तरी, कोणत्याही रूपात, जल्पें–बडबडतात

अर्थ – जो आम्हास मान देईल, तो आम्हास अधिक काय देणार आहे ? व जो मान देणार नाही, तो आम्हास देणार नाही असे काय आहे ? १ कसेही असले तरी हा श्रीविठ्ठलच सर्वभूतमात्रामध्ये वसलेला आम्हास आमच्या चित्तात दिसावा २ लोकांच्या स्वाधीन तसे काहीच नसताना लोक असे व्यर्थ का बडबडतात ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, याप्रमाणे तुला कुणी वंदिले अथवा निंदिले तरी त्याचे महत्त्व तुला सारखेच आहे ४

१२४४ भावबळें कैसा जालासी लाहान । मागें संतीं ध्यान वर्णियेले ॥ १ ॥
तें मज उचित करूनिया देवा । दाखवीं केशवा मायबापा ॥ २ ॥
पाहोनिया डोळां बोलेन मी गोष्टी । आळिंगूनि मिठी देइन पायीं ॥ ३ ॥
चरणीं दृष्टि उभा राहेन समोर । जोडोनिया कर पुढें दोन्ही ॥ ४ ॥
तुका म्हणे उत्कंठित वासना । पुरवीं नारायणा आर्त माझें ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – भावबळें–भक्तीच्या प्रभावाने, आर्त–इच्छा

अर्थ :– देवा, तू भक्ताच्या बळामुळे कसा लहान, सगुण व सुंदर झाला आहेस. याच ध्यानाचे वर्णन यापूर्वी तुझ्या संतमंडळींनी केले आहे. १ देवा, ते ध्यान उचित आहे, असे मला करून दाखवा ना. केशवा, मायबापा, अशी प्रचीती द्या ना तुम्ही २ मग मी डोळे भरून तुम्हास पाहीन व सुखाच्या दोन गोष्टी बोलून संतुष्ट होईन. तुझ्या पायावर आलिंगन देऊन तुला मी मिठीच मारीन मग. ३ मी माझी दृष्टी तुझ्या चरणावर लावून मी नीट न हलता समोर पाहीन, मी तुझ्यापुढे हात जोडून उभा राहीन. ४ तुकाराम महाराज म्हणतात, ही वासना माझी अतिशय उत्कंठित झालेली आहे, म्हणून नारायण, माझी इच्छा तुम्ही पूर्ण करावी ५

१२४५ कृपाळु म्हणोनि बोलती पुराणें । निर्धार वचनें यांचीं मज ॥ १ ॥
आणीक उपाय नेणेचि मी कांहीं । तुझें वर्म ठायीं पडे तैसें ॥ २ ॥
नये घड कांहीं बोलतां वचन । रिघालों शरण सर्वभावें ॥ ३ ॥
कृपा करिसी तरि थोडें तुज काम । माझा तरि श्रम बहु हरे ॥ ४ ॥
तुका म्हणे मज दाखवीं श्रीमुख । हरेल या भूक डोळियाची ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – निर्धार–विश्वास, हरे–दूर होणार आहेत

अर्थ – देवा, तू मोठा कृपाळू आहेस, असे सर्व पुराणे गर्जून सांगतात व माझाही त्याच्या वचनावर विश्वास आहे. १ मी तुझ्या चिंतनाखेरीज दुसरा कुठलाच विचार मनात आणीत नाही तुझे रहस्य जेणेकरून ध्यानात राहील असेच मी पाहतो २ मला तर एक शब्दही नीट घडपणे बोलता येत नाही पण सर्व भावानें मी तुलाच देवा, शरण आलो आहे. ३ देवा, तू जर माझ्यावर कृपा करशील, तर ते फार थोडे काम तुला आहे पण त्यामुळे माझे श्रम मात्र मोठ्या प्रमाणात दूर होणार आहेत ४ तुकाराम महाराज म्हणतात, श्रीहरी, मला तुमचे श्रीमुख एकदा दाखवा ना. माझ्या डोळ्याची मग तहानभूक हरून जाईल ५

१२४६ सर्वभावें आलों तुजचि शरण । कायावाचामनेंसहित देवा ॥ १ ॥
आणीक दुसरें नयें माझ्या मना । राहिली वासना तुझ्या पायीं ॥ २ ॥
माझिये वारचें कांहीं जडभारी । तुजविण वारी कोण एक ॥ ३ ॥
तुझे आम्ही दास आमुचा तूं ऋणी । चालत दूरूनी आलें[1] मागें ॥ ४ ॥
तुका म्हणे आतां घेतलें धरणें । हिशोबाकारणें भेटी देईं ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– जडभारी–मोठे संकट वारी–निवारण करील.

अर्थ :– देवा, मी तुला आता कायावाचामनेकरून शरण आलेलो आहे. १ देवा, आता तुझ्याशिवाय दुसरे काहीही मनात येत नाही. माझी सर्व वासना तुझ्याच पायाशी दटी देऊन राहिलेली आहे २ माझ्यावर जर एखादे मोठे संकट आले तर देवा, ते तुझ्याशिवाय दुसरे कोण पूर्ण करणार ? ३ देवा, आम्ही तुमचेच दास आहोत, तू आमचा ऋणी आहेस असा हा तुझा व आमचा संबंध पूर्वीपासूनच चालत आलेला आहे ४ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, आता मी तुझ्या दाराशी धरणेंच घेऊन बसलो आहे, मागील सर्व ऋणाचा हिशोब पूर्ण करण्यासाठी आता तू मला भेट द्यावीस ५

१२४७ कईं मात माझे ऐकती कान । बोलतां वचन संतां मुखीं ॥ १ ॥
केला पांडुरंगें तुझा[2] अंगीकार । मग होइल धीर माझ्या जीवा ॥ २ ॥
म्हणऊनि मुख अवलोकितो पाय । हेचि मज आहे थोरी आशा ॥ ३ ॥

१ आलों, २ माझा

झालेले दिसतात. देव चांगला क्षीरसागरात सुखासनावर होता, परंतु पृथ्वीवर पातकाची दाटी झाली, दैत्य फार मत्त झाले, म्हणून या भगवंतास गोकुळात गवळ्याच्या घरी अवतार घ्यावा लागला. आणि देवास त्या पुंडलीक महामुनींने गुंतवून ठेविले, पंढरपूर येथे बांधून ठेवले, इत्यादी भावनुसार सगुण प्रीतीच्या पोटी बुवानी येथे व्यक्त केले आहेत. ईश्वर आपल्या भक्तासाठी श्रमी होतो, हाही भक्तीच्याच अनेक छटापैकी एक नाजुकसा आविष्कार आहे कारण हा भक्तीच्या प्रीतीनेच साकार सगुण झालेला असतो 'तुका म्हणे भावें । भेणे देवें आकारावे' असे त्यानीच दुसऱ्या एका अभंगात म्हटले आहे.

१२४९ गोड जालें पोट धालें । अवचित वाचे आलें ।
म्हणतां पाप गेले । विठ्ठलसें वाचेसी ॥ १ ॥
सत्य माना रे सकळ । उद्धरिला अजामेळ ।
पातकी चांडाळ । नामासाठीं आपुलिया ॥ २ ॥
चित्त पावले आनंदा । सुखसमाधीतें सदा ।
म्हणतां गोविंदा । वेळोवेळां वाचेसी ॥ ३ ॥
हें जाणती अनुभवी । जया चाड तो चोजवी ।
तुका म्हणे दावी । रूप तेंचि अरूपा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – धाले–संतुष्ट झालो, चाड–आवड, चोजवी–शोध घेतील

अर्थ :– अवचितपणे या विठ्ठलाचे नाम माझ्या वाणीतून निघाले, म्हणून सर्वत्र गोड होऊन गेले. मनातील सर्व पापच नाहीसे झाले. पोट तृप्तीने भरून गेले. १ लोकहो, तुम्ही हे सर्व खरे मानावे. कारण आजामेळासारख्या पाप्याचाही या भगवंताच्या नामामुळे उद्धार झालेला आहे. तो कितीही पातकी व चांडाळ असला तरी त्याने भगवंताचे नाम घेतल्यामुळेच त्याचा उद्धार परमेश्वराने केला. २ श्रीहरीचे नाव वाणीतून निघाल्यामुळे माझे चित्त अतिशय आनंदित झाले आहे या गोविंदाच्या नावाने सदा सर्व काळ समाधी सुखाचाच आनंद प्राप्त झाला आहे. ३ जे कुणी अनुभवी आहेत, त्यानाच या सुखाची किंमत समजून येईल. ज्याला याची आवड आहे ते याचा शोध घेतील. तुकाराम महाराज म्हणतात, त्यालाच हा देव आपले अरूप असले तरी सगुण स्वरूप दाखवील. ४

१२५० आंत हरि बाहेर हरि । हरिनें घरीं कोंडिलें ॥ १ ॥
हरिने कामा घातला चिरा । वित्तवरा मुकविलें ॥ २ ॥
हरिनें जीवें केली साटी । पाडिली तुटी सकळांसी ॥ ३ ॥
तुका म्हणे वेगळा नव्हे । हरि भोंवे भोंवताला ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– कामा–वासनेस, घातला चिरा–दगड घालून बंदी केले, वित्तवरा–धनसंपत्ती.

अर्थ :– आता हा श्रीहरी सर्वत्र आतून व बाहेरून भरून राहिलेला आहे घरीदारी याच हरीच्या रूपाने आकार धारण केला आहे. १ या श्रीहरीने माझ्या सर्व वासनांवरच दगड घालून त्यांना बंदी केली आहे वासना त्याने नष्ट केल्या आहेत. याच्यामुळे माझी धनसंपत्तीवरीलही वासना संपलेली आहे. २ या हरीने माझ्या जीवावरचाही लोभ घालवून सर्व व्यावहारिक प्रपंचाशी वृत्तींचा भंग केला आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी आता या श्रीहरीशिवाय वेगळा नाहीच. हाच श्रीहरी माझ्या भोवती सर्वत्र भरून राहिलेला आहे. ४

१२५१ हरिनें माझें हरिलें चित्त । भार वित्त विसरलें ॥ १ ॥
आतां कैसी जाऊं घरा । नव्हे वरा लौकिक ॥ २ ॥

माझिया मनाचा हाचि विश्वास । न करीं सायास साधनाचे ॥ ४ ॥
तुका म्हणे मज होईल भरवसा । तरलो मी ऐसा साच भाव ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – कई–केव्हा, मात–गोष्ट, अंगीकार–स्वीकार, सायास–परिश्रम, साच–खरोखर.

अर्थ – संतमुखातून असे बोलणे माझे कान कधी बरे ऐकतील? १ कसे बोलणे? तर या पांडुरंगाने माझा स्वीकार मोठ्या प्रेमाने केला असून तो मला भेटला आहे. असे ऐकल्यानंतर माझ्या जीवास मोठाच धीर येणार आहे २ म्हणून तर देवा, मी तुमच्या मुखाकडे व चरणांकडे पाहात आहे याच स्थानाची मला फार मोठी आशा लागून राहिलेली आहे ३ माझ्या मनात हेच एक स्थान विश्वासाचे असल्यामुळे मी इतर कोणत्याही साधनाचे परिश्रम करणार नाही ४ तुकाराम महाराज म्हणतात, मला असे संताच्या मुखातून ऐकल्यावर विश्वास वाटेल व मी हा संसारसागर तरून गेलो आहे, असा भाव मला पटेल ५

१२४८ दोन्ही हात ठेवुनि कटीं । उभा भीवरेच्या तटीं ।
कष्टलासी सार्टी । भक्तिकाजें[1] विठ्ठला ॥ १ ॥
भागलासी मायबापा । बहु श्रम केल्या खेपा ।
आम्हालागीं सोपा । दैत्या काळ कृतांत ॥ २ ॥
होतासी क्षीरसागरीं । मही दाटली असुरीं ।
म्हणोनियां घरीं । गौळियाचे[2] अवतार ॥ ३ ॥
केला पुंडलिकें गोवा । तुज पंढरीसि देवा ।
तुका म्हणे भावा । सार्टी हातीं सांपडसी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – सार्टी–साठी, भक्तिकाजें–भक्ताच्या भक्तीसाठी, मही–पृथ्वी, गोवा–गुंतवणूक

अर्थ – देवा, आपल्या भक्ताचे काम करता करता तू फार थकलास व म्हणून या भिवरा नदीच्या काठावर कमरेवर हात ठेवून विश्रांती घेत तू उभा राहिलास १ मायबापा, देवा, तू आमच्यासाठी फार कष्ट घेतलेस रे. आमच्यासाठी, नाना अवतारासाठी फार तुला खेपा घालाव्या लागल्या तू आम्हा भक्तांना अतिशय सोपा आहेस पण दुष्ट दैत्यांना मात्र काळासारखा, कृतान्तासारखा तू भयानक आहेस २ तू सुखाने आपल्या क्षीरसागरात निवास करून होतास. त्याचवेळी या पृथ्वीवर असुरांची फार दाटी झाली व त्यांनी फार त्रास सज्जनांना दिला. म्हणून देवा, तुम्हाला गवळ्याच्या घरी अवतार धारण करावा लागला ३ देवा, या पुंडलिकाने तुला गुंतवून ठेवून तुला या पंढरपुरात स्थिर केले तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तू त्याच्या भावामुळेच आमच्या हाती सापडला आहेस ४

विवरण – वरील पाच अभंगात तुकाराम महाराजांनी सगुण ईश्वराचे मोठे लोभस व हळुवार असे वर्णन केले आहे आपल्या भक्तासाठी हा विठ्ठल मूळचा निर्गुण निराकार असला तरी कसा लहान व सगुण होतो, याचे थोडक्यात वर्णन या अभंगातून आहे अशा या लहान व सावयव ईश्वरास नीट डोळे भरून पाहता येते त्याच्याशी नीट गोष्टी बोलता येतात ' आलिंगूनि मिठी देईन पायीं ' अशी भाषा याच सगुण रूपासाठी बोलता येते प्रेमसुखाची सर्वोच्च प्रचीती याच सगुण, सुंदर रूपामुळे थोर भक्तांना प्राप्त होत असते त्याच्या चरणाशी उभे राहावे, डोळे भरून त्याचे रूप मनात साठवावे व ' हरेल या भूक डोळियांची ' म्हणून तृप्त व्हावे, यातच या सगुणाची सार्थकता आहे

क्रमांक १२४७ च्या अभंगात तर या सगुणाच्या लोभाची ओढ भक्तास कशी असते, याचे मोठे सुंदर व भावपूर्ण आढळन पांडुरंगाने आपला स्वीकार केला ही गोष्ट संत आपणास केव्हा ऐकवितात, याविषयी तुकोबांचे चित्त कासावीस झालेले आहे या एका अभंगात भक्तावर कृपा करून थकलेल्या भागलेल्या देवाचा कळवळा तुकाराम महाराजांना आलेला दिसतो ' भागलासी मायबापा । बहु श्रम केल्या खेपा ' म्हणून तुकारामबुवा कटी

१ तू जगजेठी भक्तिकाजा, २ म्हणोनिया हरी । गौळियाघरी अवतार ॥

झालेले दिसतात. देव चांगला क्षीरसागरात सुखासनावर होता, परंतु पृथ्वीवर पातकांची दाटी झाली, दैत्य फार मत्त झाले, म्हणून या भगवंतास गोकुळात गवळ्याच्या घरी अवतार घ्यावा लागला. आणि देवास त्या पुंडलीक महामुनीनें गुंतवून ठेविले, पंढरपूर येथे बांधून ठेवले, इत्यादी भावनुसार सगुण प्रीतीच्या पोटी बुवांनी येथे व्यक्त केले आहेत. ईश्वर आपल्या भक्तासाठी धर्मी होतो, हाही भक्तीच्याच अनेक छटांपैकी एक नाजुकसा आविष्कार आहे कारण हा भक्तीच्या भीतीनेच साकार सगुण झालेला असतो 'तुका म्हणे भावे । येणें देवें आकारावें' असे त्यांनीच दुसऱ्या एका अभंगात म्हटले आहे

१२४९ गोड झाले पोट धालें । अवचित वाचे आले ।
म्हणतां पाप गेले । विठ्ठलसें वाचेसी ॥ १ ॥
सत्य माना रे सकळ । उद्धरिला अजामेळ ।
पातकी चांडाळ । नामासाठीं आपुलिया ॥ २ ॥
चित्त पावलें आनंदा । सुखसमाधीतें सदा ।
म्हणतां गोविंदा । वेळोवेळां वाचेसी ॥ ३ ॥
हे जाणती अनुभवी । जया चाड तो चोजवी ।
तुका म्हणे दावी । रूप तेंचि अरूपा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – धाले–संतुष्ट झाली, चाड–आवड, चोजवी–शोध घेतील

अर्थ :– अवचितपणे या विठ्ठलाचे नाम माझ्या वाणीतून निघाले, म्हणून सर्वत्र गोड होऊन गेले. मनातील सर्व पापच नाहीसे झाले. पोट तृप्तीने भरून गेले. १ लोकहो, तुम्ही हे सर्व खरे मानावे. कारण अजामेळासारख्या पाप्याचाही या भगवंताच्या नामामुळे उद्धार झालेला आहे. तो कितीही पातकी व चांडाळ असला तरी त्याने भगवंताचे नाम घेतल्यामुळेच त्याचा उद्धार परमेश्वराने केला २ श्रीहरीचे नाव वाणीतून निघाल्यामुळे माझे चित्त अतिशय आनंदित झाले आहे या गोविंदाच्या नावाने सदा सर्व काळ समाधी सुखाचाच आनंद प्राप्त झाला आहे. ३ जे कुणी अनुभवी आहेत, त्यानाच या सुखाची किंमत समजून येईल. ज्यांना याची आवड आहे ते याचा शोध घेतील. तुकाराम महाराज म्हणतात, त्यालाच हा देव आपले अरूप असले तरी सगुण स्वरूप दाखवील. ४

१२५० आंत हरि बाहेर हरि । हरिनें घरीं कोंडिलें ॥ १ ॥
हरिनें कामा घातला चिरा । वित्तवरा मुकविलें ॥ २ ॥
हरिनें जीवें केली साटी । पाडिली तुटी सकळांसी ॥ ३ ॥
तुका म्हणे वेगळा नव्हे । हरि भोंवे भोंवताला ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– कामा–वासनेस, घातला चिरा–दगड घालून बंदी केले, वित्तवरा–धनसंपत्ती.

अर्थ :– आता हा श्रीहरी सर्वत्र आतून व बाहेरून भरून राहिलेला आहे घरीदारी याच हरीच्या रूपाने आकार धारण केला आहे. १ या श्रीहरीने माझ्या सर्व वासनांवरच दगड घालून त्यांना बंदी केली आहे. वासना त्याने नष्ट केल्या आहेत. याच्यामुळे माझी धनसंपत्तीवरीलही वासना संपलेली आहे. २ या हरीनें माझ्या जीवावरचाही लोभ घालवून सर्व व्यावहारिक प्रपंचाशी वृत्तींचा भंग केला आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी आता या श्रीहरीशिवाय वेगळा नाहीच. हाच श्रीहरी माझ्या भोंवती सर्वत्र भरून राहिलेला आहे. ४

१२५१ हरिनें माझें हरिलें चित्त । भार वित्त विसरलें ॥ १ ॥
आतां कैसी जाऊं घरा । नव्हे बरा लौकिक ॥ २ ॥

पारखियासी सांगता गोष्टी । घरची कुटी खातील ॥ ३ ॥
तुका म्हणे निवांत राहो । पाहिले पाहीं धणीवरी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – भार–ओझे, वित्त–संपत्ती, कुटी–निंदा

अर्थ :– या श्रीहरीने माझे चित्त हरून टाकले आहे संपत्तीचे ओझें याने विसरायला लावले आहे १ आता मी घरी तरी कसा जाऊ ? आता हा बाह्य लौकिक काही मला बरा वाटत नाही २ जे कुणी पारख करणारे असतील, त्याना ही माझी अवस्था समजेल, पण घरचे लोक माझी निंदाच करतील ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, मी आता याच अनुभवात स्वस्थ होऊन राहतो जे मी पाहिले आहे तेच तृप्ती होईपर्यंत पाहात बसते ४

विवरण – वरील दोन अभंगातून तुकाराम महाराजानी परमेश्वराची अनुभूती कशी आली व जिकडे तिकडे श्रीहरीच सामावून राहिल्याची प्रचीती कशी आली याचे मोठे रेखीव असे वर्णन आहे जिकडे तिकडे श्रीहरीचेच रूप त्याना दिसू लागली मागचे सर्व सगय फिटले तळमळ दूर झाली, व 'हरि भोवे भोवताला' अशी जाणीव तीव्रपणे प्रकटली तुकाराम महाराजाना अशा प्रकारे श्रीहरीच्या दर्शनाने जे सुखसमाधान वाटत असे, त्याचे रेखीव व मर्मग्राही वर्णन त्यानी शब्दांकित केलेले आहे ' भाग्य फळलें झाली भेटी । नेपें तुटी यावरी । दैन्य गेले हरली चिंता । सदैव आता यावरी ' अशा प्रकारचा अनुभव त्यानी आणखी एका अभंगात वर्णन केलेला आहे पुष्कळ दिवस वाट पाहिल्यानंतर परमानंदाचा दिवस कसा उगवतो, याचे मोठे सुंदर वर्णन तुकोबानी ' बहुता दिवसाची आजि झाली भेटी । झाली होती तुटी काळगती ' या ओळीने सुरू होणाऱ्या अभंगात केलेले आहे या श्रीहरीचे रूप प्राप्त झाल्यावर, त्याची भेट झाल्यावर मग जगाकडे पाहण्याची दृष्टीच बदलून ' धवळले जगदाकार । आधार तो निरसला । ' असा सर्वत्र प्रकाशाचाच पसारा दिसतो जिकडे तिकडे त्या श्रीहरीच्याच खुणा मग दिसू लागतात 'धावे मागें मागें । जाय तिकडे चालत लागे ॥ तुका म्हणे नेले । माझें सर्वस्व विठ्ठले ' अशी त्याची जवळीक त्याना वाटत असे ' जेथें जातों तेथें तू माझा सांगाती । चालविसी हातीं धरूनिया ' अशी त्याची नित्य रमणीय सोबत मग उत्साहवर्धक वाटते सर्वत्र त्याच एका रूपाने विश्व भरून गेल्याचा अनुभव येतो ' ब्रह्मरसे गेले भरूनिया अंग ' अशी थोर प्रचीती मग येते

– खंड पहिला समाप्त –

# प्रथम खंडातील अभंगसूची

**क**

| अभंग | अभंग क्रमांक | अभंग | अभंग क्रमांक |
|---|---|---|---|

| अभंग | अभंग क्रमांक |
|---|---|